पूज्यश्री परमाचार्य चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी यांची वाणी

जीवनाचा वैधिक मार्ग

# ॥ हिंदू धर्म ॥



ramanjali
PRAKASHAN
रमांजली प्रकाशन

**आ नो भद्रः क्रतवो यन्तु विश्वतः।**

(ऋग्वेद १-८९-१)

उदात्त विचार अखिल विश्वातून आम्हां सर्वांकडे येवोत.

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
यांची वाणी

## जीवनाचा वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

रामांजली प्रकाशन

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
यांची वाणी

## जीवनाचा वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म



मराठी भावानुवाद
नारायण (काका) कुलकर्णी, सोलापूर (मो. 7709591944)
सुभाष कुलकर्णी, अहमदनगर.

॥ ॐ नमः शिवाय ॥
परम आदरणीय
जगद्गुरुश्री
डॉ. शिवाचार्य यांचे
पावन चरणी
नम्रतापूर्वक...
[signature]
नारायण कुलकर्णी
सोलापूर
१०-७-२०१०



ramanjali
PRAKASHAN
रामांजली प्रकाशन

जीवनाचा वैश्विक मार्ग
# हिंदू धर्म
The Universal way of life
HINDU DHARMA





प्रकाशक :
रामांजली प्रकाशन
'रामांजली', ३०/६९, पद्मनगर,
सोलापूर - ४१३००५
संपर्क : ९४२२०६६९२२, ९४२३५९१४२२
Email : himtex@gmail.com

अक्षरजुळणी
प्रमोद अंबुसे
गोपाल सुवर्णकार
सोलापूर

मुखपृष्ठ / रंगीत चित्रे
संतोष सोमा

प्रथम आवृत्ती
१६ एप्रिल २०१७

मुद्रितशोधन
पुरुषोत्तम नगरकर

स्वागतमूल्य
₹ ६००/-

मुद्रक
चेरी ऑफसेट प्रा.लि., सोलापूर



श्रृति स्मृति पुराणानाम् आलयं करुणालयम् ।
नमामि भगवत् पादम् शंकरं लोकशंकरम् ।।

## श्रीमद् आद्य शंकराचार्य

(इ. स. पूर्व ५०९–४७७)



अपारकरूणासिन्धुं ज्ञानदं शान्तरूपिणम् ।
श्रीचन्द्रशेखरगुरुं प्रणमामि मुदान्वहम् ॥

श्री कांचीकामकोटी पिठाचे ६८ वे शंकराचार्य

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेन्द्र सरस्वती महास्वामी

(इ. स. १८९४–१९९४)

*गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः*
*गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः।।*

वसुधैव कुटुम्बकम्
हा हिंदू धर्माचा आदर्श
सत्यात उतरविण्यासाठी ज्यांनी
आपले संपूर्ण जीवन समर्पित केले
त्या सर्व -
भारतातील व विश्वातील
ऋषिमुनी, संत, साधुजन आणि
आचार्य यांना
कृतज्ञतापूर्वक अर्पण

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
(२० मे १८९४ ते ८ जानेवारी १९९४)
हे श्री कांची कामकोटी पीठाचे
६८ वे शंकराचार्य.

त्यांच्या मूळ तमीळ प्रवचनांच्या संकलनाचे
फलस्वरूप म्हणजे हा ग्रंथ.

मूळ तमीळ ग्रंथरूप

- वानडी पडिप्पकम् प्रकाशन गृह, मद्रास.

इंग्रजी रूपांतर

- भारतीय विद्याभवन, मुंबई.

मराठी रूपांतर

- रामांजली प्रकाशन, सोलापूर.

**यस्य वेदमयी वाणी यस्य देवमयी तनुः।**
**यस्य ब्रह्ममयी दृष्टिः स गुरुः पातु मां सदा।।**

आर्य सनातन वैदिक हिंदू धर्माचे पुनरुद्धारकर्ते प्रातःस्मरणीय जगद्गुरू आद्य शंकराचार्य यांचे स्थान भारतीयच नव्हे तर वैश्विक विचारवंतांच्या परंपरेत अढळ आहे. सुमारे २५०० वर्षांपूर्वी केवळ बत्तीस वर्षांच्या लघु जीवनात चौफेर अखंड प्रवास, प्रस्थानत्रयी भाष्यासह केलेले विपुल, सकस, दर्जेदार लेखन, असंख्य वादांतून विरोधकांचा केलेला पराभव, भव्य व प्रदीर्घ विद्वान शिष्यपरंपरा व सर्वदूर धर्मसंस्कार केंद्र स्वरूप मठस्थापना; या व अशा कार्यांनी त्यांनी इतिहासाचे वळणच बदलून टाकून शुद्ध वैदिक धर्मास दिव्य तेज प्रदान केले.

पूज्य आचार्यांनी देशाच्या चारी दिशांना मठस्थापना करून आपल्या चार थोर शिष्यांना त्यावर विराजमान केले व ते स्वतः मात्र श्रीक्षेत्र कांचीपुरीत राहिले. त्यामुळे सर्व आचार्यपीठांचेही कांची हे गुरुपीठ होय! या पवित्र गुरुपीठाचे ६८वे शंकराचार्य परमाचार्य प्रातःस्मरणीय परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती यांनी या पीठाची कीर्तिपताका गगनास भिडविली. वयाच्या १३व्या वर्षी पीठारोहण करून आयुष्याच्या ९९व्या वर्षांपर्यंत तेवत राहिलेल्या या ईश्वरीय ज्योतीने वैदिक आचार-विचारांच्या माध्यमाने जगास अव्याहतपणे धर्मप्रकाश प्रदान केला. सखोल अध्ययन, कडकडीत तपाचरण, अखंड कार्यमग्नता व कमालीचे साधे जीवन यांचे मूर्तिमंत स्वरूप म्हणजे पूज्य परमाचार्य होत. त्यांच्या सहवासात महिनाभर राहिल्यावर पूज्य स्वामी करपात्रीजी महाराज उद्गारले- 'असे आचार्य अन्य कुणी झालेच नाहीत.' त्यांच्या या एका वाक्यात पूज्य परमाचार्यांचे व्यक्तिमत्त्व काय असेल याचे प्रत्यंतर येते.

अशा या परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामीजी यांनी प्रवर्तित केलेल्या तमीळ भाषेतील प्रवचनांच्या इंग्रजीतील अनुवादाचे श्री. नारायणकाका कुलकर्णी, सोलापूर यांनी मराठीमध्ये केलेले हे रूपांतर अत्यंत समर्पक आणि समर्थ असे झाले आहे. या कार्यात त्यांना नगरचे श्री. सुभाष कुलकर्णी यांचाही मोलाचा सहभाग लाभला आहे. एकूण २२ भागांमध्ये २४५ प्रकरणांतून हे विवेचन विस्तारले आहे. या अलौकिक योगदानाबद्दल व धर्मसेवेबद्दल श्री. कुलकर्णी द्वयांचे प्रारंभीच मनःपूर्वक अभिनंदन!! त्यांनी केलेली विषयांची मांडणी प्रवाही व प्रभावी असून तीस प्रासादिकतेमुळे अधिकच सौष्ठव लाभले आहे. प्रत्येक हिंदुत्वप्रेमीला हा ग्रंथ अतिशय मार्गदर्शक व अभिमान वाटावा इतका उपयुक्त झाला आहे.

प्रारंभीच्या प्रकरणात 'एक धर्मच करी रक्षण' शीर्षकाखाली दिलेले प्रास्ताविक आणि त्यातून उलगडत गेलेला एकेक विषय मनामध्ये उद्‌भवणाऱ्या अनेक शंकांचे निरसन करण्यात यशस्वी ठरला आहे. परमात्म्याशी होणाऱ्या तादात्म्यात अविनाशी आनंद मिळतो हीच सर्व धर्मांची शिकवण असून प्रत्येक धर्माने मनुष्याला ईश्वराभिमुख करण्याचे ध्येय मानल्याचे विवेचन सारभूत सत्य होय! धर्माच्या प्रयोजनात मोक्षाचे वैशिष्ट्य व त्यासाठी सांगितलेले सिद्धान्त याच्या पालनाला 'धर्म' म्हणतात; हे म्हणणे व्यवहार्यच आहे. धर्म आणि धर्मगुरूंची वैशिष्ट्ये सांगताना तो स्वार्थत्यागी, निष्कलंक, सदाचारसंपन्न, शांत व करुणामय असावा असे नमूद करून त्यामुळे धर्मविकास साधला जातो ही गोष्ट मार्गदर्शक होय!

'हिंदू धर्मा'बद्दल दिलेली सीमित व्याख्या बघता 'वैश्विक धर्म' हीच त्याची ओळख अचूक व अर्थपूर्ण वाटते. वैदिक धर्मातील कर्मसिद्धांताचे वैशिष्ट्यही पू. महाराजांनी अधोरेखित केले आहे. माणसाचे उन्नयन करून त्याला सद्‌धर्माचा मार्ग दाखविण्यासाठी ईश्वर भूलोकात पुनः पुन्हा अवतार घेतो हे गीतेतील वचन 'धर्माची' आवश्यकता व संरक्षणाचे प्रयोजन प्रतिपादन करतात. आज अस्तित्वात असलेल्या विविध धर्मांचे उगमस्थान व त्यांचे तत्त्वज्ञान यांचा परामर्श घेता 'वेद' हेच सर्वांचे मूळ असल्याचे निर्विवाद मान्य होते. त्यानंतर 'वैदिक धर्म आणि वर्णधर्म' प्रकरणातून समाजकार्य व व्यवस्था व्यवस्थित कार्यरत राहावी यासाठी आवश्यक असणारे घटक व वर्णधर्माच्या ऱ्हासाला जबाबदार असलेल्या 'ब्राह्मण' वर्गाविषयी अतिशय वास्तव असे विश्लेषण, विवेचन केले आहे. महात्मा गांधींच्या 'माझा वर्णाश्रम धर्म' या शीर्षकाच्या निबंधावर मल्लिनाथी करताना, आमचा समाज असा असला पाहिजे की ज्यात उच्च-नीच अशी विषमता असता कामा नये. सर्वजण ईश्वराची लेकरे मानल्यावर एकमेकांना साहाय्य करीत शांत व सुख-समाधानाने जगावे हे अगदी स्वाभाविक होय, त्यासाठी समाजातील वर्गसंघर्ष थांबवला पाहिजे हे पटवून दिले आहे. अशा या परिस्थितीत परमाचार्य पूज्यश्रींनी आपल्या कार्याचे प्रयोजन, 'ब्राह्मणांनी आपले वैदिक धर्माचे कार्य सोडू नये, ते अखंड चालू ठेवावे' हे सांगून वैदिक धर्माच्या उन्नतीसाठी काही योजना नमूद करून वैदिक परंपरा टिकवून कल्याण साधावे असे प्रतिपादन केले आहे.

संस्कृतीला 'आधुनिक' उपाधीचा जडलेला रोग; त्याच्या निवारणाचा मार्ग सांगताना, माणसांनी आपल्या इच्छापूर्तीसाठी भौतिक सुखसाधने मिळविण्यासाठी संघर्ष केला, त्याऐवजी धर्माचरण करून मोक्ष मिळविण्यासाठी प्रयत्न करणे गरजेचे आहे हे तर वस्तुस्थितीला धरूनच आहे. धर्माने वागूनच अविनाशी आनंदाचा लाभ होऊ शकतो हे परमसत्य होय!

संपूर्ण ग्रंथात भाग क्र. ५ हा सर्वाधिक विषयांचा सविस्तर ऊहापोह करणारा असून त्यामध्ये ४३ प्रकरणे समाविष्ट आहेत. हा भाग म्हणजे संपूर्ण ग्रंथाचे विविध रत्नरूपी विचारांनी साकारलेले दालन आहे. 'हिंदूंच्या मूळ धर्मग्रंथांविषयीचे आमचे 'अज्ञान', 'धर्माची आवश्यकता' येथून 'वेदांची महानता', 'यज्ञाचा हेतू', 'चार वेद', 'ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर', 'ब्राह्मणांची कर्तव्ये', 'वेदांची सहा अंगे' ही सगळीच प्रकरणे माहितीपूर्ण तर आहेतच, परंतु त्यातून व्यक्त केलेले संदेश, संदर्भ हे निश्चितच धर्म व समाजव्यवस्थेसाठी मौलिक असेच आहेत. या प्रकरणांतून पू. आचार्यांचा व्यासंग व व्याप्ती याचा योग्य परिचय होऊन त्यांच्या कार्यकर्तृत्वाची खऱ्या अर्थाने ओळख होते.

फक्त आपल्या धर्मामध्येच रूढ असणाऱ्या यज्ञपरंपरेचा तिहेरी उद्देश आणि त्यामागील भूमिका फारच चांगल्या प्रकारे प्रस्तुत केली आहे. त्यातील चुकीच्या व गैरसमजुतीतून घडणाऱ्या परंपरांबद्दल केलेले विवेचन उद्‌बोधक ठरणारे आहे. ब्राह्मण, आरण्यक, उपनिषदे, ब्रह्मसूत्र, दहा उपनिषदे यांविषयी परमाचार्यांच्या अमूल्य विचारांना श्री. कुलकर्णी यांनी आपल्या शब्दसाजातून अधिक परिणामकारक असे ठसविले आहे. 'वेद आपल्याला काय शिकवितात?' हे प्रकरण सर्वसामान्यांच्या दृष्टीने मौलिक आहे. त्यातील हा विचार, 'जे आत्म्याचे चिंतन करतात आणि सत्य जाणतात ते आत्मा आणि ज्ञान व जाणीव यांतून तयार झालेली शक्ती ओळखतात'. हे विचार अत्यंत महत्त्वाचे आहेत. ब्राह्मणांची कर्तव्ये, आजच्या सामाजिक परिस्थितीत आवश्यक व योग्य आहेत. वेदांची महानता नमूद करताना, 'एखाद्या माणसाच्या शरीराच्या सर्व भागांना वेदना आहेत पण त्याचे हृदय भक्कम आहे तर तो जगेल, त्याचप्रमाणे ह्या भूमीत वेदांची भरभराट झाली तर सर्व राष्ट्रे भरभराटीस येतील आणि शांततेने व सुखाने राहतील' ही वैदिक धर्माची धारणा खऱ्या अर्थाने वैश्विक धर्माची ओळख करून देणारी आहे.

परमाचार्य पूज्यश्रींचे स्मरण करताना या प्रस्तावनेच्या आरंभी दिलेला श्लोक मला नेहमी आठवतोः ज्यांची वाणी वेदमय आहे, ज्यांचा देह देवमय आहे व ज्यांची दृष्टी ब्रह्ममय आहे असे ते आमचे सर्वांचे परम गुरुदेव होत. त्यांचे तेजोमय चैतन्य आजही भक्तांचे परमकल्याण करीत असते असा भक्तांचा अनुभव आहे. मी तर त्यांचा विशेष करुणाकटाक्ष अनुभवला आहे. माझ्याकडून त्यांनी श्रीमद्‌भागवताचे निवडक श्लोक व विवेचन ऐकून स्वतःच्या गळ्यातील हार माझ्या गळ्यात घालायला प्रसाद म्हणून देऊन आशीर्वाद दिला. माझ्या पूजेतील मुख्य विग्रहाची प्राणप्रतिष्ठा परमाचार्य पूज्यश्री जयेन्द्र सरस्वती स्वामी महाराजांनी केली. त्यावर पूज्य परमाचार्यांनी स्वतः बेल-फुले वाहून त्यास अभिमंत्रित केले. शेवटच्या दर्शनप्रसंगी मला त्यांच्या चरणकमलांवर मस्तक टेकण्यास कृपापूर्वक अनुमती दिली व स्वतःच्या अंगावरील वस्त्र माझ्या अंगावर

घालण्यास पूज्य बालस्वामींना सांगितले. हे सर्व देवदुर्लभ सद्भाग्य होय! त्यांच्या वाङ्मयतीर्थाचे या प्रस्तावनेच्या रूपाने मला पूजन करण्याची संधी लेखकांनी दिली या सुयोगाबद्दल त्यांचे आभार!

संपूर्ण वैदिक, संस्कृत व भारतीय वाङ्मयरूप क्षीरसागराच्या, पूज्य परमाचार्यांच्या ऋतंभरा प्रज्ञेने केलेल्या मंथनातून आपणास हा अमृतकलश प्राप्त झाला आहे. हिंदू धर्माशी संबंधित व वेदांना अनुसरून प.पू. परमाचार्यांनी आपल्या शब्दसौंदर्याने, अर्थपूर्ण विचारांनी प्रस्तुत केलेली विचारांची ही अलौकिक विचारगंगा श्री. नारायण कुलकर्णी आणि श्री. सुभाष कुलकर्णी यांनी तितक्याच समर्थपणे, सहजतेने मराठी वाचकांपर्यंत पोहोचवून अमूल्य असा अमृतकलश प्रदान केला आहे. या विचारगंगेत सुस्नात होऊन आपल्या धर्माचे वैशिष्ट्य, वेदांची महानता व मानवधर्म या सर्वच आघाड्यांवर फार मोठे वैचारिक मंथन होऊन योग्य दिशादर्शन लाभेल, वैदिक सनातन धर्म बलवान होईल. त्यांच्या अलौकिक, अनुपमेय व असीम योगदानाबद्दल पुनश्च अभिनंदन! प्रत्येक धर्मप्रेमी व हिंदूंनी आवर्जून अभ्यासावा, संग्रही ठेवावा असा हा अनमोल खजिना श्री. कुलकर्णी द्वयांनी परिश्रमपूर्वक प्रदान केला; त्याचे सर्वत्र स्वागत व्हावे ही श्रीज्ञानेश्वरचरणी प्रार्थना. इति!

श्रीज्ञानेश्वरपदाश्रित

स्वामीगोविंददेवगिरिः

'धर्मश्री', पुणे
अनंत चतुर्दशी
दि. १५/०९/२०१६

स्वामी गोविंददेव गिरि
(आचार्य किशोर व्यास)

***तयांचे बिसाट शब्द । सुखें म्हणो येती वेद***
***सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ।।*** (ज्ञा. १८-१६४५)

(त्यांच्या मुक्त बोलांना सहजच, 'वेद' संज्ञा प्राप्त होते; ते स-देह सच्चिदानंदच होत!)

अशा शब्दांत संतश्रेष्ठ श्री ज्ञानेश्वर महाराजांनी ज्या सिद्ध पुरुषांची थोरवी सांगितलेली आहे, त्या श्रेणीचे व आपल्या अलौकिक विभूतिमत्वाने दक्षिण भारतात संचारी देव (Walking God) म्हणून ओळखले गेलेले प्रातःस्मरणीय परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी हे श्रीमद् आद्य शंकराचार्य स्थापित कांची कामकोटी पीठाचे ६८वे पीठाधिपती होत.

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी हे १९०७ मध्ये, वयाच्या अवघ्या १३व्या वर्षी, कांची कामकोटी पीठाचे ६८वे शंकराचार्य झाले. २०व्या शतकाचा अधिकांश भाग हा त्यांचा जीवनकाळ. त्या काळातील सामाजिक आणि राजकीय अस्वस्थ स्थितीतील मार्गदर्शक प्रकाशकांपैकी ते एक. खरोखरच, त्या काळातील थोर आध्यात्मिक विभूतिमत्व- दिव्यत्याचे रूपच ते. वैदिक धर्मास पुनश्च गतकाळातील गौरव प्राप्त करून देण्याचे त्यांचे कार्य हे श्रीमद् आद्य शंकराचार्यांसारखेच होते.

गुरूंचेही गुरू असलेले हे परमाचार्य एखाद्या तेजःपुंज दीपकळीसारखे होते. धर्म आणि संस्कृती यांसारख्या अनेक क्षेत्रांत त्यांनी राष्ट्रात चैतन्य निर्माण केले. भरतवर्षाचे ते आंतरिक बोल होते. विज्ञान-तंत्रज्ञानात उंच झेप घेऊनही अंधारात चाचपडणाऱ्या मानवाला त्यांनी अधिक उच्चस्तर स्थितीकडे कशी वाटचाल करावी आणि उच्चतम स्वतंत्रता- आत्मसत्तेचे स्वातंत्र्य कसे प्राप्त करून घ्यावे, हे शिकविले.

त्यांच्या ज्ञानाइतकीच त्यांची करुणा असीम होती. त्यांची शांत मुद्रा आमच्या अंतःकरणातून कधीही पुसली जाणार नाही, आशीर्वादासाठी उंचावलेल्या त्यांच्या हाताचे स्मरण आमच्यावर कृपेचा अखंड वर्षाव करीत राहील. वाऱ्यासवे आणि सागराच्या लाटांवर लहरत येणारी त्यांची वाणी अजूनही कानी येते. आणि त्यांच्या दिव्य अस्तित्वाच्या अनंतत्वाची आम्हाला जाणीव होत राहते...

# अनुवादकाचे मनोगत

ईश्वरकृपेचे देणे। साकारले 'अक्षरलेणे'
तेथ 'माझेपण' मिरविणे। निरर्थक।।

कांची कामकोटी पीठाचे ६८वे शंकराचार्य परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती यांच्या 'हिंदू धर्म' ग्रंथाच्या अनुवादाचे कार्य माझ्याकडे आले ते माझ्या पात्रतेपेक्षा माझी 'पूर्वसुकृताची जोडी' अधिक होती म्हणूनच. ते कळसाला गेले तेही परम सद्गुरूंच्या कृपेमुळेच होय.

हे काम करीत असताना माझ्या वाढत्या वयापेक्षा माझा उत्साहच अधिक कामास आला. सुमारे ७०० पृष्ठांचा अनुवाद म्हणजे मला तरी प्रचंड पर्वतच वाटला. परंतु अहमदनगरचे माझे मित्र, अनुभवी अनुवादक श्री सुभाष कुलकर्णी हे मी विनंती करताच देवासारखे माझ्या मदतीला धावून आले. परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती यांच्या भाषणांवरील 'दि वेदाज' या इंग्रजी ग्रंथाचा त्यांचा अनुवाद 'वेदांची तोंडओळख' या नावाने प्रसिद्ध झाला आहे. सुभाषजींनी केलेल्या निरपेक्ष साहाय्यातूनच हा ग्रंथ साकार झाला. अनुवादात त्यांचा मोलाचा वाटा आहे.

माझे दुसरे मित्र श्री पुरुषोत्तम नगरकर. गीतेत वर्णिलेल्या 'अमानित्वा'चे साकार रूप.

पार्थ तेणें पाडें। सन्मानें जो सांकडे
गरिमेतें अंगाकडे। येवोचि नेदी।। (ज्ञानेश्वरी १३-१८७)

'सन्मान वाटे संकट भारी' अशा नगरकरांनी केवळ मुद्रितशोधनच नव्हे तर ग्रंथाच्या भाषेतही आवश्यक सुधारणा करीत हा ग्रंथ सिद्ध होण्यास अपार परिश्रम घेतले.

हे इतके जरी झाले तरी हा ग्रंथ साकार होण्यात 'सिंहाचा वाटा' आहे तो श्री सत्यरामजी म्याकल यांचा. त्यांची आत्यंतिक तळमळ व पराकोटीची जिद्द यामुळेच हे अशक्यप्राय कार्य संभव झाले.

सर्वश्री सुभाष कुलकर्णी, पुरुषोत्तम नगरकर व सत्यरामजी यांचा तर मी ऋणी आहेच, शिवाय माझ्या गुणदोषांसह माझ्यावर निरंतर प्रेम करणाऱ्या असंख्य मित्रांचा व मला 'आपला' म्हणणाऱ्या आदरणीय महानुभावांचा मी अत्यंत ऋणी आहे.

कितीही काळजी घेतली तरीही ग्रंथात काही उणिवा राहू शकतात, राहिल्या असतील. कृपया वाचकांनी समजून घ्यावे.

तरी न्यून तें पुरतें। अधिक ते सरतें
करूनि घेयावें हे तुमतें। विनवितु असे।। (ज्ञानेश्वरी १-८०)

सोलापूर
दि. २८ मार्च २०१७ (गुढीपाडवा)

नारायण (काका) कुलकर्णी

# प्रकाशकाचे मनोगत

*अखण्ड मण्डलाकारं व्याप्तं येन चराचरम्।*
*तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः।।*
*अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानांजनशलाकया।*
*चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः।।*

प्रातःस्मरणीय परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी हे कांची कामकोटी पीठाचे ६८वे शंकराचार्य होत. श्रीमद् आद्य शंकराचार्य यांच्या निवासाचे पीठ म्हणून कांची कामकोटी पीठास विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी यांनी वयाच्या १३व्या वर्षी पीठाधिपती झाल्यापासून ते थेट १००व्या वर्षी सहजपणे महासमाधी घेईतो धर्मसंवर्धनाची धुरा समर्थपणे सांभाळत लोककल्याणार्थ आपली काया चंदनाप्रमाणे झिजविली, या परिव्राजकाने तब्बल २१ वर्षे पायी भारतभ्रमण करीत लाखो हृदयी धर्मभावना रुजविली. ते नडीचे देवूडु/नडमाडू देव/Walking God/चालता बोलता ईश्वर म्हणूनच ओळखले जात.

माझ्या आयुष्यात या दिव्य विभूतीच्या दर्शनाचा मंगलयोग १९८१मध्ये आला. पंढरपुरी आपला चातुर्मास संपवून परमाचार्य सोलापूरकडे येताना मोहोळमुक्कामी असता मला सहपरिवार, त्यांच्या दर्शनाचा लाभ झाला. नंतर पुढेही अनेक निमित्तांनी त्यांच्या पावन संपर्कात राहता आले, कृपानुग्रह झाला, मठात येणे-जाणे चालू झाले.

परमाचार्यांच्या प्रवचनांवरील Hindu Dharma-The Universal way of life हा इंग्रजी ग्रंथ, एकदा तिरुमलाला गेलो असता माझ्या पाहण्यात आला. परमाचार्यांनी चेन्नई येथे आपल्या शिष्यांसह दोन वर्षे मुक्काम केला होता. कांची कामकोटी पीठ-देवतांचे पूजन आणि नंतर प्रवचन असा कार्यक्रम तब्बल दोन वर्षे चालला. सुगम भाषेत प्रवचने करून त्यांनी सनातन वैदिक धर्माची ज्ञानगंगा जनसामान्यापर्यंत पोहोचविली होती. ही तमीळ प्रवचने पुढे काही खंडांतून प्रसिद्ध झाली. या प्रवचनांपैकी बहुतेकांचा समावेश करीत 'भारतीय विद्या भवन'ने साकारलेला तो इंग्रजी ग्रंथ होता.

परमाचार्यांचे हे मौलिक विचारधन मराठी भाषेत आणले पाहिजे असे माझ्या मनाने घेतले. आणि कांची कामकोटी मठाचे आचार्य जयेंद्र सरस्वती स्वामीजी आणि पीठाधिपती आचार्य शंकर विजयेंद्र सरस्वती स्वामीजी यांच्या अनुग्रहाने माझा त्या दिशेने प्रवास सुरू झाला. अनुवादकाचा शोध घेत घेत मी माननीय श्री विवेक घळसासी यांच्या मदतीने ज्येष्ठ साहित्यिक श्री नारायण (काका) यांच्यापर्यंत येऊन पोहोचलो. काकांचा 'प्रसाद ज्ञानेश्वरी' हा ज्ञानेश्वरीचा आजच्या मराठीतील सुगम, समओवी भावानुवाद

प्रसिद्ध आहे. तसेच त्यांचा कान्हनगड, केरळ येथील 'आनंदाश्रम'चे प्रणेते स्वामी रामदास यांच्या 'God Experience'वर आधारित 'अमृतवचने' हा ग्रंथही प्रकाशित झाला आहे.

अनुवादाचे प्रस्तुत काम खूप मोठे तर होतेच, शिवाय सहजसाध्यही नव्हते. परंतु काकांनी ते त्यांचे स्नेही - अहमदनगरचे श्री सुभाष कुलकर्णी यांचे साहाय्य घेत आत्मीयतेने पूर्ण केले. दोघांनाही मी मनःपूर्वक धन्यवाद देतो. मुद्रितशोधक श्री पुरुषोत्तम नगरकर यांचेही मी हार्दिक आभार मानतो.

माझी प्रार्थना स्वीकारून आचार्य किशोरजी व्यास यांनी 'अमृतकलश' प्रस्तावना लिहून ग्रंथाच्या वैभवात भर घातली आहे. त्यांना कृतज्ञतापूर्वक सादर प्रणाम.

ग्रंथाच्या उभारणीत अनेकांचे प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष सहकार्य लाभले; त्या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

'जीवनाचा वैश्विक मार्ग : हिंदू धर्म' हे 'रामांजली प्रकाशना'चे पहिलेच पुष्प आहे. माझ्या हातून पूज्यश्री परमाचार्यच ही सेवा रुजू करून घेत आहेत; असे वाटते. माझ्या आयुष्यातील हा परमभाग्याचा क्षण आहे.

परमपूज्य परमाचार्यांच्या कृपेने सिद्ध झालेला हा ग्रंथ मराठी वाचकांच्या धार्मिक, आध्यात्मिक जाणिवा समृद्ध करील असा विश्वास वाटतो.

सोलापूर, दि. ४ एप्रिल २०१७ — **सत्यराम म्याकल**
'रामनवमी'

परमाचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी यांची वाणी

## जीवनाचा वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

### अनुक्रम

परमाचार्य पूज्यश्री
चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
यांची वाणी

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

परमाचार्य पूज्यश्री
चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
यांची वाणी

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

**भाग - १**

**धर्म : सामान्य स्वरूप**

।। श्री राम ।।

## प्रकरण - १

# एक धर्मच करी रक्षण

पिंपळ आणि निंब ही प्रकृतिमातेच्या वनस्पतिसृष्टिसाम्राज्याची वैभवशाली लेकरे आहेत. नव्या वर्षाच्या आगमनाची चाहूल लागताच ते आपली पाने ढाळू लागतात आणि नंतर अल्पावधीतच त्यांना नवी कोवळी हिरवी पालवी फुटू लागते. हा सर्व सृष्टिमातेचा अगाध लीलासोहळा आहे.

पिंपळाच्या आणि निंबाच्या झाडाखाली विनायक आणि नागराज यांच्या मूर्तींची स्थापना करून पिंपळाचे व निंबाचे लग्न लावण्याची परंपरा फार पुरातन काळापासून चालत आली आहे. शिशिरात पुन्हा थंडीच्या कडाक्यात पानगळीमुळे ही झाडे उघडी-बोडकी दिसू लागतात, त्यांच्या तळाशी असलेल्या विनायक आणि नागराज यांच्या डोक्यावरली सावली हरवते आणि त्यांना उन्हे झेलावी लागतात. आता उन्हाचा फारसा तडाखा नसतो आणि थंडीचा विशेष कडाकाही नसतो. त्यामुळे मोकळ्यावर, थंड आभाळाखाली बसून कोवळे उन्ह खाता येते. पाऊसधारा कोसळू लागतात किंवा सूर्याचे उन्ह चटके देऊ लागते तेव्हा आपण रक्षणासाठी छत्री घेतो. जेव्हा थंडीच्या कडाक्याने हुडहुडी भरू लागते तेव्हा आपण मोकळ्यावर बसू शकत नाही आणि आभाळाकडे एकटक पाहू शकत नाही. परंतु आता मात्र जेव्हा पानगळ सुरू होते आणि सोसेल इतके बेताचेच उन्ह असते, तेव्हा आपण टक लावून आभाळाकडे पाहण्यासाठी दिवसा किंवा रात्रीच्या वेळी मोकळ्या परिसरात बसू शकतो. 'शिवरात्र' झाली की थंडी 'शिव शिव' म्हणत सृष्टीचा निरोप घेत पळ काढते. या मोसमाचा सुखद लाभ प्रकट करण्यासाठीच जणू पिंपळाच्या आणि निंबाच्या झाडांची पाने झडल्यावर प्रकृतिमाता या झाडांच्या तळाशी असलेल्या विनायक आणि नागराज यांची सूर्याच्या कोवळ्या किरणांनी पूजा करू लागते.

नागराजाला सुब्रह्मण्य (कार्तिकेय) असेही म्हणतात. तेलुगू भाषक लोकांना सुब्बारायडू या शब्दाचे सुब्रह्मण्य आणि नाग हे दोन्हीही अर्थ माहीत असतात. षष्टीला नागांची पूजा करण्याची प्रथा तामीळ भाषकांत पूर्वापार चालत आली आहे. पार्वती आणि महादेव यांची संतती असलेल्या विघ्नेश्वर आणि सुब्रह्मण्य यांच्याविषयीची प्रकृतिमातेच्या मनातील ही धारणा तिच्या आपल्या सर्वांवरील प्रेमाचे द्योतकच आहे कारण आपण देखील त्या आद्य युगुलाची संताने आहोत.

या प्रेमात एक पूर्णत्व आहे. मी या आधीच म्हटल्याप्रमाणे जेव्हा फार उन्हही नसते आणि फार गारठाही, तेव्हा विघ्नेश्वर आणि नागराज दोघेही उन्हात असतात. पण

वसंत ऋतूचा प्रभाव जसा वाढत जातो तशी प्रकृतिमाता या दोन्ही देवतांचा उन्हाच्या उपद्रवापासून बचाव करते. कसे म्हणाल तर नव्याने पाने फुटलेली ही झाडे विनायक आणि नागराज यांच्या मस्तकावर हिरवीगार छत्री धरतात. पानगळ होणे आणि पुन्हा पालवी फुटणे हा निसर्गक्रम आहे. सृष्टीच्या आरंभापासून चालत आलेला, विश्वाच्या कधी न बदलणाऱ्या नियमांचा तो खेळ आहे.

या विश्वातील वस्तुमात्रांचे संचालन करणारा एक नियम आहे. हे विश्व व्यवस्थित चालावे म्हणून आम्ही त्या नियमाच्या अधीन राहिले पाहिजे. अन्यथा सर्व गोष्टींचे तिरपगडे होऊन परिणामी अनागोंदी होईल. विश्वनियंत्याची ही इच्छा आहे की त्याची ही संपूर्ण सृष्टी आणि अखिल चराचर आनंदात राहावे. म्हणूनच तर त्याने सर्वांसाठी एक नियम लागू केला - धर्म निर्माण केला. या धर्माच्या अनुपालनाने अवती-भवती, चोहीकडे एक सुंदर शांतिपूर्ण सामरस्य नांदते. ईश्वर जसा सृष्टीतील आपल्या संतानांचे सूर्याच्या प्रखर उन्हापासून आणि पावसापासून रक्षण करतो तसेच गरज असेल तेव्हा तो प्राणिमात्राला कोवळ्या उन्हाची ऊबही देतो. त्याचे आपल्या संतानाविषयीचे प्रेम एका विशिष्ट प्रणालीतून प्रकट होत राहते. ही प्रेमप्रणाली त्यानेच घालून दिलेली आहे. जिच्यामुळे प्रकृती आणि विश्वनियंत्रक नियम या दोन्हीचेही कार्य चालते. वनस्पतिसृष्टीसाठी त्याने लागू केलेली प्रणाली या नियमाचाच एक भाग आहे.

ईश्वराच्या प्रेमास आपण पात्र व्हावे म्हणून आपल्या अंगी काही गुणविशेष, काही सद्‌गुण असावयास हवेत. जर वृक्षांना लागू होणारा एक नियम आहे तर आम्हांलाही लागू होणारा एखादा नियम असावयास हवा. अशा नियमाच्या पालनाने व संपूर्ण मानवजातीच्या कल्याणासाठी कार्ये करीत राहण्यानेच आम्ही ईश्वराच्या प्रेमास व दयेस पात्र ठरू. ज्याला धर्म म्हटले जाते-तोच आहे हा माणसाच्या आचरणांचे नियमन करणारा सर्वंकष नियम. ईश्वराने मानवाला बुद्धीचे वरदान दिले आहे पण त्याच बुद्धीचा उपयोग तो धर्माच्या आज्ञेचा भंग करण्यासाठी करीत आहे. असे आम्ही का करीत आहोत ? असा प्रश्न कोणी आम्हांस केल्यास आमचे एकच उत्तर असते, 'सारा ईश्वराच्या लीलेचा खेळ आहे ! 'माणूस कोणत्या ना कोणत्या वस्तूची सतत कामना करीत राहतो. त्याला वाटत असते की त्या विशिष्ट वस्तूच्या प्राप्तीने तो सुखी होईल. आणि त्याचवेळी तो धर्माचे उल्लंघनही करीत राहतो. परंतु त्याला आज ना उद्या कळून येते की शेवटी केवळ धर्मच त्याला सुख देऊ शकतो.

विश्वात असे काही तरी आहे की ज्यामुळे कोणत्या ना कोणत्या प्रकारे सर्वजण धर्माकडे वळतात. हे असे 'काहीतरी' जे आहे तेच मानवाला आपल्या भौतिक गरजांच्या पलीकडे जाऊन काही विलक्षण गोष्टी करण्याची प्रेरणा देते. कोणी हातात क्रॉस घेऊन

बायबल वाचू लागतो, दुसरा कोणीतरी आपल्या सर्वांगास भस्म लावतो, तर तिसरा कोणीतरी वैष्णवाची मुद्रा धारण करतो. पिढ्यानपिढ्या माणसे अशा गोष्टींचे पालन म्हणून करीत आली आहेत. पण प्रत्यक्षात त्यांना कोठलेच दृश्य फळ मिळालेले दिसत नाही याचे काय कारण असावे?

माणूस प्रथमतः आपल्या दैनंदिन गरजा भागविण्यासाठी उपजीविकेचे काही ना काही साधन शोधू लागला. परंतु त्याला लवकरच कळून आले की वर्तमानातल्या सर्व गरजा भागविण्यासाठी हे अर्थार्जन पुरेसे नाही. मग तो आपली कमाई कशी वाढेल व भविष्यकालीन गरजांसाठी काही बचत कशी करता येईल याचा प्रयत्न करू लागला. परंतु लवकरच 'भविष्यकाल' म्हणजे नेमके काय याचा प्रश्न त्याच्या मनात फेर धरू लागला. यावर विचार करताना त्याला स्पष्टपणे कळून आले की या पृथ्वीवरचा त्याचा भविष्यकाळ काही कायमस्वरूपी नाही. त्याचा अंत निश्चित आहे. तो हजार किंवा दहा हजार वर्षे जगणार नाही. मग तो आपल्याला आयुष्यभर व पुढे आपल्या मागे मुलाबाळांना पुरेल इतके कमावण्याच्या प्रयत्नाला लागला.

मृत्यूनंतर माणसाचे काय होत असेल हा प्रश्नही त्याला भेडसावू लागला. विभिन्न देशांत वेळोवेळी जन्मलेल्या महान माणसांचा असा विश्वास होता की देह नष्ट झाला तरी 'माणूस' म्हणून असलेले आपले अस्तित्व काही संपत नाही. त्यांच्या मनात हे सत्य प्रकट झाले होते की माणसाने देहधारणेसाठी कमावलेली धनदौलत त्याच्या ईहलोकातून जाण्यानंतर त्याच्या काडीमात्रही उपयोगाला येत नाही. यानंतर माणसाच्या मनाचा जर कोणत्या विचाराने ताबा घेतला असेल तर तो म्हणजे मरणोत्तर स्थितीत माणसाला उत्तम अवस्था कशी प्राप्त करून घेता येईल. या विचाराने विभिन्न देशांतल्या धर्माग्रर्णींनी याबाबतीत वेगवेगळ्या मार्गांचा उपदेश केला. क्रॉस, नमाज, पवित्र विभूती, पवित्र तीर्थस्थाने इत्यादींचे प्रचलन विभिन्न धर्मांच्या उपासकांच्या आचरणातून या प्रकारे प्रकट झाले.

''हे जग त्या विश्वनियंत्या ईश्वराचे आहे या दृष्टीनेच तुम्ही जगाकडे पाहिले पाहिजे व तुमची प्रत्येक कृती त्या धारणेतूनच व्हावयास हवी. यातूनच मानवधर्म निर्माण होतो. केवळ स्वार्थी हेतूने प्रेरित झालेली कोणतीही कृती माणसाला अधार्मिकतेच्या खाईत लोटल्याशिवाय राहत नाही. आपला विचार आणि आचार या दोन्ही बाबतींत आपला स्वार्थी हेतू रोज जास्तीत जास्त कमी कसा होत जाईल हे माणसाने पाहिले पाहिजे. त्याने सतत ईश्वराचे स्मरण ठेवावे व तो ईश्वर या जगाचा स्वामी आहे ही जाणीव सतत जागती ठेवली पाहिजे'' सर्व धर्मांची उभारणी या जाणिवेवरच झालेली आहे.

'आपल्या लहरीप्रमाणे व मनाला येईल तसे वागा' असे कोणताच धर्म शिकवीत

नाही. 'केवळ आपल्याच वैयक्तिक गरजा भागविण्यासाठी धनदौलत मिळवा' असे कोणताच धर्म शिकवीत नाही. जर कोणी केवळ आपणच महत्त्वपूर्ण आहोत व सर्व काही आपणच आहोत असे मानत असेल तर तो फक्त स्वतःसाठीच जगतो आहे. आणि म्हणूनच सर्व धर्म ईश्वर किंवा तत्सम शक्तीचे अस्तित्व मानतात व आपले अहंकारजन्य मीपण टाकण्यास शिकवितात. ते म्हणतात, ''मुला, तू या विश्वनिर्मात्या सार्वभौम महासत्तेपुढे काहीही नाहीस. त्या सर्वश्रेष्ठ सत्तेने तुला बुद्धी दिली. तुझ्या या बुद्धीने, प्रज्ञेने तुला धर्माचा श्रेष्ठ पंथ दाखविला पाहिजे, तुझ्यात धर्मपरायणता निर्माण केली पाहिजे. याकरिता या महासत्तेकडे तू एकमेव आधार म्हणून पहा. सदाचारास दैवी शक्तीचे अधिष्ठान हवे या श्रद्धेमुळेच सर्व धर्मांत भक्ती आणि उपासना यांस महत्त्व दिल्याचे आढळते.

अमूर्त स्वरूपात असलेल्या परमेश्वराविषयी श्रद्धाभाव निर्माण करणे किंवा भक्तिभावना वाढीला लावणे सामान्यतः सोपे काम नाही. सर्वसाधारण माणसाच्या बाबतीत भक्तीचे स्वरूप अधिक व्यावहारिक असावयास हवे. धार्मिक कर्मकांडाचा उगम यातच आहे. संध्यावंदन, नमाज आणि प्रार्थनांची विविध रूपे ही या कर्मकांडाचीच उदाहरणे आहेत. आपल्या कर्तव्याचे पालन करावे, जगात आपले आचरण कसे असावे आणि ऐहिक जीवनातही ईश्वराला समर्पित कसे व्हावे हेच सर्व धर्म लोकांना शिकवीत असतात.

'सर्वांवर प्रेम करा' 'त्यागाचे जीवन जगा' 'मानवतेची सेवा करा' हीच विभिन्न धर्मांची शिकवण असते. या शिकवणुकीप्रमाणे माणूस आचरण करील तर देह सोडल्यानंतर त्याचा आत्मा परमात्म्याप्रत पोहोचेल असा विश्वास सर्व धर्मांच्या धारणेत आहे. जे अद्वैत सिद्धान्त मानतात ते ठामपणे म्हणतात की देहविसर्जनानंतर आत्मा परमात्म्याप्रत पोहोचल्यानंतर तो अनंत काळ तेथे परमात्म्याची सेवा करीत, त्याच्या कृपाकरुणेच्या वर्षावात आनंद भोगत राहतो. अंतिम अवस्थेबद्दल वादंग करण्यात काहीच अर्थ नाही. कोणत्याही मार्गाने गेल्यास आपण प्रभुचरणाशी पोहोचतो आणि तोच या जगातील आपल्या समग्र दुःखांचा, विफलतेचा, नैराश्याचा अंत असतो. यानंतर उरते ती फक्त संपूर्ण, अविनाशी आनंदावस्था. वर्तमानात यापेक्षा अधिक काहीही जाणून घेण्याची आवश्यकता नाही.

परमात्म्याने आपणास जवळ घ्यावे असे जर आम्हांस वाटत असेल तर परमेश्वराच्या विषयी आवश्यक असलेल्या व ऐहिक बाबतीत जगाच्या दृष्टीने आम्ही करणे आवश्यक असलेल्या कर्तव्यांचे पालन आपण न चुकता, काटेकोरपणे करावयास हवे. या पार पाडावयाच्या कर्तव्यातूनच आमचा धर्म साकार होत असतो. आम्ही देहरूपात राहतो

तेव्हा व देहरूपाचा त्याग करतो तेव्हाही जो आम्हाला साहाय्यभूत होतो त्याला धर्म म्हणतात. जीवन जगत असताना व जीवनाचा त्याग केल्यानंतरही धर्म आम्हांला उपयुक्तच ठरतो. आम्ही जोपर्यंत या भौतिक जगात जगत आहोत तोपर्यंत आम्हांला तीच कर्तव्यकर्मे केली पाहिजेत, जी आम्ही येथून निघून गेल्यानंतर आम्हांला अपेक्षित ठिकाणी पोहचवतील. आम्ही येथून गेल्यानंतर आमच्यामागे राहणाऱ्यांना त्यांचे जीवन नीट जगता यावे म्हणून आम्ही विमा उतरवतो. मग जीवनोत्तर आम्ही सुस्थितीत असावे याला अधिक महत्त्व देणे गरजेचे नाही काय ? धर्म हा जीवनसमाप्तीनंतरचा विमा आहे. पण हेही तितकेच सत्य आहे की जीवन जगत असतानाही धर्म आम्हांला शांती आणि आनंद देतो.



आम्हांला ज्या धर्माचे पालन करावयाचे आहे त्याच्याविषयी आमच्या मनात कोणत्याही प्रकारचा संदेह किंवा वैचारिक गोंधळ असू नये. आमच्या पिढ्यान् पिढ्यातील महान व्यक्तींनी ज्या धर्माचे पालन केले त्या धर्मात आम्ही सर्वजण आज निमग्न झालो आहोत. त्यांनी धर्माच्या शाश्वत सौंदर्याची आंतरिक अनुभूती घेतली होती. ते संपूर्ण चिंतारहित जीवन जगले हे आम्हांला निश्चित माहीत आहे. आमच्या पिढीतल्या लोकांचे जीवन निश्चितच तसे नाही. आता आम्हांला खरोखरच कशाची गरज असेल तर आमच्या पूर्वीच्या पिढ्यांतील लोकांनी पालन केलेल्या धर्माचे आम्ही पालन करावे. आम्ही जर आमच्यासाठी एक नवा धर्म निर्माण करू तर ते एक संकटाला आमंत्रणच ठरेल व तो धर्म आम्हाला हितकारक ठरेल की काही अनिष्ट घेऊन येईल, अशा प्रकारच्या संभ्रमाच्या स्थितीने आम्ही विदीर्ण होऊन जाऊ. तेव्हा भूतकाळातल्या महान व्यक्तींनी पालन केलेल्या आमच्या पूर्वजांच्या धर्माचेच आम्ही पालन करणे हे सर्वतोपरी हिताचे होईल.

जीवनात मानवास खडतर प्रसंगांना आणि दुर्दैवी घटनांना सामोरे जावे लागते. या सत्याचे आपल्याला स्मरण असावे म्हणून नव्या वर्षाच्या पहिल्या दिवशी आम्ही निंबाच्या झाडाची कडू पाने व त्याचा मोहोर खातो. याचाच अर्थ असा की नव्या वर्षाच्या पहिल्या दिवशीच आम्ही जीवनाचे हे कटू स्वरूप स्वीकारतो. वर्षाच्या अखेरच्या सुमारास पोंगल हा सण साजरा करताना ऊस चावून खातात. वर्षारंभीच आम्ही केवळ गोडीचाच आस्वाद घेऊ तर कदाचित वर्षाच्या अखेरीस आम्हाला कटू अनुभव घ्यावा लागेल. कटू प्रसंगाविषयी आमच्या मनात कडवटपणा असता कामा नये, उलटपक्षी प्रकृतिमातेने किंवा धर्माने आम्हाला दिलेले ते आरोग्यकारक औषध आहे असे समजून आम्ही अशा प्रसंगांचे स्वागतच करावयास हवे. असे जर आम्ही करू तर हळूहळू आम्ही कोणत्याही अनुभवाला सामोरे जायला शिकू, मग तो अनुभव विषादाचा असला तरी तो गोड करून घेऊ.

राज्यत्यागानंतर वनवासात असताना प्रभू रामचंद्रांनी भोगलेले प्रसंग खरोखरच

अत्यंत दुर्दैवी असेच होते. दूरच्या प्रवासाला निघालेल्या पुत्राला आई शिदोरी बांधून देते. कौसल्या मातेने देखील रामाला वनवासात जाताना शिदोरी बांधून दिली होती, पण ती शिदोरी रामाला वनवासात चौदाही वर्षे पुरावी म्हणून तिने अत्यंत विचारपूर्वक दिली होती. काय होती बरे ही शिदोरी ? कौसल्यामातेने रामाच्या हातात शिदोरी म्हणून धर्माचे सारच दिले. ती रामाला म्हणते, ''राघवा, एक धर्मच तुझे रक्षण करील आणि हा धर्म कोणता तर ज्याचे तू स्वतःच अत्यंत धैर्याने आणि न डगमगता खंबीरपणाने रक्षण करशील.'' हे आहे धर्माचे संरक्षक कवच, जे राज्यत्याग करून वनवासात निघालेल्या आपल्या पुत्राला त्याच्या मातेने दिले होते.



*यं पालयसि धर्मं त्वं धृत्य च नियमेन च*
*स वै राघवशार्दूल धर्मस्त्वामाभिरक्षस्तु ।।*

हाच तो धर्म ज्याने रामाला, त्याने केलेल्या प्रदीर्घ संघर्षानंतर विजय मिळवून दिला. जो धर्माच्या मार्गाने वाटचाल करील त्याला विश्वाचा आदर मिळेल. त्याचे पाऊल अधर्माच्या किंवा अपवित्र मार्गावर पडेल तर त्याचा भाऊ देखील त्याचा शत्रू होईल. रामायण ह्या सत्याचे दर्शन घडविते. वानरांनी रामाची आदराने पूजा केली तर रावणाच्या बाबतीत काय घडले ? प्रत्यक्ष त्याच्या भावाने, बिभीषणाने त्याचा त्याग केला.

धर्म आणि केवळ धर्म हेच आमचे संरक्षण करणारे कवच आहे. दहा शिरे असलेल्या अधर्मी रावणाचा विनाश झाला तर विजयराघव म्हणून धर्मपालक रामचंद्राचा माथा उन्नत झाला. हे सर्व, धर्माचे कर्तृत्व आहे.

एखाद्याचा धर्म म्हणजे काही एखादी आगळी वेगळी गोष्ट नसते तर त्याच्या पूर्वसुरींनी जो आचरला त्याचे अनुसरण असते. सर्वजण आपल्या धर्माशी अतूट श्रद्धेने आणि धैर्याने जोडले जावोत आणि त्यांना अक्षय आनंदाचा लाभ होवो.

---------

## प्रकरण - २

# पाप आणि पुण्य

जगाने आपणास पापी म्हणून ओळखावे असे कोणासच वाटत नाही, परंतु त्याच वेळी आपण सर्वजण नैतिक बंधनाचे व प्राकृतिक सिद्धांतांचे उल्लंघन करीत असतो. नीतिमत्ता-सदाचार याविना आणि कोणतेही श्रेष्ठ कार्य न करता आम्हांला पुण्याचे फळ हवे असते.

अर्जुन भगवान कृष्णांना म्हणतो, ''भगवंता, कोणीही मनुष्य पाप करू इच्छित नसतो, परंतु तो पुन्हा पुन्हा पापकर्म करीत राहतो, असे करायला त्याला कोण भाग पाडते ?'' भगवंत उत्तर देतात, ''त्याची इच्छा होय, केवळ त्याची इच्छाच त्याला पापकर्म करायला भाग पाडते.''

अर्जुन उवाच -

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ।। (गीता ३-३६)

योग्य की अयोग्य, धर्म की अधर्म याचा काहीही विचार न करता आपण आपल्या इच्छा पूर्ण करायच्या प्रयत्नात असतो. तूप ओतून का अग्नी कधी विझत असतो ? उलट तो अधिकच भडकतो. त्याचप्रमाणे आपण एक इच्छा पूर्ण केली की दुसरी तिच्याहून अधिक अयोग्य अशी इच्छा आपल्या मनात जोर धरू लागते. मग आम्ही असे मानायचे का की आम्ही आमच्या इच्छा पूर्ण केल्या नसत्या तर खूप बरे झाले असते ? नाही, इच्छा अपूर्ण ठेवल्या की मनात क्रोध खदखदू लागतो आणि त्या इच्छा पूर्ण करण्यासाठी त्यांच्यामागे धावूनही यश आले नाही आले तरीही क्रोध निर्माण होतोच. भिंतीवर फेकून मारलेला चेंडू जसा उसळून पुन्हा आपल्याकडेच येतो त्याचप्रमाणे आमच्या अपूर्ण इच्छा उसळून आमच्याकडे येतात आणि आम्हाला पापकर्म करायला भडकवतात. कृष्ण भगवान अशा क्रोधाला कामानंतरचा तितकाच महान महापापी म्हणतात.

श्रीभगवानुवाच -

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।<br>
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ।। (गीता -३-३७)

केवळ इच्छेचा पूर्ण त्याग केल्यानेच आमचे हृदय पापमुक्त राहू शकेल. हे कसे होईल ? आम्ही कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. शरीराने निष्क्रिय असताना सुद्धा आमचे मन निष्क्रिय असत नाही, आमच्या शारीरिक आणि मानसिक क्रिया या आमच्या

इच्छांच्या भोवती फिरत असतात आणि या इच्छाच आम्हाला पापाच्या गर्तेत खोल, अगदी खोल ढकलीत असतात. मग कोणतेही कर्म न करता आम्ही राहू शकतो का ? मानवाचा स्वभावधर्मच असा आहे की या प्रश्नाचे उत्तर 'नाही' असेच द्यावे लागते. तायुमानवस्वामीगल असे म्हणतात की कोणताही विचार किंवा कृती न करता कोणीच माणूस राहू शकत नाही. शरीराने एकवेळ आम्ही कोणतीही क्रिया न करता राहू शकू, पण मनाचे काय ? त्याला आम्ही शांत ठेवू शकतो का ? मन कधीच शांत राहत नाही. ते स्वतः चंचल तर आहेच शिवाय शरीरालाही काहीतरी करायची चिथावणी देत असते.



आम्ही आमच्या इच्छा नाहीशा करू शकत नाही किंवा टाळू शकत नाही. मग, आमच्या इच्छा नष्ट करणे किंवा कृतीपासून मुक्ती मिळविणे हे दोन्हीही आमच्या आवाक्याबाहेरचे आहे असेच आम्ही समजायचे काय ? या प्रश्नावर मात करण्याचा कोणताच उपाय नाही की काय ? आहे ! यावर निश्चितच मार्ग आहे. प्रारंभी, अपरिपक्वतेच्या निकट अवस्थेत आपण आपली सर्व कर्मे एकदम थांबविण्याची मुळीच गरज नाही. त्याऐवजी प्रथम, स्वार्थी हेतूने केली जाणारी कामे थांबवून इतर लोकांच्या हिताची व स्वतःस आंतरिक समाधान देतील अशीच कामे करीत राहावीत. आमचे मन जसे जसे अशा प्रकारच्या कामांत रमू लागेल, आमच्या इच्छांची आमच्या मनावरची पकड कमी होऊ लागेल. यामुळे काही प्रमाणात का होईना आम्ही पापकर्मापासून दूर राहू आणि त्याच वेळी आमच्या हातून काही सत्कर्मेही होऊ लागतील. स्वार्थी हेतूने केली जाणारी कामे निग्रहाने टाळण्याची सवय स्वतःस लावून घ्यावी. फळाची इच्छा न ठेवता केलेले काम हेच सत्कर्म किंवा खरे पुण्यकर्म असते.

आम्ही चार प्रकारे पापकर्मे करतो. शरीराने करू नये असे पाप करतो. वाचेने खोटे बोलतो, मनाने अपवित्र चिंतन करतो आणि धनाने जितकी करता येतील तितकी दुष्टकर्मे करतो. पापकर्मे करण्याच्या ह्या चार माध्यमांचेच आम्ही सत्कर्म करणाऱ्या साधनांत रूपांतर करावयास शिकले पाहिजे.

कायेने आम्ही इतरेजनांची सेवा करावी आणि ईश्वरास प्रदक्षिणा घालून त्याच्यापुढे लोटांगण घालावे. असे करून आम्ही काही पुण्य मिळवू शकतो. पुण्यकर्मासाठी आम्ही वाचेचा कोणत्या प्रकारे उपयोग करावा ? वाचेने भगवंताचे नाम घेत,जप करीत आम्ही पुण्य पदरी जोडू शकतो. तुम्ही असेही म्हणाल की आमचा सर्व वेळ हातातोंडाची गाठ घालून गुजराण करण्यातच जातो मग आम्ही भगवंताचे नाम घ्यावे तरी कधी ? आपल्या परिवाराचा योगक्षेम चालविण्यातच गृहस्थाश्रमी माणसाचे सर्व आयुष्य खर्ची पडते. पण खरोखरच असे पहा की संपूर्ण वेळ तो कुटुंबासाठीच खर्च करीत असतो का ? व्यर्थ गप्पागोष्टी, करमणुकीच्या गोष्टी, इतरांची निंदा-नालस्ती व वर्तमानपत्रांचे वाचन यांत तो

आयुष्याचा कितीतरी वेळ व्यर्थ दवडीत असतो. यातला थोडा वेळ भगवंताचे नामस्मरण करण्यासाठी तो वाचवू शकणार नाही का ? जप ठरावीक वेळेलाच केला पाहिजे असेही मुळीच नाही. ऑफिसला किंवा अन्य ठिकाणी, बस किंवा रेल्वे गाडीने जाताना तो ईश्वराचे सहजपणे चिंतन करू शकतो. पैसा मिळविण्यासाठी आयुष्यभर जिवाची उरस्फोड करून आयुष्याचा अंत झाल्यावर त्यातली एक कवडीही तो स्वतःच्या बरोबर नेऊ शकत नाही. भगवंताचे घेतलेले नामच परलोकात चालणारे एकमेव नाणे आहे.

मन हे ईश्वराचे खरे सिंहासन आहे पण आम्ही ते पवित्र स्थान अत्यंत अपवित्र करून टाकतो. ते अत्यंत निर्मळ करून त्याठिकाणी आम्ही ईश्वराची प्रतिष्ठापना केली पाहिजे व आपले आपणच एका आत्मशांतीचा अनुभव घेतला पाहिजे. दिवसातून नियमितपणे किमान पाच मिनिटे तरी ध्यान केले पाहिजे व जगात काहीही उलथापालथ होवो, ध्यान करण्याचा आपला दृढ संकल्प आपण पाळला पाहिजे. संपूर्ण विश्व लयाला जाईल तेव्हा देखील फक्त हे ध्यानच आपल्या साहाय्यास येईल.

दीन-दुर्बलांना मदत करून आणि प्रभूचा महिमा सर्वत्र पसरविल्यानेच आपणास पुण्य संपादन करता येईल.

पापवासना ही दुधारी शस्त्रासारखी असते. एका बाजूची धार आम्हांस तत्काल पापकर्म करण्यास प्रवृत्त करते, तर दुसरीकडची धार उद्या करावयाच्या पापाच्या चिंतनात बुडविते. उदाहरणार्थ, तुम्ही तपकीर ओढलीत तर तिचे दुष्परिणाम लगेच भोगाल. पण दुसऱ्या दिवशी देखील ती ओढण्याची तीव्र इच्छा तुम्हाला होत राहील. यालाच वासना म्हणतात. जी व्यसनाचे रूप घेते. अशा वासनेचा नुसताच क्षय करण्याचा प्रयत्न करून चालणार नाही तर काही अन्य सत्कर्म करून वासनेचे रूपांतर सद्गुणात करता आले पाहिजे.

वासनाच आम्हाला वारंवार पापकर्माकडे खेचून नेते आणि दुर्दैवाने आम्हांला त्यात कोणत्याही प्रकारचे भय वाटत नाही. खरोखरच अगदी आमच्यासारखीच माणसे, ज्यांनी घोर पातके केली होती ते ईश्वराचे महान भक्त झाले व त्यांना आत्मज्ञानाचा प्रकाश प्राप्त झाला. ईश्वर दयाळू आहे आणि पापकर्मे करणाऱ्यांचाही रक्षणकर्ता आहे. म्हणून तर तो महान! आपल्यासारख्या पापी जनांनीच त्याला 'पतितपावन'-पतितांचा उद्धार करणारा, हे बिरुद मिळवून दिले. जे त्याचे खास वैशिष्ट्य आहे. पतितपावन याचा अर्थच मुळात हा आहे की जो पापामुळे पतित झालेल्यांना उचलून घेऊन पावन करतो, तो पतितपावन. आमच्यामुळेच त्या ईश्वरालाही महान योग्यता प्राप्त झाली आहे.

'मला एकट्यालाच शरण ये, कोणतेही भय बाळगू नकोस, मी तुला सर्व पापांतून

मुक्त करीन'. श्रीभगवानुवाच 

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।। (गीता - १८-६६)

सर्व पापांपासून मुक्त करण्याचे भगवान श्रीकृष्णांनी आम्हाला दिलेले हे आश्वासन आहे. तेव्हा आम्ही धैर्यवंत होऊ या. एखादी वस्तू बांधून ठेवायची असेल तर आपण त्या वस्तूभोवती दोऱ्यावर दोरा गुंडाळतो आणि तीच वस्तू मोकळी करायची असेल तर तो गुंडाळलेला दोरा उलट्या दिशेने सोडवावा लागतो. अगदी त्याचप्रमाणे पापवासना नष्ट करण्यासाठी, पाप करण्याच्या वासनेतून पूर्णपणे मुक्त व्हायचे असेल तर चांगले कर्म करण्याची वासना तितक्याच प्रखरतेने वाढविली पाहिजे. असे करताना धांदल किंवा क्रोध यांना मुळीच थारा देता नये. कारण त्यांच्यामुळे तुम्ही सोडविलेला दोरा पुन्हा गुंडाळला जाऊ लागतो. आम्ही वासनामुक्त होण्याचे काम चिकाटीने व त्या ईश्वरावर श्रद्धा ठेवून आणि धर्मात रुजलेले राहून करू तर ईश्वर निश्चितच आमच्या साहाय्यास धावून येईल.

मानवाला काया-वाचा-मने विषयसुखापासून परावृत्त करून ईश्वराभिमुख करणे हेच सर्व धर्मांचे उद्दिष्ट आहे. वेळोवेळी ज्या महान विभूती अवतरल्या, त्यांनी आपला धर्म या एकाच उद्देशाने स्थापन केला आहे की मानवाला त्याच्या इंद्रियसुखाच्या आसक्तीतून मुक्त करावे; कारण ही इंद्रियेच आम्हाला पाप करावयास विवश करतात. पापाचरणातून, इंद्रियसुखातून क्षणभंगुर आनंद प्राप्त होतो. परंतु अविनाशी आनंद हा केवळ परमात्म्याशी होणाऱ्या तादात्म्यातच असतो. हीच सर्व धर्मांची शिकवण आहे आणि माणसाला ईश्वराभिमुख करून त्याला त्याच्या ऐहिक अस्तित्वातून मुक्त करणे हेच सर्व धर्मांचे उद्दिष्ट आहे.

-------

## प्रकरण - ३

# धर्माचे प्रयोजन

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे प्राप्त करण्याचे धर्म हे साधन आहे. हे चारही पुरुषार्थ मानले जातात.

तामीळ भाषेत 'धर्मा' ला 'अरम', 'अर्थ' ला 'पोरुळ', कामाला 'इन्बम' तर 'मोक्षाला' 'विडु' असे म्हणतात. अर्थ हा पुरुषार्थाचा पर्याय म्हणून उपयोगात येतो, पण तो चार पुरुषार्थापैकी एक आहे. माणसाला त्याच्या जीवनात स्वतःसाठी काय मिळवायचे असते? त्याच्या जीवनाचे ध्येय काय असते? तर हे चार पुरुषार्थ त्याचे प्राप्तव्य आहे. माणसाला काय हवे असते? कोणत्याही अभावावाचून त्याला सुखी जीवन जगायचे असते. सुख दोन प्रकारचे आहे. एक असते क्षणभंगुर सुख आणि दुसरे असते अविनाशी सुख, ज्याचा कधीच ऱ्हास होत नाही. काम अर्थात इन्बम यात क्षणभंगुर सुख म्हणजेच ऐहिक आनंद, ऐहिक इच्छा समाविष्ट आहेत. मोक्ष म्हणजेच विडु यात क्षणिक आनंद नसून अविनाशी सुख आहे. हा आनंद किती उच्च प्रतीचा व निरंतर टिकणारा असतो याचे ज्ञान नसल्याने माणसे 'कामा' तले क्षुद्र आणि क्षणिक सुख मिळविण्यासाठी धडपडत असतात.

चारी पुरुषार्थांतला मोक्ष किंवा 'विडु' हा जो चवथा पुरुषार्थ, तो प्राप्त कसा होईल याचाच आम्ही खरा शोध घेतला पाहिजे. चार पुरुषार्थांतला तिसरा पुरुषार्थ म्हणजेच 'काम' मिळविण्यासाठीच आजकाल बहुतांश माणसे उत्कंठित आहेत. तुम्ही जेव्हा खाता तेव्हा तुम्ही सुखात असता. उच्च न्यायालयात न्यायाधीश म्हणून तुमची नेमणूक झाली की खूप सुख मिळाले असे तुम्हाला वाटते. एखाद्या संस्थेने तुमचा सत्कार केला की तुम्हाला खूप आनंद होतो हे खरे आहे ना? परंतु अशा प्रकारे मिळणारे सुख किंवा आनंद हा चिरकाल टिकणारा नसतो. अशा प्रकारची सुखे चारी पुरुषार्थांतल्या 'पोरुळ' म्हणजेच 'अर्थ' या मार्गाने मिळतात. धन-धान्य, घरदार ही 'अर्थ' या पुरुषार्थाने मिळतात. म्हणजे 'अर्थ' हा सुखाकडे नेणारा मार्ग असला तरी त्या मार्गाने मिळविलेल्या ऐहिक सुख-संपत्तीतला आनंद हा क्षणकाल टिकणारा असतो. 'अजून काही' 'अजून काही' ही तुमची भूक सतत वाढतच जाते.

'मोक्ष' ही एक परमोच्च आनंदावस्था आहे. ती प्राप्त झाल्यानंतर अजून काही मिळविण्याचा शोध उरत नाही. आम्ही एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी असे हिंडत राहतो आणि अनेक प्रकारची दुःखे भोगत राहतो. आमचे गंतव्य स्थान म्हणजेच प्रवासाचे अखेरचे पोहोचण्याचे ठिकाण आमचे निजधाम आहे. कैदी हा त्याची तुरुंगातून सुटका

झाल्यानंतर त्याच्या घरी म्हणजे 'विडु' ला पोहोचवतो. परंतु 'विडु' या शब्दाचा अर्थ 'सुटका' किंवा 'मुक्ती' असा देखील आहे. आम्ही सध्या देहाच्या तुरुंगात कैद असल्याने व स्वतःला देहस्वरूप समजत असल्याने आम्ही भयंकर अपराध करीत आहोत. देह हा आमचा खरोखर तुरुंग आहे. आमचे खरे 'घर' आहे 'आनंद', ज्याला 'मोक्ष' असे म्हणतात. आम्ही तुरुंगातून म्हणजेच आमच्या देहातून स्वतःची सुटका करून घेऊन मोक्ष या आमच्या खऱ्या घरात निवास केला पाहिजे. ईश्वराने आमच्या पापाकरता आम्हाला तुरुंगवासाची शिक्षा दिली आहे. म्हणजेच त्याने आम्हाला आमच्या देहात कैद केले आहे. आम्ही जर सदाचरण करू तर तो आमच्या अपराधांना माफ करून शिक्षा संपण्यापूर्वीच या देहाच्या तुरुंगातून आमची सुटका करील. या तुरुंगवासाची मुदत वाढू नये म्हणून आम्ही पापाचरणापासून परावृत्त झाले पाहिजे आणि आमची या तुरुंगातून सुटका करून घेऊन आमच्या खऱ्याखुऱ्या घरी म्हणजे मोक्षधामाला अर्थात प्रभुपदाला पोहोचण्याचा प्रवास करावयास हवा. मोक्ष हा आकलनाच्या पलीकडचा आनंद असून तो स्थल, काल आणि वस्तू यांच्या कक्षेत येत नाही.

अखेरीस मी धर्म या पहिल्या पुरुषार्थाचे विवेचन करतो. धर्म म्हणजे परोपकाराचे कृत्य, सत्कर्म किंवा सदाचरण. धर्म याचा अर्थ देणे, दान करणे असाही घेतला जातो. भीक मागताना भिकारी म्हणतो, 'मला धर्म घाला हो माय', 'धर्म करा हो माय'. तसेच आम्ही 'दान-धर्म' करणे असाही शब्दप्रयोग करतो. धर्माशी संबंधित आज्ञांना तामीळ भाषेत 'अर-कट्टलई' असे म्हणतात. या दृष्टीने 'धर्म' या शब्दाकडे पाहिल्यास आपल्या जवळील 'अर्थ' (धन) म्हणजे 'पोरुळ' दुसऱ्यास दान करणे याला 'धर्म' करणे म्हणता येईल. पण प्रथमतः हे पाहावयास हवे की जे आम्ही धर्म म्हणून दान करीत आहोत ते आम्ही कसे मिळविले ? पूर्वजन्मात जो आम्ही धर्म केला - म्हणजेच दुसऱ्यास अर्थदान केले त्याचेच फळ आम्हाला या जन्मात प्राप्त होते. भौतिक गोष्टी मिळविण्याचा खरा हेतू धर्माचरण करता यावे हाच आहे. ज्याप्रमाणे भौतिक साधने हा सुख मिळविण्याचा मार्ग आहे तसाच धर्म देखील भौतिक सुखाचा मार्ग आहे. केवळ दान-धर्माचे फळ भौतिक सुखाच्या रूपात प्राप्त होते असे नाही तर धर्माच्या अंतर्गत येणारी सर्व कर्मे देखील त्यांचे भौतिक फळ दिल्याशिवाय राहत नाहीत.

आपणास जे काही मिळते आहे ते सर्व काही ईश्वराच्या इच्छेने मिळते आहे या श्रद्धेने व समर्पणाच्या भावनेने, जर कोणत्याही फळाची अपेक्षा न ठेवता आपण धर्माचरण करू तर आपल्या अस्तित्वाला कलंकित करणारी विकृती नष्ट होईल आणि आपणास परमोच्च कोटीतला आनंद प्राप्त होईल. धर्मपालनास प्रारंभ होताच प्राप्त होणारी भौतिक फळेच परमार्थप्राप्तीची साधने होतात. याप्रमाणे आपणास असे दिसून येईल की धर्म हा भौतिक प्राप्तीचे निमित्तकारण होऊन त्यातून सुखप्राप्ती होत असतानाच आपण निःस्वार्थ

हेतूने धर्माचरण केल्यास हाच धर्म मोक्षाचे साधनही होऊ शकतो. त्यातूनच आपणास भौतिक साधने प्राप्त होतात आणि तीच धर्मचरणास साहाय्यभूत होतात. याचाच अर्थ हा आहे की 'अर्थ' हा पुरुषार्थच धर्माचा आधार होतो. 'काम' किंवा इच्छा मात्र स्वतःही पूर्णत्वाला जात नाही अथवा अन्य कोणतेही प्रयोजन पूर्ण करण्याचे साधन होत नाही. इच्छा ही तापलेल्या वाळूवर पाणी ओतण्यासारखी व्यर्थ आहे. याहून अधिक वाईट गोष्ट ही आहे की 'इच्छा' ही धार्मिक विचार, भौतिक साधनसंपत्ती व मुक्तिसंपदा या सर्वांच्या नाशास कारणीभूत होते.

थोडक्यात काय? पूर्णतया इच्छेशिवाय राहणे असंभव आहे. परंतु धर्म हा इच्छेला थोडा थोडा लगाम घालतो आणि माणसाला क्षुद्र, क्षणभंगुर सुखाकडून हळूहळू परमोच्च आनंदाकडे घेऊन जातो. प्रथम आपण धर्माचा अर्थ आणि त्याची व्याप्ती पाहिली, नंतर धर्माचरण कसे करावे व भौतिक साधने मिळविण्याची योग्य पद्धती कोणती हे पाहिले, जेणेकरून ती साधने धर्माचरणास उपकारक ठरतील. अखेरीस इच्छांचा उपशम कसा करावा हेही जाणून घेतले. मोक्षातला परमोच्च आनंद मिळविण्यासाठी क्षणिक सुख देणाऱ्या कामनांचा त्याग करण्याकरिता परिपक्वता आणि विवेकबुद्धी मिळविण्याची ही साधनप्रक्रिया आहे.

सर्व प्रकारच्या आसक्तीतून मुक्त करणारी अनासक्ती म्हणजेच 'मोक्ष'. या मोक्षावस्थेत आत्मस्वरूप, निरंतरपणे निरंकुश मुक्तावस्थेत आणि ईश्वरानुग्रहाच्या परमानंदात राहते. ही परमोच्च अवस्था कशी प्राप्त करून घ्यावी हे धर्म आम्हाला शिकवितो.

सामान्यतः माणसे अविनाशी सुख मिळवत नाहीत हे आम्हांला निश्चितच ठाऊक आहे. परंतु माणसास असे सुख मिळविण्याच्या मार्गाकडे घेऊन जाणे हेच प्रत्येक धर्मचे प्रयोजन असते. क्षुद्र आनंद मिळविण्याची धडपड थांबविली तरच कधीही नाश न पावणारा ईश्वरी कृपेतला आनंद मिळतो. इंद्रियसुखे मिळविण्याची धडपड थांबवून अविनाशी आनंद प्राप्त करण्यात धर्माचे आदेश आमची मदत करतात. सर्वांना मुक्ती मिळावी हेच समान उच्च प्रयोजन असलेली समाजव्यवस्था निर्माण करण्यात हे धर्माचे आदेश अत्यावश्यक आहेत. मुक्ती हे ध्येय असलेल्या धर्माने त्यासाठी काही सिद्धान्त घालून दिलेले आहेत. या सिद्धांताच्या पालनालाच महान व्यक्ती 'धर्म' असे मानतात.

------

## प्रकरण - ४

# मानव आणि पशू

पशू हे आडवे वाढतात म्हणून संस्कृतमध्ये त्यांना तिर्यक योनी असे म्हटले जाते. सरळ उभ्या रेषेत वाढणाऱ्या माणसासमोर मात्र पशूहून भिन्न असा उच्च आदर्श असावयास हवा, तरच तो अन्य प्राण्यांपेक्षा अधिक सुख मिळवू शकेल. परंतु प्रत्यक्षात आपणास काय पाहावयास मिळते? माणूस अन्य प्राण्यांहून अधिक दुःखे भोगतो आहे. माणसाला जितक्या इच्छा असतात, तो जितकी दुःखे व अपमान सहन करतो, तितक्या इच्छा प्राण्यांना नसतात व माणसाइतकी दुःखे आणि अपमान प्राण्यांच्या वाट्याला येत नाहीत आणि महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राणी पापाबद्दल अज्ञानी असतात. आम्ही माणसे मात्र पाप करतो आणि त्याचा परिणाम म्हणून दुःखे भोगत राहतो.

एका अर्थाने तर मला असे वाटते की ईश्वराने प्राण्याला जितक्या लाभदायक गोष्टी दिल्या आहेत तितक्या मानवाला दिलेल्या नाहीत. आम्हाला स्वतःचे रक्षण करण्यासाठी अंगभूत हत्यारे नाहीत. गायीला जर धोक्याचे भय निर्माण झाले तर तिला रक्षणासाठी शिंगे आहेत. वाघाजवळ पंजे आहेत. आम्हाला तशी शिंगे नाहीत किंवा पंजेही नाहीत. थंडीच्या कडाक्यापासून रक्षण करण्यासाठी मेंढ्यांना अंगावर लोकर दिलेली आहे. त्याचप्रमाणे इतर प्राण्यांची काही ना काही व्यवस्था केलेली आहे, पण माणसाला मात्र असे काहीच अंगभूत रक्षण करणारे साधन नाही. त्यामुळे तो त्याच्यावर झालेल्या आक्रमणाचा प्रतिकार करू शकत नाही किंवा घोड्याइतक्या वेगाने तो पळून जाऊ शकत नाही. घोड्याला शिंगे नसली तरी वायुवेगाने दूर नेणारे पाय त्याच्याजवळ आहेत. माणसाची अशी प्रतिकूल परिस्थिती असली तरी देखील इतर प्राण्यांत नसलेली बुद्धी असण्याचा माणसाला अधिक फायदा होतो.

थंडीपासून रक्षण करण्यासाठी माणूस प्राण्यांच्या अंगावरची लोकर काढून त्यापासून स्वतःसाठी घोंगड्या, रग विणून तयार करतो. वेगाने प्रवास करायच्या वेळी तो स्वतःच्या गाडीला घोडे जुंपतो. स्वतःच्या रक्षणासाठी माणसाजवळ प्राण्यांसारखी शिंगे, पंजे नसले तरी ईश्वराने त्याला हे बुद्धिकौशल्य दिले आहे, ज्याच्या जोरावर तो स्वतःचे स्वतः शस्त्रे तयार करतो. या बुद्धीच्या शक्तीमुळेच तो इतर प्राण्यांचा स्वामी झाला व संपूर्ण चराचरावर हुकुमत गाजवू लागला.

सर्व जातीच्या प्राण्यांचे आपापले स्वभावविशेष, विभिन्न गुणधर्म असतात. थंड प्रदेशात राहणारी काही जातींची अस्वले आपल्या देशात वाढू शकत नाहीत. तसेच भारत, आग्नेय आशिया व आफ्रिकेचे काही प्रदेश येथील जंगलात राहणारे हत्ती थंड प्रदेशात राहू

शकत नाहीत. परंतु माणूस मात्र पृथ्वीवरील कोणत्याही भागात राहतो. तो आपल्या बुद्धीचा उपयोग करून विश्वाचा कोणताही भाग स्वतःच्या निवासासाठी अनुकूल करून घेतो.

परंतु बुद्धीने असा सर्वश्रेष्ठ असून देखील मनुष्य दुःखे भोगतो. सर्व संकटे जन्मापासूनच निर्माण होतात. पुनर्जन्मापासून स्वतःस कोण वाचवू शकतो? असे आहे तर मग आमच्या जन्माचे कारण काय? आमच्या हातून घडलेले प्रमाद हेच आमच्या जन्माचे कारण आहे आणि त्याचा दंड भोगण्याकरिता कायद्याने चाबकांच्या काही फटक्यांची शिक्षा आम्हाला झालेली आहे आणि त्यातील दहा फटके सोसल्यावर आमचा देह नाश पावला तर उरलेले फटके खाण्यासाठी आम्हांला पुन्हा जन्म घ्यावा लागतो. आमच्या इच्छा पूर्ण करण्यासाठी आम्ही जी पापकर्मे करतो तेच आम्हाला पुन्हा पुन्हा जन्म घ्यावे लागण्याचे कारण आहे. काही 'कर्म' च केले नाही तर जन्मदेखील असणार नाही. आम्ही करीत असलेल्या दुष्कर्मांपैकी बहुतांश दुष्कर्मांचे कारण क्रोध असतो आणि इच्छा ही क्रोधाचे मूळ आहे. म्हणूनच इच्छेला आमच्या अंतःकरणातून हद्दपार करणे हे सर्वाधिक महत्त्वाचे आहे. परंतु अनेक आसक्तींचा लळा लावून घेतल्यानंतर कोणतेही कर्म न करता राहणे अशक्यप्राय आहे. आसक्तीचा त्याग केला तरच पापकर्मांना पूर्णविराम देता येतो.

इच्छेचे मूळ कारण काय आहे? आपल्याहून भिन्न असे काहीतरी आहे आणि आपले अस्तित्व त्या 'काहीतरी' शी जोडलेले आहे या विचारधारणेतून इच्छा उगम पावते. खरे तर एक 'शिवतत्त्व' च सर्व चराचरांतून प्रकटत असते.

गायीला आरशात आपले प्रतिबिंब दिसते आणि ती त्या प्रतिबिंबाला दुसरी गाय समजते. माणसाने मात्र स्वतःचे प्रतिबिंब आरशात पाहिले तर तो तिथे कोणी दुसरी व्यक्ती आहे असा विचार करतो काय ? तो त्या स्वतःच्या प्रतिबिंबाने विचलित होत नाही, कारण ते रूप म्हणजे तो स्वतःच आहे याचे त्याला ज्ञान असते. त्याचप्रमाणे आपणास जे जे दिसते ते दृश्यजात एक आणि एकच असते. इच्छा ही आपल्या पृथक् अस्तित्वाच्या विचारधारणेतून उगम पावते आणि तिच्यामुळेच क्रोध निर्माण होऊन परिणामी तो आम्हांला पापकर्मात लोटतो. यानंतर नवा जन्म अटळ असतो. सर्व वस्तुजात एकच आहे हे जाणण्याइतके आम्हास ज्ञान झाले की इच्छा निर्माण व्हायला जागाच उरत नाही. इच्छा निर्माण होण्यासाठी स्वतःपेक्षा पृथक् अशी काही वस्तू असावी लागते आणि इच्छेचा अभाव म्हणजे क्रोध नसणे, पाप नसणे. या अवस्थेत 'कर्म'ही उरत नाही आणि जन्मही. आणि अंततः दुःखही असणार नाही.

हा प्रकाश किंवा हे ज्ञान आपणास कसे प्राप्त होईल ? मातेच्या स्तन्यावर आमच्या देहाचे पोषण होते. ज्ञानाचे स्तन्यपोषण देऊन ती 'अंबा' आमचे भरण पोषण करते.

जगदंबा ही प्रत्यक्ष ज्ञानाचे मूर्त स्वरूप आहे. आम्ही जर तिच्या चरणकमलांशी अनन्यतेने शरण जाऊन तिच्याशी लीन होऊ तर स्वयंप्रज्ञेच्या प्रकाशाचा प्रसाद आम्हांला निश्चित मिळेल आणि जो कोणी असे करतो तो ईश्वरस्वरूप होतो.

या ज्ञानप्राप्तीच्या साधनप्रक्रियेची पहिली पायरी म्हणजे पशूचे जीवन न जगता मनुष्य खऱ्या अर्थाने माणूस म्हणून जगू लागेल हे सुनिश्चित करणे. दुसरी पायरी म्हणजे त्याला देवत्वाच्या पातळीपर्यंत उन्नत करणे. सर्व धर्मांचे हेच प्रयोजन आहे, भले ते आपली तत्त्वे, विचार भिन्न पद्धतीने मांडोत. परंतु माणूस आज लालसा-प्रकोपाचे जीवन जगत असल्याने ज्या लांच्छनास्पद अवस्थेला पोहोचला आहे तशी त्याची दुरवस्था होऊ नये हाच प्रत्येक धर्माचा चिंतेचा विषय असला पाहिजे. मनुष्य सत्प्रवृत्त होवो आणि त्याच्यात प्रेम, लीनता, विशुद्धता आणि त्यागवृत्ती हे गुणविशेष ओतप्रोत प्रकट होवोत असेच सर्व धर्म एकमुखाने म्हणत आहेत.

--------

## प्रकरण - ५

# सर्व धर्मांचे समान सूत्र : भक्ती

माणसाला उद्विग्नता आणि चिंता यांपासून मुक्त करून त्याचे उन्नयन करणे हेच सर्व धर्मांचे एक समान प्रयोजन आहे. माणसाला ज्या चिंता आहेत त्या कोणीही अन्य व्यक्ती वाटून घेऊ शकत नाही. परंतु सर्व धर्मप्रणाली प्रकटपणे असे सांगतात की मनुष्य जर प्रयास करील तर तो स्वतःला चिंतामुक्त करील. इतकेच नाही, तर जे ज्ञान इतर प्राण्यांच्या आवाक्याबाहेरचे आहे ते ज्ञान देखील तो मिळवू शकतो. ठामपणे सांगायचे झाले तर या विश्वाचे कार्य जी महान सत्ता संचालित करते, त्या सत्तेला जर मनुष्य शरण जाईल तर तो सर्व प्रकारच्या चिंतांतून मुक्त होईल. अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत, शैव सिद्धान्त, इसाई, इस्लाम इत्यादी सर्व धर्मसिद्धांतांचे 'भक्ती' हेच एक समान सूत्र आहे. बुद्ध धर्म भक्तीविषयी काही बोलत नाही, पण असे दिसून येते की, बुद्धाचे अनुयायी आपल्या गुरूचा भक्तीशिवाय आदर करू शकत नाहीत. त्यांनी बुद्धाचे मत बाजूला ठेवून कोणत्याही अन्य देवतांच्या नसतील इतकी बुद्धाची भव्य शिल्पे साकारली. अगदी अलीकडच्या काळात अनेक ज्ञानी व्यक्तींनी मुक्तीचा एकमेव मार्ग म्हणून आत्मचिंतन करण्यावर भर दिला आहे. परंतु अशा व्यक्तींच्या अनुयायांनी त्या ज्ञानी व्यक्तींचीच ईश्वर म्हणून पूजा करण्यास आरंभ केला. भक्ती हा मनुष्याचा उपजत म्हणजेच सहज स्वभाव आहे. खरोखर 'भक्ती' हा मनुष्याचा अंगभूत भाग आहे.

अद्वैत मतप्रणालीमध्ये उपास्य आणि उपासक यामध्ये एकरूपतेचा, अभिन्नतेचा भाव निर्माण होणे म्हणजेच भक्ताने भगवंताला आत्मस्वरूपाहून भिन्न न मानणे अभिप्रेत आहे. यावर असे विचारले जाण्याची शक्यता आहे की सर्वशक्तिमान आणि सर्वज्ञ अशा ईश्वराची उपासना करणाऱ्या भक्ताची शक्ती आणि ज्ञान दोन्हीही अत्यंत मर्यादित आहेत, मग भक्त आणि भगवंत हे दोघे एकच कसे असू शकतील? पण त्याचबरोबर हाही प्रश्न पुढे येतो की ईश्वर आम्हांला त्याच्याहून भिन्न मानतो का? जर वस्तुमात्राचे ईश्वराहून भिन्न अस्तित्व असेल तर ते कसे निर्माण झाले? जर ते ईश्वराहून भिन्न अस्तित्वरूप असतील तर ईश्वराची त्यांच्यावर सत्ता कशी?

याप्रमाणे जर आम्ही विचार करू तर परमेश्वरच विभिन्न रूपांत सर्वत्र भरून राहिला आहे हे स्पष्ट होईल. समुद्र हा ईश्वराचेच एक रूप आहे याचे ज्ञान झाले तर पाण्याचे डबके, विहीर किंवा थोडेसेच पाणी असलेला चमचा ही समुद्राहून वेगवेगळी भिन्न रूपे आहेत, पण सर्वात असलेले पाणी एकच आहे. प्रत्येकाच्या क्षमतेत फरक आहे, परंतु तुम्ही जर मूलभूत विचार कराल तर तुम्हांला दिसून येईल की रूप भिन्न असले तरी

अस्तित्वाने सर्व एकच आहेत. आम्ही मुळापर्यंत जाऊ तर मुळाशी एकरूप होऊ. हाच अद्वैतातला मोक्ष आहे - मुक्ती आहे. अद्वैतातील मोक्ष स्थितीविषयी केवळ बोलणे म्हणजे एक बौद्धिक कसरत आहे आणि ती निरर्थक आहे. या मोक्ष अवस्थेतले सत्य हे आंतरिक सत्यस्वरूप व्हावयास हवे. याचाच अर्थ आत्मशोधाचे रूपांतर आत्मानुभवात व्हावयास हवे आणि तसे केवळ ईश्वरी कृपेनेच होऊ शकते. महान विभूतींचे हेच सांगणे आहे की जी सत्ता आम्हांला सतत कर्माच्या फेऱ्यात गुंतवून ठेवते त्याच सत्तेच्या कृपेने हा कर्माचा फेरा थांबेल आणि आम्हांला आधारभूत अशी अद्वैतप्रेरणा लाभेल. ''ईश्वरानुग्रहादेवपुंसाम् अद्वैतवासना'' हे त्याचे सूत्र आहे.

ईश्वर आणि भक्त हे भिन्न आहेत असे आम्हांला जेव्हा वाटत असते तेव्हा त्या प्राथमिक अवस्थेत देखील आम्ही ही जाणीव, कमी प्रमाणात का असेना, आत्मसात केली पाहिजे की ईश्वररूपात असलेला परमात्मा आणि आमच्या रूपात असलेला परमात्मा दोन नसून एकच आहेत. आमचा जर दृष्टिकोन असा असेल तर ईश्वराविषयीचे आमचे प्रेम अधिक तीव्र होईल. काहीही असो, आम्ही कोणत्याही वस्तूवर किंवा व्यक्तीवर स्वतःपेक्षा अधिक प्रेम करतो काय?

ईश्वर आम्हांला आमच्या कर्माचे फळ देतो. आम्ही ईश्वराच्या कृपावर्षावात जर त्याला अधिकाधिक समर्पित होऊ तर आम्ही त्याच्या अधिकाधिक निकट जाऊ. तो कोण आहे आणि काय आहे हे त्याचे स्वरूप तो स्वतःच आमच्यासमोर प्रकट करील आणि त्याच्याविषयी शोध घेण्याची आवश्यकताच उरणार नाही. तो प्रसन्न होऊन आपले स्वरूप आमच्यासमोर प्रकट करील. भगवंताने गीतेत म्हटले आहे -

''भक्त्या मां अभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ।। १८-५५

ईश्वराचे गुण अनंत आहेत ज्यांतून आम्हांला त्याच्या परमोत्कट सौंदर्याचे आणि परममंगल स्वभाववैशिष्ट्याचे दर्शन घडते. त्या गुणांच्या चिंतनात भक्ताला निरंतर आनंद प्राप्त होतो. परंतु आत्मानुभूती लाभलेल्या ज्ञानी पुरुषांना ईश्वराचे निर्गुण रूपच परमप्रिय वाटते आणि अंततः तो ह्याच ईश्वररूपात विलीन होऊन जातो. सगुणोपासना हे या साधनमार्गाकडे पडणारे त्याचे पहिले पाऊल आहे. याचकरिता आमच्या धर्माने इष्ट देवता ही संकल्पना विकसित केली आहे.

सनातन धर्म किंवा ज्याला हिंदू धर्म असे म्हटले जाते त्याचे वैशिष्ट्य तरी काय आहे? सर्व धर्मांत हा एकच धर्म असा आहे, ज्यात एकमेव अशा एकाच ईश्वराला अनेक वैशिष्ट्यांसह, अनेक दिव्य रूपांत पाहिले जाते. भक्त आपल्या मानसिक अवस्थेनुरूप ईश्वराचे जे रूप भावते त्याची उपासना करतो आणि अशा प्रकारे आपल्या प्रेमाच्या नि

भक्तीच्या बळावर त्याला ईश्वराच्या अधिकाधिक निकट जाता येते. ईश्वराची ही बहुविध रूपे कोणाच्या कल्पनेतून निर्माण झालेली नाहीत. प्रत्यक्ष परमात्माच ही अनेक रूपे घेऊन महान भक्तांच्या समोर प्रकटला आणि त्या भक्तांना अशा प्रकट झालेल्या ईश्वराशी प्रत्यक्ष सुखसंवाद करण्याइतका त्याचा सहवास लाभला अशांनी केलेले हे वर्णन आहे. त्यांनी, आम्ही देखील ईश्वराला समोरासमोर कसे पाहू शकू हे सांगितले, हे होण्यासाठी मंत्र दिले आणि त्यांना साक्षात्कार झालेल्या दिव्य शक्तींची उपासनापद्धतीही सांगितली.

उपासनापद्धती कोणती का असेना, भक्ती हे सूत्र सर्व धर्मांत समान आहे आणि विभिन्न दैवतांना उपास्य मानणाऱ्या आमच्या श्रद्धेस ते विसंगत नाही.

-----

# धर्मांची एकता

ईश्वराची उपासना करणे हे सर्व धर्मांच्या समोर समान ध्येय असते आणि ईश्वर एकच आहे असेही सर्व धर्म प्रकटपणे मान्य करतात. सर्व धर्मांनी मान्य केलेला हा एकच ईश्वर विभिन्न धर्मांनी घालून दिलेल्या उपासना पद्धतीचा विचार न करता तुम्ही केलेली भक्ती स्वीकारतो. म्हणूनच जन्म कोणत्याही धर्मात घेतला असला तरी त्याचा त्याग करून अन्य धर्म कवटाळण्याची आवश्यकता नाही.

मंदिर, चर्च, मशीद, विहार हे एकसारखे नसतील, त्यातली मूर्ती किंवा अन्य कोणत्याही रूपात असो, उपास्य प्रतीके पण भिन्न असतील, परंतु उपासकांवर कृपा करणारा परमात्मा एकच असतो, मग त्या उपासकांची श्रद्धा कोणत्याही रूपात असो. हे विभिन्न धर्म ज्या देशांत निर्माण झाले, त्या त्या देशातील विशिष्ट परंपरा, पद्धती आणि तेथे राहणाऱ्या लोकांचे भिन्न मानसिक दृष्टिकोन या अनुसार धर्मांनी आकार धारण केला. मात्र उपासकांच्या या विभिन्न वृत्ती-प्रवृत्तीप्रमाणे त्यांना एकाच परमात्म्याकडे घेऊन जाणे हेच सर्व धर्मांचे ध्येय असते. म्हणूनच आपला धर्म सोडून अन्य धर्म स्वीकारण्याची कोणासच गरज नाही. धर्मांतर करण्याने केवळ ज्या धर्मात जन्म घेतला त्याच धर्माची नव्हे तर नंतर जो धर्म स्वीकारला त्याचीही ते अवमानना करतात. वस्तुतः ते ईश्वराचाच अनादर करतात.

'जन्मतः लाभलेल्या धर्माचा मनुष्य त्याग करतो त्याअर्थी त्या धर्मात त्याला काहीतरी अभाव जाणवत असेल' असा विचार तुमच्या मनात येईल. मग जो मनुष्य धर्मांतर करतो तो ज्या दुसऱ्या धर्माला कवटाळतो त्या धर्माचा अनादर करतो असे स्वामीजी का म्हणतात? असेही तुम्हाला वाटेल. पण मला असे का वाटते त्याचे कारण मी सांगतो. जे लोक धर्मांतर करतात त्यांना सर्व धर्मात एकच ईश्वर आहे असे वाटत नसल्याने ते दुसरा धर्म स्वीकारतात ना? असे करण्याने ते ईश्वरी स्वरूपाचे मूल्य कमी करतात असे नाही वाटत तुम्हाला? ते बहुधा असे समजत असावेत की त्यांनी ज्या धर्मात जन्म घेतला त्यातला ईश्वर निरुपयोगी आहे आणि म्हणून ते एकदम दुसऱ्या धर्मात उडी मारतात. पण मग या दुसऱ्या नव्या धर्मातला ईश्वर हा विश्वात्मक आहे असे तरी ते मानतात का? नाही नाही, असे जर आहे तर मग धर्म बदलण्याची आवश्यकताच नव्हती. माणसे नवा धर्म का स्वीकारतात ? असे तर नाही ना की त्यांनी जन्म घेतलेल्या धर्मात त्यांच्या राहण्याने ते ज्या नव्या धर्माकडे आकर्षित झाले आहेत त्या धर्मातल्या ईश्वराच्या कृपाशीर्वादाला ते मुकत आहेत असे त्यांना वाटत होते? याचाच अर्थ हा होतो की ते

नव्या धर्माचे आणि त्यातील ईश्वराचे स्वरूप मर्यादित करीत आहेत. यामुळेच आदर करण्यासाठी ते ज्या नव्या धर्माचा स्वीकार करतात त्याचा ते वस्तुतः अनादर करतात.

हिंदू धर्म आणि अन्य धर्म यांत हा एक मोठा फरक आहे की फक्त हिंदू धर्मच मोक्षाचा मार्ग दाखवितो असे हिंदू धर्माने कधीच मानले नाही. केवळ आमच्या वैदिक धर्मानेच धर्मांतराच्या व्यवहाराला मान्यता दिली नाही आणि ते देखील याच कारणाकरिता की सर्व धर्म हे त्यांत असलेल्या एकाच परमात्म्याची अनुभूती घेण्यासाठी असलेले वेगवेगळे मार्ग आहेत अशी आमच्या पूर्वजांची ठाम समजूत होती. वेदांची स्पष्ट घोषणा आहे ''एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति'' ज्ञानी जन एकच सत्य अनेक रूपांत सांगतात. भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात -

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ।। ४-११।।

अर्थात 'जे जसे, ज्या प्रकारे मला भजतात, त्यांची श्रद्धा मी तशीच वाढवितो आणि त्यांना त्या उपासनेत स्थिर आणि दृढ करतो'. तर याच अर्थाच्या एका तामीळ वचनात म्हटले आहे की माणसाला ईश्वराचे आकलन जसे ज्या पातळीवरचे झाले, त्याच पातळीवरची त्याची उपासना असते. याच कारणामुळे अन्य धर्माच्या अनुयायांप्रमाणे हिंदूंनी कधीही धर्मांतर किंवा जिहादसारखी धर्मयुद्धे छेडली नाहीत.

आमच्या प्रदीर्घ इतिहासात याचे पुरेसे पुरावे आहेत. सर्वच इतिहासकार आम्ही धर्मसहिष्णु असल्याचे सत्य मान्य करतात. त्यांनी इतिहासात असेही नोंदवले आहे की पूर्वेकडील देशात जेव्हा श्रीविजय साम्राज्य स्थापन झाले होते तेव्हा तेथील लोकांनी आमची संस्कृती आणि जीवनपद्धती स्वेच्छेने स्वीकारली होती. ती त्यांच्यावर बळजबरीने लादली गेली नव्हती. इतिहासकारांनी पुढे असेही म्हटले आहे की हिंदू धर्म तेथे व्यापारातून पसरला, तो बळजबरीने लादला गेला नव्हता. सुमात्रा आणि इंडोनेशियाची काही बेटे यांचा समावेश असलेले श्रीविजय साम्राज्य अनेक शतके भरभराटीस आले होते आणि इसवी सनाच्या सातव्या शतकात ते वैभवाच्या शिखरावर होते.

माझ्या मते वैदिक धर्म एकेकाळी जगाच्या सर्व भागांत प्रचलित होता. पृथ्वीवरील काही भागांत सापडलेल्या भग्नावशेषावरून याला दुजोरा मिळतो .माझ्या मताशी असहमत असलेले इतिहासकार देखील हे मान्य करतात की भूतकाळात अनेक देशांतील लोकांनी भारतीय संस्कृती आणि जीवनपद्धती स्वेच्छेने स्वीकारली होती. यात आम्ही कोणत्याही प्रकारे बळजबरी केली नव्हती.

धर्मांतर मान्य असणारे सर्व धर्म, धर्मपरिवर्तन करताना विशिष्ट विधी करतात.

उदाहरणार्थ, ख्रिश्चन धर्मात बाप्तिस्मा केला जातो. हिंदू धर्मात अन्य धर्मापेक्षा कितीतरी अधिक धार्मिक विधी सांगणाऱ्या संहिता आहेत, पण धर्मपरिवर्तनाचा धार्मिक विधी सांगणारी संहिता मात्र हिंदू धर्मात नाही. आमच्या धर्माने धर्मांतराला कधीही प्रोत्साहन दिलेले नाही किंवा कोणाचे धर्मपरिवर्तनही केले नाही, या वास्तविकतेला याहून अधिक सबळ पुराव्याची आवश्यकता नाही.



कोणी प्रवासी जेव्हा रेल्वेने एखाद्या स्टेशनवर उतरतो तेव्हा टांगा, रिक्शा, बग्गी इत्यादी वाहने चालविणाऱ्यांचा त्याच्याभोवती गराडा पडतो. प्रवासी आपल्या मुक्कामाच्या ठिकाणी जाण्यासाठी स्वतःच्या सोयीप्रमाणे वाहन पसंत करतो. भाडे मिळविण्यासाठी वाहनचालकांत सदोष स्पर्धाही होते. अर्थात हा त्यांच्या उपजीविकेचा प्रश्न असतो. परंतु विविध धर्मांच्या अनुयायांनी मात्र पोहोचण्याचे एकच ठिकाण असलेल्या ईश्वरपदाकडे माणसाला आपल्याच धर्ममार्गाने नेण्याचा हट्ट धरावा, यात काहीच अर्थ नाही.

नदीवरच्या पुलाला सारख्याच आकाराच्या अनेक कमानी असतात. कमानीच्या जवळ बसलेल्या माणसास ती कमान इतर कमानीपेक्षा मोठी वाटते. लोकांना स्वतःच्या धर्माविषयीही नेमके असेच वाटते. त्यांना वाटते की केवळ आपलाच धर्म महान आहे आणि इतरांनी तो स्वीकारावा. वस्तुतः ज्या धर्मात जन्म घेतला तो धर्म टाकून दुसरा धर्म स्वीकारण्याची गरजच नाही.

विभिन्न धर्मांत वेगवेगळ्या श्रद्धा आणि परंपरा आहेत, हे काही तक्रारीचे कारण होऊ शकत नाही किंवा सर्व धर्म एकसारखे करण्याचीही गरज नाही, तर विभिन्न धर्मांच्या अनुयायांनी एकमेकांशी सामंजस्य ठेवीत जीवन जगणे महत्त्वाचे आहे. धर्मांची एकरूपता नव्हे तर एकता हे आपले ध्येय असले पाहिजे.

--------

प्रकरण - ७

# धर्मगुरूची गुणवैशिष्ट्ये

आज संपूर्ण जगातील तत्त्वज्ञानाचे विद्यार्थी आणि जिज्ञासू यांनी चिंतनाची परमोच्च विचारप्रणाली म्हणून अद्वैत सिद्धान्ताचा स्वीकार केला आहे. आपण मला अद्वैत तत्त्वज्ञान शिकविणारा 'गुरू' मानता. याचे कारण सर्वोत्कृष्टतेमुळे वेदान्त प्रणालीचे असंख्य अनुयायी आहेत असे मी म्हणेन असे तुम्हाला स्वाभाविकपणे वाटेल.

परंतु तत्काळ एक असा प्रश्न निर्माण होतो की सर्व लोक खरोखरच अद्वैत सिद्धान्त मानतात का ? जगभरातले लोक वेगवेगळ्या धर्माचे पालन करतात, अनेकजण विभिन्न तत्त्वप्रणालीचे समर्थन करतात. एकाच देशात राहणारे अनेक लोक एक धर्म सोडून दुसऱ्या धर्मात जातात. बुद्धाच्या काळात वैदिक धर्माच्या अनेक अनुयायांनी बुद्धाच्या मतप्रणालीचा स्वीकार केला होता. पुढील काळात अनेक हिंदूंनी, ख्रिश्चन किंवा इस्लाम धर्म स्वीकारला. 'पुष्टिमार्गिन' म्हणून जैन धर्मीय वैष्णव झाले. रामानुजांच्या काळात अनेकजण विशिष्टाद्वैताचे समर्थक झाले. श्रीमध्वांच्या द्वैतप्रणालीलाही अनेक अनुयायी मिळाले. आदि शंकराचार्यांच्या प्रभावकाळात जैन आणि बौद्ध या वैदिक धर्माहून भिन्न अशा मतप्रणालीच्या धर्मांचा ऱ्हास झाला. वैदिक धर्माचाच भाग असलेले कर्ममार्गाचे अनुयायी खरोखर पूर्णपणे वैदिक धर्मप्रणाली असलेल्या अद्वैत मतप्रणालीकडे परतले.

एकेकाळी भरभराटीला आलेल्या धर्माचा आलेख नंतरच्या काळात उतरणीला का लागतो? लोक खऱ्या अर्थाने धर्माचे पालन करतात का? किंवा विशिष्ट धर्मातील तत्त्वप्रणाली सखोल चिंतन करून मग त्या तत्त्वप्रणालीचे समर्थन करतात का? कदाचित तत्त्वसिद्धान्ताचे मूल्यमापन करून केवळ चिंतनशील व्यक्तीच धर्माचा स्वीकार करीत असतील. परंतु कोणत्याही धर्माचे पालन करणाऱ्या सर्वसामान्य लोकांच्या बाबतीत मात्र असे म्हणता येणार नाही. सामान्य माणसे ही धर्मातील सिद्धान्तासाठी धर्माचा स्वीकार करतात असे म्हटले तर त्यांना त्या धर्मसिद्धान्तांबद्दल सांगता आले पाहिजे व त्यांनी स्वीकारलेल्या धर्मातील सिद्धान्त अन्य धर्मातील विचारप्रणालीपेक्षा कसे श्रेष्ठ आहेत हे इतरांना त्यांना स्पष्ट करून सांगता आले पाहिजे. परंतु वास्तविकता ही आहे की, कोणत्याही धर्मातील बहुतांश व्यक्तींना आपल्या धर्माची उभारणी कोणती श्रद्धामूल्ये किंवा तत्त्वप्रणाली यांवर झाली आहे याबद्दल ठोस असे फारच थोडे ज्ञान असते.

माझा विश्वास आहे की धर्माचा विकास किंवा विस्तार त्या धर्मातील सिद्धांताशी मुळीच संबंधित नसतो. सामान्य माणसांना धर्मांतर्गत प्रश्नांचीही काही चिंता नसते. आदर्श चारित्र्य आणि सद्गुण असलेल्या महान व्यक्ती भूतलावर अवतरतात. करुणेची

मूर्त स्वरूप असलेली महान व्यक्ती सर्वत्र मांगल्याचा वर्षाव करते आणि सर्व लोक त्या व्यक्तीकडे आकर्षित होतात. तिने शिकविलेले धर्मसिद्धान्त, मग ते कसे का असेनात चांगलेच असले पाहिजेत या श्रद्धेने लोक आपल्या धर्माचा त्याग करून त्या व्यक्तीने सांगितलेला धर्म स्वीकारतात. याउलट, ज्या धर्मांचे प्रवक्ते-प्रसारक त्यांच्या धर्माची तत्त्वे पटवून देण्यात कितीही वाक्पटू असले तरी ते जर संशयात्मक चारित्र्याचे व आचारहीन असतील तर त्यांच्या धर्माचा ऱ्हास सुरू होऊन तो धर्म नाश पावतो. विसंगत श्रद्धामूल्ये असलेल्या धर्माच्या छत्राखाली लोक का जमा होतात या प्रश्नाचे उत्तर देणे अवघड आहे. एखाद्या धर्मात काही काळ लोकांना अलौकिकत्व कसे प्राप्त झाले व काही काळानंतर त्या धर्माच्या तत्त्वमूल्यांचा ऱ्हास का झाला या प्रश्नाचे उत्तर, आपण काही धर्मांच्या बाबतीत अभ्यास केला तर आपणास मिळू शकेल. त्याचवेळी आपणास हेही कळून येईल की प्रथमतः त्यांनी इतक्या मोठ्या संख्येने लोकांना आपल्या धर्माकडे कसे आकर्षित केले? त्या धर्मांचा ऱ्हास का झाला हे जर तुम्हाला कळून आले तर तो प्रथम कसा वृद्धिंगत झाला व भरभराटीस कसा आला हेही तुम्हांस कळून येईल.

कोणत्याही देशातील एखाद्या धर्माच्या ऱ्हासाचे कारण त्या धर्मांचे नेतृत्व करणारे अग्रणी व त्या धर्माचा विकास करण्याचे उत्तरदायित्व ज्यांच्यावर आहे अशा त्या धर्मसंस्थेतील व्यक्तींची चारित्र्यहीनता हेच असते.

आपण जेव्हा बुद्धाच्या चरित्रकथा वाचतो-ऐकतो आणि त्याच्या प्रतिमा वारंवार पाहतो तेव्हा त्याच्या प्रतिमेतून भूतदया, करुणा आणि शांती हे भाव पाझरताना दिसतात, त्या भावनांनी आपलेही अंतःकरण ओसंडून वाहू लागते. बुद्धाच्याही काळात लोकांची हृदये अशीच त्याच्याकडे आकर्षित झाली असतील. नंतरच्या कालप्रवाहात बुद्ध भिक्षुव्यवस्थेचे झालेले नैतिक अधःपतन महेंद्र पल्लव ह्याने लिहिलेल्या 'मत्तविलासम्' ह्या ग्रंथांतील वर्णनात पाहावयास मिळते. बौद्ध धर्माचा ऱ्हास कसा होत गेला आणि कोणत्याही धर्मांचा उगम किंवा अधःपतन हे त्या धर्माच्या प्रसारकांच्या चारित्र्यावर कसे निर्भर असते हे या ग्रंथावरून कळून येते.

बुद्धानंतर झालेल्या आदि शंकराचार्यांचे अतुलनीय साधुत्व व मानवता यामुळे लोक त्यांच्याकडे आकर्षित झाले. त्यानंतर रामानुजाचार्य आणि मध्वाचार्य झाले. ते त्यांच्या वैयक्तिक जीवनात उत्तुंग दर्जाचे चारित्र्यवान म्हणून विख्यात पावले. त्या दोघांनीही प्रचंड अनुयायीवर्ग मिळविला व आपल्या सिद्धान्तांचा प्रभाव सर्वदूर प्रस्थापित केला. अलीकडच्या काळात शांती आणि त्यागाचे प्रतीक असलेले गांधीजी झाले. लक्षावधी लोकांनी त्यांच्या तत्त्वांचा स्वीकार केला व 'गांधीवाद' म्हणून ओळखला जाणारा वेगळाच धर्म खरोखरी अस्तित्वात आला. खरोखरच जर ह्या धर्माच्या विकासाचे कारण त्याच्या

मूलभूत तत्त्वप्रणालीत असते तर गांधीवादातून निर्माण झालेला धर्म आज अत्युच्च शिखरावर राहिला असता. पण प्रत्यक्षात आम्हांला काय दिसते? गांधीवादातून आचरणात आलेल्या आजच्या जीवनपद्धतीवर भाष्य करण्याची आवश्यकता नाही.

बळ आणि आर्थिक प्रलोभन यांच्या जोरावर लोकांना आपल्याकडे खेचून घेणाऱ्या धर्मांचा येथे प्रश्नच येत नाही. विविध प्रलोभने व सामाजिक प्रतिष्ठेच्या आमिषांनी अनेकजणांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. अशा पद्धतीने दुष्काळाच्या काळात ख्रिस्ती धर्माने आपला प्रभाव वाढविला. असेही म्हटले जाते की तलवारीच्या आणि फौजफाट्याच्या जोर-जबरदस्तीने अनेकजणांचे इस्लामने धर्मांतर घडवून आणले. सर्वसामान्य जनतेने त्या धर्मांचा स्वीकार त्यातील कोणत्याही तत्त्वांसाठी वा सिद्धान्तासाठी केला नव्हता हेही येथे पुन्हा पुराव्यानिशी सिद्ध झाले आहे. आणखी एक सत्य येथे विचारात घ्यावयास हवे. ग्रामीण भागाच्या बाहेरील भागात राहणाऱ्या लोकांचे पाद्री मिशनऱ्यांनी धर्मांतर केले. तुम्ही ज्या धर्मात जन्म घेतला आहे त्या धर्मात तुम्हाला सतत दाबून ठेवून चिरडण्यात आले आहे असे सांगून त्यांना मोफत शिक्षण व मोफत औषधोपचार यांचे आमिष दाखवून व प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचे वचन देऊन, धर्मपरिवर्तन करण्याची त्यांची नेहमीचीच पद्धती होती.

सर्वजण जरी नाही तरी काहीजण या आमिषांना बळी पडले. तथापि दमनाची स्थिती असली तरी कित्येक जणांनी दाखविल्या गेलेल्या प्रलोभनांना नाकारून आपला मूळ धर्म सोडण्याचे नाकारले. असे घडण्याचे कारण काय होते? एक तर त्यांची धार्मिकता चांगली होती आणि दुसरे म्हणजे वेळोवेळी आपल्या धर्मात होऊन गेलेल्या महान व्यक्तींविषयी त्यांच्या मनात आदर होता. त्यांनी स्वतःसच बजावले की ''आपण आपल्या पूर्वजांच्याच धर्मात राहिले पाहिजे, ज्या धर्मात अनेक थोर पुरुष होऊन गेले.''

ज्यांनी लोकांचे धर्मपरिवर्तन केले त्यांची आपण निंदा करता कामा नये किंवा त्यांना दोषही देऊ नये. त्यांचा धर्म सर्वोच्च सत्याचा पुरस्कार करतो असा त्यांचा विश्वास आहे. म्हणूनच तर ते अन्यधर्मीयांना सक्तीने किंवा विविध प्रलोभने दाखवून आपल्या धर्मात आणू पाहतात. आपला धर्मच फक्त लोकांना मोक्ष देऊ शकतो असे वाटल्याने ते असे करतात. प्रलोभने दाखवून किंवा सक्ती करून धर्मांतरण घडविण्यात त्यांना काहीच गैर वाटत नाही कारण ते असे लोककल्याणासाठीच करीत आहेत असे त्यांना वाटत असते.

बळजबरीविना किंवा आर्थिक प्रलोभनाविना जे धर्म वाढतात ते केवळ त्या धर्मांच्या गुरूंच्या श्रेष्ठ गुणांमुळेच. धर्मप्रतिनिधी किंवा धर्मप्रवक्त्यांच्या बाह्य रूपावर त्यांची गुणवत्ता ठरत नसते. तो ज्या धर्मप्रेरणेशी संबंधित असेल त्याविषयी तो संपूर्ण स्वार्थरहित असावा,

त्याने कुणाचेही अमंगल चिंतू नये व इतकेच नव्हे तर तो निरपवादपणे निष्कलंक असावयास हवा. त्याचे जीवन पूर्णपणे सदाचारसंपन्न असावे व तो स्वभावाने शांत आणि करुणामय असावा. केवळ असाच माणूस त्याच्याकडे मदतीच्या अपेक्षेने आलेल्यांच्यातील उणिवा आणि दोष दूर करून त्यांची मदत करू शकतो.

अशा श्रेष्ठ गुणांनी युक्त असलेली माणसे आपल्याच माणसातून निर्माण करणे हा आपल्या धर्माचा विकास करण्याचा मार्ग आहे. आपला धर्म वाढविण्यासाठी अन्य धर्मांचा अपप्रचार करण्याची गरज नाही. गरज आहे ती धर्मप्रतिनिधींनी व धर्मगुरूंनी आपल्या धर्माची शिकवण, प्रत्यक्ष आपल्या जीवनातील आचरणातून आदर्श उदाहरण म्हणून घालून देण्यासाठी स्वतःस अधिक पात्र करण्याची. काळाच्या ओघात, युगामागून युगे, अशा व्यक्तींनीच सनातन धर्म एक जिवंत शक्ती म्हणून टिकवून ठेवला आहे.

जर एखादा युद्धप्रिय लष्करशहा माझ्यापुढे प्रकट झाला तर त्याच्याशी सामना करण्यासाठी मी सैन्यबलाची जुळवाजुळव करू शकणार नाही, किंवा प्रलोभनांतून आपल्या धर्माची भुरळ लोकांना पाडण्यासाठी जे धर्मप्रसारक इस्पितळे आणि शाळा बांधतात त्यांच्यासारखी कोट्यवधीची धन-संपत्ती मी खर्च करू शकणार नाही आणि यदाकदाचित तसे मी करूही शकलो तरी अशा मार्गाने केलेली धर्मपरिवर्तने खरी असणार नाहीत, टिकाऊही असणार नाहीत. समजा, अधिक शारीरिक बळ आणि अर्थबळ असलेला एखादा जनसमूह निर्माण झाला तर तो आपल्या जोरदार शक्तीच्या आणि अफाट संपत्तीच्या जोरावर माझ्या कार्याचा सर्वनाश करू शकेल. म्हणून आपला धर्म वाढविण्यासाठी अशा बाह्य शक्तींवर अवलंबून न राहता, त्याऐवजी आपण स्वतःला अधिक उन्नत करण्यासाठी आपल्या आत्मिक बळावर निर्भर राहिले पाहिजे. या मार्गाने गेल्यास कोणत्याही आक्रमक प्रसाराशिवाय, अन्य प्रलोभनाशिवाय आपण आपल्या धर्माचा विकास करू शकू.

सध्या विदेशातील अनेक लोक जे अद्वैत सिद्धान्ताबद्दल आवेशयुक्त भाषेत बोलत आहेत, ते तत्त्वप्रणाली म्हणून अद्वैताच्या उच्च स्वरूपामुळे असू शकेल. वेदान्तमताची पूर्ण पारख करून आणि आपले आंतरिक पूर्ण समाधान झाल्यावरच ते या तत्त्वपीठात येतात. परंतु सर्वसाधारण माणसाला गरज, अशा अमूर्त तत्त्वज्ञानाची नव्हे तर एखाद्या महात्म्याच्या महान जीवनचरित्राच्या उदाहरणाची असते.

म्हणून शांती आणि करुणाभाव असलेला, प्रज्ञा आणि स्वार्थत्यागी वृत्ती असलेला पुरुष आमच्यातूनच निर्माण व्हावयास हवा.

-----

परमाचार्य पूज्यश्री
चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी
यांची वाणी

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

**भाग -२**

**वैदिक धर्म : प्रास्ताविक**

## प्रकरण - १

# नाव नसलेला धर्म

आपण जेव्हा ''हिंदू धर्म'' असे म्हणतो परंतु वस्तुतः या धर्माच्या सुरुवातीस नाव असे काही नव्हते. काही जणांच्या मते 'हिंदू' या शब्दाचा अर्थ 'प्रेम' असा तर काहींच्या मते 'हिंदू तो जो 'हिंसा' किंवा 'अत्याचार' मानत नाही, असाही असतो.' शब्दाचा अर्थ सांगण्याचे हे प्रतिभापूर्ण प्रकार असू शकतील.

आपल्या कोणत्याही पुरातन शास्त्रात हिंदू धर्म असा शब्दप्रयोग आढळत नाही. हिंदू हे नाव आम्हांला विदेशी लोकांनी दिले. आमच्या पश्चिमेकडील देशांतील लोक सिंधू नदी पार करून आमच्या देशात आले. ह्या सिंधू नदीला ते 'इंडस' किंवा 'हिंद' असे म्हणत असत. या इंडसच्या लगतच्या प्रदेशाला त्यांनी 'इंडिया' हे नाव दिले. ह्या देशात राहणाऱ्या लोकांच्या धर्माला ते 'हिंदू धर्म' म्हणू लागले. शेजारच्या देशाचे नाव कधी कधी त्याच्या निकट असणाऱ्या प्रदेशास दिले जाते. या संदर्भात मी आपणास एक मनोरंजक गोष्ट सांगतो.

स्वतःस 'बैरागी' म्हणविणाऱ्या लोकांस उत्तर प्रदेशातील लोक तत्परतेने भिक्षा घालतात. ('बैरागी' हा शब्द मूलतः बिरागिन ह्या शब्दापासून झालेला असून त्याचा अर्थ जो 'राग' रहित म्हणजेच वासनारहित आहे असा होतो. 'बैरागी' चा अर्थ भिक्षेकरी असाही होतो.) दक्षिणेतली माणसे तसे करीत नाहीत, म्हणून बैरागी लोकांच्या मनात त्यांच्याबद्दल तक्रारीचा सूर असतो. 'इल्ली पो पो कहे तेलुंगी' हा त्यांच्या गाण्याचा छोटासा तुकडा असतो. तेलुगू आम्हाला भिक्षा घालीत नाहीत, हाकलून देतात' असा ह्या ओळीचा अर्थ आहे. वास्तविक तेलुगू लोक 'जा-जा' म्हणायचे असेल तर 'पो-पो' न म्हणता 'वेल्लु-वेल्लु' असे म्हणतात. 'पो' हा तामीळ भाषेतील शब्द आहे. मग वरील ओळीचा अर्थ तुम्ही कसा लावाल ? दक्षिणेतील प्रदेशांचा प्रवास करताना बैराग्यांना प्रथम तेलुगू म्हणजे आंध्रप्रदेश ओलांडून जावे लागले होते. त्यामुळे त्यांना असे वाटले की तेथून पुढील दक्षिणेतील प्रदेश हा तेलुगू भाग आहे.

ही तर्कपद्धती तेलुगू भाषकांनी स्वतःस तामिळनाडु अरवनाडु म्हणण्यामागे आहे. कारण आंध्र प्रदेशाच्या दक्षिणेकडील छोट्याशा प्रदेशाला 'अरव' म्हणतात. त्यामुळे तेलुगू लोक तामिळनाडुला अरवनाडु म्हणतात. याचप्रमाणे परकीय लोक भारतात प्रथम सिंधू म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशाजवळ आल्याने पुढील संपूर्ण भारतास ते त्याच नावाने

ओळखू लागले.

ते काहीही असो, फार पूर्वी आमच्या धर्माचे नाव काही हिंदू धर्म असे नव्हते किंवा (वैदिक मत) वैदिक धर्म वा सनातन धर्म म्हणूनही तो ओळखला जात नसे. आमच्या मूळ रचनांतील पाठात कोठेही आमच्या धर्माचा उल्लेख कोणत्याच नावाने केलेला नाही. मी जेव्हा ह्या गोष्टीचा विचार करू लागलो तेव्हा मला वाटले की आमच्या धर्मात काहीतरी त्रुटी आहे.

फार वर्षांपूर्वी कोणीतरी मला एकदा म्हणाले, 'रामू येथे आहे' काहीशा विमनस्क अवस्थेत मी म्हणालो, 'कोणता रामू?' ताबडतोब प्रश्न आला, 'कोणता रामू म्हणजे? रामू काय दोन चार आहेत?' त्यानंतर माझ्या लक्षात आले की 'कोणता रामू'? हा माझा प्रश्न माझ्या भूतकाळातील स्मृतीमधून बाहेर उसळून आला होता. माझ्या गावी 'रामू' नावाचे चार इसम राहत होते. त्यांचा नक्की उल्लेख कळण्यासाठी आम्ही त्यांना 'काळा रामू' 'गोरा रामू' 'उंच रामू' आणि 'ठेंगणा रामू' अशी वेगवेगळी नावे दिलेली होती. जर तेथे एकच 'रामू' असता तर अशी वेगवेगळी नावे देण्याची गरजच पडली नसती.

ह्यावरून आमच्या धर्माला नाव का नाही ह्याबद्दल माझ्या मनात एकदम प्रकाश पडला. अनेक धर्म असतील तर त्यांना ओळखण्यासाठी वेगवेगळी नावे द्यावी लागतात. पण जर का एकच धर्म असेल तर त्याला ओळखण्यासाठी नावाची आवश्यकताच काय?

आमचा धर्म सोडून इतर सर्व धर्मांची स्थापना कोणा एक व्यक्तीने केली होती. बुद्ध धर्म म्हणजे गौतम बुद्धाने स्थापन केलेला धर्म. जैन धर्म म्हणजे जैन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या महावीरांनी स्थापन केलेला धर्म. त्याचप्रमाणे ख्रिस्ती धर्माच्या नावाचा उगम येशू ख्रिस्ताच्या नावात आहे. ह्या सर्व धर्मांच्या आधीचा आमचा धर्म संपूर्ण जगभर पसरलेला होता आणि त्यावेळी कोणताही अन्य धर्म नसल्याने आमच्या धर्माला नाव देण्याची आवश्यकता भासली नाही. हे सत्य जेव्हा मला उमगले तेव्हा आमच्या धर्माला नाव नव्हते, ह्याबद्दल लाज वाटण्याचे कारण उरले नाही. उलट त्याबद्दल मला अभिमान वाटला.

आमचा धर्म प्राक्कालीन होता असे म्हटले तर मग तो कोणी स्थापन केला असा प्रश्न उद्भवतो. ह्याविषयी केलेले सर्व शोध विफल ठरले आणि उत्तर काही मिळाले नाही. ज्यांनी ब्रह्मसूत्रांची रचना केली त्या व्यासांनी आमच्या धर्माची स्थापना केली असेल का ? की ज्याने आम्हांला भगवद्गीता दिली त्या कृष्ण परमात्म्याने आमच्या धर्माची स्थापना केली असेल ? परंतु व्यास आणि कृष्ण दोघेही म्हणतात की वेद त्यांच्याही पूर्वी होते. असे असेल तर मग ज्यांनी आम्हांला वेद, मंत्र दिले त्या ऋषींना आम्ही आमचे

धर्मसंस्थापक म्हणावे का? पण ते स्वतःच स्पष्टपणे सांगतात की वेद आम्ही निर्माण केलेले नाहीत. आपण जेव्हा मंत्राचे पठण करतो तेव्हा आपल्या मस्तकाला हात लावून त्या मंत्राच्या द्रष्ट्या ऋषीच्या नावाचा उच्चार करतो. परंतु ते ऋषी स्वतःच सांगतात की ते मंत्र आमच्या माध्यमातून जगापुढे प्रकट झाले हे सत्य आहे म्हणूनच आम्हांला मंत्रद्रष्टा ऋषी म्हटले गेले. परंतु मंत्राची रचना आम्ही केली नाही तर ते आमच्यापुढे प्रकट झाले. चित्तवृत्ती निरोध करून आम्ही जेव्हा ध्यानाला बसलो तेव्हा मंत्र आम्हांला अवकाशात दिसले. खरोखरच आम्ही त्यांना प्रत्यक्ष पाहिले (म्हणून मंत्रद्रष्टा अशी संज्ञा). आम्ही त्यांची रचना केली नाही. (ऋषी हे मंत्रकर्ते नव्हते.) सर्व ध्वनी अवकाशात निर्माण होतात. त्यांच्यापासून सारी निर्मिती झाली. विज्ञान सांगते की विश्व अवकाशातील कंपनांनी निर्माण झाले. आपल्या तपोबलाने ऋषींना अवकाशातील मंत्र पाहण्याची दैवी शक्ती प्राप्त झाली होती. जे मंत्र मानवास या निर्मित स्थितीतून मुक्त करतात. वेद हे अपौरुषेय (म्हणजे कोणा मानवाने लिहिलेले नाहीत.) आहेत, आणि ते अवकाशातील परमेश्वराच्या निःश्वासितापासून निर्माण झालेले आहेत. ऋषींना ते दिसले आणि विश्वाला ते त्यांनी भेट म्हणून दिले.

हे जर आम्हांला कळून आले तर आमच्या धर्माचा कोणी संस्थापक नाही ह्या वस्तुस्थितीचा आम्हांला अभिमानच वाटेल. वस्तुतः एका सनातन धर्माचे, प्रत्यक्ष परमात्म्याच्या निःश्वासितातून निर्माण झालेले वेद ज्या धर्मात आहेत त्या धर्माचे आम्ही वारसदार आहोत, या भाग्याचा आम्हाला आनंदच वाटला पाहिजे.

-----

## प्रकरण - २

# वैश्विक धर्म

वर्तमानकाळात हिंदू धर्म म्हणून ओळखला जाणारा धर्म निश्चित ठाऊक नसलेल्या भूतकाळात संपूर्ण जगभर प्रचलित होता. पुरातत्त्वाच्या अध्ययनात देखील आपल्या वैदिक धर्माच्या अवशेषपर खुणा आढळून आल्या आहेत. उदाहरण द्यायचेच झाले तर इ. स. पूर्व १४ व्या शतकात रमेसेस दुसऱ्या आणि हित्तितेस यांच्यात झालेल्या तहनाम्याचे देता येईल. या तहनाम्यात तहाचे साक्षीदार म्हणून मित्र आणि वरुण ह्या वैदिक देवतांचा उल्लेख केलेला आहे. रमेसेस आणि आपल्या रामाच्या नावातही साम्य आहे.

मादाभास्कर येथील स्थळांपैकी ७५ टक्के स्थळांची नावे संस्कृतोद्भव आहेत. पश्चिम हॅम्पशायर येथे देखील एकेकाळी भरभराटीला आलेल्या हिंदू धर्माच्या अस्तित्वाचे पुरावे मिळाले आहेत. आमच्या नवरात्रीच्या काळातच मेक्सिको मध्ये 'राम-सीता' म्हणून ओळखला जाणारा उत्सव साजरा केला जातो. ह्या भागात जेथे जेथे उत्खनन करावे तेथे गणपतीच्या मूर्ती सापडतात. स्पेनिर्द यांनी मेक्सिको जिंकण्यापूर्वी अझटेक हे तिथे राहत होते. 'अझटेक' हा 'आस्तिक' चा अपभ्रंश असावा. पवित्र मेषसंपाताच्या काळात पेरूमध्ये सूर्यमंदिरात पूजा केली जात असे. दिवस आणि रात्र यांचा कालावधी ज्या दिवशी सारखा असतो त्यास विषुवदिन असे म्हणतात. हाच वसंत ऋतूत येणारा 'मेषसंपात' म्हणून ओळखला जातो. येथील लोकांना Incas म्हटले जात असे. 'इन' हे सूर्यदेवतेचे संस्कृत नाव आहे. आपण रामाला 'इनकुल तिलक' असे म्हणतो ना? 'इनकुल तिलक' याचा अर्थ इन कुळाचे भूषण असा होतो. 'तिलक' याचा अर्थ भूषण किंवा अलंकार असा होतो. हे संस्कृत शब्दकोशात पाहावयास मिळेल. स्पेन्सर किल्लन ह्यांनी लिहिलेल्या 'दी नेटिव ट्राइबज् ऑफ सेन्ट्रल ऑस्ट्रेलिया' ह्या पुस्तकाच्या पृष्ठ १२८ व १२९ वर ऑस्ट्रेलियातील मूळ रहिवाशांची नग्न अवस्थेत नृत्य करतानाची चित्रे दिलेली आहेत. ह्या चित्रांतील 'शिवनृत्य' ह्या शीर्षकाखाली दिलेली चित्रे बारकाईने पाहिल्यास त्यातील नर्तकांच्या कपाळावर तिसरा डोळा काढल्याचे आढळते. हे चित्र शिवाच्या त्रिनेत्राचा स्पष्ट संकेत देणारे आहे.

बॉटरनेओच्या गहन अरण्यात अगदी अलीकडच्या काळापर्यंत कोणाही मानवाचा प्रवेश झाला नव्हता असे म्हटले जाते. ह्या अरण्यात एक यज्ञीय स्तंभ सापडला असून त्यावर एक लेख कोरलेला आहे. ह्या लेखातील अक्षरांचे आपल्या ग्रंथातील वर्णांशी खूप साधर्म्य आहे. ह्या लेखाला इतिहासकार कोर्टईचा (कोटेई किंवा कुटेई या नावाने ओळखला जाणारा जिल्हा पूर्व बॉरनेओमध्ये आहे) लेख म्हणून ओळखतात. ह्या लेखात

ज्या राजाने यज्ञीय बळी दिला त्याचा उल्लेख त्या युपाचे म्हणजे यज्ञीय स्तंभाचे ठिकाणी सापडतो. राजाने ब्राह्मणांना कल्पवृक्षाचे दान केल्याचाही उल्लेख ह्या लेखात केलेला आहे. ज्या युरोपिअन लोकांनी आमच्या धर्माचा उपहास केला त्यांनीच हे संशोधन केले आहे, ही विशेष लक्षात घ्यावी अशी गोष्ट आहे.

ह्या संदर्भात माझ्या मनात काही विचार येतो, तो तुम्हालाही खूप मनोरंजक वाटेल. तुम्हाला सगरपुत्रांची कथा ठाऊकच आहे. सगर हा सूर्यवंशातला राजा होता आणि त्याला साठ हजार पुत्र होते. यज्ञात सोडलेल्या अश्वाचा शोध घेत हे सगरपुत्र जमीन खणत खणत पाताळ लोकांपर्यंत पोहोचले. अशा प्रकारे समुद्र निर्माण झाला. त्याला सगर राजाच्या नावामुळे 'सागर' असे नाव मिळाले.

अखेरीस सगरपुत्रांना आपला अश्व कपिल महर्षींच्या आश्रमाजवळ सापडला. ह्या ऋषीनेच आपला घोडा चोरून पाताळ लोकात आणून लपविला असावा असा विचार करून त्यांनी त्याच्यावर हल्ला चढविला. यावर कपिल ऋषींनी केवळ दृष्टिक्षेपाने सगरपुत्रांना जाळून भस्मसात केले. पुढे ह्याच सगरांच्या वंशात जन्माला आलेल्या भगीरथाने तपश्चर्या केली व भस्मसात झालेल्या आपल्या पूर्वजांना मुक्त करण्यासाठी गंगेला स्वर्गातून खाली आणले. रामायणानुसार सगरांची ही अशी कथा आहे. अमेरिका हा अगदी टोकाला असलेला देश म्हणजेच पाताळ किंवा पाताळ लोक असावा आणि कपिल ऋषींचा आश्रम असलेले कपिलारण्य हे तेथे असावे, असे आपण मानले तर, काही काळ 'मरुदाई' असलेले जसे अपभ्रंशाने मदुराई झाले त्याचप्रकारे 'कपिलारण्या' चा कॅलिफोर्निया झाला असावा. तेथेच कॅलिफोर्नियाच्या जवळ (अश्वदीप) (हॉर्स आयलँड) आणि 'अश आयलँड' नावाची बेटे आहेत हे सत्य देखील ह्या संदर्भात मुद्दाम लक्षात घेण्यासारखे आहे.

ह्याशिवाय सगर आणि सागर ह्या नावांच्या संदर्भात एक विचार माझ्या मनात असाही येतो की भूगर्भशास्त्रज्ञांच्या मते कित्येक युगांपूर्वी सहारा वाळवंटाच्या जागी सागर होता आणि 'सहारा' हा 'सागरा' चा अपभ्रंश असावा.

भूतकाळात आमचा धर्म संपूर्ण जगात प्रचलित होता, ह्याविषयीच्या पुराव्याबद्दल काही इतिहासकार असे स्पष्ट करण्याचा प्रयत्न करतात की हिंदुस्थान व अन्य देशांत जी सांस्कृतिक व धार्मिक विचारांची देवाण-घेवाण झाली ती ह्या देशांतील प्रवासामुळे घडून आली होती. मला स्वतःला याविषयी असे वाटते की सर्वत्र एकच धर्म होता आणि ज्या खुणा किंवा प्रतीके आपणास आज दिसून येतात ते सर्व त्या त्या देशातील रहिवाशांनी निर्माण केले आहे.

इतिहासाच्या काही अभ्यासकांनी, ज्याला आपण इतिहासकाळ म्हणतो, म्हणजेच दोन किंवा तीन हजार वर्षांच्या इतिहासकाळात अन्य देशांत आढळलेल्या आपल्या धर्माच्या अवशेषांच्या संशोधनाबद्दल असे मत मांडले आहे की, हिंदू त्या देशात गेले, तेथील जुनी स्थानिक संस्कृती त्यांनी उद्ध्वस्त केली आणि त्या जागी हिंदू संस्कृती लादली. दुसऱ्या शब्दांत सांगायचे झाले तर ते असा दावा करतात की हिंदूंनी तेथील रहिवाशांच्या जीवनपद्धतीत आपली संस्कृती अशा पद्धतीने घुसविली की ती त्यांच्यात पूर्णपणे विलीन झाली.

तथापि चार हजार किंवा त्याहून अधिक वर्षांपूर्वी, अनेक देशांच्या वैदिक धर्माशी असलेल्या संबंधाविषयी पुरावे मिळावयाचे आहेत. याचाच अर्थ तेथील संस्कृती उदयास येत असता काळाबरोबरच त्या देशांत वैदिक धर्माचे काही अस्तित्व होते. आणि त्यानंतरच त्या प्रदेशातील रहिवाशांना त्यांचा स्वतःचा असा धर्म मिळाला.

ग्रीस देशात त्यांचा प्राचीन धर्म होता आणि भव्य देवालयांतून विभिन्न देवतांची पूजा केली जात होती. हेल्लेनिक धर्मात वैदिक धर्माची मूलतत्त्वे होती. ईसाई पूर्वकाळात जीझसशी संबंधित सेमीटिक धर्माची देखील अशीच स्थिती होती. मेक्सिकोमधील मूळ रहिवाशांचा स्वतःचा धर्म होता. त्यांनी वैदिक धर्ममताप्रमाणेच निसर्गशक्तीमध्ये दिव्यत्व पाहिले आणि त्यांना देवता मानून त्यांची पूजा केली. अशा सर्व धर्मांत धार्मिक विधींची चांगली व्यवस्था होती.

ग्रीक लोकांचा वा अन्य कोणताच धर्म टिकला नाही. ग्रीक संस्कृतीने एके काळी वैभवाचे सर्वोच्च स्थान प्राप्त केले होते. सध्या ग्रीक देशात ख्रिश्चन धर्म भरभराटीला येत आहे. बुद्ध धर्म मध्य आणि पूर्व आशिया मध्ये जपानपर्यंत पसरला आहे. मानवशास्त्राच्या अभ्यासकांच्या मते आफ्रिकेच्या अरण्यासारख्या प्रदेशातच केवळ धर्म आपल्या मूळ स्वरूपात अस्तित्वात आहेत. परंतु ह्या प्राचीन धर्मांत देखील वैदिक तत्त्वे आहेत.

धर्म आणि तत्त्वज्ञानातील सिद्धान्तात्मक सत्य अज्ञ लोकांना सुलभतेने कळावीत म्हणून ती नेहमीच दृष्टांत देऊन व कथांतून सांगितली जातात. आध्यात्मिक संकल्पना ह्या कळायला कठीण असतात म्हणून एक तर त्या कथांत गुंफून सांगाव्या लागतात किंवा त्या धर्मकृत्याच्या रूपात, आचरणात उतरल्याच पाहिजेत म्हणून धार्मिक विधीच्या रूपात सांगितल्या जातात. सर्वसामान्य माणसासाठी धार्मिक कृत्याचे आचरण म्हणजे त्याच्या प्रतीकात्मक स्वरूपात विद्यमान असलेल्या सत्याचा शोध घेण्याचे साधन असते. तथापि प्रतीकात्मता हेच केवळ धार्मिक कृत्याचे वैशिष्ट्य असते आणि जोपर्यंत त्यांच्या आंतरिक सत्यार्थाचा बोध होत नाही तोपर्यंत त्यांचे पालन करण्याची आवश्यकता नाही ह्या मताशी मात्र मी सहमत नाही.

धार्मिक विधींचे आचार म्हणून स्वतःचे एक विशेष स्थान व प्रभावपूर्ण सामर्थ्य आहे. त्याचबरोबर पुराणातल्या कथा ह्या केवळ सत्याचे दर्शन किंवा सिध्दान्ताचे आकलन व्हावे म्हणून स्पष्टीकरणात्मक असतात असेही मी मानीत नाही. कथा ह्या दृष्टीने त्यांचे असे वेगळे उच्च स्थान आहे व त्या केवळ कल्पित नसून त्या प्रत्यक्षात घडल्या आहेत असा माझा विश्वास आहे. परंतु त्याचवेळी ह्या कथा एका सत्याच्या विशिष्ट अर्थाचे निश्चित दर्शन देखील घडवीत असतात. धर्मकृत्याविषयी म्हणाल तर त्यांचे आचरण आम्हाला निश्चित लाभदायक असते. परंतु यथावकाश अशा धार्मिक कृत्याचा खरा अर्थ जाणून घ्यायला आम्ही शिकलो की आमचे चित्त शुद्ध होऊ लागते, आणि ही एक अशी अवस्था असते की त्यावेळी त्या धार्मिक कृत्यापासून होणाऱ्या लाभाचा उद्देश पूर्णपणे विस्मृत होतो आणि आम्हांला एक सर्वोच्च स्थिती म्हणजेच मुक्त आनंदावस्था प्राप्त होते.

काळाच्या ओघात अशा काही कथांचा किंवा धार्मिक विधींचा खरा आंतरिक अर्थ लोप पावण्याचा किंवा पूर्णपणे विस्मृत होण्याचा संभव असतो. तेव्हा हजारो वर्षांचा काळ लोटल्यानंतर विदेशात जेव्हा नवे धर्म आकार घेऊ लागतात तेव्हा सर्वांचे मूळ असलेल्या वैदिक धर्माशी संबंध नसलेल्या धर्मांत मूळ वैदिक संकल्पनात बदल घडतात किंवा त्यांचा विपर्यास होतो.

हिब्रू परंपरेतल्या ईव्ह आणि ॲडॅमची गोष्ट तुम्हाला ठाऊक आहे. ही कथा जुन्या करारात आली असून त्या कथेत ज्ञानाचा वृक्ष आणि त्याचे फळ न खाण्याची देवाची आज्ञा ह्याबद्दल सांगितले गेले आहे. प्रथम ॲडॅमने फळ खाल्ले नाही पण ईव्हने मात्र खाल्ले, त्यानंतर ॲडॅमने पण ते निषिद्ध फळ खाल्ले.

उपनिषदातील एका संकल्पनेनेच बायबलमधील ही कथा साकारली आहे. परंतु स्थळ आणि काळात झालेल्या बदलामुळे मूळ कल्पना विपर्यस्त झाली आहे, इतकेच नव्हे तर तिच्यावर बोळा फिरविला गेला आहे.

मण्डुकोपनिषदात आलेल्या ह्या कथेत दोन पक्षी पिप्पल वृक्षाच्या फांदीवर राहत होते. पिप्पल वृक्ष म्हणजेच पिंपळाचे झाड. एक पक्षी झाडाचे फळ खातो आहे, पण दुसरा पक्षी मात्र फळ न खाता केवळ फळ खाणाऱ्या आपल्या जोडीदाराकडे पाहतो आहे. ह्या रूपक कथेत पिप्पल वृक्ष म्हणजे देह. पहिला पक्षी हा जीवात्मा किंवा जीव आहे आणि तो जे फळ खातो आहे ते फळ म्हणजे विषयसुख होय. वृक्षाच्या प्रतीकाने दाखविलेल्या त्याच देहात असलेला दुसरा पक्षी हा परमात्म्याचे प्रतीक आहे. तो सर्व जीवांचा आधार आहे. परंतु तो विषयसुख जाणीत नाही. तो ते विषयरूप फळ खात नाही. साहजिकच त्याला जीवात्मा म्हणून म्हणजेच पहिल्या पक्ष्याने भोगलेला तोच अनुभव नाही. उपनिषदात ही दोन पक्ष्यांची कथा अत्यंत सुंदर काव्यपूर्ण पद्धतीने आली

आहे. जो फळ खातो तो पक्षी म्हणजे जीव आहे आणि जो फळ खात नाही तो पक्षी म्हणजे परमसत्य आहे. जो स्वतःस 'आत्मा' असे जाणतो.

ह्या 'जीवा'लाच हिब्रू धार्मिक परंपरेतल्या बायबलच्या कथेत 'ईल' म्हटले गेले आहे. आश्चर्य म्हणजे ह्या हिब्रू भाषेतल्या मूळ शब्दाचा अर्थ खरोखर 'जीव' (Life) असाच आहे. व्याकरणाच्या नियमाप्रमाणे 'जी' चे रूपांतर 'ई' मध्ये आणि 'ज' चे 'य' मध्ये होते. यमुनाचे जमुना व योगींद्र चे जोगिंदर झाल्याची उदाहरणे आपणास ठाऊकच आहेत. बायबलच्या ह्या कथेत 'जीव' चे 'ईल' आणि 'आत्मा' (किंवा आत्मज) चे 'ॲडम' झाले आहे. तसेच 'पिप्पल' चे ह्याचप्रमाणे 'ॲपल' झाले आहे. आपला बोधीवृक्ष म्हणजे ज्ञानवृक्ष होय. 'बोध' चा अर्थ ज्ञान असाच आहे. बुद्धाला ज्ञान बोधीवृक्षाखाली झाले हे सर्वश्रुतच आहे. परंतु बुद्ध झाले त्या आधीच्या काळी देखील पिंपळाच्या झाडास बोधीवृक्ष असेच म्हटले जात असे.

काही शतकांचा काळ लोटल्यानंतर दूरच्या देशात मूळ धरलेल्या उपनिषदातील कल्पनांत बदल घडून आला. बायबलच्या कथेत अशा प्रकारचा झालेला बदल आपणास पाहावयास मिळतो. वास्तविक आत्मा हा कधीच विषयसुख घेत नाही, पण ह्या कथेत मात्र तो ज्ञानवृक्षाचे फळ खातो. आमचा बोधीवृक्ष ज्ञानाचा आत्मप्रकाश देतो व विषयसुख पळवून लावतो. तर बायबलमधील ह्या कथेतला ज्ञानवृक्ष ऐहिक सुखाचे भान देतो. अशा प्रकारचे बदल लक्षात घेतले नाही तरी एक पुरावा येथे नक्कीच मिळतो की हिब्रूच्या प्रदेशात वैदिक धर्म एकेकाळी निश्चितच प्रचलित होता.

अशा प्रकारच्या परंपरा व संकल्पना विदेशातल्या जनतेने स्वीकारल्यानंतरही काळाच्या ओघात कितीही बदलत गेल्या तरी त्या देशातील मूळ कल्पनांचे दर्शन घडविणाऱ्या काही गोष्टी तशाच टिकून राहतात. ह्याचे समर्थन करणारे दुसरे एक उदाहरण मी आपणास देतो. आपले तिरुप्पावई आणि तिरुवेम्बावई हे वेदांइतके प्राचीन नाहीत. विद्वान लोक त्यांचा काळ १५०० वर्षांहून अधिक पुरातन नसल्याचे सांगतात. असे असले तरी तामीळ भाषेतल्या ह्या स्तोत्रांची रचना करणारे आण्डाल आणि माणक्कवाचकर हे वेद व महाकाव्यांच्या काळाहून कितीतरी नंतरच्या काळात झालेले आहेत. त्यांच्या काळानंतर समुद्रपार हिंदू साम्राज्ये उदयास आली. चोळ राजांनी देखील आपल्या साम्राज्याच्या सीमा देशाच्या सीमान्त किनाऱ्यापलीकडे नेल्या. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे आमच्या आरमाराच्या मोहिमांमुळे आमचा सागरी व्यापार प्रचंड प्रमाणात वाढला व त्यामुळे आमचा परदेशांशी संपर्क वाढण्यात झाला. ह्याचा परिणाम म्हणजे परदेशातील लोक हिंदू धर्म आणि संस्कृतीकडे आकर्षित झाले. अशा प्रकारे आमच्या धर्म आणि संस्कृती यांच्याशी ज्या प्रदेशांचा संपर्क वाढला त्यात आग्नेय अशियाचा प्रदेश अत्यंत

महत्त्वाचा होता. इंडोनिशियाच्या दीपसमूहातील बालीसारखी बेटे पूर्णपणे हिंदू झाली. सयाम (थायलंड), इंडोचायना आणि फिलिपाईन्स हे हिंदू संस्कृतीच्या प्रभावाखाली आले. श्रीविजय सांप्रत व्हिएटनाम, कंबोडिया आणि लाओस हे इंडोचायनामध्ये समाविष्ट आहेत.

(येथे परमसद्‌गुरू विविध धर्मांच्या विलीनीकरणाच्या विभिन्न अवस्थांचा अगदी संक्षेपाने उल्लेख करतात.) मूळ प्राक्कालीन काळात वैदिक धर्म सर्वत्र होता ही पहिली अवस्था होय. दुसऱ्या अवस्थेत जगाच्या विभिन्न भागांतल्या नव्या धर्मांचे विलीनीकरण झाले. तिसऱ्या अवस्थेत ह्या धर्मांचा ऱ्हास झाला व बौद्ध, ईसाइ व इस्लाम धर्मांनी त्याची जागा घेतली. नंतरच्या अवस्थेत हिंदू संस्कृती ही हिंदुस्थानच्या समुद्रापलीकडील देशांतसुद्धा, प्रामुख्याने आग्नेय आशियात जीवनाची आधारभूत शक्ती झाली होती. याच काळात आमच्या धर्म आणि संस्कृतीच्या विस्ताराबरोबरच, तामिळनाडूमधील मंदिरांची आठवण करून देणारी भव्य मंदिरे कंबोडियामध्ये अंगकोर-वट, जावा, इंडोनिशियामध्ये बोरोबुदुर आणि जावामध्येच प्रमबनन येथे सुद्धा निर्माण झाली होती. आता ह्या वेळी आमच्या तिरुप्पावई आणि तिरुवेंबावईने थायलंड मध्ये प्रवेश केला होता.

आज देखील थायलंडमध्ये डिसेंबर-जानेवारी महिन्यात तामीळ मार्गझईसारखा, त्याच महिन्यात एक भव्य उत्सव साजरा केला जातो. याच काळात आपण येथे तिरुप्पावई व तिरुवेंबावई या स्तोत्रांचा भक्तिभावाने पाठ करतो. या उत्सवाचाच एक भाग म्हणून दोलोत्सव (झोक्यांचा उत्सव) देखील साजरा केला जातो. या उत्सवाचा विशेष म्हणजे विष्णूच्या नावाने साजरा केल्या जाणाऱ्या उत्सवात एक व्यक्ती शिवाचे रूप धारण करून झोक्यावर बसते. या प्रसंगावरून वैष्णव आणि शैवांच्या एकात्मतेमध्ये तिरुप्पावई व तिरुवेंबावई यांचा किती भरीव वाटा आहे हे कळून येते. पावई गाणी किंवा पावई रचना म्हणजेच तिरुप्पावई आणि तिरुवेंबावई.

तुम्ही जर थायलंडच्या लोकांना पावईच्या गाण्यांबद्दल विचाराल तर ते तुम्हांला काहीच सांगू शकणार नाहीत. थाई उत्सव केवळ तामीळ मार्गझई उत्सव ज्या महिन्यात होतो त्याच महिन्यात साजरा केला जातो. म्हणून थाई उत्सवाचा संबंध पावई रचनांशी जोडणे संयुक्तिक होणार नाही. पण थायलंडचे लोक स्वतःच ह्या उत्सवाला 'त्रियाम्यावई-त्रिपावई' असेच म्हणतात हेही लक्षात घेतले पाहिजे. ह्याच उत्सवाचा एक भाग म्हणून थाई लोक देखील झोक्याचा उत्सव साजरा करतात आणि त्यात एकजण शिवाचा पोषाख घालून शिवाचे रूप धारण करतो.

आज जे कोणी बायबल वाचतात त्यांना उपनिषद कथेचे ज्ञान नसणे हे शक्य आहे, परंतु त्यांना ईव्ह व ॲडॅम ह्यांच्या कथेपर्यंतचा भाग नक्कीच आठवतो. त्याचप्रमाणे थाई लोकांना पावई कथेपर्यंतचा रचनाबदल ज्ञात नसू शकेल, पण त्याच वेळेस ते

तिमप्पाबाई-तिमाबाई नावाचा उत्सव दरवर्षी धनुस महिन्यात साजरा करतात. धनुस हा स्वैर मास असून वा तामीळ मार्गझई सारखाच असतो. तो साजरा करताना धार्मिक विधीच्या पालनात इतिहासाच्या कालौघात एकच विपर्यस्त बदल झाला आहे आणि तो म्हणजे विष्णूची जागा शिवाने घेतली आहे. ह्या उत्सवाच्या काळात थाई लोकांना पावई रचनांचा विसर पडलेला दिसून येतो, परंतु हा उत्सव ते पावईच्या नावाने अजूनही साजरा करीत आहेत. हेही वैशिष्ट्य पुरेसे बोलके आहे. ह्या वास्तवातल्या सर्व गोष्टी तुमच्यासमोर मांडल्यानंतर मी तुम्हाला तीन ते चार हजार वर्षांपूर्वीच्या काळात नेऊ इच्छितो आणि त्या काळात एखाद्या धर्मात किंवा संस्कृतीत, त्या विदेशीय भागात कसा कसा आणि किती बदल घडत गेला असेल ह्याची तुम्हीच कल्पना करावी असे तुम्हाला आवाहन करीन.

ह्या संदर्भात तुम्ही वैदिक परंपरेचा विचार करताना ह्या गोष्टीचा विचार करावयास हवा की अन्य देशांत गेल्या एक सहस्र वर्षांत ह्या परंपरेत बदल व विपर्यास होऊन देखील ह्या परंपरेच्या जागी प्रस्थापित झालेल्या धर्मात देखील दिसत असलेले मूळ घटक तिचे अस्तित्व प्रकट करीत आहेत.

प्राक्कालीन इतिहास काळातील लोकांच्या धार्मिक श्रद्धेतून आपणास त्यांच्या हिंदू धर्माची मुळे किंवा संकल्पन यांचे कसे आकलन करावे? अन्य देशांत जेव्हा सामाजिक सुधारणांनी आकार घेतला नव्हता तेव्हा आमच्या धर्माचा किंवा संस्कृतीचा प्रसार तेथे सशस्त्र आक्रमणातून किंवा व्यापारातून केला गेला हे म्हणणे योग्य होणार नाही आणि म्हणूनच मला असे वाटते की ह्या देशातले काही घेतले आणि त्या देशात नेऊन रुजवले हा प्रश्नच येथे मुळातूनच उद्‌भवत नाही. माझ्या मते हेच सत्य आहे की अगदी आरंभापासूनच वैदिक धर्म संपूर्ण जगभर प्रचलित होता. अनेक शतके लोटल्यावर भिन्न स्वरूपे धारण केली असावीत. ह्या भिन्न धार्मिक स्वरूपांनाच पुढील काळात विभिन्न देशांत, इतिहास काळात त्या त्या धर्मांना ईसाई किंवा इस्लाम असे नाव प्राप्त झाले असावे.

-----

प्रकरण - ३

# सनातन धर्माच्या स्वरूपाची विशिष्टता

आपल्या धर्माच्या स्वरूपाची अनेक अद्वितीय वैशिष्ट्ये आहेत. कर्मसिद्धान्त हे त्यातील एक वैशिष्ट्य असून आपल्याच धर्माची शाखा असलेल्या बौद्ध धर्मासारख्या सर्वच धर्मांत तो सिध्दान्त समान रूपाने अस्तित्वात आहे.

हा कर्मसिद्धान्त आहे तरी काय? प्रत्येक क्रियेला तितकीच समान आणि विरोधात्मक प्रतिक्रिया असते. कार्य-कारण, क्रिया-प्रतिक्रिया हा भौतिक शास्त्रातला अटळ नियम आहे. हा भौतिक शास्त्रातील अद्‌भुत नियम आमच्या पूर्वजांनी मानवी जीवनाला लागू केला.

हे विश्व जाणिवेची देणगी लाभलेल्या केवळ सचेतन जीवांनीच नव्हे तर असंख्य जड वस्तूंनीही भरलेले आहे. त्याचबरोबर ते भौतिक जीवनही निर्माण करते. नियम, धर्म हे जसे सचेतनाला तसेच अचेतनालाही लागू असले पाहिजेत. कर्मसिद्धान्तानुसार मनुष्याच्या प्रत्येक क्रियेचा तदनुसार परिणाम असतो. ह्या धारणेप्रमाणे आमचा धर्म स्पष्ट सांगतो की मनुष्य जर पापकर्म करील तर तो त्याचा दंडही भोगील. तसेच त्याची कृती पवित्र असेल तर त्याला त्याचे लाभप्रद फळ मिळेल.

यानंतर आमचा धर्म असे निश्चयपूर्वक सांगतो की आपल्या चांगल्या-वाईट कर्माचे फळ भोगण्यासाठी प्रत्येकास वारंवार जन्म घ्यावा लागतो. 'सत्कर्म करा', 'दुष्कर्म करू नका' असा आदेश सर्वच धर्म करतात, परंतु हिंदू धर्म आणि त्याच्या उपशाखा मात्र क्रिया आणि परिणाम याचा संबंध मानतात. मात्र भारताच्या बाहेरील कोणताही धर्म, कर्म आणि त्याचे फळ यांच्या कार्यकारणभावाला किंवा त्याचाच श्रद्धेचा भाग असलेला पुनर्जन्माचा सिद्धान्त मान्य करीत नाही. खरोखरी विदेशातील धर्मांचे मत या सिद्धान्ताला विरोधी आहे आणि माणूस आपल्या कर्माची फळे भोगून संपविण्यासाठी पुन्हा पुन्हा जन्मतो या मताचा ते जोरदार प्रतिवाद करतात. त्यांचा असा विश्वास आहे की मनुष्याला एकच जन्म मिळतो आणि त्याच्या मृत्यूनंतर जेव्हा त्याचा आत्मा निघून जातो, तेव्हा तो न्यायाच्या दिवसाची वाट पाहत कोठेतरी राहतो. या न्यायाच्या दिवशी ईश्वर त्याच्या सत्कृत्याचा आणि दुष्कृत्याचा हिशेब करतो आणि त्या आधारे त्याला चिरंतन स्वर्ग देतो किंवा शाश्वत नरकाची सजा देतो.

काही वर्षांपूर्वी युरोपातील एक विख्यात लेखक मला भेटायला माझ्याकडे आले होते. आजकाल तुम्ही अनेक गोऱ्या लोकांना मठात येताना पाहता. (परमगुरू येथे मठाचा

उल्लेख उपारोधाने करीत आहेत.) 'ईश्वर म्हणजे प्रेम' असा बायबलने एकापेक्षा अधिक

वेळा उल्लेख केला असल्याचे त्या सद्गृहस्थाने मला सांगितले. परंतु ईश्वर पापी माणसाला मुक्तीची संधी न देता कायमस्वरूपी नरकाला पाठवितो या गोष्टीचा मेळ 'ईश्वर म्हणजे प्रेम' या विधानाशी काही त्याला लावता येईना. याबद्दल एका पाद्र्याने याला सांगितले होते की 'होय, हे खरे आहे की कायमस्वरूपी नरक आहे पण तो नेहमीच रिकामा असतो'.

पाद्र्याचे हे विधान स्वीकारणे कठीण आहे. ईश्वर करुणेपोटी पापी माणसाला नरकात पाठवत नसेल हे आपण मान्य करू पण मग ईश्वर पापी माणसाच्या आत्म्याला कोठे पाठवितो? ख्रिश्चन धर्मानुसार पुनर्जन्म नसल्याने पाप करणाऱ्याला जर पुन्हा जन्मावे लागत नाही, तर त्यालाही सत्कर्म करणाऱ्या माणसाप्रमाणेच स्वर्ग मिळत असेल. याचाच अर्थ असा होईल की कोणतेही शिक्षेचे भय न बाळगता आम्ही पाप करीत राहावे कारण अखेरीस नैतिकता किंवा सत्याचरणाची काही आवश्यकताच ठरणार नाही.

आमच्या धर्ममतानुसार देखील मृत्यूनंतर आमची गती आमच्या कर्मानुसार ठरविणारा ईश्वरही परम दयावंत आहे, परंतु त्याचवेळी तो जग अधर्मात किंवा अपवित्रतेत बुडू देत नाही. पापकर्मास क्षमा करून करतो तरी काय? तो आमच्या बऱ्या-वाईट कर्माची फळे भोगण्यासाठी अजून एका जन्माची संधी आम्हाला देतो. स्वर्गाचे सुख आणि नरकाच्या यातना या खरोखरी ह्याच जगात असतात. या जन्मात आमच्या वाट्याला येणारी सुख-दुःखे ही आमच्या गतजन्मीच्या चांगल्या-वाईट कर्माच्या प्रमाणात असतात. ज्यांनी गतजन्मी खूप पापे केलेली असतात ते ह्या जन्मी खूप दुःखे भोगतात आणि त्याचप्रमाणे ज्यांनी अधिक सत्कर्मे केलेली असतात त्यांच्या वाट्याला ह्या जन्मात खूप सुखे येतात. सुखापेक्षा दुःखच अधिक प्रमाणात वाट्याला येणाऱ्यांचे व सुखदुःखे सारख्या प्रमाणात वाट्याला येणाऱ्यांचे प्रमाण अधिक असते. केवळ आनंदच वाट्याला येणारे कृपांकित लोक अगदी अल्प असतात. यावरून इतकेच सिद्ध होते की आमच्यापैकी बहुसंख्य जणांनी गतजन्मी सत्कर्मापेक्षा दुष्कर्मेच अधिक प्रमाणात केली असावीत.

ईश्वर दयेपोटी आमची पापे धुण्यासाठी आम्हाला प्रत्येक वेळी नवीन संधी देतो. सद्गुरू, शास्त्रे आणि मंदिरे ही ईश्वराने आम्हांला आमची आंतरिक अपवित्रता धुण्यासाठी दिलेली वरदाने आहेत. पापी माणूस देखील स्वतःच्या प्रयत्नांनी आपली उन्नती करून घेईल. ही खात्री बाळगून तो ईश्वर पापकर्म करणाऱ्यावर विश्वास टाकतो आणि दयावंत होऊन सुधारणेसाठी त्याला पुढील जन्माची नवी संधी देतो. पापकर्म करणाऱ्याला काहीही न करता अयोग्य ठरवूनही स्वर्ग बहाल करण्यापेक्षा त्याला सुधारण्याची संधी देणारा हा दयापूर्व विश्वास श्रेष्ठ नव्हे काय? आपण स्वतः काहीही करू शकत नाही, सर्व काही

ईश्वरच करतो या भावनेने जर माणूस शरणागतीवर विश्वास ठेवील तर तो मुक्त होऊन उद्धरून जाईल. परंतु स्वतःच्या उन्नतीसाठी आपले सर्व प्रयत्न सोडून देऊन ईश्वराचा आश्रय घेणाऱ्यावर ईश्वराने कृपा करणे ही एक गोष्ट आणि आपली आंतरिक उन्नती करण्यासाठी कोणतेही प्रयत्न करण्यास त्याला अपात्र ठरवून ईश्वराने त्याच्यावर कृपा करणे ही पूर्णतः भिन्न गोष्ट आहे. या विषयात मानवी प्रयत्नांच्या दृष्टिकोनातून पाहताना आपण असा विचार करावयास हवा की स्वतःच्या प्रयत्नांनी आध्यात्मिक उन्नती साधू पाहणाऱ्या साधकावर विश्वास टाकणे हीच ईश्वराची सर्वोच्च कृपा आहे. याच मार्गाने खरी ईश्वरी कृपा प्रकटते.

ईश्वर कोणालाही शिक्षा म्हणून शाश्वत नरकात पाठवत नाही, हे त्या विशिष्ट पाद्र्याचे केवळ वैयक्तिक मत आहे. माणसाला फक्त एकच जन्म असतो या ख्रिश्चन धर्माप्रमाणे मत असणारे सर्वच धर्म त्या पाद्र्याच्या वरील मताशी सहमत असतील असे म्हणता येणार नाही. माणसाने आपल्या एकमात्र जन्मात केलेल्या चांगल्या किंवा वाईट कर्मानुसार ईश्वर त्यांना स्वर्ग किंवा नरक देतो व तो भाणूस त्या एकाच जन्मात ते भोगत असतो असा त्या धर्माचा विश्वास आहे. नरकयातना भोगण्याची शिक्षा झालेल्या पापी माणसांच्या बाबतीत 'न्यायाचा दिवस' किंवा ज्याला जगाच्या 'अंताचा दिवस' अशा भयंकर नावाने ओळखतात, तो दिवस प्रमुख असतो. येथे परमेश्वराच्या दया या संकल्पनेला मर्यादा घातल्या जातात.

पुनर्जन्माच्या सिद्धान्ताचे समर्थन करणारा सबळ पुरावा आहे. एके दिवशी एक पाश्चात्त्य महिला मला भेटावयास आल्या आणि पुनर्जन्माच्या सिध्दान्ताचे समर्थन करणारा काही पुरावा आहे काय असे त्यांनी मला विचारले. मी त्या विषयावर त्या महिलेबरोबर काहीच चर्चा केली नाही. उलट मी त्यांना तेथील स्थानिक प्रसूती दवाखान्यात जाऊन तेथे जन्मलेल्या नवजात शिशूंची सर्व माहिती मिळवावयास सांगितले. आम्ही त्यावेळी जेथे मुक्काम केला होता तेथे एक इंग्लिशचे उत्तम जाणकार गृहस्थ राहत होते. मी त्या गृहस्थाला त्या महिलेबरोबर दवाखान्यात जायला सांगितले. दवाखान्यातून नंतर जेव्हा ते दोघे परतले तेव्हा मी त्या महिलेस त्या दवाखान्यातील नवजात बालकांविषयीचे तिचे मत विचारले. तेथे एक गुबगुबीत व धट्टाकट्टा असे एक बालक तर दुसरे सडपातळ असे बालक तिच्या पाहण्यात आल्याचे तिने सांगितले. तसेच तेथील सुखसोयी असलेल्या वार्डमध्ये म्हणजे सुस्थितीतील मातांसाठी असलेल्या वार्डमधील श्रीमंत आईच्या पोटी एक व एका गरीब आईच्या पोटी जन्माला आलेले बालक पाहिले.

यावर मी त्या विदेशी महिलेला म्हणालो, ''मृत्यूनंतर ईश्वर माणसाला शाश्वत नरकात पाठवितो हा विषय आपण थोडा वेळ बाजूला ठेवू या. असल्या गोष्टी काही

आपण पाहिलेल्या, अनुभवलेल्या नाहीत. पण तुम्ही आताच त्या दवाखान्यात भिन्न प्रकारे जन्मलेली बालके प्रत्यक्ष तुमच्या डोळ्यांनी पाहिली. तेथील बालकांमध्ये जी भिन्नता तुम्हाला आढळली त्याचा अर्थ तुम्ही कसा लावाल? एखादे बालक श्रीमंत मातेच्या पोटी जन्मते तर दुसरे गरीब आईच्या पोटी का जन्मते? एक बालक जन्मतःच सुदृढ असते तर दुसरे दुबळे का असते? आणि एखादे बालक सुंदर, गोजिरवाणे निपजते तर दुसरे कुरूप, असे का?

"माणसांना एकच जन्म असतो हा सिद्धान्त तुम्ही मान्य केला तर जन्मतःच बालकांमध्ये असलेली भिन्नता पाहिल्यावर ईश्वर दयाळू किंवा निःपक्षपाती नाही आणि तो दोषपूर्णतेने आणि असमंजसपणाने काम करतो आहे असे तुमचे मत झाल्याशिवाय राहील काय? अशा ईश्वराची आम्ही का भक्ती करावी आणि तो आमच्याकडे दयेने पाहील अशी श्रद्धा कशी ठेवावी? आमच्या गतजन्मी आम्ही केलेल्या चांगल्या किंवा वाईट कर्माप्रमाणे आमचा सध्याचा जन्म निश्चित होतो हा सिद्धान्त मान्य केला नाही तर दोन जीवांतील ह्या भेदाचा अर्थ आम्ही कसा लावू शकतो?" त्या पाश्चात्त्य महिलेने माझे हे म्हणणे मान्य केले.

तथापि आधुनिक काळातील विचारवंतांच्या दृष्टीने हे म्हणणे संयुक्तिक ठरणार नाही. ते पुनर्जन्माच्या विषयी शास्त्रीय पुरावा मागतील. या विषयावर शास्त्रज्ञांनी खूप संशोधन केले असून त्यांचे निष्कर्ष पुनर्जन्माच्या सिद्धान्ताला अनुकूल असेच आहेत. जगाच्या विभिन्न भागांत केलेल्या अध्ययनात त्यांनी आपल्या पूर्वजन्माचे स्मरण आहे अशा व्यक्तींची भेट घेतली. त्यांनी पूर्वजन्मात पाहिलेल्या पण वर्तमानकाळात ज्या व्यक्ती किंवा स्थळांशी त्यांचा काहीही संबंध नाही अशा व्यक्तींच्या आणि स्थळांच्या आठवणी सांगितल्या. शास्त्रज्ञांनी त्याची पडताळणी करून पाहिली आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांनी दिलेली ती माहिती बिनचूक निघाली. त्यांनी अशी अनेक उदाहरणे तपासली. आपल्यापैकी अनेकजणांना गतजन्मीचे मुळीच ज्ञान नसते पण काहीजणांना मात्र गतजन्माचे स्मरण असते. संशोधकांच्या मते गतजन्माचे स्मरण असणाऱ्यांपैकी अनेकजणांचा पूर्वजन्मात अपघाताने मृत्यू झाला होता, किंवा त्यांचा खून झाला होता.

ईश्वराचा अवतार ही संकल्पना हे आमच्या धर्माचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. एकच सद्वस्तू असून तीच असंख्य रूपांत प्रकट होते हा आमचा एक मूळ सिद्धान्त आहे. ते एकमेव सत्यच, जन्म-मृत्यूच्या अधीन असलेल्या जीवांच्या रूपाने पुनःपुन्हा प्रकट होत राहते. या जड-चेतन वस्तुमात्राने भरलेल्या जगाचे संरक्षण करण्यासाठी तेच सत्य ईश्वररूपाने प्रकटते. मानवाप्रमाणे तो ईश्वर कर्मसिद्धान्ताच्या अधीन नसतो. स्वतःच्या कर्मोत्तर अस्तित्वात आपल्या कर्माची फळे भोगण्यासाठी मनुष्य पुनःपुन्हा जन्म घेतो.

परंतु वारंवार घेतलेल्या ह्या जन्मांत आपल्या प्राचीन कर्मांचे क्षालन करण्याऐवजी तो अधिकाधिक कर्मांच्या कर्दमात लिप्त होत जातो.

माणसाचे उन्नयन करून त्याला सद्धर्माचा मार्ग दाखविण्यासाठी ईश्वर पुनःपुन्हा भूलोकात प्रकटत असतो. 'जेव्हा जेव्हा अधर्माचे वर्चस्व वाढते आणि धर्माला ग्लानी येते, तेव्हा तेव्हा अधर्माचा नाश करून धर्माची पुन्हा स्थापना करण्यासाठी आणि साधूंचे रक्षण करून दुष्टांचा नाश करण्यासाठी मी अवतार घेत असतो' असे श्रीकृष्ण परमात्म्याने भगवद्गीतेत सांगितले आहे (गीता अध्याय ४ श्लोक ७ आणि ८.)

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
अभ्युत्थानं अधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।

ईश्वराला त्याच्या विभिन्न अवस्थांत जाणून घ्यावे लागते. ईश्वर सर्व काही असून सर्वांत ईश्वरच आहे हे जाणून घेणे कठीण आहे. यानंतर गीतेच्या 'विभूतियोग' ह्या दहाव्या अध्यायात असे म्हटले आहे की प्रत्येक प्रकारच्या सर्वोत्कृष्टामध्ये परमात्मा वास करतो. काही विद्वानांनी भगवंताच्या ह्या अवस्थेचे वर्णन 'सारांचे सार' असे केले आहे. मानवाची सर्वोत्कृष्टतेची उंची वाढविण्यासाठी ईश्वर प्रज्ञावंत आणि ज्ञानी अशा गुरू (आचार्य), योगी आणि भक्त यांच्या रूपात आपल्या दूतांना भूलोकावर पाठवितो. ही ईश्वराची आणखी एक अवस्था आहे. ह्या अवस्थेतील ईश्वराला जाणून घेतले पाहिजे. ह्या वर उल्लेख केलेल्या अवस्थांनी समाधान न झाल्याने तो आणखी एक अवस्था धारण करतो आणि अवताराच्या रूपाने खाली येतो. 'अवतरण' या शब्दाचाच अर्थ मुळी खाली आलेला असा आहे. ईश्वर हा 'परात्पर' म्हणजे 'सर्वोच्चाहून उच्च', अतीत म्हणजे 'सर्वातीत' आणि असा सर्वातीत असूनही तो धर्मसंस्थापनेसाठी आमच्यामध्ये जन्म घेऊन पृथ्वीवर अवतरित होतो.

शिव हा अवतार आहे असे सिद्धान्त शैव मानीत नाहीत. (दक्षिणेत अकराव्या शतकाच्या सुमारास विकसित झालेल्या शैव सिद्धान्ताच्या अनुयायांना 'सिद्धान्त शैव' असे म्हटले जाते.) तेराव्या शतकातला 'शिवज्ञानबोधम्' चा लेखक मेयकन्दर हा शैव सिद्धान्ताच्या प्रमुख पुरस्कर्त्यपैकी एक होय. आदि शंकराचार्य हे शिवाचे व ज्ञानसम्बन्धर हे मुरुग म्हणजेच सुब्रह्मण्यचे अवतार आहेत असे सिद्धान्त शैव मानीत नाहीत. त्यांचे असे म्हणणे आहे की ईश्वर जर मानवाच्या गर्भाशयात रक्तमांसाच्या देहात वास करील तर तो स्वतःच अपवित्र होईल. अद्वैतवादी मताप्रमाणे रक्तमांसाच्या मानव योनीत वास केला तरी अवतार हे खऱ्या अर्थाने केवळ ब्रह्मच आहेत. त्यांच्या मते ईश्वराने पृथ्वीवर खाली येण्यात अनुचित असे काहीच नाही.

सर्व वैष्णव दिव्य अवताराचा सिद्धान्त निरपवादपणे मान्य करतात. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने पाहिले तर ब्रह्म हे स्वतःच जीव म्हणून प्रकट होते. ह्या मताशी शैव पूर्णपणे सहमत नसले तरी वैष्णव आणि शैव ह्यांच्या मतप्रणालीत अनेक मुद्यांबाबत एकमत आहे. आपण जेव्हा अवताराविषयी बोलतो तेव्हा मुख्यत्वे करून आपल्या मनात विष्णूच्या दहा अवतारांचा विचार असतो. मनुष्यमात्राचा उद्धार करण्याच्या हेतूने विष्णू पृथ्वीवर अवतरतात ही वैष्णवांची श्रद्धा असल्यामुळे त्यांना अवताराचा सिद्धान्त मान्य आहे. केवळ आपल्या करुणेच्या पोटीच विष्णू स्वतः कितीही लहान रूप धारण करतो. वास्तविक ईश्वर बाह्यतः कोणत्याही मर्त्य रूपात प्रकट झाला तरी आपल्या सत्य स्वरूपाची त्याला जाण असल्याने तो धारण केलेल्या अवताराच्या रूपात किंचितही लहान होत नाही किंवा त्याच्या मूळ स्वरूपाला कोणतीही दोषार्ह बाधा देखील पोहोचत नाही.

वैदिक म्हणजेच हिंदू धर्माला अवतार संकल्पना पूर्णतः मान्य आहे. विष्णूच्या दहा अवतारांबद्दल शैव देखील वैष्णवांशी सहमत आहेत.

एकमात्र असलेला निर्गुण आणि निराकार परमात्मा सगुण आणि साकार रूपात प्रकट होतो ही एक आणखी आमच्या धर्माच्या स्वरूपाची विशेषता आहे. ह्या सगुण साकार रूपातील देवतांची प्रतीके असलेल्या मूर्तींची आम्ही पूजा करतो. ह्यामुळे अन्य लोक आमच्यावर अनेकेश्वरवादी असा शिक्का मारतात. त्यांचे हे मत पूर्णपणे अयोग्य आहे. कारण आम्ही एकाच परमेश्वराची, एकाच सत्याची विविध रूपांत पूजा करतो ह्याचा अर्थ आम्ही अनेक ईश्वर मानतो असा मुळीच होत नाही. मूर्तीमध्ये ईश्वर आहे असे मानून आम्ही मूर्तीची पूजा करतो. म्हणून आम्हाला मूर्तिपूजक मानणे हेही तितकेच असमंजसपणाचे आहे. आपल्या धर्माची अत्यंत सुस्पष्ट धारणा असलेले हिंदू केवळ मूर्ती म्हणजेच परमेश्वर असे मानीत नाहीत. एकाग्र चित्ताने भक्ती करता यावी म्हणून मूर्ती निर्माण केली गेली असून सर्वत्र उपस्थित असलेला ईश्वर मूर्तीत देखील आहे व तो केवळ मूर्तीतच नाही ह्या दृढ धारणेनेच मूर्तीची पूजा केली जाते. अन्य धर्माच्या उपासकांनी देखील पूजा आणि ध्यानासाठी प्रतीके स्वीकारलेली आहेत. त्यामुळे केवळ हिंदूच मूर्तीची पूजा करतात; असे म्हणणे पूर्णपणे अन्यायाचे असून हिंदूंना मूर्तिपूजक म्हणून त्यांचा उपहास करणे योग्य नाही.

आमचा धर्म हा असा एकमेव धर्म आहे की जो केवळ आमच्याच अनुयायांना मुक्तीचा अधिकार आहे असे म्हणत नाही. ही खरोखरच आम्हा हिंदूंना अत्यंत अभिमानास्पद बाब आहे. कोणत्याही धर्माने सांगितलेल्या मार्गाने गेले तरी अंततः सर्वांना एकाच परमात्म्याची प्राप्ती होते असा आमच्या धर्माचा सर्वसामान्य दृष्टिकोन आमच्या धर्मग्रंथांतून प्रकट झालेला आहे. ह्याच कारणामुळे हिंदू धर्मामध्ये धर्मांतराला स्थान नाही.

माणसाने जर येशू ख्रिस्ताच्या शिकवणुकीचे पालन केले नाही तर त्याला नरकाची शिक्षा दिली जाईल असे ईसाई धर्म म्हणतो. प्रेषित महंमदाची शिकवण न पाळल्यास अशीच शिक्षा होईल असे इस्लाम धर्मनिपण म्हटले आहे. याबद्दल आम्ही दोन्हीही धर्मांच्या अनुयायांवर रागावता कामा नये. ईसाई आणि इस्लाम ह्या दोन्हीही धर्मांच्या अनुयायांपाशी असलेली पूर्णतेची बुद्धी अन्य धर्मांच्या अनुयायाजवळ नाही असा त्या दोन्हीही धर्माचा समान विचार आहे असे आपण मानू. तेव्हा आपण असे समजू की ख्रिश्चन किंवा इस्लाम यांपैकी कोणीही असो त्यांचा ह्यात चांगलाच हेतू आहे आणि ते मदत करण्याच्या हेतूनेच इतरांना आपल्या धर्माच्या छत्राखाली आणू इच्छित आहेत.

अन्य धर्मीयांना आपल्या धर्मात आणताना ते लालूच दाखविण्यासारख्या काही अवांच्छित मार्गाचा अवलंब करतात तेव्हा ते स्वतः श्रेष्ठ समजत असलेल्या उद्दिष्टासाठी तसे करीत आहेत असे आपण समजू. त्याप्रमाणे त्यांनी भूतकाळात शस्त्रबळावर धर्मांतर घडवून आणले, विशेषतः इस्लाम धर्माने ह्याच मार्गाने आपला धर्म वाढविला. ईसाई लोकांनी आपला धर्म पैशाच्या जोरावर वाढविला असे नेहमी म्हटले जाते. मिशनऱ्यांच्या लोककल्याणाच्या कामाला शस्त्रबळाची जोड देऊन ख्रिश्चनांनी धर्मप्रसारासाठी सैन्यबळाचा उपयोग करून घेतला. गोऱ्या लोकांच्याजवळ धनाचे बळ होते पण अरबी वाळवंटाच्या मुस्लिमांजवळ तसे ते नव्हते. (पश्चिम आशियात पेट्रोडॉलर्समुळे आलेल्या भरभराटीमुळे आता ही स्थिती पूर्णतः बदलली आहे.) ते गरीब लोकांनी आपला धर्म स्वीकारावा ह्याच उद्देशाने ख्रिश्चन मिशनऱ्यांनी शाळा उघडल्या, दवाखाने सुरू केले.

जोरजबरदस्तीने किंवा काही प्रलोभनांनी लोकांनी धर्म बदलावा हे आपल्याला मान्य होणार नाही. परंतु अशा पद्धतीने जे कोणी आपल्या धर्माचा प्रसार करतात, केवळ ह्याच कारणासाठी त्यांच्या ह्या कार्याने ते सामान्यपणे कल्याण करू इच्छितात ह्याविषयी आपल्या मनात संदेह असू नये. त्यांचा हा विश्वास योग्य आहे का असे विचारणे आवश्यक आहे. ख्रिस्त किंवा प्रेषिताचे अनुयायी नसलेले सगळे खरोखरच नरकात पाठविले जातात का? थोडासा विचार केला तरी हे कळून येईल की ख्रिश्चन किंवा इस्लामच्याच अनुयायांनाच मुक्तीचा अधिकार आहे हे म्हणणे काही तर्कावर टिकू शकणार नाही. येशू दोन हजार वर्षांपूर्वी झाला तर प्रेषिताचा जन्म सुमारे चौदाशे वर्षांपूर्वी झाला. (इस. ५७० ते ६३२ हा प्रेषित महंमदाचा जीवनकाल आहे.) मग सृष्टी निर्माण झाल्यापासून ह्या दोघांच्या पूर्वी जन्मलेल्या सर्व माणसांचे काय झाले? ते सर्वजण नरकात पाठविले गेले असे आम्ही समजायचे काय? ज्यांनी ख्रिश्चन आणि इस्लाम धर्म स्थापन केला त्यांच्या पूर्वजांना देखील स्वर्ग मिळाला नसेल असा आम्हांला निष्कर्ष काढणे भाग पडेल.

ख्रिस्ताच्या किंवा प्रेषिताच्या पूर्वी झालेल्या सर्वजणांचा हिंदूंच्याप्रमाणे जर पुनर्जन्मावर विश्वास होता आणि ख्रिस्ताच्या व प्रेषिताच्या येण्यापूर्वी त्यांचे तारण झाले नसेल असे आम्ही मान्य केल्यास ते पुन्हा पुन्हा जन्म घेत राह्यले असतील आणि नंतर त्यांना ख्रिस्ताच्या आणि प्रेषिताच्या शिकवणुकीचे पालन करण्याची संधी मिळाली असेल. परंतु पुनर्जन्म नाही हा ख्रिश्चन व इस्लाम धर्मीयांचा तर्क आम्ही स्वीकारल्यास असंख्य पिढ्यांचे लक्षावधी लोक शाश्वत नरकात गेले असतील.

ज्या ठिकाणाहून कधीही सुटका होणार नाही अशा शाश्वत नरकात युगानुयुगे माणसांना पाठवीत राहण्याइतका परमेश्वर निर्दय असेल का, असा येथे प्रश्न निर्माण होतो. ह्या काळात मनुष्यमात्राला मुक्तीचा मार्ग दाखविण्यासाठी आपला शिक्षक किंवा दूत पाठविण्याइतका तो करुणामय नसेल का? मग करुणा नसलेल्या त्या ईश्वराची आम्ही पूजा का करावी? किंवा मग धर्म तरी कशासाठी हवा?

भिन्न हवामान आणि भिन्न पिके येणारे अनेक देश आहेत. त्याचप्रमाणे जगाच्या प्रत्येक भागाने आपली वेगळी संस्कृती विकसित केली आहे. परंतु प्रारंभापासूनचे पृथ्वीवरील सर्व देश वेदांनी व्यापले होते व नंतर त्या त्या देशांच्या परिवर्तनशीलतेतून अन्य धर्म तेथे उदय पावले. त्यामुळेच या विधानाचे समर्थन करणारे पुरावे म्हणूनच वैदिक परंपरेचे पैलू केवळ तेथील वर्तमानकालीन धर्मातच नव्हे तर आम्हांला माहीत असलेल्या त्या आधीच्या तेथील धर्मात देखील पाहावयास मिळतात. परंतु केवळ हिंदुस्थानातच हिंदू धर्म हा प्रत्यक्ष जीवनाचा मार्ग म्हणून पूर्ण विकसित रूपात टिकून आहे.

याबरोबरच हेही सांगितले पाहिजे की प्राक्कालीन असलेल्या ह्या मूळ हिंदू धर्माने त्याच्यानंतर निर्माण झालेल्या धर्मांचा नेहमीच आदर केला आहे आणि आजही करीत आहे. ह्या संदर्भात हिंदू धर्माचा दृष्टिकोन असा आहे : अन्य धर्म ज्या ठिकाणी विकसित झाले ते तेथील माणसांच्या परिपक्वतेनुसार झालेले आहेत आणि ते त्यांच्या अनुयायांचे कल्याणच करतील. 'जगा आणि जगू द्या' हा आमच्या धर्माचा निरंतर आदर्श होता आणि राहील. हिंदू धर्माने बुद्ध आणि जैन या धर्मांना जन्म दिला आणि त्यांनी, विशेषेकरून बुद्ध धर्माने विदेशातही तेथील लोकांची आत्मिक उन्नती करण्यासाठी धर्मप्रसार केला.

मी ह्या ठिकाणी तत्त्वज्ञान आणि धर्मशास्त्रांच्या दृष्टिकोनातून हिंदू धर्माच्या विशिष्ट स्वरूपाविषयी बोललो. परंतु हिंदू धर्मस्वरूपाची आणखी एक विशेषता आहे आणि ती म्हणजे त्या धर्माचे सामाजिक स्वरूप.

सर्वच धर्मांची आपली स्वतःची अशी तत्त्वज्ञान व धर्मशास्त्रविषयक प्रणाली आहे. तसेच सर्वच धर्म वैयक्तिक जीवन आणि आचरण व थोड्या फार प्रमाणात सामाजिक

जीवनाशी संबंधित कार्य करीत असतात. 'आपल्या शेजाऱ्याकडे स्वतःच्या भावाप्रमाणे पहा', 'तुमच्याशी इतरांनी जसे वागावे असे तुम्हाला वाटते तसे तुम्ही इतरांशी वागा', 'प्राणिमात्रांवर दया करा', 'सत्य बोला', 'अहिंसा पाळा', आचरणविषयक ह्या आज्ञा आणि हे नियम सामाजिक जीवनाच्या एका मुद्यापर्यंत आणि त्या मुद्यापुरतेच बोलतात, हिंदू धर्माशिवाय इतर धर्मांच्या पुढे सामाजिक जीवन किंवा समाजाची रचना हा चिंतेचा प्रमुख विषय नाही. एका हिंदू धर्मालाच मजबूत सामाजिक पाया असून त्याचे विशिष्ट स्वरूप असलेला 'वर्णाश्रम धर्म' हे त्याचे प्रकट स्वरूप आहे.

वर्णधर्म हा एक आणि आश्रम हा दुसरा धर्म असून दोन्ही मिळून वर्णाश्रम धर्म तयार झालेला आहे. हा आश्रमधर्म माणसाच्या वैयक्तिक जीवनात त्याच्या आयुष्याच्या चार विभिन्न अवस्थांमधील आचरणाशी संबंधित आहे. जीवनाच्या पहिल्या अवस्थेत तो 'ब्रह्मचारी' च्या स्वरूपात गुरुकुलातील अध्ययनाला स्वतःला वाहून घेतो. दुसऱ्या अवस्थेत तो एक तरुण म्हणून विवाह करतो, पत्नी मिळवितो, जीवनात स्थिर होतो व संतती प्राप्त करतो. तिसऱ्या अवस्थेत जसे त्याचे वय वाढते, तो अरण्यात जाऊन तपस्वी होतो. भौतिक जीवनाशी अधिक संबंध न ठेवता स्वतः वैदिक कर्मे करीत राहतो. चवथ्या अवस्थेत तो वैदिक कर्मांचा देखील त्याग करतो, पूर्णपणे संन्यासी होण्यासाठी जगाचा त्याग करतो आणि स्वतःचे मन परमेश्वराकडे सर्वस्वी वळवितो. ह्या जीवनाच्या चार अवस्थांना किंवा आश्रमांना ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम व संन्यासाश्रम असे म्हटले जाते.

वर्णधर्म ही संपूर्ण समाजाचे नियंत्रण करणारी एक 'व्यवस्था' आहे. ही वर्णव्यवस्था आजकाल जबरदस्त टीकेचे लक्ष्य बनली असून तिच्यामुळे समाज, जाती-जातीमध्ये भंग पावला आहे असे ह्या व्यवस्थेबद्दल नेहमीच बोलले जाते. परंतु वर्ण आणि जाती ह्या वस्तुतः भिन्न आहेत. वर्ण फक्त चारच आहेत. परंतु जाती मात्र पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ, एकाच वर्णात अय्यर, अय्यंगार, राव इत्यादी जाती आहेत. तर दुसऱ्या वर्णात मुदलियार, पिल्लाई, रेड्डियार आणि नायकर ह्या जातींचा समावेश आहे. यजुर्वेदात तिसऱ्या अष्टकाच्या चौथ्या प्रश्नात आणि धर्मशास्त्रामध्ये अनेक जातींचा उल्लेख आलेला आहे, परंतु त्या आज पाहावयास मिळत नाहीत.

'आमच्या धर्मावरील कलंक', आणि 'उच्च आणि नीच असे समाजाचे तुकडे करणारी दुष्ट व्यवस्था' असे वर्णधर्माचे टीकाकार म्हणतात. परंतु ह्या व्यवस्थेकडे जर निःपक्षपणे पाहाल तर वर्णधर्म व्यवस्था ही समाजात निर्दोष व्यवस्था आणि सामंजस्य नांदविणारी व्यवस्था आहे असे तुमच्या लक्षात येईल. (वर्णधर्माबद्दल ह्याच ग्रंथाच्या भाग ३ व २० मध्ये विवेचन केलेले आहे.)

-----

प्रकरण - ४

# वेद : सर्वांचे मूळ

आमच्या धर्माचे दोन भाग आहेत. एक 'शैव' आणि दुसरा 'वैष्णव'. यावर आम्ही येथे धर्माच्या दोन स्वतंत्र शाखांबद्दल बोलत आहोत की एकाच धर्माबद्दल बोलत आहोत असा संदेह निर्माण होतो.

ख्रिश्चन धर्माचे देखील दोन मुख्य भाग आहेत, परंतु दोन्ही भागांचे ख्रिश्चन एकाच ईश्वराची उपासना करतात. बुद्ध धर्मात देखील 'हीनयान' व 'महानयान' असे दोन प्रवाह आहेत, पण ते दोन भिन्न धर्म नाहीत कारण दोन्हीही एकाच धर्मसंस्थापकाच्या शिकवणुकीवर आधारलेले आहेत. 'हीनयान' अर्थात 'कनिष्ठयान' 'कनिष्ठ मार्ग' ही बुद्ध धर्माची ज्ञानशाखा असून ती केवळ वैयक्तिक म्हणजेच काही निवडक व्यक्तींनाच मोक्षाच्या मार्गाचे ज्ञान देते. 'महायान' अर्थात 'महान यान' किंवा 'श्रेष्ठ मार्ग' हा सर्वांच्या मुक्तीचा मार्ग शिकवितो. 'हीन यान' ही बुद्ध धर्माची प्रारंभीची ज्ञानशाखा असून ती बुद्धाच्या शिकवणुकीचे अधिक शुद्ध स्वरूप असल्याचा त्यांचा दावा आहे. 'महायान' प्रायः नागार्जुनाशी संबंधित आहे.

शैव आणि वैष्णव हे एकाच ईश्वराची उपासना करतात काय? सामान्य वैष्णवांचे काहीही असो पण वैष्णवांचे आचार्य आणि गुरू हे शिवाच्या मंदिराजवळ देखील कधीही जात नाहीत. त्यांचा ईश्वर विष्णू आहे, शिव कधीही नाही. विष्णूच्या उपासकांच्या मते शिव हा विष्णूच्या भक्तांपैकी एक आहे. शैवामध्ये एका टोकाचा विचार करणारे आहेत. त्यांच्या मते विष्णू हा ईश्वर नाही, तर तो शिवाचा भक्त आहे. अशा स्थितीत शैव आणि वैष्णवांना एकाच धर्माचे दोन गट कसे म्हणता येईल?

शैव आणि वैष्णव ह्या दोघांचाही एकच धर्मग्रंथ असेल तर ह्या एकाच गोष्टीच्या आधारे त्या दोघांचाही एकच धर्म आहे असे म्हणता येईल काय? ख्रिश्चनांच्या दोन्ही संप्रदायांचा बायबल हा एकच धर्मग्रंथ आहे, तर इस्लामच्या सर्व शाखांचा कुराण हा एकच 'पवित्र ग्रंथ' आहे. शैव आणि वैष्णवाच्या बाबतीत अशीच स्थिती आहे असे म्हणता येईल काय? तिरुमुरारी हा शैवांचा मूळग्रंथ आहे तर नालयिरादिव्यप्रबंधम् ही वैष्णवांची पवित्र ग्रंथरचना आहे. (येथे परमाचार्य तामिळनाडूमधील शैव व वैष्णवांच्याबद्दल सांगत आहेत.) अशा प्रकारे शैव आणि वैष्णव ह्या दोघांचेही उपास्य दैवत आणि धर्मग्रंथ हे दोन्हीही भिन्न आहेत. मग ह्या दोघांचाही धर्म एकच आहे असे कसे म्हणता येईल?

शैव आणि वैष्णव ह्या दोन भागांत अशी आमची विभागणी असली तरी गोऱ्या

इंग्रजांनीच वस्तुतः ह्या दोघांनाही 'हिंदू' ह्या एकाच नावाखाली आणले. अन्यथा आमची काय स्थिती झाली असती? खेड्याखेड्यातून शैव (शिवाचे उपासक) वैष्णव (विष्णूचे उपासक) शाक्त (सर्वोच्च देवता शक्तीचे उपासक) मुरुग (विशेषत्वाने तामीळ लोक ज्याची उपासना करतात त्या सुब्रह्मण्य किंवा कार्तिकेय याचे उपासक) गणपति अय्यप्पा (शैव आणि वैष्णवांचे एकत्व असणारा 'शास्ता' किंवा 'हरिहरपुत्र' याचे उपासक) आणि इ. अशा अनेक पृथक् धार्मिक गटातून आमचे तुकडे पडले असते. नंतर ह्या प्रदेशातून ख्रिश्चन आणि इस्लाम धर्माच्या अनुयायांचे वर्चस्व निर्माण झाले असते. आता आमच्या उपखंडाच्या दोन भागांचे पाकिस्तान झाले आहे. (हे प्रवचन बांग्लादेश स्वतंत्र होण्यापूर्वी दिलेले आहे.) आम्हा सर्वांना जर हिंदू ह्या एका संज्ञेखाली आणले गेले नसते तर आमच्या पूर्ण उपखंडाचा पाकिस्तान झाला असता. ज्या लोकांनी आपल्या दुष्ट मनसुब्याप्रमाणे पाकिस्तान निर्माण केले आणि आर्य व द्रविड ह्या दोन वंशांच्या सिद्धान्तानी आमच्यात भेदप्रवृत्तीची बीजे पेरली, अगदी त्यांनीच आम्हाला हिंदू म्हणून आणि त्यामुळे हिंदुस्थान नावाचा देश अस्तित्वात आणून अजाणता आमचे भलेच केले!

तर, आमचा एकच धर्म आहे की दोन धर्मश्रद्धांत आम्ही विभागले गेले आहोत? शैव आणि वैष्णव ह्यांची उपास्य दैवते आणि धर्मग्रंथ भिन्न आहेत ही धारणा सत्यदर्शक नाही. ह्या दोन्ही संप्रदायांच्या सध्याच्या बाह्य स्वरूपावरून त्यांची धार्मिक श्रद्धा भिन्न असल्याचे सूचित होत असले तरी त्यांच्या प्रधान धर्मग्रंथांचे अध्ययन केल्यास ह्या विषयातील सत्य उघडकीस येईल. शैवांच्या तिरुमुराई आणि वैष्णवांच्या नालाचिर-दिव्यप्रबंधम ह्यांची रचना ज्या संतांनी केली त्यांनी ह्या त्यांच्या रचना त्या संप्रदायांचे प्रमुख धर्मग्रंथ असल्याचे कधीच म्हटले नव्हते. तसेच त्यांनी स्वतःस ह्यापैकी कोणत्याच धर्माचे संस्थापक म्हणवून घेतले नाही. आळवारच्या पूर्वी वैष्णव आणि नायनमारच्या पूर्वीच्या काळातही शैव होते.

शैव आणि वैष्णव ह्या दोन्हीही संप्रदायांचा मूळ धर्मग्रंथ वेदाधिष्ठित आहे. शैवांनी ईश्वराचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे ...

वेदमोदारंगमायिनानई
वेदनाथन, वेदगीतन आरणकान

ईश्वराला त्याच्या वेद आणि षडंगाच्या रूपात पाहा. त्याचप्रमाणे वैष्णवांच्या धर्मपाठात असे म्हटले आहे - वेदम् तमिझ्ह शेयत मारन सथकोपन.

नम्माझहवर (मारन किंवा शथकोपान) याने तामीळ वेद निर्माण केले. आपण जर त्यांच्या उच्चारणाकडे बारकाईने ध्यान दिले तर ह्या दोन्ही संप्रदायांचे वेद हेच मुख्य धर्मग्रंथ आहेत असे आपणास दिसून येईल. तेवारम हे शैवांना आणि तालापिरा-

दिव्यप्रबंधम् हे वैष्णवांना नितांत महत्त्वाचे आहेत. परंतु वेदच ह्या दोन्हीचा मूळ आधार आहे. महान संत आणि कवींनी रचलेल्या शैव आणि वैष्णवांच्या स्तोत्रांतून व भजनातून सर्वच वेदांच्याच वैभवाचे गायन केलेले आहे. मंदिराचे वर्णन करताना ते अत्यानंदाने म्हणतात - येथील वातावरण वेदध्वनींनी भरलेले आहे आणि यज्ञाच्या अग्नीतून निघणाऱ्या धुराने व्यापलेले आहे. येथे वेदाची सहाही अंगे बहरलेली आहेत. (भाग ६ ते ११ मध्ये ह्या सहा अंगांचे वर्णन आलेले आहे.) वेदांच्या ह्या स्तोत्रात्मक भक्तिभावाच्या गीतांतून ईश्वराच्या भक्तिभावालाही तितकेच स्थान मिळालेले आहे.

वेद हे अनेक देवतांच्या रूपांतून आमच्यापुढे एकच सत्य प्रकट करतात. ह्या प्रत्येक दिव्य अस्तित्वाची उपासना ही वेदसरितेवरील घाटाप्रमाणे आहे. शेक्कीझहार हेच सांगतो, तो म्हणतो, ''वेद बहरून येवोत, शैव धर्म समृद्ध होवो''.

शैव आणि वैष्णव ह्याशिवाय शाक्त, गाणपत्य, कुमार आणि सौर अशा कितीतरी सांप्रदायिक प्रणाली आहेत. आदि शंकराचार्यांनी शिव, विष्णू, शक्ती, गणपती, कुमार आणि सूर्य यांच्या उपासनेच्या 'षण्मत' ह्या सहा धार्मिक प्रणाली सुरू केल्या. ह्या देवतांची पूजा त्यांच्या पाठांसह वेदात प्रतिष्ठापित केलेली आहे. वेदात आमची देवता प्रशंसिली गेली आहे असा ह्या प्रत्येक प्रणालीचा उद्‌घोष आहे.

अशा प्रकारे हिंदू धर्मातील विभिन्न संप्रदाय व तत्त्वपीठांचा उगम मात्र एकाच धर्मग्रंथात आहे, असे आम्हांला दिसून येते.

ह्या उगम ग्रंथात उपनिषदे समाविष्ट आहेत. ह्यापैकी दहा उपनिषदांवर (दशोपनिषद) शैव, वैष्णव आणि स्मार्त परंपरेतील श्रेष्ठ आचार्यांनी भाष्ये लिहिली आहेत. ब्रह्म हेच एकमेव दिव्य सत्य आहे असे ही उपनिषदे सांगतात. ह्या सत्याला कठोपनिषदात विष्णू, आणि माण्डुक्योपनिषदात शिव म्हटले आहे. मित्र, वरुण, अग्नी, इंद्र इत्यादी वेदांच्या संहितांतून आलेल्या सर्व देवता ही एकाच सत्याची भिन्न नावे आहेत. म्हणूनच वेदात ''एकम् सद् विप्रा बहुधा वदन्ते'' असे म्हटले गेले आहे.

अशा प्रकारे असे दिसून येते की आमच्या धर्मात सर्वजणांना समान असणारा एकच एक धर्मग्रंथ आणि अनेक नावांनी ओळखले जाणारे परंतु एकमेव असे एकच एकमेव सत्य आहे. वेद हा तो समान धर्मग्रंथ आणि ब्रह्म हे ते सर्वांना समान असलेले एकमात्र सत्य होय. अशा प्रकारे अत्यंत निःसंदेहपणे आणि अंतिम रूपाने आम्ही असे म्हणू शकतो की आम्ही सर्वजण एकाच धर्माचे आहोत.

आम्हा सर्वांना समान असलेल्या वेद ह्या धर्मग्रंथाने आम्हा सर्वांना समान असे सत्य दिले आहे आणि जीवन कसे जगावे हे शिकविले आहे. अत्यंत महत्त्वाची गोष्ट ही आहे

की आम्हांला स्वतःच सत्यस्वरूप होण्याचा मार्ग दाखवून वेदांनी आमचे अंतिम आणि परमकल्याण केले आहे. वेद हाच आमचा ईह आणि परलोकीचा आश्रय आहे आणि हेच आमच्या सर्व परंपरा, आमच्या सर्व तात्त्विक सिद्धान्त प्रणालींचे उगमस्थान-सर्वांचे मूळ आहेत. आमच्या सर्व संप्रदायांचा, आमच्या धर्माच्या सर्व तत्त्वपीठांचा उगम वेदांमध्ये आहे. शाखा अनेक पण मूळ मात्र एकच आहे.

वेद हे केवळ हिंदू धर्मातील सर्व विभागांचेच उगमस्थान आहे असे नव्हे तर जगातील सर्व धर्मांचा उगम वेदांमध्ये सापडतो. ह्या वेदांचे वैभव निरंतर प्रज्वलित राहावे म्हणून त्यांचे जतन करणे हे आमचे परम कर्तव्य आहे.

-----

# वेद आणि त्यांचे मूळ स्वरूप

असे म्हटले जाते की लोक आपल्या किंवा इतरांच्या भाषेबद्दल सतत वाद करीत असतात. अशा पद्धतीने वाद करीत राहण्यापेक्षा मौन बाळगणे आमच्या अधिक हिताचे ठरेल असे आम्हास वाटते. आपणास दुसऱ्याने जाणून घ्यावे म्हणून आपले विचार, भाव-भावना प्रकट करण्याची भाषा हे साधन मात्र आहे. सर्व देशांत एकच भाषा असणे शक्यच नाही. प्रत्येक जमात, प्रत्येक प्रदेश किंवा देश यांची स्वतःची अशी आपली भाषा असते. तेव्हा इतरांपेक्षा आपलीच भाषा अधिक श्रेष्ठ असे म्हणून वाद करणे असमंजसपणाचे ठरते. 'ती भाषा मला कळते' किंवा 'त्या भाषेचे मला ज्ञान नाही' असे म्हणणे अधिक योग्य. परंतु 'माझी भाषा' आणि 'तुझी भाषा' असे म्हणणे योग्य नाही. त्याचबरोबर आपल्या भाषेला देव किंवा धर्मापेक्षा अधिक महत्त्वाचे मानणे हेही अयोग्य होय. मी तर असेही म्हणेन की इतर भाषेप्रमाणेच संस्कृत भाषेचा विचार करावा. परंतु आमच्या धर्माचा मूळ पाया असलेले वेद आणि शास्त्रे संस्कृत भाषेत असल्याने व वेद आणि शास्त्रे जतन करणे आवश्यक असल्याने आम्ही संस्कृत भाषा देखील जीवित ठेवली पाहिजे.

आपल्या 'कुरल' ची रचना केल्यानंतर तिरुवल्लुवर हे त्याचे 'अरणगेर्रम' करण्यासाठी मदुराईला गेले होते. तेथे नगरात सुवर्णकमळे असलेले एक तळे व एक विद्वत् आसन (संगपलगाई) होते. कवीने आपली रचना त्या आसनावर ठेवली. तत्काळ तेथे बसलेली सर्व विद्वान मंडळी तळ्यात जाऊन पडली पण 'कुरल' हा ग्रंथ मात्र आसनावर राहिला आणि अशा प्रकारे 'कुरल' ग्रंथाचे लोकार्पण झाले. अनेक विख्यात कवींनी आणि विद्वान व्यक्तींनी 'कुरल' या ग्रंथावर व त्यातील आशयावर प्रशस्तिगीते गायली. ही 'कुरल' वरची प्रशंसागीते तिरुवल्लुवर-मालाई मध्ये संकलित केलेली आहेत. यातील एक कवी म्हणतो, ''संस्कृत श्रेष्ठ की तामीळ श्रेष्ठ ह्या प्रश्नावर मी विचार केला. संस्कृत आणि तामीळ ह्या दोन्हीही भाषा समानरूपाने श्रेष्ठ आहेत. एक दुसरीपेक्षा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ आहे असे म्हणता येणार नाही. ह्याचे कारण हे आहे की वेद हे संस्कृत भाषेत आहेत आणि 'कुरल' मुळे तामीळ भाषेत पण वेद आहेत. तामीळमध्ये जर 'वेद' नसते तर संस्कृत ही भाषा तामीळपेक्षा श्रेष्ठ म्हणावी लागली असती - परंतु आता वेदाइतकेच श्रेष्ठ 'कुरल' तामीळमध्ये असल्याने संस्कृत आणि तामीळ ह्या दोन्हीही भाषा समान रूपाने महान आहेत असे म्हणता येते.''

संस्कृत भाषा ही श्रेष्ठ का मानली जाते? तिरुकुरल ह्या आपल्या स्तुतीपर काव्यात कवी याचे उत्तर देतो की वेद हे संस्कृत भाषेत आहेत म्हणून ती श्रेष्ठ भाषा आहे. वेद संस्कृत मध्ये आहेत ह्या गोष्टीला काही लोक विशेष महत्त्व देताना दिसत नाहीत. त्यांचे म्हणणे असे की ह्या पवित्र ग्रंथांचा मूळ भाग भाषांतरातून जाणून घेता येतो.

आजकाल अनेक पुस्तकांचे एका भाषेतून दुसऱ्या भाषेत भाषांतर केले जाते आणि भाषांतराच्या ह्या प्रक्रियेत मूळ ग्रंथाचे मूळ स्वरूप किंवा विशिष्टता यात बदल किंवा विपर्यास होतो. एखाद्या विशिष्ट विषयावर महान व्यक्तींनी उच्चारलेल्या शब्दांचा अर्थ आज आपणास कळत नाही. परंतु तेच शब्द जर त्याच भाषेत मूळ स्वरूपात जतन केले गेले तर त्या शब्दांच्या अर्थाचे आकलन काही काळानंतर पूर्णपणे होण्याची शक्यता असते. कल्पना स्पष्ट करून सांगताना स्वतःच्या भाषेत त्यासाठी सुंदर शब्दाचा उपयोग कराल पण तेच दुसऱ्या भाषेत सांगताना त्या अर्थाचा तितकाच सुंदर पर्यायी शब्द तुम्हाला सुचेलच असे नाही. मग तोच अर्थ शाब्दिक कसरत करून सांगण्याची आपणावर वेळ येते.

मूळ पाठात व्यक्त झालेले मत तितक्याच प्रभावीपणे भाषांतरात न उतरण्याची देखील दाट शक्यता असते. भाषांतरकर्त्याची मानसिक सिद्धता, त्याचे ज्ञान आणि संबंधित विषयाचे त्याचे मर्यादित आकलन यामुळे भाषांतराला मर्यादा पडतात, हा एक भाषांतरातला तोटा असतो. एका व्यक्तीने केलेले भाषांतर दुसऱ्या व्यक्तीस अचूक वाटेलच असेही नाही. एकाच ग्रंथाची अनेक भाषांतरे उपलब्ध असल्यास अचूक भाषांतर निवडणे कठीण होते. अशा स्थितीत मूळ ग्रंथाकडेच जाणे भाग पडते.

ह्याच कारणामुळे वेदांचे मूळ स्वरूपातच जतन व्हावे असा माझा आग्रह आहे. वेद हे महान आचार्यांच्या तत्त्वप्रणालींचे उगमस्थान आहेत. आपल्या सोयीचा होईल असा वेदाच्या मतात कोणताही फेरबदल न करता किंवा वैदिक परंपरेच्या बाहेर जाऊन आपला स्वतःचा कोणताही धर्म स्थापण्याचा उद्देश न ठेवता ह्या आचार्यांनी आपले सिद्धान्त स्वतःच्या वैयक्तिक दृष्टिकोनातून विकसित केले. त्यांच्या तत्त्वप्रणालीचा उगम; मूळ हे एकच होते आणि ते म्हणजे वेद. ह्या उगमस्थानात कोणतेही परिवर्तन न झाल्याने आपले नवनवीन दृष्टिकोन मांडताना विचारवंत आणि गुरूंनी वेळोवेळी वेदाच्या मूळ स्वरूपातूनच प्रेरणा आणि बळ मिळविलेले आहे. परंतु हे दृष्टिकोन नवीन धर्म निर्माण करण्यासाठी नव्हते. ह्याचे कारण हेच की ते सर्वजण, ह्या सर्व मतप्रणाली असलेल्या 'वैदिक धर्म' नावाच्या एका श्रेष्ठ प्रणालीशी जोडलेले होते.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - ३

## वैदिक धर्म आणि वर्णधर्म

# श्रमाची विभागणी

समाजाचे कार्य व्यवस्थितपणे चालणे हे अनेक घटक-गोष्टींवर अवलंबून असते. माणसाच्या गरजा पूर्ण होण्यासाठी अनेक प्रकारच्या शारीरिक व बौद्धिक श्रमांची आवश्यकता असते. एका प्रकारचे श्रम दुसऱ्या प्रकारच्या श्रमापेक्षा हीन किंवा उच्च दर्जाचे मानणे सर्वथा अयोग्य आहे.

आपणा सर्वांना तांदूळ हवे असतात, होय ना? तसेच मीठ, कापड, पुस्तके इत्यादी अनेक गोष्टी देखील आवश्यक असतात. आपल्यातला प्रत्येकजण तांदूळ किंवा गहू पिकवू शकतो का? तसेच मीठ, कापड, पुस्तके तयार करू शकतो का? शेतकरी केवळ स्वतःसाठी नव्हे तर संपूर्ण समाजासाठी धान्य पिकवितो. विणकर आम्हा सर्वांसाठी वस्त्रे विणतो. काही जण संपूर्ण समाजासाठी व्यापार करतात, तर काही जण देशाचे संरक्षण करण्यासाठी आपणा सर्वांच्या वतीने युद्ध करतात.

मानवतेच्या आत्मिक कल्याणाचे काय? अशा प्रकारचे काम करण्यासाठी काही जण झपाटलेले असतात हे खरे. ते ध्यान-धारणा करतात, पूजा-अर्चना करतात आणि मानवाच्या कल्याणासाठी शास्त्रांच्या आज्ञेप्रमाणे होम-हवन करतात. समाजाचे वेगवेगळे विभाग करून व त्यांना वेगवेगळी कामे नेमून देऊन आमच्या धर्मशास्त्रांनी आमच्यासाठी आनंद मिळवून देणारा आणि सर्वांच्या हिताचा असा आदर्श मार्ग आखून दिला आहे.

ही कामे कशा प्रकारे दिली आहेत? प्रत्येकाच्या क्षमता पाहून ही वाटणी केली गेली आहे का? तसे असेल तर आपल्या योग्यतेपेक्षा आपली क्षमता अधिक असल्याचे प्रत्येक जणास वाटण्याचा ह्या पद्धतीत धोका संभवतो. प्रत्येकाची आवड आणि अंगचे गुण पाहून ही कामाची वाटणी केल्यास आपण अधिक प्रतिष्ठेच्या कामासाठी अधिक योग्य आहोत असे प्रत्येकजणच म्हणेल आणि अन्य कामे करावयास कोणीच पुढे येणार नाही. मग अशी कोणती कार्यपद्धती शोधून काढावी की जिच्यामुळे समाजाची कामे सुरळीतपणे चालतील आणि ती तशी चालावीत म्हणून सर्वजण आवश्यकतेनुसार उद्योग-व्यवसायाची कामे पार पाडतील? ती कार्यपद्धती अशी असावी की तत्कालीन नव्हे तर अखंडपणे कायमस्वरूपी कार्य करीत राहील. प्रत्येकजण जर प्रत्येक प्रकारच्या कामात दुसऱ्याशी स्पर्धा करीत राहील तर हे शक्य होणार नाही. ह्या सर्व समस्यांचे उत्तर म्हणून जन्मानुसार वंशपरंपरेने व्यवसाय ठरवून देणारी वर्णधर्माची व्यवस्था अस्तित्वात आली.

प्रत्येकाने आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेले काम, मग ते काहीही असो,

ईश्वराने आपणावर सोपविलेले आहे व आपण ते जगासाठी करीत आहोत ह्या निष्ठेने करावे. हे तत्त्व वर्णधर्मव्यवस्थेच्या मागे आहे. ह्या भावनेने आपले काम केल्यास ते कायम त्याच्या आंतरिक उन्नतीचे साधन होते.

भौतिक अस्तित्वातून मुक्तता मिळावी ह्या उद्देशाने केल्या जाणाऱ्या धर्मपालनात प्रत्येकाच्या व्यवसाय-धंद्यानुसार बदल करावयास हवा. कठोर शारीरिक मेहनतीची कामे करणाऱ्या व्यक्तींनी उपास-तापास करण्याची गरज नाही. बौद्धिक कामे करणाऱ्यांना अतिरिक्त शारीरिक पोषणाची गरज नाही. त्यांनी धार्मिक व्रत-वैकल्यांचे आयोजन करून उपवास करावेत ज्यातून देहाभिमान न धरण्याचा त्यांना बोध होईल. धार्मिक व्रताचरणातला हा फरक प्रत्येकाच्या व्यवसायाप्रमाणे केला गेला आहे हे कळून आले की समाजाच्या विभिन्न वर्गांतील माणसात वादाला किंवा कलहाला जागा राहणार नाही.

धर्मशास्त्रांनी सांगितलेले हे विहित धार्मिक विधी, अर्थ न कळता आचरणात आणले तरी आयुष्यात पुढे काही काळानंतर त्यांचा अर्थ कळेल आणि हे धर्माचरण उपयुक्त ठरेल. प्रत्येकजण जर आपली विहित कर्तव्यकर्मे पार पाडील व इतरांस तसे करण्यात सहकार्य करील तर ते खरोखरच प्रशंसनीय ठरेल. 'तू तो विशिष्ट व्यवसाय का करतोस किंवा त्या धर्माचे पालन का करतोस?' 'मी करतो ते काम तू का करीत नाहीस?' किंवा 'मी तुझा धर्म, तुझी कामे करू का?' अशा प्रकारच्या स्पर्धा वाढविणाऱ्या किंवा चढाओढीच्या भावनांना थारा देऊन आपण त्यांना बळी पडता कामा नये. आपल्या स्वधर्माचा म्हणजेच जन्मतः आपल्या वाट्याला आलेल्या कर्तव्यांचा त्याग करण्याचा जर कोणी विचार करील तर तसे करण्यापासून त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न करा आणि आपल्या स्वधर्मात एकनिष्ठ राहण्यात केवळ त्याचे स्वतःचेच असे नव्हे तर इतर सर्वांचेही हित आहे हे त्याच्या मनावर पक्के बिंबवा.

मी ह्या पूर्वीच म्हटल्याप्रमाणे विभिन्न प्रकारचे श्रम करणाऱ्यात उच्च-नीच असा कोणताही भेदभाव नाही. एका प्रकारचे काम करणारा माणूस दुसऱ्या प्रकारचे काम करणाऱ्याहून हलका नाही किंवा श्रेष्ठही नाही. समाजाची सर्व कामे सुरळीतपणे चालावीत म्हणून शास्त्रांनी श्रमाची विभागणी वेगवेगळ्या प्रकारांत केली असून समाजाच्या वेगवेगळ्या समूहांवर ती कामे सोपविली आहेत.

ही कामे करताना आम्ही जर आमच्या आवडी-निवडींना महत्त्व देऊन किंवा मनपसंत इच्छा पूर्ण करणारे काम करायला जाऊ तर समाजाच्या सर्वसामान्य आयोजनाला बाधा पोहोचेल. प्रत्येक जण आपली पोतडी इतरांच्या पैशातून भरू पाहात आहे हे आजकाल तुम्ही पाहात असाल. सर्वसामान्यांचे कल्याण हे जर आमच्या जीवनाला मार्गदर्शन करणारे तत्त्व नसते तर भरपूर पैसा मिळवून देणारे काम हाच

प्रत्येकाच्या चिंतेचा विषय राहिला असता. अशा स्थितीत श्रमाची विभागणी करण्याचा प्रश्नच उद्भवला नसता आणि सर्वसामान्यपणे लोककल्याणाची चिंताही केली गेली नसती.

प्रत्येकजण जर आपले आनुवंशिक काम व वाडवडील करीत आलेले धार्मिक विधी करील तर एकमेकांशी स्पर्धेची भावना किंवा मत्सराचे कारणच उरणार नाही. ह्याचा अजून एक फायदा म्हणजे कोणत्याही सामूहिक कर्माला अडथळा न येता सामाजिक जीवन सुरळीतपणे चालेल व प्रत्येकाला आंतरिक पवित्रता अनुभवता येईल. सुधारणेच्या नावाखाली समाजाचे विघटन होऊ द्यायचे नसेल तर वरील सर्व गोष्टी विचारात घ्यावयास हव्यात.

सर्वजणांना ते कोणते काम करतात हे विचारात न घेता अन्न, वस्त्र आणि निवारा पुरविणे हे सरकारला बंधनकारक आहे. ह्या अत्यावश्यक गरजांच्या पलीकडे असलेल्या गोष्टी मिळविण्याची भूक प्रबळ झाली की मत्सर आणि वैरभावना वाढीला लागतात. कोणत्याही अन्य गोष्टीपासून मिळणाऱ्या समाधानापेक्षा पैशातून मिळणारे समाधान अधिक मोठे असते असे मानण्यामुळेच आमच्या आजच्या सर्व समस्या निर्माण झाल्या आहेत. हा दृष्टिकोन बदलला पाहिजे. जशी जशी परिपक्वता वाढत जाईल, माणसाला हे कळून येईल की त्याच्यावर सोपविलेले काम योग्य रीतीने पूर्ण केल्याने मिळणारे समाधान ह्यातच त्याचा ईश्वर आहे. (थोड्या फार फरकाने हे मूळ मजकुराचे शब्दशः भाषांतर आहे. 'श्रम हाच ईश्वर' ह्या विधानापेक्षा परमगुरू येथे अधिक काही सांगत आहेत. त्यांचा हा विचार अधिक विस्ताराने आपण असा करू शकू- ''जो माणूस शास्त्रांनी सांगितलेल्या विहित कर्मांचे पालन करील तर प्रत्यक्ष परमेश्वरच त्याच्या सन्मुख असेल. तो जर प्रामाणिकपणे 'स्वधर्माचे' पालन करील तर सर्व भौतिक बंधनांतून मुक्त होईल'')

तुमच्यासमोर अनेक प्रकारचे खाद्यपदार्थ असतात. अनेक प्रकारचे संगीतातले राग तुम्ही ऐकता आणि समाजाचे कार्य सुरळीत चालावे म्हणून आवश्यक अशी अनेक कामे तुमच्यासमोर असतात. चांगली चव यावी म्हणून तुमच्या जेवणातील 'रसम' मध्ये तुम्ही मीठ घालता. (ह्या ठिकाणी परमगुरू 'राग' ह्या शब्दावर श्लेष करीत आहेत. राग म्हणजे (संगीतातल्या रागाहून भिन्न) 'स्वाद' 'भाव' 'सारतत्त्व' 'चव' 'सौंदर्यानुभूतीचे तात्पर्य) 'रसम' हा शब्द मूळ 'रस' पासून आलेला असून आणि दक्षिण भारतातील स्वयंपाकात वापरला जाणारा प्रसिद्ध पदार्थ असून यातील एक प्रकार मुल्लीगटवनी म्हणून इंग्रजांना परिचित आहे. 'रसाभास' चे भाषांतर करणे कठीण आहे. 'आभास' चा शब्दशः अर्थ 'प्रतिबिंब' 'प्रतिप्रभा' असा होतो. सर्वसामान्य व्यवहारात 'रसाभास' चा अर्थ 'अयोग्य रस' 'सुस्वादाच्या विपरीत' असा होतो. दक्षिणेत 'रसाभास' ह्या शब्दाला 'असभ्य' 'अभद्र' असा अर्थ प्राप्त झाला आहे. परंतु तुम्ही जर ह्या 'रसम' मध्ये 'मधुर पेय' घालाल तर

त्याचा 'रसाभास' (पिण्यास अयोग्य) होईल. त्याचप्रमाणे संगीतात एका रागातील स्वर दुसऱ्या रागात वापरल्यास 'रसाभास' होईल. (म्हणजेच असे संगीत 'विरूप' होईल, श्रवणास (कानास) सुखकारक होणार नाही.) माणसे आजकाल 'चव' हरवून बसली आहेत. पुराणातील कथाप्रसंग रंगवून सांगताना भागवतकार सवंग विनोद करतात आणि श्रोते मोठ्या चवीने त्याचा आनंद लुटतात. आनंद देणारे अनेक खाद्यपदार्थ असताना माणसे आरोग्याला विघातक असलेली तंबाखू खातात, धूम्रपान करतात. ही सर्व 'रसाभास' ची (मराठी भाषेत 'रसभंगा' ची) लहान लहान उदाहरणे आहेत. समाजातल्या विभिन्न जमातीच्या वर्गासाठी आचरणांच्या नियमांचे सुस्पष्ट प्रतिपादन करून समाजाच्या कल्याणात मोलाची भर घालणारी वर्णव्यवस्था समजून घेण्यात केलेला गोंधळ हा सर्वात मोठा 'रसाभास' किंवा 'रसभंग' आहे.

-----

# वर्णधर्म आहे तरी काय ?

पूर्वीच्या काळात स्वयंपाकघरातील चुली वाळलेले सरपण, गोवऱ्या ह्यांनी पेटत असत. पावसाळ्याच्या दिवसात चुली पेटवणे कठीण जात असे. परंतु थोड्या ठिणग्या निर्माण करता आल्या की त्यावर लाकडे व शेणाच्या गोवऱ्या पेटविण्यासाठी पंख्याने वारा घालून जाळ तयार करता येई. आमचा सनातन धर्म पूर्णपणे नाश पावलेला नाही. हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या संख्येत ह्या धर्माची काही थोडी स्फुल्लिंगे आमच्यामध्ये आजही जीवित असलेल्या महान विभूतींच्या रूपाने प्रज्वलित आहेत. आमच्या सनातन धर्माचा त्याच्या वैशिष्ट्यांसह मूळ स्वरूपात प्रसार व्हावा म्हणून ही स्फुल्लिंगे प्रज्वलित ठेवली पाहिजेत अशी माझी आत्यंतिक इच्छा आहे.

हिंदू धर्म अन्य धर्मांहून वेगळा असू नये यासाठी आमचे सुधारक वर्णधर्म नष्ट करू पाहत आहेत.

ह्या संदर्भात मी तुम्हाला विचारतो, धर्म म्हणजे काय? धर्म हा आत्मसंकोचाने निर्माण होणाऱ्या रोगांचे निवारण करणाऱ्या चिकित्सा पद्धतीसारखा आहे. रोग्याला कोणत्या रोगाचा त्रास होत आहे आणि त्यावर काय उपचार करावयाचे हे एका डॉक्टरलाच कळते. आमची धर्मशास्त्रे ज्यांनी निर्माण केली आणि ज्यांनी स्वतःसाठी कधीही कशाची देखील अपेक्षा न करता अत्यंत निःस्वार्थ बुद्धीने मानवकल्याणाची सतत चिंता वाहिली त्या साधुसंतांनीच आमच्यासाठी सनातन धर्म ह्या औषधाची शिफारस केली आहे.

अन्य देशांतील डॉक्टरांनी त्यांच्या स्वतःच्या धर्मपद्धतीप्रमाणे औषधयोजना केली आहे. दुसरा डॉक्टर ज्या प्रकारे आपल्या रोग्यावर औषधोपचार करतो तसाच उपचार माझ्यावर करा असे सांगितलेले तुमच्या डॉक्टरला आवडेल काय? औषधोपचाराच्या अनेक पद्धती आहेत. एका पद्धतीत आहाराची पथ्ये अत्यंत कडक असतील तर दुसऱ्या पद्धतीत आहारबंधने तितकी कडक नसतील. एका पद्धतीत दिलेली औषधे गोड असतील तर दुसरीत कडू. आरोग्यप्राप्तीसाठी तर आम्हाला एकाच औषधपद्धतीचा स्वीकार केला पाहिजे, अनेक पद्धती एकत्र करून चालणार नाही.

अन्य धर्म आपल्या सर्व अनुयायांना सर्वसामान्य अशीच कर्तव्ये निर्धारित करतात. वैदिक धर्मात मात्र दोन प्रकारचे धर्म सांगितले गेले आहेत, एक सर्वांसाठी समाईक असलेला आणि दुसरा व्यक्तिगत स्वरूपाचा असलेला वर्णधर्म. सर्व हिंदूंना समान कर्तव्ये असणारा,

वैश्विक आचारसंहिता असलेल्या धर्माचे नाव 'सामान्य धर्म' असे आहे. (ह्याच ग्रंथाच्या भाग २२ मध्ये या विषयाचे विवेचन आहे.) अहिंसा, सत्य, शुचिता, इंद्रिय-संयमन आणि अपरिग्रह म्हणजे स्वतःच्या किमान आवश्यकतेपेक्षा भौतिक वस्तूंचा, एका काडीचा देखील अधिक संग्रह न करणे, कर्तव्यपरायणता, माता-पित्यांचे ठायी श्रद्धा, प्राणिमात्राविषयी दयाभाव ही सामान्य धर्माची अंगे आहेत. प्रत्येक वर्णासाठी स्वतंत्र, विशेष आचारसंहिता किंवा पिढीजात व्यवसाय निर्धारित करणारा 'विशेष धर्म' आहे.

विभिन्न वर्णांना विशेष कर्तव्यकर्मे सांगणारा 'विशेष धर्म' जर का सर्वांना समान रूपाने लागू केला असता, म्हणजेच सामान्य धर्माचाच भाग केला गेला असता तर कोणीच धर्माचे आचरण केले नसते अशी परिस्थिती उद्‌भवली असती. हे कसे ते स्पष्ट करणारे एक उदाहरण मी देतो. बुद्ध धर्मात मांसाहार वर्ज्य करण्याचा नियम 'सामान्य धर्मात' घालून दिलेला आहे. परंतु बौद्ध धर्माचे मोठ्या प्रमाणात अनुयायी असलेल्या देशात आज काय पाहावयास मिळते? ह्या प्रदेशातील बहुतेक सर्व बुद्धधर्मीय मांसाहार करतात. याच्या उलट स्थिती आमच्या धर्मात पाहावयास मिळते. आमच्या धर्मातील द्रष्टे आणि धर्मशास्त्रकारांना मानवी स्वभावाचा सखोल अभ्यास होता. त्यांनी समाजातील मर्यादित लोकांनाच मांसाहार वर्ज्य ठरविला. परंतु समाजातील अन्य लोक उपवासाचे दिवस, वाडवडिलांच्या श्राद्धदिनासारखे काही विशेष दिवस आणि देवतांचे पवित्र दिवस ह्या काळात मांसाहार न घेणाऱ्या मर्यादित लोकांचे अनुकरण करतात.

आपल्या सर्व अनुयायांना एक समान आचारसंहिता असलेले, एके काळी अन्य देशांत भरभराटीला आलेले धर्म लोप पावले. युरोपात हेल्लेनिक धर्म अस्ताला गेला. त्याचप्रमाणे पश्चिम आशियात प्राक्कालीन हिब्रु धर्म फार काळ टिकला नाही आणि केवळ पूर्व आशियात कनफ्यूशी आणि शिन्तो इत्यादी धर्मांचे केवळ अवशेष उरले आहेत. बौद्ध, ख्रिश्चन आणि इस्लाम धर्मामध्ये सुद्धा त्यांच्या सर्व अनुयायांसाठी एकच आचारसंहिता आहे. विभिन्न देशांतील ह्या धर्माच्या अनुयायांचे आंतरिक समाधान आता कमी-कमी होऊ लागले आहे. ह्या सर्वच प्रदेशांत आपल्या धर्मावरील श्रद्धा हरवून बसलेल्या लोकांची संख्या वाढते आहे. एक तर ते नास्तिक होतात किंवा हिंदू धर्मातील योग, भक्ती किंवा ज्ञान संप्रदायाकडे वळतात.

विभिन्न देशांत, इतिहासकाळात निर्माण झालेल्या धर्माबद्दल लोकांच्या मनात किती काळ निष्ठा टिकून राहील ते सांगणे कठीण आहे. मी हिंदू धर्माचा प्रतिनिधी आहे म्हणून असे म्हणतो आहे किंवा अन्य धर्मांना कमी लेखावे हाही माझा उद्देश नाही. विभिन्न धर्मांचे पालन करणारे लोक त्यांच्या आपल्या धर्मातच राहावे आणि त्यांना आध्यात्मिक परिपूर्तीचा लाभ व्हावा हीच माझी खरोखर इच्छा आहे. इतरांनी माझ्या धर्मात यावे असे मी कधीच म्हणत नाही. वास्तविक असे करणे माझ्या धर्माच्या मूळ तत्त्वप्रणालीच्या

विपरीत आहे असाच माझा विश्वास आहे. ह्या जगात अपघाताने काहीच घडत नसते. विभिन्न परिपक्वतेची माणसे वेगवेगळ्या धर्मांत जन्मतात. अर्थात हे ईश्वराने ठरविल्याप्रमाणे घडते. माणूस ज्या धर्मात जन्मतो त्या धर्मातील तत्त्वांचे पालन केल्याने त्याचा आंतरिक विकास होत जातो असे मला वाटते.

अन्य धर्मांबद्दल वाईट न बोलणे किंवा अन्य धर्मीयांना आपल्या धर्मात न बोलावणे हे अन्य धर्मांत न आढळणारे पण हिंदू धर्माचे वैशिष्ट्य मला अत्यंत मोलाचे वाटते. हे हिंदू धर्माचे वैशिष्ट्य जाणून घेण्याचे कष्ट न घेता अन्य धर्मीय लोक हिंदू धर्माच्या ह्या अद्वितीय वैशिष्ट्यावर हल्ला चढवितात आणि त्यांच्या मताचा काही हिंदू लोकांवर पगडा बसलेला दिसतो. ह्याच कारणांमुळे आमच्या धर्माच्या वैशिष्ट्यपूर्ण सिद्धान्ताविषयी मला बोलणे भाग आहे. कार्यसिद्धान्त, ईश्वराचे अवतार इत्यादी आमच्या धर्माने स्वीकारलेल्या संकल्पना अन्य धर्मीयांच्या स्वतःच्या धर्मविषयक श्रद्धेवरील निष्ठा कोणत्याही प्रकारे कमजोर करीत नाहीत. कोणत्याही धर्माची मूलभूत संकल्पना, प्राणभूत तत्त्व काय असते? ईश्वराबद्दलची निष्ठा आणि त्याच्यावरील भक्ती हेच ते मूळ तत्त्व असते. हिंदू धर्माच्या ह्या मूलभूत विशिष्ट संकल्पनांचे सहानुभूतीने अवलोकन करण्याने अन्य धर्मीयांच्या आपल्या ईश्वर अथवा धर्मविषयक श्रद्धेवर कोणताच दुष्परिणाम होणार नाही.

अन्य धर्माची स्थिती समस्यापूर्ण आहे म्हणून किंवा ते खरोखरच समस्यामुक्त आहेत असेही वाटत नसल्याने मी हे सर्व सांगत आहे. टॉयन बी, पॉल ब्रंटन किंवा कोस्टलर सारख्या धर्माच्या प्रख्यात अभ्यासकांच्या दृष्टिकोनाविषयीचा हा माझा पडसाद आहे. धर्मावरील श्रद्धेचा अभाव आणि वस्तुतः दिवसेंदिवस वाढत चाललेल्या नास्तिकवादामुळे सर्वच धर्म आपले अस्तित्व टिकविण्यासाठी संघर्ष करीत आहेत ह्या त्यांच्या मताचा मी केवळ पुनरुच्चार केला आहे.

अशा प्रकारचा कल आमच्या देशातही वाढीस लागल्याचे दिसून येत आहे. परंतु इतर देशांच्या तुलनेत आमच्या देशातील स्थिती खूप चांगली आहे, ह्यावर संपूर्ण जगातील धर्मश्रद्धाविषयक अभ्यास केलेल्या विदेशी अभ्यासकांत एकमत आहे. ''तुमच्या देशात धर्मभावना अजूनही चिंताजनक अवस्थेला पोहोचलेली नाही'' असे ते आम्हाला सांगत आहेत. साधक जिज्ञासू आजही मोठ्या संख्येने हिंदुस्थानात येत आहेत. हिंदुस्थानात धर्मभावना उताराला लागून जो नास्तिकवाद वाढीस लागला आहे ह्याबाबत आपण थोडा विचार केला तर निःसंदेहपणे असे दिसून येईल की, आम्ही वर्णधर्माचे पालन करण्यात अधिक उदासीन झाल्याने व कोणतीही जात न ठेवता संपूर्ण हिंदू समाज एक केला पाहिजे अशी आमची धारण झाल्याने हे सर्व घडते आहे.

धर्म जेव्हा आपल्या अनुयायांचे अनेक तऱ्हेने विभाजन करतो तेव्हा त्यांच्यात

एकता किंवा एकात्मता राहणार नाही असे आम्हाला वाटते. तसेच तो धर्म एकटा पडेल व त्याच्यात खटके उडतील असेही आम्हांला वाटते. अलेक्झांडरच्या काळापासूनच हिंदुस्थानावर विदेशी अन्य धर्मीयांची एका पाठोपाठ एक आक्रमणे होत राहली. आमच्या धर्मातले गट आणि परकीय आक्रमणांची मालिका पाहता हिंदू धर्म कोणताही स्पष्ट ठसा न उमटवता संपून गेला असता. परंतु प्रत्यक्षात आपण जे पाहतो आहोत ते चित्र त्याहून वेगळेच आहे. जाती-संप्रदाय नसलेले व सर्व अनुयायांना समान आचारसंहिता असणारे धर्म काळाच्या ओघात नष्टप्राय झाले आहेत. तर अशाच काही अजून तग धरलेल्या धर्मांना, त्यांच्याच अनुयायांच्या म्हणण्यानुसार संपण्याचा धोका आहे. परंतु हिंदू धर्म मात्र सर्व जातींच्या वर्गासह अजूनही जीवित आहे. हिंदू धर्माच्या ह्या जीवित राहण्यामागचे रहस्य आपण भावनेच्या आहारी न जाता समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

आम्ही सहस्रावधी वर्षे वर्णधर्माचे आचरण करीत आलो आहोत आणि तो जीवनाधार शक्ती म्हणून आजही चालू आहे. त्याचे रहस्य काय? किंवा ह्याचा विचार करा-मंत्रांचे जतन करणे हे ब्राह्मणांचे विशेष कर्तव्य आहे. परंतु ते कधी बहुमतात होते का? नाही. त्यांना कधी शस्त्रबळाचा लाभ मिळाला का? नाही. संपत्तीपासून कधी त्यांना धनशक्तीचा लाभ मिळाला का ? उत्तर पुन्हा 'नाही' असेच आहे. (धनसंचयाची सवय ब्राह्मणांनाही लागू लागली आहे, पण ती अगदी अलीकडची वास्तविकता आहे. अर्थात हे अनुचित आहे.) धन, शस्त्र किंवा संख्याबळ याची शक्ती नसलेल्या ब्राह्मणांनी तयार केलेल्या शास्त्रास घालून दिलेल्या वर्गपद्धतीचा इतर जातींनी का व कसा स्वीकार केला?

बुद्धासारख्या महान व्यक्तीने किंवा जैनांनी घोषणा केली होती, 'आम्हाला वेदांची किंवा वेदांनी सांगितलेल्या यज्ञांची आवश्यकता नाही. आम्हाला संस्कृत भाषेची देखील गरज नाही. आम्हा सर्वजणांना एकच समान धर्म असू द्या. पाली किंवा सर्वसामान्यांना कळेल अशा अन्य कोणत्याही प्राकृत भाषेत आम्हाला शास्त्रे लिहू देत''. लोकांनी नवीन धर्माचा स्वीकार करावा म्हणून काही लोकांनी प्रयत्न केला हेही खरे. परंतु ह्या धर्मांचे आकर्षण तात्कालिक ठरले आणि दोन्ही धर्मांचा प्रभाव हळूहळू कमी झाला. प्राचीन वैदिक धर्म मात्र नवीन शक्तीनिशी पुन्हा प्रकट झाला.

एका महान व्यक्तीने काव्यात असे वर्णन केले आहे, ''हे खरोखरच अद्‌भुत आहे की प्राण नवद्वारे असलेल्या ह्या देहात राहतो, पण तो तेथून निघून गेला की आश्चर्य वाटावे असे तेथे काहीच उरत नाही.'' त्याचप्रमाणे हिंदू धर्म आपल्या सर्व वर्गांसह आणि बाह्य आक्रमणांचा सामना करण्याच्या त्याच्यातील निरंतर शक्तीनिशी लयाला गेला असता तर आश्चर्यकारक मागे काहीच उरले नसते. परंतु ही खरोखरच महान किमया आहे की तो नाश पावला नाही.

हिंदुस्थानातले आणि बाहेरचे धर्म स्वभावतःच नाश पावले पण हिंदू धर्म मात्र गेल्या दहा हजार वर्षांपासून जीवित आहे, ह्यातूनच हे सिद्ध होत नाही का की हिंदू धर्मात असे काही तरी विशेष तत्त्व असले पाहिजे ज्याचा अन्य धर्मांत अभाव आहे. हे काहीतरी विशेष तत्त्व म्हणजेच आमची वर्णव्यवस्था. वर्णविभाग हेच आमच्या धर्मांच्या एकात्मतेचे विभाजन करण्यास जबाबदार आहेत असे आजचे समाजसुधारक प्रतिपादन करतात. परंतु हे निःसंदिग्ध सत्य आहे की ह्याच वर्णधर्माने, वर्णविभागांनीच हिंदू धर्म टिकवून ठेवला आणि अखंड राखला आहे. समता ह्या संकल्पनेहून श्रेष्ठ आणि लोककल्याणाचा जीवनाधार असे ह्या धर्माचे विशिष्ट स्वरूप आहे हे क्रमानेच आले. ह्या तत्त्वाच्याच आधाराने आमच्या समाजाचे वर्गवार विभाजन केले गेले आहे, पण हेही लक्षात घेतले पाहिजे की ह्याच विभाजनाने आमच्या धर्माला आक्रमक झंझावाताला तोंड देऊन स्वसंरक्षण करण्यात साहाय्य केले आहे.

-----

प्रकरण - ३

# विविधतेतील एकता

वर्णव्यवस्थेबद्दल बोलताना मला विमानविद्येच्या प्रारंभिक अवस्थेची आठवण झाली. सुरुवातीला ह्या विमानाच्या बलूनमध्ये एका गॅसची बॅग भरली जात असे. पुढे असे दिसून आले की हे विमान उडताना एखाद्या ठिकाणातून जरी हवा बाहेर जाऊ लागली तर विमान कोसळेल. ह्याकरिता विमान न कोसळता हवेत उडत राहावे म्हणून गॅसने भरलेल्या अनेक लहान-लहान पिशव्या त्याला जोडल्या गेल्या. समाजातल्या वेगवेगळ्या वर्गांना वेगवेगळी कामे आणि व्यवसायास ठरवून देणारे तत्त्व हे जुन्या काळातले विमान कोसळू न देण्यासाठी वापरलेल्या पद्धतीसारखेच आहे. वर्णव्यवस्था हे विविधतेतही एकता साधणारे आमच्यासाठी तसेच उत्तम उदाहरण आहे.

जळणासाठी वापरली जाणारी सुटी लाकडे एकत्र बांधणे तसे सोपे नसते. लाकडांची बांधलेली मोळी लवकरच सैल होते आणि प्रत्येक लाकूड मोकळे होऊन बाजूला पडते. मोळीतले एक लाकूड जरी बाहेर काढले तरी ती सैल होते आणि लाकडे बाहेर पडतात. सर्व लाकडे एकत्र बांधण्यापेक्षा हातात मावतील इतकीच लाकडे एकत्र बांधून घ्या. अशा प्रकारे बांधलेल्या लहान मोळ्यांची एक मजबूत मोळी बांधणे सोपे जाते. अशी मोळी सैल झाली तरी सर्व लहान मोळ्या बाहेर येणार नाहीत. परंतु सर्व लाकडे एकाच ठिकाणी बांधलेल्या मोठ्या मोळीच्या बाबतीत असे घडत नाही. लहान मोळ्यांची तयार केलेली एक मोठी मोळी मात्र घट्ट राहते.

एक विशाल समाज एका समान रचनाबंधात एकत्र ठेवणे ही जवळपास अशक्यप्राय गोष्ट आहे. प्रचंड विस्तारामुळे असा विशाल समाजाची योग्य व्यवस्था करणे शक्य नसल्याने अशा समाजात अनुशासन राखणे सहज शक्य होत नाही. अशा स्थितीत लाकडाच्या लहान लहान मोळ्या बांधून त्यांची एक मोठी मोळी बांधण्याचे उदाहरण लक्षात घ्यावयास हवे. त्याचप्रमाणे हा विशाल समाज लहान लहान जातींमध्ये विभागून पुन्हा एकत्र ठेवून प्रत्येक जातीला ठरावीक व्यवसाय दिला गेला होता. प्रत्येक वर्ण लहान लहान मोळ्याप्रमाणे अनेक जातींत विभागून प्रत्येक जातीमध्ये अपराधी लोकांना शिक्षा करण्याचा अधिकार असलेला एक प्रमुख होता. गुन्हेगारांना सध्या तुरुंगवासाची किंवा अन्य प्रकारची शिक्षा दिली जाते, परंतु ह्या शिक्षांचा प्रतिबंधात्मक परिणाम होत नसल्याने गुन्ह्यांची संख्या वाढतेच आहे. जातिव्यवस्थेत मात्र दिली जाणारी शिक्षा गुन्हेगाराच्या मनाला झोंबत असे. गेले शतक उलटे पर्यंत लोक कमी अधिक प्रमाणात सन्मानाने जगत होते आणि गुन्ह्यांचे प्रमाण कमी होते. पोलीस व न्यायाधीश यांना फारसे काम नव्हते.

त्याकाळी अपराध्यांना गाव किंवा जातिप्रमुख कोणती शिक्षा देत असे? बहिष्कार! म्हणजेच वाळीत टाकणे. अपराध करणारा कोणत्याही जातीचा असो, चांभार असो की न्हावी, आजकाल ज्यांची गणना मागास किंवा शोषितांत केली जाते, कोणीही असो जातीच्या बाहेर करणे ही शिक्षा त्याला कोणत्याही शिक्षेपेक्षा अधिक कठोर, अधिक अपमानकारक वाटत असे.

आम्ही ह्यापासून काय बोध घ्यावा? कोणतीही जात स्वतःस किंवा अन्य जातीस हीन समजत नव्हती. आपली कामे व्यवस्थित करण्यात प्रत्येक जातीचा सदस्य, अधिक उत्कृष्टतेमुळे त्या कामात स्वतःस सर्वश्रेष्ठ अधिकार असलेला समजत होता. ह्यामुळे स्वाभाविकपणेच प्रत्येकजण संतुष्ट व समाधानी होता. काही जातींना 'हीन' किंवा काही जातींना 'उच्च' मानले गेले असते तर काय झाले असते? समाजातील काही वर्गांमध्ये स्वतःस कमी लेखणारी न्यूनगंडाची भावना निर्माण झाली असती आणि कदाचित ब्राह्मण व क्षत्रिय सोडल्यास अन्य कोणत्याही जातीच्या माणसास आपल्या जातीबद्दल अभिमान वाटला नसता. आणि प्रत्येक जातीच्या माणसास आपल्या जातीबद्दल गर्व वाटला नसता तर जातीच्या बाहेर टाकण्याची शिक्षा त्याच्या मनास मुळीच लागली नसती. संपूर्ण समाज जेव्हा जातीच्या नावाने लहान लहान गटांमध्ये विभागलेला होता तेव्हा प्रत्येक जातीला दुसऱ्या जातीविषयी जिव्हाळा आणि विश्वास वाटत होता. त्यावेळी खरोखरच प्रत्येकाच्या मनात एक आपलेपणाची भावना होती. ह्याचमुळे जातीबाहेर करणे ही फार भयंकर शिक्षा मानली जात होती.

आता समाजातील काही वर्ग, ते मागासलेल्या जातीचे असल्यामुळे जे विशिष्ट लाभ मिळत आहेत त्या कारणासाठीच आपल्या जातीस जोडलेले आहेत. परंतु त्यांना खरोखरीच आपल्या जातीचा अभिमान वाटत नाही. पूर्वीच्या काळी ह्या वर्गास कोणताही विशेष लाभ मिळत नसे, पण आम्हांस हे सत्य ठाऊक आहे की तीन-चार पिढ्यांपूर्वी आपण त्या जातीचे आहोत ह्याचा त्यांना अभिमान वाटत असे. ह्याच्या पुढे जाऊन आपण असे म्हणू शकतो की गटा-गटामध्ये आजकाल पाहावयास मिळणारी द्वेष-मत्सराची स्थिती त्याकाळी नव्हती म्हणूनच असे घडत होते. खरोखरच त्या काळात जातिभेदावर आधारित भांडणे किंवा स्पर्धा नव्हती. प्रत्येक जातीच्या माणसाच्या मनात केवळ आपल्या जातीबद्दल अभिमान होता, इतकेच नव्हे तर आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेला पिढीजात धंदा व धार्मिक धंदा करण्यात त्यांना समाधान होते.

आजकाल उपद्रव करणारे लोक पोलिसांचा देखील प्रतिकार करतात. परंतु पूर्वीच्या काळी जातिव्यवस्थेमध्ये जातिप्रमुखाच्या निर्णयांचा कोणी विरोध करीत नसे. काहीही झाले तरी पोलीस देखील व्यवस्था आणि कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्या व्यवस्था

प्रणालीच्या बाहेरचे असतात. परंतु जातिव्यवस्थेत मात्र एकमेकांविषयी जिव्हाळ्याची भावना असल्याने शिस्त ही अंतर्गत व्यवस्था होती. त्यामुळे शस्त्रे किंवा पोलीस ह्यांच्या साहाय्याने गुन्ह्यांच्या केल्या जाणाऱ्या नियंत्रणापेक्षा जातिव्यवस्थेत ते काम अधिक प्रभावीपणे केले जात असे.

-----

## प्रकरण - ४

# श्रमाने विभागलेले पण प्रेमाने जोडलेले

विभिन्न जाती, प्रत्येक जातीला वाटून दिलेली कामे, प्रत्येक जातीने पाळावयाच्या परंपरा आणि धार्मिक कृत्ये ह्याबद्दल मी बोललो. माझे हे बोलणे पूर्णपणे बरोबर नव्हते. धंदा-व्यवसाय हा जातीसाठी नाही तर जात ही धंदा-व्यवसायासाठी आहे. वैदिक धर्माने ह्या जाती वेगवेगळ्या विभागून त्यांच्या लहान-लहान (सरपणाच्या मोळीप्रमाणे) मोळ्या कोणत्या आधारावर बांधल्या? एका जातीसाठी एक व्यवसाय निश्चित केला गेला. पाश्चात्त्य अर्थशास्त्रज्ञ श्रमविभागणीबद्दल बोलतात, पण ती संकल्पना ते प्रत्यक्ष व्यवहारात उतरवू शकले नाहीत. समाजातील विभिन्न कामे योग्य रीतीने करण्यावरच कोणत्याही समाजाला अवलंबून राहावे लागते.

समाजाच्या ह्या गरजेतूनच श्रमांची विभागणी ही संकल्पना उदय पावली. परंतु प्रत्येक प्रकारच्या कामासाठी माणसांची संख्या ठरवायची कोणी? समाजाचे काम व्यवस्थित चालण्यासाठी समतोल सांभाळून ह्याचे प्रमाण निश्चित करावयाचे कोणी? ह्या प्रश्नांची उत्तरे पश्चिमेजवळ नव्हती. तेथे प्रत्येकजणाची एक-दुसऱ्याशी स्पर्धा, प्रत्येकाची आरामशीर काम-धंद्यासाठी धडपड, सगळीकडे हवे-हवेपण आणि कडवटपणा आणि ह्यातून निर्माण झालेली चढाओढ. ह्या सर्वांचा परिणाम म्हणून निर्माण झालेल्या व्यवस्था आणि नैतिकतेतल्या त्रुटी.

ही श्रमविभागणी आम्ही आमच्या देशात पिढीजात वंशपरंपरेने केली आणि ती जोपर्यंत प्रत्यक्षात कार्य करीत होती तोपर्यंत लोकांचे जीवन सुख, शांती आणि समाधानाने भरलेले होते. आज अब्जाधीश सुद्धा सुखासमाधानात नाही. त्याकाळी चांभाराचेदेखील जीवन चिंतारहित होते. सर्वांना असमाधानाच्या दलदलीत लोटून आज आम्ही कोणती प्रगती साधली? अशा 'प्रगती' ने समाधानी नसतानाही ह्याच पद्धतीने आम्ही वेगाने पुढे गेले पाहिजे असे सर्वत्र बोलले जात आहे.

शतकानुशतके जेव्हा वर्णधर्म पूर्ण जोमात होता, हव्यास आणि हावरटपणा कोणास माहीतही नव्हता. सर्व माणसे लहान लहान समूहात एकत्रितपणे घट्ट गुंफलेले होते आणि ह्या एकत्र राहण्यातच आनंद आहे हे त्यांना उमगले होते. ह्याशिवाय प्रत्येकाच्या मनात धर्माविषयी आस्था, परमेश्वराविषयी भिरुता आणि भक्तिभाव तसेच आपल्या कुलदैवताचा व कुलाचाराचा अभिमान वसत होता. अशा प्रकारे कोणत्याही बाह्य वस्तूंच्या लालसेपोटी निर्माण होणाऱ्या दुःखाशिवाय त्यांना आपल्या जीवनाचे पूर्णत्व स्वतःच्या जगण्यातच लाभले होते. सर्व समाजाला आत्मिक समाधानाचा अनुभव येत होता.

लोक अनेक समूहांत विभागले गेलेले असूनही  एका, ईश्वरभक्तीच्या सूत्रात मात्र एकत्र गुंफलेले होते आणि जरी त्यांची कुलदैवते भिन्न होती तरी त्यांच्या गावच्या ग्रामदैवताच्या किंवा शहरातील नगरदेवतांच्या भव्य मंदिरात ते एकत्वाने बांधलेले होते. ही मंदिरे आणि तेथील उत्सव त्यांच्या जीवनात केंद्रस्थानी होते आणि त्या मंदिरात विराजित असलेल्या देवतेची लेकरे म्हणून ते एकत्र राहिले. रथोत्सवाच्या वेळी ब्राह्मण, मागास जाती म्हणून ओळखले जाणारे गावकुसाबाहेरचे लोक खांद्याला खांदा लावून एकत्रितपणे देवतेचा रथ ओढीत असत. ते शांती-समाधानाचे आणि सलोख्याचे दिवस पुन्हा परतून येतील का? त्या काळातील लोकांना मत्सर किंवा कडवटपणा ठाऊक नव्हता आणि ते एकमेकांवर दोषारोप करीत नव्हते. प्रत्येकजण आपले काम करीत असे आणि आपली कर्तव्यकर्मे नम्रता आणि संतुष्ट भावनेने पार पाडीत असे.

हे सर्व लक्षात घेता, समाजात अनेक वर्ग असून देखील आपल्यासमोरील सर्व आव्हानांना हिंदू धर्माने तोंड दिले असे म्हणणे बरोबर होईल का? नाही, नाही असे म्हणणे पूर्णपणे चूक ठरेल. सत्य हे आहे की आमचा धर्म जीवनाची प्राणशक्ती म्हणून युगानुयुगे जो एकत्रित स्वरूपात टिकून आहे तो केवळ समाजातील ह्या वर्गांमुळेच. सर्वांसाठी एकच धर्म असलेले अन्य मोठे धर्म लयाला गेले आणि त्याच प्रकारचे अन्य धर्म ह्याच मार्गाने लयाला जाण्याचे भय आहे. शाश्वत धर्म म्हणून हिंदू धर्म कोणत्या कारणामुळे टिकून आहे? आपण पुन्हा एकदा सरपणाच्या मोळीचा दृष्टांत लक्षात घेतला पाहिजे. सर्व सरपण एकाच मोठ्या मोळीत न बांधता लहान लहान मोळ्यांची एकत्र बांधलेली मोठी मोळी जशी मजबूत आणि सुरक्षित राहते, त्याचप्रमाणे लहान लहान, वेगवेगळ्या जातींच्या रूपात बांधलेल्या मोळ्यांचा मिळून हिंदू समाज एका, ईश्वरभक्तीच्या सूत्रात व्यवस्थित गुंफलेला आहे.

समान कर्मकर्तव्ये आणि आचारसंहिता असलेले धर्म अंतर्गत तसेच बाह्य विरोधापुढे टिकाव धरू शकले नाहीत. हिंदुस्थानात अनेक धार्मिक श्रद्धा असलेले वर्ग आपणा स्वतःत किंवा एका मोठ्या समान प्रणालीशी एकात्म भावनेने जोडलेले होते. यांच्यात अंतर्गत स्वरूपाने नवीन आस्था किंवा धर्म निर्माण झाले किंवा बाह्य धर्मप्रणालीमुळे उपपंथ तयार झाले तर नको असलेले टाकण्याची व हवे असलेले आत्मसात करण्याची (यद्रोचते तत् ग्राह्यम्, तत् न रोचते यत् त्याज्यम्) अशी नाकारण्या-स्वीकारण्याची प्रक्रिया अस्तित्वात आली. बौद्ध आणि जैन हे वैदिक धर्माच्याच वेगवेगळ्या मतप्रणालीतून उगवून आलेले धर्म आहेत. यामुळे हिंदू धर्म त्यांना व अन्य अनेक धर्मगटांना पचवू शकला किंवा स्वतःत सामावून घेऊ शकला. अशा प्रकारच्या धर्मगटांना विरोध करण्याची किंवा संघर्ष करण्याची हिंदू धर्माला गरज पडली नाही.

इस्लाम धर्माच्या उदयानंतर आम्ही त्यांच्या काही परंपरा स्वीकारल्या जरुर, पण कोणतीही धार्मिक संकल्पना मात्र स्वीकारली नाही. आमचा पोषाख, संगीत, वास्तुशिल्प आणि चित्रकला यावर काही प्रमाणात मोगलांचा प्रभाव दिसून येतो. अशा प्रकारचा मुस्लिम प्रभाव देखील स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व फार काळ टिकवू शकला नाही तर तो वैदिक संस्कृतीच्या ओघात विलय पावला. तसेच हा मुस्लिम प्रभाव फार करून उत्तरेत पाहावयास मिळतो, दक्षिणेत मात्र हा प्रभाव फारसा दिसून येत नाही. ह्या बाबतीत दक्षिण फार मोठ्या प्रमाणात स्वतःच्या पारंपरिक मार्गालाच चिकटून राहिली.

नंतर युरोपिअनांचे आगमन झाल्यावर उत्तर आणि दक्षिण अशा संपूर्ण हिंदुस्थानात वैदिक धर्मावरील श्रद्धेला ओहोटी लागली. हे बदल कशामुळे घडून आले? आजचे राजकीय नेते 'जातीयवाद' हे नाव देऊन वर्णव्यवस्थेवर टीकेची झोड का उठवत आहेत? आणि जातिवार आधारित वर्गव्यवस्थेने राष्ट्राच्या प्रगतीमध्ये फार मोठी बाधा पोहचविली ह्या मतास सर्वत्र समर्थन कसे मिळत गेले? आणि केवळ जातीचा उल्लेख करण्याने तुरुंगवासाची शिक्षा वाट्यास का यावी?

ह्या प्रकारच्या स्थितीला कोण जबाबदार आहे हे मी जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे तुम्हाला नंतर सांगणारच आहे. काही लोक ही वर्णधर्मव्यवस्था का संपवू पाहत आहेत एवढेच आपण तूर्तास पाहू या. ही व्यवस्था काही जातींना श्रेष्ठता देते तर काही जातींना कनिष्ठता देते म्हणून ही व्यवस्था अन्यायमूलक आहे असे त्यांना वाटत असावे असे दिसते. सर्वजण एका समान पातळीवर असावेत असे त्यांना वाटते.

हे होणे शक्य आहे का व व्यवहार्य आहे का? ह्या प्रश्नांचे उत्तर मिळविण्यासाठी ज्या देशात अशा प्रकारची जातिव्यवस्था नाही तेथे काय परिस्थिती आहे ते पाहणे गरजेचे आहे. तेथे जर अशा तऱ्हेचे श्रेष्ठ किंवा कनिष्ठ असे भिन्न विभाग नाहीत तर मग तेथे वर्गसंघर्षही नसला पाहिजे. पण प्रत्यक्षात काय पाहावयास मिळते? त्या देशातले लोक 'लाभान्वित' आणि 'लाभवंचित' अशा दोन वर्गांत विभागलेले असून ते सतत परस्परांशी झगडत आहेत. आमच्या धर्माचे योग्य आकलन केले तर मात्र असे दिसून येईल की येथे आमच्या लोकात जातीवरून प्रतिष्ठेत अंतर पडत नाही. परंतु अशा प्रकारे जातीमुळे आमच्या येथे प्रतिष्ठेत फरक केला जातो असे जरी वादासाठी गृहीत धरले तरी वर्णधर्म नव्हे तर भेदभावाची कल्पना दूर करणे हेच आमचे कर्तव्य आहे.

ह्या संदर्भात अजून एका मुद्याचा विचार करावयास हवा. आपण जरी हे मान्य केले की सामाजिक वर्गविभागणीमुळे येथे भिन्न वर्गाच्या लोकांच्या मनात एक प्रकारचा कडवटपणा निर्माण झाला आहे, तर मग अन्य देशांतल्या अशा कडवटपणाचे काय कारण? अन्य देशांत असलेली अशी दुर्भावना नाकारता येईल काय? संपत्ती आणि प्रतिष्ठा

यांच्या विषमतेमुळे त्या देशातील अधिक अधिकार नसलेल्या व गरीब वर्गातील लोकांच्या मनात कडवटपणा आणि संतापाची भावना आहे. अमेरिकेतील सर्व लोकांना पुरेसे अन्न, कपडा आणि घरे उपलब्ध आहेत असे म्हटले जाते. पण तेथील वस्तुस्थिती काय आहे? अमेरिकेतील घरकाम करणाऱ्या नोकराजवळही स्वतःचे चार चाकी वाहन असते असे ते म्हणतात. यावरून अमेरिकेतील लोक सुखी आहेत असा तर्क करता येईल. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे? ज्या माणसाजवळ एक मोटरगाडी आहे तो ज्याच्या जवळ दोन गाड्या आहेत अशा माणसाचा द्वेष करतो. त्याचप्रमाणे ज्या माणसाची बँकेतील शिल्लक शंभर दशलक्ष आहे तो एक दशलक्ष शिल्लक असणाऱ्याच्या मनातील द्वेषाग्नीचे कारण होतो. चैनीचे जीवन जगण्याची साधने ज्याच्याजवळ उपलब्ध आहेत तो अधिक सुख-संपत्तीने समृद्ध आणि अधिक विशेषाधिकार असणाऱ्याबरोबर भांडण-तंटे करतो. अमेरिकेसारख्या देशातही विषमतेमुळे समाजाच्या उच्च-नीच वर्गात संघर्ष आहे असा ह्याचा अर्थ होत नाही का?

कम्युनिस्ट देशात काही ह्याहून वेगळी कथा नाही. (हे प्रवचन सोव्हिएट युनियन आणि पूर्व युरोपमध्ये कम्युनिझमला उतरती कळा लागण्यापूर्वी अनेक वर्षे आधी दिलेले आहे.) तेथे प्रत्येकाला समान वेतन मिळते असे सांगितले जात असले तरी अधिकारी आणि कारकून यांच्या बाबतीत ही समान स्थिती नाही. राज्यांनी लागू केलेल्या कायदा-व्यवस्थेनुसार विभिन्न श्रेणींच्या कर्मचाऱ्यांत कलहाची वर वर चिन्हे दिसत नसली तरी तेथील लोकांच्या मनात अशाच प्रकारची द्वेषात्मक स्पर्धेची भावना असणारच. अधिक गुप्त स्वरूपात सत्ता असलेल्या कम्युनिस्टांसारख्या देशात तर अन्य देशांपेक्षा ही द्वेषभावना अधिक प्रमाणात असणार. आजच्या हुकूमशहाच्या जागी उद्या दुसरा हुकूमशहा येतो. प्रतिकाराची वाढती स्थिती रोखण्यासाठी सर्वांना समान दर्जा देणे शक्य होणार आहे का? काही केले तरी उच्च-नीचतेची भावना राहणारच आणि स्पर्धात्मक स्थिती त्याबरोबर येणारच.

द्वेषभावना आणि सामाजिक विसंवादाला वाव देणाऱ्या पश्चिमेतील विषमतेपेक्षा पिढीजात चालत आलेल्या व्यवसायाच्या पद्धतीचे पालन चुकीने करण्यात झालेल्या चुकांमुळे आलेला भिन्नभाव फार बरा असे मला वाटते. ह्या व्यवस्थेमुळे पूर्वीच्या काळात आमच्या देशात शांतता नांदत होती आणि येथील प्रत्येक जण सुखा-समाधानाचे जीवन जगत होता.

विभिन्न प्रकारची कामे ही सामान्यतः लोकांचे चांगले व्हावे म्हणूनच असतात. एखादे काम कमी प्रतीचे आणि दुसरे श्रेष्ठ दर्जाचे समजणे हेच मुळात चुकीचे आहे. कोणतेही काम असो, फळाची अपेक्षा न ठेवता पूर्णत्वाने करण्यासारखे आंतरिक शुद्धीचे

दुसरे प्रभावी साधन नाही. एखादे काम चांगले किंवा वाईट मानण्याची चुकीची कल्पना ही एक वेळ अन्य देशांतील विषमता आणि भेदभावांना तोंड देण्यापेक्षा कितीतरी बरी असेही मी म्हणेन. सामाजिक जीवनात विशेष आणणारी स्पर्धात्मक भावना आणि त्यातून निर्माण होणाऱ्या कडवटपणापासून आम्ही मुक्त होतो आणि आत्ताही आहोत.

विभाजित असूनही आम्ही एकत्रित राहिलो आणि आमच्या सांस्कृतिक सुधारणेचे पोषण केले. अन्य देशांतील संस्कृती लयाला गेल्या याचे कारण तेथील समाज बाह्यतः एकत्र दिसत असला तरी आतून मात्र तो वस्तुतः विभागलेला होता. आमच्या बाबतीत मात्र श्रमाच्या संदर्भात आमची विभागणी झालेली होती तरी आतून हृदयाने मात्र आम्ही सारेजण एक होतो म्हणूनच आमची संस्कृती बहरली. अन्य देशांत मात्र श्रमाच्या बाबतीत भेद नव्हते म्हणजेच कोणीही कोणतेही काम करू शकत होता, तरीही त्यामुळेच चढाओढीची भावना आणि परिणामस्वरूप प्रत्यक्षात एकतेचा अभाव निर्माण झाला. ह्यामुळे अन्य सांस्कृतिक आक्रमणापासून स्वतःचे रक्षण करण्यास ते असमर्थ ठरले.

सर्व लोक एकत्र आणणे किंवा प्रत्येकजणाला उच्च स्थान मिळणे असंभव आहे. त्याचप्रमाणे समाजातील माणसांचे कट्टर स्वरूपाचे वर्गविभाजन करणेही शहाणपणाचे ठरणार नाही.

ह्या दोन्हीही आत्यंतिक टोकाच्या स्थितीतून संभवणारा धोका टाळण्यासाठी आमच्या धर्मशास्त्रांनी ह्यातून सुवर्णमध्य काढला आहे. मी ह्या सुवर्णमध्य असलेल्या मार्गाचा प्रतिनिधी म्हणून सांगतो आहे की लोकांच्या विभिन्न वर्गांत विधींच्या पालनात भेद असले तरी चालतील पण हे सर्वजण अंतःकरणाने मात्र एक असले पाहिजेत. दोन वर्गांत मात्र कोणत्याही प्रकारचा असामंजस्याचा भाव असता कामा नये.

श्रमाच्या रूपातल्या भिन्नतेने बाह्यतः आम्ही विभागलेले असलो तरी हृदयाने मात्र एक असल्याने आमच्यात शांती राहील. युगानुयुगे ह्या देशाची हीच परंपरा आहे की आम्ही सर्वजण मनाने एक आहोत. समाजातील प्रत्येकजण जर आपले कर्तव्यकर्म निस्वार्थीपणे आणि तो जे काही करीत आहे ते संपूर्ण समाजाच्या कल्याणासाठी करीत आहे ह्या दृढ विचाराने करील तर उच्च-नीचतेचा भाव त्याच्या हृदयाला शिवणार देखील नाही. परिस्थिती कितीही प्रतिकूल असो, प्रत्येकजण आपले सामान्य कर्तव्य पार पाडील आणि त्याचा जो वैयक्तिक विशिष्ट कर्तव्यभाग असेल तोही पार पाडील तर कोणाच्याच वाट्याला कधीही दुःख येणार नाही.

-----

# केवळ ह्या देशातच का ?

जातिव्यवस्थेवर आधारित समाजरचनेचा विचार करताना साहजिकच असा प्रश्न उद्भवतो की ह्याबाबतीत हिंदुस्थान सोडून अन्य देशांचे काय? तेथे धर्माचे पालन कसे केले जाते? तेथे जातिव्यवस्था नाही किंवा पिढीजात व्यवसायावर आधारित श्रमाची विभागणीपण तेथे केली जात नाही. मग अशा प्रकारची व्यवस्था आमच्या देशातच का असावी?

श्रमावर आधारित सामाजिक वर्गविभागणी नसलेल्या देशांत देखील ज्ञानी, मुत्सद्दी, प्रशासक, लढवय्ये तसेच कृषी, व्यापार आणि कामगार क्षेत्रांतील विकासात भर घालणारी तज्ज्ञ माणसे निर्माण झाली हे मान्य करावेच लागेल. परंतु ह्या बाबतीत निःपक्षपातीपणाने व देशाबद्दलच्या गर्वाच्या भावनेतून पाहिले नाही तरी हे तुम्हांला दिसून येईल की आमच्याइतकी श्रेष्ठ संस्कृती अन्य कोणत्याही देशात नव्हती. तेथे संस्कृतीची खूप भरभराट झाली होती हे सत्य असले तरी आमच्या संस्कृतीप्रमाणे त्या हजारो वर्षे टिकू शकल्या नाहीत. हे असे म्हणणे म्हणजे स्वतःचीच टिमकी वाजविणे नव्हे. अलेक्झांडरच्या काळापासून आजपर्यंत हिंदू संस्कृतीबद्दल विदेशी लोक देखील आश्चर्य व्यक्त करीत आहेत. वैभवाच्या शिखरावरून खोल पाताळात आमची संस्कृती पोहोचल्यासारखी वाटली, तरीही.

अन्य देशांनी महान विभूतींना, देवमाणसांपासून मानवसेवकांपर्यंत अनेक त्यागी पुरुषांना जन्म दिला आहे हे सत्यच आहे. परंतु आपण जर सर्व देशांवर नजर टाकली तरी हे दिसून येईल की पिढ्यांमागून पिढ्या, गेल्या हजारो वर्षांच्या काळात जितके संत, प्रज्ञावंत, तत्त्वज्ञ, भक्त आणि मानवतेचे कल्याण करणाऱ्या विभूती ह्या देशात जितक्या मोठ्या संख्येने सतत निर्माण झाल्या तितक्या अन्य कोणत्याही देशात निर्माण झाल्या नसतील. हिंदुस्थानात जन्म पावलेल्या अशांची संख्या अन्य देशांतील सर्वजणांच्या एकत्रित संख्येपेक्षा कितीतरी अधिक आहे. म्हणूनच अन्य देशांचे लोक हिंदुस्थानचे वर्णन 'संतांची भूमी', 'साधूंची भूमी' असेच करतात. ते आपल्या वेदान्ताची, अध्यात्मविद्येची आणि अन्य सर्व प्राचीन ग्रंथसंपदेची मुक्त कंठाने प्रशंसा करीत असतात.

संपूर्ण जगातील लोक आमच्या कला, शिल्प, संगीत, काव्य, खगोल, गणित, वैद्यक ह्या क्षेत्रांतील अतुलनीय कार्याची दखल घेतात. आमची उपनिषदे, भगवद्गीता, रामायण, शाकुंतल इत्यादी तत्त्वज्ञान आणि महान साहित्यकृतींबद्दल आश्चर्य व्यक्त करताना ते

कधीही मागे हटत नाहीत. हिंदुस्थानाबाहेरील पंडितजनांच्या मते तामीळ भाषेतील 'तेवारम' आणि 'दिव्यप्रबंध' सारखे भक्तिपर ग्रंथ हिंदुस्थानाबाहेर अभावानेच असतील. तामीळ भाषेतील 'कुरल' बद्दल तर ते म्हणतात की 'कुरल' ही अत्यंत विस्मयपूर्ण, गहन, सुबोध अशी नीतिविषयक आणि पुन्हा संक्षिप्त अशी महान साहित्यरचना आहे. आमची गोपुरे-मंदिरे, आमच्या शिल्पकृती, आमची भरतनाट्यम्सारखी नृत्यकला पाहण्यासाठी विदेशातले लोक आपले घरदार सोडून आमच्या देशात येतात आणि हे सर्व पाहून विस्मयचकित होतात. युरोपिअनांनी नाना प्रकारचे दोषारोप आमच्या माथ्यावर लावले आणि आपल्या 'फूट पाडा आणि राज्य करा' ह्या धोरणाने आम्हांला गुलाम केले. पण त्याचवेळी त्यांनी आमच्या संस्कृतीविषयीच्या कुतुहलापोटी आमच्या शास्त्रांचे, प्राचीन ग्रंथसंपदेचे संशोधन करून आपल्या भाषांमधून त्यांची भाषांतरे देखील करून घेतली.

आमच्या ह्या महान आणि अद्वितीय संस्कृतीत असा कोणता विशेष घटक होता की ज्याला ह्या सर्व गोष्टींचे श्रेय द्यावे लागेल. ह्या प्रश्नाचे उत्तर शोधू गेल्यास तुम्हांला असे दिसून येईल की एक विशेष भाग आमच्या सामाजिक संरचनेत असा होता की, जो अन्य कोणत्याही देशात नव्हता आणि तो म्हणजे आमचा 'वर्णधर्म'. आमच्यात असलेले सर्व सामाजिक दोष आमच्या जातिव्यवस्थेमुळे आहेत असे आमच्या सुधारकांचे मत आहे. परंतु हीच ती भूमी आहे जिने ह्या अद्वितीय वर्णधर्मप्रणालीच्या बळावर अध्यात्म, कला, सामाजिक मूल्ये आणि ज्ञानाच्या क्षेत्रात अन्य सर्व देशांवर मात केली. सामाजिक स्थैर्य आणि शांती हे येथे हातात हात घालून नांदले. ह्यांच्याशिवाय, सर्जनात्मक कार्याला पोषक अशा ह्या वातावरणाशिवाय कोणतीही कला, कोणतीही संस्कृती पिढ्यापिढ्यांतून अशी बहरलीच नसती. अन्यथा तत्त्वज्ञ, साधू-संत आणि कलाक्षेत्रातील मेधावी ह्या भूमीत इतक्या मोठ्या संख्येने जन्मलेच नसते.

अन्य देशांतील धर्मजीवनाचे नियंत्रण करणारे धर्म अशा प्रकारचे स्थैर्य देणारी सामाजिक संरचना निर्माण करण्यात असमर्थ ठरले. अशा प्रकारच्या सामाजिक पायाभरणीच्या प्रश्नाकडे त्यांनी दुर्लक्ष केले असावे असेही कोणी म्हणेल. त्यांनी सुव्यवस्थित सामाजिक जीवनासाठी विशिष्ट नियम घालून दिले नव्हते, पण 'चोरी करू नका' 'असत्य बोलू नका' 'व्यभिचार करू नका', 'त्यागपूर्ण जीवन जगा' असे प्रतिबंधात्मक आदेश मात्र होते. बौद्ध आणि ख्रिश्चन धर्मात मठाचे जीवन फक्त भिक्षू-भिक्षुणीसाठीच होते. ह्या कोणत्याही धर्मात हिंदू धर्माप्रमाणे संपूर्ण समाज हा, त्यातील प्रत्येक सदस्य एक दुसऱ्याचा आधार होईल अशा प्रकारे एके ठिकाणी गुंफण्याकडे लक्ष दिले गेले नव्हते.

अन्य देशांत वैज्ञानिक प्रगती झाली होती हे कोणीच नाकारणार नाही. संरक्षणाची

त्यांची अशी एक व्यवस्था होती आणि ते व्यापार-उदीमही करीत होते. परंतु त्यांच्या देशात असलेल्या स्पर्धेच्या भावनेने जीवनाचे प्रत्येक क्षेत्र दूषित झाले होते. कोणत्याच जातीचा स्वतःचा स्वतंत्र असा व्यवसाय नव्हता. सर्व व्यवसायांत प्रत्येकजण एक दुसऱ्या बरोबर स्पर्धा करू शकत होता. आमच्या देशात मात्र प्रत्येकाचा स्वतःचा पिढीजात कामधंदा होता आणि त्यांची उपजीविका सुरक्षित होती. ह्यामुळे समाजात सलोखा आणि स्थैर्य नांदत होते. आपण हे लक्षात घेतले पाहिजे की आगळ्या वेगळ्या अशा वर्णधर्मामध्ये सर्व माणसे एकत्र बांधलेली होती, म्हणूनच हे घडू शकले आणि संस्कृती व चारित्र्याच्या क्षेत्रात ते सर्वांच्या पुढे जाऊ शकले आणि ह्या वर्णव्यवस्थेने दिलेल्या स्थैर्यामुळे मानवाच्या इतिहासात जे जे उदात्त त्याचा आदर्श स्वतःच्या उदाहरणांनी घालून दिलेले अनेकजण येथे जन्माला आले हे सत्य वेगळेपणाने सांगण्याची गरज नाही. या उलट इतर देशात मात्र अशा प्रकारची व्यवस्था नसल्याने मत्सर आणि स्पर्धा भावना ह्या बाधा पोहचविणाऱ्या व्यवधानांनी तेथील जीवन पार बिघडवून टाकले.

आमच्या येथील समाजसुधारक दावा करतात त्याप्रमाणे जर वर्णव्यवस्थेत माणसे दबलेली राहिली असती तर आमच्या देशात अनेक वेळा क्रांती व्हावयास हवी होती. परंतु सामाजिक क्रांती हा शब्द देखील आम्हांला आत्तापर्यंत नवीनच होता. जुलूम-जबरदस्तीमुळे संपूर्ण समाजात केवढा मोठा असंतोष निर्माण होतो; फ्रेंच, अमेरिकन आणि रशियन क्रांती ह्यांच्याबद्दल वाचल्यानंतर हे आम्हांला कळाले. अन्य देशांतील सामान्य माणसे वारंवार होणाऱ्या अशा प्रकारच्या क्रांतीच्या आंदोलनात सापडली होती. परंतु आमचा हा निष्कर्ष आहे आणि तो अत्यंत महत्त्वाचा आहे की कोणत्याही क्रांतीने शाश्वत असे कोणतेही मूल्य प्राप्त केले नाही. समाजात आज उद्रेक झाला तर नंतर पुन्हा दुसरा उद्रेक पन्नास किंवा शंभर वर्षांनी होतो. ह्याचाच निष्कर्ष असा निघतो की विदेशातली माणसे बहुतेक काळ असंतोषातच जगत आहेत.

आजची स्थिती देखील अत्यंत सुस्पष्ट आहे. संपूर्ण जग प्रक्षुब्ध स्थितीत आहे. अनुशासनहीनता, संप, सामाजिक अस्थिरता, क्रूर, हिंसेचे प्रकार ही रोजची कथा झाली आहे. हुकूमशाही असलेल्या सोविएट युनियनसारख्या देशात विरोधात क्वचितच उठू शकलेला आवाज तात्काळ चिरडला जातो. तथापि ह्या असंतोषाच्या ज्वालामुखीचा कधी स्फोट होईल ते सांगता येणार नाही. ह्या देशातून वारंवार कोणी बुद्धिवादी किंवा साहित्यिक आपली सुटका करून घेऊन इकडे येतो आणि तेथील लोक भोगत असलेल्या जुलूम-जाचाच्या कथा सांगत असतो. स्पष्टच आहे की सोविएट युनियनमधील लोक देखील सुखी आणि समाधानी नाहीत.

अशा प्रकारची एकसत्ताक राज्यपद्धती किंवा हुकूमशाही हिंदुस्थानात अभावानेच

होती. कला आणि शास्त्रामध्ये ह्या देशाने प्रगती केली, ही भूमी जर गुलामांचा देश असती किंवा येथे जर हुकूमशाही असती तर ह्या देशाने जी शास्त्रे आणि कलाक्षेत्रात झेप घेतली ती निश्चितच शक्य झाली नसती. येथे लोक भरडले जातात अशी रडकथा कोणीच कोणासमोर गायली नाही. स्वातंत्र्याच्या मुक्त वातावरणात मने फुलली नसती तर येथे कधीच ज्ञानाच्या, प्रज्ञेच्या क्षेत्रातील कृती, आमच्या सर्व कला, आमची मंदिरे ह्यांचा विकास झाला नसता. येथील बहुसंख्य सामान्य माणसे ही धर्मभोळ्या वेडगळ समजुती आणि भ्रामक कल्पनांचे व भटभिक्षुकांच्या स्वार्थी डावपेचाचे शिकार होऊन जगत होते असे म्हणणे केवळ मूर्खपणाचे ठरेल. अशा प्रकारचे विधान तुम्ही आफ्रिका किंवा दक्षिण अमेरिकेतील जंगलातून राहणाऱ्या वन्य जमातीबद्दल करू शकला असता. तेथील धर्मगुरू हा राजासारखाच असे. तो नुसता दिसायला सुद्धा भयावह असे. पण तो केवळ मंत्र उच्चारून वाटेल ती गोष्ट करू शकतो हे त्या वन्य जमातींच्या मनावर निश्चितपणे बिंबवू शकत असे. लोकांना शिक्षा करण्याचाही त्याला अधिकार असे. अशी परिस्थिती आमच्या देशात नव्हती. येथील माणसे, मग ती कोणत्याही जातीची असोत, खूप ज्ञानी होती आणि निष्ठावान होती तशीच आत्म्याविषयीच्या ज्ञानात त्यांची खूप प्रगती झालेली होती.

तुम्ही जर (तामीळमधील पेरियपुराणासह) पुराणे वाचाल तर तुम्हांला कळून येईल की सर्व जातींत महान माणसे होऊन गेली. चंद्रगुप्तासारखे सार्वभौम राजे आणि शेक्कीझारसारखे मंत्री हे चवथ्या वर्णात जन्मले होते. आमच्या धर्मगुरूंना कोणालाही शिक्षा करण्याचा अधिकार नव्हता. धर्मसंहितेनुसार प्रत्येक धर्मगुरू हा निष्कलंक चारित्र्याचाच असणे आवश्यक होते व त्याच्या हातून एखादा अपराध घडल्यास त्याने स्वतःस दंड करून घ्यावा असे म्हटले गेले आहे. गोरा माणूस निग्रो माणसाच्या संपर्कात आला तर निग्रो माणसाला शिक्षा केली जाते, परंतु आमच्याकडील धर्मगुरू जर अस्पृश्याच्या संपर्कात आला तर धर्मगुरू स्वतः स्नान करीत असे. अस्पृश्यवादाची समस्या आपण थोडा वेळ बाजूस ठेवू या. पण एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की ह्या परंपरा धाकदपटशा, शिक्षेच्या धमकावणीने किंवा दडपशाहीने पाळल्या जात नव्हत्या. आज जगभर जिची प्रशंसा केली जात आहे ती आमची संस्कृती, आमच्यामधील काही वर्गाची माणसे दडपली जाऊन वंचित ठेवली गेली असती तर इतकी भरभराटीला आलीच नसती. धर्मशास्त्र हे जेव्हा सर्वजणांच्या हिताचे असते तेव्हा समाजातल्या कोणत्याच वर्गाला विद्रोहाचे काहीच कारण नसते.

आमची वर्णव्यवस्था प्रचलित असताना लोकांमध्ये विद्रोहाला किंवा असंतोषाला कोणतेही कारण न देता आमची संस्कृती अखंडपणे विकसित होत होती. ते असू द्या, पण हिंदुस्थानात वर्गवार श्रमविभागणीची जुनी पद्धत भंग पावल्यानंतरचे आणि अन्य

देशांनी 'प्रगती' व 'समता' ह्या नावाखाली स्वीकारलेला नवा मार्ग अंगीकारल्यानंतरचे हिंदुस्थानातील चित्र पाहा. सर्वत्र अनैतिकता, संप, निदर्शने, हरताळ, संचारबंदी इ. रोजचेच होऊन बसले आहेत. ह्यावरून लोकमानसात मोठ्या प्रमाणात असंतोष आहे हे स्पष्ट होत नाही का? व्यापार-धंद्यात तर आम्ही अशा पातळीवर आलो आहोत की अप्रामाणिक व्यवहाराबद्दल अन्य राष्ट्रांच्या टीका आणि उपहासाचे आम्ही लक्ष्य बनलो आहोत. प्रत्येकजण हिंदुस्थानची केवळ प्रशंसाच करीत असे हा आता भूतकाळ झाला. पाकिस्तानसारखा लहानसा देशही आम्हाला युद्धात खेचतो. ह्यावरून आमची आत्मिक शक्ती इतकी घटली आहे हेच स्पष्ट होत नाही काय?

आम्ही आमचे आंतरिक सामर्थ्य असे कसे गमावले? कशाचा त्याग केल्याने आम्हाला हा दुबळेपणा आला? असे काय होते की ज्याने आमचे भरण-पोषण करून आमची संस्कृती हजारो वर्षे वाढती ठेवली? अशा कोणत्या गोष्टीपासून आम्ही विभक्त झालो की आम्ही स्वतःला त्या महान संस्कृतीचे वारसदार म्हणवून घेण्याची लाज वाटावी इतके आमचे अधःपतन झाले? सत्य हे आहे की, आमच्या देशात जोपर्यंत आमच्या देशाची अद्वितीय अशी वर्णव्यवस्था प्रचलित होती, आमची संस्कृती संपूर्ण जगात मानाचे स्थान प्राप्त करीत एखाद्या खडकाप्रमाणे स्थिर होती. परंतु वर्णधर्मव्यवस्थेचा ऱ्हास सुरू झाल्यानंतर आमची दिवसेंदिवस अधोगती होत आहे.

हा वर्णधर्म केवळ आमच्या देशातच का? कारण तत्त्वज्ञानाचा विकास करणारी, कला आणि सभ्यतेला पोषक असलेली व आत्मस्वरूपाच्या शोधाला अधिकाधिक प्रेरणा देऊन शाश्वत सत्याचे दर्शन घडविणारी आमची संस्कृती टिकविण्यासाठी हा वर्णधर्म आवश्यक आहे. ह्या वर्णधर्माचे निदान आमच्या देशात जरी पालन केले गेले तरी शेष विश्वासाठी ते एक आदर्श उदाहरण ठरेल.

जर वर्णधर्म नसेल तर त्याबरोबरच सामाजिक विसंवाद आणि माणसा-माणसात मत्सरभावना, असंतोष निर्माण होतो. आपल्या आवडीचे किंवा सोयीची कामे मिळविण्यासाठी माणसे एकमेकांशी स्पर्धा करतील. त्याचप्रमाणे शिक्षणातही स्पर्धा येईल आणि सर्वांनाच आपल्या प्रयत्नांत यश न मिळाल्याने किंवा त्यांच्या इच्छा-आकांक्षा पूर्ण न झाल्याने सर्वत्र द्वेष आणि असंतोष पसरेल. सध्या हिंदुस्थानात काय घडते आहे ते पाहा. शिक्षणाबरोबर बेरोजगारी वाढते आहे. म्हणून महाविद्यालयातील प्रवेश मर्यादित करा. देशात इंजिनियर फारच वाढले आहेत म्हणून काही इंजिनियरिंग कॉलेज बंद करा असे सुचविले जाते. ह्या विषयात 'सर्वांना सर्व काही मुक्त' हे तत्त्व काम करू शकत नाही. काही लोकांवर काही मर्यादा घालणे अपरिहार्य होत आहे. पूर्वीच्या काळी काम कोणतेही का असेना, ते त्या माणसाला स्वाभाविकपणे आपले वाटत असे व त्याला

आपल्या कामाचा अभिमान वाटत असल्याने ते काम ती आपली संपत्ती - आपल्या वाडवडिलांकडून चालत आलेला वडिलोपार्जित अधिकार, आपल्या कुटुंबाचे स्वामित्व असलेले समजून करीत असे. तो आपले हे काम दक्षतेने आणि प्रामाणिकपणे करीत असे. पैसा कमावणे ही गोष्ट तो दुय्यम मानीत असे. प्रत्येक काम विश्वासाने आणि अत्यंत मन लावून, आपले स्वतःचे मानून केले जात असे. त्यामुळे कोणत्याही समस्या निर्माण होत नसत. त्यामुळे संपूर्ण समाजजीवन खुशालीचे होते.

निश्चित व्यवस्थेशिवाय कोणतीच संस्कृती भरभराटीला येऊ शकत नाही. वर्णधर्म व्यवस्थेने सर्वांच्या इच्छा पूर्ण करून सर्वांना समाधान दिले आहे.

वर्णधर्म व्यवस्था पुन्हा आमच्या जीवनात येऊ शकेल का? तिचे पुनरुज्जीवन करण्याचे आमचे प्रयास सफल होवोत वा न होवोत किंवा आमचे प्रयत्न निष्फळ ठरल्यावर आम्ही ते सोडून दिले तरी देखील ह्या वर्णव्यवस्थेने हजारो वर्षे आमच्या धर्मातील सर्व जाती-जमातींचे तसेच ह्या देशाचे आणि पर्यायाने त्यातूनच संपूर्ण विश्वाचे हित साधले हे तरी किमानपक्षी मान्य करावेच लागेल. कमीत कमी ह्या प्रणालीला दोष न देण्याची तरी आम्हाला सद्‌बुद्धी असावी.

-----

प्रकरण - ६

# वर्णधर्माच्या ऱ्हासाला जबाबदार कोण ?

जातिव्यवस्था ही संस्कृतिहीनतेचा भाग आहे असे राजकारणी आणि बुद्धिजीवी दोघेही म्हणतात. का? वर्णधर्मासारखी अत्यंत मौलिक प्रणाली छिन्न विच्छिन्न होण्याला कोण जबाबदार आहे?

ह्यापूर्वीपण मी ह्या प्रश्नांचा उल्लेख केला होता. येथे त्या प्रश्नांची उत्तरे देण्याचा प्रयत्न करीत आहे. वर्णधर्मावरून निर्माण झालेल्या भ्रामक समजुतींना स्वतः ब्राह्मणच जबाबदार आहेत. केवळ आत्मिक उन्नतीलाच नव्हे तर ह्या देशाचे व संपूर्ण मानवतेच्या कल्याणाचे कार्य केलेल्या ह्या प्राचीन वर्णव्यवस्थेच्या ऱ्हासास खरोखर ब्राह्मणच जबाबदार आहेत.

वेदाध्ययन व वेदपरंपरेत विहित असलेले धार्मिक विधी यांचे पालन करणे हे आपले जन्मजात कर्तव्य करणे ब्राह्मणांनी सोडून दिले. त्याने आपले जन्मगाव, स्वतःचे खेडे, शहर सोडून दिले. त्याने आपले केस कापून घेतले आणि तो पाश्चात्त्य युरोपिअन शैलीचे जीवन जगू लागला. वेदांचा अभ्यास करणे सोडून देऊन तो पाश्चात्त्य ऐहिक विद्येचे धडे गिरवू लागला. आपल्या गोऱ्या मालकाने दाखविलेल्या नोकऱ्यांच्या आमिषाला बळी पडून तो पोषाख, जीवनपद्धती आणि जगण्याच्या प्रवृत्तीत त्याची नक्कल करू लागला. उष्ट्या खरकट्यासाठी त्याने आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेला वैदिक ऋषींकडून मिळालेला महान धर्म वाऱ्यावर उधळून दिला. प्रत्येक पाश्चात्त्य गोष्टीकडे, विज्ञान आणि जीवनशैली व मनोरंजन यांकडे आकर्षित झाला.

धर्मसंहितेत सांगितल्याप्रमाणे ब्राह्मणाला धनाचा लोभ असू नये व त्याने संपत्ती साठवू नये. शास्त्राने सांगितल्याप्रमाणे जोपर्यंत ब्राह्मण आपल्या धर्माचे पालन करीत होता आणि जोपर्यंत वेदपठण करून यज्ञ-याग करीत होता तोपर्यंत तो जगाच्या कल्याणाचे कार्य करीत होता आणि इतर जाती त्यांचा आदर करून त्याच्याशी प्रेमाने वागत होत्या. वस्तुतः ते त्याला आपला मार्गदर्शक व आदर्श व्यक्ती मानत होते.

ब्राह्मण कसे बदलले ते आता इतर लोकांनी पाहिले. बाह्य झगमगाट आणि दिखाऊ स्वरूपासह त्याची जीवनशैली कशी बदलली आणि सुधारणेच्या क्षेत्रात आपण उन्नत झाल्याचे ढोंग करीत तो कसा बदलत गेला ते इतरांनी पाहिले. जे जे काही उदात्त, त्या सर्व बाबतींत ब्राह्मण त्यांचा आदर्श होता; परंतु आता तो धर्माच्या मार्गावरून भरकटला होता आणि इतर लोकांनी देखील ब्राह्मणाचे उदाहरण आपल्या डोळ्यांसमोर ठेवले आणि

आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेल्या ज्या कामधंद्यात ते खरोखर सुखी-समाधानी होते ती कामे सोडून देऊन त्यांनी आपली गावे सोडून दिली व उपजीविकेसाठी ते शहरात आले. ब्राह्मणांप्रमाणेच त्यांनीही आग्रहपूर्वक इंग्रजी शिक्षण घेऊन सरकारी नोकऱ्या मिळविल्या.

हजारो वर्षे ब्राह्मण आत्मिक साधना व बौद्धिक कार्ये यांत मग्न होते. प्रारंभीच्या काळात त्यांच्या सर्व मानसिक शक्ती यत्किंचितही वैयक्तिक उन्नतीचे स्वार्थी काम न करता केवळ समाजाच्या कल्याणाचेच काम करीत होत्या. ह्या वृत्तीमुळेच केवळ त्यांची बुद्धी धार लावून ठेवलेल्या शस्त्रासारखी सतत तीक्ष्ण राहिली. आता मात्र समाजाचे कल्याण हे त्यांच्या प्रयत्नांचे उद्दिष्ट राहिले नाही आणि त्यांच्या स्वार्थी वृत्तीने व ऐहिक विषयातली गोडी वाढल्याने साहजिकच त्यांची बुद्धी मंद झाली. त्यांना तेजस्वी बुद्धीचे वरदान मिळालेले होते आणि आपली जन्मजात कर्तव्यकर्मे पार पाडण्यासाठी त्यांच्यावर परमात्म्याची कृपादृष्टी होती. आता मात्र आपल्या स्वधर्माचा त्याग केल्यानंतर, साहजिकच त्यांच्या बुद्धीची धार बोथट झाली.

केवळ आधीच मिळालेल्या गतीमुळे पायडल मारायचे थांबवूनही जशी सायकल काही अंतर पुढे चालत राहते, अगदी त्याचप्रमाणे ब्राह्मण आता जरी आंतरिक तेजाच्या साधनेऐवजी भौतिक विषयांतील ज्ञान प्राप्त करण्याच्या मागे लागले असले तरी त्यांच्या पूर्वजांनी आधीच मारलेल्या पायडलमुळे अजूनही त्यांचे बौद्धिक तेज थोडेफार टिकून आहे. केवळ ह्याच कारणामुळे ब्राह्मण पाश्चात्त्य शिक्षणात देखील उल्लेखनीय प्रगती करू शकले. पाश्चात्त्य चालीरिती, त्यांचे कायदे आणि उद्योग ह्या विषयांत त्यांनी विशेष ज्ञान प्राप्त केले. ह्या विषयातील महत्त्वाचा भाग उल्लेखनीय प्रकारे आत्मसात करून ब्राह्मणांनी त्यावर इतके प्रभुत्व मिळविले की आज ह्या विषयावर तेच आपल्या गोऱ्या मालकाला धडे देऊ शकतील.

आता ह्या ठिकाणी हा प्रश्न निर्माण होतो की मुस्लिमांच्या सत्ताकाळात ज्या वेदाध्ययनावर फारसा दुष्परिणाम झाला नाही, त्याची युरोपियनांच्या आगमनानंतर मात्र इतकी भयंकर अधोगती कशी झाली? गोऱ्या लोकांच्या आगमनाबरोबर आलेले नवे विज्ञान व यंत्रे याचा परिणाम हे त्याचे एक कारण आहे. ह्या विज्ञानातून अनेक सत्यांचा शोध लागला आणि त्यांच्यामुळे सर्वजणांना काही मर्यादेपर्यंत लाभ झाला; हेही तितकेच खरे. परंतु एखाद्या विषयाचे स्वाभाविक ज्ञान होणे आणि त्या ज्ञानाचा व्यवहारात आपण उपयोग करणे ह्या दोन गोष्टी भिन्न असतात.

बाष्प आणि विद्युत ह्या दोन शक्तींचा उपयोग सुरू होताच अनेक प्रकारची कामे सुलभतेने होऊ लागली हे खरे, परंतु त्यापासून इंद्रियांना सुखविणाऱ्या, विचारहीन,

आरामदायक सुविधापण निर्माण झाल्या. तुम्ही इंद्रियांना अधिकाधिक सुखवीत राहिलात की नवीन नवीन लालसा निर्माण होत राहतात. ह्यातूनच उपभोगाच्या साधनांचे अधिकाधिक उत्पादन होऊ लागले. आपण इंद्रियसुखे जितकी जास्त मिळविण्याचा प्रयत्न करू तितकी आपल्या आंतरिक अस्तित्वाला अधिकाधिक हानी पोचत राहते. विज्ञानाचा विकास, यंत्रांचा उपयोग आणि त्यांच्या बरोबरीने आलेले नवीन सुखोपभोग हे ब्राह्मणांना, अन्य जमातींपेक्षा अधिक अटळ आमिषे ठरली. गोऱ्यांनी आणलेल्या विज्ञानाबरोबर आलेली अवांच्छित गोष्ट म्हणजे त्यांनी आणलेला 'बुद्धिवाद'. ह्या बुद्धिवादानेच लोकांच्या मनातल्या धर्मविषयक श्रद्धेला सुरुंग लावला व श्रद्धेच्या पायावर उभी असलेली व मनातून ज्यांची प्रचिती आलेली होती अशी धार्मिक सत्येही निव्वळ फसवणूक आहे असा भ्रम काहींच्या मनात निर्माण झाला. मुस्लिम सत्तेच्या काळात ज्या माणसांनी आपले कर्तव्यकर्म टाकले नाही त्यांनी आता नव्याने शोध लागलेल्या सुखोपभोगांसाठी आणि चैनीतून मिळणाऱ्या आनंदासाठी आपल्या कर्तव्यकर्मांचा त्याग केला. त्याने इंग्रजापेक्षा अधिक रुबाबदार पोषाख केला, तो सिगारेट ओढू लागला आणि इतकेच नव्हे तर तो आपल्या गोऱ्या मालकासारखा नाचूदेखील लागला. अशा प्रकारे जे कोणी गोऱ्या माणसांच्या विद्या-कलेत प्रवीण झाले त्यांना पुरस्कार म्हणून नोकऱ्या मिळाल्या.

आता सर्वात दारुण शोकांतिका घडून आली. आत्तापर्यंत समाजातील प्रत्येक माणसास आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेला धंदा-व्यवसाय होता आणि कोणासच आपल्या उपजीविकेची चिंता नव्हती, परंतु आता मात्र अशा जाति-समुदायांच्या समोर असलेले ब्राह्मणांचे उदाहरण पाहून ब्रिटिशांनी देऊ केलेल्या बँका, रेल्वे, कलेक्टर कचेरी इत्यादी नोकऱ्यांसाठी सर्वांनीच आपले पारंपरिक धंदा-व्यवसाय सोडून दिले. यंत्रांनी व्यवसाय सुरू झाले आणि आमचा हस्तव्यवसाय धोक्यात येऊन, आमच्या कारागिरांना आपल्या पोटापाण्यासाठी दुसरी कामे शोधायची वेळ आली. काम आणि कामगार यांत कोणतीच आवश्यक मर्यादा निश्चित न राहिल्याने ह्या देशात प्रथमच काम मिळविण्यासाठी चढाओढ सुरू झाली. ही एक भयानक घटना होती आणि तिच्यातून, ह्यापूर्वी जे सलोख्याने वागत होते, त्या माणसांत परस्परांबद्दल मत्सर, दुष्टबुद्धी, कलह निर्माण होऊन अन्य दुष्ट प्रकारांचे पेव फुटले.

ब्राह्मण आणि ब्राह्मणेतरांत देखील दुष्ट भावना निर्माण झाली कशी? तर ब्राह्मणांचे प्रमाण लोकसंख्येच्या मानाने फारच कमी होते आणि मी पूर्वीच म्हटल्याप्रमाणे ब्राह्मणांच्या पूर्वजांनी आधीच 'पायडल' मारून ठेवलेले असल्यामुळे, नव्या व्यवस्थेत आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर ते उच्च पदावरच्या नोकऱ्या मिळवू शकले. प्रशासन, अकादमी, कायदा-व्यवस्था, औषधी क्षेत्र, इंजिनिअरिंग अशा जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात ते

सर्वोत्कृष्टतेने पुढे गेले. इंग्रजांनी आपल्या मनाशी एक गणित पक्के केले होतें की ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर जातींमध्ये शत्रुत्वभावना निर्माण करावी आणि ह्या वैरभावनेला खतपाणी घातले तर त्यामुळे ह्या देशावर आपली पकड घट्ट राहील असे त्यांना दिसून आले. त्यांनी आर्य आणि द्रविड हा वंशभेदाचा सिद्धान्त मांडला आणि एकाच आईच्या पोटी जन्माला आलेल्या लेकरांच्या मनात भेदभावनेची बीजे पेरली. नोकऱ्या मिळविण्यासाठीच्या चढाओढीने आधीच दूषित झालेल्या वातावरणात हा भेदभावाचा नवीन आराखडा एकदमच प्रभावी ठरला.

ही दुष्ट भावना वाढविण्यासाठीच जणू ब्राह्मणांनी एक अनर्थकारक पाऊल पुढे टाकले. एकीकडे त्याने आपल्या धर्माचा त्याग केला आणि आपल्या प्राचीन समाजव्यवस्थेला एक- दुसऱ्याचे शोषण करणारी रानटी व्यवस्था असा शिक्का मारत, ती निरुपयोगी ठरवीत ब्रिटिशांशी हातमिळवणी केली. दुसरीकडे, जरी तो समतेची भाषा करीत होता तरी स्वतःस अन्य जातीच्या लोकांपेक्षा श्रेष्ठ समजत त्यांच्यापासून दूर राहिला. भूतकाळात जरी तो प्रत्यक्षात इतर जातींच्या लोकांत मिसळला नव्हता, तरी त्याचा अर्थ असा नव्हता की त्याने स्वतःस श्रेष्ठत्वाच्या आसनावर बसविले होते. अन्य जातींच्या प्रत्यक्ष संपर्कात न येण्याचे त्याचे जे कारण होते ते आपण लक्षात घेतले पाहिजे. जातींतले भेद, काम आणि परिसर ह्यांवर आधारित असतात. फिल्मवरची प्रक्रिया करताना फोटोग्राफरला डार्करूम आवश्यक असते पण याउलट त्याच फिल्मचे छायाचित्रण करताना मात्र त्याला प्रखर प्रकाश आवश्यक असतो. कारखान्याच्या कॅन्टीनमध्ये काम करणाऱ्यास अत्यंत स्वच्छ असावे लागते, पण मशिनरी साफ करणाऱ्याचे कपडे मळकट असतात. ह्याचा अर्थ हा होत नाही की कॅन्टीनमध्ये काम करणारा वेटर, कारखान्यातल्या मशिन साफ करणाऱ्या माणसापेक्षा श्रेष्ठ आहे. स्वतःचा कोणताही विचार न करता जो आपली बुद्धी तेजस्वी ठेवण्याचा प्रयत्न करतो त्याला उपवास करणे आवश्यक आहे, तर ज्याला सतत सुदृढ व सशक्त असावे लागते तो सैनिक मांसाहार करतो.

ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्या दोघांत परस्परांविषयी अमंगल भावना का असावी? ब्राह्मणाने क्षत्रियाच्या प्रत्यक्ष संपर्कात येऊन त्यास सांगावयास हवे का, की त्याच्या मनात क्षत्रियाविषयी कोणतीही दुष्ट भावना नाही. तो जर क्षत्रियाबरोबर सहभोजन करील तर त्यास मांसाहार घेण्याचा मोह होईल व अशा मोहाने त्याच्या हातून स्वधर्मविरोधी वर्तन होईल. प्रत्येक जातीला स्वतःची कर्तव्ये, परंपरा आणि आहारपद्धती आहे. समतेच्या नावाखाली जर सर्व जाती आपापल्या वैयक्तिक जीवनपद्धतीबद्दल आदर न ठेवता एकमेकांत मिसळून जातील तर सर्व कार्याची हानी होईल व समाज गोंधळात बुडून जाईल.

काही एक निश्चित उद्देश डोळ्यांसमोर ठेवूनच ब्राह्मणांना इनाम म्हणून दिलेला (अग्रहार) आणि शेतीचा वतनी जमिनीचा भाग असे गावाचे वेगवेगळे भाग पाडलेले होते. अशा पद्धतीची जमिनीची विभागणी ग्रामीण जीवनात करणे शक्य होते. परंतु नवीन शहरी जीवनपद्धतीत ते तसे शक्य नव्हते. शहरीकरण व औद्योगीकरणामुळे विभिन्न जातींच्या लोकांना एके ठिकाणी, एका पाळीत काम करणे भाग पडू लागले. एकाच कॅन्टीनमध्ये बसून एकाच प्रकारचे अन्न खाणे क्रमप्राप्त झाले. अनेक धार्मिक विधी पार पाडण्यासाठी ज्या ब्राह्मणांना उपास व व्रते यांचे पालन करणे अपरिहार्य असे ते आता इतर लोकांपेक्षा वेगळे काही करताना दिसेनासे झाले. धार्मिक विधी पार पाडण्यासाठी कार्यालये आणि महाविद्यालयाच्या कामाच्या वेळा त्यांना गैरसोयीच्या होऊ लागल्या. त्यामुळे ब्राह्मणांनी धार्मिक विधींचे पालन करणे वाऱ्यावर सोडून दिले. आत्तापर्यंत तो, हे विधी इतरांच्या कल्याणाचा हेतू मनात ठेवून करीत आला होता. समाजासाठी तो धर्माचे रक्षण विश्वस्त ह्या नात्याने करीत होता व त्याची फळे संपूर्ण समाजाला सोपवीत होता.

झाले ते सर्व भूतकाळात जमा झाले. आपण सर्वजण समान आहोत, मी तुमच्यातीलच एक आहे असा उद्घोष करीत ब्राह्मणच पुढे सरसावले. त्याचप्रमाणे ब्राह्मण इतरांच्या ईर्ष्येस कारण झाला आणि कामधंदा मिळविण्यासाठी इतरांच्या बरोबरीने स्पर्धेत उतरून तो खरोखर त्यांच्यातीलच एक झाला. असो, तो जरी समानतेची भाषा बोलत होता तरी धार्मिक कर्तव्ये पार पाडण्याच्या बाबतीत इतरांपेक्षा तसूभर देखील अधिक दक्ष नसूनही तो स्वतःस इतरांपेक्षा श्रेष्ठ समजत होता. इतरांचा द्वेष ओढवून घ्यायला हे पुरेसे नव्हते का?

ब्राह्मण स्वतः बिघडला आणि त्याने इतरांसही बिघडविले. स्वतःचा धर्म गुंडाळून ठेवून त्याने इतरांसमोर अनुचित उदाहरण घालून दिले. स्वतः धर्मच्युत झाल्यामुळे इतरांत उठून दिसेल असे कोणत्याही प्रकारचे विशिष्टपण त्याच्यात उरले नाही. खरे पाहू गेले तर, स्वधर्माचे काटेकोरपणे पालन करून देखील इतरांपेक्षा स्वतःस श्रेष्ठ समजण्याचा ब्राह्मणास कोणताच अधिकार नाही. समाजामध्ये प्रत्येकजण आपापले व मी देखील माझे कर्तव्यकर्म व्यवस्थित पार पाडीत आहे ह्या विश्वासाने ब्राह्मणाने सतत नम्र राहावयास हवे. भूतकाळात इतर लोक जो काही त्याचा आदर करीत होते आणि समाजात त्याला मानाचे स्थान देत होते त्याचे कारण केवळ त्याचे निरपेक्ष कार्य, त्याचे सदाचारपूर्ण जीवन, अनुशासन आणि पवित्रता हेच होय. पण आता तो इतका अधःपतित झाला आहे की त्याच्यावर सर्वांकडून धारदार टीका होत आहे.

माझे हे निश्चित मत आहे की हिंदू समाजाच्या नाशास ब्राह्मणच जबाबदार आहेत. काहीजणांनी ह्याचे उत्तर तयार करून ठेवले आहे. ब्राह्मणाला जर खरोखरच आपल्या

धर्माशी प्रामाणिक राहायचे असेल तर वेदाध्ययन, वेदपठण, होमहवन, शास्त्रांचे जतन इत्यादी कामांतच त्याचा सर्व वेळ जाईल आणि मग त्याने पोटासाठी काय करावे? तो जर पैसा कमावण्यासाठी किंवा उदरनिर्वाहाची सामग्री मिळवू पाहील तर त्याचे जीवितकार्य कोण करील? आणि त्याचे हे जीवनकार्य तर दिवसाचा थोडा वेळ देऊन पूर्ण होणारे नाही आणि तो जर आपल्या उपजीविकेसाठी अन्य काम स्वीकारील तर त्याच्या धर्मकार्यात शिथिलता येण्याची अधिक शक्यता. हे म्हणजे पथ्य न पाळता औषध घेण्यासारखे आहे. ह्याने वेदांच्या अध्ययनातून प्राप्त केलेली शुभंकर शक्ती कमी होत जाईल व त्याप्रमाणात त्याच्या कार्यातून होणाऱ्या लोककल्याणाचे प्रमाणही कमी होत जाईल.

शास्त्रांनी केवळ ह्याच एका कारणासाठी, केवळ ब्राह्मणांनाच आपल्या उदरनिर्वाहासाठी भिक्षा मागण्याची अनुमती दिलेली आहे. ब्राह्मण करीत असलेल्या धर्माचरणामुळे इतर समाजाचे हित होते हा विचार लक्षात ठेवूनच पूर्वीच्या काळी ब्राह्मणांना वतन म्हणून जमिनीच्या रूपाने राजाश्रय मिळत असे. परंतु आपल्या आवश्यकतेपेक्षा किंचितही अधिक दानधर्म ब्राह्मणांनी स्वीकारू नये असा शास्त्राचा दंडक होता. त्यांनी जर ह्या मर्यादेपेक्षा अधिक साहाय्य स्वीकारले तर त्यांना वैषयिक सुखांचा मोह पडेल आणि ती मदतच त्यांच्या आंतरिक उन्नतीला बाधक ठरेल. अशा प्रकारची मदत करणाऱ्या दात्यांपुढे ब्राह्मण लाचार होऊन, आश्रयदात्यांची मर्जी राखण्यासाठी त्याच्या सोयीनुसार धर्माला मुरड घालण्याचा धोकाही ह्यात संभवतो. अशा प्रकारचे सर्व संभाव्य धोके लक्षात घेऊनच पूर्वीच्या काळी ब्राह्मण राजाश्रयाखालीच धर्माचरण करीत. (म्हणजेच आपल्या धर्माचरणाला बाधा येईल अशा कोणत्याही दबावाला बळी न पडण्यासाठी अशा प्रकारची मदत म्हणून अत्यंत किमान 'दानधर्म' स्वीकारीत असत.)

नंतरच्या काळात ब्राह्मणाच्या धर्माचरणाबद्दल पळवाट शोधणारे असे म्हणू लागले की, ब्रिटिशांची सत्ता आल्यानंतर ब्राह्मणांचा राजाश्रय बंद झाला. मग हा राजाश्रय बंद झाल्यानंतर ब्राह्मणांनी कोणत्याही कमाईशिवाय कसे जगावे? परिस्थितीच्या दबावाने त्यांना इंग्लिश शिक्षण घेणे व नंतर सरकारी नोकऱ्यांच्या मागे लागणे भाग पडले. ह्या बाबतीत त्यांना दोषी धरणे अन्यायाचे होईल.

ह्या म्हणण्यात थोडेफार तथ्य आहे, परंतु ब्राह्मणांमध्ये झालेल्या परिवर्तनाचे ह्या म्हणण्याने पूर्ण समर्थन होत नाही. ब्रिटिश सत्ता येण्यापूर्वी येथे मोगल व त्यापूर्वी एका मागोमाग एक अशा सल्तनींनी आमच्यावर राज्य केले. ह्या काळात फारच थोड्या पंडितांना दरबारात आश्रय मिळाला. परंतु इतर ब्राह्मण मात्र सत्ताधाऱ्यांकडून कोणत्याही प्रकारच्या साहाय्यावाचून आपल्या धर्माचे पालन करीत होतेच ना? खेड्यांचा नाश

झाल्यामुळे ब्राह्मणांच्या वाड्यावस्त्या ओस पडल्या. ब्राह्मणांची वतने म्हणून दिलेल्या जमिनी केवळ कागदावरच राहिल्या. वेद शिकविणाऱ्या पाठशाळा, आश्रय नसल्याने उजाड झाल्या. ह्या घटनेला होऊन शंभर वर्षे देखील उलटली नाहीत. वैदिक धर्म गेल्या पिढीत भरभराटीला आलेला नव्हता काय?

केवळ हिंदू सत्ताधाऱ्यांनी ब्राह्मणांना आश्रय दिला होता म्हणून वैदिक धर्म भरभराटीला आला होता असे नाही. हा धर्म दुर्बल होऊन ह्याचा नाश व्हावा असे त्या काळच्या सर्वच वर्णांच्या लोकांना वाटत नव्हते. ब्राह्मण जात दुर्बल होणार नाही आणि त्यांची उपजीविका योग्य पद्धतीने होऊन ते वैदिक परंपरांचे संवर्धन करू शकतील इकडे त्यांनी उदारतेने लक्ष दिले. आज शेकडो वैदिक पाठशाळा ओस पडल्याचे तुम्ही पाहता आहात. आज ब्राह्मणांची फारच थोडी मुले वेदग्रंथांचा किंवा शिलालेखांचा अभ्यास करण्याची इच्छा धरीत आहेत. वैदिक संस्था चालाव्यात म्हणून तामिळनाडूतील नाट्टकोट्टाइ, नागरत्तार, कौमुट्टी शेट्टी आणि वेळ्ळाल या तामिळनाडूतील ब्राह्मणेतर जातीच्या लोकांप्रमाणे आता कोणी निधी गोळा करीत आहे काय? नागरत्तार ह्यांनी आमच्या मंदिरासाठी केलेले कार्य तर खरोखरच प्रशंसनीय आहे. या. तामिळनाडूतील ब्राह्मणेतर जातीच्या लोकांप्रमाणे संपूर्ण तामिळनाडूमध्ये जेथे जेथे त्यांनी मंदिरे उभारली तेथे तेथे त्यांनी एक वेदपाठशाळा बांधली, कारण वेद हे मंदिराचे 'मूळ' आहे अशी त्यांची श्रद्धा होती. मंदिरातील उपास्य देवतांचे 'जागृत'पण टिकून राहावे व तेथे त्यांची पूजा होत राहावी म्हणून वेदांचा मूलाधार त्यांना आवश्यक वाटत होता. तसेच वेळ्ळालामधील मोठे जमीनदार वैदिक शाळांना मुक्तपणे दान देत होते.

ब्राह्मण जर युरोपियनांच्या जीवनशैलीच्या मोहात पडला नसता आणि शास्त्रांच्या आज्ञेनुसार पवित्रपणे जीवन जगत राहिला असता तर अन्य जातीसुद्धा त्याच्या साहाय्याला पुढे आल्या असत्या. इतर वर्णांच्या लोकांनी त्याला बाजूला टाकले ही सत्यस्थिती नसून पश्चिमेकडील विज्ञानतंत्राने उपलब्ध करून दिलेल्या नवीन ऐशआरामाच्या जीवनाच्या लालसेमुळे त्याने स्वतःच आपला धर्म, आपले वतन, आपला गाव व वैदिक पाठशाळा यांपासून पलायन केले. त्याला आपल्या उच्च आदर्शांचे विस्मरण झाले व आपल्या आत्मकल्याणाच्या संदर्भात शारीरिक गरजांचे फारसे महत्त्व नाही, ह्या तत्त्वाला द्यावे तितके महत्त्व तो देईनासा झाला. आपली उपजीविकाच होईनाशी झाल्याने ब्राह्मणाला आपला धर्म बासनात गुंडाळून ठेवणे भाग पडले असे जे प्रत्येकजणाचे म्हणणे आहे त्यात फारसे तथ्य नाही. ब्राह्मणाची लोभी वृत्ती वाढली आणि आपल्या उपजीविकेला आवश्यक असलेल्या धनापेक्षा अधिक कमावण्याची इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली हे आम्हांला नाकारता येणार नाही.

ब्राह्मणाला आपल्या खेड्यात आपला उदरनिर्वाह चालविणे अशक्य झाल्याने त्याने आपले गाव सोडले व तो मद्राससारख्या शहरात आला हे आपण मान्य करू या. पण मग त्याला येथे तरी सुख मिळून तो समाधानी झाला का? आम्हांला प्रत्यक्षात काय पाहावयास मिळते? समजा, त्या ब्राह्मणाला आज मद्रासमध्ये एक हजार रुपये पगार मिळतो आहे अन् त्याला जर दुप्पट पगाराची-दोन हजार रुपयाची नोकरी दिल्लीला मिळाली तर तो तिकडे धाव घेतो. आता थोड्या फार प्रमाणात का होईना तो जी धर्मकर्मे मद्रासला करीत होता ती दिल्लीला गेल्यावर त्याने पूर्णपणे गुंडाळून ठेवली. ह्यानंतर जर त्याला अमेरिकेत दरमहा चार हजार डॉलरची नोकरी मिळाली तर तो आपले नशीब काढण्याच्या प्रलोभनाने आपला मायदेश सोडायला तयार होतो. अमेरिकेत गेल्यानंतर तो पूर्णपणे आपला धर्म, आपल्या परंपरा ह्याकडे पाठ फिरवितो. पैसा मिळविण्यासाठी तो अगदी टोकाला जाऊन काहीही करायला तयार असतो. उदाहरणार्थ, पैसा जास्त मिळत असेल तर तो सैन्यातही जाईल, त्यासाठी तो मांसाहार घेईल, मद्यप्राशनही करील आणि ब्राह्मणाने धर्म सोडला तरी धर्म काही बुडत नाही ही नेहमीची सबब पुढे केली जाते.

मी ह्यापुढे आणखी एक पायरी जाईन. पाश्चिमात्य तंत्रज्ञान आमच्याकडे आल्यानंतर अन्य जातीचे लोक देखील धर्मपराङ्मुख झाले व त्यांनी आपल्या धार्मिक परंपरांचे पालन करायचे सोडून दिले अशी आपण कल्पना करू. इंग्रजांनी कुटनीतीने तयार केलेल्या आर्य-द्रविड वादामुळे त्यांच्या विचारप्रणाली व भावनांवर झालेल्या परिणामातून, ह्या जातीच्या लोकांनी ब्राह्मणांच्या पाठीशी इथून पुढे उभे न राहण्याचा निर्णय घेतला असेही आपण मान्य करू. ह्यापुढे आपण हेही धरून चालू की पोटाला गोळाभर भात मिळावा म्हणून ब्राह्मणाला आपले घरदार व चूल-मूल, आपले मूळ गाव सोडून दूर देशात जाऊन कचेऱ्यातून काम करावे लागले. तो आपल्या धर्माशी प्रामाणिक राहिला असता तर त्याने स्वतःला बजावले असते की काहीही होवो, प्राण गेला तरी मी माझ्या धर्माचे पालन करीन. अशा निर्धाराने प्रयत्नपूर्वक तो वेदांचे अध्ययन आणि आपल्या परंपरांचे पालन चालू ठेवू शकला असता. तथापि गेल्या पिढीने हे काम करावयास हवे होते असे म्हणण्यात काहीच तथ्य नाही. त्यांनी ज्या कर्तव्यकर्माची उपेक्षा केली ते कार्य चालू पिढीने करावे असे मी त्यांना आग्रहपूर्वक सांगेन. मरण ओढवले तरी तुम्ही आपला धर्म सोडू नका असे मी पुन्हा एकदा सांगेन. आम्ही मरण टाळू शकतो काय? कधीतरी मरावे हे लागणारच आहे. नाही तरी आम्ही पैसा जमवतो. पराकोटीची मानखंडना सहन करतो, दुसऱ्यांच्या द्वेषभावनेला सामोरे जातो आणि अखेरीस आमच्या धर्माशी प्रामाणिक न राहून स्वतःचा जातिधर्मही गमावून बसतो.

अशा स्थितीत आमच्या श्वासात श्वास आहे तोपर्यंत, प्रसंगी उपाशी राहूनही आम्ही

आमच्या धर्माशी एकनिष्ठपणे टिकून राहू तर अधिक श्रेयस्कर होणार नाही काय? अशा प्रकारे धर्माशी एकनिष्ठ राहणे हे आमच्यासाठी अभिमानाचे ठरणार नाही काय? इतरेजन आमच्याकडे कोणत्या दृष्टीने पाहतात? ते आमचा आदर करतात की आमची निंदा करतात ह्याची आम्ही का चिंता करावी? जोपर्यंत आम्ही नोकरी-व्यवसायासाठी त्यांच्या स्पर्धेत उतरत नाही तोपर्यंत त्यांना आमचा द्वेष किंवा विरोध करण्याचे काहीच कारण नाही. भलेही ते आम्हाला मागासलेले किंवा मूर्ख म्हणोत किंवा काळाबरोबर चालण्याची आमच्यात क्षमता नाही असाही आमच्याविषयी त्यांचा समज होओ. सध्या देखील आम्ही त्यांच्या थट्टेचा विषय नाहीत का? ह्या उपहासाच्या वातावरणात आणि मरण समोर उभे ठाकले तरी आम्ही आपल्या धर्माशी प्रामाणिक राहू या. केवळ पोटाची खळगी भरण्यासाठी आपला धर्म सोडल्यामुळे अपशब्दांचे गोफणगुंडे आणि टीकेचा भडिमार ओढवून घेण्यापेक्षा हे चांगले नाही का? आजकाल माणसे आपल्या मातृभूमीसाठी आपल्या प्राणांचेही बलिदान करतात, आपल्या मातृभाषेसाठी संपूर्ण जीवन झोकून देतात. प्राणांचे बलिदान करण्यासाठी प्रेरित करायला त्यांना देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीसारखे महान कारण आवश्यक वाटते असे नाही तर एखाद्या जिल्ह्याचा भाग दुसऱ्या जिल्ह्यात समाविष्ट करावा ह्या लहानशा मागणीसाठी देखील लोक मरणाशी खेळ खेळताना, आयुष्याचा त्याग करताना दिसतात. मग ब्रिटिश लोक आपली जीवनपद्धती घेऊन जेव्हा ह्या देशात आले तेव्हा अशा प्रकारच्या श्रद्धेच्या भावनेतून स्वेच्छेने, स्वधर्मरक्षणासाठी मरण झेलूनही एखादे आंदोलन चालविले गेले का? त्यावेळी धर्मरक्षणासाठी मृत्यू पत्करणे ही त्यासाठी द्यावी लागणारी एक अल्पशी किंमत आहे अशा श्रद्धेने आम्ही धैर्याने धर्मरक्षण केले का?

गीतेमध्ये स्वतः भगवंतांनी सांगितले आहे की परधर्मामध्ये सुखाचा परमोत्कर्ष प्राप्त करण्यापेक्षा स्वधर्मात त्याचे अनुपालन करताना मरण येणे अधिक चांगले होय. भगवान श्रीकृष्ण म्हणतात -

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।। (गीता ३.३५)

आपल्या इतिहासातील प्रदीर्घ मुस्लिम काळात ज्या ब्राह्मणांना आपली जीवनपद्धती बदलावी असे मुळीच वाटले नाही त्यांनी ब्रिटिश सत्ताकाळात मात्र ती बदलली; का बरे? गोऱ्या माणसाबरोबर नवे विज्ञान आणि नवी यंत्रे येथे आली. मोटारगाडी आणि विद्युतशक्ती यांचा स्वतःचा असा वेगळाच प्रभाव येथील जीवनावर झाला. पूर्वी कधी ज्यांची कल्पना देखील केली नव्हती अशा ऐशआरामाकडे व सुखसोयींकडे ब्राह्मण खेचला गेला. जीवनात घडून आलेल्या बदलाचे हे एक कारण असू शकेल, पण ते तितकेसे तर्कसंगत मात्र नक्कीच नाही.

देह हा इंद्रियसुखाचे साधन नसून तो वेदांचे रक्षण करण्यासाठी, वेदांनीच सांगितलेल्या धार्मिक कृत्यांचे पालन करण्याचे साधन आहे आणि मानवकल्याणाकरिता वेदांचे रक्षण केलेच पाहिजे असे ब्राह्मणांनी मानले पाहिजे. इंद्रियसुखाची भूक ज्यामुळे भडकेल असे काहीही ब्राह्मणाच्या देहास देता कामा नये असा मूलधर्म आहे. ब्राह्मणांच्या हातून मुळात जर काही चूक झाली असेल तर ती ही की ज्या त्यागवृत्तीमध्ये ब्राह्मणांचा धर्म ओतप्रोत भरलेला होता त्या त्यागवृत्तीचे त्याला विस्मरण झाले आणि तो नव्या यंत्रतंत्रामुळे, सहजतेने उपलब्ध झालेल्या आरामदायक सुविधांना बळी पडला. प्रतिकूल परिस्थितीत असताना देखील स्वधर्माचे पालन करणे ही गर्व करावी अशी गोष्ट आहे. ब्रिटिशांच्या सत्ताकाळात अशा तऱ्हेने न वागणे ही ब्राह्मणांनी केलेली फार मोठी चूक होती आणि त्या चुकीची फळे आम्ही भोगत आहोत. आज देशातील एकाच आईच्या मुलांतील वैरभावना पाहा. आम्ही इतरांना देखील क्लेश दिले आहेत. प्रथमतः ब्राह्मणांना महाविद्यालयातून प्रवेश व नोकऱ्या नाकारल्या गेल्या. आता काळ असा आला आहे की अन्य जातींच्या वाट्याला तीच स्थिती येत आहे.

यंत्रांची मदत नसताना देखील आपल्या नैसर्गिक साधनसामुग्रीचा उपयोग करून मनुष्य साधेपणाने जगत होता तोपर्यंत त्याचे जीवन किती सुखाचे होते. अधिकाधिक कारखाने वाढल्यानंतर आणि यंत्रबळाचा वापर अधिक प्रमाणात होऊ लागल्यावर जीवन अधिक जटिल-गुंतागुंतीचे झाले. आज तर अशी परिस्थिती निर्माण झाली आहे की महाविद्यालयात प्रवेश मिळविणे किंवा नोकरी मिळविणे ह्या समस्येला प्रत्येकालाच तोंड द्यावे लागत आहे.

लोक मला विचारतात, 'आज ह्यावर उपाय काय? सर्व ब्राह्मणांनी आता त्याच्या नवीन जीवनाचा त्याग करून आपल्या मूळ वैदिक अध्ययनाकडे परतावे असे तुम्हास वाटते काय'? त्यांनी असे करावे की करू नये ह्याविषयी माझी अपेक्षा काय आहे? किंवा आता त्यांना तसे करणे शक्य आहे की नाही? मी मात्र त्यांना 'वैदिक धर्माकडे परत या' असेच म्हणेन. मी माझे तोंड बंद करून जे जे घडते आहे आणि सर्वांचा आधार असलेला धर्म धोक्यात येत असलेला स्वस्थपणे पाहू लागलो तर ज्या आसनावर मला आचार्य म्हणून प्रतिष्ठापित करण्यात आले आहे, त्या गुरुपीठाची तरी काय आवश्यकता? ज्या धर्मात आपण जन्म घेतला त्या वैदिक धर्माकडे ब्राह्मणांचे परत फिरणे अशक्यप्राय दिसत असले तरी ते प्रत्यक्षात आणणे शक्य आहे, हे दाखवून दिले पाहिजे आणि 'मठ' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संस्थांचे हेच प्रयोजन आहे. हे उद्दिष्ट प्राप्त करण्यासाठी मठांनी आपली सर्व शक्ती पणास लावली पाहिजे.

सत्याग्रहाने गोरे ब्रिटिश हा देश सोडून जातील ह्या कल्पनेचे, स्वातंत्र्यप्राप्तीच्या

संघर्षकाळात अनेकजणांना आश्चर्य वाटत असे, पण अशक्यप्राय वाटणाऱ्या अनेक गोष्टी ह्या विश्वात घडल्या आहेत.



ब्राह्मणांचे पुन्हा आपल्या वैदिक धर्माकडे परतणे अशक्यप्राय आहे असे मी तरी म्हणणार नाही आणि तसे मी म्हणणे हे आपल्या धर्माच्या विरुद्धच आहे. ते प्रत्यक्षात उतरविणे किंवा ते अशक्य ठरविणे दोन्ही तुमच्याच हातात आहे. परंतु धर्मशास्त्राच्या संदेशाचे तुम्हाला स्मरण करून देत राहणे, एवढेच माझे काम आहे.

-----

# ब्राह्मण इतके तरी करू शकतात

वर्तमान हिंदू समाजात परिवर्तन येईल किंवा न येईल किंवा त्यात परिवर्तन आणता येईल किंवा न येईल, परंतु वेदाध्ययन हाच ज्यांचा जीवन-श्वास आहे असा एक वर्ग असणे नितांत आवश्यक आहे. तथाकथित ब्राह्मण जातीच्या अस्तित्वाविषयीची मला चिंता आहे म्हणून मी हे बोलत नसून, अशी एखादी जात असली आणि ती केवळ आपल्या स्वार्थासाठीच जगत असेल तर जातीपासून काहीच लाभ नाही. ब्राह्मण म्हणविल्या जाणाऱ्या जातीचे अस्तित्व असायलाच हवे असेल तर ते मानवकल्याणासाठीच असायला हवे. वेदांचे प्रयोजन, वेदध्वनीचे प्रयोजन विश्वकल्याण हेच आहे. इथून पुढे निदान जो वेदपठण करीत नाही असा एकही ब्राह्मण नसावा असे जे मला वाटते त्याचे कारण हेच आहे. या विश्वातील सर्व अमंगलावरील, सर्व समस्यांवरील एकमात्र उपाय कोणता असेल तर तो ब्राह्मणांनी पुन्हा आपल्या वैदिक धर्माकडे परतणे हाच होय.

या संदर्भात ब्राह्मणांकडून किमानपक्षी काय अपेक्षित आहे ते मी तुम्हाला सांगतो. आपल्या धर्माकडे परतण्यासाठी आवश्यक असलेले धैर्य किंवा त्यागाची भावना या दोन्हीही गोष्टी ब्राह्मणांजवळ नाहीत. या वास्तवतेकडे डोळेझाक करायला मी तयार आहे. परंतु आपल्या मुलांना तरी हे कार्य करण्यास ते सिद्ध करू शकतात. वेदांचे ज्ञान नसलेला एकही ब्राह्मण पुढील पिढीत असता कामा नये आणि आपली मुले या पवित्र वेदविद्येचे अध्ययन करतील याची तुम्ही खातरजमा केली पाहिजे.

तुम्ही आपल्या मुलांना केवळ वैदिक ब्राह्मण करावयाच्या विरुद्ध असाल (वैदिक ब्राह्मण म्हणजे जो वेदविद्येत पारंगत आहे पण ब्राह्मण जमातीमध्येच ज्याच्याकडे दुःस्थितीत असलेला म्हणून अवहेलनेच्या भावनेने पाहिले जाते असा भिक्षुक) आणि त्याने तुमच्याप्रमाणेच सुखाचे जीवन (ज्याला तुम्ही आरामाचे जगणे समजता) जगावे म्हणून तुम्ही उत्सुक असाल तर तुम्हाला पुढील सूचना करण्यासाठी एक पायरी मी खाली यावयास तयार आहे. तुमच्या मुलांनी आपल्या जीवनाचा कायमस्वरूपी व्यवसाय म्हणून वेदांचे शिक्षण घ्यावे असे तुम्हाला वाटत नसेल व त्यांनी कचेरी किंवा कारखान्यात काम करावे किंवा डॉक्टर, इंजिनियर इत्यादी होण्यासाठी आधुनिक शिक्षण घ्यावे असे तुम्हाला वाटत असेल तर त्याही बाबतीत मी तुमच्याशी सहमत होईनही, परंतु तुमचा मुलगा आठ वर्षांचा असताना त्याचा उपनयन संस्कार करा. (उपनयन संस्काराची सविस्तर माहिती भाग १७ मध्ये दिली आहे) व त्याच्या शाळेच्या वेळेनंतर रोज एक तास वेदशिक्षणाच्या संध्याकाळच्या वर्गात पाठवा असे मी म्हणेन. अशा पद्धतीने दहा वर्षे त्यांना वेदांचे

शिक्षण दिले जावे.



वेदपरंपरेचे रक्षण करण्यासाठी ब्राह्मण इतके तरी करू शकतात. मुलांना वेद शिकविण्याचे काम प्रत्येक ब्राह्मणाने आपल्या घरातच करावे. कारण इतक्या साऱ्यांना शिक्षण देण्यासाठी आमच्याजवळ पुरेसे वेदशिक्षक नाहीत हे मला ठाऊक आहे व ही आमच्या धर्माची दुरवस्था आहे असेच मी म्हणेन. हे तथ्य आणि आर्थिक स्थिती विचारात घेता मला असे सुचवावेसे वाटते की सर्व मुलांना वेदांचे शिक्षण देण्यासाठी वेदांचे वर्ग एका वसाहतीत किंवा शेजारच्या ठिकाणी एकत्रितपणे चालविले जावेत. गरीब मुलांना वेदांचे शिक्षण सहकारी तत्त्वावर दिले जावे.

याप्रमाणे मुलांना क्रमशः वेदांतील मंत्रांचा भाग, ज्याला 'संहिता' म्हणतात ती, अवगत होईल व उपकर्मासारखी धार्मिक कृती करताना ते तिचा प्रयोग करू शकतील. येथे मी प्रयोगाबद्दल म्हणजे धार्मिक कृत्ये करण्याविषयीच्या प्रक्रियेबद्दल बोलतो आहे. कारण भविष्यकाळात पुरोहित न मिळाल्यास ब्राह्मणांना आपली वैदिक कर्मे स्वतःचे स्वतःच करता आली पाहिजेत.

येणाऱ्या संपूर्ण काळात हे विश्व वेदध्वनींनी व्यापले जायला हवे. हे ध्येय पूर्ण होण्यासाठी प्रत्येकाने प्रामाणिकपणे काम करायला हवे. केवळ ब्राह्मण जातीचे किंवा भारतातील सर्व जाती जमातींचेच नव्हे तर या पृथ्वीवरील संपूर्ण प्राणिमात्राचे कल्याण होईल ह्याची खात्री करणे हे तुमचे कर्तव्य आहे. हे ईश्वराने तुम्हांवर सोपविलेले कर्तव्य-दिव्य कर्तव्य आहे.

सांप्रत, विद्यमान लोकांचे आम्ही देणे लागतो म्हणून हे काम करणे महत्त्वपूर्ण आहे. इतकेच नव्हे तर येणाऱ्या पिढ्यांबाबत देखील आमच्या हातून अपराध घडू नये म्हणून हे काम तितकेच महत्त्वाचे आहे. तुम्ही म्हणाल की नाहीतरी कोणालाच वेदांची पर्वा नाही तर येणाऱ्या पुढील काळात तरी वेदांची पर्वा कोण करणार आहे? मग आज आम्ही वेदांचे अध्ययन अद्ययावत ठेवण्याचा प्रयत्न करून काय उपयोग? मी या विचारांशी सहमत नाही. चाक फिरत असताना आज त्याचा जो भाग खाली आहे तो उद्या निश्चितच वर येणार आहे. आधुनिक सुधारणांची संस्कृती ही आपल्या उन्मत्त वेगाबरोबरच पराकोटीला पोहोचताच निश्चितपणे तिचे अधःपतन होणार आहे. प्रगत वैज्ञानिक तंत्रज्ञानाने उपलब्ध करून दिलेल्या तथाकथित सुखांनी आम्ही भरकटलो आहोत. पण एक दिवस आम्हांला कळून येईल की ही सुखे आम्हांला पूर्णत्वाची भावना देऊ शकत नाहीत आणि आम्ही खरोखर त्या सुखातून आमच्यासाठी केवळ दुःखेच निर्माण केली आहेत.

हे सिद्ध करण्यासाठी अमेरिकेचेच उदाहरण पुरेसे आहे. आपण परिपूर्ण ऐश्वर्य मिळविले आहे असे तेथील लोक मानत असूनदेखील त्यांच्या मनात मात्र अपूर्णतेची भावना आहे. आधुनिक सुख- सुविधांनी निर्माण केलेली अशांती दूर करण्यास ते उत्सुक आहेत. ज्या अमेरिकी लोकांच्या मनात थोड्या फार प्रमाणात का होईना पण जागृती निर्माण झाली आहे ते वेदान्त, योग, भक्तिसंगीत इत्यादीकडे आकर्षित झाले आहेत. इतर लोक कसेतरी इंद्रियसुखोपभोग विसरू पाहत आहेत. मग ते नशेचे पदार्थ घेऊन तंद्रीत बुडून जात आहेत.

हा विनाश आपल्या देशावर सुद्धा ओढवेल. भौतिक सुखांची चव घेण्याचा आम्हांला नेहमीच मोह पडत आला आहे आणि जोपर्यंत ती चटक पूर्ण होत नाही तोपर्यंत आम्हांला चैन पडत नाही. चोथा होईपर्यंत सुखांचा उपयोग घेतल्यानंतर ती सर्व सुखे अशाश्वत आहेत हे आम्हांला कळून येते आणि ह्याच क्षणी आम्ही आत्मशोधाकडे वळतो. अविनाशी आनंदाचा शोध घेऊ लागतो. वेदसंमत आचरणातून समाजाला शांतीचा आणि समरसतेचा लाभ झाला होता हे कळून आल्यावर वैदिक मार्गाने वाटचाल करण्यास आम्ही उत्सुक होऊ. युगानुयुगे, पिढ्या-पिढ्यांतून चालत आलेल्या वेदांच्या अभ्यासाशी आम्ही चालू पिढीचा संबंध तोडू तर पुढच्या पिढीला वेदाध्ययनाची संधी नाकारण्याचा आमच्या हातून अक्षम्य गुन्हा घडेल. आम्ही हे ध्यानात ठेवले पाहिजे की वेद हे मुखोद्गत करून एका पिढीकडून दुसऱ्या पिढीला सोपविले गेले आहेत.

वेद आणि यज्ञ या विषयांवर भारतीय आणि विदेशी विद्वानांनी लिहिलेले अनेक ग्रंथ खंडामागून खंड प्रकाशित होत आहेत. यावर असे सुचविले जाईल की ''पुढील पिढ्यांतील लोक हे ग्रंथ वाचून नक्कीच वेदांचा अभ्यास करतील''.

यावर बोलण्यापूर्वी मी दुसऱ्याच एका प्रश्नाचे प्रथम उत्तर देतो, जो प्रश्न थेट वेदपरंपरेच्या गाभ्यालाच स्पर्श करणारा आहे. तो प्रश्न असा आहे की वेदांचा ध्वनी जगाचे रक्षण करतो असे तुम्ही म्हणता त्याचा अर्थ काय? मंत्र हे शब्दांच्या रूपातून प्रकट झालेले विशिष्ट ध्वनिरूप आहेत. या शब्दांचा स्वतःचा असा गहन अर्थ आहे. आम्ही ग्रंथांद्वारे मंत्र आणि त्यांचा अर्थ शिकू शकत नाही का? वेदपठण करण्यासाठी एका विशिष्ट जातीची काय आवश्यकता? वेदांच्या अर्थाचे जतन करावयाचे तर ही पुस्तके असताना चिंता करण्याचे काय कारण? एका विशिष्ट जातीवर वंशपरंपरेने या वेदग्रंथांचे रक्षण करण्याचे काम सोपविण्याची गरजच नाही. वेदांच्या अर्थाचा प्रश्न बाजूला ठेवला तरी वेदस्तोत्रांचे पठण करून पुरातन काळापासून ज्या ध्वनिरूपात वेद आमच्यापर्यंत आले त्याच रूपात त्यांचे जतन करण्यासाठी एक विशिष्ट वर्गच का असावा या प्रश्नाचे उत्तर द्यायलाच हवे.

-----

प्रकरण - ८

# वेदांचे जतन-रक्षण : संपूर्ण जन्माचे धर्मकार्य का आहे

(या प्रकरणात ध्वनीचे भौतिक व आध्यात्मिक ज्ञानात्मक प्रतिपादन केले आहे.)

जर श्रमाची विभागणी संपूर्ण समाजाच्या कल्याणासाठी वंशपरंपरेच्या आधारावर केली गेली आहे, तर वेदांचे जतन-रक्षण करणे या ब्राह्मणांच्या व्यवसायाचा विशेष लाभ तो कोणता? असा प्रश्न वारंवार विचारला जातो.

कुंभार तुमच्यासाठी मडकी-गाडगी तयार करतो, धोबी कपडे धुतो, विणकर वस्त्रे विणतो, गवळी दूध आणून देतो, तुम्हाला जेवणात भात मिळावा म्हणून शेतकरी शेतात राबतो. दुसऱ्याच्या जीवनासाठी आवश्यक असलेल्या वस्तू मिळाव्यात म्हणून प्रत्येकजण काही ना काही काम करतो. शेतकऱ्याने शेतात पिकविलेला गहू किंवा तांदूळ आपले भरण-पोषण करतो. विणकराने विणलेल्या वस्त्रांनी आपले लज्जारक्षण होते. ती वस्त्रे आपल्याला हिवाळ्यात ऊब देतात. गवळी दूध आणून देतो, ते आपण पितो व त्याचे ताक करतो. कुंभाराने केलेल्या भांड्यात आपण अन्न शिजवितो. यावरून हेच दिसून येते की समाजाला उपयुक्त असे पदार्थ सर्व जातीचे लोक पुरवितात. या संदर्भात ब्राह्मणाचा सहभाग काय आहे? वर्णधर्माचा पाया असलेल्या शास्त्रांनी ब्राह्मणांवर कोणते कार्य सोपविले आहे?

आपले शिक्षक करीत असलेल्या वेदपठणाचे श्रवण करून ब्राह्मणांनी वेद शिकावेत. हेच अध्ययन होय. वेदांचे श्रवण करणे हे जसे वेदांचे अध्ययन करणे आहे, तसेच वेदपठण करणे हेच वेदांचे अध्यापन आहे. याशिवाय शास्त्रांनी वैदिक यज्ञासहित विविध धार्मिक कृत्ये करण्याचे काम ब्राह्मणांवर सोपविले आहे.

वेदामध्ये उन्नत स्वरूपाची सत्ये समाविष्ट आहेत. वेदातला हा आशय अत्यंत पोषक असा आहे हे आधुनिक काळातील लोकांना माहीतही नसेल. समाजाला ज्ञान, कला इत्यादी आवश्यक आहे. वेद हे ज्ञानाचे भांडार आहे. म्हणूनच वेदात असलेल्या सत्य-तत्त्वज्ञानाचा प्रचार, प्रसार करण्यासाठी एक विशिष्ट वर्ग आवश्यक आहे हा विचार पूर्णपणे तर्कसंगत वाटतो. शास्त्रांच्या मतानुसार वेदग्रंथांचे ध्वनिरूप जतन करण्यासाठी एका विशिष्ट वर्गाची आवश्यकता आहे. हा विशिष्ट वर्ग ब्राह्मणांचा असून तो वेदांचे जतन व वैदिक कर्मे वंशपरंपरेने करीत आला आहे. वेदात प्रतिपादन केलेली सत्ये ही मानवासाठी कल्याणकारक आहेत, हा विचार अनेकजणांना मान्य होईल, परंतु एक लहानसा वर्गसमूह वेदांचे ध्वनिस्वरूप जतन करून जगासाठी कल्याणाचे कार्य करीत

आहे या गोष्टीवर मात्र त्यांचा विश्वास बसत नाही. शेतकऱ्याने शेते पिकविली नाहीत आणि कुंभार, सुतार इत्यादी लोकांनी आपआपली कामे केली नाही तर समाजाचे काम अडते. पण ब्राह्मण करीत असलेल्या कार्याबद्दल तुम्ही असे म्हणाल का? ब्राह्मणांनी वेदांचे पठण करायचे थांबविले तर समाजजीवनात काय फरक पडतो?

वरील प्रश्नांची उत्तरे समजून घेण्यापूर्वी प्रथम आम्ही वेदांचे स्वरूप जाणून घेतले पाहिजे. या विषयाचा केवळ बौद्धिक स्तरावर विचार करून कोणताही हेतू साध्य होणार नाही. ज्या लोकांच्या हृदयात खोलवर वेदांचे ज्ञान आहे त्यांचे वेदांबद्दलचे मत आपण स्वीकारले पाहिजे. 'आम्ही ते कसे करू शकू महाराज?' असा काही लोक विरोध करतील आणि म्हणतील, 'आम्ही तर्कनिष्ठ माणसे आहोत व कोणतेही सत्य किंवा विधान केवळ तर्कसंगत असल्यास किंवा प्रत्यक्ष ज्ञान झाले तरच ते आम्हांला पटते.'

यावर आम्ही काय करावे? सर्व विषय मानवाच्या तर्कज्ञानाच्या क्षेत्रात आणले पाहिजेत असे कोणी कसे म्हणू शकतो? उदाहरणार्थ असे पाहा की भौतिकशास्त्रज्ञाने त्याच्या प्रयोगशाळेत केलेले प्रयोग एखाद्या गायीला कळू शकतील काय? एखाद्या शास्त्रज्ञाने प्रयोगाच्या साहाय्याने काही सिद्धान्त सूत्रबध्द केले तर हे भौतिकशास्त्राचे सिद्धान्त अस्तित्वातच नाहीत असे ती गाय म्हणू शकते काय? परंतु भौतिकशास्त्राचे ज्ञान नसलेल्या माणसांना हे सिद्धान्त कसे ठाऊक असतात? तर हे ह्या विषयात सिद्धान्त पारंगत असलेल्या व्यक्तींनी मांडलेल्या विचारावर विश्वास ठेवतात.

हा विचार स्पष्ट करण्यासाठी कोणत्याही शास्त्रीय उपकरणाचे उदाहरण घेऊ या. ते उपकरण विज्ञानाच्या विशिष्ट तत्त्वांवर चालते आहे असे तुम्हास सांगितले गेले. ते उपकरण कसे चालते आहे याचे निरीक्षण करून तुम्ही त्या उपकरणाच्या संचालनाची सांगितली गेलेली तत्त्वे मान्य करता. अगदी याच पद्धतीने शास्त्रांच्या आज्ञांचे कठोरपणे पालन करीत जीवन जगणाऱ्या महान व्यक्तींनी वेदांविषयी प्रकट केलेल्या मतांवर आपण विश्वास ठेवला पाहिजे. त्याचप्रमाणे आपल्या वेदग्रंथापासून मिळणारे फळ किंवा त्यापासून होणाऱ्या प्रत्यक्ष लाभाच्या आधारावर आपण आपल्या धर्मग्रंथावर विश्वास ठेवला पाहिजे. आजही आम्ही सर्वजण पाहू शकतो या धर्मग्रंथांचे एक 'फळ' आहे आणि ते म्हणजे 'हिंदू धर्म'; जो गेल्या सहस्रावधी वर्षांच्या कालखंडातील सर्व आव्हाने झेलून उभा आहे. आमच्या धर्माने अन्य कोणत्याही धर्मापेक्षा अधिक महान व्यक्तींना जन्म दिला आहे. वैदिक परंपरेवरील श्रद्धेचे फळ म्हणून लोकांना आंतरिक परमोच्च आनंदावस्था प्राप्त झाली आहे. जगाच्या पाठीवरील प्रत्येक गोष्ट तर्क किंवा प्रत्यक्ष अनुभूतीच्या कक्षेत आली पाहिजे असा त्यांचा आग्रह नव्हता.

मानवी ज्ञानाच्या सीमा ओलांडून ऋषि-मुनी हे वैश्विक सत्याशी एकरूप झाले होते

आणि त्यांच्याच द्वारे विश्वाला वेदमंत्र प्राप्त झाले. ही आमच्या धर्माची मूलभूत संकल्पना आहे. या द्रष्ट्या ऋषिमुनींनी घालून दिलेल्या आदर्शांपासून मानव आत्मिक शक्ती प्राप्त करू शकतो हेच तुम्हास मान्य नसेल तर या विषयावरील पुढील सर्व बोलणेच निरर्थक ठरेल. कोणी तुम्हाला अशीही मोठी माणसे दाखवतील ज्यांच्याकडे तुम्ही काही अपेक्षेने पाहू शकता, अशी मोठी माणसे ज्यांनी पूर्णत्वाला पोहोचून काही शक्ती प्राप्त करून घेतल्या. परंतु त्या सामान्य जनासाठी वाटून घेतल्या नाहीत. त्या व्यक्तींना जर तुम्ही फसविणारे भोंदू किंवा भ्रष्ट म्हणाल तर पुन्हा एकदा यावर बोलणे निरर्थक ठरेल. आमच्या सांप्रतच्या मर्यादित आकलनाच्या स्थितीत, मानवी तर्क आणि आकलनाच्या पलीकडे असलेल्या काही गोष्टींचे अस्तित्व नाकारणे म्हणजे आपल्या बुद्धिशून्यतेची कमाल होऊन आपणच आपला घात करून घेण्यासारखे होईल.

मनोरंजन करणाऱ्या राजकीय सभांना जायचे सोडून तुम्ही माझे प्रवचन ऐकायला येथे आला आहात. तेव्हा तुमच्यापैकी काहीजण निश्चितच बुद्धिवादी आहेत असे मला वाटते. म्हणूनच काळाने मान्य केलेल्या परंपरेनुसार वेदांचे रक्षण का करावयास हवे याविषयी मी बोलल्यास तुम्ही ते ऐकून घ्यायला नाही म्हणणार नाही. तुमच्यापैकी काहीजण बुद्धिवादी असले तरी हे स्वामीलोक काय म्हणतात ते तरी ऐकू या असेही तुम्हाला वाटत असेल.

वेदांच्या ध्वनीला इतके अधिक महत्त्व का दिले जाते ते बऱ्याच लोकांना समजत नाही. ध्वनी कोठून उगम पावतो किंवा तो कसा निर्माण होतो? जेथे कंपन आहे, गती किंवा हालचाल आहे तेथे ध्वनी निर्माण होतो. हे पूर्णपणे तर्कविज्ञानाच्या सिद्धांतानुसार आहे. अनेक प्रकारच्या कंपनातून वाणी निर्माण होते. आपण कानांच्या द्वारे ध्वनी ऐकतो. पण काही ध्वनी असे आहेत जे विद्युतलहरीत रूपांतरित केले जातात, ते आपण ऐकू शकत नाही. हे आपल्याला रेडिओ व टेलीफोनच्या कार्यप्रणालीवरून कळू शकते. आपणास जे ऐकू येते किंवा आकलन होते त्या वास्तविक विद्युतलहरी असतात. माणूस जे जे ऐकतो आणि पाहतो, ते त्याच्या मेंदूच्या साहाय्याने, या सर्व विद्युतलहरींमुळे, याचे विज्ञानाला ज्ञान झाले आहे.

भूसमूह, पर्वत, नद्या, समुद्र इत्यादी असंख्य जड वस्तू या जगात आहेत. तसेच अनेक प्रकारचे सचेतन घटकपण येथे आहेत. हे सर्व अचेतन, सचेतन कशातून तरी निर्माण झाले असणार. सृष्टिनिर्माणाचे वेळी हे 'काहीतरी' अनेक प्रकारे कंपित झाले असणार आणि जे जे आम्हांला आज दिसते आहे ते त्यातून उत्पन्न झाले असणार. सर्व गतींना जर ध्वनी आहे तर निर्माणाच्या पूर्वी अनेक प्रकारचे ध्वनी निर्माण झाले असणार. या सृष्टिनिर्माणात प्रत्येकजण एकमेकाला आधार देतो. या परस्पर आधार देण्याच्या

प्रक्रियेत विभिन्न हालचाली होऊन त्यातून ध्वनी निर्माण झाले असणार. कंपने फक्त स्थूलाच्या हालचालीतून निर्माण झाले असतील असे समजण्याची आवश्यकता नाही. विज्ञानाने शोध लावला आहे की आमची विचारप्रक्रिया देखील विद्युत्प्रवाह किंवा उर्जेचाच एक प्रकार आहे. प्रत्येक विचारप्रक्रिया ही विद्युतप्रवाह किंवा ऊर्जा असल्याने तीतून कंपन आणि ध्वनी निर्माण होतो. हा ध्वनी अत्यंत सूक्ष्म असल्याने तो आपल्याला कानांनी ऐकता येत नाही. ज्याप्रमाणे सूक्ष्म जंतू आपल्याला चर्मचक्षूंनी पाहता येत नाहीत त्याप्रमाणे असे अनेक ध्वनी आहेत जे आपल्याला केवळ श्रवणेंद्रियांनी ऐकता येत नाहीत. विज्ञानाच्या मते प्रत्येक शारीरिक किंवा मानसिक हालचालीतून ध्वनी निर्माण होतो.

प्रत्येक हालचाल स्वतःचा असा ध्वनी निर्माण करते; ही संकल्पना दुसऱ्या शब्दांत याप्रमाणे मांडता येईल. विशिष्ट ध्वनी निर्माण करण्यासाठी विशिष्ट हालचाल निर्माण करावयास हवी. शास्त्रीय संगीत गाणाऱ्या गायकाचे उदाहरण घ्या. त्याच्याप्रमाणे जलद गतीने तराणा म्हणावयाचा झाला तर तो ज्याप्रमाणे कंठात कंपने निर्माण करतो तशी कंपने तुम्हाला तुमच्या कंठात करता आली पाहिजेत.

ध्वनी आणि कंपने (किंवा गती) एकत्रच निर्माण होतात. स्थूल वस्तुने वा मानसिक अवस्थेतून कंपने निर्माण होतात. तेव्हा सृष्टीची निर्मिती ध्वनीतून झाली आहे हा निष्कर्ष आपण काढू शकतो. विज्ञानाने देखील ह्या पुरातन संकल्पनेची पुष्टी केली आहे.

सृष्टिनिर्माणाशी अनेक विषय जोडलेले आहेत. विचार आणि हालचाली व त्यांच्याशी संबंधित ध्वनी यांनी अवकाश भरलेले आहे. हातांची टाळी वाजविण्याने निर्माण होणाऱ्या ध्वनीचे पुढे काय होते? तो ध्वनी अवकाशात भरून राहतो. चांगल्या आणि वाईट कृती आणि त्यांच्या समवेत होणाऱ्या हालचालींचा आपला स्वतःचा ध्वनी असतो. या उलट अशा प्रकारच्या हालचालींतून जे निर्माण होते त्याचा परिणाम चांगला किंवा वाईटच असला पाहिजे. माणसात चांगले विचार निर्माण करण्यासाठी चांगल्या कृती निर्माण केल्या पाहिजेत. त्यांच्याशी संबंधित ध्वनी निर्माण केले पाहिजेत. आपण जर असे ध्वनी निर्माण करू शकलो तर चांगले विचार माणसांची मने व्यापून टाकतील. मानवकल्याणासाठी अशा चांगल्या विचाराहून अधिक कशाची आवश्यकता आहे? वेदमंत्रांत, त्या ध्वनीत माणसाच्या मनात चांगले विचार निर्माण करण्याची शक्ती आहे.

अजून एक गोष्ट. जीवित राहण्यासाठी आम्हांला अन्नाची आवश्यकता असते आणि अन्न पिकण्यासाठी पर्जन्य आवश्यक आहे. ढग निर्माण होणे व त्यांच्यातून जलवर्षाव होणे हे विशिष्ट कंपनांवर अवलंबून असते. पर्जन्यवृष्टी ही एका विशिष्ट ध्वनीच्या निर्माण होण्यावर आणि त्यापासून निर्माण होणाऱ्या विशिष्ट कंपनावर अवलंबून असते. हेच तत्त्व

जीवनातील आपल्या अन्य सर्व गरजांना लागू होते. ध्वनीमुळे अनावश्यक आणि अनिष्ट घटकही निर्माण होतात हेही सत्य आहे. परंतु संपूर्ण विश्वात मंगल निर्माण करणे हाच वेदध्वनींचा एकमात्र उद्देश आहे.

परंतु ध्वनी आणि कंपने स्वयंस्फुरणाने निर्माण होतात का? नाही. जर कंपने स्वतः होऊन निर्माण होऊ लागली तर ती दोषपूर्ण असतील. क्षोभ निर्माण करणारी व एकमेकाशी संबंधित नसतील. पण आपण या सृष्टिचक्राच्या फिरण्यात एक व्यवस्था असल्याचे पाहतो. त्यातील एक घटक दुसऱ्याशी जोडलेला आहे. यातून आपण कोणता निष्कर्ष काढू शकतो? हाच की ही जी सूत्रबद्धता आपण पाहतो आहोत ती एका श्रेष्ठ प्रज्ञाप्रणालीने निर्माण केली असून ही व्यवस्था तिने आपल्या स्वतःच्या कंपनातूनच निर्माण केली आहे.

वेद हे या श्रेष्ठ प्रज्ञाव्यवस्थेच्या, आत्मिक ज्ञानाच्या कंपनातून उत्पन्न झालेले ध्वनी आहेत. त्यामुळेच आमचा विश्वास आहे की वेदातले मंत्र हे प्रत्यक्ष परमात्म्याचे सर्जन आहे. विश्वकल्याणासाठी अशा ध्वनींचे आपण विशेष सावधानतेने रक्षण केले पाहिजे. होय, वेदमंत्र ही विश्वकल्याणासाठीची ध्वनिमालिका आहे.

या विषयावर काही शंका निर्माण केल्या जातात. लोक असे म्हणतात की आम्ही वेदातले मंत्र स्पष्टपणे ऐकू शकतो, परंतु अवकाशातले निर्माणाचे ध्वनी आम्हाला ऐकू येत नाहीत, मग हे दोन्ही ध्वनी एकच कसे असू शकतील?

'ब्रह्मांडी वसे ते पिंडी दिसे' अर्थात जे ब्रह्मांडात आहे तेच व्यक्तिमात्रात उपस्थित आहे. ब्रह्म हे त्याची प्रतिकृती असलेल्या विश्वात उपस्थित आहे हे आपल्या सामान्य बुद्धीला पटण्यासारखे नाही. परंतु नास्तिकासह सर्व लोक हे मान्य करतात का? इंद्रियांच्या रूपात आपल्या शरीरात जी साधने आहेत त्यांना ब्रह्मांडातील विषयाचे ज्ञान होऊ शकते. ब्रह्मांडातील सूर्याचे ज्ञान आपल्या देहाला उष्णतेच्या रूपाने होते. बागेतील फुलाचे ज्ञान त्याच्या सुवासाने होते. उसाच्या गोडीची चव आपणास जिभेमुळे कळते. एखादी वस्तू लाल रंगाची तर दुसरी वस्तू पिवळ्या रंगाची आहे हे आपणास डोळ्यांमुळे कळते.

विश्व आणि ब्रह्म हे एकाच पदार्थापासून तयार झालेले नसते तर एकास दुसऱ्याची जाणीव होणे संभवले नसते. अन्यथा जीवनाचे संचालनही खरोखरच शक्य झाले नसते. एक पाऊल आपण पुढे जाऊ तर आपणास हे सत्य कळून येईल की ब्रह्म आणि विश्व हे केवळ एकाच पदार्थापासून तयार झालेले नाहीत तर एकच पदार्थ स्वतः ब्रह्म आणि विश्व झालेला आहे. योगी पुरुषांना प्रत्यक्ष अनुभूतीतून या सत्याचे ज्ञान असते.

जे जे काही अवकाशात आहे ते सर्व व्यक्तिमात्रात आहे. ही मूलद्रव्ये मानवाच्या देहात असून ती इंद्रियग्राह्य अवस्थेत आहेत. मनुष्य जो ध्वनी आपल्या कंठातून निर्माण करतो, त्याचा उगम आम्हाला ऐकू न येणाऱ्या लहरीत असतो. विकिरणे (रेडियो) विद्युत्लहरींचे ध्वनिलहरीत रूपांतरण करतात. जर मनुष्य अवकाशातील ध्वनींचे ग्रहण करून ते श्रवणयोग्य करू शकला तर तो विश्वकल्याणासाठी आवश्यक ते करू शकेल. योगी पुरुषास योगसाधनेने (पूर्णत्वाच्या साधनाने) विश्व काय आहे याचे ज्ञान होते व तो ती विश्वानुभूती ब्रह्मानुभूतीत पोहोचवू शकतो. मानवाला आपल्या तर्कशक्तीने जो ग्रहण करता येईल असा या विषयात मी पुरावा देऊ शकणार नाही. योग हा आपल्या सीमित तर्कशक्तीच्या आणि आकलनाच्या अतीत आहे. मानवी आकलन आणि मन यांच्या अतीत असणाऱ्या विषयावर भाष्य करणे हेच वेदांचे प्रयोजन आहे.

सत्य जाणण्यासाठी एक तर तुमची महान व्यक्तींच्या सांगण्यावर श्रद्धा पाहिजे किंवा तुम्ही यम-नियमांचे कठोरपणे पालन करीत स्वतःच योगाचा अभ्यास केला पाहिजे. परंतु वेदाबद्दल जे कोणी प्रश्न विचारतात किंवा शंका उपस्थित करतात त्या सर्वांनाच वेद जाणण्यासाठी अशा प्रकारे योगाचा अभ्यास करणे प्रत्यक्षात शक्य नसते. आणि खरोखर जर तुम्ही योग्याच्या शब्दांवर श्रद्धा ठेवण्यास तयार असाल तर प्रथमत; तुम्हाला तो योगी पुरुष हा खरोखरच ज्ञान झालेला योगी आहे की ढोंगी आहे हे तुम्हाला कसे कळणार? याचाच अर्थ असा की तुमची काही बाबतीत तरी कोणावर तरी श्रद्धा ही असावयासच हवी. त्यानंतर तुमची ही श्रद्धा स्वतःच्या अवलोकनाने, तर्काधिष्ठित निष्कर्ष काढत, प्रत्यक्ष अनुभूतीवर बळकट होत जाईल. ज्यांच्या मनात श्रद्धा नाही किंवा स्वतःच्या अनुभूतीवर ती विकसित करण्याची ज्यांची तयारी नाही अशा लोकांच्या बाबतीत बोलणे केवळ व्यर्थ होय.

ब्रह्म आणि विश्व यांच्या एकरूपत्वाची अनुभूती ही एक अवस्था आहे. अशा प्रत्यक्ष अनुभूतीच्या अवस्थेला पोहोचलेले व 'ब्रह्म' चे सूक्ष्म रूप विश्वाच्या स्थूल स्वरूपात रूपांतरित करण्याचे सामर्थ्य असलेले महात्मे आहेत. अशा प्रकारच्या स्थितीच्या संभाव्यतेवर ज्यांचा विश्वास आहे त्यांच्याशी मी येथे बोलतो आहे.

आपण जेव्हा या विश्वाकडे व त्याच्या संचालनाच्या व्यामिश्र व्यवस्थेकडे पाहतो तेव्हा या विश्वाची निर्मिती आणि त्याचे अस्तित्व टिकविणारी संचालन व्यवस्था यांच्यामागे एक फार महान प्रज्ञाशक्ती असली पाहिजे हे आपणास पटते. आपण जे जे पाहतो ते ते सर्व काही आणि आपण ऐकतो ते सर्व ध्वनी त्या महान प्रज्ञाशक्तीपासून म्हणजेच परमात्म्यापासून निर्माण झाले आहेत. प्रथम ध्वनींचे विश्व आणि नंतर आपणास दृग्गोचर होत असलेले हे विश्व उत्पन्न झाले. खूपसे ध्वनिविश्व अद्यापही अवकाशात अस्तित्वात

आहे. जे काही बाह्य विश्वात अस्तित्वात आहे ते मानवाच्या देहात देखील उपस्थित आहे. आपल्या बाहेर जे अवकाश आहे ते आपल्या हृदयात देखील आहे. योगी जेव्हा समाधी अवस्थेत (म्हणजे अनंतात निमग्न) असतात तेव्हा त्यांना या हृदयाकाशाची अनुभूती येते. ही अवस्था म्हणजे इंद्रियातील अवकाश हे हृदयात सर्वव्यापक अवकाश होणे ही होय. योग्यांच्या या अवस्थेत बाह्य विश्व आणि अंतर्विश्व यांतील सर्व भेद लोप पावतात आणि हे दोन्हीही एक होतात. आता या अवस्थेत योग्यांना अवकाशातील ध्वनी ग्रहण करून मानवाला प्रदान करता येतात. या ध्वनींच्या पुनरुच्चारणातून जे विश्वाचे कल्याण करतात तेच वेदमंत्र होत.

हे वेदाचे मंत्र कोणा एका व्यक्तीची स्वतःची निर्मिती नव्हे. प्रत्येक मंत्राला जरी एखाद्या ऋषीचे किंवा मुनीचे नाव दिलेले असलेले तरी वस्तुतः ती त्याची स्वतःची निर्मिती नव्हे. आपण जेव्हा एखादा विशिष्ट मंत्र एका विशिष्ट ऋषीच्या नावाशी जोडतो तेव्हा त्याचा आपणास हा अर्थ अभिप्रेत असतो की तो मंत्र त्या ऋषीला प्रथमतः अवकाशात आरंभाशिवाय दृग्गोचर झाला व त्याने तो विश्वाला प्रदान केला. ऋषी या शब्दाचा मूलतः अर्थ 'मंत्रद्रष्टा' अर्थात ज्याला मंत्र दिसला, ज्याने मंत्र प्रकट केला असाच असून मंत्रकर्ता म्हणजे ज्याने मंत्र निर्माण केला असा नाही. आपले श्वसन कशा प्रकारे चालले आहे यावर आपले जीवन अवलंबून असते. त्याचप्रमाणे ब्रह्माचे संचालन वेदध्वनीच्या कंपनानुसार चालते. म्हणूनच वेदमंत्र हे परमात्म्याचे श्वसन आहे. म्हणून वेदाशिवाय ब्रह्म नाही असाच निष्कर्ष आपण काढला पाहिजे. वेद हे परमात्म्याप्रमाणेच 'स्वयंभू' आहेत असे दुसऱ्या शब्दांत सांगता येईल.

वेद हे ध्वनीच्या रूपाने विश्वाला शुभाशीर्वाद देत असतात, मग त्यांचा अर्थ कळला नाही तरी चालेल; हे वेदांचे वैशिष्ट्य आहे. अर्थात ते अर्थगर्भ असून आम्हांला ज्याचे प्रत्यक्ष ज्ञान होते त्यातून एकमेव सत्यच प्रकट होते असे ते सांगतात. मंत्रांच्या विभिन्न ध्वनींना अनुसरून अनुरूप अशा देवतांच्या स्वरूपात वेद आम्हांला आशीर्वाद देतात.

ध्वनी स्वतः कोणताही लाभ करून देत नाहीत, फळ देत नाहीत. केवळ ईश्वरच कल्याणकर्ता-हितकारक आहे. परंतु तो हे लाभ थेट स्वतः देत नसून, राजा किंवा देशाचा राष्ट्रपती ज्याप्रमाणे आपल्या आज्ञांचे पालन करण्यासाठी पदाधिकारी नियुक्त करून त्यांच्याकरवी आम्हाला लाभ करून देतो तद्वत मंत्र ध्वनींच्या रूपात विभिन्न देवतांचे प्रतिनिधित्व करतात. मंत्रांचे निरंतर पठण आणि ध्यान करून आपण मंत्रसिद्धी प्राप्त केल्यास त्या मंत्राची देवता आपल्या प्रत्यक्ष स्वरूपात प्रकट होऊन आपणास तिचे दर्शन झालेच पाहिजे. विशिष्ट मंत्रांचे पठण करून यज्ञाच्या अग्नीत हवन केल्यास यज्ञदेवता यज्ञाग्नीतून देखील प्रकट होतात. अशा प्रकारे यज्ञ केल्यास देवता आपणांस त्यांचे विशेष

आशीर्वाद देतात. आपण राज्याचे कर थेट राजास किंवा राष्ट्रपतीस देत नाही. त्याचप्रमाणे यज्ञयाग व वेदपठण करून विश्वकल्याणाकरता परमात्म्याच्या प्रतिनिधींना यज्ञाच्या माध्यमातून कर भरतो. ध्वनी हेच मंत्रांचे रूप आहे.

आपल्या काव्यमय स्वरूपाने वेद पाश्चात्त्य पंडितांच्या प्रशंसेचा विषय झाले. वेद आपणास अनेक देवतांचे समोरासमोर दर्शन घडवितात आणि त्यांच्या कृपेचा लाभही करून देतात. याखेरीज उपनिषदांच्या माध्यमातून ते आपणास आत्मविषयक सत्याचे ज्ञान करून देतात. याप्रकारे वेद हे त्यांच्यातील गहन सत्याबद्दल विख्यात आहेत. परंतु त्यांचा ध्वनी हाही काही कमी महत्त्वाचा नाही. खरोखरच वेदध्वनीचे स्वतःचे विशिष्ट स्वरूप व सामर्थ्य आहे. केवळ वेदमंत्रांतच नव्हे तर सर्वच मंत्रांत शक्ती आहे हे ध्यानात घेतले पाहिजे.

काही मंत्रांच्या ध्वनीला त्या मंत्रांच्या अर्थापेक्षा अधिक महत्त्व आहे. त्यांच्या पदांशाचे विशिष्ट पद्धतीने पठण केल्यास त्यापासून विशिष्ट ऊर्जा निर्माण होते. परंतु त्यांच्या अर्थाला विशेष महत्त्व नसते. विंचूदंशावर म्हटल्या जाणाऱ्या मंत्राचे उदाहरण पाहा. त्या मंत्राचे मांत्रिक म्हणतात की याला विशेष अर्थ नाही. खरे तर मांत्रिक म्हणतात की त्या मंत्राचा अर्थ सांगावयाचा नसतो. परंतु तो मंत्र म्हटल्याने वातावरणात त्याची कंपने निर्माण होतात आणि विंचवाचा दंश बरा होतो. असे आहे मंत्राच्या ध्वनीचे सामर्थ्य. ध्वनींचा प्रभाव विभिन्न मंत्रानुसार बदलत असतो. काही विशिष्ट मंत्र किंवा सूत्रांच्या पठणाने अनिष्ट करता येते. याला 'अभिचार' विद्या म्हणतात. जिला पश्चिमेकडे 'काळी जादू' असे म्हणतात. या सर्व प्रकारांत ज्या स्पष्टतेने मंत्राच्या पदांशाचे उच्चारण केले जाते त्याला महत्त्व आहे. 'बिलची शून्यम्' नावाने ओळखली जाणारी 'काळी जादू' करणाऱ्यात स्वतःचे दात वाजविण्याची पद्धती असे. परंतु ही 'काळी जादू' करणाऱ्यास दातच नसतील तर तो त्या मंत्रांचे योग्य उच्चारण करता न आल्याने त्याच्या मंत्राचा अपेक्षित प्रभाव होत नसे. ध्वनिसामर्थ्याचे हे सत्य आपणास पटले तर मंत्राच्या भाषेला महत्त्व राहत नाही आणि नंतर मंत्र हे आम्हाला कळणाऱ्या भाषेत असावेत हे म्हणणे निरर्थक होईल. पितर किंवा पित्याच्या स्मरणार्थ केल्या जाणाऱ्या श्राद्धविधीचे मंत्र इंग्लिश, तामीळ किंवा अन्य कोणत्याही संबंधित भाषेत म्हणावेत म्हणजे ते सोडून गेलेल्या पितरांस अधिक चांगले कळतील हेही म्हणणे निरर्थक ठरेल.

वेदमंत्र हे विश्वातील अखिल प्राणिमात्राचे कल्याण करतात यावर आपण श्रद्धा ठेवली पाहिजे. जे आम्हांला, आमच्या कानांनाही ऐकू येत नाहीत ते मंत्र ऋषींना कसे ऐकू येतात अशी शंका विचारणेही योग्य होणार नाही. अशा प्रकारे पाहण्याची आणि ऐकण्याची दिव्य शक्ती असते. आमचे पाहणे आमच्या डोळ्यांतील भिंगांवर अवलंबून

असते. डोळ्यांवर वेगळे भिंग लावताच आपण पाहतो ते वेगळे दिसू लागते. योगाच्या गाढ अभ्यासातून आपल्या पाहण्यात व ऐकण्यात योगी दिव्यशक्ती प्राप्त करू शकतो.

आपले मर्यादित अनुभव व तर्कशक्तीच्या आणि आकलनाच्या आपल्या सीमित क्षमतेमुळे खरे तर आम्ही वेदांबद्दल प्रश्न करू नये. आमचे डोळे, कान आणि तर्कशक्ती याच्या पलीकडे जे आहे त्याबद्दल वेद आम्हाला सांगतात आणि तेच त्यांचे खरे प्रयोजन आहे. अशा काही गोष्टी आहेत, की जे अवलोकनाने अवगत होत नाही, जे तर्कज्ञानाने सिद्ध होत नाही आणि जे आमच्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहे ते या ऋषिमुनींनी आपल्या दिव्य अवलोकनाने आम्हाला वेदांच्या रूपाने प्रदान केले आहे. अन्य देशातील घडामोर्डींचे आम्हाला कसे ज्ञान होते? आम्ही त्या घडामोडी प्रत्यक्ष पाहत नाही, परंतु आम्ही तेथील घटनांविषयी वर्तमानपत्रातील वृत्तावर अवलंबून राहतो. याशिवाय आणखी एक वृत्तपत्र आहे जे आम्हाला कोणत्याही भौतिक माध्यमांच्या द्वारा ज्ञान न होऊ शकणाऱ्या विषयांचे ज्ञान देते आणि ते वृत्तपत्र आहे वेदमंत्रांनी भरलेले वृत्तपत्र, जी आम्हाला ऋषींनी दिलेली देणगी आहे.

आम्ही वेदांचा श्रद्धेने स्वीकार केला पाहिजे. वेदांच्या ठायी थोडी श्रद्धा वाढवा आणि त्यांनी दिलेली फळे स्वतःसाठी अनुभवा. वेदांनी कथन केलेले सत्य यथावकाश तुम्हाला पटेल.

शुभ करण्यापेक्षा अशुभ करण्यात मंत्रशक्ती बऱ्याच वेळा कशी अधिक प्रभावी ठरत आहे हे आज देखील आपणास दिसून येत आहे. 'मांत्रिक' हा शब्दच आपल्या मनात भय निर्माण करतो. मंत्रांमध्ये अशुभ करण्याची शक्ती असेल तर त्यांच्यात शुभ करण्याचे सामर्थ्यही निश्चितच असणार. पर्जन्यसूक्ताच्या मंत्रांनी आवाहन केल्यानंतर वरुण देवतेने पाऊस पाडल्याचे वृत्त आपल्या कानावर येते.

दुष्काळ पडल्यावर पाऊस पडावा म्हणून समुद्र व जल यांची देवता असलेल्या वरुणाला प्रसन्न करून घेण्यासाठी 'वरुणजप' हा विधी केला जातो. हा वरुणजप कधी कधी सफल न झाल्याने पाऊस पडत नाही. पण याकरिता सर्वच मंत्र निरर्थक आहेत असे म्हणून ते सरळ सरळ नाकारण्याचे काहीच कारण नाही. नियमित औषधोपचार करूनही व्याधिग्रस्त माणसे मरण पावतातच. म्हणून आपण वैद्यकीय विज्ञान निरर्थक ठरवितो का? रुग्णाचा आजार इतक्या पुढच्या अवस्थेला पोहोचला होता की कोणतेच औषध त्याला लागू होऊ शकले नाही; अशा प्रकारचे, रुग्णाची प्रकृती न सुधारण्याचे स्पष्टीकरण असू शकते. त्याचप्रमाणे प्रबळ कर्माशी जेव्हा सामना करावा लागतो तेव्हा कोणताच मंत्र काम करू शकत नाही. मंत्र निरर्थक ठरायला अजून एक कारण आहे. तुम्ही जर तुमच्या आहाराविषयीच्या नियमाबाबत काटेकोर नसाल तर तुम्ही घेतलेले औषध काम करीत

नाही. त्याचप्रमाणे विशिष्ट नियमांचे पालन करण्यात आम्ही शिथिल असू तर मंत्रांचा अपेक्षित प्रभाव दिसत नाही.

योग हे एक विज्ञान आहे. विज्ञानाच्या प्रयोगशाळेत प्रयोग करताना तेथील विशिष्ट नियमांचे पालन करावे लागते. विद्युत्‌तंत्रज्ञाने जर हातमोजे घालायचे नाकारले किंवा विजेचे काम करताना त्याने उभे राहण्यासाठी लाकडी स्टुलाचा उपयोग केला नाही तर काय होईल? त्याचप्रमाणे योगाचा अभ्यास करताना योगसाधकास योगनियामक नियमांचे पालन करावेच लागते. आता पुन्हा वरुणजपाचा विचार करू. वरुणजप सफल झाला नाही, अशा घटनांत मी चौकशी केली असता मला असे आढळून आले की वरुणजप हा विधी करणाऱ्यांनी तो करताना 'अलवण' (आळणी) म्हणजे भोजनात मीठ न खाण्याच्या नियमाचे पालन केले नव्हते व वरुणजप सफल न होण्याचे हेच कारण होते.

तिरुचिरापल्ली जवळच्या तिरुवानिक्का येथील लोकांनी केवळ मंत्रोच्चारानी एका निष्पर्ण वृक्षाला हिरवीगार पालवी फुटल्याचे प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे. या स्थळाचा किंवा मंदिराचा शुभ्र जम्बू हा पवित्र वृक्ष आहे. म्हणूनच तिरुवानिक्काला जम्बुकेश्वर ह्या नावानेही संबोधिले जाते. एक शाखा सोडता हा संपूर्ण वृक्ष सुकून गेला होता. येथील मंदिराचे विश्वस्त असलेल्या चेट्टिसार यांनी एकादश रुद्राभिषेक केला आणि विश्वास ठेवा, मंत्राच्या सामर्थ्याने वृक्षाला नवी पालवी फुटली. एकादश रुद्राभिषेक या विधीत 'तैनिरिप संहिते' मधील रुद्रसूक्ताचा अकरा वेळा पाठ करून शिवलिंगाला अभिषेक केला जातो.

प्रत्येक ध्वनीचा बाह्य जगतावर एक विशिष्ट प्रभाव असतो. एकदा एका सरोवराच्या काठी एका वाद्यावर विशिष्ट प्रकारचे स्वर निर्माण करण्याचे प्रयोग केले गेले होते. या प्रयोगात असे आढळून आले की हे निर्माण केलेले स्वर निनादत असताना त्या स्वरांच्या कंपनांच्या प्रभावाने सरोवराच्या पाण्यावर प्रकाशकण चमकत होते. नंतर या प्रकाशकणांनी विशिष्ट आकार धारण केला. या प्रकारच्या शास्त्रीय पुराव्यावरून या गोष्टीवर विश्वास ठेवणे शक्य होते की वेदमंत्रांचा शास्त्रशुद्ध पाठ केल्यास आपणास त्या मंत्रदेवतेचे दर्शन होते. ध्वनीचे रूपांतरण बाह्य जगात प्रकाशात होते. एवढेच नाही तर ध्वनी हा अनेक प्रकारे व्यापक असून तो विविध प्रकारचे परिणाम साधतो. वातावरणाला व्यापणारा वेदमंत्रांचा ध्वनी हा पराकोटीचा कल्याणकारक असतो. ध्वनी आपणास लाभदायक व्हावा म्हणून तो उच्चारण्याच्या विविध पद्धती आहेत. काही स्वर आरोही, काही अवरोही, तर काही समगतीने उच्चारावे लागतात. वेदांचे पठण अशा प्रकारे करावे लागते. 'उदात्त', 'अनुदात्त' व 'स्वरित' या पठणाच्या तीन पद्धती आहेत. ध्वनी आणि स्वर हे एकत्र येऊन ब्रह्मांडातील शक्तींचे आपणासाठी अनुकूल परिवर्तन करतात.

वेदमंत्रांत कल्याण करण्याची शक्ती आहे हे जरी मान्य केले तरी या वेदांचे अध्ययन व वैदिक विधी पार पाडण्याचे कार्य यासाठी एक वेगळी जात का निश्चित करण्यात आली आहे हा प्रश्न आता उभा राहतो.

या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी एक गोष्ट प्रथम लक्षात घेतली पाहिजे ती ही की वेद हे लिखित संहितेवरून म्हणावयाचे नसतात. वेदमंत्रांचे नित्य श्रवण आणि पुन्हा पुन्हा पठणातून त्यांची आवृत्ती करावी लागते. मग अभ्यासकच अध्यापक होतो व अशा प्रकारे ही प्रक्रिया पिढ्या-पिढ्यांतून चालू राहते. अशी ही अध्ययनाची व अध्यापनाची प्रक्रिया अबाधित राखणे हे पूर्णवेळ करण्याचे कार्यच आहे. हे करीत असताना शिक्षकाला किंवा विद्यार्थ्याला दुसरे कोणतेही काम करता येत नाही.

वेदाभ्यासाव्यतिरिक्त ब्राह्मणाला कला, कौशल्य आणि विविध शास्त्रांवर प्रभुत्व मिळवावे लागते. खरे पाहता त्याला विभिन्न जातींवर सोपविलेली कामे पण स्वतः करता आली पाहिजेत, परंतु अशा प्रकारचे कोणतेही काम त्याने स्वतःचे उपजीविकेचे साधन करता कामा नये. ज्ञान व संस्कृती संवर्धन हेच ब्राह्मणांचे उत्तरदायित्व आहे. अन्य जातींकडे वंशपरंपरेने चालत आलेल्या कला-कौशल्याच्या कामाबरोबरच युद्धकौशल्याचे कामही आत्मसात करून ते ज्ञान संबंधित जातींना आपली उपजीविका चालविण्यासाठी सुपूर्द करणे हे ब्राह्मणांकडून अपेक्षित आहे. वेदांचे अध्ययन आणि अध्यापन हा ब्राह्मणांचा व्यवसाय होय. शास्त्रांच्या आज्ञेनुसार त्याने साध्या घरात राहावे आणि मंत्रांवर प्रभुत्व मिळविण्यासाठी कठोर नियमांचे व आज्ञांचे पालन करावे. त्याने देहरक्षणास आवश्यक इतकेच अन्न ग्रहण केले पाहिजे. त्याची सर्व कर्मे त्यागाच्या भावनेतून प्रेरित झालेली असली पाहिजेत व त्याने वैदिक परंपरा व वैदिक कर्मांचे लोककल्याणाकरिता पालन केले पाहिजे.

ब्राह्मण हा उपासमारीने मरणार नाही हे पाहणे अन्य जातींचे कर्तव्य आहे. अन्य जातींनी जगण्यासाठी आवश्यक असलेल्या ब्राह्मणाच्या गरजा भागविल्या पाहिजेत. यज्ञकर्मासाठी आवश्यक असलेली सामग्री त्यास पुरविली पाहिजे. अन्य कामे करणाऱ्यांना मेहेनताना किंवा त्यांच्या उत्पादनाची किंमत दिली जाते. ब्राह्मण हा संपूर्ण समाजासाठी काम करतो आणि धर्माज्ञेप्रमाणे आपले जीवन व्यतीत करीत समाजसेवेसाठी यज्ञविधी करून वेदमंत्रांचे पठण करतो. याकरिताच त्याच्या उपजीविकेची तरतूद करावयास पाहिजे. त्याला राहण्यासाठी महाल दिला पाहिजे किंवा उपहार म्हणून सोने-नाणे दिले पाहिजे, असे धर्मग्रंथ मुळीच सांगत नाहीत. ब्राह्मणाला यज्ञकर्म योग्य रीतीने पार पाडण्यासाठी जे जे आवश्यक असेल ते ते दिले पाहिजे. आपल्या वैयक्तिक जीवनात ब्राह्मणाने सर्व प्रकारच्या दिखाऊपणापासून व विलासापासून दूर राहिले पाहिजे. स्वतःच्या

इंद्रियांना ताब्यात ठेवून व सर्व इच्छांचा नाश करूनच त्याला मंत्रांवर प्रभुत्व मिळविता येते.

वेद हे लिखित संहितेवरून नव्हे तर सतत श्रवणातून शिकावे लागतात हे मी अनेकवेळा सांगितले आहे. याचे कारण काय ते मी सांगतो. वेदांच्या ध्वनीने जग न्यायाने चालते. वेदांच्या मुद्रित ग्रंथांचे रक्षण करण्यापेक्षा या गोष्टीला अत्यंत महत्त्व आहे. वेदांची मुद्रित संहिता जर सतत उपलब्ध असेल तर वेदसूक्ते मुखोद्गत करणे व त्यांचे पठण करण्याच्या सवयीकडे आपले दुर्लक्ष होण्याचा संभव असतो, यात तीळमात्र संदेह नाही. कोणत्याही स्थितीत आपल्याजवळ वेदग्रंथ उपलब्ध आहे आणि काही शंका निर्माण झाल्यास आपण ग्रंथात संदर्भ पाहू शकतो तर आपण मंत्र पाठ करण्यात वेळ का वाया घालवावा? अशा तऱ्हेची उपेक्षेची वृत्ती, ज्यांच्यावर वेदपरंपरेचे जतन करण्याचे उत्तरदायित्व सोपविण्यात आलेले आहे त्यांच्या मनात बळावण्याची शक्यता असते.

आजकाल आम्हाला 'अलमंच-मनुष्या' कडून पंचांगारन (पंचांगक्कारन) कळते. आम्हास ठाऊक आहे की चवथ्या वर्णाच्या लोकांचे धार्मिक विधी करणे हे त्याचे काम आहे. परंतु 'अलमंच-मनुष्य' या शब्दातूनच आम्हास कळून येते की हे त्याचे पूर्ण वेळेचे काम नव्हे. पंचांगवकारन किंवा अलमंच मनुष्याचे (पंचांग पाहणारा) मुख्य काम 'अलमंच' (पंचागाची) ची पाच मुख्य अंगे किंवा घटक निश्चित ठरविणे हे असे. तिथी, वार, नक्षत्र, योग आणि करण अशी प्रत्येक दिवसाची पाच अंगे असतात. एखादा विशिष्ट दिवस शुभ आहे किंवा नाही अथवा एखादे काम किंवा समारंभ करण्यास तो दिवस अनुकूल आहे किंवा नाही हे पाहून ठरविण्यासाठी पंचांगातील ही पाचही अंगे विचारात घ्यावी लागतात.

तिथी - चांद्र पक्षानुसार येणारा दिवस
वार - सप्ताहातला दिवस
नक्षत्र - संबंधित दिवसाला जोडणारा तारकासमूह
योग - महामहोपाध्याय पां. बा. काणे यांच्या मताप्रमाणे सूर्य आणि चंद्र यांच्या रेखांशाची बेरीज करून योगाचा हिशोब केला जातो. (किंवा सूर्य आणि चंद्र यांचा अवकाशातला १३ अंश आणि २० मिनिट याचा एकत्र निष्पादित समय म्हणजे योग होय.)
करण - तिथीचा अर्धभाग म्हणजे करण. करण दोन प्रकारचे असून त्यांस 'चर' आणि 'स्थिर' असे म्हणतात.)

सांप्रत ग्रिनिच येथील खगोलशास्त्रज्ञ सूर्योदय व सूर्यासाठी वेळ निश्चित करण्यासाठी सूर्य, चंद्र व ग्रहगोल यांचे निरीक्षण करतात. तीन-चार पिढ्यांपूर्वी प्रत्येक खेडेगावात पंचांग पाहणारा माणूस असे, जो पंचांग पाहण्यात तरबेज असे. ग्रहण कधी होईल, त्याची

लागण्याची-सुटण्याची नक्की वेळ यांचे पूर्वानुमान तो आजच्या खगोलशास्त्रज्ञा इतकेच अचूकपणे वर्तवीत असे. तो दिवसाची पाच अंगे एका ताडपत्रावर लिहून घरोघरी जात असे व लोकांना भौतिक व धार्मिक कृत्यात मदत करीत असे. पूर्वीच्या काळी त्याला 'कुट्टाईचुवंडी' म्हणजेच लघु ताडपत्र असे म्हणत असत.



आजकालच्या पंचांग सांगणाऱ्यांना या शास्त्राचा कसा विसर पडला? छापखान्यांचा शोध लागला आणि वर्षभराचे पंचांग एकदम छापून सर्व लोकांना तयार मिळू लागले. त्यामुळे पंचांग सांगणारा (जोशी-कुलकर्णी) हा नावापुरताच ठरला. खगोलशास्त्र आता लोप पावण्याच्या बेतास आले आहे.

आम्ही जर हस्तलिखित किंवा छापील ग्रंथातून वेदाध्ययन करू लागलो असतो तर जी गत पंचांगशास्त्राची झाली तीच वेदांचीही झाली असती. वेदध्वनींनी जग व्यापले गेले नसते आणि सर्वव्यापक कल्याण झाले नसते.

एखादी विद्या जतन करायची असेल तर ती लिखित स्वरूपात आणणे तिचे जतन करण्याच्या दृष्टीने योग्य नव्हे, कारण तसे केल्याने त्या विद्येचे जतन करण्याकडे उदासीनता वाढते हे आपल्या पूर्वजांना ठाऊक होते. लिखित संहिता पाहून ज्यांनी वेदांचे पठण केले (लिखित पाठक) त्यांच्याकडे 'अधम' म्हणजे वेदपठण करण्यातले सर्वात कनिष्ठ दर्जाचे म्हणून पाहिले जाई. तामीळमध्ये वेद हे 'अलिखित पुरातन संहिता' म्हणून ओळखले जातात. संस्कृतमध्ये देखील वेदांना 'श्रुती' असेच म्हणतात. 'श्रुती' म्हणजे 'ऐकलेले' म्हणजेच जे 'लिखिता' वरून पाठ न करता ऐकूनच शिकायचे ते. वेदांचे पठण चालू असताना ते श्रवण करणे व मग स्मरणशक्तीत साठविणे हीच वेद शिकण्याची पद्धती असल्याने वेदपरंपरेचे जतन करणे हे संपूर्ण जीवनाचे काम झाले. शिक्षक पाद दर पाद शिकवीत असे व शिष्य प्रत्येक 'पाद' दोन वेळा म्हणत असे. अशा प्रकारे वेदध्वनींनी पूर्ण आसमंत भरून जाई. याप्रमाणे आमच्या वेदग्रंथांचे त्यांच्या संशोधनासहित अध्ययन केले जाई. वेदांचा हा संशोधनाचा भाग हा सागरासारखा असणारा वेदांचा विस्तार आहे. विस्तारासह वेदांचे जतन शतकानुशतके मौखिक परंपरेने केले गेले. हा संपत्तीचा ठेवा, हे आमच्या आत्मस्वरूपाचे पोषण करणारे, कधी न संपणारे 'अन्न' हे ईश्वराच्या व्यवस्थेनुसार युगानुयुगे पार करीत आमच्यापर्यंत येऊन पोहोचले आहे. या वेदनिधीची उपेक्षा करून तो लोप पावू देण्याइतके दुसरे मोठे पाप असू शकणार नाही.

वेदपरंपरा लोप पावली तर ब्राह्मण म्हणविल्या जाणाऱ्या वेगळ्या जातीची आवश्यकता नाही. आजकाल 'ब्राह्मणांनो चालते व्हा' अशी घोषणा वारंवार ऐकू येते. पण 'कुंभारांनो, चालते व्हा' किंवा 'धोब्यांनो, चालते व्हा' असे म्हटल्याचे ऐकू येते का? जर का कुंभार किंवा धोबी गाव सोडून जाईल तर त्यांना बळजबरीने परत आणून गावात

ठेवले जाईल, असे का होते? तर समाजाला त्यांच्या सेवेची गरज आहे.

जोपर्यंत ब्राह्मणांच्या ठायी सत्त्व-गुण म्हणजे उत्कृष्टता आणि शुद्धता हे गुण त्यांच्या अंगी होते आणि त्यांनी वेदपरंपरा अखंड ठेवली होती व ते साधे जीवन जगत होते, तोपर्यंत समाजातले ब्राह्मणांचे मूल्य इतरेजन ओळखून होते. ते ब्राह्मणाकडे प्रेमाने आणि आदराने बघत असत व ब्राह्मणांच्याविषयी ते विश्वास बाळगून होते. संपूर्ण आसमंतात वेदध्वनी भरून राहिला आहे व वैदिक कर्मांचे पालन केल्याने सर्वत्र आरोग्यसंपन्न वातावरण व त्यांची शुभ कृपा असल्याने दुष्काळ किंवा रोगांची पीडा समाजाला होत नाही, (जशी ती आज होते आहे) अशी संपूर्ण समाजाला जाणीव होती.

ब्राह्मण केवळ या एकाच मार्गाने समाजाची सेवा करीत होते असे नाही. त्याचे वैयक्तिक जीवन हे समाजाला प्रेरणा देणारे असे आदर्श जीवन होते. ब्राह्मणाने आपली इंद्रियसुखांची भूक कशी कमी केली आहे, तो कसे शांतिपूर्ण जीवन जगत आहे, इतर प्राणिमात्राविषयी त्याच्या मनात कशी करुणा आहे, तो परमेश्वराचे ध्यान कसे करतो, तो कुठल्याही पारितोषिकाची अपेक्षा न बाळगता विविध धर्मकृत्ये, शास्त्राच्या नियमांचे कठोरपणे पालन करीत कशी पार पाडतो हे सर्व समाज पाहत होता. संपूर्ण ब्राह्मण जमात कशी निःस्वार्थ व त्यागी वृत्तीने जगत आहे हे समाज पाहत होता. साहजिकच सर्वजण ब्राह्मण जमातीने घालून दिलेल्या आदर्शामुळे त्यांच्याकडे आकर्षित झाले होते. ब्राह्मणांच्या उदाहरणाचे अनुकरण करीत अन्य जमाती आपल्या व्यवसायाला साजतील असे उपास, व्रत-वैकल्ये करू लागल्या. ब्राह्मणांनी अन्य जातींना चिरडून टाकले असा ब्राह्मणावर आरोप करणे निरर्थक आहे. वेदग्रंथांनी ब्राह्मणांना जीवन जगण्याचा एक विशेष मार्ग घालून दिला आहे आणि त्याच्याशी प्रामाणिक राहून त्याने स्वतःची उन्नती करू पाहणाऱ्या अन्य जनाला स्वतःचे वैयक्तिक उदाहरण घालून दिले आहे.

वेदांचा अभ्यास करण्याचा अधिकार नाही असे म्हणून इतरांना अवनत ठेवण्यात आले हे म्हणणेही असेच निरर्थक आहे. वेदपरंपरेचे जतन करणे हे वंशपरंपरागत करावयाचे काम असून तो जन्मभर करावयाचा व्यवसाय आहे हे मी तुम्हाला यापूर्वी सांगितलेच आहे. कोणताही व्यवसाय हा वंशपरंपरेच्या आधारावर करावा लागतो. अन्यथा द्वेष आणि प्रतिस्पर्धेच्या भावनेने समाज छिन्न-विच्छिन्न होण्याचा धोका असतो. वेदपरंपरेचे जतन करणे हा मूलतः एक व्यवसाय आहे. विभिन्न व्यवसायाच्या लोकांना एकाच समान परंपरेचे पालन करण्याची जर अनुमती दिली गेली तर श्रमविभागणीच्या प्रणालीत गोंधळ होऊन अनागोंदी माजेल. परिणामतः सामाजिक संरचना बिघडणार नाही का? सामाजिक स्तराच्या दृष्टीने पाहिले तर प्रत्येक व्यवसायाला अन्य व्यवसायाइतकेच महत्त्वाचे स्थान आहे. असे असताना वैदिकी व्यवसाय हा अन्य प्रकारच्या कामाहून श्रेष्ठ

दर्जाचा आहे अशी कल्पना कोणी का बाळगावी?


काही जातींना वेद शिकण्याचा अधिकार दिला गेला नाही, पण म्हणून वेदातले सत्य शिकण्याचा त्यांना कोणी प्रतिबंध केलेला नाही. हे सर्व त्यांच्या आत्मिक उन्नतीसाठी गरजेचे आहे. वेदध्वनी विश्वात जीवित राखण्याचे कार्य मात्र एका वर्गावर सोपविणे आम्हास आवश्यक वाटते. आध्यात्मिक उन्नतीसाठी वेदातील संकल्पना सर्वांना मुक्त आहेत. अप्पर आणि तम्माझवार सारख्या ब्राह्मणेतर संतांची गाणी वेद आणि वेदान्ताच्या विचारांनी ओतप्रोत आहेत.

आत्मज्ञान आणि भक्ती यावर आपला एकाधिकार करून ब्राह्मणांनी अन्य जातीयांना पददलित केले हे जर खरे असते तर केवळ वर उल्लेखिलेल्या संतांच्या उदाहरणाशिवाय, केवळ अप्पर आणि तम्माझवार नव्हे तर अन्य कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या नायम्मार व आझवारसारख्या जातीत सुद्धा अनेक संत झाले याचे तुम्ही काय स्पष्टीकरण द्याल? तायुमानवर आणि पट्टीनट्टार सारखी स्वयंप्रकाशित माणसे तुम्हाला कोठे पाहावयास मिळतील? ब्राह्मणांनी देखील ज्यांची प्रशंसा केली अशा स्वयंप्रकाशित व्यक्ती आणि श्रेष्ठ भक्त ब्राह्मणेतरातही झाली या वास्तविकतेशिवाय चतुर्थ वर्णात देखील अशा व्यक्तींनी साम्राज्ये स्थापन केली व वैदिक धर्माला नवजीवन आणि चैतन्य प्राप्त करून दिले. ब्राह्मणांनी अन्य जातींचे शोषण केले ही अगदी अलीकडे शोध लागलेली कल्पित कथा आहे.

ब्राह्मण निरपराध आहेत आणि त्यांच्यात काहीच त्रुटी नाहीत असा दावा मी कधीच करणार नाही. परंतु एकंदरीत पाहता ब्राह्मणांनी समाजाचे भले केले व समाजातील सर्वांना मार्गदर्शन केले, हे सत्य आहे आणि त्यामुळेच ब्राह्मण इतकी शतके सन्मानाने जगू शकले.

सांप्रत जेव्हा अन्य जातीच्या लोकांनी ब्राह्मण आता कोणत्याही प्रकारची समाजसेवा करीत नाहीत हे पाहिले तेव्हा त्यांनी 'ब्राह्मणांनो चालते व्हा' हा आवाज उठविला. ब्राह्मण जर समाजसेवा करीत नाहीत व जर ते काही करीत असतील तर इतरांप्रमाणेच संपत्ती मिळविण्याची धडपड करीत आहेत, तर ब्राह्मण म्हणून ओळखली जाणारी वेगळी जात असण्याचे प्रयोजनच काय? मला तर असे वाटते की ब्राह्मण नावाची जात समाजाची सेवा करीत नसेल तर मीच त्या जातीचा विध्वंस करणारा पहिला माणूस असेन. उपयुक्तता मूल्य नसेल तर त्या विशेषाच्या अस्तित्वास कोणताही अधिकार कसा असेल? ब्राह्मणापासून जगाला कोणताच लाभ नसेल तर ब्राह्मण म्हणविल्या जाणाऱ्या जातीची गरजच नाही.

आजकाल अनेक ठिकाणी टोळ (नाके) फाटके आहेत. परंतु तिथे फाटके मात्र नाहीत. पूर्वीच्या काळी या फाटकांच्या सीमेवर टोळ म्हणजे कर वसूल केला जात असे. पुढे ही पद्धती बंद झाली आणि फाटके कारणहीन झाली. वेदाध्ययनहीन झाल्याने ब्राह्मण देखील टोळनाक्यावर प्रत्यक्ष टोळ वसूल न करणाऱ्या फाटकासारखेच प्रयोजनरहित झाले आहेत. मग त्यांना फेकून देऊ नका असे आम्ही कोणत्या कारणासाठी किंवा कोणत्या न्यायाच्या आधारे म्हणू शकू?

ब्राह्मण जर आज त्यांना विशेष आदराची वागणूक मिळावी अशी अपेक्षा करतील तर ते केवळ निंदेलाच योग्य ठरतील. त्यांच्यावर होणारी टीका योग्यच म्हणावी लागेल. स्वधर्म गुंडाळून ठेवल्यामुळे ब्राह्मण हा दोषी आहे. परंतु धर्म म्हणजे वेदप्रणीत धर्म हा वेगळाच विषय आहे. या धर्माच्या पालनाविषयी ब्राह्मणाला दोषी धरू नये. कारण या धर्माच्या पालनात ब्राह्मणांची मदत करणे हे इतरांचे कर्तव्य आहे. जगाच्या कल्याणासाठी वैदिक धर्म टिकवून ठेवला पाहिजे. वंशपरंपरेने आलेल्या व्यवसायातून वेदपरंपरा टिकविणारी एक जात असली पाहिजे या तत्त्वाला अन्य जातीच्या लोकांनी पाठबळ दिले पाहिजे. वेदधर्मावरील श्रद्धा ते स्वतःच हरवून बसले तर ब्राह्मणांनी वेदांचा त्याग केला असा दोष ते ब्राह्मणांना देऊ शकणार नाहीत. त्यांना जर वेदधर्म नको असेल तर त्यांच्याच तर्कानुसार वंशपरंपरागत आपल्या वेदधर्माचा त्याग केला यात ब्राह्मणांनी देखील कोणताच अपराध केला असे म्हणता येणार नाही. आपल्या उदरनिर्वाहासाठी ब्राह्मणांना देखील इतरांच्या स्पर्धेला तोंड देऊन दुसरा व्यवसाय शोधावा लागला हे ओघानेच आले. साहजिकच वेदधर्माची गरज नाही ही त्याची धारणा झाली आणि त्याचबरोबर वेदधर्म सोडून ब्राह्मणाने इतर काम करू नये हे तर्कसंगत ठरेनासे झाले. वेदधर्म हा सर्वस्वी चुकीचा आहे आणि तो संपविला पाहिजे असे एकीकडे म्हटले गेले तर दुसरीकडे त्याचवेळी वेदधर्माचे रक्षण करणे हे ज्याचे कर्तव्य, त्याने दुसरा धंदा करू पाहिले तर त्याचा द्वेष, हेटाळणी केली गेली. यात न्याय आहे का? कोल्हा, कुत्रा देखील उपाशी राहू नये हा माणुसकीचा भाग आहे आणि हा माणुसकीचा धर्म सर्व धर्मांचा समान घटक आहे. आम्हाला कोणत्याही धर्माची गरज नाही असे म्हणणारे सुद्धा करुणा आणि सर्व कर्मांत त्यागभावनेचे समर्थन करतात. तेव्हा माणसाने आपला वंशपरंपरेने चालत आलेला व्यवसाय करू नये आणि त्याचवेळी त्याने दुसरा व्यवसाय न करता अन्नात्र दशेत मरून जावे असे म्हणणे कितपत न्यायाचे ठरेल?

ब्राह्मणाने स्वतःच्या बाबतीत सत्यनिष्ठ राहावे व वैदिक धर्माचा त्याने निर्वाह करावा याविषयी अन्य जातीचे लोक त्याला मोठी मदत करू शकतात. मी असे म्हटल्याचे ऐकले आहे की जुन्या काळात काही ब्राह्मण अस्पृश्यांच्या घरी जाऊन म्हणाले की या

आपण एक होऊ या. यावर अस्पृश्य म्हणाले की "नको, नको, तुम्ही तुमचे करीत राहा, तेच आपणा दोघांच्या हिताचे होईल. येथे पुन्हा येऊ नका'' आपली एकमात्र उपजीविका असलेली गाडगी-मडकी ब्राह्मणांसमोर फोडून ते ब्राह्मणांना वारंवार त्यांच्याकडे येण्यापासून रोखीत असत. त्यावेळी श्रमविभागणीच्या पद्धतीमुळे जरी ते विभक्त होते आणि एकमेकात मिसळत नव्हते तरी त्यांना परस्परांविषयी प्रेम होते आणि प्रत्येकजण आपले काम सर्वांच्या कल्याणासाठी करतो आहे याबाबत त्यांचा विश्वास होता.

आज देखील सामान्य माणसांचा वेदांवर विश्वास नाही किंवा त्यांच्या मनात वेदांविषयी श्रद्धा नाही असे नाही. ते असाच वेदांचा आणि वेदधर्माचा आदर करीत राहतील, ब्राह्मण व वेदांविषयीचा द्वेषमूलक अपप्रचार हा राजकीय कारणामुळे आहे असे मला वाटते. वेद, वेदप्रणीत धार्मिक कृत्ये आणि वैदिक परंपरांवर माणसांची श्रद्धा आहे; याचा मी पुनरुच्चार करतो आणि ब्राह्मण जर अल्प प्रमाणात का होईना पण अधिक चांगले होतील म्हणजे जर आपल्या व्यवसायाशी प्रामाणिक राहतील तर सर्व द्वेषभावना नष्ट होईल. मी पूर्वीच म्हटल्याप्रमाणे जर ब्राह्मण इतरांकडून आदराची अपेक्षा करीत असतील तर आपल्या जीविताची(ही) जोखीम पत्करून त्यांना आपल्या धर्माशी प्रामाणिक राहिले पाहिजे. माझा विश्वास आहे की समाज ब्राह्मणावर अशी आत्यंतिक दुरवस्था येऊ देणार नाही. परंतु ब्राह्मणांवर अशी वेळ आली तरी त्यांनी आपला धर्म सोडता कामा नये हीच माझी भूमिका आहे. इतर लोकांचा दृष्टिकोन काहीही असो, ते मदत करोत वा त्याला दडपण्याचा प्रयत्न करोत, ब्राह्मणाने लोकमांगल्यासाठी वेदपरंपरा उचलून धरली पाहिजे.

मी जे काही ब्राह्मण समाजाबद्दल बोललो ते तत्त्वतः ब्राह्मणेतरांनाही लागू होते. ब्राह्मणेतरांच्या ज्या कर्तव्यांविषयी मला त्यांच्याशी बोलावयाचे आहे ती कर्तव्ये अनेक आहेत. ते देखील त्याबद्दल ऐकण्यास उत्सुक आहेत आणि मला विश्वास आहे की त्यांची कर्तव्ये जर त्यांना योग्य प्रकारे स्पष्ट करून सांगितली तर ते आपापल्या धर्मांचे निष्ठेने पालन करतील. तथापि त्यांना उपदेश करण्यास मी पात्र असलो पाहिजे. ब्राह्मण समाजाशी माझा विशेष संबंध आहे असा समज आहे. मठात अनेक वैदिक विधी केले जातात. तेव्हा बरोबर असो की चूक, वैदिक धर्माचे समर्थन करणे हे कर्तव्य मानणाऱ्या जातीविषयी मला बरेच काही करावयाचे आहे असा समज होण्यास भरपूर वाव आहे. अशी स्थिती असल्यामुळे अन्य जातीचे लोक माझ्या बोलण्याकडे लक्ष देतील असे गृहीत धरूनही मी जर अन्य जातींच्या लोकांबरोबर धर्माबद्दल बोललो तर त्यांच्या मनात एक प्रश्न उत्पन्न होऊ शकेल. ब्राह्मण लोक हे माझ्या समर्थनावर खूपसे अवलंबून आहेत आणि तरीही ते माझ्या उपदेशाप्रमाणे सुधारणा करताना दिसत नाहीत. अशा स्थितीत मी

त्यांच्या म्हणजे ब्राह्मणेतरांच्या कर्तव्याबद्दल त्यांना उपदेश का करावा? असा तो प्रश्न असेल.

खरे पाहू गेले तर ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर हे दोघेही सारखेच आहेत. ब्राह्मणेतरापेक्षा मी ब्राह्मणांच्या बाबतीतच अधिक असंतुष्ट आहे. कारण त्यांनी सर्वांचे सर्वोच्च आंतरिक कल्याण करणारा धर्म गुंडाळून ठेवला. असे असले तरी ब्राह्मणांच्या मनात माझ्याविषयी विशेष प्रेम आहे अशी माझी धारणा असल्यामुळे त्यांनी पूर्णपणे मनापासून व सर्व शक्तीनिशी वैदिक धर्माकडे पुन्हा वळावे म्हणून मी त्यांची सतत कानउघडणी करीत असतो. ब्राह्मण त्यांच्याकडून अपेक्षित धर्मपालनाचे कार्य अंशतः जरी पार पाडतील, तर अन्य जातीच्या लोकांना त्यांच्या कर्तव्याचे स्मरण करून देण्यास मी पात्र ठरेन. वेदपरंपरा अखंड राखण्यासाठी ब्राह्मणांनी यथासंभव पराकाष्ठेचे प्रयत्न केले पाहिजेत. असे केल्याने ब्राह्मण मला अन्य जातीच्या लोकांशी त्यांच्या कर्तव्याबद्दल बोलण्यासाठी समर्थ करतील.

संपूर्ण मानवसमुदाय आणि पृथ्वीवरील प्राणिमात्र सुखी असले पाहिजेत. काम कोणतेही असो, त्यात श्रेष्ठता किंवा कनिष्ठता नाही याची जाणीव ठेवून प्रत्येकाने सर्वांच्या भल्यासाठी आपल्या वाट्याला आलेल्या धर्माचे पालन करावे. भौतिक जीवनात समृद्धी व वैश्विक आत्मिक उन्नती साधण्यासाठी वेदध्वनींचे जतन करण्याचे कर्तव्य एका वर्गाकडे सोपविले पाहिजे. पुन्हा मूळ प्रश्नाकडे वळण्यापूर्वी मी तुम्हाला प्रथम काही सांगू इच्छितोः वैदिक धर्माचा व्यवसाय हा विषय बाजूला ठेवून वंशपरंपरेने व्यवसाय ही पद्धती सर्व प्रकारच्या कामांत फायद्याची आहे असे आपण गृहीत धरू या. परंतु वैदिक धर्माचे जतन करणे हे एकाच वर्गाने जीवनभर करावयाचे कार्य का आहे? अन्य व्यवसायांची काहीही स्थिती असो, ते राहोत अथवा न राहोत, ते परस्परात मिसळून जावोत अथवा न जावोत, वैदिक धर्माचे रक्षण हा स्वतंत्र व्यवसाय असला पाहिजे. हे या विषयाचे तात्पर्य म्हणून आता सिद्ध झाले आहे.

(भाग १९ मधील 'ब्राह्मणांची नवीन जात निर्माण करता येईल का?' व भाग २० मधील 'वर्णधर्म आणि विश्वकल्याण' या शीर्षकाचे लेख देखील पाहावेत.)

-----

## प्रकरण - ९

# शिरच्छेद हा डोकेदुखीवरील उपाय आहे काय ?

आजकाल थेट मोठ्या पुढाऱ्यापासून ते रस्त्यावरील सामान्य माणसापर्यंत प्रत्येकजण विचारतो. 'जात हवीच कशाला'? आपण थोडा जरी विचार कराल तर आपणास कळून येईल की विभिन्न जातींमध्ये समाजाची केलेली विभागणी ही सर्वांच्या कल्याणासाठी आहे. ही जातींमध्ये केलेले विभागणी दोन प्रकारे उपयोगी पडते. एका प्रकारे ती संपूर्ण समाजाची प्रगती साधते तर दुसऱ्या मार्गाने समाजातील प्रत्येक व्यक्तीला आपले अंतःकरण शुद्ध करून घेऊन अंतिम मुक्ती मिळविण्यास साहाय्यभूत होते.

हे तुम्हाला मी सांगतो आहे किंवा शास्त्रांनी तसे सांगितले आहे म्हणून हे मत तुम्ही स्वीकारू नका. माझ्यासारखी माणसे प्रगतीला विरोध करणारी प्रतिगामी आहेत असे तुम्हाला वाटत असेल. परंतु राष्ट्राची उन्नती हेच ज्यांचे ध्येय होते-आणि ही गोष्ट सर्वजण मान्य करतात. त्या व्यक्तीचे तरी मत विचारात घ्या. ही व्यक्ती समाजातील सर्व प्रकारची विषमता दूर करण्यासाठी, धर्मभोळ्या कल्पनांचे समूळ उच्चाटन करून मागासलेल्या जाती-जमातींना उरलेल्या समाजाच्या-समान-पातळीवर आणण्यासाठी कटिबद्ध होती; ही व्यक्ती म्हणजे गांधीजी. त्यांनी वर्णाश्रम व्यवस्थेची प्रशंसा करून ती मनःपूर्वक स्वीकारली होती. याचा उल्लेख मी मुद्दाम केला आहे. कारण मला असे वाटते की इतर कोणी राहो, पण वर्णव्यवस्थेमध्ये उत्तम अशी वैशिष्ट्ये आहेत हे गांधीजींच्या विचारांनी तुम्हाला पटेल.

गांधीजींनी 'माझा वर्माश्रम धर्म' या शीर्षकाचा एक निबंध लिहिला आहे. या निबंधात ते म्हणतात, 'वर्णाश्रम ही अशी व्यवस्था आहे, जी स्वतःच्या अंगभूत गुणातून निर्माण झाली. ती स्वाभाविक असून माणसामध्ये जन्मतःच आहे. हा प्रकृतीचा सिद्धान्त असून हिंदू धर्माने या व्यवस्थेला योजनाबद्ध शास्त्रीय रूप दिले आहे. या व्यवस्थेने श्रमाची चार वर्गांत चौपदरी-विभागणी केली व प्रत्येक वर्गास त्याची कर्तव्ये ठरवून दिली. ही त्यांची कर्तव्ये होती. हक्क नव्हे. कोणाही व्यक्तीने स्वतःला इतरापेक्षा श्रेष्ठ समजणे आणि दुसऱ्यास स्वतःपेक्षा तुच्छ मानणे हे मूलतःच हिंदू संस्कृतीच्या मूलभूत तत्त्वाला धरून नाही. वर्णाश्रम व्यवस्थेत प्रत्येक व्यक्ती स्वयंअनुशासन शिकते व त्यामुळे समाजशक्ती व्यर्थ दवडली जात नाही. अस्पृश्यता हा अपराध आहे असे मी मानतो म्हणून मी अस्पृश्यतेविरुद्ध संघर्ष करतो, परंतु समाजासाठी निकोप प्रणाली म्हणून वर्णाश्रम व्यवस्थेचे मी समर्थन करतो. माझा विश्वास आहे की ही व्यवस्था संकुचित मनाची परिणती नाही. ही व्यवस्था, जी प्रतिष्ठा तत्त्वचिंतकाला देते तीच प्रतिष्ठा एका

कामगाराला देते. गांधीजींनी अशा प्रकारे सनातन्यांपेक्षाही अधिक उत्कटतेने वर्णाश्रम व्यवस्थेचा पुरस्कार केला आहे.

*(वस्तुतः हा भाग महात्मा गांधींच्या लेखातील अंश आहे. तो परमसद्गुरू स्वामीजींनी येथे स्मरणानुसार उद्धृत केला आहे. महात्मा गांधींच्या 'माझा वर्णाश्रम धर्म' या लेखातील उताऱ्याचा अनुवाद खाली दिला आहे.*

*"माझ्या मते वर्णाश्रम हा मानवाच्या स्वभावात नैसर्गिकपणेच आहे, हिंदू धर्मीयांनी याला शास्त्राचे रूप दिले आहे इतकेच. तो जन्माशी संलग्न नाही. या विभागणीने कर्तव्ये ठरवून दिलेली आहेत, हक्क नाही. एकाला श्रेष्ठत्व किंवा दुसऱ्याला कनिष्ठपणा देणे हे हिंदू-धर्मतत्त्वाच्या विरोधात आहे असे मला वाटते. वर्णाश्रम हा आत्मसंयमन, स्वसंरक्षण व उर्जेची बचत करणारा आहे."*

*"वर्णाश्रम आणि अस्पृश्यता यांतील अंतर मी वारंवार स्पष्ट केले आहे. वर्णाश्रमाचे मी नेहमीच विवेकपूर्ण, शास्त्रीय सत्य म्हणून समर्थन केले आहे तर अस्पृश्यतेचा बांडगूळ आणि केवळ पाप म्हणून निषेध केला आहे. जन्मावर आधारित निकोप श्रमविभागणी म्हणून वर्णाश्रमाचा मी आदर करतो. माझ्या मते वर्णाश्रम हा संकुचित वृत्तीमधून निर्माण झालेला नाही. उलट वर्णाश्रमाने श्रमिकांना आणि शूद्रांना तत्त्वचिंतकाला, ब्राह्मणाला द्यावी तितकी प्रतिष्ठा दिली आहे. वर्णाश्रमाने गुणांना महत्त्व दिले तर अवगुणांच्या उच्चाटनावर भर दिला आहे आणि माणसाच्या भौतिक हव्यासाचे रूपांतर अविनाशी आणि आध्यात्मिक आकांक्षेत केले आहे. मोक्ष किंवा आत्मसंयमन हेच ब्राह्मणाचे आणि शूद्राचे सामान्य ध्येय होते. कीर्ती, श्रीमंती किंवा सत्ता नव्हे.")*

कर्मकांड व रूढी-परंपरांवर आधारित सामाजिक विषमतेला गांधीजींचा विरोध होता असे त्यांच्या कार्यावरून सूचित होते. त्यांनी आंतरजातीय विवाहाचे देखील समर्थन केले होते. त्यांनी वर्णाश्रम व्यवस्थेचे समर्थन केले होते. या तथ्याचा मेळ कसा घालावयाचा ? वर्णधर्म व्यवस्था ही जरी योग्य होती तरी ती कोसळून पडली आणि तिचे पुनरुज्जीवन करणे अशक्यप्राय होते असे गांधीजींचे मत होते. एखाद्या गोष्टीचा गाभाच नष्ट झाल्यावर तिचे अवशेष सांभाळण्याचे काय प्रयोजन ? असा त्यांनी प्रश्न केला होता. तेव्हा ज्या तत्त्वांवर ही विषमता उभी होती ती तत्त्वेच नष्ट झाल्यावर समाजातील विषमतेचे बाह्य अवशेष राहू देण्यात काहीच अर्थ नाही असा गांधीजींचा विचार होता.

मला मात्र गांधीजीच्या या विचाराप्रमाणे वाटत नाही. वर्णाश्रम व्यवस्था हा आमच्या धर्माचा कणा आहे. ही व्यवस्था दुरुस्त न करण्याइतपत मोडकळीस आली आहे असे म्हणून ती समाप्त करायची असेल तर आम्हाला मठ किंवा त्याचे संचालन करणाऱ्या

मठाधिपतीची आवश्यकता नाही. स्वतःला, धर्माचे मूळ नष्ट झाल्यावर एखाद्या संस्थेचा मुख्य किंवा मठाधिपती म्हणवून घेत ती संस्था चालविणे हे एक प्रकारे समाजाचे शोषण करण्यासारखेच आहे. जुनी जातिव्यवस्था जर खरोखरच नाश पावली असेल तर मठाची आवश्यकताच नाही व ही मठव्यवस्था बरखास्त केली पाहिजे. माझा विश्वास आहे की अशी स्थिती अजून निर्माण झालेली नाही. जातिव्यवस्था पूर्वीप्रमाणे आपले अस्तित्व अनिवार्यतेने टिकवून ठेवू शकेल असेही मला वाटत नाही. परंतु आपण आता तरी जर या विषयात जागृत होऊन सर्व शक्ती एकवटू व हर उपाय करून योग्य ती पावले उचलू तर आपण वर्णव्यवस्थेला नवसंजीवनी व नवचैतन्य देऊ शकू असा मला आत्मविश्वास आहे.

अन्य व्यवसायांच्या संदर्भात वर्णव्यवस्था जरी असामंजस्याच्या भोवऱ्यात सापडलेली असली तरी सर्व व्यवसायांचे प्राणतत्त्व असलेले वेदाध्ययन हे पाठशाळांतून कुठे ना कुठे अस्तित्व टिकवून आहे. या पाठशाळेतून वेदग्रंथ अत्यंत काटेकोरपणे पारंपरिक पद्धतीने शिकविले जात आहेत. वेदांच्या शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांना उत्साहवर्धक पाठबळ मिळत आहे. खूप मोठ्या संख्येने विद्यार्थी या पाठशाळेतील शिक्षणात सहभागी होत आहेत. वैदिक परंपरा आणि तिचे अस्तित्व अखंड टिकविण्याच्या कार्याला वाहून घेतलेला एक लहानसा गट कार्यरत आहे. हे कार्य वृद्धिंगत करण्यासाठी अशा प्रकारचे अनेकानेक गट स्थापन करणे हे माझे काम आहे. वेदशिक्षणाचे कार्य मोठ्या प्रमाणावर विकसित झाले तर अन्य वर्णांत निर्माण झालेल्या दोषपूर्ण असामंजस्याच्या स्थितीवर मात करण्याचा मार्ग मोकळा होईल आणि सर्वच्या सर्व नाही पण थोडे जरी ब्राह्मण आपल्या जीवनमार्गाशी एकनिष्ठ राहून इतरांस आदर्श उदाहरण घालून देत समाजाचे मार्गदर्शन करतील तरी उरलेले ब्राह्मण देखील आपल्या जन्मजात कर्तव्याकडे परततील.

वर्णाश्रम धर्मव्यवस्थेला योग्य वळण लावणे किंवा तिचे योग्य स्वरूपात पुनरुज्जीवन करणे गांधीजींना अशक्यप्राय वाटल्याने त्यांना ही वर्णव्यवस्थाच पूर्णपणे संपवावी असे वाटले. माझा मात्र या विषयात वेगळा विचार आहे. वर्णाश्रम व्यवस्थेच्या अस्तित्वाची ज्योत मंद झाली असली तरी ती पूर्णपणे विझलेली नाही. तिच्यात काही अग्निकण अजून बाकी आहेत, ज्यांच्यावर फुंकर घालून ती ज्योत पुन्हा प्रज्वलित करता येईल असे मला वाटते. आमच्या समाजाच्या गेल्या पन्नास वर्षांच्या इतिहासापासून आम्ही हा धडा घेतला पाहिजे की वर्णधर्माचा त्याग केल्यास आम्हाला त्याची फार मोठी किंमत मोजावी लागेल. भारत सोडून उर्वरित जगातील भरभराटीला आलेल्या पण वर्णव्यवस्था नसल्याने तेथील महान संस्कृतींच्या वाट्याला आलेल्या दुःस्थितीपासून आम्ही काही धडा घेतला पाहिजे.

वंशपरंपरागत व्यवसायाच्या पुरातन प्रणालीच्या विच्छेदनाचे कारण यांत्रिकीकरण व मोठ्या मोठ्या कारखान्याची उभारणी हेच आहे. साध्या-सरळ जीवनात यंत्रांना फारसे स्थान नाही. सर्वसाधारण माणसे जर जुना हस्तव्यवसाय व कुटिरोद्योग यांच्या साहाय्याने साधे जीवन जगले असते तर पुरातन वर्णव्यवस्था वाचली असती. गांधीजी आपल्या आदर्श जीवनपद्धतीबद्दल निरंतर सांगत असत की सर्व काम मनुष्यबळानेच केले गेले पाहिजे. ते आवाढव्य यंत्रांच्या विरोधी मताचे होते व विलासी जीवनाचा त्याग करून साधे, सरळ जीवन जगा असे ते लोकांना आवाहन करीत असत. अशा प्रकारे गांधीजींची मते ही वर्णव्यवस्थेची पुष्टी करणारी होती.

सध्या सरकारने लागू केलेल्या अनेक योजना व लोकांचा बदलता दृष्टिकोन यामुळे ते साधी राहणी व हस्तव्यवसायाची आदर्श पद्धती यांच्या विरुद्ध संघर्ष करीत आहेत. पण दैवदुर्विलास मात्र असा की राजकीय नेते मंडळी आणि इतर लोक गांधीजींच्या संकल्पना प्रत्यक्षात न उतरवता केवळ त्यांच्या स्तुतीचा राग निरंतर आळवीत राहतात. गांधीजी हे सुधारक होते. समाजाचे कल्याण व्हावे अशी त्यांची उत्कट इच्छा होती व सामाजिक समतेसाठी त्यांनी कार्य केले. कट्टर सनातनी लोक केवळ प्राचीन आहेत म्हणून धर्मग्रंथांना दृढतेने चिकटून राहतात, गांधीजी तसे नव्हते. लोकांच्या मनात त्यांच्याविषयी श्रद्धा होती. अशा व्यक्तीच्या वर्णाश्रमविषयक विचारांचा तुमच्यावर खोलवर प्रभाव होईल असे मला वाटते.

लोक सामान्यपणे जातिव्यवस्थेचा विरोध का करतात ? कारण जातीमुळे समाजात भेदभाव व विषमता वाढून त्यातून कलह निर्माण होतो असे त्यांना वाटते. मी तुम्हाला वारंवार सांगितले आहे की वस्तुतः कोणतीही जात दुसऱ्या जातीपेक्षा कनिष्ठ किंवा श्रेष्ठ नाही. तथापि वर्णधर्मांचे टीकाकार मात्र असे म्हणतात की वर्णधर्माने खरोखरीच समाजात विषमता निर्माण केली असो वा नसो, वर्णधर्मामुळे विषमता आली असे मत मात्र तयार झाले आहे. पुढे टीकाकार असे म्हणतात की, तुम्ही स्वतःचे स्वतःच पाहा, वर्णधर्मामुळे कलह निर्माण झाला आहे आणि ही भांडणे अशीच अनिश्चित काळापर्यंत चालू राहू देऊन आम्हास समाजाचे विभाजन व्हावयास नको असल्याने ही जातिव्यवस्थाच संपविली पाहिजे.

हे बोलणे म्हणजे डोकेदुखी बरी करण्यासाठी शिरच्छेद करण्यासारखे आहे. जुना धर्म जर समाजातील कलहाच्या डोकेदुखीने त्रस्त असेल तर डोकेदुखी थांबवून पुन्हा स्वास्थ्य प्राप्त करणे हे आमचे कर्तव्य आहे. हे कसे होईल ? तर वर्णधर्माच्या विरोधकांशी आम्ही मित्रत्वाने, शांतपणाने आणि वर्णधर्माच्या खऱ्या तत्त्वांविषयी वारंवार बोलले पाहिजे आणि कलह निर्माण करणारे त्यांच्या मनातील गैरसमज दूर केले पाहिजेत. वर्णव्यवस्थेला

निकोप ठेवण्याचा हाच मार्ग आहे. कलह आहे म्हणून आपल्या समाजाचा उगम आणि मूळ असलेला धर्मच उखडून टाका हे म्हणणे मूर्खपणाचे आहे.

कलहाचे कारण जर 'काहीतरी' असेल तर ते 'काहीतरी' आपले आपण नष्ट पावणार नाही. जगातली कामे आपण अशा पद्धतीने करू शकत नाही. प्रत्येक प्रश्नाच्या बाजूने काही लोक व विरुद्ध बाजूने काही लोक असणारच. मतभेद अटळ असतात. सांप्रतच्या काळात संघर्ष निर्माण करणारे दोन प्रश्न आहेत, एक भाषावाद आणि दुसरा भिन्न विचारप्रणाली; हे संघर्षाचे कारण आहे. म्हणून आम्हाला भाषा नको किंवा विचारप्रणालीच नको असे म्हणणे असमंजसपणाचे होईल.

आमच्या देशात भाषावादावरून ज्या प्रकारचे झगडे चालले आहेत तसे प्रकार जगात अन्यत्र कोठेही नसतील. जातिवादावरील कलह-वेडाचार अत्यंत तीव्र असला तरी भाषावादाच्या तुलनेत कमी प्रमाणात आहे. तामीळ आणि तेलुगुभाषक एकमेकांत भांडत राहतात. तसेच बंगाली हे बिहाऱ्यांशी आणि कन्नडिग हे मराठी भाषकांशी भांडत आहेत. इंग्लिश विरुद्ध हिंदी हा वेगळा संघर्ष चालूच आहे. भाषेच्या प्रश्नावरून सारे एकमेकांवर आघात करीत आहेत. हे प्रश्न तुम्ही कसे सोडविणार आहात? का यावरील उपाय म्हणून तुम्ही 'सार्वत्रिक मौन' स्वीकारणार आहात ? सर्व भाषा बोलणे बंद करून त्यांचे विसर्जन करणार आहात?

कोणत्या प्रकारचे प्रशासन असावे यासारख्या राजकीय प्रणालीसंबंधीचे कलह असंख्य आहेत. कम्युनिझम आणि भांडवलशाही हा फार मोठे विच्छेदन करणारा कलह आहे, ज्याच्यामुळे संपूर्ण जगात अशांती आहे. राजकीय प्रणालींच्या संघर्षात प्रत्यक्ष युद्धे न पेटताही हजारो जणांचे बळी जात आहेत. कम्युनिझम आणि भांडवलशाही या संघर्षाशिवाय साम्राज्यवाद आणि प्रजातंत्राचा उदय, तसेच हुकूमशाहीच्या सरकारांची स्थापना यासारखे अशांती निर्माण करणारे प्रश्न जगाच्या विभिन्न भागांत उद्‌भवत असल्याचे तुम्ही पाहताच आहात. आपण लोकशाहीचे पुरस्कर्ते आहोत असा प्रत्येकजण मनापासून उद्‌घोष करीत असला तरी राजकीय विचारप्रणालींच्या प्रश्नावरून माणसा-माणसात मतभेद असल्याने सर्व कलह निर्माण होत आहेत.

विचारप्रणालींच्यामुळे कलह निर्माण होत आहेत म्हणून सर्व विचारप्रणालींना तिलांजली द्यायला हवी हे म्हणणे कितपत संयुक्तिक होईल? कोणतेही सरकार कुठल्या ना कुठल्या तरी विचारप्रणालीवर स्थापन झालेले असते, हे खरे ना? कोणतीच विचारप्रणाली नाही असे कोणतेही सरकार नाही, हे देखील बरोबर आहे ना? मग कायदा आणि सुव्यवस्था राखणारी कोणतीच अधिकृत यंत्रणा नाही म्हणून आम्ही प्रशासनाचे काम करणाऱ्या सर्व संस्थाच बंद करावयाच्या आणि जनावरासारखे वागावयाचे की काय?

भांडणाचे मूळ आहे म्हणून भाषाच नकोत आणि वैचारिक संघर्षातून युद्धे पेटतात म्हणून सरकारेच नकोत असे म्हटले तर, तंटे बखेडे निर्माण होतात म्हणून धर्म आणि जातीच नकोत हे म्हणणे तर्काच्या ओघानेच आले. एक पायरी याच्यापुढे जाऊन असे म्हणता येईल का की आम्ही माणसे एकमेकात भांडत राहतो म्हणून आम्ही आमचे आम्हालाच ....? *(यानंतर परमसद्गुरू हे वाक्य अपुरे ठेवून केवळ हसले.)*

जातींच्या विरोधात जरी कर्णकर्कश आवाजात आंदोलने केली जात असली तरी एक महत्त्वाचा घटक म्हणून निवडणुकींच्या काळात जातींचा विषय उद्भवतोच ना ? जातींच्या आधारावरच सर्व राजकीय पक्ष निवडणुका लढवितात. 'आम्हाला जात नको' या घोषणेचा अर्थ आम्हाला विशिष्ट जात नको असाच खरोखर पाहू गेले तर असतो.

आपली सामाजिक जबाबदारी म्हणून प्रत्येक जातीला काही विशिष्ट कर्तव्य सोपविलेले नसेल तर जातिव्यवस्था केवळ औपचारिक पद्धतीने चालू ठेवण्यात काहीच अर्थ नाही. वंशपरंपरेनुसार प्रत्येक समूहाला किंवा जातीला व्यवसाय ठरवून देणे हे सर्व समाजाच्या हिताचे आहे. स्वतःमध्ये असलेल्या ध्वनींच्या महानतेने व गहन सत्याने जे वेद अखिल जीवित प्राणिमात्रांना आनंद देतात त्या वेदांचे सर्व आयुष्यभर पठण करीत राहण्याचे काम सोपविलेला एक वर्ग असणे ही या देशाची महत्त्वपूर्ण विशेषता आहे. मंत्रांचा अभ्यास करण्याइतकेच, वैदिक परंपरेचे अंग असलेले धार्मिक विधी पार पाडणे हे या समाजसमूहाचे कर्तव्य आहे.

जाती-जातीमध्ये 'उच्च' व 'नीच' या प्रश्नावर तंटे निर्माण होण्यास वर्णव्यवस्था जबाबदार आहे असे आधुनिक लोकांचे म्हणणे आहे. या उलट माझे म्हणणे असे आहे की प्रतिष्ठेच्या विषयात सर्व प्रकारच्या उच्च-नीचतेच्या भेदभावापासून समाजाला मुक्त करण्याच्या यथार्थ हेतूने आम्हाला जातिव्यवस्थेची आवश्यकता आहे. आम्ही या विशिष्ट जातीत जन्माला आलो आहे तर असू दे, ती ईश्वराची इच्छा आहे व आमचा व्यवसाय देखील त्याच पद्धतीने आमच्या वाट्याला आला आहे. आम्ही तो व्यवसाय समाजाच्या हितासाठी दृढतेने व यथाशक्ती उत्तम तऱ्हेने करू. एखाद्या व्यक्तीस अन्य व्यवसाय करणे अधिक चांगले वाटत असेल तर तीही ईश्वराचीच इच्छा समजावी. 'आमच्या वाट्याला आलेले काम ईश्वरार्पण बुद्धीने आम्ही प्रत्येकजण करू' असा विचार जर वृद्धिंगत होईल तर एखादे काम श्रेष्ठ किंवा हलक्या प्रतीचे अशा विचाराला किंवा भावनेला जागाच राहणार नाही.

आम्ही हा भाव रुजविण्याचा व तो प्रत्येकात वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आम्ही या भावनेने आचरण ठेवून आमचे जीवन अनुकरणीय उदाहरण म्हणून समाजासमोर ठेवू तर यासारखा जातिव्यवस्थेचा खरा हेतू लोकांना पटवून देण्याचा दुसरा

अधिक चांगला उपाय नाही. असे केल्यावर या विषयात आमच्या 'मौखिक प्रचाराची' देखील गरज राहणार नाही. समाजात जर अनिष्ट भावना असेल तर ती वर्णधर्माच्या संकल्पनेमुळे आहे असे समजणे बरोबर होणार नाही. खरोखरच अगदी या क्षणापासून जर आम्ही धर्माचे आचरण त्याच्या मूलभूत तत्त्वाला धरून करू तर कडवटपणामुळे समाज दुभंगण्याचे कारणच उरणार नाही.



जातिधर्माचा ऱ्हास झाल्यावर उपजीविका भागविणे ही समस्या प्रत्येकापुढे निर्माण झाली. पैशाचा मोह या चिंतेचाच स्वाभाविक परिणाम होय. सुमारे ७० ते ७५ वर्षांपूर्वी कोणालाच उपजीविकेचा प्रश्न नव्हता. त्यानंतर मात्र प्रत्येकाचे काम कोणते? कर्तव्य काय? याविषयी चिंता निर्माण झाली. उपजीविकेचे साधन प्राप्त करणे हेच जर का फक्त जीवनाचे उद्दिष्ट असले तर तुलनेने कमी प्रतीच्या स्थितीत असलेल्या व्यक्तींच्या मनात, समाजात अधिक समृद्ध व चांगले स्थान प्राप्त केलेल्या व्यक्तींबद्दल द्वेषभावना निर्माण होते. त्यातूनच गैरसमज व भांडणे निर्माण होतात. परंतु जर का प्रत्येक व्यक्ती आपले कर्तव्य आणि ते उत्तम प्रकारे कसे पार पाडता येईल याची चिंता वाहील तर कमी-अधिक प्रतिष्ठेचा प्रश्नच उद्‌भवत नाही. परंतु जर का संपत्ती व प्रतिष्ठा हेच उद्दिष्ट असेल तर मात्र ज्या व्यक्तीजवळ अधिक संपत्ती आहे व ज्याला समाजात अधिक मानाचे स्थान आहे तो स्वाभाविकपणे कमी समृद्ध व कनिष्ठ स्थानावर असलेल्या व्यक्तीपेक्षा श्रेष्ठ समजला जातो. मुद्दा हा आहे की असा विषमतेचा प्रश्न खऱ्या स्वरूपाच्या वर्णधर्मात येतच नाही, जातीवर आधारित समाजव्यवस्था पूर्णपणे नष्ट झाली असती आणि त्याचबरोबर विभिन्न जमातींमधील कलह संपला असता तरी देखील समाजाला वर्गसंघर्षाच्या समस्येला सामोरे जावे लागलेच असते आणि आज तीच स्थिती संपूर्ण जगात पाहावयास मिळत आहे.

आमचा समाज असा असला पाहिजे की ज्यात उच्च-नीच अशी विषमता असता कामा नये. त्यामुळे सर्वजण एका ईश्वराची लेकरे असल्याप्रमाणे, एकमेकात भांडणे न करता, गुण्यागोविंदाने जीवन जगतील. एकमेकाला साहाय्य करीत शांतीने व सुख-समाधानाचे वातावरण सर्वत्र पसरवीत, एकत्र कुटुंबातील माणसांप्रमाणे राहतील. मी तुम्हा सर्वांनाच पुरातन धर्माचे पालन करा असे एवढ्यासाठीच म्हणतो आहे की त्यामुळे आम्ही अशा प्रकारचा आदर्श समाज निर्माण करू शकू. या ध्येयाकडे आम्ही एक लहानसे पाऊल उचलू तर पुढील वाटचालीसाठी ईश्वर आम्हाला मदतीचा हात देईल. मी तशी ईश्वराला प्रार्थना करीत राहीन.

-----

# माझे कार्य

कोठेही, कोणत्याही एखाद्या खेडेगावात एकांतात पूजाकर्म आणि ध्यान करीत मी राहू शकतो. मठ चालविण्यासाठी शहरातल्या जनतेकडून मिळणाऱ्या इतक्या मोठ्या धनाची आवश्यकता नाही. माझ्या मते मठासाठी आवश्यक असलेले किमान धन व मनुष्यबळ असले म्हणजे झाले. इतका मोठा लवाजामा आणि सेवकांच्या मोठ्या ताफ्याची, मठ चालविण्यासाठी गरज नाही. मठाचा आर्थिक आधार आणि बळ म्हणजे त्यावर आधिपत्य करणाऱ्या व्यक्तीचे श्रेष्ठत्व वाढविणे आहे.

मी स्वतःचे एकांतातले जीवन सोडून शहरात येतो ते तुम्ही मला खूप मोठे धन देता म्हणून नव्हे. तुमच्या मनात माझ्याविषयी फार मोठे प्रेम आहे व भक्ती आहे व तुमच्या विनंतीनुसार मी येथे आल्यावर तुम्हाला इतका आनंद होतो म्हणूनच मी येथे येतो. मी येथे यावे असे तुम्हाला वाटते आणि मी तुमच्यात आल्यावर तुम्हाला आनंद होतो. हे तुमचे काम झाले पण येथे शहरात येण्यात माझे स्वतःचे काही काम, माझे कार्य आहे. (हे प्रवचन परमसद्गुरूंनी चेन्नई येथे दिले होते.) काय बरे आहे ते 'माझे कार्य'?

ब्राह्मण आपले वैदिक धर्माचे कार्य करणे सोडणार नाहीत, ते तसेच अखंड चालू ठेवतील अशी काही व्यवस्था करण्यासाठी मी येथे आलो आहे. आमच्या सर्व विचारप्रणाली व जीवनशैली यांचे मूळ स्रोत असलेल्या वैदिक धर्माच्या उन्नतीसाठी काही योजना तुम्हाला तयार करायला सांगावे हे माझे येथे येण्यामागचे खरे प्रयोजन आहे. धर्म या पिढीतच लुप्तप्राय होणार नाही याची खात्री या योजनेने केली पाहिजे. अनादि असलेले वेद हे त्यांच्या मूळ प्रामाणिक स्वरूपात निरंतर प्रज्वलित ठेवले पाहिजेत. वेदांचा हा प्रकाश, ही ज्योत हातात घेऊन संपूर्ण विश्वाला ब्राह्मणाने सेवक होऊन प्रकाशित केले पाहिजे. हे ब्राह्मणाचे कर्तव्य ब्राह्मणांनी केवळ आत्ताच नव्हे तर पुढे येणाऱ्या सर्व पिढ्यांतून करीत राहायला पाहिजे.

ब्राह्मणाला जे ब्राह्मण्य मिळाले आहे ते काही इतरांवर प्रभुत्व गाजविण्यासाठी किंवा स्वतःची वैयक्तिक उन्नती साधण्यासाठी नव्हे तर वेदाचा दीप हातात घेऊन ब्राह्मणाने सेवक होऊन मानवतेला वैदिक धर्माचा मार्ग दाखविला पाहिजे. मी जो येथे शहरात येतो ते ब्राह्मण जमातीला ही प्रेरणा देण्यासाठी येतो की हा वेददीप मालवू न देण्यासाठी ब्राह्मण आहेत, कारण हा प्रकाश लोपला तर संपूर्ण विश्व कायमचे काळोखात बुडून जाईल.

नगरातून आणि शहरातून श्रोते हजारोंच्या संख्येने माझी प्रवचने ऐकायला येतात.

त्यामुळेच मी इतक्या विशाल श्रोतृवर्गाशी प्रत्यक्ष बोलू शकतो. मोठ्या शहरातून माझे हे असे येणे मठाशी संबंधित धार्मिक कृत्यांना हानी पोहचविल्यासारखे असले तरी तुमच्याशी बोलण्याचा हेतू मनात ठेवूनच मी येथे येतो.

माझी प्रवचने ऐकण्यासाठी जमणाऱ्या लोकांसाठी जागोजागी मांडव घालण्यावर तुम्ही किती तरी मोठी रक्कम खर्च करता. स्वतःच्या अनेक समस्या असतानाही तुम्ही माझी प्रवचने ऐकायला येता. तरीदेखील तुमच्या जीवनपद्धतीत काय त्रुटी आहेत हे न सांगता तुमची मने रिझवील असे भाषण देणे माझ्या विवेकबुद्धीला पटत नाही आणि तसे करून मी कदाचित तुमची मने दुखवीत असेन. पण तुमचे धन घेऊन जर मी तुमच्या व जगाच्या हिताचे काही सांगितले नाही तर माझे कोणतेच प्रयोजन मी पूर्ण केल्यासारखे होणार नाही. म्हणूनच वैदिक परंपरेचे रक्षण व सनातन धर्माचे आचरण करा असे मी तुम्हाला वारंवार सांगतो आहे. मी यात यशस्वी होईन किंवा नाही परंतु तसे करा म्हणून मी वारंवार तुम्हाला आवाहन करीत राहीन.

कांची कामकोटी पीठावर मी 'शंकराचार्य' म्हणून १९०७ साली पीठासीन झालो तो दिवस तुम्ही सर्वजण माझ्यावर सुवर्णमुद्रांची वृष्टी करून मोठ्या थाटामाटात साजरा करता. माझ्यावरील अतीव प्रेमापोटी तुम्ही तसे करता. त्यासाठी तुम्ही समित्या स्थापन करता. निधी गोळा करता आणि दिवस-रात्र परिश्रम करता. पण माझ्या नंतर जे आचार्य पीठासीन होतील त्यांचाही तुम्ही याचप्रकारे आदर कराल अशी खात्री देता येईल का? वैदिक धर्मच जर का लोप पावला तर मठ किंवा मठाधिपती हे हवेत कशाला ? तेव्हा मी म्हणतो, 'माझा सन्मान करण्यात, माझा पीठाधीश होण्याचा दिवस साजरा करताना माझ्यावर सुवर्णमुद्रांचा वर्षाव करण्यात, केवढा उत्साह दाखविता. मग वैदिक धर्माचे रक्षण करण्यात तुम्ही तेवढा उत्साह का दाखवीत नाही? या वेदरक्षणाच्या कार्यासाठी समित्या स्थापन करून, योजना आखून, निधी का गोळा करीत नाही ?''

येथून पुढे ब्राह्मण, वैदिक धर्म हा आपल्या संपूर्ण जीवनाचा व्यवसाय करू शकतील अशी परिस्थिती तुम्ही निर्माण करू शकला नाही तरी हरकत नाही. मी तुम्हाला सांगतो की तुमची मुले आठ वर्षे वयाची झाली की ती अठरा वर्षांची होईपर्यंत रोज किमान एक तास तरी वेदमंत्र शिकण्यासाठी, धर्मग्रंथांचे अध्ययन करण्यासाठी पाठविण्याची व्यवस्था करणे इतके तरी कमीत कमी तुम्ही करू शकता. धर्मकृत्ये करण्याचा विधी देखील त्यांना शिकवा. हे कार्य जागोजाग चढाओढीने करा. हे कार्य जर तुम्ही कराल तर खऱ्या अर्थाने तुम्ही माझ्यावर सुवर्णमुद्रा उधळून माझा सन्मान केल्यासारखे होईल.

प्रयत्नाशिवाय काहीही साध्य होत नसते. आपण स्वतःचे काम करीत असलो तर

त्यासाठी कितीही कष्ट करावे लागले तर आपण त्यासाठी तयार असतो. एखादे विद्यापीठ खूप दूरच्या ठिकाणी आहे आणि जर तुम्हाला सांगितले गेले की तुम्ही जर त्या विद्यापीठाची पदवी प्राप्त कराल तर तुम्हाला खूप आकर्षक पगाराची नोकरी मिळेल, तर तुम्ही काय करता? तुम्ही त्या विद्यापीठाचा अभ्यासक्रम ताबडतोब पोस्टाने मागवता आणि तेथे जाऊन अभ्यास सुरू करता. मग आमच्या धर्मकार्यात अनंत अडचणी आहेत म्हणून आम्ही आमचा धर्म गुंडाळून ठेवावा काय? अनंत अडचणी आहेत तर निश्चितच, त्याच प्रमाणात खूप मोठा लाभ आहे आणि पुन्हा ती अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे.

मी तुम्हाला अशाच प्रकारचा त्रास देण्यासाठी येथे आलो आहे. मला आश्चर्य वाटते की तुम्ही माझी सूचना अमलात आणायचे मान्य करून तशी व्यवस्था पूर्ण करीपर्यंत मी तुम्हाला असाच त्रास देत येथे का राहत नाही ? नाहीतरी मला कोठेतरी राहायचेच, मग येथेच का राहत नाही?

शहरातून भजनाचे कार्यक्रम आता पूर्वीपेक्षा खूपच अधिक प्रमाणात होत आहेत. मंदिरांशी संबंधिक कार्य वाढत आहे आणि पुराणावरील प्रवचनांची संख्या पूर्वीपेक्षा वाढली असून असे कार्यक्रम वारंवार होत आहेत याचा मला खूप आनंद आहे. परंतु या सर्व कार्यांचा मूल आधार वेदातून तयार झाला आहे हे आपण लक्षात घेतले पाहिजे. आमच्या धर्मग्रंथाचाच नाश झाला तर त्यावर आधारित असलेले हे कार्यक्रम किती काळ चालू राहतील ? वेद हे पित्याकडून पुत्राला, या पिढीपासून पुढच्या पिढीला सोपविले गेले पाहिजेत. या परंपरेचे आम्हाला विस्मरण झाल्यामुळेच आमचा धर्मच अस्थिर झाला आहे. ब्राह्मणांनी आपला वैदिक धर्म सोडला हेच जगातील सर्व संकटे, दुःखे आणि सर्व प्रकारच्या अनिष्ट घटनांचे वास्तविक कारण आहे.

जातिव्यवस्था नष्ट झाली याची मला चिंता नाही परंतु मानवाच्या कल्याणात जो गतिरोध निर्माण झाला त्याची मला चिंता आहे. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे सोपविल्या जाणाऱ्या वैदिक परंपरेची साखळी खंडित झाली आणि आता ती परंपरा सर्वत्र पुन्हा पूर्ववत कार्यान्वित करणे कदाचित शक्य होणार नाही या वास्तवामुळे देखील मी अत्यंत चिंतित आहे.

वेदध्वनी आणि यज्ञविधी यापासून सूक्ष्म रूपात निर्माण होणाऱ्या शुभत्वातून 'लोकमंगल' किंवा मानवतेचे कल्याण होते हा एकच लाभ नाही. वेदान्तात प्रकट झालेले महान सत्य हे सर्व देशातील मानवांची आत्मिक उन्नती करू शकते. आमच्या वेदान्तात रुची घेऊन विदेशी लोक आमच्या देशात कसे आले ? ते जेव्हा येथे आले तेव्हा त्यांना असे दिसून आले की येथील एक वर्ग जीवनव्रत म्हणून वैदिक धर्माचे पालन करतो आहे. समाजातील एका संपूर्ण वर्गाने वेदकार्याला पूर्ण जीवनभर वाहून घ्यावे अशी वेदात

कोणती महानता आहे हे जाणून घ्यायला ते उत्सुक झाले. त्यांनी येथील धर्मग्रंथांचे

परिशीलन केले आणि विश्वातील अनेक संस्कृतीच्या एकत्वासहित अनेक सत्यांचा शोध लावला.

वेद हे अखिल विश्वाचे कल्याण साधतात, इतकेच नव्हे तर माझ्या मते प्रारंभी संपूर्ण विश्वात वैदिक संस्कृती प्रचलित होती. या विषयाचा सखोल अभ्यास केला तर इतरांचे देखील हेच मत होण्याची शक्यता आहे. अखिल मानवमात्रासाठी काहीतरी असे समान तत्त्व आहे जे सर्वांच्या आनंदाचे मूळ कारण आहे आणि जे विविध धर्मांमध्ये सलोख्याची प्रवृत्ती निर्माण करील. याशिवाय मला असे वाटते की कोणत्याही धर्माच्या लोकांनी वैदिक धर्मातील सत्य जाणून घेऊन आपली आंतरिक उन्नती साधावी.

वैदिक परंपरेसाठी सर्वस्वाचा त्याग करणारा एक वेगळा समाजसमूह नसेल तर या वैदिक परंपरेबद्दल अन्य देशांतील लोकांना रुची निर्माण व्हावी अशी अपेक्षा तुम्ही कशी करू शकता? आमची स्वतःचीच एखादी गोष्ट निरर्थक ठरवून आम्ही टाकून दिली असेल तर इतरांना तिच्यात आवड निर्माण व्हावी अशी अपेक्षा आम्ही करू शकतो का? आम्हीच वेदांची उपेक्षा करू तर तो इतरांना त्यातून लाभ घेण्यापासून दूर ठेवल्याचा अपराध ठरेल. केवळ ह्याच देशातील सर्व जातींच्या लोकांनाच नव्हे तर संपूर्ण जगातील लोकांना आनंद मिळावा म्हणून वैदिक परंपरा अखंड टिकविणे ही वर्तमान पिढीची जबाबदारी आहे. ही जबाबदारी पार पाडल्याशिवाय, केवळ माझ्यावर सुवर्णमुद्रा उधळण्याने कोणताच हेतू साध्य होणार नाही.

मग मी या सुवर्णमुद्रांच्या अभिषेकास संमती का दिली? माझे प्रवचनातील विचार ऐकून घेण्यासाठी तुम्ही इतक्या मोठ्या संख्येने उपस्थित राहिलात म्हणूनच मी कनकाभिषेक करू दिला.

आमचे सामाजिक जीवन कलुषित करणारी, विद्वेष, क्रोध आणि कडवटपणाची भावना नष्ट करावयाची असेल तर वैदिक धर्म टिकवून ठेवण्याची ज्यांची जबाबदारी आहे त्यांनी त्या धर्माशी सत्यनिष्ठ राहून सद्गुणसंपन्न व शांतिपूर्ण असे जीवन जगत इतरांच्या पुढे आदर्श घालून दिला पाहिजे. अशा जीवनापासून होणारा लाभ ताबडतोब दिसून येणार नाही. हरताळ पाळले जातात तेव्हा काय घडते ? सर्व दुकाने बंद केली जातात आणि जनतेला अनन्वित अडचणींना तोंड द्यावे लागते. वैदिक धर्मरक्षणाचे कार्य असेच बंद पडल्यानंतर काय होईल याचा विचार करा. याचे समाजाला भोगावे लागणारे दुष्परिणाम हे ताबडतोब दिसणार नाहीत, पण काही काळानंतर दिसून येतील. नंतर मात्र, वेदाध्ययन हेच जीवनकार्य मानून त्या कार्याला वाहून घेणाऱ्या एका विशिष्ट वर्गामुळे होणारे फायदे सर्वांना कळतील. केवळ ब्राह्मण वर्ग जरी आपले कर्तव्य करण्यास चुकला नाही तरी

साऱ्या समाजात आज दिसणारा विद्वेष एक दिवस पूर्णपणे नष्ट होऊन त्या जागी पुन्हा आनंद नांदू लागेल.

आपल्या गौरवपूर्ण भूतकाळात मनु तामीळ प्रदेशात राहत होते. वेदाध्ययन, आत्मिक साधना आणि भक्ती हे येथेच आपल्या वैभवाच्या शिखरावर पोहोचले होते. 'द्रविडेशु भूरीश' असे ते म्हणत असत. तामिळनाडु मध्ये तायुमानवर आणि पिट्टिनट्टार सारखे मोठे संतच नव्हे तर वेदनायगम पिल्लाई आणि मस्तान साहिब सारखे अन्यधर्मीय श्रेष्ठ पुरुष देखील झाले, जे तामिळभूमीच्या विशेष गुणांमुळे 'वेदान्ती' झाले.

ही भूमी वेदांचे मूळ उगमस्थान आहे. असे मानले जाते की जेव्हा कलियुगाचा शेवट जवळ येईल तेव्हा श्रीविष्णूंचा दहावा अवतार कल्की हा वेदांच्या रक्षणाचे अवतारकार्य करण्यासाठी द्राविड भूमीच्या तिरुनेलवेली प्रदेशात जन्म घेईल. आपले जीवनकर्तव्य अत्यंत दृढतेने पार पाडणाऱ्या ब्राह्मणाच्या पोटी तो जन्माला येईल असे पुराणात म्हटले गेले आहे. अशा या पवित्र भूमीमध्ये वैदिक धर्माला विरोध करणारे कोणी नसेल. मी येथे या मद्रास शहरात आलो ते तुम्हास याचेच स्मरण करून देण्यासाठी आलो आहे की वेदपरंपरा अखंड ठेवण्यासाठी, वेदाची गुरुकिल्ली ब्राह्मणांच्या हातात आहे.

अन्य कोणत्याही धर्मात घातले जात नाहीत इतके आत्मसंयमनाचे यमनियम आमच्या धर्मात, त्याच्या अनुयायांवर घातले जातात, परंतु हे नियम त्याला त्याच्या योग्य अवस्थेला, जीवनाचे खरे ध्येय असलेल्या उद्दिष्टाच्या ठिकाणी पोहचविण्यासाठी आहेत. हे नियम जसे प्रत्येक व्यक्तीसाठी आहेत. तसेच ते जातिसमूहासाठीही आहेत. हा आत्मनिग्रहाचा प्रत्येक नियम सरोवराला किंवा नदीला घातलेल्या बांधासारखा आहे. हा बांध नष्ट केला गेला किंवा तो वाहून गेला, तर त्याच्या आसपासच्या सर्व क्षेत्राचा विध्वंस होतो. सांप्रत, व्यक्तिजीवनास किंवा समाजजीवनास कोणतेच नियम-प्रतिबंध नाहीत. एकेकाळी धर्माने आपल्या अनुयायांवर घातलेले असंख्य नियम देखील आज उरलेले नाहीत.

मी गावोगाव जाऊन प्रवचने देत असतो. ब्राह्मणांनी उर्वरित समाजाचे मार्गदर्शक होणे अपेक्षित असल्याने त्यांच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठीच मी असे करतो. ब्राह्मण समाज समजो किंवा न समजो किंवा मला तसे वाटत असेल, पण एक असा सर्वसाधारण समज आहे की ब्राह्मण लोक हे माझ्याशी अधिक जोडले गेलेले आहेत. म्हणून ब्राह्मणांना त्यांच्या धर्माशी जोडण्यात जर मी प्रथमतः थोडाफार यशस्वी झालो तर इतरांना त्यांचा धर्म शिकविण्याचे बळ मला येईल.

थोडक्यात, मला ब्राह्मणांकडून काय अपेक्षित आहे? मर्त्य देह त्यागण्यापूर्वी श्रीमद्

शंकरचार्यांनी पाच श्लोक लिहिले आहेत, ज्यात त्यांच्या उपदेशाचे खरे सार आलेले आहे. प्रारंभीच आचार्यांनी जे सांगितले आहे ते मी आजकाल ब्राह्मणांना सांगत असतो. आचार्य म्हणतात, ''वेदो नित्यम् अधियताम्'' हाच उपदेश अयुब्बियार या संत कवयित्रीने केला आहे. तो अगदी आचार्यांच्या श्लोकाच्या तामीळ भाषांतरासारखाच आहे. 'तुम्ही दररोज वेदांचे पठण केले पाहिजे' असे जे आचार्यांनी सकारात्मक पद्धतीने सांगितले आहे ते या भाषांतरात 'तुम्ही वेदपठण केल्याशिवाय एक दिवस घालवू नका' असे नकारात्मक पद्धतीने म्हटले आहे. तामीळ भाषेत वेदाला 'ओत्तु' असे म्हणतात. 'तिरुक्कुरुल' ला ही हाच शब्द वापरतात. जेथे वेदांची पूजा केली जाते त्या स्थानाला 'वेदपुरी' असे म्हणतात. तामीळमध्ये त्याला 'तिरुवोत्तुर' असे म्हणतात. ब्रह्मदेवाच्या व्युत्पत्तिकाळापासून आजपर्यंत वेदांचे पठण अखंड होत आहे. मी जागोजाग जाऊन लोकांना त्रास देत असतो आणि माझ्या या भेटी दरम्यान त्यांना खूप खर्च करायला भाग पाडतो. वेदांचे मुखाने पठण सतत होत राहिले पाहिजे हे त्यांच्या मनावर बिंबविण्यासाठीच मी असे करीत असतो.

तुम्ही हजारोजण येथे जमलेले आहात. माझ्या सांगण्याचा प्रभाव तुम्हापैकी किमान दहा ते वीस जणांवर तरी होईल व ते माझ्या विचारावर चिंतन करून त्याप्रमाणे आचरण करू लागतील अशी मला आशा आहे.

मोठमोठ्या शहरात आणि नगरात लोक जेव्हा स्थलांतरित झाले तेव्हा त्यांचे त्यांनाच कळून चुकले की त्यांना आता आपल्या धर्माने जसे जीवन जगायला शिकविले होते त्याच्या विरुद्ध जगणे भाग पडत आहे. नागरी क्षेत्रातूनच आधुनिक संस्कृतीचे निकृष्ट पैलू पाहावयास मिळतात. म्हणूनच अशा ठिकाणी यावयाचे टाळून खेडेगावातच राहणे मी अधिक पसंत करतो. परंतु तुमच्या सारख्या शहरातल्या लोकांनी मला शहरात येण्याचा आग्रह केला आणि त्यांच्या प्रेमाने मी भारावून गेलो. त्यांची विनंती स्वीकारण्यास प्रारंभी मी तयार नव्हतो. मी त्यांना म्हणालो, ''प्रथमतः, थोड्या प्रमाणात का होईना आपल्या पुरातन जीवनपद्धतीचा तुम्ही अवलंब करण्याचे मान्य करीत असाल तर मी तुमच्या शहरात येण्यास तयार आहे. लगेचच तुम्ही वेदाचे पाठ घ्यायला हवेत असे नाही. पण प्रारंभी तुम्ही वैदिक धर्माने सांगितलेला बाह्य भाग आचरणात आणायला सुरुवात करा. कचेरीतला शिपाई गणवेश घालतो की नाही ? त्याचप्रमाणे ब्राह्मणाने 'पंचकच्छ' म्हणजे धोतर नेसावे आणि 'शिखा' म्हणजे शेंडी राखावी. ही काही त्याचे श्रेष्ठत्व दाखविणारी चिन्हे नव्हेत, उलटपक्षी तो अन्य सर्व जातींचा आणि वेदांचा सेवक आहे हेच त्यातून दिसून येईल. मी तुमच्या शहरात यावे असे वाटत असेल तर ही बाह्यचिन्हे तुम्ही धारण करावयास हवी.

मी घातलेल्या या अटी व्यर्थ ठरल्या. कदाचित माझ्या सांगण्याप्रमाणे आपली

वेषपद्धती किंवा बाह्यस्वरूप बदलण्याची ब्राह्मणांची इच्छा नव्हती किंवा तसे करण्याचे त्यांच्याजवळ धैर्य नव्हते. तरी परंतु मी त्यांच्या गावी यावे अशी त्यांनी मला वारंवार विनंती केली. अखेरीस मीच स्वतःशी तडजोड केली आणि जरी त्यांनी माझे म्हणणे ऐकले नव्हते तरी मी त्यांचे निमंत्रण स्वीकारले. मी माझे मलाच सांगितले, 'त्यांना अजूनही माझ्याविषयी थोडाफार आदर आहे, तर चला त्यांची विनंती मान्य करून, त्यांच्याशी प्रत्यक्ष बोलून, आपला हेतू साध्य होतो का पाहू या. नाहीतरी मठ कशासाठी आहे ? लोकांतील अनिष्ट नष्ट करीत त्यांना सन्मार्गावर आणून त्यांचे कल्याण साधणे हेच मठाचे प्रयोजन आहे ना ? माझ्या मते त्यांचे काय चुकले आहे याविषयीचे माझे म्हणणे त्यांना आवडो न आवडो, त्यांच्याशी वारंवार संवाद साधणे हे माझे कर्तव्य आहे.

अशा प्रकारे मी शहरांना पुन्हा भेटी देण्यास प्रारंभ केला. जेव्हा जेथे जाईन तेथे रस्ते गुढ्या-पताकांनी सुशोभित करीत लोक माझे आनंदाने स्वागत करून सन्मान करू लागले. तेव्हा त्यांच्या चुकांबद्दल बोलून त्यांच्या भावना कशा दुखवाव्यात असे मला वाटू लागले. प्रत्येकाच्या जीवनात काही ना काही समस्या असतात. जग उद्वेग-गोंधळात बुडून गेले आहे आणि लोक अनंत प्रकारच्या अडचणींचा सामना करीत आहेत. अशा या स्थितीतही स्वतःच्या समस्यांचा विसर पडावा ही आशा धरून ते माझ्याकडे येतात. अशा वेळी त्यांच्या चुकांचा पाढा वाचणे योग्य होईल का? का आलेल्या प्रत्येकाचे मन आनंदित होईल यासाठी मी माझे धार्मिक प्रवचन थोडे रंजनात्मक करावे?

लोकांचे हित कशात आहे, समाजाचे भले कशाने होईल हेच मी सतत सांगत राहावे की काही काळ त्यांच्या मनाला आनंद देणारे, दरबारातले खेळीमेळीचे वातावरण निर्माण करावे ? पण दरबारात संगीत जाणणारी माणसे असतात. मग त्याप्रमाणे काहीसे मनोरंजन करण्यासाठी मला का बोलवावे ? पैशासाठीच मला हे करायचे असेल तर मला श्रोत्यांना तात्पुरता आनंद द्यावा लागेल. पण पैसा हे तर माझे प्रयोजन नाही. अधिक पैसा जमू लागला की अधिक संख्येने येणाऱ्या श्रोत्यांच्या वाढत्या आवश्यकतांची पूर्तता करण्यासाठी विद्वान मंडळींच्या सभांचे आयोजन इत्यादीवर तो अधिक जमलेला पैसा खर्च होतो. लहान खेडेगावातून मठ कमी खर्चात चालविता येतो. तेव्हा संपूर्ण समाजाच्या जीवनाचे कल्याण कशात आहे, त्यांच्या हिताचे काय आहे हे बोलण्याचाच प्रयत्न करावयास हवा. हेच मठाचे नेमके प्रयोजन नाही काय?

असा विचार करून मी याप्रमाणे निष्कर्ष काढला की, 'माझे प्रवचन ऐकून माझ्या आदेशाप्रमाणे वागणे न वागणे शहरातील श्रोत्यांवर निर्भर आहे पण माझे हे बोलणे त्यांना आवडो न आवडो, त्यांची कर्तव्ये तसेच आध्यात्मिक उन्नतीसाठी त्यांनी काय करावयास हवे यावर आणि मानवी जीवनातील खऱ्या आनंदाविषयीच मी त्यांना संबोधित करीन.'

त्यांच्या कर्तव्याविषयी त्यांना उपदेश करण्याशिवाय मी काहीच करू शकणार नाही. माझ्या सांगण्याप्रमाणे ते वागले नाहीत तर त्यांना शासन करण्याचा मला अधिकार नाही. सर्वांच्या एकात्मतेवर आणि समतेवर विश्वास ठेवणाऱ्या राजकीय पक्षांना देखील गैरव्यवहार करणाऱ्या आपल्या सदस्यावर शिस्तभंगाची कारवाई करावी लागते, काहीजणांची अस्पृश्याप्रमाणे हकालपट्टी केली जाते. कोणत्याही अपराधाबद्दल कोणालाही बहिष्कृत करण्याचा मला अधिकार नाही किंवा अशा प्रकारच्या अधिकाराची मी मागणीही करू शकत नाही. लोकांनी फक्त माझे म्हणणे ऐकून घ्यावे एवढाच हक्क मी मागू शकतो. मला जे करावयास हवे ते मी करू शकत नसून देखील मी आहे त्या स्थानावर टिकून आहे.

कोठे का होईना परंतु एखादा माणूस जरी माझे म्हणणे नीट ऐकून मनावर घेईल व त्याप्रमाणे आचरण करील तरी पुरेसे आहे. ती व्यक्ती म्हणजे कार्याचा प्रारंभ म्हणून प्रगतीच्या दिशेने पडलेले पहिले पाऊल असेल. तिळमात्र देखील औचित्य नसलेल्या चळवळी, प्रारंभी केवळ दहाबारा माणसेच असता वाढल्या नाहीत काय? चांगले उद्दिष्ट असलेल्या कार्याला देखील प्रथम दहा माणसे मिळाली तरी पुरेसे आहे.

मला अपेक्षित अशी माणसे माझ्या कार्यासाठी भेटतील या आशेवर मी प्रवचने देत राहतो. मी तुमच्याविषयी अत्यंत असमाधानी आहे असे मानून तुम्ही दुःखी होण्याचे कारण नाही. आधुनिक जीवनातील गुंतागुंत आणि समस्या याविषयी मी अनभिज्ञ नाही. कोणी या जीवनात एकदा का अडकला की त्यातून सुटणे महाकठीण आहे हे मला ठाऊक आहे. अशा परिस्थितीतही तुम्ही महाकुम्भाभिषेक, भजने, प्रवचने इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन करता याचा मला आनंद आहे. या तुमच्या सर्व कार्यांचा मूळ आधार, प्राणतत्त्व असलेल्या विषयासंबंधी तुमच्याशी बोलताना मला अत्यंत उत्साह वाटतो. वैदिक धर्माला याने उत्तेजन मिळते.

सांप्रतच्या जीवनपद्धतीत शास्त्रबाह्य वर्तनाचे अनेक अपराध घडण्याचा संभव असला आणि भविष्यकाळ चिंतेचा असला तरी देखील आमच्या कल्याणाच्या काही निश्चित संकेतांनी मला पुन्हा आश्वस्त केले आहे. 'पूर्वीचे सर्व काही नष्ट झाले आहे' असा शोक करीत बसण्यापेक्षा, वर्तमानकालीन जीवनपद्धतीतील शुभतत्त्वे वाढीस लावणे आणि अजून काय करणे आवश्यक आहे यावर बोलणे अधिक योग्य होईल. असे करण्याने जे योग्य मार्गापासून भरकटले आहेत त्यांना आज ना उद्या प्रकाश दिसेल आणि ते शहाणपणाच्या मार्गाकडे, सन्मार्गाकडे वळतील.

या सर्व गोष्टींमुळे मला जीवनक्रमणाचे जुने मार्ग आणि जुन्या परंपरा या विषयावर बोलण्याचा आत्मविश्वास मला मिळतो. जुने ते सर्व चांगले असतेच असा मी दावा करीत

नाही. त्याचबरोबर केवळ जुने म्हणून काहीही नाकारले जाऊ नये असे मला वाटते. एखादी गोष्ट जुनी किंवा नवी या आधारावर तिचे मूल्यमापन केले जाऊ नये तर तिची उपयुक्तता तपासूनच ती ग्राह्य की त्याज्य, हे ठरवावे. नव्यात जे जे चांगले ते आपण घेऊ या आणि जुन्यात जे जे वाईट ते टाकून देऊ या. त्याचप्रमाणे नव्यातले वाईट टाकू या आणि जुन्यातले चांगले तेवढे घेऊ या. महाकवी कालिदासाने 'मालविकाग्निमित्र' या नाटकात खालील श्लोकात असेच म्हटले आहे -

पुराणमित्येव न साधुसर्वम्
न चापिकाव्यम् नवमित्यवद्यम्
संतः परिक्षान्पतरद् अजन्ते
मूढः परप्रत्ययतेय बुद्धिः ।।

अत्यंत प्रेमाने तुम्ही मला निमंत्रण दिले आणि माझा अत्यंत आदर केलात. तेव्हा तुमच्या सध्याच्या जीवनपद्धतीत काय चांगले नाही ते सांगावयास मला बरे वाटत नाही. भक्ती, ज्ञान, संस्कृती इत्यादी अनेक विषयांचा मी परामर्श घेतला आहे. परंतु ते सर्व विषय, वेदांनी तयार झालेल्या मूळाच्या आधारावर असलेल्या अनेक शाखा , फुले आणि फळे यांप्रमाणे आहेत. कोणतीही गोष्ट या वेदाशिवाय उगवत नाही, वैदिक परंपरेशिवाय बहरत नाही. हा महत्त्वपूर्ण विषय सोडून अन्य विषयांवर बोलणे व्यर्थ आहे. वैदिक धर्माचे रक्षण ही आमच्या धर्माची करीत असलेली मूलभूत सेवा आहे. या विषयावर बोलताना आम्हास वर्तमानकालीन जीवनातील त्रुटीवर विस्ताराने बोलणे आवश्यक आहे. अन्य विषयांवर तुमच्याशी बोलल्यानंतर आणि तुमच्यात मिळून मिसळून गेल्यावर मी तुमचा स्नेही झालो आहे आणि म्हणून तुमचे कर्तव्य आणि तुमची जबाबदारी याबद्दल बोलण्याचे स्वातंत्र्य मी घेऊ शकतो. तुमच्या जीवन जगण्याच्या पद्धतीत काय चुकते आहे हे तुम्हाला सांगावयास पूर्वीइतके आता मला अडचणीचे वाटत नसल्याने मी 'वेद' या विषयावर बोलणार आहे.

आणि माझ्या येथे येण्याचे हेच प्रयोजन आहे. परंतु त्याविषयी प्रारंभीच बोलणे माझ्यासाठी योग्य होईल का? माझा सन्मान करून आणि माझे मन आनंदित करून तुम्ही तुमचे काम पूर्ण केले असल्याने आता मी वैदिक जीवनपद्धतीला बळ देण्याच्या महत्त्वाविषयी बोलून माझे कर्तव्य करू शकेन असे मला वाटते. हा हेतू साध्य करण्यासाठी मी तुम्हाला खूपच त्रास दिला असून यासाठी तुम्हाला बराच खर्चही करावा लागला. हे सर्व अपुरे पडले म्हणूनच की काय मी विनोबा भावे यांच्याप्रमाणे संपत्ती दान करा असे आवाहन करणार आहे. गांधीवादी विनोबा भावेंनी प्रथम भूदान अभियान सुरू करून नंतर त्यात संपत्ती दान व श्रमदान यांचा समावेश केला.

प्रत्येक ब्राह्मणाने वेदांचे अध्ययन केले पाहिजे व वेद आपल्या मुलांस शिकविले पाहिजेत. हे जरी आवश्यक असले तरी एक याहून अधिक महत्त्वाचे काम प्राधान्य देऊन करावयाचे आहे आणि ते म्हणजे शेवटचे क्षण मोजीत असलेल्या, वेद शिकविणाऱ्या पाठशाळा बंद न पडू देता त्यांना नवे चैतन्य दिले पाहिजे. हे करण्यासाठी वेद शिकविणारे शिक्षक आणि शिकणारे विद्यार्थी या दोघांनाही आर्थिक मदत केली पाहिजे. केवळ मंत्रच नव्हे तर त्यांचा अर्थ देखील शिकविणे व परीक्षा घेण्याकरिता अधिक वेदपाठशाळा स्थापन केल्या पाहिजेत. वेद शिकणाऱ्यांना अध्ययन काळात शिष्यवृत्ती दिली पाहिजे. परीक्षेत उत्तीर्ण झालेल्यांना भरीव रोख रकमेचे पुरस्कार दिले पाहिजेत. ही रक्कम त्यांनी परीक्षेत मिळविलेल्या गुणांवर आधारित असावी. वैदिक धर्माचे कार्य चालू ठेवण्यासाठी हे सर्व तुम्हाला करावयास हवे. स्वाभाविकच यासाठी आर्थिक भांडवल हवे.

भांडवल गोळा करण्यासाठी ट्रस्ट निर्माण केलेले आहेत. अनेकजणांनी विनोबा भावे यांनी सुरू केलेल्या भूदानाप्रमाणे मलाही भूदान केले आहे. आता जमिनीवर सिलींगचा कायदा लागू झाला आहे. भविष्यात जमीनमालकांच्या हक्कावर याचा काय प्रभाव होतो तेही पाहावे लागेल आणि एवढ्यासाठीच मी संपत्ती दान करा असे म्हणतो.

तुम्हापैकी प्रत्येकाने, प्रत्येक महिन्याला, स्वतःच्या जन्मनक्षत्र दिवशी एका छोट्या पेटीत एक रुपया टाकावा. जन्मनक्षत्र म्हणजे जन्माचे वेळी जे नक्षत्र होते ते जन्मनक्षत्र. हे प्रत्येक महिन्यात येते. हा रुपया पेटीत टाकताना तुम्ही तो माझ्यासाठी टाकीत आहात, अखेरीस मीच तुम्हाला तसे करावयास सांगितले आहे. बारा महिने होताच हे १२ रुपये तुम्ही 'वेद रक्षण निधीला' पाठविले पाहिजेत. तुमच्या जन्मनक्षत्र दिनी मठ तुमच्याकडे प्रसाद म्हणून पवित्र विभूती, कुंकू व मंत्राक्षता पाठवील. वेदरक्षण निधीस प्रतिवर्षी तुम्ही तुमचे योगदान पाठवीत राहिल्यास तुम्हाला कांची कामकोटी पीठाचे रक्षणकर्ता दैवत असलेल्या चंद्रमौलीश्वराचे (शिवाचे) शुभाशीर्वाद प्राप्त होतील.

तुम्ही 'कर' भरता आणि अनेक गोष्टींवर भरपूर खर्च करता. 'वेद रक्षण निधी' हा मी तुमच्यावर लादलेला कर समजा. प्रत्येक महिन्याला माझ्यासाठी एक रुपया द्या. प्रत्येकाने असे करावयाचे मान्य केले तर वैदिक धर्मरक्षणाच्या कार्याला तुम्ही दिलेला तो मोठा आधार ठरेल. वैदिक परंपरा अखंड राखणे या गोष्टीला माझ्या मनात सर्वोच्च प्राधान्य आहे आणि येणाऱ्या पिढ्यांच्या कल्याणाकरिता आम्हाला आमचे हे कर्तव्य केले पाहिजे.

वैदिक धर्म चिरस्थायी केलाच पाहिजे असे तुम्ही का म्हणता, असा जर तुम्ही मला प्रश्न कराल तर वैदिक मंत्रांचा ध्वनी आणि यज्ञयागादीसारखी कर्मे विश्वाचे भौतिक आणि आध्यात्मिक कल्याण साधतील हे त्याचे उत्तर आहे. दुसरे असे की जगातील अन्य सर्व

देशांतील माणसांना हे कळले पाहिजे की वैदिक धर्म हा एकेकाळी वैश्विक धर्म होता आणि या जनजागृतीच्या जोरावर जर विश्वात एकता आणि शांती प्रस्थापित करावयाची असेल तर आमच्या या देशात वेदांच्या अध्ययनाला पूर्णपणे वाहून घेतलेला एक वर्ग - एक समूह असला पाहिजे. वैदिक धर्म हा केवळ आमच्या देशातीलच नव्हे तर जगभरातील लोकांना समृद्धी आणि आंतरिक शांती देणारा असल्याने त्याचे भरण-पोषण करणे हे नितांत महत्त्वाचे आहे, याचे मी समर्थन करतो.

ज्याला वेदांचे स्वरबद्ध पठण करता येत नाही असा पुढच्या पिढीत एक सुद्धा ब्राह्मण नसावा. आम्हाला दुसऱ्यावर श्रेष्ठत्वाचा अधिकार गाजविणारा ब्राह्मण नको आहे, केवळ आमच्या देशात एकता असावी म्हणून नव्हे तर संपूर्ण जगात एकपणाची भावना निर्माण व्हावी म्हणून, आमच्या आदिकालीन धर्माचे रक्षण करण्याचे कर्तव्य पार पाडणाऱ्या ब्राह्मणाची आम्हाला गरज आहे.

या देशात वैदिक परंपरा अखंड टिकावी म्हणून त्या कार्याला वाहून घेतलेला एक लहानसा समूह संपूर्ण विश्वात आनंद निर्माण करू शकेल असा दावा आम्ही कसा काय करू शकतो? वीजपुरवठा करणाऱ्या पॉवर हाऊसचे उदाहरण घ्या. तेथे केवळ चार पाच जणच काम करतात परंतु संपूर्ण नगराला प्रकाश मिळतो. हे चार पाच कर्मचारी जर काम करणार नाहीत तर संपूर्ण नगर अंधारात बुडून जाईल. त्याचप्रमाणे हा वेदांचा पवित्र दीप प्रज्वलित ठेवण्यासाठी काही थोड्या लोकांची गरज आहे. त्या कार्यासाठी आवश्यक असलेल्या बीज भांडवलाचे रक्षण सर्व प्रयत्नानिशी करणे हे माझे जीवित कार्य आहे. याकरिताच माझ्या सन्मानार्थ तुम्ही आयोजित करीत असलेल्या सर्व समारंभांना मी संमती दिली. या समारंभातून निनादत राहिलेल्या 'जय जय शंकर, हर हर शंकर' या गजराने माझे प्रवचन ऐकायला अनेक लोक येथे जमा केले. माझ्या सन्मानार्थ हे समारंभ आयोजित करणाऱ्यांनी मी काय सांगू इच्छितो त्याकडे नीट ध्यान दिले पाहिजे. जीवनात अनेक गोष्टींसाठी तुम्ही कितीतरी प्रकारचे परिश्रम करता, मग थोडे परिश्रम माझ्याकरिता का करीत नाही? स्वतःकरिता तुम्ही कितीतरी श्रम करता, तुम्ही कचेरीला जाता. स्वतःच्या करमणुकीचा प्रश्न आहे आणि तुम्ही अनेक इतर कामे करता. माझ्याकरिता हे वैदिक धर्माचे कार्य करा.

खरे तर, 'माझ्याकरिता' आणि 'तुमच्याकरिता' अशी तुमच्या-माझ्यात ही भेद निर्माण करणारी भाषा मी का करावी? माझे कार्य हे तुमचेही कार्य आहे. वैदिक परंपरा टिकविण्याचे कार्य हे सर्वांच्याच कल्याणाचे कार्य आहे. हे कर्तव्य करणे म्हणजे तुमचे कल्याण साधण्यासारखे आहे आणि परिणामतः त्यामुळे माझीपण कीर्ती होईल.

-----

# जीवनाचा वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग -४

## शास्त्रे आणि आधुनिक जीवन

प्रकरण - १

# आधुनिक संस्कृती नावाच्या रोगाच्या निवारणाचा उपाय

परस्परविरोधी मतांच्या दोन गटांमध्ये सध्या जनता सापडलेली आहे. एकीकडे शास्त्र-मतानुसार वागावे असे म्हणणाऱ्या आमच्यासारख्या माणसांचा जोर, तर दुसरीकडे विरुद्ध दिशेला ही शास्त्रे बदलली पाहिजेत अशी इच्छा असणाऱ्या सुधारकांकडे ओढली जात आहे. तरुणपणापासूनच आजकालची मंडळी सुधारणेच्या नावाखाली परिवर्तनाची भलावण करणारे छापून येणारे वृत्त वाचीत असतात. हा सर्व आधुनिक शिक्षणाचा प्रभाव आहे. असे जरी असले तरी लोकांनी जुन्या रूढ चालीरीतींचा काही पूर्णपणे त्याग केलेला नाही. शास्त्रात सांगितल्या गेलेल्या आणि शतकानुशतके पाळल्या जात असलेल्या धर्माचे काही प्रमाणात पालन अजूनही आमच्या घरगुती व सामाजिक जीवनात केले जात आहे. एकीकडे परंपरा पाळण्याची लागलेली सवय आहे तर दुसरीकडे नवीन शिक्षण पद्धतीतून अंगवळणी पडत चाललेल्या सवयी आहेत.

आधुनिक जीवनपद्धतीत समाधानाचा अभाव असल्याचे जागतिक स्तरावर मान्य केले गेले आहे. मागच्या पिढ्यांत जी मनःशांती होती ती आजकालच्या जीवनात आढळत नाही. या सत्याबद्दल कोणाचेच दुमत नाही. आता लोकांजवळ खूप मोठ्या प्रमाणात धनसंपत्ती असल्याचे खरे मानले जात आहे. पण लोक खरोखरच दारिद्र्यातून मुक्त झाले आहेत का? प्रत्येक गोष्ट भरपूर प्रमाणात उपलब्ध असल्याचा, आमच्या आवश्यकतेपेक्षा आम्ही अधिक अन्नधान्य पिकवित असल्याचा दावा केला जात आहे. परंतु जीवनावश्यक वस्तूंच्या पुरवठ्याबद्दल सर्वत्र चिंता दिसून येत आहे.

जुन्या साकारलेल्या झोपड्या आणि साधी कौलारू घरे जाऊन त्यांच्या जागी आता अनेक मजली इमारती उभ्या राहिल्या. त्यावेळी आमच्याजवळ स्वयंपाकाची चारपाच भांडी होती. ताडाच्या फांद्यांची टोपली असे. पदार्थ ठेवण्यासाठी भोपळे कोरून त्यांचा उपयोग केला जात असे. आता मात्र घरे आजच्या सुधारणेच्या जीवनाचा भाग असलेल्या सर्व प्रकारच्या वस्तूंनी आणि उपकरणांनी खचाखच भरली आहेत. लोक नव्या नव्या सुखसोयींचा उपभोग घेत आहेत आणि सुखसाधने गोळा करीत आहेत, तरीदेखील आजचे लोक तितके सुखी-समाधानी नाहीत जितके त्यांचे वाडवडिल होते.

आजदेखील असे लोक आहेत जे जुन्या परंपरांनुसार वागत शांतिपूर्ण जीवन मनापासून जगू इच्छितात. परंतु आधुनिक जीवनाचा पायात असलेला खोडा किंवा सुधारणावादी चळवळींनी घडवून आणलेल्या परिवर्तनाबद्दलची गर्वाची भावना झुगारून देण्याची त्यांच्यात हिंमत नाही. पारंपरिक जीवन किंवा नवीन जीवनपद्धती यांपैकी

कोणत्याच पद्धतीशी त्यांची पूर्णपणे बांधीलकी नसल्याने ते अडचणीच्या बिकट परिस्थितीत सापडले आहेत. याबद्दलचा निर्णय लोक स्वतः का घेऊ शकत नाहीत? ते धड ना इकडचे ना तिकडचे अशी त्यांची अवस्था का झाली आहे हे मी स्पष्ट करतो. अनेक घरांतून तुम्हाला गांधीजींचे आणि माझे चित्र पाहावयास मिळेल. गांधीजी विधवाविवाहाचे समर्थन करतात तर मी शेंडी राखा असे सांगतो. जे गांधीजींचा आदर करतात त्यांच्यात विधवेशी विवाह करण्याचे धैर्य नाही किंवा शेंडी राखण्याचीही हिंमत नाही. बिचारे लोक! कोठेच पक्के बांधलेले नसल्याने या ना त्या विचारधारेत हेलकावे खात राहतात. शास्त्रांवर दृढ विश्वास आणि अढळ श्रद्धा ठेवण्याचे आमच्यात धैर्य हवे.

शास्त्रांच्या नियमांचे पालन करण्यात जर आम्ही लहान मोठ्या तडजोडी करण्यास प्रारंभ केला तर अखेरीस आमच्या दैनंदिन जीवनात सोयीस्कर असतील तेवढ्याच, धर्मग्रंथात सांगितलेल्या व्यवहाराचेच पालन केले जाईल. काही लोक मला चांगल्या हेतूने सांगतात, धर्मशास्त्रे ही ऋषींची निर्मिती आहे. तुम्ही ऋषितुल्य आहात. काळानुसार शास्त्रात तुम्ही बदल करावयास हवेत. त्यांचे हे मत म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही रानातले गवत खुरपतो तसे आम्ही आमच्या परंपरा आणि कर्तव्ये यांत कालमानानुसार बदल करावा असे म्हणण्यासारखे आहे. मी जर काही धार्मिक कृत्ये व शास्त्रात सांगितलेले पालन करावयाचे नियम कालमानानुसार गवताप्रमाणे काढून फेकून दिले तर पुढे कोणी दुसरा माणूस येईल आणि याच सबबीखाली अजून काही नियम काढून टाकील. असेच होत गेले तर एक दिवस असा उगवेल की पीक कोणते आणि गवत कोणते हेच न कळल्याने संपूर्ण शेत ओसाड होऊन जाईल.

आम्हाला खऱ्या अर्थाने शास्त्रांशी प्रामाणिक राहावयाचे असेल तर; केवळ शास्त्रात ऋषींचे विचार व्यक्त झाले आहेत म्हणून नव्हे तर ईश्वरप्रणित अशा वेदांवर आधारलेले नियम शास्त्रात ग्रंथित केलेले आहेत ही जाणीव होणे अत्यंत महत्त्वाचे आहे. शास्त्रे जशी आहेत तशी जतन केली जात आहेत हे पाहणे माझे कर्तव्य आहे. शास्त्रात फेरबदल करण्याचा मला अधिकार नाही.

शास्त्राज्ञेचे पालन करणे कठीण आहे म्हणून शास्त्रानुसार असलेल्या जीवनपद्धतीचा आम्ही त्याग करता कामा नये. जर आम्ही आधुनिक ऐहिक जीवनाच्या झगमगाटाने भरकटून गेलो नाही आणि जर आम्ही आमच्या गरजा कमी करून पैशामागे धावलो नाही तर आमच्या धर्मग्रंथांनी निर्धारित केलेल्या चालीरीती व कृत्ये सोडून द्यावी लागणार नाहीत. आम्ही जर पैशामागे धावलो नाही तर ईश्वरचिंतनासाठी आम्हांला भरपूर वेळ मिळेल आणि शांती, समाधान मिळून आनंदाचे पुन्हा राज्य येईल.

शास्त्रविहित धार्मिक कृत्ये करण्यासाठी पैशाची, थाटामाटाची किंवा पूजेसाठी

उपचारांचीही आवश्यकता नाही. पूजा करायला एक सुकलेले तुलसीपत्र किंवा बिल्वदल देखील पुरेसे आहे. स्वतःसाठी शिजविलेला भात देवाला नैवेद्य दाखविलेला चालतो. विवाह हा देखील शास्त्रांच्या आज्ञेप्रमाणे करावयाचा विधी आहे. आम्ही या विधीवर खूप पैसा खर्च करतो. या खर्चाचे काय? असे विचारले जाते. विवाहातून आजकाल दिखाऊपणावर पैशाची उधळपट्टी केली जात आहे ती अनावश्यक आहे. विशेष करून लग्नाचा अत्यावश्यक भाग समजला जाणाऱ्या हुंड्यावरच्या खर्चाला शास्त्रांची मुळीच मान्यता नाही. आमच्या धर्मग्रंथांनी निश्चित केलेल्या धार्मिक कृत्यासाठी पैसा हा महत्त्वाचा असेल तर आमचा धर्म हा केवळ श्रीमंतांचाच आहे असा त्याचा अर्थ झाला असता. पण हे वस्तुतः सत्य नाही.

धर्म, अर्थ, काम (भौतिक सुखसाधन) आणि मोक्ष हे जीवनाचे प्रमुख चार उद्देश आहेत. परंतु आम्ही फक्त कामातील आनंदाचीच म्हणजे सुख, प्रेम आदीची इच्छा करतो. आमच्या इच्छापूर्तीसाठी आम्ही भौतिक सुखसाधने मिळविण्यासाठी संघर्ष करीत राहतो. वास्तविक आमचे प्रयत्न धर्माचरण करून त्यातून मोक्ष मिळविण्याच्या उद्देशाने केलेले असावयास हवेत. हे सर्व साध्य करण्यासाठी खरोखर जर कशाची गरज असेल तर ती म्हणजे आम्ही साधे जीवन जगण्याचा दृढ संकल्प करणे ही होय. मग मात्र पैशामागे किंवा अन्य ऐहिक सुख-साधनांच्या मागे धावण्याचे बंधन उरणार नाही, त्यामुळे धर्माने वागल्यास अविनाशी आनंदाची अंतिम फलप्राप्ती अधिक सहज सुलभतेने होईल.

-----

# धर्म आणि समाज

धर्मसिद्धान्तांचे पालन करताना आपल्या दैनंदिन जीवनात, तर धर्मशास्त्रांच्या नियमांचे पालन करताना सामाजिक जीवनात काही अडचणी निर्माण होतात, असे लोकांना वाटते. या मुद्यावरच सुधारक लोक शास्त्रामध्ये परिवर्तन घडवू इच्छितात.

दुर्दैवाने या सुधारकांना धर्मशास्त्रांची उभारणी कोणत्या सत्यावर करण्यात आली आहे किंवा त्यांचे अंतिम उद्दिष्ट काय आहे या दोन्हींचेही ज्ञान नाही. सामाजिक जीवन असे म्हणताना सुधारकांच्या मनात आत्मविषयक कोणताच विचार नसतो. ते फक्त राजकीय व्यवस्था, वारंवार बदलणारी विज्ञान, व्यापार आणि व्यवसाय व्यवस्था आणि आधुनिक जीवनशैली इत्यादींचाच विचार करतात. आमचे या जगातले अस्तित्व हेच जर केवळ आमच्या सामाजिक जीवनाचे उद्दिष्ट असते तर तत्संबंधीचे नियमही त्याचप्रमाणे परिवर्तनीय असणार. परंतु आमच्या धर्मग्रंथांच्या मतानुसार आमचे सामाजिक जीवन असे केवळ वस्तुनिष्ठ नाही. आमची शास्त्रे ही आत्मनिष्ठ असून भौतिक जीवनातून सुटका करून घेणे, मुक्ती मिळविणे हेच त्यांचे उद्दिष्ट आहे. जे भौतिकाशी संबंधित आहे ते परिवर्तनीय आहे, परंतु आत्म्याशी संबंधित असलेल्या सत्याशी मात्र ते संबंधित नसते. बदलत्या समाजाला अपरिवर्तनीय सत्याच्या मजबूत पायावर स्थिर करणे हेच मुळात शास्त्रांच्या आज्ञांचे प्रयोजन असल्याने तेथे परिवर्तन संभवत नाही.

या जगात सुखसोयींनी भरलेले आरामशीर जीवन प्राप्त करून घेणे हेच आमचे उद्दिष्ट असते तर सामाजिक जीवनाशी संबंधित विषयात घडामोडी, बदल झाले असते. परंतु आमच्या जीवनाचे प्रयोजन अत्यंत उदात्त असून ते आत्मिक सुखाशी संबंधित आहे आणि म्हणूनच आमच्या भौतिक जीवनाचे नियम देखील जीवनाच्या या उदात्त हेतूशी सुसंगत असेच आहेत आणि ते आमच्या सोयीप्रमाणे बदलले जाऊ शकत नाहीत. जगातील भौतिक सुखांना शास्त्रात सर्वोच्च महत्त्व दिले गेलेले नाही. या उलट या जगातील अनेक प्रकारच्या अडचणींना तोंड देऊन, गैरसोयी सहन करून परलोकातले सुख कसे प्राप्त करून घ्यावे हेच शास्त्रे आम्हाला शिकवितात. म्हणूनच आमच्या भौतिक जीवनाला अनुकूल होतील असे शास्त्रात बदल करण्याची अपेक्षा करणे हे काही योग्य ठरणार नाही.

सुधारकांचा हा दृष्टिकोन सांप्रतच्या शिक्षण पद्धतीने तयार झालेला असल्याने त्यांना दोष देण्यात काहीच अर्थ नाही. अन्य देशांतील धर्मविचार आणि त्यांची शिक्षणव्यवस्था यांच्यात विसंवाद नाही. मात्र दुर्दैवाने आमच्या येथे शाळा स्थापन करणाऱ्या ब्रिटिशांना

आमच्या धर्माशी काहीच देणे-घेणे नव्हते. आपल्या उपजीविकेसाठी येथील लोकांना पाश्चात्त्य शिक्षण घेणे भाग पडले. नंतर लवकरच अशी स्थिती निर्माण झाली की एका परकीय पद्धतीने आक्रमण केलेल्या शिक्षणव्यवस्थेत सारे प्रवाहपतित झाले. त्यामुळे सनातन शास्त्राचे ज्ञान वाढविण्याचा, त्याविषयी श्रध्दा निर्माण होण्याचा पर्यायच लोकांपुढे उरला नाही. आपल्या धर्मग्रंथांविषयी व त्यांच्यात अंतर्निहित असणाऱ्या प्रयोजनाबद्दल अज्ञानात ठेवले गेल्यामुळे त्याचा परिणाम म्हणून आपल्या सोयीप्रमाणे शास्त्रांत परिवर्तन केले जाऊ शकते या मताचे सारे स्वतःच समर्थन करू लागले.

आमचा धर्म आणि आमच्या पवित्र धर्मग्रंथांवरील टीका यांच्या प्रभावाखाली आमची तरुण पिढी अगदी त्यांच्या संस्कारक्षम वयापासूनच येते. आमची पुराणे हे असत्य कथांचे बाड असून आमची शास्त्रे अंधश्रद्धा वाढवितात असे त्यांना सांगितले जाते. मग त्यांच्या मनात आमचे धर्ममत, त्यातील धार्मिक कृत्ये आणि परंपरा याविषयी आत्मीयता कशी राहील?

धर्म आणि ईश्वर याविषयीची श्रद्धा लोकांच्या मनात बालपणापासूनच रुजविली जावयास हवी. ज्या महान व्यक्ती धर्माच्या सिध्दान्तानुसार आदर्श जीवन प्रामाणिकपणे जगल्या आणि जगत आहेत त्यांच्याविषयीची माहितीही त्यांना मिळावयास हवी. ऋषिमुनींनी केलेले कार्य, स्वतःच्या आत्मानुभवावर आधारित अशा त्यांच्या रचना, त्यांचा इंद्रियातीत जीवनाचा अनुभव आणि आध्यात्मिक उन्नतीचा त्यांनी दाखविलेला मार्ग याविषयी लोकांच्या मनात आस्था निर्माण केली पाहिजे. ऐहिक आनंद आणि सामाजिक जीवन हे आत्मिक उन्नतीसाठी परस्परपोषक होतील अशा पद्धतीने ऋषींनी आपली शास्त्रे सूत्रबद्ध केली आहेत यावर त्यांचा विश्वास बसण्यास आपण त्यांना साहाय्य केले पाहिजे. तरच केवळ ऐहिक सुख आणि सोयी यापेक्षा धर्माच्या नियमांचे कितीतरी श्रेष्ठ प्रयोजन आहे हे लोक ओळखतील.

-----

# ना ऐश आरामाची लयलूट - ना सुखसोयींची रेलचेल

आता माणसाला जीवन आरामात जगायचे आहे आणि त्याकरिता त्याला! हव्या आहेत सर्व प्रकारच्या सुखसोयी. माणसांच्या अयोग्य इच्छांना अंत नाही. असे म्हटले जाते की अमेरिकेतल्या प्रत्येक माणसाजवळ बंगला, मोटारगाडी, रेडिओ, टेलिफोन इत्यादी आहे पण तेथील माणसे सुखासमाधानात आहेत काय? नाही. आमच्या देशापेक्षा तेथे फार मोठे असमाधान आहे. इतर कोणत्याही ठिकाणापेक्षा गुन्ह्यांचे प्रमाण तेथे अत्याधिक आहे. प्रत्येक अमेरिकी माणसाजवळ स्वतःची मोटार आहे हे ठीक आहे. पण आज असलेली गाडी त्याला दुसऱ्या दिवशी चांगली वाटत नाही. बाजारात रोजच मोटारगाडीचे नवे नवे मॉडेल येत असते आणि प्रत्येक गाडीत कालच्यापेक्षा आज अधिक सुखसोयी पुरविलेल्या असतात. याचाच अर्थ असा की अमेरिकी माणसाला येणाऱ्या प्रत्येक नव्या गाडीबरोबर स्वतःचे उत्पन्न वाढविणे भाग पडते. एक दिवस असा उगवेल की अमेरिकेतला माणूस स्वतःच्या घरातून दुसऱ्या घरी जाण्यासाठी विमानाचा वापर करील.

याचप्रमाणे जगभर राहण्याच्या बाबतीत देखील अशीच प्रगती झालेली आपण पाहतो. प्रथम कुटी किंवा झोपडी होती, नंतर कौलारू घरे आली आणि त्यानंतर सिमेंट कॉन्क्रीटच्या भिंती व छते असलेली घरे आली. घरातील जमिनीचेही हेच झाले. प्रथम गाईच्या शेणाने सारवलेली जमीन होती, नंतर सिमेंटचा गिलावा आला. नंतर त्याजागी मोझाईक फरसबंदी येऊन आता याहून अधिक मऊ आणि चमकदार फरशा तयार करण्यावर संशोधन चालू आहे. वस्त्रप्रावरणांच्या बाबतीतही रोज नवनवीन अधिक चांगल्या आणि तलम कापडाचे उत्पादन केले जात आहे. सध्या जरी आम्ही सुखसोयीचे आरामशीर जीवन जगत असलो तरी आमचे जीवन अधिकाधिक ऐश-आरामाचे करण्यासाठी लागणाऱ्या वस्तू आणि उपकरणे यांचा शोध लावण्यासाठी आम्ही आमच्या बुद्धिचातुर्याचा उपयोग करीत आहोत. असे असले तरी आणि आरामाची सर्व सुखसामग्री आमच्या हाताशी असून देखील एक अस्वस्थतेची - बैचेनीची भावना सतत आमच्या मनात राहण्याचा संभव असतो. याचाच अर्थ हा आहे की आमच्या हवे-हवेपणाला अंत नाही. समाधान किंवा मनःशांतीचा कोणताही अनुभव न घेता आम्ही अधिकाधिक संपत्ती प्राप्त करायला विवश होतो. हे सर्व पेट्रोल ओतून आग विझविण्याचा विचार करण्यासारखे आहे. आम्ही नव्या नव्या वस्तूंचे उत्पादन करू पाहतो आणि या प्रक्रियेत चैन आणि आराम मिळविण्याची आमची लालसा अधिक भडकवत राहतो.

या सत्याचे आमच्या ऋषिमुनींना ज्ञान होते. आम्ही आमच्या अत्यावश्यक

गरजांपेक्षा अधिक कशाचीच इच्छा करू नये असे त्यांनी आम्हाला शिकविले. आधुनिक काळात गांधीजींनी आम्हाला हाच धडा शिकविला.



चालू शतकात लोक प्रगतीच्या नावाखाली दुराग्रही जीवन जगू पाहत आहेत. रोज नव्या नव्या ऐश-आरामाची ही भूक वाढती असेतो तोपर्यंत व्यक्ती किंवा समाज कोणालाच सुखसमाधान मिळणार नाही. माणसांच्या मनात परस्परांविषयी ईर्ष्या, द्वेष आणि मत्सर या भावनांचा अग्नी पेटत राहील.

संक्षेपाने सांगायचे तर वर्णाश्रम धर्मात ब्राह्मण आणि ब्राह्मणेतरांना समान दर्जा आहे. जातिभिन्नता असून देखील सर्वजण सारखेच साधे जीवन जगत होते. सर्व माणसे जर साधे जीवन जगतील तरच समानतेचा आदर्श साधता येईल. या समान व्यवस्थेत प्रत्येक व्यक्ती समाधान आणि आंतरिक सुखाचा अनुभव घेतो आणि कोणालाच इतराच्या समृद्धीचा हेवा करण्याचे कारणच उरत नाही.

व्यवसाय कोणताही असो कोणत्याही व्यक्तीला अत्याधिक संपत्ती किंवा अत्याधिक सुखसोयी असता कामा नयेत आणि सर्वाहून अधिक महत्त्वाचे हे आहे की हे धन किंवा या सुखसोयी खरोखर ज्या समाधानासाठी व आंतरिक परिपूर्णतेच्या भावनेसाठी आहेत ते त्यातून कधीच लाभत नाही. आंतरिक समाधान असेल तेव्हाच माणूस ईश्वराची ध्यान-उपासना करू शकतो. आणि ज्या माणसाला असे समाधान लाभले आहे, केवळ त्याच्याच हृदयात परमेश्वराच्या रूपात अंतिम सत्य प्रकट होते. माणसाला जेव्हा अत्याधिक सुखपूर्ण जीवन प्राप्त होते तेव्हा तो इंद्रिय-सुखोपभोगाच्या पलीकडे जाण्यास असमर्थ होतो. कोणतेही शारीरिक परिश्रम न करता तो जर सुखोपभोगांच्या आहारी जाईल तर तो स्वतःच्या मनाला आणि आंतरिक अस्तित्वाला हानी पोहोचवील. कठोर परिश्रम आणि कष्ट सोसण्याची सिद्धता आत्मिक उन्नतीची इच्छा करणाऱ्यासाठी अत्यंत आवश्यक आहेत. मगच त्यांना दुःखातले सुख आणि परिश्रमातला आनंद अनुभवता येईल.

-----

प्रकरण - ४

# शास्त्र की विवेक ?

विश्वकल्याण हे शास्त्रांचे उद्दिष्ट आहे. धर्मशास्त्रावर ज्या ज्या महान विभूतींनी साहित्यलेखन केले त्यांच्या मनात स्वार्थाचा लवलेशही नव्हता आणि अखिल प्राणिमात्राच्या सुखाशिवाय दुसरा कोणताही विचार नव्हता. हे प्रबंध अधिकृत रचना आहेत ज्यांच्यावर धर्माची स्थापना केली गेली आहे. तुम्ही वस्तूचे रूप आपल्या डोळ्यांच्या साहाय्याने त्या वस्तूच्या प्रतिमेतून पाहता, तुम्ही आपल्या कानांनी नादाचे श्रवण करता, त्याचप्रमाणे तुम्हाला धर्मशास्त्रातून धर्माचे ज्ञान प्राप्त होते. (भाग १५ पाहा)

वेद म्हणजेच श्रुती हे धर्माचे मूळ आहे. श्रुतीनंतर येतात स्मृती. स्मृती या श्रुतीमधील स्वरांवर आधारित आहेत. (भाग १५ पाहा) त्यादेखील धर्मशास्त्राप्रमाणेच प्रमाण आहेत. महान विभूतींनी जीवनात कसे आचरण केले त्याचे उत्तर आम्हाला पुराणांत सापडते. त्यानंतर शिष्टाचारातून आम्हाला या उदात्त चारित्र्याच्या सद्गुणी पुरुषांच्या जीवनाविषयी मार्गदर्शन मिळते. प्रत्येक व्यक्तीच्या आचरणातून आम्हांला मार्गदर्शन मिळत नाही. धर्माचरणासाठी आदर्श म्हणून ज्या व्यक्तीकडे पाहावयाचे त्या व्यक्तीची शास्त्रावर श्रद्धा असली पाहिजे आणि ती शास्त्राज्ञेप्रमाणे जीवन जगत असली पाहिजे. याशिवाय ती इच्छा आणि क्रोध यापासून मुक्त असली पाहिजे. अशा व्यक्तींचे आचरण म्हणजेच शिष्टाचार होय. धर्मविषयक मार्गदर्शन मिळण्याचे आणखी एक प्रमाण आहे, आमचे मन अत्यंत निर्मळ, पारदर्शक अवस्थेत असताना त्या स्थितीतली आमची विवेकबुद्धी.

आत्मा, धर्मशास्त्र आणि धर्म याविषयी आम्हांस मार्गदर्शन करण्यात वेद हे सर्वात अग्रस्थानी आहेत. वेदानंतर आहे धर्मशास्त्रांचे स्थान. तिसरे स्थान आहे गतकाळात महात्मा सत्पुरुषांनी केलेले आचरण आणि चवथे आहे आपल्या समकालीन सद्गुणी व्यक्तींचा आदर्श. धर्मविषयक निश्चित मार्गदर्शन करण्यात अखेरच्या स्थानावर आहे आपली विवेकबुद्धी.

परंतु आता सर्वकाही उलटे पालटे झाले आहे. लोक स्वतःच्या विवेकबुद्धीला पहिले आणि वेदांना शेवटचे स्थान देत आहेत. जीवनात कर्मे करताना धर्म म्हणजे काय हे सांगणारे कोणतेही साधन नसेल तेव्हा अंतिम आश्रय म्हणून स्वतःच्या विवेकबुद्धीचा कौल घ्यावा. विवेकबुद्धीला मनःसाक्षी का म्हटले गेले आहे? मन हे साक्षीदार होऊ शकते, न्यायमूर्ती नव्हे. साक्षीदार नेहमीच असत्य पुरावे देतो. तथापि सर्व गोष्टींचे पूर्ण ज्ञान असूनही मन अधित्य सांगत नाही. तामीळ संतकवयित्री म्हणते- 'मनापासून जे लपले,

ऐसे कपट नाही कुठले'. विवेकबुद्धीला साक्षीदार म्हणता येईल. परंतु आजकाल धार्मिक विषयांच्या बाबतीत या साक्षीदारालाच न्यायाधीश केले गेले आहे. साक्षीदार म्हणून मन, हे त्याने काय पाहिले किंवा ऐकले याचा सत्य वृत्तान्त कथन करील, परंतु त्याच्या आधारे आपण न्याय्य काय आहे याचा कोणत्याही प्रमाणात अंतिम निर्णय करू शकत नाही. आपल्या कृत्यांबद्दल फक्त विवेकाचाच कौल घेतला तर प्रत्येक व्यक्ती माझे मतच योग्य आहे असे म्हणून स्वतःचे समाधान करून घेईल. हे त्याचे मन धर्माचे अंतिम निर्माण म्हणून कसे मान्य करता येईल?

माझी विवेकबुद्धी सांगेल त्याप्रमाणे मी वागेन असे लोकांनी म्हटलेले आपण नेहमी ऐकतो. परंतु हे म्हणणे, ही प्रवृत्ती योग्य नव्हे. असे एकाएकी आपल्या विवेकबुद्धीला न्यायाधीशपद बहाल करता येणार नाही. निर्णय करताना कोणताच पर्याय उरला नाही. तरच तुम्ही मनाला, 'साक्षीदार म्हणून तू सर्व काही पाहिले आहेस, आता तुझे मत काय आहे ते मला सांग,' असे म्हणू शकता. एक व्यक्ती म्हणून आपणा प्रत्येकाला मन लाभले आहे. तेव्हा आपण ते आपल्या स्वार्थी हेतूपासून वेगळे करू शकत नाही. आपल्या वैयक्तिक विषयांच्या बाबतीत मनाला असलेले स्थान, धर्मविषयक निर्णय करताना आपण त्याला देऊ शकत नाही. धर्माच्या बाबतीत, वैश्विक कल्याणाशी संबंधित असलेल्या आणि जे स्वतःचा वैयक्तिक संबंध असलेल्या आपल्या मनाच्या किंवा स्वतःच्याही पलीकडे पोहोचले आहेत, फक्त अशाच संत-सत्पुरुषांचे मत निर्णायक मानावे.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - ५

## वैदिक धर्म आणि वर्णधर्म

## भाग - ५

# वैदिक धर्म आणि वर्णधर्म

प्रकरण - १

# हिंदूच्या मूळ धर्मग्रंथाविषयीचे आमचे अज्ञान

जगात विविध प्रकारच्या विषयांवर लिहिले गेलेले ग्रंथ विपुल प्रमाणात आहेत. प्रत्येक धर्माचे अनुयायी आपणांस मुक्ती देणारा या श्रद्धेने आदराचे स्थान असलेला एक विशेष ग्रंथ ठरवितात. काही धर्माचे अनुयायी आपल्या पवित्र धर्मग्रंथाच्या गौरवार्थ मंदिरे सुद्धा बांधतात. उदाहरणार्थ शीखधर्मीय असेच करतात. 'ग्रंथसाहेब' या आपल्या पवित्र धर्मग्रंथाचा आदर म्हणून मंदिर (गुरुद्वारा) बांधतात आणि आपला धर्मग्रंथ तेथे जपून ठेवतात.

प्रत्येक धर्माच्या अनुयायांनी याप्रमाणे आपल्या आध्यात्मिक उन्नतीचा मार्ग दाखविणारा एक ग्रंथ निश्चित केला आहे. प्रत्येक धर्माच्या संस्थापकांच्या मुखातून प्रकट झालेली ईश्वराची वाणी आणि आज्ञा अशा धर्मग्रंथांतून ग्रथित केली आहे. अशी त्या त्या धर्माच्या अनुयायांची श्रद्धा असते. म्हणूनच या धर्मग्रंथांना ईश्वराने प्रकट केलेले ग्रंथ असे म्हटले जाते. आपण त्या ग्रंथांना, कोणी एका पुरुषाने निर्माण न केलेले असे 'अपौरुषेय' ग्रंथ म्हणतो. कोणी माणूस म्हणजे पुरुष स्वतःच्या बुद्धीने काही निर्माण करतो त्याला 'पौरुषेय' व जे परमात्मा कोण्या माणसाला माध्यम किंवा साधन करून प्रकट करतो त्याला 'अपौरुषेय' असे म्हणतात.

आपल्या वैदिक धर्माचा अधिकृत धर्मग्रंथ कोणता आहे? अन्यधर्मीयांची आपापल्या पवित्र धर्मग्रंथाविषयी सुस्पष्ट धारणा आहे. बौद्धांचे 'त्रिपिटक, पारशी (झोराष्ट्रियन) धर्मीयांचे झेंड-अवेस्ता, ख्रिस्ती लोकांचे बायबल आणि इस्लामधर्मीयांचे कुरआन हे धर्मग्रंथ आहेत. शैव, वैष्णव, द्वैती, अद्वैती आणि अन्य विविध हिंदुधर्मपरंपरांचे अनुयायी या सर्वांना मान्य असणारा समान असा आमचा धर्मग्रंथ कोणता? बहुतेकांना या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण जाते. का बरे?

या स्थितीला एक महत्त्वाचे कारण आहे. अन्य धर्मात जन्मलेल्यांना शाळेतच त्यांच्या पवित्र धर्मग्रंथाचे शिक्षण दिले जाते किंवा शाळेत जाण्यापूर्वीच दोन-तीन वर्षे मुलांना घरातच आपआपल्या धर्माविषयी ज्ञान दिले जाते व नंतरच त्यांना शाळेत, ज्याला आपण धर्मनिरपेक्ष (खरे तर ऐच्छिक) म्हणतो ते, शिक्षण घेण्यासाठी पाठविले जाते. त्यामुळे अगदी तरुण वयात त्यांना ज्या धर्मात त्यांचा जन्म झाला त्या धर्माची उत्तम ओळख होते. आम्हा हिंदूंना आपल्या धर्माची माहिती मिळत नाही. या स्थितीचा आमच्यावर कोणता परिणाम झाला? अन्य धर्माचे लोक आपल्या धर्माचा त्याग करून

फार मोठ्या संख्येने अन्य धर्म कवटाळताना का दिसत नाहीत? याचे कारण हे आहे की त्यांना आपल्या धर्माच्या शिकवणुकीचे शिक्षण त्यांच्या बालपणातच दिले जाते व त्यामुळे ते आपल्या धर्माला घट्ट चिकटून राहतात. याच्या उलट आम्हाला आमच्या बालपणात आमच्या धर्माच्या मूळ स्वरूपाबद्दल काहीही शिकविले जात नाही. आमच्या धर्मग्रंथाबद्दल आम्ही अत्यंत घृणास्पद बोलतो आणि ते नष्ट केले जात आहेत याची आम्हाला खंत देखील वाटत नाही.

आमची शिक्षणपद्धती पाश्चात्त्यांच्या शिक्षणपद्धतीचे अनुकरण करणारी आहे. गोऱ्या माणसांसारखे बोलावे, त्यांच्याप्रमाणे वेशभूषा करावी आणि रीतिरिवाजात त्यांचीच नक्कल करावी असे आम्हांला वाटते. स्वातंत्र्य मिळाल्यावरही आम्ही असेच आहोत. आम्ही सतत आमची संस्कृती आणि स्वदेशी बद्दल बोलत असलो तरी वस्तुतः आम्ही पूर्वीपेक्षा अधिक पाश्चिमात्य झालो आहोत. मनाने परदेशी राहून प्रत्यक्षात आम्ही 'स्वदेशी' असल्याचे बोलत राहतो. अतिप्राचीन काळापासून धर्म हा आमच्या राष्ट्रजीवनाचा कणा राहिला आहे. आम्ही खरोखरच अंतर्बाह्य 'स्वदेशी' राहू इच्छित असू तर आम्हाला धार्मिक शिक्षण बालपणापासूनच मिळावयास हवे. निधर्मी (धर्मनिरपेक्ष) स्थिती आमच्या कामाची नाही. कारण त्या स्थितीत आमच्या मुलांना पाश्चात्त्य पद्धतीनुसार शिक्षण देणे चालू राहील व आमची शास्त्रे म्हणजे धर्मभोळेपणा आहे हेच त्यांना शिकविले जाईल. याचा परिणाम हाच आहे की सर्व हिंदूंना समान असा धर्मग्रंथ कोणता आहे, हे आम्हांपैकी बहुतेकजणांना माहीत नाही.

आमच्या आत्मविद्याशास्त्राची जगभरातील लोक वाखाणणी करीत आहेत. (राजनीतिविषयक व्यवस्था, अर्थशास्त्र, नृत्य इत्यादी विषय बाह्यतः भौतिक असले तरी आमच्या देशात त्यांच्या शिक्षणाचा हेतू श्रेष्ठ आहे.) आमच्या शास्त्रांच्या शोधात परदेशातले लोक भारतात येतात आणि आमच्या शास्त्रांचे त्यांच्या स्वतःच्या भाषेत भाषांतर करतात. जगाने आमचा आदर करावा असे जर आम्हाला वाटत असेल तर आम्ही आमच्या शास्त्रांचे अधिकाधिक ज्ञान मिळविले पाहिजे. कारण संपूर्ण जग आमच्या शास्त्रांची प्रशंसा करीत आहे. विज्ञान किंवा तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात आम्ही अन्य लोकांपेक्षा अधिक बहुमान मिळवू शकणार नाही. एक किंवा दोन भारतीयांनी नोबेल पुरस्कार बहुमान मिळविला याचा आम्हांला अभिमान वाटतो, पण जगातील अन्य देशांनी याची अभावानेच दखल घेतली आहे. याबद्दलचा त्यांचा रोख या शब्दांत सांगता येईल, ''विज्ञान आणि तंत्रज्ञानात आम्ही घेतलेली उत्तुंग भरारी आम्हांला समाधान देत नाही. म्हणून आम्ही या सर्वांच्या पलीकडे असलेल्या गोष्टी मिळविण्यासाठी हिंदूंच्याकडे जातो. परंतु आमच्या विज्ञान व तंत्रज्ञानासाठी त्यांनी आपल्या तत्त्वज्ञान व आध्यात्मिक संशोधनाचा

त्याग केला असल्याचे दिसते'. ज्यांनी आंतरिक आनंद प्राप्त केला आहे. अशा आमच्या येथे झालेल्या व्यक्तींची संख्या जगातील अन्य सर्व देशांच्या अशा एकूण संख्येपेक्षा अधिक आहे याचा आम्हांला अभिमान वाटावयास हवा. त्या महान व्यक्तींनी ज्या शास्त्रज्ञांना आनंद कसा वाढवावा हे शिकविले त्या व्यक्तींनी त्यांचा वारसा म्हणून आम्हाला दिलेल्या त्या शास्त्रांचे आम्हाला ज्ञान नसावे याची आम्हाला खंत वाटावयास हवी.

आपल्या धर्माचा उगम ज्या धर्मग्रंथातून झाला त्याबद्दल अनेक हिंदू अज्ञानी आहेत. त्यांना आपल्या धर्मग्रंथाचे नावदेखील माहीत नाही. ''धर्मग्रंथाचे नाव माहीत नसेल तर काय बिघडते? आणि माहीत असले तर त्यापासून कोणता आमचा लाभ होणार?'' असे ते विचारतात.

ज्या संस्कृतीची विश्वस्तरावर प्रशंसा केली जात आहे त्या महान संस्कृतीचे आम्ही वारसदार असूनसुद्धा तिच्या उगमस्थानाबद्दल आम्ही अज्ञानी आहोत. संस्कृतीची चिंता कोणी करावी? आम्हाला गरज आहे फक्त धनाची. अशी आपल्या लोकांच्या मनाची प्रवृत्ती झाली आहे आणि ते आपले भाग्य उजळावे म्हणून खंडा-खंडातून त्याचा शोध घेत हिंडत आहेत. त्यातले काहीजण माझ्याकडे येतात आणि मला म्हणतात, ''परदेशातली माणसे आम्हाला आमच्या धर्माविषयी, वेद-उपनिषदाबद्दल विचारतात. गीता आणि योग, आमची देवालये आणि पुराणे आणि इतर अनेक गोष्टी ते जाणून घेऊ इच्छितात. आम्ही त्यांच्या प्रश्नांची उत्तरे देऊ शकत नाही. खरे तर याबद्दल ते जितके जाणतात तितके या विषयातले ज्ञान आम्हांला देखील नाही. आम्हांला खरोखरच स्वतःची लाज वाटते. तेव्हा आपण कृपा करून आमचा धर्म आणि तत्त्वज्ञान या दोन्हीविषयी थोडक्यात माहिती द्याल काय?''

याचा अर्थ काय आहे? आमच्या स्वतःच्या देशातच परकीयांप्रमाणे जीवन जगण्याचा आम्हाला अभिमान वाटतो आहे, परंतु आमच्या या असल्या जगण्याचा परदेशस्थांना खेद वाटतो आहे. विश्वातल्या सर्वाधिक पुरातन धर्म आणि संस्कृतीचे आम्ही वारसदार असूनदेखील आमचा त्याच्याशी काहीच संबंध नसल्यासारखे आम्ही वागत आहोत. अशा स्थितीत परकीयांच्या मनात आमच्याविषयी आदर असावा अशी अपेक्षा तुम्ही कशी करू शकता?

आम्ही निरक्षर आणि अडाणी असतो तर या स्थितीचे फारसे दुःख करण्याचे काहीच कारण नव्हते. अन्य लोक आम्हाला अडाणी समजले असते इतकेच. परंतु आज वस्तुस्थिती काय आहे? आम्ही वाचतो, लिहितो आणि मोठ-मोठ्या विषयांवर बोलतो देखील. विज्ञान आणि तंत्र, राजकारण, सिनेमा, साहित्य यात आम्ही रुची घेतो. आणि

आमच्या देशाच्या अद्वितीय अशा आत्मविषयक शास्त्रांची आम्ही उपेक्षा करतो. म्हणूनच अन्यदेशीय लोक आमच्याकडे तुच्छतेच्या भावनेने पाहतात.

आमच्या धर्मावर अनेक ग्रंथ लिहिले गेले आहेत. परंतु आम्हांला त्यांची आवश्यकता वाटत नसल्यासारखे दिसते आहे. आमच्या वाचनात विदेशी साहित्यच आहे. मिल्टन आणि वर्डस्वर्थच्या सर्व साहित्यकृतींचे आम्हांला ज्ञान आहे. भवभूती या संस्कृत आणि ओट्टकुट्टर या तामिळ कवीच्याविषयी मात्र आम्हाला फारच थोडे ठाऊक असते. लुई घराणे आणि रशियाचे सम्राट झार यांच्या इतिहासाचे ज्ञान आम्हांला आहे, परंतु आमच्या देशाच्या सूर्य आणि चंद्र वंशाचे मात्र आम्हाला ज्ञान नाही. इतकेच कशाला, आम्हांला आमच्या विभिन्न गोत्रांच्या प्रमुख ऋषींची तरी नावे कोठे ठाऊक आहेत? आमच्याशी ज्यांचा संबंध नाही अशा विषयांचे आम्हाला सखोल ज्ञान आहे, पण विश्वात आश्चर्याचे विषय ठरलेल्या आमच्या कित्येक गोष्टींच्या बाबतीत आम्ही इतके अज्ञानी आहोत की ज्यांच्या नावाने आमच्या येथील शास्त्रे निर्माण झाली त्यांची नावे देखील आम्हाला ठाऊक नाहीत. एवढेच नव्हे तर या विषयातील अधिकारी विद्वान मंडळी त्या ग्रंथांबद्दल बोलू लागल्या तर ते आम्ही ऐकूनसुद्धा घेत नाही. आमचा देश आणि आमचे अधःपतन झाले आहे, याच्या मला अपार वेदना होतात.

या दुःखदायक दुरवस्थेचे कारण हेच आहे की आमच्या संस्कृतीच्या ज्ञानाने आम्हाला पैसा किती मिळू शकेल हे जाणून घेण्यासाठी आम्ही जितके उत्सुक आहोत तितकी उत्सुकता आम्हांला आमची संस्कृती जाणून घेण्याविषयी वाटत नाही. वास्तविक पाहता द्रव्यार्जन किंवा आमच्या अन्य उद्योगांचा हेतू आमच्या संस्कृतीचे ज्ञान पूर्णपणे मिळविणे व त्यातील आशयाशी सुसंगत असे वर्तन ठेवून पूर्णत्वाची अनुभूती घेणे हाच असावयास हवा. आमच्या धर्माविषयी जाणून घेण्याची आवश्यकताच काय? यासारखे प्रश्नच मूलतः असमंजसपणाचे व हास्यास्पद आहेत. वास्तविक धर्मच आमच्या जीवनाचे मूळ प्रयोजन आहे. तोच त्याचा खरा हेतू आहे. धर्मकृत्यांच्या आचरणाने मनःशांती, सर्वांबद्दल प्रेमभावना आणि अंततः मुक्ती यांसारखे महत्त्वाचे लाभ होत असता धर्माला अन्य उद्देशाची गरजच काय? पण या सर्वांचा विचार न करता यापासून काही आर्थिक लाभ होईल का याचाच आम्ही विचार करतो. आम्हाला खरोखरच जर धर्मात आस्था असेल आणि धर्माशी आम्ही खरोखरच जोडलेले असू तर त्यापासून होणाऱ्या कोणत्याच उद्दिष्टपूर्तीची आम्हाला काळजी वाटता कामा नये.

"ब्राह्मणेन निष्कारणो धर्मः षडंगो वेदाध्ययनश्च" असे शास्त्रे सांगतात. याचा अर्थ असा आहे की ब्राह्मणाने वेदांचे आणि शास्त्रांचे अध्ययन कोणत्याही कारणासाठी, केवळ त्याने काही हेतू पूर्ण होतो म्हणून करता कामा नये. बालपणात मात्र आम्ही कोणताही

विषय त्याचा किती उपयोग आहे हे न विचारता शिकत असू. मी इतिहास किंवा भूगोल हा विषय का शिकावा असा प्रश्न शाळेत जाणारा विद्यार्थी कधीच करीत नाही.

आमच्या धर्मग्रंथांचे शिक्षण मुलांना बालवयातच द्यावयास हवे. मोठा झाल्यावर मुलगा कॉलेजात जातो. कॉलेजातील शिक्षण त्याला उपयोगाचे ठरेल असे त्याला वाटत असावे. बी.ए. किंवा एल.एल.बी. चा अभ्यास तो वकील होण्यासाठी करतो. त्याचप्रमाणे तो एल.टी. (किंवा बी.एड) पदवी किंवा एम.बी.बी.एस. चा अभ्यास करतो ते शिक्षक किंवा डॉक्टर होण्यासाठी. विशीतल्या त्या मुलाला जर तुम्ही धार्मिक शिक्षण घे असे म्हणाल तर तो विचारील, धार्मिक शिक्षण का घ्यायचे? ते घेतल्याने मी काय होईन? या विषयाचा अभ्यास करण्याचा काय उपयोग? अशा प्रकारचे कोणतेही प्रश्न न करता आपण कोणत्याही विषयाचा अभ्यास केवळ बालपणातच करतो. मी इतिहास किंवा भूगोलाचा अभ्यास का करू? असा प्रश्न शाळेत जाणारा मुलगा कधीच करीत नाही. म्हणूनच आमचे धर्मग्रंथ मुलांना लहान वयातच शिकवावयास हवेत. मुले जेव्हा मोठी होऊन कॉलेजात जाऊ लागतात तेव्हा तेथील विषय शिकल्याने ते काहीतरी होतात अशी त्यांची धारणा असते. तो जेव्हा कायद्याच्या एल.एल.बी. इ. अभ्यासक्रमांचा अभ्यास करतो तेव्हा त्या अभ्यासाने तो वकील होणार आहे हे त्याला माहीत असते. त्याचप्रमाणे जेव्हा तो डी.एड, बी.एड. चा अभ्यास करतो किंवा एम.बी.बी.एस.चा अभ्यास करतो तेव्हा तो शिक्षक किंवा डॉक्टर होणार आहे.' याचे त्याला ज्ञान असते. तुम्ही किशोरवयीन विद्यार्थ्यास धर्मग्रंथ शीक असे म्हणाल तेव्हा तो हे शिक्षण घेतल्याने मी पुढे कोण होईन असे विचारतो. याकरिता मुले मोठी होऊन या शिक्षणाने मी कोण होईन हे विचारण्यापूर्वी किंवा अन्य काही शंका विचारू लागायच्या पूर्वीच्या वयातच त्यांना धर्मग्रंथांचे आणि शास्त्रांचे शिक्षण दिले पाहिजे. आपल्या मुलांच्या आवडीचा खेळ, संगीत किंवा सिनेमा यांवर आपण खर्च करीत नाही का? अगदी त्याचप्रमाणे खेळ आणि मनोरंजन याकरिता आपण जसा खर्च करतो त्याचप्रमाणे धर्मग्रंथांच्याविषयी त्यांच्या मनात गोडी कशी निर्माण होईल हे आपण पाहिले पाहिजे. क्रीडा किंवा करमणुकीतून मिळणाऱ्या तत्कालिक आनंदापेक्षा ज्याच्यामुळे जीवनात कायम टिकणारा आनंद त्यांना मिळणार आहे ते धर्मशिक्षण आम्ही त्यांना दिलेच पाहिजे. आमच्या सांप्रतच्या दुःखद दुरवस्थेचे कारण आमच्या या सदोष मूलभूत शिक्षणपद्धतीतच दडलेले आहे.

आज आम्ही या स्थितीस येऊन पोहोचलो आहोत की धर्माचे शिक्षण लोकांच्या उपजीविकेस काही उपयोगाचे आहे का असा प्रश्न ते विचारत आहेत. ही खरोखर शरमेची गोष्ट आहे. शास्त्रांनी ताकीद दिली आहे की वेदांच्या शिक्षणातून तुम्हाला खायला अन्न मिळेल का? हा प्रश्न विचारू नका. आम्ही खातो आणि जगतो ते वेदांचे शिक्षण

घेण्यासाठीच. या विषयाकडे पाहण्याचा तुमचा दृष्टिकोन या भूमिकेवर आधारलेला असावयास हवा. अशा प्रकारची उच्च आदर्श श्रद्धा घेऊन जन्माला आलेले मूल जन्मापासूनच धार्मिक शिक्षणाच्या सर्व प्रकारच्या संधीपासून दूर ठेवले जाते. त्याला जन्मल्यापासूनच ऐहिक गोष्टींचे ज्ञान दिले जाते. हे बघणे आमचे काम आहे. आम्ही आमच्या मुलांचे संगोपन योग्य प्रकारे केले पाहिजे. ईश्वराविषयीची श्रद्धा त्यांच्या मनात लहान वयातच निर्माण केली पाहिजे.

आम्ही आमच्या लहान मुलांवर कितीतरी खर्च करतो पण त्यांना धार्मिक शिक्षण देण्यासाठी काही खर्च करतो का? आपल्या मुलाच्या मौजीबंधनासाठी त्याचा पिता हजारो रुपये खर्च करतो. या उपनयन विधीवर म्हणजे मुंज लावण्याच्या समारंभावर त्या विधीचा मूळ हेतू न जाणता आजकाल बेसुमार खर्च केला जातो. परंतु आपल्या मुलाला उत्तम ब्रह्मचारी बनविण्यासाठी, त्या विधीवर खर्च केल्या जाणाऱ्या रकमेच्या एक दशांश एवढी रक्कम जरी खर्च केली तरी धर्मावरील श्रद्धा जिवंत ठेवण्यास मदत होईल. खासगी शिक्षक ठेवून मुलाला ब्रह्मचाऱ्यांची कर्तव्ये शिकवावीत. या व्यवसायाशी संबंधित व्यक्तींना मिळणारे उत्पन्न का नाकारावे? बालपणातच जर धर्माचे शिक्षण दिले तर ते मोठे होतील तसतसे संशयमुक्त होतील आणि धर्माच्या शिक्षकांनाही आर्थिक लाभ होईल. परंतु आज स्थिती इतकी शोचनीय आहे की आम्हापैकी कित्येकजणांना आमच्या धर्माचा आधार असणाऱ्या प्रमाणग्रंथांची नावे देखील माहीत नाहीत.

लहान वयात धर्माचे शिक्षण दिले न जाणे हे लोकांच्या मनात असणाऱ्या अनेक विसंवादाचे एक वास्तविक कारण आहे. एकजण ईश्वरवादी तर दुसरा अतीश्वरवादी आहे. एकजण श्रद्धारहित राहून धर्मकृत्ये करतो आहे तर दुसरा श्रद्धावान आहे पण धार्मिक कृत्येच करीत नाही. विसंवाद आणि विवाद अनेक आहेत. लोक धर्मविषयक निर्माण करीत असलेल्या संदेहांना तर अंतच नाही. बालपणातच आम्हाला आमच्या धर्माचे शिक्षण दिले गेले असते तर आमच्या विचारप्रणालीत मतैक्य राहिले असते व सर्व संदेहांचे निराकरण होऊन त्यापासून सुटका झाली असती. धर्माविषयी मनात संदेह असलेली माणसे जितकी आमच्या धर्मात आहेत तितकी अन्य धर्माच्या अनुयायात नाहीत. या वास्तवाचे कारण हेच आहे की अन्य धर्मीयांतील अनुयायांना त्यांच्या धर्मसंकल्पनांचे योग्य प्रकारे ज्ञान दिले जाते, आमच्या धर्मात मात्र असे घडत नाही.

आमचा धर्मग्रंथ कोणता? या प्रश्नाचे निश्चित उत्तर देणे देखील आजकाल लोकांना कठीण झाले आहे. तथापि अशा त्या ग्रंथातून प्रतिपादित केलेले, झालेले सत्यतत्त्व जर आम्ही आचरणात आणू तर संपूर्ण विश्वाची उन्नती होईल.

अनेक धर्मांचे अनुयायी केवळ एकाच ग्रंथाच्या नावाचा उल्लेख आपला पवित्र

धर्मग्रंथ म्हणून करतात, भले मग त्या ग्रंथाच्या आशयावर आधारित अन्य कितीही का ग्रंथ असेनात. एखादा माणूस आज एक ग्रंथ लिहील, उद्या दुसरा माणूस अजून दुसरे पुस्तक लिहील. त्यात चांगल्या तसेच काही वाईट विषयावर लिहिले गेले असेल आणि त्यावरून प्रत्येक पुस्तकाचे मूल्यमापन करणे कठीण आहे. अशा स्थितीत एकच ग्रंथ आमचा सर्वकालीन धर्मग्रंथ म्हणून स्वीकारणे आमच्या फायद्याचे होणार नाही का? आणि याच कारणाकरिता प्रत्येक धर्म अशा प्रकारच्या एकाच ग्रंथाचा आपल्या धर्माचा प्रमुख ग्रंथ म्हणून स्वीकार करतो.

आमच्या धर्माविषयी सर्व काही सांगणाऱ्या अशा कोणत्या रचना आहेत? ग्रंथालये हिंदू धर्मावरील खरोखरच शेकडो-हजारो पुस्तकांनी ठसाठस भरली आहेत. आमच्या धर्माशी संबंधित असलेले विषय असंख्य आहेत. हे सर्व गोंधळात टाकणारे आहे. तरी परंतु आम्ही हे लक्षात घेतले पाहिजे की असे ग्रंथ मात्र अगदी थोडे आहेत ज्यांनी या असंख्य ग्रंथांचा मूळ पाया तयार केलेला आहे.

आमच्या धर्माच्या सिद्धान्तांचे पालन केल्याने अनेकांना आनंदाची अनुभूती येऊन ते मृत्यूची जाणीव व बाह्यजगताच्या विस्मरणाशिवाय समाधी अवस्थेत राहिले आहेत. अशी माणसे आज देखील पाहावयास मिळतात. अशा प्रकारच्या आत्मानुभूती घेतलेल्या सदाशिव महेंद्र व पट्टिनत्ता सारख्या साक्षात्कारी विभूतींची माहिती देणारे ग्रंथ उपलब्ध आहेत. आमच्या धर्मात जितके आत्मसाक्षात्कारी महात्मे निर्माण झाले तितके अन्य धर्मांत झाले नाहीत. अशा असंख्य विभूतींचे प्रेरणास्थान असलेल्या आमच्या धर्माचा अधिकृत धर्मग्रंथ नसेल हे कधीतरी शक्य आहे का?

-----

## प्रकरण - २

# धर्माची आवश्यकता?

आम्हाला धर्माची का आवश्यकता आहे? धर्मगुरूचे आम्ही का ऐकतो? आमच्या समस्या सुटतील आणि आमच्यातील दोष दूर होतील या आशेने आम्ही तसे करतो. आम्हाला कोणतीही समस्या नसते किंवा आमच्यामध्ये काही न्यूनत्व, अपूर्णता आहे असे आम्हाला वाटत नसते तेव्हा आम्हाला अशा प्रकारच्या धर्मोपदेशकाची गरज भासत नाही. जेव्हा जेव्हा आम्हाला एखाद्या समस्येने जितके अधिक प्रमाणात घेरले जाते तितके दर्शनासाठी व महात्म्यांच्याकडून उपदेश घेण्यासाठी आमचे मंदिरात जाण्याचे प्रमाण वाढते.

आमच्या पीडेच्या निवारणाचा उपाय सापडावा व आमच्या मनातील संदेह दूर व्हावेत ही आशा बाळगूनच आम्ही महात्म्यांच्याकडे, साधु-सत्पुरुषांच्याकडे जातो. आम्ही जेव्हा अडचणींच्या चक्रव्यूहात सापडतो तेव्हा त्यातून सुटण्याचा मार्ग सापडावा म्हणून आम्ही ग्रंथात किंवा प्रज्ञा आणि सद्गुणांचे भांडार असलेल्या अशा महान विभूतींच्या उपदेशात त्या समस्यांचे समाधान शोधू पाहतो किंवा आम्ही तीर्थयात्रेला जाऊन पवित्र कुंडात किंवा नदीत स्नान करतो. अशा प्रकारे विविध मार्गांनी आम्ही मानसिक शांती मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. जे नितांत प्रशांतावस्थेत असतात ते सतत आनंदात राहतात. त्यांची कोणी बदनामी केली किंवा त्यांना दुःख पोहचविले, सन्मान केला किंवा विटंबना केली तरी ते मुळी देखील विचलित होत नाहीत.

आत्मशांतीचा अनुभव घेतलेली माणसे सर्व जाती-जमातीमध्ये निर्माण होतात. धर्म म्हणजे काय? सलोखा, सामंजस्य व शांतीचा मार्ग जो दाखवितो व त्या मार्गाकडे घेऊन जातो तो धर्म. या मार्गालाच 'मत' किंवा धर्म असे म्हणतात. धर्म हा अंतिम कल्याण म्हणजेच मोक्ष प्राप्त करण्याचे साधन आहे आणि धर्म म्हणजेच 'मत' होय.

धर्माच्या अनुसरणाचा प्रथमतः आनंदप्राप्ती आणि ऐहिक कल्याण हा हेतू असतो. परंतु नंतर मात्र धर्माचे अनुसरण ईहलोकीच्या आनंदाची इच्छा न धरता केल्यास आपणास 'मोक्ष' प्राप्त होतो हाच धर्म होय, हेच 'मत' होय.

'मत' यासाठी की, शास्त्रांनी उपयोगात आणलेल्या 'धर्म' या संज्ञेचा अर्थ जीवनाला पूर्णत्व देणारी नैतिक आणि धार्मिक तत्त्वे असा आहे. आमच्या अनेक ग्रंथांतून या धर्माची शिकवण दिलेली आहे, परंतु आम्ही त्याबद्दल अज्ञानात राहतो. या ग्रंथांतून धर्माच्या मूळ आधारभूत तत्त्वांचे प्रतिपादन केलेले असल्याने त्यांना 'धर्मप्रमाण' ग्रंथ असे म्हटले गेले

आहे. वस्तूचे सत्यत्व किंवा औचित्य (किंवा 'मत') स्थापन करते ते 'प्रमाण' होय. धर्माशी संबंधित असलेली आणि हिंदूमत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या धर्मप्रमाणांचे ज्यात प्रतिपादन केले गेले आहे व जी आम्हाला अतिप्राचीन वेदकाळापासून सोपविली गेली आहेत अशी आमची चौदा मूळ शास्त्रे आहेत. हे ग्रंथ आम्हाला आमचे धर्मसिद्धान्त आणि धर्माचरण याविषयी सांगतात.

अंगानि वेदश्चत्वारो मीमांसा-न्यायविस्तारः पुराणं धर्मशास्त्रं च विद्याह्येतश्चतुर्दश
- मनुस्मृति

पुराण-न्याय-मीमांसा धर्मशास्त्रांगमिश्रितः वेदाः स्थानानि विज्ञानां धर्मस्यच चतुर्दश
- याज्ञवाल्क्य स्मृति

'चतुर्दश' ही संज्ञा दोन्ही श्लोकांत आली आहे. या पदाचा अर्थ चौदा असा आहे. या दोन श्लोकांवरून आम्हास हे कळून येते की आमच्या धर्माचे सर्वांग परिपूर्ण ज्ञान देणारे असे अधिकृत चौदा ग्रंथ आहेत.

'विद' या संस्कृत धातुचा अर्थ 'जाणणे' असा आहे. या धातूपासूनच 'विद्या' हा शब्द आला असून त्याचा अर्थ जी ज्ञान देते, जी धर्माच्या सत्यावर प्रकाश टाकते ती विद्या. वरील दोन श्लोकांत विद्येवर 'विद्याह्येतश्चतुदर्श' आणि 'विद्यानाम् धर्मस्यच' असा उल्लेख आलेला आहे. या चौदा विद्या केवळ धर्माचे ज्ञान देणारे ग्रंथ नसून ते नैतिक तत्त्वावरील ज्ञान देणारे ग्रंथही आहेत. आणि म्हणूनच या ग्रंथांना 'स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश' असे 'विद्यास्थान' किंवा धर्मस्थान असे म्हटले गेले आहे. 'विद्' याचा अर्थ 'जाणणे' असा असला तरी या शब्दात 'सर्व प्रकारचे ज्ञान' असे सूचित होत नाही. विद्या या शब्दातील 'विद' याचा अर्थ सत्याचे ज्ञान असा होतो. 'विट्' किंवा 'विजडम्' या इंग्लिश भाषेतील शब्दांचे मूळही हा 'विद्' धातू असून या धातुपासूनच 'वेद' हा शब्द बनला आहे, ज्याचा अर्थ 'ज्ञानाचा ग्रंथ' असा होतो. ज्ञानाचे उगमस्थान असल्याने हे चौदा ग्रंथ बनले आहे, ज्याचा विद्यास्थान म्हणजेच ज्ञानाचे किंवा ज्ञानार्जनाचे निवासस्थान होत. धर्मस्थान (धर्माचे निवासस्थान) हे विद्येचे देखील निवासस्थान आहे.

-----

## प्रकरण - ३

# ज्ञानाची चौदा निवासस्थाने

चार वेद, वेदांचे अवयव असलेली सहा अंगे, मीमांसा, न्याय, पुराण आणि धर्मशास्त्र ही ज्ञानाची चौदा निवासस्थाने आहेत. वेद आणि त्याची सहा अंगे हा संदर्भ तरी निदान तुमच्या वाचनात आलेलाच असेल. 'तेवारम' या तामीळ भक्तिपर ग्रंथात ईश्वर हे चार वेद आणि त्याची सहा अंगे यांचे स्वरूप असल्याचे म्हटले गेले आहे.

या चौदा धर्मप्रमाण ग्रंथांना 'चतुर्दश विद्या' असे म्हटले गेले आहे. 'नैषधम्' या सुप्रसिद्ध काव्यरचनेत नळ हा ज्ञानाच्या या चौदा शाखांशी परिचित होता असा उल्लेख आलेला आहे. या ग्रंथाचा कवी श्रीहर्ष हा चतुर्दश या शब्दावर कोटी करून म्हणतो की नळाने या चतुर्दश विद्यांना चतुर्दशा म्हणजे वाचन आकलन म्हणजे जे वाचले ते समजणे आणि आचरण म्हणजे जे वाचले त्यात सांगितल्याप्रमाणे वागणे आणि इतरांना तसे जीवन जगण्यासाठी प्रेरित करणे या चार दशा दिल्या.

चतुर्दशत्वम् कृत्वान् कथ स्वयम्  न वेद्मि विद्यासु चतुर्दशस्वपि - नैषधम् १.४

ज्ञानाच्या या चौदा शाखांत धर्माचे संपूर्ण ज्ञान समाविष्ट आहे.

याशिवाय आणखी चार विद्या आहेत. प्रथम उल्लेख केल्या गेलेल्या चौदा शाखांत या चार विद्या मिळविल्या तर एकूण अठरा विद्या होतील. या चौदा विद्या धर्माशी प्रत्यक्ष संबंधित आहेत. आयुर्वेद, अर्थशास्त्र, धनुर्वेद आणि गंधर्ववेद या अन्य चार विद्या आहेत. (आयुर्वेद म्हणजे आयुर्विज्ञान किंवा औषधी विज्ञान, अर्थशास्त्र म्हणजे राजनीति मितव्यय पद्धती. धनुर्वेद म्हणजे युध्दशास्त्र आणि गंधर्ववेद म्हणजे संगीतशास्त्र.) या चारही विद्या धर्माशी संबंधित नाहीत. तरीही त्या ज्ञानाची निवासस्थाने म्हणजे विचारस्थान म्हणवून घेण्यास पात्र आहेत. प्रथम उल्लेखिलेल्या चौदा विद्या दोन्ही धर्मस्थान आणि विद्यास्थान, म्हणजेच धर्म तसेच विद्येची निवासस्थाने आहेत.

धर्मस्थान आणि विद्यास्थान यांना एकत्रित स्वरूपात सामान्यपणे 'शास्त्र' असे म्हटले जाते. 'शास्त्र' या शब्दाचा अर्थ आदेश किंवा आज्ञा असा आहे. आम्ही 'राजशासन' म्हणजेच 'राजाज्ञा' असे म्हणतो. महाभारतातील एका अध्यायात भीष्मांनी धर्माच्या आज्ञा युधिष्ठिरास स्पष्ट करून सांगितल्या आहेत, त्याला 'अनुशासन पर्व' असे म्हणतात. अय्यनारला 'शास्ता' असे म्हटले जाते कारण तो शिवाचे गण आपल्या आदेशांद्वारे नियंत्रणात ठेवतो. शास्त्रावरील ग्रंथात अध्यादेश समाविष्ट केलेले आहेत. आम्हाला अनुशासित व सत्पथावर ठेवण्यासाठी त्यात विवरण केले गेलेले आहे.

सर्व चौदा शास्त्रे हे मूळ आणि प्रमाणभूत ग्रंथ असून वेद हे त्यांच्या मुकुटस्थानी आहेत. बौद्धमत, झोरास्ट्रियनमत (झुरस्ट्रिअन मत) झेन अवेस्ता, बायबल आणि कुराण या धर्मग्रंथांप्रमाणेच वेद हा आमचा प्रमुख धर्मग्रंथ आहे.



ज्ञानाच्या चौदा शाखांपैकी पहिल्या चार शाखा असलेले वेद हे नंतरच्या दहा शाखांचा आधार आहेत. या सर्वांना मिळून शास्त्राचा संपूर्ण ग्रंथ तयार झाला असून त्यावर आमच्या धर्माची उभारणी झालेली आहे.

-----

# गतकालीन वैभव आणि वर्तमानकालीन लांछन

ज्ञानाच्या चौदा शाखांचे शिक्षण आमच्या देशात अतिप्राचीन काळापासून ब्रिटिश राजवटीच्या आरंभापर्यंत दिले जात होते. याविषयी मी आपणास काही मनोरंजक माहिती देऊ इच्छितो. तुम्ही फेन आणि ह्यूएन त्संग या चीनमधून भारतात आलेल्या यात्रेकरूंविषयी वाचलेच असेल. यापैकी पहिला पंधराव्या शतकाच्या आरंभकाळी तर नंतरचा इसवी सनाच्या सतराव्या शतकात भारतात आला होता. या दोघांनीही येथील स्थितीबद्दलचा आणि विशेष करून आमच्या नालंदा व तक्षशीला येथील अन्य विद्यापीठांच्या उज्ज्वल कार्याविषयीचा आपला अभिप्राय त्यांच्या प्रवासवृत्तात नोंदविलेला आहे. नालंदा आणि तक्षशीला ही आमची वैदिक विद्यालये किंवा विश्वविद्यालये होती, जी भारतात प्राचीन काळात आणि मध्ययुगात वैभवाच्या शिखरावर होती, तेव्हा बौद्धमताचा या देशात सर्वत्र प्रसार झाला होता. या विद्यापीठांविषयीची माहिती आम्हाला पुरातत्त्व विभागाच्या संशोधनातूनही मिळते. या दोन्ही विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात चतुर्दश विद्यांचा समावेश होता हे उल्लेखनीय आहे. अर्थात बौद्धमताच्या धर्मग्रंथांचेही येथे शिक्षण दिले जात होते. परंतु ते चौदा हिंदू शास्त्रांचे शिक्षण दिल्यानंतरच दिले जाई. कारण वेदविद्यांचे शिक्षण हे धार्मिक समाजाला ज्ञान आणि चरित्र निर्माण याचे ज्ञान मिळविण्यास साहाय्यभूत ठरत असे. याप्रमाणे खऱ्या अर्थाचे शिक्षण द्यायचे असेल तर त्यात हिंदू चतुर्दश विद्यांचा समावेश असलाच पाहिजे असा बुद्धांचा विश्वास होता.

दक्षिण भारतात देखील ही शास्त्रे घटिकास्थान व तामीळ राजांनी स्थापन केलेल्या अन्य संस्थात शिकविली जात होती. इ. स. ८६८ मधील ताम्रपट लेखात बिहारमधील कट्टलुर आणि पाँडेचरी मधील स्थानावर कार्यरत असलेल्या शिक्षण संस्थेत चतुर्दश विद्यांचे शिक्षण दिले जात असल्याचा उल्लेख केला गेला आहे. त्याचप्रमाणे वैझापुरम व तिन्नदिवनम् यांच्यामध्ये असलेल्या येन्नायिरम येथे विद्यालयातील अभ्यासक्रमात पुरातन शास्त्रे हा अभ्यासाचा भाग होता असे अकराव्या शतकातील राजेंद्र चोळ यांच्या शिलालेखात दिसून आले आहे. यासंबंधीची अनेक प्रमाणे उपलब्ध आहेत.

आजकाल तामीळ इतिहासात अनेक संशोधने भरपूर प्रमाणात केली जात आहेत. त्यातून प्रेरित होऊन कथा-कादंबऱ्या लिहिल्या जात आहेत. तथापि तामीळ राज्यकर्त्यांनी वेद आणि शास्त्रे यांच्या अभ्यासासाठी फार मोठे समर्थन दिले होते; या माझ्या स्वतःच्या अभ्यासातून बाहेर आलेल्या निष्कर्षावर मात्र कोणीच काम करताना दिसत नाही. संशोधनाचे विषय निःपक्षपातीपणे निवडले जावेत व संशोधनात शास्त्रीय दृष्टिकोन असावा

याबद्दल खूपसे बोलले जाते. परंतु प्रत्यक्षात मात्र तसे लोकांना दिसत नाही. बौद्ध हे वेदांचे वास्तविकः विरोधक असून देखील आपल्या शिक्षण संस्थांतील विद्यार्थ्यांचा बौद्धिक विकास होण्यासाठी, त्यांचे नैतिक चरित्र घडविण्यासाठी त्यांनी चौदा हिंदूशास्त्रांचे अध्ययन करणे आवश्यक आहे यावर त्यांचा विश्वास होता. परंतु आमचे येथील लोक मात्र आपली स्वतःच्या धर्मावर श्रद्धा आहे असे म्हणतात (भलेही ते शास्त्रांच्या प्रगतीसाठी काहीही करीत नसोत) परंतु भूतकाळात तामीळ राजांनी वैदिक अध्ययनाच्या विषयी केलेल्या कार्याबद्दल मात्र ते मूग गिळून गप्प बसतात.

आता आम्ही अशा अवस्थेला येऊन पोहोचलो आहोत की कोणी जर आम्हाला आमच्या विद्याविषयी विचारेल तर आम्ही गप्प बसण्याखेरीज काहीही करू शकत नाही. खरे तर आम्हाला विद्या म्हणजे काय हे सुद्धा माहीत नाही. सर्व संभाव्यतेने आम्ही विद्येला हातचलाखी चेटूक किंवा जादू समजतो. विद्या आणि कला या दोन्ही एकच आहेत. कला म्हणजे ज्ञान जे चंद्राप्रमाणे वृद्धिंगत होत जाते. आजकाल बहुसंख्य लोक कला म्हणजे केवळ नृत्य असाच अर्थ घेतात. (परमगुरूंच्या मताप्रमाणे इंग्लिश भाषेतील 'स्कूल' किंवा फ्रेंच भाषेतील याच अर्थाचा 'इकोल' हा शब्द 'कला' या शब्दापासूनच झालेले आहेत.)

येथून पुढे आम्ही आमच्या शास्त्रांविषयी अज्ञानी किंवा उदासीन न राहता आम्ही स्वतःशी प्रामाणिक राहिले पाहिजे आणि म्हणूनच मी आमच्या ज्ञानाच्या या चौदा किंवा अठरा शाखांविषयी संक्षेपाने तुमच्याशी बोलू इच्छितो. तुम्हाला त्यांची निदान नावे तरी माहीत असली पाहिजेत.

शिक्षा, व्याकरण, मीमांसा आणि न्याय यांची चौदा शास्त्रांत गणना केली गेली असून त्यांचा ऊहापोह स्वतंत्रपणे सहा, सात, बारा आणि तेरा या भागांत केलेला आहे. हे विषय तुम्हाला कंटाळवाणेही वाटतील आणि आमच्या आत्मविकासाला यांच्यापासून कोणताही लाभ नाही असेही तुमच्या मनात येईल, परंतु मी तुम्हाला असे विचारतो की तुम्ही रोज दिवसभर जे काही करता त्याचे काय? त्यातून तुमच्या आत्म्याला कितीसा लाभ होतो. तुम्ही वर्तमानपत्रे वाचण्यास कितीतरी वेळ खर्च करता. वर्तमानपत्रात एक किंवा दोन पाने इतका मजकूर क्रीडा विषयावर छापलेला असतो. त्या सर्व वाचनाने तुमच्या दैनंदिन जीवनात काय साध्य होते? किंवा त्याने तुमचा किती आत्मविकास होतो?

काही वर्षांपूवी एके दिवशी मी एका शहरात गेलो होतो. दुपारची वेळ होती. मी सहज बाहेर पडलो तर एका दुकानासमोर खूप मोठी गर्दी दिसली. रेडिओवरून मोठ्या आवाजात बातम्या दिल्या जात होत्या आणि ती गर्दी त्या बातम्या ऐकण्यासाठी जमली

होती. अशी कोणती खळबळजनक बातमी आहे याची मी तेथील माणसाजवळ चौकशी केली असता त्याने सांगितले की समुद्रापलीकडील कोणत्या तरी खंडात हजारो मैल दूर एका गावात क्रिकेट मॅच खेळली जात होती आणि त्याचा ताजा स्कोअर बातम्यात सांगितला जात होता. आणि ती बातमी ऐकण्यासाठी इतकी मोठी गर्दी जमली होती.

सत्य हे आहे की लोक आपल्या मनोरंजनाच्या कार्यक्रमासाठी स्वतःचा वेळ, पैसा आणि शक्ती खर्च करावयास तयार आहेत परंतु वस्तुतः या गोष्टींना काहीच मूल्य नसते. आता मी तुम्हाला आपल्या शास्त्रात आवड दाखवायला सांगणार आहे. शास्त्रांच्या बाबतीत जर आवड दाखवाल तर ते क्रिकेट किंवा अन्य मनोरंजनापेक्षा निश्चितच तुमच्या हिताचे ठरेल. यामुळे तुमच्या जीवनात आध्यात्मिक लाभ प्रत्यक्ष रूपाने झाल्याचे दिसणार नाही कारण असे करण्याचा अंतिम हेतूच मुळात आम्हाला आत्मप्रकाशाच्या मार्गावर नेणे हा असून ते आमच्या ज्ञानवृद्धीसाठी प्रगल्भ करण्यासाठी अत्यावश्यक आहे.

हे ज्ञान हा अमूल्य ठेवा असून ते ईश्वराचे वरदान आहे. हे ज्ञान जर तुम्ही उत्तम शिक्षणाने व जिज्ञासू वृत्तीने ग्रहण कराल तर अंतिम सत्य विजेप्रमाणे तळपत क्षणार्धात तुमच्या प्रचितीला येईल. एकट्या मनुष्यालाच वाणी नावाचे दिव्य वरदान लाभलेले आहे. तो जर त्याचा विवेकाने उपयोग करील तर त्या विपुल प्रमाणात सदिच्छांचा लाभ होईल. यासाठीच वाणीशी संबंधित व्याकरण, निरूक्त, शिक्षा ही शास्त्रे विकसित झाली. आपणापैकी प्रत्येकाला या शास्त्रांचे किमान प्रारंभिक तरी ज्ञान असावयास हवे.

-----

# आमच्या धर्माचे मूळ

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे आमच्या धर्माचे पहिले चार प्रमाण ग्रंथ (म्हणजेच अधिकृत ग्रंथ) असून ते अत्यंत महत्त्वपूर्ण देखील आहेत. अन्य दहा प्रमाण ग्रंथात वेदाची सहा अंगे असून चार उपांगे आहेत.

माणसाला जसे अनेक उपांगे म्हणजेच अवयव आहेत त्याचप्रमाणे वेदांचे मनुष्यरूप काल्पिल्यास वेदपुरुषाला सहा अंगे आहेत. याठिकाणी हेही ध्यानात घेतले पाहिजे की वेदांना वेदमाता असेही म्हटले गेले आहे. चार उपांगे ही वेदांची पूर्णांगे नसली तरी ती वेदपुरुषाचे साहाय्यक अवयव आहेत. वेदाची अंगे सहा असून ती शिक्षा, व्याकरण, छंद, निरुक्त, ज्योतिष आणि कल्प अशी आहेत तर मीमांसा, न्याय, पुराण आणि धर्मशास्त्र ही त्याची चार उपांगे आहेत.

वेदांना मूलभूत महत्त्व असून त्याची अंगे व उपांगे यांना वेदांपासून महत्त्व प्राप्त झाले आहे. आयुर्वेद, अर्थशास्त्र, धनुर्वेद आणि गांधर्ववेद हे उपवेद म्हणजेच साहाय्यक वेद आहेत. अशा प्रकारे प्रमुख धर्मग्रंथांशी असलेला त्यांचा संबंध सुस्पष्ट आहे.

वेदांचा अभ्यास हा अंग-उपांगांसह करावयास हवा. वेदाच्या अशा अभ्यासास 'सांगोपांग अध्ययन' असे म्हटले जाते. यापासूनच प्रचलित 'सांगोपांग' हा शब्द प्रचलनात आला आहे. एखाद्या वक्त्याने किंवा अन्य कोणी कोणत्याही विषयाचा सखोल परामर्श घेतल्यास आपण त्याच्या भाषणास 'सांगोपांग' म्हणजे अंग-उपांगासह केलेले अभ्यासपूर्वक भाषण असेच म्हणतो. पुरातन चतुर्दश विद्यांना म्हणजे सहा अंगे आणि चार उपांगे यांच्या अभ्यासाविषयी देखील आपण सांगोपांग अभ्यास असाच शब्द उपयोगात आणतो. आम्हाला शिक्षणाच्या पुरातन पद्धतीचे पूर्ण विस्मरण झाले असले तरी आमची संस्कृती आमच्यात इतकी भिनली आहे की एखाद्या विषयाच्या सखोल अभ्यासास किंवा सर्वांगपरिपूर्ण प्रस्तुती करणाऱ्या संदर्भात आम्ही अद्यापही 'सांगोपांग' याच शब्दाचा उपयोग करतो. तात्पर्य स्पष्टच आहे की वेद आणि त्याची उपांगे आमच्या जीवनाचा इतका अविभाज्य भाग बनले आहेत की आमच्या येथील सामान्य माणसे देखील परंपरेने सांगोपांग या शब्दाचाच उपयोग अद्यापही करीत आहेत. परंतु दुर्भाग्य असे आहे की आज आम्हाला शास्त्राची नावे देखील माहीत नाहीत.

वेदांनी आमच्या धर्माचे संपूर्ण अंतरंग व्यापलेले आहे आणि आमच्या सर्व धार्मिक कृत्यांच्या आचरणासाठी तेच प्रमाणभूत मानले जातात. तेच आमचे बायबल, कुराण आणि

ग्रंथ साहेब आहेत. परंतु अर्थातच वेद हे धर्मग्रंथांहून फार पुरातन आहेत. हे सर्व ग्रंथ वेदात प्रतिपादित सत्यातूनच उगम पावलेले आहेत. वेद हा शब्दच मुळात प्रमाणित काय आहे हे सुचवितो. बायबल, कुराण आणि अन्य धर्मग्रंथांचा 'ख्रिश्चन वेद' 'मॉहमेडल वेद' 'पारशी वेद' 'शीख वेद' असाच उल्लेख केला जातो. भारतातील ख्रिश्चन, बायबलचा उल्लेख 'सत्य वेद' असा करतात.

वेद या विषयासंबंधी बोलणे तसे कठीण आहे. या विषयाचा आरंभ कोठून करावा व समारोप कोठे करावा हे सांगणाऱ्यास कळत नाही. हे गोंधळात टाकणारे अवघड काम आहे. हा विषयच इतका व्यापक आहे आणि हेच आमच्या वेदांचे वैभव आहे.

'प्रमाणम् वेदाश्च' असे आपस्तंभ सूत्रात म्हटले गेले आहे. वेद हेच खरोखरी सर्व धर्मांचे उगमस्थान आहेत. तसेच ज्यावर या धर्मांची उभारणी झाली आहे त्याचे वेद हे प्रमाण आहेत. तामीळ प्रदेशातील थोर लोकांनी जर कोणता ग्रंथ प्रेमाने आपल्या हृदयात बाळगला असेल तर तो ग्रंथ 'मनु धर्म मूल' अर्थात मनुस्मृति हाच होय. मनुच्या धर्मशास्त्राला संपूर्ण भारतात अत्यंत आदराचे स्थान आहे. 'मनुनीति कण्द चोल' या नावाने तामिळनाडूमध्ये होऊन गेलेला राजा हा न्यायदानासाठी अत्यंत प्रसिद्ध होता. न्यायनिवडा करण्यात तो इतका निःपक्षपाती आणि कठोर होता की एकदा त्याच्या मुलाच्या रथाच्या चाकाखाली एका गायीचे वासरू चिरडून मेले. पीडित गाय जेव्हा राजाकडे न्याय मागण्यास गेली तेव्हा राजाने स्वतःच्या मुलाला त्याच रथाच्या चाकाखाली चिरडून ठार मारण्याची शिक्षा दिली. मनुस्मृति बाबतीत प्रमाण आहे. परंतु मनुस्मृति स्वतःस सर्व धर्मावरील प्रमाण मानते का? नाही! 'वेदोऽखिलो धर्ममूलम्' अर्थात वेद हेच धर्म; सर्व धर्मांचे मूळ आहेत असेच मनुस्मृतीत म्हटलेले आहे. वेदच सर्व धर्मांचे प्रमाण आहेत असे मनुस्मृति म्हणते.

आपण वेदांच्या आज्ञांचे पालन केले पाहिजे. ज्यावेळी आम्हाला कोणताही प्रश्न न करता एखाद्या गोष्टीचे पालन करावयास सांगितले जाते. तेव्हा हा 'वेदांचा शब्द' आहे असे म्हणण्याची पद्धती आहे. सर्वसाधारण माणसाच्या मनात वेदांच्याविषयी किंवा वेदांनी दिलेला निर्णय निःशंकपणे पाळण्याविषयी असलेल्या निष्ठेचाच हा पुरावा आहे. वेदातील निर्णय किंवा वेदवाक्य ही आमच्यासाठी हजारो वर्षांपासून पवित्र व अनिवार्य अशीच आज्ञा आहे.

-----

## प्रकरण - ६

# शाश्वत

वेदांचा काळ सांगणे केवळ अशक्य आहे. कोणतीही गोष्ट आपण 'अनादी' आहे असे म्हटले तर तिच्यापूर्वी काहीही अस्तित्वात नव्हते असे त्याचा अर्थ होतो. एखादा ग्रंथ कोणी एका व्यक्तीने किंवा अनेक व्यक्तींनी लिहिला आहे असे म्हटले तर ते आपण मान्य करू शकतो. 'जुन्या करारा' मध्ये अनेक प्रेषितांची वचने संकलित केली गेली आहेत. 'नव्या करारा' मध्ये येशू ख्रिस्ताच्या कथा व प्रवचने दिलेली आहेत. कुराण या पवित्र ग्रंथात प्रेषित महंमदाची शिकवण ग्रथित केली गेली आहे. या प्रकारच्या धर्माचे संस्थापक या ऐतिहासिक व्यक्ती असल्याने त्यांची धर्मविषयक शिकवण काही त्यांच्यापूर्वी अस्तित्वात नव्हती. वेद ही याचप्रमाणे एका किंवा अनेक उपदेशकांची रचना आहे काय? आणि हे धर्मगुरू विभिन्न कालखंडांत होऊन गेले असे आम्ही मानावयाचे काय? दहा हजार, लक्ष किंवा दशलक्ष वर्षांपूर्वी हे धर्मगुरू होऊन गेले असे मानावयाचे काय? यापैकी कोणत्याही कालखंडात वेदांची रचना झाली असे मानल्यास वेदांना 'अनादी' असे म्हणता येणार नाही. वेदांची रचना एक लक्ष वर्षांपूर्वी झाली असे जरी म्हटले तरी त्या कालखंडाच्या पूर्वी वेद नव्हते असेच म्हटल्यासारखे होईल.

वेद ही मर्त्य मानवांनी केलेली रचना आहे असे मान्य केले तरच वरील प्रश्न संभवतात आणि असे असेल तर वेदांना 'अनादी' म्हणता येणार नाही. वेद ही मर्त्य ऋषी आणि द्रष्ट्या मुनींची रचना आहे असे आम्ही समजतो आणि तसेच म्हटले जाते व आम्हाला इतिहासाच्या पाठ्यपुस्तकात तसेच शिकविले गेले आहे.

वेदात अनेक सूक्ते आहेत हेही ध्यानात घ्या. ज्याप्रमाणे ज्ञानसंबंधाच्या तेवारममध्ये अनेक पतिगम् आहेत आणि जशा प्रत्येक पतिगमात दहा कडवी आहेत त्याप्रमाणे प्रत्येक सूक्तात ठरावीक संख्येत मंत्र आहेत. सु+उक्त = सूक्त. या शब्दात 'सु' या उपसर्गाचा अर्थ 'सुगुण' किंवा 'सुलोचना' यातील 'सु' सारखा म्हणजे चांगला असा आहे. 'उक्त' याचा अर्थ 'बोलला गेलेला' किंवा 'जे बोलले गेले ते' असा आहे. म्हणजेच 'सूक्त' याचा अर्थ 'चांगला शब्द' 'चांगला उच्चार' किंवा 'उत्तम उच्चारले गेलेले' असा आहे.

शास्त्रांनी घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणे आपण जेव्हा वेदांचे पठण करतो तेव्हा म्हटल्या जाणाऱ्या प्रत्येक सूक्ताबरोबर आपण त्या सूक्ताशी संबंधित ऋषीचे नाव, त्या सूक्ताचा छंद आणि त्या सूक्ताद्वारे आवाहन केली गेलेली देवता यांचा उच्चार करतो. विभिन्न ऋषींच्या नावाशी जोडले गेलेले वेगवेगळे मंत्र असल्याने आपणास असे वाटते की

त्या मंत्रांची रचना त्या त्या ऋषींनी केली आहे. त्याचप्रमाणे आपण मंत्राबरोबर त्या मंत्राच्या ऋषीची वंशपरंपरा, त्याचे गोत्र इत्यादीचा उच्चार करतो. उदाहरणार्थ ''अगस्त्यो मैत्रावरुणीः'' याचा अर्थ मित्र - वरुण याचा पुत्र अगस्ती असा आहे. आणखी एक उदाहरण पाहा- मधुच्छंद वैश्वामित्रः'' याचा अर्थ विश्वामित्र गोत्रात उत्पन्न झालेला ऋषी मधुच्छंद'' असा आहे. याप्रमाणे अनेक ऋषींच्या नावांनी मंत्र आहेत. जर अगस्त्य ऋषीच्या नावाशी निगडित असलेले मंत्र अगस्त्याने रचलेले असतील तर ते मित्र-वरुणाच्या पूर्वीच्या काळात अस्तित्वात नसणार, त्याचप्रमाणे मधुच्छंदाच्या नावाचे मंत्र विश्वामित्राच्या काळात असणार नाहीत. हे जर खरे असेल तर वेद हे 'अनादी' आहेत असे तुम्ही कसे म्हणू शकाल?

मंत्र हे ऋषींच्या नावांशी निगडित असल्यामुळे आम्ही ते मंत्र त्या ऋषींनी रचले आहेत असा त्याचा अर्थ लावतो. परंतु ही वस्तुस्थिती नाही. 'अपौरुषेय' याचा अर्थ जी रचना कोणाही पुरुषाची नाही. वेदांची रचना एका किंवा अनेक माणसांनी केली आहे का? रचनाकार हे ऋषी असतील तरी देखील वेदांना 'पौरुषेय' म्हणावे लागेल. परंतु ज्याअर्थी वेदांना अपौरुषेय म्हटले गेले आहे. त्याअर्थी त्यांची रचना ऋषींनी देखील केलेली नाही. मंत्र हे ऋषींनी रचलेले असते तर त्या ऋषींना 'मंत्रकर्ता' असे म्हटले गेले असते. परंतु वास्तविकता ही आहे की ऋषींना 'मंत्रकर्ता' म्हटले गेले नसून 'मंत्रद्रष्टा' म्हणजे ज्याने ते वेद पाहिले तो 'मंत्रद्रष्टा' असे म्हटले गेले आहे.

आपण जेव्हा कोलंबसाने अमेरिकेचा शोध लावला म्हणतो तेव्हा त्याने अमेरिका खंड निर्माण केले असा त्याचा अर्थ नसतो. त्याचा अर्थ इतकाच असतो की कोलंबसाने अमेरिका खंडाच्या अस्तित्वाचे जगाला ज्ञान करून दिले. त्याचप्रमाणे न्यूटन, आईनस्टाईन इत्यादींच्या नावे असलेल्या शोधांबद्दल म्हणता येईल. त्यांनी ते वैज्ञानिक सत्य शोधून काढले, निर्माण केले नाही. वर फेकलेली वस्तू खाली पृथ्वीवर पडते हे न्यूटन म्हणतो म्हणून घडत नाही. न्यूटन सारख्या शास्त्रज्ञांनी निसर्गातील वैज्ञानिक सिद्धान्त शोधून काढले आणि जगाला त्यांचे ज्ञान करून दिले. त्याचप्रमाणे ऋषींनी या मंत्रांचा शोध लावला आणि विश्वाला ते दान केले. हे मंत्र त्या ऋषींच्या वाडवडिलांच्याही पूर्वी अस्तित्वात होते. परंतु ते विश्वाला अज्ञात होते. ऋषींनी मानवमात्राला त्या मंत्राचे ज्ञान करून दिले म्हणून आम्ही जेव्हा ते मंत्र सुरात म्हणतो तेव्हा त्या ऋषींच्या नावाचा उच्चार करण्याची परंपरा आहे.

ग्रंथांचे प्रकाशक हे त्या ग्रंथांचे लेखक असतातच असे नाही. चित्रपटाचे वितरण करणारा त्याचा निर्माता असतोच असे नाही. त्याचप्रमाणे ज्या ऋषींनी मंत्र विश्वापुढे प्रकट केले त्यांनी ते निर्माण केलेले नाहीत. ऋषींच्या पूर्वीही मंत्र अस्तित्वात होते. तरी परंतु

त्या मंत्रांचे आम्हाला ज्ञान करून देण्याचे महान कार्य त्यांनी केले म्हणूनच मंत्र म्हणताना त्या ऋषीचा नामोच्चार करून त्याला आम्ही वंदन करतो.

ऋषींनी आपल्या डोळ्यांनी मंत्र पाहण्यापूर्वी मंत्राच्या अस्तित्वाबद्दल आम्हाला काही ज्ञान आहे का? मंत्र हे जर शाश्वत आहेत तर ते निर्माण होताना स्वतः प्रकट झाले असा त्याचा अर्थ आहे काय? पृथ्वीवर मनुष्यप्रणाली अस्तित्वात येण्यापूर्वी मंत्र विद्यमान होते काय? मंत्र अस्तित्वात कसे आले?

वेद हे सृजनाच्या वेळीच प्रकट झाले असे आपण मानले तर परमात्म्याने विश्वाबरोबरच मंत्र निर्माण केले असा त्याचा अर्थ होईल. परमात्म्याने ते मंत्र पुढे ऋषींनी शोधून काढावे म्हणून कोठेतरी लिहून ठेवले का? असे घडले असेल तर वेदांना अनादी म्हणता येणार नाही. विद्यमान विश्वाची ब्रह्माने कधी निर्मिती केली ह्याची आम्हाला कल्पना आहे.

कृत, त्रेता, द्वापार आणि कली या चार युगांचे किंवा कल्पाचा कालावधी निश्चित केलेला आहे. चार युगे मिळून चतुर्युग होतात. हजार चतुर्युगांचा मिळून ब्रह्म्याचा एक दिवस होतो आणि इतक्याच प्रदीर्घ कालावधीची त्यांची रात्र असते. या कालगणनेनुसार ब्रह्म्याचे वय सध्या पन्नास वर्षाहून अधिक आहे. प्रत्येक धार्मिक कृत्यांच्या प्रारंभी आपण संकल्प उच्चारतो, ज्यात त्या कृत्याच्या स्थळ-काळाचा उल्लेख करताना ते कृत्य ब्रह्म्याच्या अमुक अमुक वर्षात, अमुक अमुक महिन्यात अमुक अमुक शुक्ल किंवा कृष्ण पक्षात करीत असल्याचा उल्लेख असतो. यावरून आपणास ब्रह्मा अस्तित्वात आल्याचा काळ कळतो. या कालगणनेनुसार ब्रह्मा जरी लक्षावधी वर्षापूर्वी निर्माण झाला असे आपण मान्य केले तरी त्याला 'अनादी' म्हणता येणार नाही. मग सृष्टिनिर्माणाचा प्रारंभ काळ नाही असे म्हणता येईल. प्रत्यक्ष सृष्टिनिर्मात्याला आरंभ आहे असे म्हटल्यावर वेदांना आपण 'अनादी' कसे काय म्हणू शकतो?

परमात्मा शाश्वत असल्यामुळे सृष्टिनिर्माणापूर्वी म्हणजे जेव्हा ब्रह्माही नव्हता तेव्हाही परमात्मा होता. परमात्मा, ब्रह्म किंवा परमोच्च ईश्वर हा शाश्वत आहे. ब्रह्मांड, सर्व सजीव प्राणिमात्र आणि निर्जीव वस्तू त्या ईश्वरापासून अस्तित्वात आल्या. परमात्म्याने स्वतः त्यांना निर्माण केले नाही तर त्याचे ब्रह्म्याचे द्वारा त्यांना निर्माण केले. विष्णूच्या द्वारा तो त्यांचे पालन करतो आणि रुद्राचे द्वारा त्यांचा विध्वंस करतो. नंतर ब्रह्मा, विष्णू आणि रुद्र यांचा स्वतःचा नाश तो ईश्वर करतो. विद्यमान असलेला ब्रह्मा जेव्हा शंभर वर्षाचा होईल तेव्हा तो परमात्म्याशी एकरूप होईल म्हणजेच त्याच्यात विलीन होईल. नंतर दुसरा ब्रह्मा निर्माण होईल आणि तो दुसरी संपूर्ण सृष्टी पुन्हा निर्माण करण्याच्या कार्याचा आरंभ करील. येथे हा प्रश्न उद्‌भवतो की दुसरा ब्रह्मा निर्माण

करण्यापूर्वी परमात्मा वेद निर्माण करतो का?

सृष्टीच्या निर्माणापूर्वीही वेद अस्तित्वात होते हे आम्हाला शास्त्रातून कळते. खरे तर ब्रह्म्याने निर्माणाचे कार्य वैदिक मंत्राच्या साहाय्याने केले असे शास्त्रे सांगतात. ध्वनीच्या रूपात प्रकट झालेल्या मंत्रांच्या साहाय्याने ब्रह्म्याने सृष्टिनिर्माणाचे कार्य कसे केले याबद्दल मी आपणास नंतर सांगेन. निर्मितीबद्दल भागवतात वर्णन करणाऱ्या उताऱ्यात देखील ब्रह्म्याने हे विश्व वेदाच्या साहाय्याने केले असेच म्हटले आहे.

वैदिक मंत्रांच्या साहाय्याने ब्रह्म्याने हे विश्व निर्माण केले, या तर्काच्या आधारे वेद हे अनादी आहेत असे म्हटले गेले आहे काय? याच्या आधारे वेद आणि ईश्वर हे दोन्हीही अनादी आहेत असे म्हणणे संयुक्तिक होईल का? ईश्वराने हे विश्व निर्माण करण्यापूर्वी वेद निर्माण केले असे जर आपण म्हणू तर एक काळ असा होता की जेव्हा वेद अस्तित्वात नव्हते असा त्याचा अर्थ होईल आणि त्याने वेद हे अनादी आहेत या विधानाविषयी असंगतता निर्माण होईल.

ईश्वर आणि वेद दोन्हीही अनादी आहेत असे आम्ही म्हणू तर त्यामुळे ईश्वराने वेद निर्माण केले असे म्हणणे बरोबर होणार नाही व ईश्वराने वेद निर्माण केले असे तुम्ही म्हणाल तर वेदांना अनादी म्हणता येणार नाही. सर्वांचाच उगम ईश्वरात आहे. तर या तर्कानुसार ईश्वर आणि वेद हे दोन्हीही काळाच्या संदर्भात अनादी आहेत असे म्हणता येणार नाही. अस्तु हे सर्व काही गोंधळ निर्माण करणारे आहे.

तर मग वेद हे अनादी आहेत आणि ते ईश्वरनिर्मित नाहीत हे कशाच्या आधारावर सत्य मानायचे? याचे उत्तर प्रत्यक्ष वेदातच दिलेले आहे. स यथार्द्रैधाग्नेरभ्याहितात्पृथग्धूमा विनिश्चरन्तयेवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निःश्वासितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदो सामवेदोऽथर्वांगिरस इतिहास; पुराणं विद्या उपनिषद श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि निश्वासितानि ।। वृद- २-४-१०.

उपनिषदे हा वेदांचाच भाग असून ऋक्, यजु आणि सामवेद ही ईश्वराचे श्वास आहेत असे म्हटले गेले आहे. येथे 'निश्वासिते' असा शब्द वापरला गेला आहे.

आपण श्वासाशिवाय एक क्षणही जगू शकत नाही हो कोणाला सांगण्याची गरज नाही. त्याचप्रमाणे वेद हे चिरंतन सत्य असलेल्या ईश्वराचे प्राणासमान श्वास आहेत. वेद हे याप्रमाणे ईश्वराशी त्याचा श्वास होऊन तादात्म्यरूपाने अस्तित्वात आहेत.

ईश्वराने वेद निर्माण केले आहेत असे म्हणणे रीतसर नाही हे आपण येथे लक्षात घेतले पाहिजे. आपला श्वास आपण निर्माण करतो का? नाही, तो आपल्या जन्माबरोबरच

अस्तित्वात येतो. अगदी तसेच ईश्वर आणि वेद यांच्या बाबत आहे आणि म्हणूनच ईश्वराने वेद निर्माण केले असे आपण म्हणू शकत नाही.

अनेक विषयांवर प्रभुत्व असलेले प्रकांड पंडित विद्यारण्य स्वामी हे इ.स. १३३६ मध्ये स्थापन झालेल्या विजयनगर साम्राज्याचे संस्थापक होते. वेदांचे भाष्यकार म्हणून जेव्हा त्यांचा उल्लेख केला जातो तेव्हा त्यांचे धाकटे बंधु सायनाचार्य यांचेही स्मरण होते. वास्तविक वेदावरील भाष्य या सायनाचार्यांचेच आहे. विद्यारण्यस्वामींनी वेदभाष्य लिहिताना गुरूंना केलेल्या प्रार्थनेत गुरूची प्रार्थना करताना त्याला ईश्वर मानून त्याचा गौरव करीत, 'यस्य निश्वसितम् वेदाः' म्हणजे वेद हे ज्याची निश्वसिले आहेत' असेच म्हटले आहे. उपनिषदात देखील वेदाबद्दल 'निश्वसिते' असाच शब्द येतो. येथे सुद्धा वेद ईश्वराने वेद निर्माण केले असे म्हटलेले नाही.

भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात -
सर्वस्यचाहं हृदी सन्निविष्टो -
मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च
वेदैश्च सवैरहमेव वेद्यो
वेदान्तकृद् वेदविदेव चाहं (भ.गीता अ. १५ श्लो. १५)

"सर्व वेदांकडून जाणला जाणारा मीच आहे" स्वतःला वेदांचा कर्ता, वेदकृत न म्हणविता वेदवित् वेदांना जाणणारा असे म्हटले आहे. तत्त्वज्ञानविषयक सत्य जपून ठेवणारा वेदान्त मानवाला ज्ञात करून देण्यापूर्वीही वेद ध्वनिरूपाने ईश्वराचा प्रत्यक्ष श्वास म्हणून अस्तित्वात होते. वेद हे खरोखरच ईश्वरामध्ये ईश्वर म्हणून वास करीत होते आणि करीत आहेत.

भगवत् गीतेप्रमाणेच भागवतही ईश्वराने वेद निर्माण केले असे म्हणत नाही. भागवत म्हणते की वेद हे प्रकाशशलाके प्रमाणे ईश्वराच्या हृदयात अकस्मात प्रकट झाले. या अकस्मात प्रकट होण्याच्या संदर्भात भागवतात 'स्फुरणम्' असा शब्द योजलेला आहे. हा शब्द कोणत्याही पूर्वी अस्तित्वात नसलेल्या व नव्याने अस्तित्वात आणलेल्या गोष्टीला आपण लावू शकत नाही. ब्रह्मा हा असा आद्यऋषी आहे ज्याला वेद सर्वप्रथम दिसले. परंतु परमेश्वरानेच त्याला वेदांची जाणीव करून दिली. परमेश्वराने त्याला ते आपल्या मुखातून वाणीद्वारा दिले का? भागवत सांगते 'नाही', परमात्म्याने ब्रह्माला वेद आपल्या हृदयातून दिले. भागवत पुराणाच्या पहिल्या श्लोकात 'तेने ब्रह्महृदाय आदिकवये' असे म्हटले आहे.

(जन्माद्यस्य यतोन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट ।
तेने ब्रह्महृदाय आदिकवये मुह्यन्ति यत्सूय्यः।।
तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा)

धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमही ।। १ ।।

परमेश्वराने वेद निर्माण केले नाहीत. सत्य हे आहे की वेद हे परमेश्वराच्या हृदयात निरंतर विद्यमान आहेत. वेद ब्रह्मदेवाला द्यावेत असा जेव्हा परमेश्वराने सहज संकल्प केला तेव्हा ते ब्रह्मदेवााला तत्काळ प्राप्त झाले आणि त्यांच्या ध्वनीपासून त्याने सृष्टिनिर्माणाच्या कार्याला आरंभ केला.

तामीळ तेवारमध्ये 'वेदिया वेदगीता' असे वर्णन केलेले आहे. त्यात म्हटले आहे की परमेश्वर वेदांच्या विविध शाखा किंवा मूळ ऋचांचे सतत गायन करीत आहे. परमेश्वर वेदांच्या ऋचा गात आहे याचा आम्ही काय अर्थ समजावा? श्वसन हेच मूलतः संगीत आहे. आमच्या श्वसनाला 'हंस-गीता' असे म्हटले जाते. वेद हे असे परमेश्वराच्या श्वसनाचे संगीत आहे. तेवारम पुढे म्हणते - पवित्र यज्ञोपवित व विभूति भस्म धारण करून निरंतर स्नान करीत ईश्वर वेदांचे गायन करीत आहे.

या वर्णनावरून कळून येईल की हे वर्णन 'महागणपति' असलेल्या ईश्वराचे आहे. अप्परस्वामीगल यांनी उल्लेखिल्याप्रमाणे ईश्वराच्या अंगाला लावलेली आणि दुधाशी साम्य असलेली विभूति ही पोवळ्यासारखी आहे. तो म्हणतो की परमेश्वर वेदाचे 'पठण' करतो, त्यांचे 'गायन' करतो, पण त्याने वेद निर्माण केले नाहीत. वैष्णव दिव्य प्रबंधनमध्ये देखील वैदिक यज्ञाचे अनेक संदर्भ आलेले आहेत, परंतु कसा कोण जाणे परमेश्वर वेदांचे गायन करीत असल्याचा संदर्भ मात्र मला त्यात आढळला नाही.

तामीळ वैष्णव संतकवी पुट्टझेन्डी पुलवर याने गजेंद्रमोक्षाची कथा सांगताना सुसरीने पाय पकडलेल्या गजराजाने आर्ततेने विष्णूच्या केलेल्या धाव्याचे वर्णन केले आहे. परमेश्वर आपल्या भक्ताची संकटातून मुक्तता करण्यासाठी किती आतुर असतो ते दाखविण्यासाठी ही कथा सांगितली गेली आहे. 'आदिमूल्यमे' हे तामीळ भाषेतील अनादि ईश्वराला संबोधित करताना होणारे 'आदिमूलम्' चे संबोधनात्मक रूप आहे. हा धावा ऐकताच परमेश्वर भक्त गजराजापुढे प्रकट होऊन 'काय?' असे विचारतो. हे वर्णन करताना कवी म्हणतो की, महाविष्णू वेदाच्या समोरील भागात प्रकट झाले. (वेदत्तीन मून निनादन). म्हणजेच तामीळ कवीच्या म्हणण्याप्रमाणे 'परमेश्वर वेदाच्या पुढील भागात प्रकट झाले असा आहे. वेदाच्या आधी, वेद येण्याच्या पूर्वी प्रकट झाले असे नाही. 'माणूस दारासमोर उभा राहिला' हे तामीळ भाषेत सांगताना 'वित्तीन मून निनादन' असेच म्हटले जाते. म्हणजेच 'वेदत्तीन मून निनादन' याचा अर्थ तो सर्व वेदांच्या आरंभीच्या भागात प्रकट झाला असाच घेतला पाहिजे. अजून एक विचार माझ्या मनात येतो. पेरुमाल म्हणजे विष्णू किंवा कोणत्याही वैष्णव देवतेला मिरवणुकीतून कसे नेले जाते ? उत्सवमूर्तीच्या म्हणजे मिरवत नेल्या जाणाऱ्या सर्वात पुढच्या भागात तिरुवायमोझी म्हणजे

वेदपाठक म्हणजे वेदांचा पाठ म्हणणारे असतात. येथे देखील आपण भगवंत वेदाच्या आधीच्या भागी म्हणजे पुढे उभे राहिले (वेदत्तीन मून निनादन) असे म्हणू शकतो.

वैष्णव आगम आणि पुराणात महाविष्णूला विशेष करून 'यज्ञस्वरूपी' (यज्ञाचे प्रत्यक्ष रूप) व 'वेदस्वरूपी' म्हणजे (वेदाचे प्रत्यक्ष रूप) असे म्हटले गेले आहे. परंतु या कोणत्याही संहितेत विष्णूला 'वेदाचा निर्माता' असे म्हटलेले नाही.

वेदातच येणाऱ्या पुरुषसूक्तात वेदांचा 'जन्म' झाला (अजायता) असे म्हटले गेले आहे. तथापि हे स्तोत्र प्रतीकात्मक किंवा दृष्टान्तस्वरूप असल्याने त्याचा शब्दशः अर्थ घेऊ नये. परमपुरुषाचा यज्ञात पशूप्रमाणे बळी दिला गेला आणि या यज्ञ समर्पणातूनच निर्मितीचे कार्य सिद्धीस गेले असेही येथे म्हटले गेले आहे. याच वेळी वेदही प्रकट झाले. यज्ञपशू म्हणून यज्ञात परमपुरुषाचा बळी दिला गेला. याचा अर्थ आपण कसा लावावा? याचा तंतोतंत शब्दशः अर्थ घेऊ नये. या यज्ञात तुपाऐवजी वसंत ऋतूची आहुती दिली गेली, ग्रीष्मऋतूचा समिधा म्हणून आणि शरद ऋतूचा हविष्य म्हणून उपयोग केला गेला. जे कोणी मंत्रावर ध्यान करतात व मंत्रात निमग्न होतात केवळ त्यांनाच याचा अर्थ आंतरिक अनुभूती द्वारा कळू शकेल. तेव्हा 'वेदांचा जन्म झाला' या विधानाचा आपण शाब्दिक अर्थ घेऊ नये.

ईश्वराचा श्वास 'ध्वनी' च्या रूपाने प्रकट झाला आणि ब्रह्मदेवाने या ध्वनीच्या रूपाने आपले सृष्टिनिर्माणाचे कार्य केले हे विधान आधुनिक मानवाच्या मनाला मूर्खपणाचे वाटेल. परंतु बारकाईने पाहिल्यास ही विधाने महान वैज्ञानिक सत्यावर आधारित आहेत हे आपणस पटेल.

वेद हे केवळ वर्तमानकालीन विज्ञानाशी सुसंगत असतील तरच आपण त्यांचा स्वीकार केला पाहिजे असे मला म्हणावयाचे नाही किंवा परमात्म्याविषयीचे सत्य प्रकट करणारे आमचे वेद हे विज्ञान आणि वैज्ञानिकांच्या आवाक्याबाहेरचे असून ते विज्ञानाच्या कक्षेत आणावयास हवे होते असेही मला वाटत नाही. वेदातील अनेक विषय विज्ञानाशी सुसंगत न वाटण्याचा संभव आहे आणि याच कारणासाठी ते चूक आहेत असे मानता कामा नये. परंतु परमात्म्याच्या श्वसनातून ध्वनी निर्माण झाला व त्यातून सृष्टिनिर्माणाचे कार्य कसे होऊ शकले हा आमचा येथील प्रतिपादनाचा विषय मात्र विज्ञानाशी सुसंगत आहे.

-----

## प्रकरण ७

# ध्वनी आणि निर्मिती

(हे प्रकरण प्र. ८ भाग ३ आणि ह्या भागाचे प्र. १३ चे जोडीने वाचावे.)

ध्वनी म्हणजे काय? आधुनिक शास्त्रानुसार ध्वनी म्हणजे कंपन. ''जर तुम्ही अणूच्या गाभ्याचे परीक्षण केले तर सर्व पदार्थ एकच आहेत असे कळून येईल''. अणु शास्त्र आईनस्टाईनच्या संकल्पनेनुसार ह्या अद्वैती तत्त्वज्ञानाच्या निष्कर्षाकडे येते. हे सर्व जग शक्तीचा प्रचंड प्रवाह आहे. प्रत्येक गोष्ट ही विद्युतचुंबकीय प्रवाह आहे. मग आपण विविध वस्तूंच्या प्रकटीकरणाचे काय कारण सांगतो. हे विविध प्रकारच्या कंपनांमुळे घडून येते.

जेथे कंपन असते तेथे ध्वनी असतो. या उलट, ध्वनी निर्माण करण्यासाठी त्याच्याशी संबंधित कंपन निर्माण करावे लागते. अशी श्रद्धा आहे की ह्या विश्वाची निर्मिती परमात्म्याच्या निश्वासिताबरोबर वेदध्वनीचे प्रकटीकरण करती झाली. ही गोष्ट, एकाच शक्तीची विविध कंपने ही निर्मितीचे कारण असतात ह्या शास्त्रीय संकल्पनेप्रमाणेच आहे.

मानव आणि इतर जीव यांचा विचार करा. त्यांचे आरोग्य आणि भावभावना कोण ठरवितो? श्वसनाच्या वेळी जो श्वास आपल्या नाड्या, रक्तवाहिन्यांमधून जातो तो कंपने निर्माण करतो. त्यावर आरोग्याची स्थिती अवलंबून असते. जे आपला श्वासोच्छ्वास योगाचे आचरण करून संयमित ठेवतात ते आश्चर्यकारक प्रमाणात निरोगी असतात. त्यांच्या नसा कापल्या तरी रक्तस्राव होत नाही. नाडीलाच नस असे देखील म्हणतात. नाडी आणि हृदयाचे ठोके थांबवून ते समाधी अवस्थेत स्वतःस जमिनीखाली पुरून घेऊन राहू शकतात. त्यांना जरी साप चावला किंवा विंचवाने दंश केला तरी त्यांना विषबाधा होत नाही, कारण ते श्वसनाच्या वेळेस त्यांच्या नाडीची कंपने संयमित ठेवतात.

शरीरच नव्हे तर मनासाठीही श्वसन अत्यावश्यक आहे. विचारांचे उगमस्थान असलेले मन आणि अत्यावश्यक (प्राणिक) ऊर्जा म्हणजे श्वसनाचा उगम हे एकच असतात. नाडीच्या विविध कंपनांमुळे चांगले किंवा वाईट विचार निर्माण होतात. तुम्ही स्वतः त्याची परीक्षा घेऊ शकता. जेव्हा तुम्ही एखाद्या मूर्तीसमोर पवित्र स्थळी असता किंवा महात्म्याच्या सहवासात असता तेव्हा तुम्ही कसा श्वासोच्छ्वास करता आणि जेव्हा रागाने किंवा वासनेने तुमचे मन चंचल झालेले असते तेव्हा तुम्ही कसा श्वासोच्छ्वास करता ते तुम्हीच पहा. भजन किंवा मंदिरातील समारंभासारख्या काहीतरी उदात्त बाबीमध्ये भाग घेता तेव्हा जे सुख तुम्ही अनुभवता ते आणि इंद्रियाद्वारे मिळणारे सुख हे भिन्न असणारच, संबंधित नाडीची कंपनेही भिन्न असणारच.

उदात्त प्रकारच्या आनंदाचा तुम्ही जेव्हा अनुभव घेत असता तेव्हा श्वसनाचा मार्ग उजव्या नाकपुडीतून असतो पण तुम्ही जेव्हा इंद्रियसुख अनुभवत असता तेव्हा तो डाव्या नाकपुडीतून असतो. तुमच्या सर्व उत्कट इच्छा आणि भावना यांचे उगम असलेल्या प्रसन्नतेवर जेव्हा तुम्ही वाढत्या एकाग्रतेने चिंतन करीत असता तेव्हा श्वास दोन्ही नाकपुड्यांतून संथपणे, समान आणि तालबद्ध जातो येतो. जेव्हा तुम्ही चिंतनविषय असलेल्या वस्तूमध्ये गर्क असता तेव्हा श्वसन स्वतःच थांबते; परंतु जीवन चालू असते. ज्ञान म्हणून संबोधली जाणारी जाणीव त्यावेळेस जणू बहरास आलेली असते.

एखाद्या माणसाचे जड शरीर आणि जीवनाचे सार असलेली जाणीव ह्या दोन्ही गोष्टी त्याच्या श्वसनाच्या मार्गावर अवलंबून असतात. त्या दोन्हींचा विकास किंवा ऱ्हास श्वसनावर अवलंबून असतो. माणसाचे श्वसन त्याच्या अंतरंगातील कंपनांना व्यवस्थित ठेवते.

असंख्य जड पदार्थ आणि जीव ह्यांचा उगम आणि वाढ ही परमात्म्यापासून झालेली नाही का? त्यांच्या योग्य अशा हालचाली ह्या, अंतिम वस्तू म्हणजे परमात्म्यापासून आलेल्या आहेत.

अगदी अद्वैतानुसारही पूर्णपणे स्थिर असलेले, काय आहे हे नेमके ठरवता न येणारे, निर्गुण असे ब्रह्मही मायेच्या शक्तीसह ह्या विश्वात असंख्य रूपांत प्रकट होत असते. मायेचे वर्णन करता येत नाही. आकारात असो वा निराकारात, आपल्याला भौतिक विचाराने जड पदार्थ आणि जीव यांचे अस्तित्व मान्य करावे लागते. पण आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की त्या मायेचाही उगम ईश्वरात आहे-तो 'मायीन' आहे. मायेच्या शक्तीचा विचार सोडून जे जे आपण पाहतो ते सर्व परब्रह्म म्हटल्या जाणाऱ्या त्या वस्तूतील कंपनांतून उत्पन्न झालेले आहे. त्याचवेळेस ह्या सर्व कंपनांसह ही वस्तू अंतर्यामी स्थिर आणि शांत असते. ही स्थिरता असूनही आपल्या इंद्रियांना चटकन जाणवणाऱ्या हालचाली असतात. त्या विस्कळीत हालचाली नसतात पण त्यात सूर्यासारखे खगोल एका बाजूला आणि अगदी सूक्ष्म जीव किंवा क्षुल्लक गवताचे पाते दुसऱ्या बाजूला यांचा समावेश असलेली अवस्था त्या निर्माण करतात.

ही सुव्यवस्था भौतिक जीवन सुखी करते. निसर्गातील सर्व शक्ती एका सुव्यवस्थित प्रणालीत आणून परमात्म्याने हे केलेले आहे. तुम्हाला ह्यात काही वेळेस वैगुण्य दिसले आणि नैसर्गिक शक्ती आपल्या विरुद्ध गेलेल्या दिसल्या तर ते त्याला कधीतरी खेळकर असावे वाटते म्हणूनच.

मानवी मन कितीही दूर भटकू शकते. ते भूत किंवा पिशाच्चाप्रमाणे दिशाहीन भटकत असते. जितके हे वैश्विक जीवन व्यवस्थित असते तितके मानवी मन नियंत्रण तोडते आणि वेड्या कुत्र्याप्रमाणे सैरभैर भटकते.

जेव्हा निसर्गातील शक्ती आपल्याला प्रतिकूल असतात तेव्हा त्यांना बदलण्याचा किंवा त्या आपल्याला अनुकूल करून घेण्याचा काही मार्ग आहे का? जेव्हा आपले मन भटकत असते तेव्हा त्याला नियंत्रणात आणण्यासाठी उपाय आहे का? जर प्रत्येक गोष्ट कंपनाने, ध्वनीने निर्माण झाली असेल तर त्याच ध्वनीने निसर्गातील शक्ती आपल्याला अनुकूल करून घेणे आणि आपले मन शुद्ध करणे आणि त्याला नियंत्रणात आणण्याचा मार्ग हे सर्व असलेच पाहिजे. वेद अशा ध्वनीची रचना करतात.

योगाभ्यासाने आपण आपला श्वास म्हणजेच प्राणशक्ती नियंत्रित करून विश्वात्मक उर्जेशी जोडले जाऊ शकतो आणि त्याद्वारे स्वतःच्या आत्म्याचे आणि मानव जातीचे उन्नयन करू शकतो. नाडीची कंपने आपल्याला ऐकू येऊ शकतील असा ध्वनी निर्माण करू शकत नाहीत. विज्ञान सांगते की मानवाच्या श्रवणाच्या आवाक्याच्या बाहेर असलेले असे ध्वनी असतात. त्याचप्रमाणे मानवी डोळ्यांच्या भिंगांतून आरपार जाऊ न शकणारा प्रकाश असतो.

तथापि, जे आपल्या आवाक्यात नाही ते आवाक्यात आणणे शक्य आहे. जेव्हा एखादा रेडिओवर गातो तेव्हा त्याच्या संगीताच्या ध्वनीचे रूपांतर अवकाशात प्रवास करणाऱ्या विद्युतचुंबकीय लहरीत होते. मग आपल्याला संगीत कसे ऐकू येते? लहरी प्राप्त करणारा संच त्या विद्युतचुंबकीय लहरी पकडतो आणि त्यांचे पुन्हा ध्वनिलहरीत रूपांतर करतो.

(विज्ञान धर्माविरुद्ध नाही. मला वाटते ते धर्माच्या वाढीससुद्धा मदत करते. रेडिओ आणि टेलीफोन यांचा शोध लागण्याच्यापूर्वी एक शतक, वेदध्वनीबाबत असलेले विचार मनातही न येऊ देणाऱ्या, ते मूर्खपणाचे आहेत असे मानणाऱ्या एखाद्या नास्तिकाच्या मुद्यांना तोंड देणे सोपे नव्हते. आता विज्ञानातील शोध आपल्या मदतीला आले आहेत.) [ बिनतारी संदेशप्रणाली (वायरलेस टेलीग्राफी) किंवा रेडिओचा शोध १९०१ मध्ये लागला तर टेलीफोनचे पेटेंट प्रथम १८७६ मध्ये घेतले गेले. पण आपण हे लक्षात घेतले पाहिजे की परमसद्गुरूंनी हे प्रवचन १९७६ च्या कितीतरी पूर्वी दिलेले आहे. ]

रेडिओसारख्या जड वस्तूकडे असलेली शक्ती किंवा ऊर्जा मिळवणे मानवाला शक्य आहे. खरोखरच आपण खूप काही प्राप्त करू शकतो. तप, तपस्व्याचे प्रयत्न आपल्याला अशी ऊर्जा देईल. तप म्हणजे काय? तप म्हणजे सत्याचा शोध घेण्याचा निश्चय. अन्न, निद्रा, घर आदी प्रत्येक गोष्टीचा त्याग करून त्या शोधाच्या ठिकाणी मन केंद्रित करणे. जेव्हा तुम्ही असे साधक असता तेव्हा तुम्ही नम्र असले पाहिजे आणि अहंकाराचा थोडासा असलेला अवशेषही काढून टाकला पाहिजे. तुम्ही हे जाणले पाहिजे की तुम्हाला सत्याचा शोध केवळ ईश्वराच्या कृपेमुळेच लागेल. संतांनी अशी तपश्चर्या केली आणि ते योगाच्या उच्च स्तरावर पोहोचले. ते निर्मितीतील कंपने आणि परमेश्वराची निश्वासिते जाणू शकले. विद्युतलहरींचे जसे ध्वनीत रूपांतर होते तसे कंपनांमुळे होणारे ध्वनी मानवी कानाला ऐकू येतात हे त्यांना माहीत होते. हे

ध्वनी त्यांनी वेदांच्या रूपाने आपल्याकडे दिले आहेत.



वेदांना श्रुती म्हटले जाते. जे ऐकले जाते ते श्रुती. श्रोत्र म्हणजे कान. वेद एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे मौखिक पद्धतीने दिले गेले आहेत. ते एखाद्या लिखित ग्रंथाद्वारे शिकवले किंवा शिकले गेले नाहीत. म्हणून त्यांना 'श्रुती' हे नाव मिळाले. हे पवित्र ग्रंथ लिहिण्यास परवानगी का नव्हती? कारण वेदांचे ध्वनी योग्य रीतीने लिहिता येऊ शकत नाहीत. अचूक प्रतिनिधित्व करतील असे काही (वेदातील) ध्वनी किंवा ध्वनी वेगवेगळ्या पद्धतीने लिहिण्याचे शास्त्र कोणत्याही लिपीमध्ये नाही. उदा. 'ळ' 'झ' असे ध्वनी ऐकून शिकावे लागतात. ह्या शिवाय उदात्त, अनुदात्त आणि स्वरित् असे स्वर आहेत. स्पष्टोच्चारणात चुका संभवनीय असतात. छापील ग्रंथात स्पष्टोच्चारणासाठी काही खुणा वापरल्या जातात. चुकीचे उच्चारण अपेक्षित परिणाम घडविणार नाही. एखाद्या शब्दावयावर जोर देऊन केलेल्या उच्चारामुळे निर्माण झालेली कंपने आणि जोर न देता झालेली कंपने यात फरक असतो. त्याप्रमाणे आपल्या वासना आणि भावना आणि निसर्गावर सत्ता गाजविणाऱ्या स्वर्गीय शक्ती यात बदल होतो. वेदाच्या तैत्तिरीय संहितेमध्ये एक कथा आहेः ती चुकीच्या उच्चारणामुळे अपेक्षित परिणामाऐवजी विपरीत घडवू शकतात हे दाखविते. स्वर्गातील सुतार/कारागीर त्वष्ट्याने इंद्राचा वध करणारा पुत्र व्हावा ह्या उद्देशाने मंत्रजप केला. पण काही शब्दावयवांच्या उच्चारात तो चुकला. म्हणून अजाणता त्या स्वर्गस्थाला (इंद्राला) ठार मारणारा पुत्र होण्याऐवजी इंद्राकडून ठार मारला जाणाऱ्या पुत्रासाठी त्याने प्रार्थना केली आणि त्याची प्रार्थना (जी चुकीच्या उच्चाराची होती) फळाला आली. आपण आपल्या रेडिओवरील तरंगलांबी अगदी सूक्ष्म बदलतो तेव्हा आपल्याला भिन्न केंद्राचे प्रक्षेपण प्राप्त होते. आवश्यक केंद्र मिळण्यासाठी अचूक ट्युनिंग करावे लागते. तसेच वैदिक मंत्रांच्या उच्चारणात आहे. स्वरांमध्ये किंचितही चूक नको. तरंगलांबी बदलल्यावर आपल्याला जसे वेगळे केंद्र मिळते तसे उच्चार चुकल्यावर भिन्न परिणाम मिळतात.

वेद संथा घेऊन शिकण्याला सर्वाधिक महत्त्व असण्याचे हे कारण आहे. म्हणून श्रुती हे नाव आहे. (अलिखित जुने ग्रंथ) श्रुती ह्या नावासाठी दुसरे एक स्पष्टीकरण मला जाणवते. सामान्य लोकांना आकलन होऊ शकत नाहीत अशी कंपने ऋषींनी ऐकली नाहीत का? त्यांनी एखाद्या पुस्तकात वेद वाचले का? की त्यांनी ते स्वतःच रचले? वेदांना श्रुती हे योग्य नाव आहे कारण ऋषींनी ऐकल्यानंतर ते सर्व जगाला ज्ञात करून दिले गेले.

वैदिक ऋषींना मंत्रद्रष्टे हे नाव आहे. जो पाहतो तो द्रष्टा. तमीळमध्ये परप्पन. त्याचा अर्थ तोच आहे. ऋषींनी ते मंत्र पाहिले, याचा अर्थ त्यांना ते ऐकू आले नाहीत. ह्यापैकी कोणते बरोबर आहे? ऋषींनी मंत्र ऐकले की पाहिले? त्यांनी जर ते पाहिले तर कोणत्या लिपीत? त्याकाळी लिपी नव्हती. ग्रांथिक नव्हती किंवा त्यांचा पाया असलेली ब्राह्मी नव्हती. वेदांचे

ध्वनी, त्यांचे स्वर कोणत्याही लिपीत अचूक लिहता येणे शक्य नाही.


ह्या प्रश्नाचे उत्तर असे आहे की जेव्हा ऋषी मंत्रांचे चिंतन करीत होते तेव्हा त्यांच्या अंतःकरणात एका आतील कोपऱ्यात क्षणार्धात वेद प्रकटले.

डोळ्यांना आकलन झालेलेच केवळ 'पाहणे' किंवा 'दिसणे' नव्हे. त्या शब्दात विविध स्वरूपाचे आकलन आणि अनुभवांचा समावेश असतो. जेव्हा आपण म्हणतो की एका माणसाने त्याच्या जीवनातील सर्व दुःखे पाहिली आहेत तेव्हा 'पाहिली' शब्द हा केवळ त्याने जे त्याच्या डोळ्यांनी पाहिले त्यालाच लागू पडतो का? त्याचा अर्थ त्याने अनुभवले; असा नाही का? मंत्रद्रष्टा हा शब्दही त्याच प्रकारे घेतला जाऊ शकतो - अनुभवाद्वारे आकलन झालेले. असेही मानले जाते की ऋषीं त्यांच्या दिव्य कानांनी वेद ऐकू शकले.

अर्जुनाने परमेश्वराचे दिव्यरूप पाहण्याची इच्छा व्यक्त केली. गीतेत आहे की भगवान कृष्ण त्याला म्हणाला, "तू माझे वैश्विक रूप तुझ्या ह्या डोळ्यांनी पाहू शकणार नाहीस. मी तुला दिव्य चक्षू देतो."

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा । दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ।।
(भगवद्गीता अ-११ श्लो. ८)

भगवंताने जसे अर्जुनाला दिव्य चक्षू दिले तसे ऋषींना परमेश्वरापासून मिळालेले आणि विशाल अंतराळ व्यापणारे ध्वनी पकडून ठेवू शकतील असे दिव्य कान लाभले असले पाहिजेत.

निर्मिती आणि जीवन चालू ठेवणे एवढाच वेदातील कंपनांचा हेतू नाही. खरोखर हे वैदिक मंत्र आपल्याला हे जीवन अधिक सरस करून त्या अंतिम सत्याशी एकरूप होण्यास मदत करतात. मनुष्य जसा येतो त्याच मार्गाने जातो, तो उगमाच्या ठिकाणी येत नाही का? त्याचप्रमाणे निर्मिती कशी झाली हे शोधताना आपण; कंपने नाहीत, चलनवलन नाही, पूर्ण शांतता अशा बिंदूवर येतो. आपल्या नाडीमध्ये कंपने निर्माण करणारे काही मंत्र अशा उच्च ध्येयाकडे नेण्याचे कार्य करतात. उपनिषदातील महावाक्ये आणि प्रणव असाच आहे. महावाक्यांविषयीचा विचार 'उपनिषद्' या प्रकरणात केला आहे.

थोडक्यात, वेद हे कोणा एकाची रचना नाही. ऋषींनी ते निर्मिलेले नाहीत किंवा परमात्म्याने ते भूर्जपत्रावर लिहिलेले नाहीत.

-----

# पाश्चात्त्यांचे वेदसंशोधन

सध्याच्या राष्ट्राच्या दुःखद स्थितीत पौर्वात्य म्हटल्या जाणाऱ्या विद्वानांच्या संशोधनावरून आणि त्यांच्याच मार्गाने संशोधन करणाऱ्या भारतीयांकडून वेदासारख्या आपल्या वारशासंबंधी ज्ञान मिळविले पाहिजे. पाश्चात्त्य विद्वानांनी वेदांचा खूप मौल्यवान अभ्यास केला हे मी मान्य करतो. त्यांच्या कार्याबद्दल आपण त्यांचे कृतज्ञ राहिले पाहिजे. त्यांच्यापैकी मॅक्स मुल्लर सारख्यांनी कौतुकाने मान्यता देऊन संशोधन केले. (फ्रेडरिक मॅक्स मुल्लर (१८२३-१९००) याचा जन्म जर्मनीत झाला असला तरी त्याने आपल्या आयुष्याचा अधिकांश कार्यकाळ इंग्लंड मध्येच व्यतीत केला. तो एक प्रख्यात पाश्चात्त्य प्राच्यविद्यातज्ज्ञ म्हणून ओळखला जातो. भारताबाबत त्याच्या उद्‌गारांपैकी वारंवार उद्‌धृत केले जाणारे हे उद्‌गार पाहा - ''आपण जर पृथ्वीतलावरील अशा देशाचा शोध घेऊ लागलो की ज्याला निसर्गाकडून सर्व प्रकारची संपदा, शक्ती व सौंदर्य भरपूर प्रमाणात वरदानस्वरूप मिळाले आहे, व ज्याचा काही भूभाग तर पृथ्वीवरील प्रत्यक्ष नंदनवनच आहे, तर मला भारताचा नामनिर्देश करावा लागेल. मला जर असे विचारले गेले की कुठल्या भूप्रदेशात मानवी मनाने आपल्या काही सर्वोत्तम नैसर्गिक क्षमता पूर्णपणे विकसित केल्या आहेत व जीवनातील महान समस्यांवर गहन चिंतन केले आहे आणि त्यातील काही समस्यांवर उपाय शोधून काढले आहेत, जे प्लेटो आणि कांट च्या अभ्यासकांनी देखील ध्यानात घेण्याच्या योग्यतेचे आहेत, तर मला भारताकडेच बोट दाखवावे लागेल आणि मी माझे मलाच असा प्रश्न करीन की, ज्या आम्हां युरोपवासीयांचे वैचारिक पोषण अधिकतर केवळ ग्रीक, रोमन तसेच ज्यू या एकाच सेमेटिक विचारधारेवर झाले आहे अशांना, आपले हे विद्यमान जीवनच नव्हे तर आंतरिक जीवन देखील त्यातील वैचारिक त्रुटी भरून काढून ते रूपांतरित व अंतर्जीवन देखील अधिक परिपूर्ण, अधिक समावेशक अधिक वैश्विक करण्यासाठी आवश्यक अशी शुद्धिकारकता कोणत्या साहित्यात आहे, मिळू शकेल तर पुन्हा एकदा मला भारताचेच नाव घ्यावे लागेल''. मॅक्समुल्लरनी हिंदु तत्त्वप्रणालीची इतकी सुस्पष्ट प्रशंसा केलेली असूनही त्याला ब्रिटिशांनी भारतात ख्रिस्ती धर्माचा प्रसार करावा असेच वाटत असे परिश्रमपूर्वक प्राचीन ग्रंथ मिळवून त्यांच्या संशोधित आवृत्त्यांचे खंड त्यांनी एकापाठोपाठ एक प्रसिद्ध केले.

दोनशे वर्षांपूर्वी कलकत्ता उच्च न्यायालयात न्यायाधीश असलेल्या सर विल्यम जोन्स याने एशियाटिक सोसायटी सुरू केली. ह्या संस्थेने प्रकाशित केलेले अनेक ग्रंथ आपल्याला चकित करतात! (सर विल्यम जोन्स (१७४६-९४) भारत विद्यातज्ज्ञांचा अग्रणी १ सप्टेंबर १७८३ ला हा मद्रासला आला. दुसऱ्याच वर्षी एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली.

'शाकुंतला' चा युरोपियन भाषेत अनुवाद करणारा विल्यम जोन्स हा पहिला इंग्रज. या

भाषांतराचा युरोपियन विचारवंतांवर आणि कवींवर फार मोठा प्रभाव पडला.) ईस्ट इंडिया कंपनीच्या साह्याने सर विल्यम यांनी सायनाचार्य टीकेसह ऋग्वेद आणि इतर अनेक ग्रंथ प्रकाशित केले. इंग्रज लोकांशिवाय फ्रान्स, जर्मनी आणि रशिया येथील भारतीय भाषा तज्ज्ञांनी उल्लेखनीय कार्य केलेले आहे. ''कोलंबसाच्या अमेरिकेच्या शोधापेक्षा हिंदूंच्या वेदांचा शोध अधिक महत्त्वपूर्ण आहे.'' असे उद्‌गार काही तज्ज्ञांनी त्यांच्या संशोधनाविषयी आनंदाने काढले आहेत. ह्या परकीयांनी देशाच्या विविध भागांतून वैदिक आणि वेदान्तपर ग्रंथ शोधून काढले. त्यांनी धर्म, गृह्य आणि श्रौत सूत्रांची भाषांतरे केली. या सूत्रांचा विचार भाग १५ मध्ये स्वतंत्रपणे करू. ऑर्थर ॲवलॉन याने कुंडलिनी तंत्रावर विस्तृत लेखन केल्यावर त्या तंत्राला महत्त्व मिळाले. ऑर्थर ॲवलान (सर जॉन कुड्रोफ) याने तांत्रिक अभ्यास व शाक्त संप्रदायाच्या साहित्याविषयी या शतकाच्या प्रारंभ काळात महत्त्वपूर्ण कामगिरी केली. त्याची सर्पशक्ती ही कृती विशेषत्वाने प्रसिद्ध आहे. आपल्या संस्कृतीच्या अन्य पैलूंच्या अभ्यासात अनेक पाश्चात्त्यांनी योगदान दिलेले आहे. १८९९ ते १९०५ या काळात भारताचा व्हाईसरॉय असलेल्या लॉर्ड कर्झन याच्या काळात प्राचीन स्मारकांच्या संरक्षणाच्या कायद्याची अंमलबजावणी सुरू झाली म्हणून आपली अनेक मंदिरे आणि इतर स्मारके विध्वंसक लोकांपासून वाचविली गेली. जेम्स फर्ग्युसनने आपल्या कलात्मक वैभवाचे (शिल्पाकृतींचे) फोटो घेतले आणि ते जगाला ज्ञात करून दिले.

कनिंगहॅम, सर जॉन मार्शल आणि मॉर्टीमर-व्हीलर यांच्या सारख्यांनी भारतीय पुराणवस्तू शास्त्रात मोलाचे, उल्लेखनीय कार्य केले. मॅकेन्झीने भारताच्या विविध भागांतून हस्तलिखिते गोळा केली म्हणून आपल्याला आपली अनेक शास्त्रे ज्ञात झाली. (जेम्स फर्ग्युसन- याच्या 'भारतीय आणि पौर्वात्य वास्तुशिल्पशास्त्राचा इतिहास' या ग्रंथात ३००० भारतीय स्मारकांची छायाचित्रे असून हा ग्रंथ १८७० च्या दशकात प्रकाशित झाला.)

(सर अलेक्झांडर कनिंगहॅम - याने आमच्याकडील अनेक पुराणवस्तूंचे शोध आम्हाला लावून दिले. हा १८३३ मध्ये भारतात आला व याने ५० वर्षांचा काळ येथील संशोधनात घालविला.) (सर जॉन मार्शल आणि सर मॉर्टियर - व्हीलर - यांनी आपल्या इंडस (किंवा हरप्पा) संस्कृतीच्या ज्ञानात भर घातली. येथील उत्खननाची कामे १९२० च्या दशकात केली गेली. या पुराणवस्तू संशोधन कार्यात एका प्रख्यात भारतीय जोडीचाही सहयोग होता.) (कर्नल कॉलिन मॅकेन्झी- हा भारताचा पहिला महासर्वेक्षक होता. याने भारताच्या विविध भागातून (मुख्यत्वे दक्षिणेतून) हस्तलिखिते व शिलालेख गोळा करण्याचे अलौकिक कार्य अठराव्या शतकाच्या अखेरच्या व एकोणविसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात केले. त्याला प्राचीन भारतीय गणितशास्त्रातही रस होता.) (सर विल्यम जोन्सनेच प्रथमतः संस्कृत व

युरोपातील अभिजात भाषांचा अनुबंध शोधून स्पष्ट केला. अशा प्रकारे तौलनिक भाषाशास्त्राचा तो जनक होय.)



ब्रिटिशांच्या काळातच एपिगाफी खाते निर्माण झाले. ब्रिटिशांकडून अनेक प्रकारे आपल्याला त्रास सहन करावा लागला पण त्यांच्या काळात काही चांगलेही कार्य झाले. हे चांगले परंतु भेसळमुक्त नव्हते आणि त्यात अनपेक्षित घटक होते. स्वतःला पौर्वात्य भाषातज्ज्ञ म्हणविणाऱ्यांपैकी अनेक जणांचा हेतू दूषण देण्यापलीकडचा असा नव्हता. वेदांच्या अभ्यासाच्या पायावर त्यांना भारताच्या इतिहासाची पुनर्रचना करायची होती. काळाच्या ओघात त्यांनी आर्य-द्रविड असा वंशवादाचा सिद्धान्त बनवला आणि लोकांमध्ये द्वेषाची बीजे पेरली. बुद्धिवादी असल्याचा आविर्भाव करीत, जे तुमच्या इंद्रियांना आकलन होऊ शकत नाही त्याचा त्यांनी उपहासात्मक पद्धतीने अर्थ लावला. वेदांवर भाष्य करताना त्यांनी ऋषी हे आदिमानव होते असा दृष्टिकोन ठेवला. आपल्या ग्रंथांचे संशोधन करताना जरी काहींनी तटस्थ असल्याचे ढोंग केले तरी त्यांचा अंतस्थ हेतू ख्रिस्ती धर्माचा पसार करायचा आणि हिंदुवादाला गौण लेखण्याचा होता.

अनेक पाश्चात्त्यांना संस्कृत आणि त्यांच्या भाषा यात साम्य आढळले आणि त्यांनी तौलनिक भाषाशास्त्राला स्वतःला वाहून घेतले.

युरोपिअन भाषातज्ज्ञांनी केलेल्या संशोधनाबद्दल, आपली शास्त्रे जगभर प्रसृत केल्याबद्दल आणि त्यासाठी घेतलेल्या अमाप कष्टाबद्दल आपण त्यांचे कौतुक करू शकतो. मात्र वेदांबद्दलच्या आपल्या दृष्टिकोनाशी त्यांना काही स्वारस्य नव्हते. ह्या ग्रंथांचा हेतू काय होता? त्यांचे पठण करून, त्यांच्या ध्वनीने विश्व व्यापून, बलिदानासारखे विधी करून मानवाच्या कल्याणाची हमी दिली आहे. हा दृष्टिकोन पाश्चात्त्य विद्याकोविदांनी नाकारला. मानवाच्या आकलनापलीकडे जे असते त्याचा त्यांनी पूर्ण बुद्धिवादाच्या पातळीवरून आकलन करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या ह्या मर्यादित आकलनावरून, त्यांनी वाचनालयात जतन करून ठेवण्यासाठी म्हणून वेदांवरचे मोठे जाडजूड ग्रंथ छापले. आपले ग्रंथ हे आपली वाणी आणि कृती यांचे जिवंत वास्तव होते. अशा उदात्त उपयोगाऐवजी पुस्तकरूपात वाचनालयात देणे म्हणजे जिवंत प्राण्यांना प्राणिसंग्रहालयात ठेवण्याऐवजी वस्तुसंग्रहालयात ठेवण्यासारखे होय.

-----

प्रकरण ९

# वेदांचा काळ : संशोधन योग्य नाही

पाश्चात्त्य भाषाकोविदांच्या मानसिक दृष्टिकोनात वेद हे शाश्वत आहेत ही संकल्पना बसत नाही. आपण तटस्थपणे आणि शास्त्रीय पद्धतीने संशोधन करतो असा ते दावा करतात तरी सुद्धा ते हिंदू ग्रंथांना उच्च दर्जा देऊ इच्छित नाहीत. अनेक भारतीय विद्वान देखील वेद हे शाश्वत आहेत हे स्वीकारण्यास राजी नाहीत.

आधुनिक इतिहासकारांनी वेदांचा काळ निश्चित करण्यासाठी प्रामुख्याने दोन पद्धती स्वीकारल्या : एक, ग्रंथातील खगोलशास्त्रीय संदर्भावर आधारलेली आणि दुसरी त्याच भाषेच्या शब्दनिर्मितीच्या शास्त्रावर आधारलेली. पण दोन्हीपैकी एखादी पद्धत वापरून एखाद्या निश्चित अशा निष्कर्षावर ते आले का? प्रत्येक संशोधकाने भिन्नभिन्न काळ ठरविला. टिळकांनी वेदांचा काळ इ. स. पूर्व ६000 असा निश्चित केला. (लोकमान्य बाळ गंगाधर टिळक हे आपल्या 'ओरायन' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत वेदांचा काळ ठरविताना लिहितात की भगवद्गीता वाचत असताना माझ्या मनात असा विचार आला की 'मासामध्ये मी मार्गशीर्ष आहे' या श्रीकृष्णाच्या वचनावरून आपण अनेक महत्त्वाचे निष्कर्ष काढू शकतो. ते पुढे लिहितात की ऋग्वेदात नोंदविलेल्या परंपरा अचूकपणे दर्शवितात की हा कालखंड इ. स. ४000 वर्षे या पूर्वीचा नाही की जेव्हा विषुव (रात्र व दिवस सारखे असणारा काल) ओरायनमध्ये होता. (ओरायन हे मार्गशीर्षाचे ग्रीक नाव आहे) असे दाखविण्याचा मी प्रयत्न केला.) इतरांच्या मते तो काळ इ. स. पूर्व ३000 किंवा इ. स. पूर्व १५00 आहे.

इतर धर्मांच्या ग्रंथांच्या काळासंबधी इतिहासकारांमध्ये मतभेद नाही. बुद्धाचा 'त्रिपिटिका' हा ग्रंथ अशोकाच्या काळात लिहिला गेला ह्याबद्दल ते सहमत आहेत पण त्यात असलेला बुद्धाचा उपदेश त्याअगोदरचा आहे. 'नवा करार' हा २000 वर्षांपूर्वीचा आहे याबाबत मतैक्य आहे. कुराण १३00 वर्षांपूर्वी रचले गेले हे सर्वांना मान्य आहे. केवळ वेदांच्या बाबतीत इतिहासकार त्याचा निश्चित काळ ठरवू शकलेले नाहीत.

वेदांचा काळ ठरविण्यासाठी दोन पद्धती स्वीकारल्या गेल्याचा मी उल्लेख केला आहे. त्या ग्रंथांमध्ये आकाशस्थ ग्रहांच्या स्थितीचे संदर्भ आहेत. वेदांचा काळ इ. स. पूर्व ६000 किंवा तत्सम निश्चित केला गेला तो त्यात उल्लेखलेल्या ग्रहगोलांच्या संयुक्त स्थितीवरून होय.

तत्पूर्वीही अशीच ग्रहांची स्थिती झाली असू शकेल असे म्हणणे योग्य आहे का? इ. स. पूर्व ६000 मध्ये जशी होती तशीच ग्रहस्थिती वेदनिर्मितीच्या काळापूर्वीही, अगदी फार

फार पूर्वीही असू शकेल. वेदांमध्ये सांगितलेली स्थिती कोणत्या काळातील समजायची? ऋषींची दृष्टी प्रदीर्घ कालांतराचा वेध घेऊ शकेल अशी होती. आकलनाच्या पल्याड असणाऱ्या शक्तीद्वारे या थोर ऋषींना ज्ञान झालेले होते. म्हणून असले मांडलेले गणिती तर्क वेदांच्या बाबतीत टिकू शकत नाहीत. अशा प्रकारे वेदांमधील अंतर्गत खगोलशास्त्रीय पुरावे आणि आधुनिक संशोधकांनी दिलेले पुरावे हे वेदांचा काळ ठरविण्यास उपयोगी ठरत नाहीत.

दुसरी पद्धत म्हणजे भाषाशास्त्र. ह्यात आपल्याला भाषाच नव्हे तर लिपीचाही विचार करावा लागतो. देशाच्या बहुतेक भागांतील आज वापरात असलेल्या लिपींचे उगमस्थान ब्राह्मी आहे. देवनागरी आणि तमीळ पूर्णपणे संबंध नसलेल्या दिसतात पण वस्तुस्थिती उलट आहे. देशभर आढळलेल्या आज्ञांवरून ह्या सर्व शतकांमधून झालेल्या ब्राह्मी लिपीतील बदलांबाबत अभ्यास केला गेला आहे. त्या अभ्यासावरून केला गेलेला तक्ता असे दाखवितो की आज देशाच्या भागात वापरात असलेल्या लिप्या एकमेकांशी संबंध नसलेल्या दिसत असल्या तरी त्या मूळ ब्राह्मीतून उगम पावलेल्या आहेत. आज प्रचलित असलेल्या लिप्या ह्या मिशा आणि शिंगे असलेली ब्राह्मी अक्षरे आहेत असा एक मजेशीर विचार माझ्या मनात येतो. देवनागरीतील उ आणि ऊ एकसारखे तयार झाले आहेत. तमीळमधील बरीच अक्षरे ब्राह्मी अक्षरांना शिंगे फुटल्यासारखी वाटतात. आज्ञा (आज्ञापत्र) आणि शिलालेखावरून, लिपीतील प्रत्येक बदल होण्यास लागणारा अचूक काळ शोधला जाऊ शकतो. ह्याच पद्धतीने काही आज्ञापत्रांचा काळ ठरविला गेला आहे.

तथापि, वेद कोठेही दगडावर कोरलेले नाहीत. म्हणून एखाद्या लिपीच्या आधारावर त्यांचा काळ ठरविण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. ह्या संदर्भाने भाषेच्या इतर पैलूंचा विचार करावा लागतो. शब्दनिर्मिती आणि त्यांच्या ध्वनींची गुणवत्ता काळाबरोबर बदलत राहते. 'संगम' काळातील अनेक तामीळ शब्द अशा रीतीने बदलले आहेत. ('संगम' काव्याचा कालखंड इसवी सनाचे दुसरे किंवा तिसरे शतक हा आहे, जर तो त्यापूर्वीचा नसेल.) ही प्रक्रिया सर्व भाषांना समान आहे. काही ध्वनींच्या बाबत झीज होते. काही वेळेस त्यांचा अर्थही तसाच राहत नाही. 'वेगुली' हा तमिळी शब्द घ्या. हल्ली त्याचा अर्थ भोळसट असा आहे. पण पूर्वी त्याचा अर्थ राग किंवा रागावलेला मनुष्य असा होता. पूर्वी तमीळ शब्द मांदा याचा अर्थ मृत असा नव्हता. एका तमीळ विद्वानाने मला त्याचा अर्थ 'प्रसिद्ध' असा सांगितला. अशा प्रकारची उदाहरणे संस्कृतमध्येही आढळतात. नंतरच्या संस्कृतमधील काव्याप्रमाणे आपल्याला वेद समजू शकत नाहीत. इतर भाषांबरोबर तुलना करता आपल्या भाषांमध्ये असे असंख्य बदल नाहीत. एक हजार वर्षे जुनी असलेल्या अँग्लोसॅक्सन (जुनी इंग्रजी) मधील एक ओळही इंग्रज माणसाला आज समजत नाही. सुमारे ३०० वर्षाच्या काळात अमेरिकेत इंग्रजी इतकी बदलली की तिचे स्वतःचे अमेरिकन इंग्रजी असे नाव झाले.

ध्वनीनुसार असणारी अक्षरांचे वैशिष्ट्ये बदललेल्या काळाचा हिशेब केला गेला. परंतु तितक्याच ठामपणे एखाद्या शब्दाच्या बदललेल्या अर्थाचा काळ ठरविला गेला नाही. शब्दांच्या ध्वनीच्या अक्षराचे परीक्षण करून विद्वानांनी वेदांचा काळ निश्चित करण्याचा प्रयत्न केला, ''प्रत्येकी दोनशे वर्षांच्या कालावधीत एखाद्या शब्दाच्या ध्वनीमध्ये अमुक अमुक बदल होतो.'' भाषाशास्त्राची एक अधिकारी व्यक्ती असे निरीक्षण करते. आज आपल्याला माहीत असलेला वैदिक ध्वनी हा अनेक बदल झालेला आहे. जर अशा शब्दात दहा बदल झालेले असतील तर त्याचा अर्थ असा की वेद हे दोन हजार वर्षे पुरातन आहेत आणि जर तीस असतील तर ते ३० x २०० = ६००० वर्षे पुरातन आहेत. त्याचा अर्थ असा होईल की (ह्याच तर्कानुसार) आपले ग्रंथ ख्रिस्तपूर्व ४००० वर्षापूर्वी अस्तित्वात नव्हते. आम्ही असे उद्‌गार वारंवार ऐकतो.

वेदांचा काळ निश्चित करण्यासाठी ह्या आधाराने केलेले हिशेब कसे चुकीचे होते हे सिद्ध करण्यासाठी एक उदाहरण पुरे आहे.

आपल्याकडे घरी अनेक भांडी असतात. त्यांपैकी काही आपण अधिक वेळा वापरतो. ज्यात आपण सकाळ संध्याकाळ भात शिजवतो ते कास्याचे भांडे दोन वेळा घासावे लागते. म्हणून ते लवकर झिजते. समजा, आपल्याकडे दुसरे एक भांडे आहे, अगदी मोठे आहे, उदाहरणार्थ 'अण्डा' (तांब्याचा हंडा). ते भांडे कोठीच्या खोलीत ठेवले जाते, विवाह किंवा तशा सणांच्या शिवाय बहुधा वापरले जात नाही. ते फक्त कधीतरी अधूनमधून धुतले जाते. ते अगदी गेल्या वर्षी विकत घेतल्या गेलेल्या कास्याच्या भांड्याइतके लवकर झिजणार नाही. तो हंडा आजीच्या हुंड्याबरोबर एक भाग म्हणून आलेला असावा म्हणून खूपच जुना असावा. तरी सुद्धा तो झिजल्याचे काहीही चिन्ह दिसत नाही. आपण असे अनुमान करू शकतो का की कास्याचे भांडे हे हंड्यापूर्वी विकत घेतलेले होते. तुमच्या सुनेच्या हुंड्याबरोबर जेवणाची ताटे आणि गुलाबदाणी आली. दहा वर्षांत ताटांचा आकार बिघडला पण गुलाबदाणीची चकाकी आणि पॉलिश तसेच आहे.

हीच गोष्ट एका बाजूला रोजच्या बोलण्यातील शब्दांचे ध्वनी आणि दुसऱ्या बाजूला वैदिक शब्द यांबाबत आहे. त्यांच्यातील भेद हा वर उल्लेखलेल्या दोन प्रकारच्या भांड्यांच्या सारखाच आहे. साधारणतः रोज वापरले जाणाऱ्या शब्दांची अनेक प्रकारे झीज होत असते. जरी वेद रोज म्हटले जात असले तरी शब्दांचे मूळ ध्वनी जतन करून ठेवण्यासाठी विशेष काळजी घेतली जाते. वेदान्गे, शिक्षा आणि व्याकरण (भाग ६ आणि ७ पाहा) आणि प्रत्येक वैदिक शब्दावयवात बदल न होता जतन व्हावे म्हणून आपल्या पूर्वजांनी काय व्यवस्था केली होती हे मी तुम्हाला नंतर सांगेन. रोजच्या भांड्यांच्या किंवा सामान्य बोलण्यातील शब्दांच्या सारखे वेदातील शब्द बदलत नाहीत. ते अंडा सारखे जरी पुरातन असले तरी चांगले जतन केलेले आहेत.

आधुनिक भाषातज्ज्ञांनी वेदांमध्ये ऋग्वेद सर्वात जुना आहे असा दृष्टिकोन मांडला, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे (त्याच क्रमाने) नंतर आले. एखाद्या वेदाच्या प्रत्येक भागात किंवा शिक्षेत संहिता हा सर्वात जुना भाग असतो आणि ब्राह्मण आणि आरण्यक हे नंतर निर्माण झालेले असा त्यांचा विश्वास असतो. ह्या भिन्न ग्रंथांतील भाषेच्या भेदांवरून त्याच्या निर्मितीचा काळ ठरविण्याचा प्रयत्न केला. वेदात वापरले गेलेले काही ठरावीक शब्द निराळ्या रूपात रामायण, महाभारत आणि कालिदासासारख्या कवीच्या काव्यात कसे दिसतात यावर त्यांनी संशोधन केले आहे.

भारतीय भाषा अभ्यासकांच्या भाषासंशोधनाचे खरे परिणाम मिळाले नाहीत कारण मी दर्शविलेल्या वेदांचे ध्वनी आणि इतर लेखनकार्य यातील मूलभूत फरकाकडे त्यांनी दुर्लक्ष केले. मूळ रूपात जतन करण्याची सर्व काळजी घेऊनही आज काही वेदांतील ध्वनींमध्ये किंचित बदल दिसतात. ते दोनशे वर्षांमध्ये झालेले नाहीत तर हजारो वर्षांत झालेले आहेत. आपण समजून घेतलेली आपण बोलत असलेली झीज आणि हानी ही इतर वाङ्मय किंवा बोली भाषांप्रमाणे वेदांना लागू पडत नाही. भारतीय भाषाकोविदांनी वेदकाळ ठरविण्याचा जो प्रयत्न केला तो योग्य नव्हता याबाबत तुम्ही सहमत व्हाल.

हिंदी ही काही शतकांपूर्वीची भाषा आहे. तथापि ती मोठ्या प्रदेशात वापरली जात असल्याने आणि संस्कृत, अरेबिक आणि फारसी शब्दांचा त्यात समावेश असल्याने तिच्यात तुलनेने कमी कालावधीत बदल झाले. तामीळ भाषा जरी लहान प्रदेशात बोलली जात असली तरी तिच्यात इतके बदल झालेले नाहीत. थयुमनवरच्या गीतांइतकेच कंबनचे रामायण तुम्हाला समजणार नाही. तिरूमुरूगरूपदे ही तेवरम पेक्षा अधिक कठीण आहे. तमीळही ह्या सर्व शतकांत तशीच राहिली नाही. जरी संस्कृत भारतभर ज्ञात होती तरी ती हिंदी किंवा तमीळसारखी बोली भाषा नव्हती. ती वाङ्मयीन भाषा होती आणि ती तमीळइतकी बदलली नाही. वेद हे काव्यापेक्षा अधिक काळजीने जतन केले गेले आहेत म्हणून त्यात तुम्हाला क्वचित बदल आढळतील. म्हणून भाषाशास्त्राच्या म्हणण्यानुसार इतर भाषांमधील बदलांना १००० वर्षे लागत असतील तर वेदांतील बदलांना १००,००० वर्षे लागतील.

वेदातील प्रत्येक शब्दावयव अचूक ध्वनी आणि ग्रंथातील अचूकपणा ठेवून मंत्र म्हटले तरच ते परिणामकारक ठरतात ह्या ठाम विश्वासामुळे वेदांचे जतन अगदी काळजीपूर्वक केले गेले. ह्याच हेतूने एका स्वतंत्र जातीला ते जतन करण्याचे कार्य सोपविलेले होते. हे सत्य न जाणता केलेले संशोधन काहीही हेतू साध्य करणार नाही. वेद हे शाश्वत नाहीत हे सिद्ध करण्यात आधुनिक संशोधक यशस्वी झालेले नाहीत. इतक्या युगांमध्ये वेद जतन केले गेले आणि त्यांचे ध्वनी जिवंत ठेवण्याच्या विविध प्रकारांचा विचार तुम्ही केला तर वेद हे अनादि आहेत ह्या श्रद्धेला पुष्टी मिळेल.

----

## प्रकरण १०

# पठणाच्या पद्धती

अलिखित वेदांचे मूळ रूप जतन करण्यासाठी, त्यांच्या ध्वनींच्या आणि मौखिक शुद्धतेच्या सुरक्षिततेसाठी आपल्या पूर्वजांनी अनेकानेक पद्धती बनवल्या. पठण करताना शब्दावयव बदलला जाऊ नये किंवा एखादा स्वरही बदलला जाऊ नये याची खात्री करण्यासाठी त्यांनी नियम तयार केले. प्रत्येक शब्दाच्या अवयवाच्या उच्चाराला किती वेळ लागतो हे त्यांनी निश्चित केले आणि त्या काळाच्या घटकाला त्यांनी 'मात्रा' हे नाव दिले. आपण आपल्या शरीरात अपेक्षित कंपने निर्माण करण्यासाठी आणि त्यायोगे शब्दावयवांच्या शुद्धस्वरूपात उच्चारणाची निर्मिती करण्यासाठी श्वासोच्छ्वास कसा नियमित केला पाहिजे : हे सुद्धा शिक्षा नावाच्या वेदान्गात निश्चित केले आहे. संगीतातील स्वर आणि वेदांतील स्वरांचा विचार केला आहे. त्याच प्रमाणे एका बाजूला पक्षी आणि प्राण्यांनी काढलेले ध्वनी आणि दुसऱ्या बाजूला वैदिक स्वर. ह्यासह वैदिक स्वरांच्या आरोह-अवरोहासाठी योग्य मार्ग दाखविला आहे.

शब्द आणि शब्दावयव बदलले नाहीत याची खात्री व्हावी म्हणून असामान्य अशी पद्धत तयार केली गेली. ह्या पद्धतीनुसार मंत्रातील शब्द, 'वाक्य', 'पद', 'क्रम', 'जटा', 'माला', 'शिखा', 'रेखा', 'ध्वज', 'दंड', 'रथ', 'घन' अशा विविध रचनेत गुंफलेले असतात.

आपण काही वैदिक विद्वानांना 'घनपाठी' म्हणतो, नाही का? याचा अर्थ असा की त्यांनी 'घन' या प्रगत पायरीपर्यंत ग्रंथाचे पठण केलेले आहे. पठीन म्हणजे ज्याने पाठ पठण केले तो. जेव्हा आपण एखाद्या घनपाठीला घन म्हणताना ऐकतो तेव्हा तो मंत्राचे शब्द मागे पुढे, निरनिराळ्या पद्धतीने म्हणतो असे लक्षात येते. अमृत ओतल्याप्रमाणे ते कानांनी ऐकायला अतिशय आनंददायक असते. वेदपठणाचा नैसर्गिक प्रभाव 'घना' मध्ये वाढला जातो. त्याचप्रमाणे क्रम, जटा, शिखा, माला आणि इतर पठणाच्या पद्धतीत सुद्धा तो खरोखरच कमी स्वर्गीय नाही. अशा पद्धतींचा मुख्य हेतू अगोदर सांगितल्याप्रमाणे मंत्रातील एकही शब्दावयव किंचितही बदललेला नाही ह्याची हमी देणे होय. सांगायचे म्हणजे शब्द असे गुंफलेले असतात, ते मागे पुढे म्हटले जातात.

वाक्यपाठ आणि संहितापाठामध्ये मंत्र मूळ (नैसर्गिक) पद्धतीने म्हटले जातात, त्यात विशेष आकृतिबंध स्वीकारलेला नसतो. वाक्यपाठामध्ये मंत्राचे शब्द एकत्र जोडलेले असतात, त्याला संधी म्हटले जाते. (दोन शब्दांतील शेवटचे अक्षर अन् पाहिले अक्षर हे जोडण्याला 'संधी' म्हणतात. संधीचे विस्तृत नियम संस्कृत व्याकरणात दिलेले आहेत.) तमीळमध्येही

संधी आहेत पण शब्द एकत्र जोडलेले नसतात. तेवरम, तिरूवककम्, तिरूक्कुरल, दिव्यप्रबंधम् आणि इतर तमीळ साहित्यात अशी संधीची अनेक उदाहरणे आहेत. संधीमुळे संस्कृतमधील सुट्टे शब्द तमीळपेक्षाही कमी ओळखण्याजोगे असतात. पदपाठामध्ये मंत्रातील प्रत्येक शब्द पुढच्या शब्दापासून स्पष्टपणे वेगळा केलेला असतो. नंतर संहितापाठ आणि त्यानंतर क्रमपाठ येतो. ह्यात मंत्रातील पहिला शब्द दुसऱ्याशी, दुसरा तिसऱ्याशी, तिसरा चौथ्याशी आणि असेच शेवटचा शब्द येईपर्यंत सारे शब्द जोडलेले असतात.

दक्षिणेतील जुन्या साहित्यात संबंधित ठिकाणच्या महत्त्वाच्या लोकांची नावे क्रमवित हे नाम जोडून आलेली आढळतात. जसे वेदवितचे वेदवित् तसे क्रमवित् हा क्रमविद्‌चे तमीळ रूप आहे. त्या साहित्यावरून असे वैदिक पंडित तमीळ देशात सर्वत्र आढळत असत.

जटापाठात मंत्रातील पहिला शब्द दुसऱ्याबरोबर म्हटला जातो, नंतर हा क्रम उलट केला जातो- पहिल्याबरोबर दुसरा म्हटला जातो. नंतर पुन्हा पहिला शब्द दुसऱ्याबरोबर म्हटला जातो. नंतर दुसरा तिसऱ्याबरोबर, तिसरा दुसऱ्याबरोबर, आणि पुन्हा नंतर दुसरा तिसऱ्याबरोबर अशा प्रकारे म्हटले जाते. अशा प्रकारे मागे पुढे जात संपूर्ण मंत्र म्हटला जातो. जटापाठातील दोन शब्दांऐवजी शिक्षापाठात तीन शब्द असलेली रचना वापरली जाते.

ह्यापेक्षा घनपाठ अधिक कठीण असतो. ह्या पद्धतीचे चार प्रकार आहेत. ह्यातही मंत्रातील शब्द मागे पुढे म्हटले जातात. त्यात मांडणीचे प्रकार आणि एकत्रीकरण यांची पद्धत असते. ह्या सर्वांचे स्पष्टीकरण करणे अंकगणिताचा वर्ग चालविणे होय.

जीवरक्षक औषधाचे संरक्षण करण्यासाठी आपण प्रयोगशाळेत सर्व प्रकारची काळजी घेतो, नाही का? सर्व अपायकारक गोष्टींपासून वेदध्वनी जगाचे रक्षण करतात. ग्रंथातील ध्वनीत बदल किंवा झीज होऊ नये म्हणून आपल्या पूर्वजांनी पठणाच्या ह्या पद्धती तयार केल्या.

संहितापाठ आणि पदपाठ यांना प्रकृतिपाठ म्हटले जाते (पठणाची नैसर्गिक पद्धती). शब्द एकदाच म्हटले जातात आणि त्यांच्या नैसर्गिक क्रमाने. इतर काही पद्धती विकृतिपाठ (पठणाची कृत्रिम पद्धती) या गटात आहेत. (क्रमपाठात जरी काटेकोर एक, दोन, तीन अशा नैसर्गिक क्रमाने शब्द येत नसले तरी, दुसऱ्यानंतर पहिला, तिसऱ्यानंतर दुसरा असे शब्द मागे येणे नसते. म्हणून त्याचे आपण विकृतिपाठ म्हणून वर्णन करू शकत नाही.) क्रम पद्धती सोडून आठ विकृतीच्या पद्धती आहेत आणि त्या लक्षात ठेवण्यासाठी श्लोकांमध्ये पुन्हा म्हटल्या जातात,

जटा माला शिखा रेखा ध्वजो दण्डो रथो घनः
इत्यास्तु - विकृतयाः प्रोक्ताः क्रमपूर्वा महर्षिभिः

वेदांच्या ध्वनींची आणि शब्दांची शुचिता सदैव राहण्याची निश्चिती करण्यासाठी ह्या सर्व पद्धती आहेत. पदामध्ये सर्व शब्द क्रमाने, क्रमात दोन शब्द एकत्र, जटामध्ये शब्द मागे पुढे होणे. ह्या सर्व पद्धतीत शब्दसंख्या जुळत असते आणि त्यात मूलभूत रूपात बदल होणार नसल्याची खात्री असते. ह्या श्लोकात विविध पद्धतीने पठण करण्याचे फायदे सांगितले आहेत:

संहितापाठमात्रेन यत्फलं प्रोच्यते बुधैः
पदे तु द्विगुणं विद्यात क्रमे तु का चतुर्गुणम्
वर्णक्रमे शतगुणं जटायान्तु सहस्रकम्

('पदपाठ' हा संहितापाठाच्या दुप्पट कल्याणकारक : क्रमपाठ चौपट कल्याणकारक असतो, 'वर्णक्रम', नावाची पठणपद्धती शंभरपट तर जटापाठ ही हजारपट कल्याणकारक असते.)

आपल्या पूर्वजांनी वेदध्वनींमध्ये किंचितही बदल होऊ नये ह्याची काळजी घेतली हे विचारात घेता, आधुनिक संशोधकांचा त्यातील शब्दांमध्ये बदल कसे झाले हे ठरविण्याचा जो प्रयत्न केला तो फोल होय.

-----

## प्रकरण ११

# ईश्वरी शब्द

वेद हे केवळ मर्त्य लोकांचे कार्य नाही या श्रद्धेवर आपण अविश्वास दाखविता कामा नये. इतर धर्मांचे अनुयायी सुद्धा त्यांच्या ग्रंथाचा उगम स्वर्गीय असल्याचे सांगतात. जिझस म्हणतो की तो फक्त परमेश्वराचे शब्द पुन्हा म्हणतो आणि मुस्लिमांच्या म्हणण्यानुसार प्रेषित अल्लाचे शब्द उच्चारतो. आपण जे अपौरुषेय म्हणतो ते त्यांच्या बाबतीत प्रकट झालेले होत, धार्मिक ग्रंथ तयार होण्यासाठी परमेश्वराचा शब्द महान व्यक्तींच्या द्वारे आलेला आहे.

आपले कार्यक्षेत्र कोणतेही असो त्यातील सत्य प्रकट करण्यासाठी आपण एकाग्र मनाने वाहून घेतले पाहिजे. ते म्हणतात की अशी सत्ये विजेसारखी चमकून आपल्याकडे येतात. सापेक्षवादाचा सिद्धान्त अचानक आईनस्टाईनच्या मनात आला, त्याने तो अंतर्ज्ञानाने जाणला असे एका प्राध्यापकाने मला सांगितले. असे दावे आपण मान्य केले तर अंतःकरणाने पवित्र असलेल्या ऋषींच्या हृदयाकाशात (हृदयाकाश ही एक गूढ संकल्पना आहे) (या ठिकाणी परम सद्गुरू हे ऋषींचे वर्णन पवित्र 'अंतःकरण' किंवा 'अंतरेंद्रिय' असलेले पुरुष असे करीत आहेत.) वेद स्वतःच प्रकट झाले आणि ते मर्त्य मानवाचे हे कार्य नाही अशी जी श्रद्धा आहे ती आपण कशी अमान्य करू शकतो?

-----

## प्रकरण १२

# वेद अनंत आहेत

ध्वनिब्रह्म म्हणजेच शब्दप्रपंचाने जर संपूर्ण निर्मिती आणि तिच्या अतीत जे काही आहे ते सर्व व्यापलेले असेल तर ते स्वाभाविकपणेच अतिशय विशाल असणार. वेद कितीही विशाल असले तरी त्यांनी विश्वाच्या सर्व क्रिया व्यापलेल्या आहेत असे म्हणणे कसे योग्य होईल असा कोणास प्रश्न पडेल. वेद स्वतःच सांगतात की ''अनंतः वै वेदाः।' (वेद अनंत आहेत.) सर्वच वेद ऋषींना प्रकट झाले आहेत असे आपण म्हणू शकत नाही. चार वेदांच्या सुमारे एक हजार शाखा किंवा भाग त्यांना प्रकट झाले आहेत.

निर्माता असलेल्या केवळ ब्रह्म्यालाच संपूर्ण वेद ज्ञात आहेत. सध्याच्या ब्रह्म्यापूर्वी महाप्रलय झाला तेव्हा दुसरा ब्रह्मा होता. त्याचप्रमाणे त्याच्याही पूर्वी अन्य एक ब्रह्मा होता. काळाच्या ह्या विस्तृत दृश्यपटांमध्ये, पाठोपाठ आलेल्या प्रलयातून परमात्म्याच्या निश्वसितातून निर्माण झालेली कंपने की ज्यांनी ह्या निर्मितीचे कार्य करायला सांगितले होते, ती अवकाशात अस्तित्वात आहेत. ही कंपने अविनाशी आहेत. प्रत्येक महाप्रलयानंतर जो ब्रह्मा येतो तो त्या कंपनांसह निर्मितीचे कार्य करतो.

आपण जे ध्वनी निर्माण करतो ते कधीही नष्ट होत नाहीत. जिझस ख्रिस्ताने २००० वर्षापूर्वी जे सांगितले ते त्याच्याच आवाजात पकडता येईल आणि त्यासाठी प्रयत्न केले जात आहेत असे वाचल्याचे मला आठवते. मला माहीत नाही हे प्रयत्न किती यशस्वी झाले आहेत. मला वाटते की अशी शक्यता असावी. (भूतकाळातील आवाज किंवा ध्वनी प्राप्त करणे.) आपल्याला हे माहीत आहे की एखादा ध्वनी एकदा निर्माण झाला की तो नष्ट न होता अंतराळात सदैव राहतो.

ब्रह्माने हे विश्व वेदातील ध्वनींच्या साह्याने निर्माण केले आणि हे ध्वनी महाप्रलयात सुद्धा नष्ट होत नाहीत. आपण दगड, माती, लाकूड, लोखंड इत्यादींनी एखादे खेडे किंवा नगर बांधतो. हे सर्व पदार्थ परमात्म्याच्या इच्छेतून, त्याच्या विचारातून, त्याची इच्छा किंवा विचार असलेली कंपने यातून उद्भवतात. ब्रह्माला हे कंपनांच्या संबंधित वेदासारखे असलेले ध्वनी दिसले आणि त्याने ते म्हटले आणि सर्व विश्व अस्तित्वात आले.

काही निश्चित ध्वनींच्या कंपनांना प्रतिसाद म्हणून वृक्षाला विपुल प्रमाणात फुले किंवा फळे येतात अशा बातम्या वृत्तपत्रांत आपण नेहमी वाचतो. तर काही कंपने वनस्पतींची वाढ खुंटविण्यास कारणीभूत होतात. ध्वनी निर्मिती करू शकतो, टिकवू शकतो, नष्ट करू शकतो ह्याचा हा पुरावा आहे.

ब्रह्मा त्याच्या एकाग्रतेच्या शक्तीमुळे वेदध्वनींनी हे विश्व निर्माण करू शकला. एखादा सिद्ध पंचाक्षर मंत्र - जो आपण रोज म्हणतो - विशिष्ट उच्चारात म्हणतो आणि भस्म रोग्याच्या शरीराला लावतो आणि तो आजारी माणसाला बरे करू शकतो. तो हे करू शकतो कारण त्याची एकाग्र होण्याची शक्ती आपल्यापेक्षा जास्त असते. जर मंत्राचा परिणाम हवा असेल तर त्याच्या उच्चारणातील कोणत्याही चुकांशिवाय तो म्हटला पाहिजे. तेव्हाच फक्त तो अपेक्षित परिणाम घडवू शकतो. ब्रह्माकडे एकाग्रतेची पूर्ण शक्ती होती म्हणूनच तो निर्मितीचे माध्यम बनला.

अंतराळातील पोकळीतून विद्युतशक्तीद्वारे खूप असे सिद्ध होईल. निर्गुण ब्रह्म (स्वयंभू असे) म्हटल्या जाणाऱ्या आध्यात्मिक सत्यातून प्रत्येक गोष्टीचा उद्‌भव होतो. महाप्रलयाच्या काळात ही आध्यात्मिक दिव्य शक्ती सुप्तावस्थेत निद्रिस्त असते. एखाद्या पहिलवानाचे उदाहरण घ्या. जेव्हा तो झोपलेला असतो तेव्हा त्याची शक्ती स्पष्ट दिसून येत नाही. पण आपण जेव्हा त्याला त्याच्या विरोधकाबरोबर कुस्ती करताना पाहतो तेव्हा आपल्याला तो किती बलवान आहे हे कळते. त्याच प्रमाणे निर्मितीच्या काळात अनेकविध कार्ये पार पाडण्यासाठी ती शक्ती प्रकट होते. अशा प्रकारची कार्ये करण्यासाठी निर्गुण ब्रह्मापासून उर्जेचा प्रवाह बाहेर पडतो. ह्या प्रवाहाचा एक भाग म्हणून ब्रह्माची उत्पत्ती होते. तो म्हणजे सर्व तप, सर्व एकाग्रता असल्याने त्याच्या सामर्थ्यामुळे तो सर्व वेदांचे आकलन करू शकला. त्यांच्या ध्वनीने त्याने ह्या विश्वाची निर्मिती केली. वेद हे अनंत असल्याने निर्मितीची रूपेही अगणित आहेत.

महान ऋषी भारद्वाज तीनपेक्षा अधिक जीवनकाळात वेदपठण करीत राहिले. परमेश्वर त्यांच्यापुढे उभा राहिला आणि म्हणाला, '' मी तुला चौथे जीवन (जन्म) देतो. तू त्या काळात काय करशील?'' ऋषी म्हणाला, ''मी पुन्हा वेदपठण करीत राहीन.'' अनेक जीवनातही वेद समग्रपणे शिकणे शक्य नाही. जे कार्य पूर्ण होणे केवळ अशक्यच, अशा या कार्यासाठी तो करीत असलेल्या प्रयत्नाबद्दल परमेश्वराला भारद्वाजाची दया आली. त्याचे मन बदलण्यासाठी त्याचे तीन पर्वत दाखवले. एक मुठभर माती घेतली आणि ऋषीला म्हणाला,'' तू इतका काळ जे वेदाध्ययन केले ते ह्या मुठभर मातीएवढे आहे. तुला अजून जे विपुल शिकायचे आहे ते ह्या तीन पर्वतांएवढे आहे.'' अशी श्रद्धा आहे की वेदगिरी किंवा तिरूक्काझुक्कुरम हेच ते ठिकाण आहे. जेथे वेद ह्या पर्वतांच्या रूपाने दिसले. मी जेव्हा त्या डोंगराला प्रदक्षिणा घालत होतो तेव्हा माझ्या बरोबरचे लोक भजनात 'देवा देवा महादेवा' असे म्हणत होते. मी त्यांना त्याऐवजी 'वेदा वेदा महादेवा' म्हणायला सांगितले.

भारद्वाजांची ही कथा यजुर्वेदाच्या कठकामध्ये येते. वेद अनंत आहेत हे आपल्याला कळते. त्यांचे चार वेदांमध्ये व त्याच्या एक हजार किंवा तितके भाग ह्या नंतरच्या सुधारणा आहेत. जेव्हा ब्रह्मा अस्तित्वात आला तेव्हा त्याचे अंतःकरण पूर्णपणे वैदिक ध्वनींनी भरलेले

होते. वेदांनी त्याला त्याच्या निर्मितीच्या कार्याचा मार्ग दाखविला. वेदध्वनी सर्वत्र आहे हे त्याने जाणले. त्याला सर्व वेद आले. त्यांपैकी काही मंत्रच ऋषींसमोर प्रकट झाले. तेच आपला वारसा असलेले वेद झाले.

मंत्रपठणाच्या वेळेस आपण नेहमी त्यासंबंधी असलेल्या ऋषीचा, त्याचा छंद, त्याची देवता यांचा उल्लेख करतो. तेलुगू प्रदेशात सर्व मंत्रांच्या वेळेस तीन गोष्टींचा उल्लेख करतात. तपस्येतून प्राप्त झालेल्या एकाग्रतेच्या शक्तीमुळे मंत्रांचे ज्ञान झाले. त्यांना दिव्य कान लाभलेले होते म्हणून ते अवकाशातील मंत्र ऐकू शकले. योगशास्त्रात असे म्हटले गेले आहे की आपली अंतःकरणातील पोकळी बाह्य अवकाशाशी एकरूप झाली तर आपण त्यातील ध्वनी ऐकू शकू. ज्यांनी अद्वैत स्थिती प्राप्त केली त्यांनाच ते जाणवतील. अशाच प्रकारे ऋषींना मंत्रांचे ज्ञान झाले आणि त्यांनी जगाला त्यांची ओळख करून दिली. त्यांनी ते निर्मिलेले नाहीत हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यांनी आपल्याला मंत्र देऊन आपल्यावर खूप उपकार केले आहेत.

आपल्याला कोणी गंगाजल आणून दिले तर आपण ते घेतो, त्याला नमस्कार करतो. त्याने अर्थातच गंगा निर्माण केलेली नसते. पण तीर्थाचे काही थेंब आपल्याकरिता आणण्यासाठी त्याने हजारो मैल प्रवास केलेला असतो याची दखल घेण्यासाठी आपण त्याला आदर देतो. आपल्या कानांनी ऐकू न येणाऱ्या मंत्रांची देणगी देणाऱ्या या ऋषींचे पुरेसे कौतुक आपण करू शकत नाही म्हणून मंत्रपठणापूर्वी आपण संबंधित ऋषीच्या पवित्र चरणी नतमस्तक होतो.

-----

# मंत्रयोग

चौदा जगतांचे प्रचंड मोठे असे साम्राज्य तयार होते. (अतल, वितल, नितल (किंवा पाताळ), सुतल, तलातल, रसातल आणि भूलोक, भुवनलोक, स्वरलोक, महर्लोक, जनलोक, तपलोक आणि सत्यलोक) त्या साम्राज्याला एक सम्राट आहे आणि सर्व सजीव त्याचे प्रजानन आहेत. हे साम्राज्य तसेच त्याचा सम्राट शाश्वत आहेत आणि त्याचे स्वतःचे नियम आहेत. जर साम्राज्य आणि सम्राट शाश्वत असेल तर कायदाही तसाच असला पाहिजे. हा कायदा वेदांनी तयार केलेला आहे. जरी ह्या साम्राज्याला आणि विश्वाला 'अनादि' म्हटले असले तरी फक्त परमात्मा आणि त्याचे कायदे वेद हे शाश्वत आहेत.

विश्व अस्तित्वात येते, वाढते आणि महाप्रलयात ते विलीन होते. अशा प्रकारे पुनःपुन्हा ते अस्तित्वात येते आणि लय पावते. सम्राट आणि त्याचा कायदा शाश्वत राहतो. प्रत्येक निर्मितीच्या वेळेस परमात्मा अधिकारी व्यक्ती निर्माण करतो आणि त्यांना कार्य करण्यासाठी आवश्यक असलेली योगीक शक्ती देतो. योगशास्त्रात असे शिकविले जाते की एखाद्याचे कान बाह्य अवकाशापासून वेगळे नसतात. जेव्हा आपण ह्या सत्त्यावर चिंतन करतो तेव्हा आपण दिव्य कान प्राप्त करतो. परमेश्वराने नेमलेल्या अधिकाऱ्यांना परमेश्वराच्या कृपेमुळे अशा कानांनी त्या बाह्य अंतराळात सदैव अस्तित्वात असलेल्या ध्वनिलहरी ऐकल्या; त्यांनाच प्रथम वेद ज्ञात झाले आणि ते मंत्रांचे महर्षी (महान ऋषी किंवा संत) होत.

वेदपठण करणे म्हणजे मंत्रयोग. प्रत्येक नाडीतील कंपने विशिष्ट भावना निर्माण करतात किंवा चित्शक्तीला प्रेरित करतात. काही (कंपने) ऐंद्रिय वासना, काही आळस आणि काही दुःख निर्माण करतात. उलट, जेव्हा ऐंद्रिय वासना असते तेव्हा काही नाड्यांमध्ये कंपने असतात. जेव्हा क्रोध असतो तेव्हा इतर काही नाड्यांमध्ये कंपने असतात असे प्रत्येक भावनेबद्दल असते. हे आपल्याला प्रत्यक्ष अनुभवावरून कळते. जेव्हा आपण आरामात असतो तेव्हा आपल्या चेहऱ्यावर विशेष चमक असते आणि ही चमक काही नाड्या शांत आणि शीत असल्यामुळे असते. एक म्हण आहे, ''अंतरीचे सौंदर्य स्वभावे उमटे मुखावरी''. आपल्या भावनांच्या प्रतिक्रिया आपल्या नाड्यांमध्ये निर्माण होतात. जर आपण आपल्या नाड्या आपल्या नियंत्रणात आणल्या तर आपण आपल्या भावना आणि इच्छा यांचे स्वामी होऊ. मग त्यासाठी आपणास बाह्य साधनांवर अवलंबून राहण्याची गरज असणार नाही.

प्राणायाम हे ज्याचे महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य आहे त्या राजयोगाचा सराव करणे हा नाड्यांवर नियंत्रण मिळविण्याचा एक मार्ग आहे. (राजयोग हा ध्यानाचा श्रेष्ठ योग असून प्राणायाम म्हणजे जीवनरक्षक श्वासांवरील नियंत्रण होय.) दुसरा मार्ग मंत्रयोग आहे. जेव्हा आपण एखादा शब्दावयव उच्चारतो तेव्हा आवश्यक असा श्वास आपला घसा, जीभ, ओठ,

तोंडाचा खालचा आणि वरचा भाग इत्यादींतून जातो. त्याच वेळेस शब्दावयव किंवा अक्षर-ध्वनी निर्माण होतो. शरीराच्या त्या भागात असलेल्या नाड्यांमध्ये कंपने निर्माण होतात जेथे अक्षरध्वनींचा परिणाम म्हणून श्वास त्यातून जातो. ('राजयोग' हा ध्यानाचा श्रेष्ठ योग आहे. प्राणायाम म्हणजे जीवनरक्षक श्वासावरील नियंत्रण.)

ह्या संदर्भात वैदिक मंत्र कसे असतात? पठण म्हणजे अशा शब्दावयवाचा उच्चार करणे की जे नाड्यांची कंपने निर्माण करतात, ती कंपने अशी मानसिक स्थिती निर्माण करतात की ते ह्या विश्वात कल्याणाकडे आणि अंततः मोक्षाकडे नेतात. मंत्रांच्या पठणामुळे अन्य प्रकारची कंपने निर्माण होत नाहीत.

मंत्र म्हणजे काय? "मननात् त्रायते इति मंत्रः।" मनामध्ये पुनरावृत्ती झाल्यामुळे जो तुमचे रक्षण करतो तो मंत्र. वारंवार पठण करणे आणि नाड्यांमध्ये आत्मकल्याणकारक अशा कंपनांची निर्मिती करणे हे कर्तव्य जन्माने ब्राह्मणांवर सोपविलेले आहे. ह्या मंत्रशक्तीच्या साह्याने स्वतःचेच नव्हे तर सर्व प्राण्यांचे कल्याण त्याने साधले पाहिजे.

मंत्रांवर प्रभुत्व कसे मिळवायचे आणि त्यापासून संपूर्ण लाभ कसा मिळवायचा, यासाठी मंत्र कसे म्हणायचे?

गीतीशीघ्री शिरःकंपी तथा लिखितपाठकः ।
अनर्थज्ञो अल्पकण्ठश्च षडैतै पाठकाधमाः ।।

गीती म्हणजे संगीतातील रागाप्रमाणे जो त्याला आवडेल त्या चालीवर मंत्र म्हणतो. वेद त्यांना योग्य असलेल्या स्वरांमध्ये म्हटले पाहिजेत. शीघ्री म्हणजे जो तालात घाई करतो. मंत्रांचा पूर्ण लाभ घेण्यासाठी मंत्र म्हणताना मात्राबंधन पाळले पाहिजे. शिरःकंपी म्हणजे जो मंत्र म्हणताना सारखे डोके हलवितो. जो वेदपठण करतो तो शरीराच्या विशिष्ट स्थितीत असला पाहिजे. स्वरात म्हणताना नाडीकंपने नैसर्गिकरित्या निर्माण व्हायला हवीत. इतर कंपने नकोत. संगीत गाताना जसे डोके हलविले जाते तसे डोके हलविले तर कंपनांवर अनिष्ट परिणाम होईल. जो पुस्तकात वाचून मंत्र म्हणतो तो लिखितपाठक होय. मी नेहमी सांगत आलोय की वेद छापील ग्रंथांशिवाय शिकविले पाहिजेत आणि शिकले पाहिजेत. अनर्थज्ञ म्हणजे ज्याला अर्थ माहीत नाही. (ज्याला तो जे म्हणतो त्याचा अर्थ माहीत नसणे.) वेद म्हणणांऱ्यापैकी जे ह्या सहा श्रेणींचे असतात ते सर्वात खालच्या प्रकारचे असतात, त्यांना 'पाठकाधमाः' म्हटले जाते.

(अल्पकण्ठ शब्दाचा अर्थ पुढील प्रकरणात आहे.)

-----

# ध्वनी आणि अर्थ

मला एक मजेशीर विचार सुचतो. संस्कृतमध्ये तरम् हा प्रत्यय तुलनेसाठी वापरतात. वीर्यवत् म्हणजे बलवान. वीर्यवत्तरम् म्हणजे अधिक बलवान. ओंकाराच्या अर्थज्ञानासह जो जप करतो त्याला सर्व लाभ होतील, तो वीर्यवत्तरम्, असे छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे. (तेन उभौ कुरुतो यश्चेतदेव वेद । यश्च न वेदा नाना तु विद्या च अविद्या च यदैव विद्यया करोति श्रद्धया उपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति इति खलु एतस्य एव अक्षरस्य उपव्याख्यानं भवति (छांदोग्य उपनिषद १.१.१०). जे अर्थाविना ध्यान करतात त्यांना लाभ होतात, ते वीर्यवत. ह्या उपनिषदाच्या भाष्यात आद्य शंकराचार्य म्हणतात की जे ओंकाराचे ध्यान त्यामागील तत्त्व न समजता करतात त्यांना पुष्कळ लाभ मिळतील पण ते अर्थ समजून घेऊन ध्यान करणाऱ्याइतके नसतील.

आपल्याला धार्मिक विधींचे अर्थ माहीत असोत वा नसोत पण ज्या महान व्यक्तींनी आपल्याला ते विधी करायला सांगितले किंवा आपले वाडवडील करीत होते, त्यांचे अनुकरण करायचे म्हणून केले तरी आपल्याला योग्य फळ मिळते. श्रद्धा आपल्या कृतीला प्रेरणा देते. हे इतर कोठल्याही गोष्टीपेक्षा मंत्रउपासनेला लागू पडते. (मंत्र म्हणून आराधना करणे.) त्याचे कारण असे आहे की मंत्रातील शब्दांचे योग्य उच्चारण आणि निर्माण झालेली कंपने फलदायी परिणाम घडवितात. सूत्रांचा अर्थ नंतर येतो.

ह्या संदर्भात मला असे वाटते की अर्थज्ञानाविना विधी असे फळ देतात ते वीर्यतरम् म्हणजे त्याच्या अर्थासह केलेल्यापेक्षा अधिक शक्तिशाली होय. (नंतरचे वीर्यवत्) एखाद्या मंत्राचे त्याच्या अर्थाविना पठण करणे किंवा पुटपुटणे हे अर्थज्ञान घेऊन करण्यापेक्षा अधिक फलदायी आहे. कसे?

एखादा मनुष्य वकिलामार्फत जिल्हाधिकाऱ्याकडे अर्ज पाठवितो. दुसरा एक अशिक्षित शेतकरी आहे तो कुणाकडून तरी अर्ज लिहून घेतो आणि व्यक्तीशः जिल्हाधिकाऱ्याकडे नेऊन देतो. तो त्याच्या अधिकाऱ्याला त्याचे प्रकरण सहानुभूतीपूर्वक हाताळण्यास सांगतो. त्या अधिकाऱ्याच्या मनावर त्या माणसाच्या साधेपणाचा परिणाम होतो आणि तो त्याला मदत करायला तयार होतो. जर आपण वकिलामार्फत जिल्हाधिकाऱ्याकडे गेलो आणि त्याने भलताच अर्थ घेतला तर तो आपल्याविरुद्ध जाईल. शिवाय त्याला जर असे आढळले की आपण जाणूनबुजून गैर केलेले आहे तर त्याच्याकडे आपल्यावर नाराज व्हायला अधिक मोठे कारण मिळेल. पण जर त्याला कळले की आपण नकळत गैरकाम केलेले आहे तर त्याचा आपल्याला क्षमा करण्याकडे कल राहील.

आपण आपल्याला अर्थ माहीत नाही म्हणून विधी करणे नाकारता कामा नये तसेच शास्त्रात सांगितलेले विधी आपण का केले पाहिजेत असे विचारता कामा नये. अर्थज्ञान नसता धार्मिक विधी करणे हे मला वीर्यवत्तरम् वाटते.

तुम्हाला वाटेल की माझी निरीक्षणे काही गांभीर्याने केलेली नाहीत. पण मला दिसते की बौद्धिक उद्दामपणा आणि फसवेगिरी वाढते आहे, आणि अज्ञ लोकांची ठेव असलेली नम्रता हिरावून घेतली जात आहे, निव्वळ श्रद्धेने केलेल्या गोष्टी स्तुती करण्यायोग्य आहे, असे मला वाटते.

तुम्हाला धार्मिक कर्तव्य करण्याची गरज बौद्धिक पातळीवरून खात्रीने पटली पाहिजे आणि त्याचवेळेस तुम्ही नम्र असले पाहिजे. मंत्र हे धर्मशास्त्राचे कायदे असतात. जर आपणास त्यांचा अर्थ माहीत असेल तर आपण त्याप्रमाणे जीवन जगू.

वरील श्लोकामध्ये उल्लेखलेल्या (मागील प्रकरण) अल्पकंठ ह्याचा अर्थ ज्याचा आवाज क्षीण आहे. (जो क्षीण आवाजात वेद म्हणतो.) वेदमंत्र मोकळ्या, खणखणीत स्वरांत म्हटले पाहिजेत आणि शक्य तितक्या जास्तीत जास्त अंतरापर्यंत त्यांचा ध्वनी पोहोचला पाहिजे. मंत्राचे ध्वनी मंत्र म्हणणाऱ्या आणि ऐकणाऱ्या अशा दोघांच्या नाड्यांमध्ये कंपने निर्माण करून त्यांचे कल्याण करतात. तो ध्वनी हवा भरून टाकतात जी ह्या विश्वाला आणि पुढील विश्वाला फायदेशीर ठरेल. म्हणून वेद मोठ्या उर्जेने म्हटले पाहिजेत, ज्यायोगे त्यांचे ध्वनी जास्तीतजास्त अंतरावर पोहोचतील.

-----

प्रकरण १५

# वेदांची महानता

वेद शाश्वत आहेत आणि सर्व निर्मितीचे उगमस्थान आहेत आणि त्यांची महती निरनिराळ्या प्रकारे जाणली जाते. मी अगोदरच सांगितल्याप्रमाणे, त्यांचे ध्वनी स्वतःच्या आत्म्यालाच नव्हे तर पूर्ण विश्वाला परिणामकारक ठरू शकतील अशी कंपने निर्माण करतात. आपण लोकक्षेम किंवा विश्वाचे कल्याण म्हणजे मानवाचे तसेच इतर सर्व जीवांचे भले समजून घेतले पाहिजे. वेदात प्रकटपणे आढळणारी ही सर्व निर्मितीविषयीची चिंता अन्य कोणत्याही धर्मात नाही. ''शन्नो अस्तु द्विपदेश्चतुष्पदे'' हे एका मंत्रात येते : द्विपद, चतुष्पद इ. सह सर्व प्राण्यांच्या भल्यासाठी वेद प्रार्थना करतात. अगदी गवत, झुडपे, वृक्ष, पर्वत आणि नद्या सुद्धा त्यांच्या कनवाळू दृष्टीतून वगळल्या गेलेल्या नाहीत. सर्व सजीव प्राण्यांना आणि जड वस्तूंना वेदध्वनींच्या विशेष गुणांमुळे सौख्यावस्था आणली जाते.

वेदध्वनींच्या श्रेष्ठतम गुणधर्माबरोबरच वेद मंत्रांतून प्रकट होणारी उदात्त सत्ये लक्षात घ्यायला हवीत. ह्या ग्रंथांमधील सिद्धांतांनी इतर ठिकाणच्या सर्वसामान्य आणि श्रद्धावान लोकांचे कुतूहल जागृत केले आहे. ते वेदसूक्तांतले सौंदर्य आणि सामाजिक जीवनातील तत्त्वे हाताळण्याची मार्मिक रीत, त्यात खोलवर ठसवलेली आणि विषद केलेली आध्यात्मिक सत्ये, त्यात असलेले शास्त्रीय सत्य एवढेच नाही तर नैतिक शिक्षण यांनी ते चकित झाले.

सौम्य कंपने निर्माण करणारे सर्व मंत्र अर्थपूर्ण असतातच असे नाही. ह्या संदर्भात संगीताचे एक उदाहरण घ्या. एखाद्या रागाचा आलाप (संगीताच्या प्रकाराचा विस्तार) हा शुद्ध स्वर असतो. म्हणजे त्याला शब्द नसतात तरी तो आनंद, दुःख अशा भावना निर्माण करण्यास समर्थ असतो. एका विश्वविद्यालयाच्या संघाने केलेल्या संशोधनात असे आढळून आले की वाद्यसंगीताच्या कंपनांमुळे वनस्पतींची वाढ भरभर झाली आणि त्यांनी अधिक फळे आणि भाजीपाला दिला. ध्वनीला निर्मितीचे सामर्थ्य असते त्याचा हा पुरावा आहे. आणखी एक नमूद करण्याजोगी गोष्ट म्हणजे वनस्पतींना ऐकविले गेलेल्या संगीतात कोणतेही शाब्दिक घटक नव्हते. ध्वनीला स्वतःची शक्ती असते हेच यावरून सिद्ध होते.

वेदांच्या बाबतीत आणखी एक उल्लेखनीय बाब म्हणजे त्यांच्यातील शब्दांइतकेच त्यातील ध्वनीला अत्यंत मोल आहे. ध्वनीला स्वतःचे सामर्थ्य आहे त्याचबरोबर अर्थ वाहून नेण्याच्या श्रेष्ठ गुणधर्मासाठीही शब्द उल्लेखनीय आहेत.

उच्च प्रतीचे तमीळ श्लोक आहेत. ते वाचणे म्हणजे हेलावून जाणे; ते त्यांतील प्रखर भक्तीने आपल्या हृदयाला स्पर्श करतात. पण विष नाहीसे करण्यासाठी किंवा रोग बरे

करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या मंत्रजपासाठी थोड्याच मंत्रांची आपल्याला मदत घ्यावी लागते. नक्कीरार, अरूणागिरीथर आणि संवंदमूर्ती यांसारखे ह्या स्तोत्रांच्या लेखकांनी ज्या कविता रचल्या त्या हृदय हेलावणाऱ्या आणि सुंदर आहेत. पण त्यातील जपासाठी निवडलेल्या स्तोत्रांमधील ध्वनी मंत्रांइतकेच सामर्थ्यवान आहेत. आपल्या आचार्यांच्या भक्तिवाङ्मयात 'सौंदर्यलहरी' आणि 'शिवानंदलहरी' आहेत. 'सौंदर्यलहरी'तील कडव्याच्या पठणाने विशिष्ट लाभ होतो. 'शिवानंदलहरी'बाबत असे नाही. कारण पहिल्यात (सौंदर्यलहरी) ध्वनीची विशेष मंत्रशक्ती आहे.

विशेषतः ध्वनीच्या दृष्टीने मौल्यवान पण अर्थहीन असे मंत्र आहेत. त्याचप्रमाणे अर्थगर्भ पण विशेष मंत्रशक्ती नसलेले वाङ्मय आहे. त्यांच्या ध्वनीचा ऊर्जादायक गुण आणि सांगत असलेले उदात्त सत्य असलेल्या मंत्रांचा संग्रह ही वेदांची महानता आहे. औषध जरी कडू असले तरी शरीराचे हित करते, तसेच काही प्रकारचे अन्न जरी स्वादिष्ट असले तरी शरीराला बाधक ठरते. कुष्माण्डलेहासारखे चवीला गोड असलेले आणि त्याच वेळेस शरीराचे पोषण करणारे काहीतरी घेण्यात आपल्याला आनंद होत नाही का? (कुष्माण्डलेह या आयुर्वेदिक औषधात अशगौर्ड, गूळ आणि इतर घटक असतात.) त्याचप्रमाणे वेद दुहेरी हेतू साध्य करतात. त्यांच्याकडे आपल्यापैकी प्रत्येकाचे आणि विश्वाचे मोठे कल्याण करण्याची मंत्रशक्ती असते तसेच त्यांच्यात महान आध्यात्मिक सत्याच्या स्वरूपाचा बोध असतो.

सैद्धांतिक पातळीवर भौतिक विश्व आणि आत्म्याच्या अंतरंगातील जीवनाशी वेद संबंधित आहेत. आत्मिक कल्याण साधण्यासाठी विशिष्ट पद्धतीने आचरण करण्याचा उपदेश वेद करतात. त्यांचा संबंध केवळ व्यक्तीच्या मोक्षाशी नसतो तर ते सामाजिक जीवन आणि सार्वजनिक कर्तव्याविषयी देखील सांगतात. ब्राह्मणाने कसे जीवन जगावे आणि राजाने राज्यशासन कसे राज्य केले पाहिजे आणि स्त्रियांनी कोणत्या आदर्शांचे अनुसरण करावे : कायद्याच्या रूपात ह्यांचे उत्तर ग्रंथामध्ये सापडते. खरोखर वेद आपल्या कायद्याच्या पुस्तकांच्या सर्वोच्च स्थानी विराजमान आहेत.

-----

## प्रकरण १६

# यज्ञ किंवा त्याग

मी वेदांची श्रेष्ठता, एक धार्मिक ग्रंथ म्हणून त्याच्या महत्ततेत भर घालणारे त्यांचे घटक या विषयी बोललो. आणखी एका घटकाबाबत बोलायचे आहे तो म्हणजे यज्ञ किंवा त्याग.

यज्ञ म्हणजे काय? तो म्हणजे अग्नीचा समावेश असलेला धार्मिक विधी मंत्र म्हणत करणे. तो शब्द यज् म्हणजे पूजन करणे, भक्ती प्रदर्शित करणे ह्या मूळ शब्दापासून आला आहे. परमात्मा आणि विविध देवता यांना संतुष्ट करण्यासाठी यज्ञ केला जातो. यज्ञाला याग असेही म्हटले जाते.

'मननात् त्रायते इति मंत्रः' अशी मंत्राची व्याख्या आपण अगोदरच पाहिली आहे. (ज्याच्या वारंवार पठणाने आणि मननामुळे जो आपले रक्षण करतो.) त्राणम् म्हणजे रक्षण करणे. आपण सर्वजण गीतेतील ''परित्राणाय साधुनाम्'' शब्दांशी परिचित आहोत. (सद्गुणी माणसाचे रक्षण करणे) (परित्राणाय साधुनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युग युगे ।। (भगवद्गीता ४-८) मननम् म्हणजे पुन्हापुन्हा म्हणणे, काहीतरी मनात रुजविणे. त्यात मंत्रातील शब्द मोठ्याने म्हणण्याची गरज नसते. जरी मनातच पुनरावृत्ती केली तरी नाड्यांमध्ये निरोगी कंपने निर्माण होतात. त्याचप्रमाणे वैदिक मंत्र मोठ्याने म्हटला (वेदघोष) तरी तो श्रोत्यांना अर्थ कळत नसताही आनंद प्राप्त करून देतो. अशा ध्वनीमध्ये मानवजातीला सुखी करण्याचे सामर्थ्य असते.

यज्ञविधीच्या वेळेस तुम्ही देहाने सहभागी झालेले असताना मंत्र मनात गुणगुणता आणि मोठ्याने म्हणता तेव्हा मन, वाचा आणि शरीर वेदांना समर्पित होत असते. यज्ञ-यागासारखे विधी हे अतिशय महत्त्वाचे वैदिक विधी आहेत.

(विविध यज्ञ पद्धतींच्या तपशिलासाठी भाग १९ पहा.)

-----

प्रकरण १७

# यज्ञविधी अन्य धर्मांमध्ये नाही

इतर उपासनांच्या पद्धतीत यज्ञाची संकल्पना नाही. आपला धर्म 'वैदिक मत' आणि इतर धर्म यात हा मोठा फरक आहे. ख्रिश्चन आणि इस्लाम धर्म एकाच ईश्वराबाबत बोलतात. वेदही असेच प्रकटपणे म्हणतात की ईश्वर एकच आहे आणि सामान्य मर्त्यांचा त्याच्याशी संबंध आहे. आमच्या आत्म्याशी निरंतर अनुसंधान ठेवून व प्रत्यक्ष अनुभूतीतून या परमात्म्याचे - भगवंताचे ज्ञान करून घ्यावे लागते. ही अवस्था प्राप्त करण्यासाठी खूप 'प्रज्ञा' आणि प्रगल्भता लागते. जेव्हा आपण ह्या एकमेव सत्याशी जोडले जातो तेव्हा हे सर्व जग नाहीसे होते.

आपण आपल्यासाठी स्वतःस कसे तयार करतो? याचे उत्तर हेच आहे, जेव्हा आपण भौतिक जगात अत्यंत गुंतलेले असतो त्या वेळेस आपल्या ऐहिक जीवनात - अस्तित्वात आपण धर्माच्या आज्ञा आणि शास्त्राच्या उपदेशानुसार जीवन जगले पाहिजे. आपली जाणीव शुद्ध होईल. त्याचवेळेस आपण आतून प्रगल्भ होऊ आणि जगापासून अलिप्त ह्या ध्येयाकडे नेणारी कर्तव्ये आणि विधी हे वेदांमध्ये जतन करून ठेवले आहेत. त्यात सर्वात महत्त्वाचा म्हणजे यज्ञ. तमीळमध्ये त्यासाठी एक शब्द आहे - वेल्वी. यज्ञात फक्त एकमात्र असलेल्या परमात्म्या ऐवजी विविध देवतांना आहुती दिली जाते. हा यज्ञ प्रकार फक्त आपल्या धर्मात आहे.

यज्ञामध्ये विविध प्रकारची सामुग्री मंत्रांच्या उच्चारणासह अग्नीला अर्पण करण्याची आपल्याला आज्ञा दिली आहे. अग्नीतील अशा हवनाला होम म्हटले जाते. सामुग्री जरी होमात टाकली असली तरी ती अग्नीला असतेच असे नाही. अग्नीला आवाहन करीत सामुग्री समंत्र होमात टाकली असली तरी ती त्या देवतेसाठी असते. रुद्र, विष्णु, इंद्र, वरुण मातरिश्वन (वायु) आणि इतर देवतांना दिला जाणारी आहुती सुद्धा अग्निकुंडात दिली जाते. आवाहन केल्या गेलेल्या देवतेला तो सामुग्री अग्नी पोहोचवितो. जसे निरनिराळी लिहिलेली पत्रे एकाच टपालपेटीत टाकली जातात तसे विविध देवतांना आहुती दिलेल्या वस्तू अग्नी ह्या एकाच देवतेद्वारे त्यांना त्यांना पोहोचविल्या जातात.

वैदिक धर्म आणि इतर धर्म यांत एक महत्त्वाचा फरक आहे. इतर धर्मांचे अनुयायी एकाच देवाची उपासना करतात. आपण अनेक देवतांचे पूजन करतो आणि होमाच्या अग्नीत त्यांना आहुती देतो.

आपण नेहमी म्हणतो की जर आपण एकमेकांना मदत केली तर भगवान संतुष्ट होतो,

नाही का? ''लोकांची सेवा, गरिबांची सेवा ही ईश्वरसेवे इतकीच चांगली आहे'' असे म्हणत सुधारणावादी पूजेचा त्याग करतात. आपणही देवांची सेवा करून परमात्म्याचे आशीर्वाद मिळवू शकतो कारण तेही त्याचीच निर्मिती आहेत.



वेद सांगतात की एकच ब्रह्म त्याला सत्य किंवा वास्तव म्हणा अनेक भिन्न देव किंवा देवतांचे प्रकटीकरण करते. देवता हीच परमात्मा समजून स्तुती केली जाते कारण आपल्याला निश्चित माहीत असते की एकेश्वरवाद हा वैदिक सिद्धान्त आहे. केवळ अनेक देवतांचे कथन करतात म्हणून वेद अनेकेश्वरवादी आहेत असे म्हणणे चूक आहे. तसे करण्यात, केवळ ब्रह्माने अनेक देवतांना प्रकट केले आहे असे त्यांना (वेदांना) म्हणायचे असते. विश्वातील अनेक व्यवहार चालू ठेवण्यासाठी परमात्म्याने विविध दिव्य शक्ती निर्माण केल्या. त्या देवता निसर्गातील शक्ती, भावना आणि मानवाच्या वासना यांच्यावरच्या प्रमुख असतात. भगवंताने जसे आपल्याला निर्माण केले त्याच पद्धतीने त्यांना निर्माण केले. त्याने स्वतःतून आपल्याला आकार दिला - याचा अर्थ असा की तोच अनेक मानव रूपांत आला.

ह्याच कारणास्तव अद्वैतवाद सांगतो की परमात्मा आणि जीवात्मा (वैयक्तिक आत्मा) एकच आहेत. अनेक देवतांमध्ये प्रकट झालेला 'तो' तोच आहे. तथापि, आपण जोवर अद्वैत सिद्धान्त समजून घेत नाही आणि जोपर्यंत आपण परमात्म्यापासून भिन्न नाहीत हे जाणत नाही तोपर्यंत आपण विधी केले पाहिजेत आणि एकमेकांना मदत केली पाहिजे. त्याचप्रमाणे देवतांकडे स्वतंत्र ईश्वरी तत्त्व समजून पाहिले पाहिजे आणि आहुती देऊन त्यांची अर्चना केली पाहिजे हा वेदांचा आदेश आहे.

ह्या विश्वात जर आपण आणि इतर सजीवांना सुखी व्हायचे असेल तर वैश्विक शक्तीचे नियंत्रण करणाऱ्या देवतांचे आशीर्वाद घेतले पाहिजेत. ह्याच हेतुने त्यांच्या कृपेसाठी त्यांना प्रसन्न आणि संतुष्ट करण्यासाठी वेदांनी आपल्यावर आहुती देण्याचे कर्तव्य सोपविले आहे.

सर्वांमधील एकत्व जाणण्यासाठी जर आपण ज्ञान आणि सुज्ञपणा प्राप्त केला तर ह्या देवतांची गरज भासणार नाही. आपण थेट परमात्म्याचे आराधन करू शकू. तथापि जोवर आपण ह्या बहुविध विश्वापासून मुक्तता मिळविण्याचे प्रयत्न करतो तोवर स्वतंत्र तत्त्व म्हणून आपण देवतांचे पूजन केले पाहिजे.

-----

## प्रकरण १८

# यज्ञाचा तिहेरी हेतू

वैदिक यज्ञांना तिहेरी हेतू आहे. पहिला म्हणजे देवतांचे आशीर्वाद मिळविणे, ज्यायोगे ह्या विश्वातील आपण तसेच इतर सर्व प्राणी सुखी होतील. दुसरा म्हणजे आपल्या मृत्यूनंतर आपण स्वर्गात सुखी राहू असा विश्वास प्राप्त करणे. पण आपला देवलोकातील, स्वर्गीय जगातील मुक्काम सर्वकाळाचा नसतो. तो ह्या जगात आपण मिळविलेले पुण्य संपेपर्यंत असतो. स्वर्गातील आनंदही महान भक्त आणि ज्ञानी लोकांच्या कडून मिळालेल्या वरदानाइतका परिपूर्ण आणि भरपूर नसतो. तो आत्म्याच्या वरदानाच्या इतकाही नसतो. ज्याचे ईश्वरानुभूती असे त्याचे वर्णन केले जाते.

शंकराचार्यांनी त्याच्या 'मनीष' पंचकामध्ये सांगितले आहे की इंद्राला ज्ञात असलेला आनंद, आत्मानंद किंवा आत्मज्ञानाच्या वरदानाच्या महासागरातील एका थेंबाइतकाही नाही. तरीसुद्धा स्वर्गातील जीवन हे अविरत दुःखी असणाऱ्या पृथ्वीवरील जीवनापेक्षा हजारोपटीने अधिक सुखी असते. आहुती देण्याचा दुसरा हेतू स्वर्गात स्थान मिळविणे हा आहे.

तिसरा हेतू सर्वात महत्त्वाचा आहे, तो गीतेत सांगितल्याप्रमाणे फलाची अपेक्षा न ठेवता आहुती - (कर्म करून) देऊन साध्य केला जातो. (कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । मा कर्मफलहेतूर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि । गी.२.४७). ह्यात आपण ह्या जगातील सौख्य किंवा स्वर्गातील रहिवासाची इच्छा ठेवत नाही. आपण यज्ञ करतो कारण जगाच्या कल्याणासाठी देवतांचे आशीर्वाद मिळविण्यासाठी आवाहन करणे हे आपले कर्तव्य आहे. अशा प्रकारे आपली जाणीव शुद्ध होईल. अज्ञान दूर करणे आणि अंतिम मोक्ष यासाठी ही शुद्धता पूर्वावश्यक असते. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर निस्वार्थपणे केलेला यज्ञ म्हणजे आपण परमात्म्यामध्ये विलीन होणे.

आत्मसाक्षात्कार आणि ज्ञानाचे आदर्श विशद करणारे शंकराचार्य म्हणतात : ''वेदोनित्यम् अधियताम् तदुदितम् कर्म स्वनुष्ठियताम् ।'' (वेद रोज म्हणा. त्यांनी सांगितलेले यज्ञ आणि इतर विधी काळजीपूर्वक करा.) ह्या जगातील सौख्य किंवा स्वर्गातील आनंदासाठी आपले यज्ञ करणे शंकराचार्यांना नको आहे. कोणत्याही क्षुल्लक फलासाठी तर नकोच नको. आपले अंतःकरण वासनेने दूषित न होऊ देता वैदिक कर्म करा असे शंकराचार्य बजावतात. त्यांच्या शिकवणुकीप्रमाणे आत्मसाक्षात्कारासाठी आपण आपले मन शुद्ध करण्याचा हा मार्ग आहे.

-----

## प्रकरण १९

# स्वर्गस्थ आणि मर्त्य एकमेकांना मदत करतात

तुम्ही पाहिले असेल की यज्ञांना आपल्या वैदिक धर्मात खूपच महत्त्व आहे. परमेश्वराने गीतेमध्ये स्वतःच सांगितले आहे, जेव्हा ब्रह्मदेवाने मानवजात निर्माण केली त्याचवेळेस मर्त्यांना आज्ञा देत त्याने यज्ञ अस्तित्वात आणले : ''यज्ञ करीत रहा. तुम्हाला उज्ज्वल भविष्य लाभेल. तुमचे हे यज्ञ तुमच्या सर्व इच्छा पूर्ण करणारी गाय (कामधेनू) ठरो.''

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् । (भ.गी. ३-१०)

ब्रह्मदेवाने ''मानव आणि त्यासह यज्ञ निर्माण केले'' असे गृहीत धरले तर असे म्हणता येईल की त्याने प्रथम मानव आणि नंतर यज्ञ निर्माण केले. पण गीतेत प्रतिपादले आहे की प्रजापतीने मानवाबरोबरच यज्ञ निर्माण केले. (सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा) यज्ञाचा उल्लेख प्रथम आहे आणि नंतर प्रजा (मानव).

वेदमंत्र हे निर्मितीचे कारण असल्याने, पठणाने निर्माण झालेली कंपने (यज्ञासारख्या) धार्मिक कृत्ये करणाऱ्या अधिकाऱ्यांना दिव्य शक्ती देतात. होमाच्या वेळेस असे मंत्र म्हणणे हे लिफाफ्यावर पत्ता लिहिण्यासारखे आहे. अशा प्रकारे होम करून अग्नीने आवाहन केलेल्या देवतेला हे आहुती देणे होय.

मांजरापेक्षा कुत्रा अधिक बलशाली असतो, घोडा कुत्र्यापेक्षा अधिक बलशाली असतो, हत्ती घोड्यापेक्षा अधिक बलशाली असतो, सिंह हत्तीपेक्षा अधिक बलशाली असतो. हा क्रम पुढे न्यायचा तर माणसांपेक्षा अधिक बलशाली कोण? देवता किंवा स्वर्गस्थ. ह्या जगात ते अदृश्य स्वरूपात पाच घटकात असतात तेव्हा स्वर्गात दृश्य स्वरूपात असतात. ज्यांनी सिद्धी प्राप्त केलेली असते किंवा मंत्रपठण करून पूर्णत्व मिळविलेले असते ते सूक्ष्मतेचे वरदान मिळवून स्वर्गस्थ देवता स्थूल रूपात पाहू शकतात. मंत्रांचा परिणाम म्हणून परमात्म्यापासून देव उद्‌भवले. म्हणून आपण मंत्रांचे, ध्वनिरूप देवता असे वर्णन करू शकू.

होमाचे वेळेस मंत्राने आवाहन केल्यावर देवता प्रकट होते. जे सुज्ञ आणि प्रगल्भ आहेत त्यांना ते त्यांच्या डोळ्यांनी पाहू शकतात. जरी ते तसे करू शकले नाहीत तरी देवतेची शक्ती त्यांच्यापुढे प्रकट होईल. तथापि आहुती त्यांना थेट दिली जाऊ शकत नाही. जेव्हा तुम्ही पत्र लिहिता तेव्हा तुम्हाला त्यावर तिकीट चिकटवावे लागते किंवा निबंधकाची मोहोर उमटावी लागते. वेदांच्या नियमाप्रमाणे स्वर्गस्थाला देऊ करण्याची कोणतीही आहुती त्यांना स्वीकारार्ह रूपात अग्नीत द्यावी लागते.

होमाने आहुती स्वाहा केल्यानंतर जे शिल्लक राहते (यज्ञशिष्ट) ते होम करणाऱ्या यजमानाकडून प्रसाद म्हणून घेतले जाते. असा प्रश्न विचारला जातो की आवाहन केल्या गेलेल्या देवतेला ते कसे पोहोचते ? आपण अशा शंका मनात बाळगता कामा नयेत. देवता आपल्यासारख्या, पंचभूतांनी निर्माण केलेल्या नसतात. म्हणून त्यांना स्थूल स्वरूपातील अन्नाची गरज नसते. आपल्याही बाबतीत पाहता आपण खाल्लेले अन्न जठराग्नीने जाळले (पचविले) जाते. त्याचा अर्क रक्ताच्या स्वरूपात सर्व अवयवांकडे नेला जातो. आहुतीचा तरल अर्क अग्नीद्वारे आवाहन केलेल्या देवतेकडे नेला जातो.

जेवण किंवा मेजवानीच्या वेळेस पाहुण्यांसाठी शुभचिंतन केले जाते हे तुम्हाला माहीत आहे. यजमान आणि निमंत्रित त्याच्या आरोग्यासाठी शुभेच्छा देतात. याचा अर्थ असा की जेव्हा लोकांचा एक समूह समारंभात खातात किंवा पितात तेव्हा त्याचा लाभ दुसऱ्या कोणाला होतो. तुम्ही विचारता हे कसे शक्य आहे ? ह्या गोष्टी केवळ मानसिक दृष्टिकोनाच्या आधारे स्पष्ट करता येऊ शकतात. चांगले हेतू आणि चांगले विचार यांना त्यांची स्वतःची निर्मितीची शक्ती असते.

परमात्म्याच्या विचारलहरी जेव्हा आपल्याकडे मंत्ररूपात येतात तेव्हा त्या खरोखरच चांगल्या शक्तींनी पूर्ण भरलेल्या असतात. मंत्र म्हणत देवतांना दिलेली आहुती त्यांचे सामर्थ्य वाढवितात. स्वर्गस्थ अर्थातच बलशाली असतात पण त्या सर्वशक्तिमान किंवा परिपूर्णही नसतात. त्यांनाही त्यांच्या उणिवा आणि वासना असतात, त्या आपण करीत असलेल्या होमाद्वारे पूर्ण होतात. जर त्या आपले भौतिक जीवन अधिक सुखी करण्यासाठी मदत करीत असतील तर आपण होमहवन करून त्यांना मदत केली पाहिजे. जर आपण यज्ञ केले तर त्या समृद्ध होतील आणि मोबदल्यात त्या कल्याणाचा वर देतील.

भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात -

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ।। (गीता- ३.११)

लोकांनी ईश्वराची कृपा कशी संपादन केली आणि होम करून स्वर्गस्थांना कसे संतुष्ट केले ह्याचा तपशील आपल्या धार्मिक ग्रंथांमध्ये ओतप्रोत भरलेला आहे.

जर स्वर्गस्थ शक्ती आपल्याला पाऊस देत असतील, सौख्यकारक अन्न, आरोग्य देत असतील तर आपण त्यांच्या संवर्धनासाठी होम केले पाहिजेत. आपल्याला असे विचारले जाते, ''जेव्हा आपण स्वतःच अन्न आणि वस्त्रासाठी देवतांवर अवलंबून आहोत तर त्यांनाच आपण का अन्न द्यायचे ? ते स्वतःच त्यांचे स्वतःचे अन्न मिळविण्याची व्यवस्था का करू शकत नाहीत ?'' तुम्ही परमेश्वराच्या वरील विधानाचे कसे स्पष्टीकरण करू शकाल? (वरील

श्लोकात उच्चारलेले) परस्परं भावयन्तः आपण त्या स्वर्गस्थांना महान जीव मानून त्यांना वंदन करणे हे पुरेसे वाजवी वाटते. म्हणून आपण त्यांचे पूजन करू या. पण त्याऐवजी आपल्याला उच्च स्तरावर नेऊन आणि त्यांच्या समान स्तरावर का ठेवले जाते ? आपल्याला सांगितले जाते त्याचा अर्थ काय ? तुम्ही त्यांच्या गरजा भागवा आणि त्यांना तुमच्या गरजा भागवू द्या - तुम्ही त्यांना यज्ञ करून अन्न द्या आणि त्यांना तुम्हाला पावसाचे वरदान देऊ द्या.

जेव्हा मी अशा प्रश्नाचा विचार करतो तेव्हा मला असे वाटते की स्वर्गस्थांचे विश्व हे इंग्लंडप्रमाणे आहे आणि ते स्वतः इंग्रज माणसाप्रमाणे आहेत. इंग्लंडमध्ये शेतीची जमीन भरपूर आहे का ? नाही. तरीही इंग्रज माणसांनी जगावर राज्य केले. ते बढाई मारत असत की, आमच्या राज्यावर सूर्य कधीही मावळत नाही. (ख्रिस्तोफर नॉर्थ ह्याने १८२९ मध्ये म्हटले आहे की, ''आमच्या साम्राज्यावरून सूर्य कधीच मावळत नाही''.) त्यांच्या ह्या वरचढपणाचे रहस्य काय होते ?

इंग्लंड अन्नधान्याच्या स्त्रोताबाबत दुर्बल आहे. तेथे विपुल प्रमाणात कोळसा आणि चुनखडी आहे. कोळसा काळा असतो आणि चुना पांढरा असतो. हे दोन स्रोत इंग्रज माणसांचे आहेत पण ते, ते खाऊ शकत नाहीत. जेथे पिके भरपूर प्रमाणात काढली जातात तेथे जर यंत्रे आणि कारखाने उभे करायचे असतील तर मोठ्या प्रमाणात कोळसा आणि चुना लागेल. उद्योगाला कोळसा आवश्यक असतो हे प्रसिद्धच आहे. (पेट्रोल आणि वीज नंतर आले. आता अणुऊर्जा पण आहे) सिमेंट सारख्या उद्योगांना चुना (चुनखडी) आवश्यक आहे.

इंग्रजांनी एक धूर्त योजना आखली. त्यांनी इतर देशांना कारखाने सुरू करण्यास प्रवृत्त केले आणि तेथील लोकांमध्ये नवीन, अनावश्यक इच्छा चेतविल्या. त्यांनी ह्या देशांना कोळसा आणि चुना विकला आणि त्या मोबदल्यात विपुल प्रमाणात अन्नधान्य आणि कापूस मिळविला. अशा पद्धतीने त्यांनी एकापाठोपाठ एक देश आपल्या अमलाखाली आणले.

स्वर्गात जमीन नाही. देवांना स्वतःचे पोट भरण्याचे कोणतेही साधन नाही. ''दुर्भिक्षं देवलोकेषु मनुनाम उदकं ग्रहे'' तैत्तिरीय आरण्यकाच्या पहिल्या प्रश्नात (पहिला भाग) असे म्हटले आहे. ढग कोसळतात तेव्हा पाऊस उत्पन्न होतो. केवळ पृथ्वीवरच पावसाचा उपयोग केला जाऊ शकतो - तो तलाव, नद्या आणि विहिरी भरतो. स्वर्गस्थांना पाण्यासाठी आपल्या घरी यावे लागते. शेतांना पाणी पुरवठा होऊन मशागती चालू राहिल्याने केवळ पृथ्वीवरच अन्न पाण्याची विपुलता आहे. स्वर्गात त्याचे दुर्भिक्ष आहे कारण तेथे शेतजमीन नाही. आरण्यकातील दिलेल्या शब्दांचा हा अर्थ आहे.

तथापि आपल्याला पावसाचे वरदान हवे म्हणून देवांची कृपा हवी. त्या कृपेला पात्र होण्यासाठी आपण यज्ञ केले पाहिजेत. नाही तर पृथ्वीवर पाऊस नसेल. त्याचा परिणाम असा

असेल की दुष्काळ पडेल किंवा पाऊस जमिनीवर नव्हे तर समुद्रात पडेल किंवा अतिवृष्टी किंवा अनावृष्टी असेल. ह्या ग्रहावर समृध्दीसाठी योग्य प्रमाणात पाऊस पडण्यासाठी, आपल्याला स्वर्गस्थांवर अवलंबून राहावे लागते.

जसे इंग्लंडमध्ये कोळसा भरपूर प्रमाणात आहे पण शेतजमीन पुरेशी नाही, तसेच स्वर्गस्थांकडे खूप कृपा आहे पण पिकविण्यासाठी पिके नाहीत - ते स्वतः त्यांच्या कृपेच्या शक्तीवर जगू शकत नाहीत. ते पाऊस पाठवितात म्हणून आपण पिके काढू शकतो आणि आपल्या स्वतःला जगवू शकतो. वेदमंत्र म्हणून आपण त्यांची कृपा करण्याची शक्ती वाढवू शकतो. अशा मंत्रपठणासह यज्ञात दिलेली आहुती त्यांचे पोषण करीत असते.

आपला देश कापूस पिकवतो. जेव्हा आपल्या सूतगिरण्यांचा विकास झाला नव्हता तेव्हा इंग्रजांनी आपला कापूस लॅन्केशायरला नेला, चांगले (तलम) कापड बनविले आणि त्या प्रक्रियेत चौपट फायदा घेऊन ते कापड आपल्याला विकले. आपल्या समुद्रावर तयार झालेल्या पाण्याच्या वाफेपासून स्वर्गस्थ पाऊस बनवितात. पण इंग्रजांच्या सारखा ते त्यातून (ह्या व्यवहारातून) फायदा काढत नाहीत. वस्तुतः ते देत असलेले वरदान आपण त्यांना भरणपोषणासाठी जे देतो त्यापेक्षा अधिक असते. मी अगोदर सांगितल्याप्रमाणे, स्वर्गस्थ आपल्यापेक्षा अधिक बलशाली आहेत. परमेश्वराने आपल्याला विविध विधी करण्यास सांगितले आहे आणि स्वर्गस्थांना त्यातच समाधान मानावे लागते. तसे करण्यात त्याने आपल्याला त्यांच्या पातळीवर नेले असे दिसते. भगवान गीतेत म्हणतात, ''परस्पर भावयन्तः'' देव आणि मानव एकमेकांना आधार देतात''.

-----

# प्रकरण २०

## परिश्रमक्षमता आणि संरक्षणक्षमता

परमेश्वराने आपल्याला काम करण्याची क्षमता दिलेली आहे आणि स्वर्गस्थांना वरदान देण्याची क्षमता दिलेली आहे. या विश्वात सुद्धा कार्याची अशीच विभागणी आहे.

शेत आणि कारखाना हे मेहनतीशी संबंधित आहेत. पोलिस स्टेशन, न्यायालय आणि इतर कार्यालये यांच्याकडे संरक्षणाचे कार्य आहे. जे शेतीत आणि कारखान्यात तयार होते त्याची न्याय्य उपलब्धता घरोघरी करण्यासाठी व्यवस्थापकीय कार्यालये असतात. कार्यालये काही उत्पन्न करीत नाहीत किंवा त्यांना पिकांची मशागत करावी लागत नाही. ती यंत्रांचा गोंगाट, शेण आणि धूळ यांपासून मुक्त असतात. जे कार्यालयात काम करतात त्यांचे हात व नखे घाण होत नाहीत आणि डोक्यावर भिरभिरणाऱ्या पंख्याखाली आरामात खुर्चीवर बसून ते त्यांचा वेळ घालवू शकतात. त्यात शारीरिक कष्ट नसतात. फक्त खर्डेघाशी, कारकुनी करणे हेच त्याचे काम असते. स्वर्गीय जग असेच आहे. ते असे कार्यालय आहे जे सर्व विश्वास संरक्षण पुरविते. जे कार्यालयात काम करतात त्यांना शेत न नांगरण्याबद्दल किंवा यंत्रे न चालविण्याबद्दल दोष देता येत नाही. त्यांनी जर असे काम करायला सुरुवात केली तर ते आपले संरक्षण करण्याचे त्यांचे कर्तव्य ते करू शकणार नाहीत. स्वर्गस्थ हे अशा अधिकाऱ्यांसारखे आहेत.

पृथ्वी ही शेत आहे आणि कारखानाही आहे. इथे दलदल आणि चिखल आहे, गोंगाट आहे, ती तेलकट, चिकट, धुळकट आहे. आपल्याला दिवसभर काबाडकष्ट करावे लागतात. नियमानुसार विधी करणे म्हणजे, होमाचा धूर सहन करणे, उपवासाने थकणे हे सर्व सहन करणे - खरोखरच तपशीलवार केलेल्या विधींमुळे तुम्हाला घामाघूम व्हावे लागते.

ईश्वर हा, स्वर्गस्थ हे वरच्या पातळीवरचे आणि मर्त्य हे खालच्या पातळीवरचे असे मानीत नाही. शेतकरी आणि कारखान्यातील कामगार अन्न आणि इतर वस्तू निर्माण करतात. शेतकरी आणि कामगार यांनी केलेल्या वस्तू न मिळाल्यास आपल्या छोट्या खोलीत रुबाबात बसणाऱ्या अधिकाऱ्याला उपाशी राहावे लागेल आणि त्याला आवश्यक वस्तू मिळणार नाहीत. एकूणच अधिकाऱ्याकडून संरक्षण दिले गेल्यामुळे शेतकऱ्याकडून पिकविले गेलेले धान्य आणि कामगाराने तयार केलेल्या आवश्यक वस्तू समाजातील सर्व सभासदांना उपलब्ध करून दिल्या जातात.

अभियंता कालवा खोदण्याची आज्ञा देतो. शेतकी अधिकारी कीटकनाशके पुरवितात. दुसरा अधिकारी कारखाना सुरू करण्याचा परवाना देतो. शासन, पोलीस त्यात

तयार झालेल्या मालाचे वितरण करण्यास मदत करतात. (ह्या हेतूनेच, शासन व्यवस्था केलेली असते, प्रत्यक्ष व्यवहारात ती कशी कार्य करते ते सोडून द्या.) ही एक अशी व्यवस्था असते जेथे एक-दुसऱ्यावर प्रत्येकजण अवलंबून असतो. 'अ' 'ब' च्या सुखात योगदान देतो आणि 'ब' 'अ' च्या.

अशा पार्श्वभूमीवर आपण गीतेतील ''परस्परं भावयन्तः'' शब्दांचा विचार केला पाहिजे, जरी देव आपल्याकडे आपल्या मदतीच्या अपेक्षेने पाहत असले तरी आपण हे विसरता कामा नये की ते अधिक वरच्या पातळीवरच आहेत आणि आपण त्यांना मान दिला पाहिजे.

इतर धर्मांमध्ये सर्वांकडून एकाच देवाची थेट पूजा केली जाते. त्यांच्याकडे अनेक देवतांना संतुष्ट करण्यासाठी यज्ञ करण्याची पद्धत नाही. आपल्यात फक्त संन्यासीच परमात्म्याची थेट आराधना करतात. इतरांना विविध देवतांना संतुष्ट आणि प्रसन्न करावे लागते आणि त्यांच्या कृपेने कल्याण साधावे लागते. देवतांना संतुष्ट करण्यासाठी आपल्याला अनेक होम करावे लागतात.

एखाद्या मोठ्या राजाला सर्वजण थेट भेटू शकत नाहीत. प्रजाननांना त्याने नेमलेल्या अधिकाऱ्यांकडून त्यांची अनुमतीची कृपा मिळवावी लागते. त्या अधिकाऱ्यांना स्वतःच्या मनाप्रमाणे वागता येत नाही, त्यांना राजाज्ञेनुसार लोकांच्या कल्याणाची काळजी घ्यावी लागते. आपल्या धर्मातील काही रूढी अशा व्यवस्थेचे अवशेष आहेत. परमेश्वर हा सर्वश्रेष्ठ राजा, सम्राट आहे. आपण मानव त्याचे प्रजानन आहोत. वरुण, अग्नी, वायू आणि इतर स्वर्गस्थ त्याचे अधिकारी आहेत. त्यांच्याद्वारे आपल्याला अनेक लाभ मिळवायचे असतात आणि आपले भले करण्याची त्यांची शक्ती वाढविण्याच्या दृष्टीने आपण होमहवन करतो. अग्नीमध्ये आपण जी आहुती देतो ती त्यांचे अन्न बनतेः ''अग्निमुखाः देवाः''

जेव्हा अग्नीमध्ये आपण एखादा सामुग्री अर्पण करतो तेव्हा आपण 'न मम' म्हणतो (माझी नाही). अशी आहुती अग्नीकडून वापरली जाते आणि ती आवाहन केल्या गेलेल्या देवतेकडे नेली जाते. अशा प्रकारे त्यांना त्यांचे पोषक पदार्थ मिळतात. अशाच प्रकारे आपणसुद्धा जे आपल्या वंश किंवा कुळातील आहेत अशा आपल्या वाडवडिलांना / पूर्वजांना (पितरांना) प्रसन्न करू शकतो. पितरांसाठी असलेल्या विधींबाबतचे दिग्दर्शन वेदांमध्ये आहे.

-----

## प्रकरण २१

# स्वर्गस्थांसाठीचे आणि पितरांसाठीचे विधी

देवतांसाठी असलेले विधी भक्तिभावाने आणि पितरांसाठी असलेले विधी श्रद्धेने केले पाहिजेत. जे काही भक्तीने केले जाते तो 'यज्ञ' आणि जे श्रद्धेने केले जाते ते 'श्राद्ध'. पहिला विधी करताना शेंडीची गाठ मारायला हवी आणि यज्ञोपवीत डाव्या खांद्यावर हवे. नंतरचा विधी करताना शेंडी मोकळी हवी आणि यज्ञोपवीत उजव्या खांद्यावर हवे.

शेंडी आणि यज्ञोपवीत हे ह्या दोन हेतूंसाठी असतात. संन्याशाकडे ह्या दोन्हीही गोष्टी नसतात. जेव्हा ते जगाचा त्याग करतात तेव्हा ते पितरांसाठीच्या विधीचा त्याग करतात आणि अनेक देवतांचे पूजन करणे थांबवितात. ते हृदयात कोणतीही भौतिक इच्छा न बाळगता थेट परमात्म्याची भक्ती करतात. इतर धर्मांचे अनुयायी शेंडी ठेवीत नाहीत किंवा यज्ञोपवीत धारण करीत नाहीत आणि (विविध देवतांचे पूजन करावे लागते अशा टप्प्यांमधून न जाता) ते थेट परमेश्वराचे पूजन करतात.

स्वर्गस्थ आणि पितरांसाठी करावयाचा विधी करताना यज्ञोपवीताच्या दोन स्थानांबद्दल सांगतो. विविध विधी करताना आपण पूर्वेकडे तोंड करावे. स्वर्गस्थांकडे जाण्याचा मार्ग तयार करण्याची दिशा उत्तर असते. ह्या मार्गाला "उत्तरायण" म्हणतात. आपले निघून गेलेले वाडवडील दक्षिणेकडे राहतात. संतकवी तिरूवल्लुवर त्यांना तेनुपुत्तार म्हणतो, जे दक्षिणेकडे राहतात. "दक्षिणायन हा पितरांच्या जगाकडे जाण्याचा मार्ग आहे. भगवान कृष्ण ह्या दोन्ही मार्गाविषयी सांगतात. (अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।। धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।। शुक्लकृष्णे गति ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ।। (गीता ८-२४, २५, २६)

जेव्हा पितरांसाठी विधी करताना आपण पूर्वेकडे तोंड करून बसतो तेव्हा कोणता खांदा दक्षिणेकडे असतो ? उजवा. म्हणून यज्ञोपवीत त्यावर असले पाहिजे.

प्रदक्षिणा घालणे म्हणजे दक्षिणेकडे तोंड करून जाणे. (बहुसंख्य मंदिरात राज-गोपुरम् - मुख्य प्रवेशाचा मनोरा पूर्वेकडे असतो. जेव्हा तुम्ही प्रवेश करता आणि प्रदक्षिणा घालायला सुरुवात करता तेव्हा तुम्ही दक्षिणेकडे तोंड करता.)

जेव्हा देवतांसाठी विधी करताना आपण पूर्वेकडे तोंड करून बसतो तेव्हा आपला डावा खांदा उत्तरेकडे असतो. म्हणून यज्ञोपवीत त्यावर असले पाहिजे. जेव्हा आपण ह्या दोन्हीत व्यस्त नसतो - म्हणजे जेव्हा आपण आपले कार्यालयीन काम किंवा अन्य काहीतरी

करीत असतो तेव्हा यज्ञोपवीत कोणत्याही खांद्यावर नसावे आणि ते हाराप्रमाणे धारण करावे. (आजकाल हा नियम कोणीही पाळताना दिसत नाही. पितरांचे विधीकार्य सोडून बहुतेक लोक डाव्या खांद्यावर यज्ञोपवीत धारण करतात.)

-----

# प्रकरण २२



## यज्ञाचा हेतू

केवळ आपल्याच धर्मात यज्ञ किंवा आहुतीसारखे विधी का आहेत?

आपल्याकडे जर अतिरिक्त धान्यउत्पादन झाले तर इतरत्र जे विपुल प्रमाणात उत्पन्न होते आणि जे आपल्याकडे केले जात नाही त्याचा आपण व्यापार करतो. सुतार, लोहार आणि इतर कारागीर उपयुक्त वस्तू बनवतात आणि आपली अनेक प्रकारे सेवा करतात. मोबदल्यात आपण त्यांना चरितार्थासाठी जे हवे ते देतो. आपण गायीला गवत देतो आणि ती आपल्याला दूध देते. आपण सरकारला कर देतो आणि ते आपल्याला संरक्षण देते. जगातील व्यवहार देवाणघेवाणीच्या पद्धतीच्या पायावर आधारलेले असतात. त्याचप्रमाणे आपण आपले जग सोडून इतर जगाशी देवाणघेवाण करतो. अभियंते आणि इतर तज्ज्ञ पावसामुळे मिळालेले पाणी अपेक्षित ठिकाणी वळवू शकतात पण ते पाऊस निर्माण करू शकत नाहीत. जर आपल्याला पाऊस हवा असेल तर आपल्याला स्वर्गस्थांच्या निवासस्थानी ठरावीक वस्तू पाठवाव्या लागतील. त्या देवाणघेवाणीविषयी गीता सांगते.

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ।। (गीता-३-११)

त्याचा अर्थ असा : यज्ञ करून तुम्ही देवांना संतुष्ट करा. आणि पृथ्वीवर पाऊस पडून तुमच्या कल्याणाची काळजी देवांना घेऊ द्या. असे एकमेकांना मदत करून अधिकाधिक वैभवसंपन्न आणि सुखी व्हा.

-----

प्रकरण २३

# यज्ञातील हत्या समर्थनीय आहे का ?

मंत्रपठण, देवतांचे आवाहन आणि हवी अर्पण करण्याने यज्ञ साकार होतो. मंत्र म्हटले जातात (तोंडी) आणि देवतेचे चिंतन केले जाते (मनात). होमात हवी अर्पण करणे ही होमासाठी सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे - ह्या कार्यात शरीर गुंतलेले असते. एकूणच यज्ञातील आहुती देण्यात मन, वाचा आणि शरीर (मनो-वाक्-काया) हे एकत्र आणले जातात. (ह्याच भागाचे प्रकरण १६ पहा).

आहुतीमधील तूप हा महत्त्वाचा घटक आहे. जेव्हा तूप आहुती म्हणून दिले जात असते तेव्हा ते इतर यज्ञ सामुग्री शुद्ध करण्यासाठी वापरले जाते - वस्तुतः ते आवश्यकच आहे. अनेक होमांमध्ये प्राण्यांची वपा वापरली जाते (चरबी किंवा मज्जा.)

होम करणे/बळी देणे हे पापमूलक आहे की पुण्यदायी आहे? किंवा ते दोन्ही आहे?

मध्वाचार्य हे बळीसाठी कोणताही पशू वापरण्याच्या विरुद्ध होते. त्यांच्या कनवाळू स्वभावानुसार ते म्हणाले की वपा ऐवजी पिठापासून पशू बनवून अर्पण केला पाहिजे. (पशू म्हणजे प्रामुख्याने गायच असे नव्हे. संस्कृतमध्ये कोणत्याही प्राण्याला पशू म्हटले जाते.)

व्यासांनी त्यांच्या ब्रह्मसूत्रात, वेदांचे ज्ञानकांड असलेल्या उपनिषदांमध्ये व्यक्त झालेल्या आत्म्याच्या स्वरूपाचे विवरण केले आहे. वेदांच्या कर्मकांडामध्ये असलेल्या पूर्वमीमांसामध्ये प्रत्यक्ष यज्ञाचा विचार केला गेला आहे. (ज्ञानकांड आणि कर्मकांड ह्यांचे स्पष्टीकरण ह्याच भागाच्या प्रकरण ३२ मध्ये केले आहे.) उत्तरमीमांसा म्हणजे ज्ञानकांडामध्ये यज्ञाचा खरा हेतू स्पष्ट केला आहे. यज्ञांचा काय हेतू किंवा ध्येय काय? जाणीव शुद्ध करणे हा यज्ञाचा हेतू होय आणि अशी शुद्धता मनुष्याला ज्ञानमार्गाकडे नेण्यासाठी आवश्यक आहे.

ब्रह्मसूत्र म्हणते : ''अशुद्धमिती चेन शब्दात्'' (या वचनाचा अर्थ साधारणतः असा आहे. पशुबळीला ग्रांथिक आधार असल्याने (किंवा ते वेदध्वनीबरोबर असल्याने) त्याला अशुद्ध म्हणता येणार नाही. अर्थात याविषयी परम सद्गुरूंनी आपले स्वतःचे स्पष्टीकरण दिले आहे.) होम हे ग्रंथाच्या अधिकारावर आधारलेले आहेत आणि तो आत्मज्ञानाचा शोध आहे. मग त्याला अशुद्ध कृती कसे म्हणता येईल ? आपण एखादी वस्तू शुद्ध किंवा अशुद्ध आहे किंवा कृती चांगली किंवा वाईट आहे हे कसे ठरवितो ? आपण ते शास्त्राच्या अधिकारानुसार निवाडा करून ठरवितो. वेदध्वनीपासून ही कृती आल्यामुळे पशुबळी हा पापमूलक नाही असे व्यास आपल्या ब्रह्मसूत्रात सांगतात. काय शुद्ध आहे आणि काय अशुद्ध हे वेदांनी ज्यांना अधिकार दिला. त्यांच्याकडून वा खरे तर 'शब्दप्रमाण' असे संबोधले जाणाऱ्या ध्वनींकडून

जाणता येईल. जर हे बळी वेदानुसार अशुद्ध मानले गेले असते तर ते आत्मिक शोधाचा एक भाग म्हणून वेदांनी त्यांना स्वीकारले नसते. जरी बळी द्यायचा पशू पिठाचा बनवलेला (मध्वाचार्यांच्या अनुसार पर्याय) असला तरी त्यात वैदिक मंत्रांच्या साह्याने प्राण ओतले जातात. मग तो जिवंत प्राण्यासारखा असणार आणि त्याचे बलिदान ही हिंसक कृती नसणार का?

तिरूवल्लुवर हे त्यांच्या तिरूक्कुरूल मध्ये म्हणतात, हजारो यज्ञांत अग्नीत आहुती देण्यापेक्षा एखादा प्राणी ठार न मारणे आणि तो भक्षण न करणे अधिक चांगले. ह्यावरून कवी यज्ञाविषयी वाईट बोलतो असे नव्हे.

धर्मानुसार किंवा धर्माचा अवलंब करण्यात कसेही असो वा काहीही असो ते आचरणात आणले पाहिजे. हिंसेच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केले पाहिजे. तिरूक्कुरल म्हणते, हजारो यज्ञ करण्यापेक्षा एखादा प्राणी ठार न मारणे अधिक चांगले. ह्या विधानावरून असे स्पष्ट होते की तिरूवल्लुवर बळी देण्याचा धिक्कार करतो. मनुच्या म्हणण्यानुसार हजारो यज्ञ करण्यापेक्षा एक अश्वमेध (अश्वाचे बलिदान) करणे अधिक श्रेष्ठ होय. त्याच वेळेस तो जाहीर करतो की हजारो अश्वमेध यज्ञांपेक्षा सत्य श्रेष्ठ असते. जेव्हा आपण म्हणतो की एका गोष्टीपेक्षा दुसरी अधिक चांगली तेव्हा त्याचा ध्वन्यर्थ असा की दोन्ही चांगले आहेत. जर यज्ञ पापमूलक असता तर हजारो पापमूलक कृत्यांपेक्षा एक पुण्यदायी गोष्ट श्रेष्ठ असते असा दावा केला गेला असता का ? हजारो एकादशांच्या दिवशी उपवास करण्यापेक्षा एका शिवरात्री उपवास करणे अधिक श्रेष्ठ असे तुम्ही म्हणू शकता. पण तुम्ही असे म्हणू शकता का की ते (उपवास) कत्तलींपेक्षा अधिक चांगले आहे ? जेव्हा तुम्ही असा शेरा मारता की ''हा विधी त्या विधीपेक्षा किंवा दुसऱ्या विधीपेक्षा चांगला आहे'' तेव्हा त्याचा अर्थ असा की दोन किंवा अधिक गोष्टींमध्ये तुलना आहे.

छांदोग्य उपनिषदाच्या समारोपाच्या परिच्छेदात जेथे अहिंसेची खूप स्तुती केली आहे तेथे तुम्हाला ''अन्यत्र तीर्थेभ्यः'' हे शब्द आढळतील. त्याचा अर्थ असा की वेदविधी सोडून अहिंसेचे आचरण झाले पाहिजे.

(तद्धैतद्ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः
प्रजाभ्य आचार्याकुलाद्वेदमधीत्य
यथाविधानं गुरोः कर्मातिशेषाणाभिसमावृत्य
कुटुम्बे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो
धार्मिकान्विदधदात्मनि सर्वेन्द्रियाणि
सम्प्रतिष्ठाप्याहिंसन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः स
खल्वेवं वर्तन्यावदायुषं ब्रह्मलोकमभिसम्पद्यते

न च पुनरावर्तते न च पुनरावर्तते ।। १ ।।
- छांदोग्य उपनिषद (८-१५-१)

यज्ञात आणि युद्धात हिंसेचा विचार करायला वाव नाही.

जर अहिंसेचा आदर्श हा बली देण्याच्या विधीपेक्षा श्रेष्ठ असेल तर त्याचा अर्थ असा आहे की यज्ञ चांगले आहेत पण अहिंसा त्यापेक्षा अधिक चांगली आहे. हजारो यज्ञांच्या कृतीची स्तुती केली पाहिजे पण अहिंसेच्या आचरणाची अधिक स्तुती केली पाहिजेः यज्ञाच्या संबंधातील कुरल श्लोकाचा अर्थ ह्या दृष्टीने लावला पाहिजे. हा संदर्भ सर्वसंगपरित्यागाच्या खंडात येतो हे आपण विसरता कामा नये. कवीला काय सांगायचे आहे तर एखाद्या गृहस्थाश्रमी माणसाने यज्ञ करण्यापेक्षा एखादा संन्यासी हत्येपासून दूर राहतो हे अधिक चांगले. शास्त्रानुसारही संन्याशाला यज्ञ करायला अनुमती नाही.

अनेक प्रकारचे यज्ञ आहेत. 'कल्प' (वेदांचे एक अंग) आणि गृहस्थाश्रम (गृहस्थाची एक स्थिती) हा विषय हाताळायच्या वेळेस मी नंतर (अनुक्रमे भाग ११ व १२ मध्ये) त्यासंबंधी बोलेन. मला असे विधान करायचे आहे की सर्वच यज्ञांमध्ये प्राण्यांची हत्या केली जात नाही. असे अनेक यज्ञ आहेत की त्यात फक्त तूपच (आज्य) अग्नीमध्ये हवन केले जाते. काहींमध्ये हविष्यान्न (तूप मिसळलेला भात) दिले जाते आणि काहींमध्ये चरू किंवा पुरोडाष नावाचा शिजविलेला भात टाकला जातो. अग्निहोत्रात अग्नीत दूध ओतले जाते, औपासनात अखंड धान्य (अक्षता) वापरल्या जातात आणि समिधान मध्ये पळसाच्या काड्या वापरल्या जातात. (ह्या सर्व शब्दांचे विवरण भाग १९ मध्ये केले आहे.) ज्या यज्ञात प्राण्यांची वपा आहुती दिली जाते, जळालेल्या अवशेषाचा केवळ अगदी छोटा भाग - अर्थात प्रसाद रूपाने घेतला जातो.

एखाद्याला एकवीस यज्ञ करायची आज्ञा दिलेली आहे. ते तीन प्रकारचे आहेतः पाकयज्ञ, हविर्यज्ञ आणि सोमयज्ञ. प्रत्येक गटात सात उपविभाग आहेत. पाकयज्ञाच्या सात त्याचप्रमाणे हविर्यज्ञाच्या पहिल्या पाच यज्ञात पशुबळी नव्हते. सहाव्याच्या पुढील (निरूढ्रपशुबंध) हविर्यज्ञात प्राण्यांचा बळी दिला जातो.

"ब्राह्मणांनी प्राण्यांचे कळपच्या कळप बळी दिले आणि त्या मांसावर ताव मारला. असे कळप यज्ञवेदीवर नेत असताना बुद्धाने वाचविले." असा तपशील आपण नेहमी पुस्तकामध्ये वाचतो. खरे सांगायचे म्हणजे मोठ्या प्रमाणात प्राण्यांची हत्या होते असा कोणताही यज्ञ नाही. सर्वश्रेष्ठ प्रकारचा यज्ञ वाजपेय ब्राह्मणांकडून केला जातो. केवळ सत्तावीस प्राण्यांचा उल्लेख आहे. अश्वमेध (घोड्याचा बळी) ह्या सम्राटाकडून केल्या जाणाऱ्या ह्या सर्वात मोठ्या यज्ञात शंभर प्राण्यांचा उल्लेख आहे.

आपली मांसभक्षणाची हौस भागविण्यासाठी ब्राह्मण बळी देत असत आणि देवतांना

संतुष्ट करण्याचे बोलणे ही सबब होती असे म्हणणे निखालस खोटे आहे. बळीचे मांस काढण्याबाबत नियम होते. शरीराच्या कोणत्या भागातील आणि प्रत्येक ऋत्विक म्हणजे यज्ञविधी करणारे पुरोहित (प्रकरण २६ पाहा.) किती प्रसाद (इधावतरण) म्हणून घेऊ शकतो याचे नियम आहेत. तो वाटाण्याच्या आकाराहून लहान असे आणि तो चवीला म्हणून काही न घेता गिळावा लागत असे. ह्या बळीच्या पद्धतीवर हल्ला करण्यासाठी अनेक कारणे आहेत, परंतु ब्राह्मणांनी मांस खाण्याच्या लालसेने फसवणूक केली असे म्हणणे हास्यास्पद आहे.

हल्ली प्रयोगशाळेत गिनीपिंग म्हणून असंख्य प्राण्यांची कत्तल होते. महान आदर्शासाठी (मानवजातीचे कल्याण) केलेली लहानशी हानी म्हणजे पशुबळी असे मानले पाहिजे. खरे पाहता त्यात नुकसान नाही कारण त्या प्राण्याला उन्नत स्थिती प्राप्त होते.

अशी एक अफवा हल्ली पसरली आहे की ब्राह्मणांनी सोमरस (सोम ह्या वनस्पतीचा अर्क) पिण्याच्या लोभाने सोमयाग केले. ज्यांनी ह्या खोट्याचा प्रचार केला त्यांनी सोमरसपानाची दारू पिण्याबरोबर तुलना केली. खरे पाहता सोमरस मादक नाही. इंद्राने त्याच्या शत्रूला ठार केले जेव्हा तो सोमरसाने धुंद झालेला होता असा वेदांमध्ये एक संदर्भ आहे. जे हे खोटे पसरवितात ते अर्थवादाचा (प्रकरण ३४ पाहा.) आश्रय घेतात आणि ह्या उताऱ्याचा आधार त्यांच्या विकृत दृष्टिकोनासाठी घेतात.

ज्या तत्त्वावर देवतांचे शरीरशास्त्र आधारलेले आहे ते मानवांपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे. ते सोडून, पुरोहित बाटल्याच्या बाटल्या किंवा भांडीच्या भांडी सोमरस पित होते असे म्हणणे हे वैदिक धर्माबाबतचे केवळ अभद्र अज्ञान प्रकट करणे होय. सोमवल्ली ग्रह नावाच्या लहान खलामध्ये कुटली जाते आणि रस काढला जातो. देवांना अर्पण केल्या जाणाऱ्या अर्काच्या प्रमाणाबाबत नियम आहेत. आहुतीनंतर जो लहान भाग शिल्लक राहतो तो 'हुता-शेष' तो एक औंसापेक्षा जास्त नसतो, तो थेंब प्यायचा असतो. अशा पिण्याने कोणीही बेशुद्ध पडत नाही. ते म्हणतात की सोमरस हा फार चविष्ट नसतो. (या भागात प्रतिपादन केलेले काही विषय हे श्री अग्निहोत्रम् ताताचारियार यांच्या वैदिक आचार यातील आहेत.)

सोमरस ही त्या काळातली कॉफी होती असे हास्यास्पद विधान केले जाते. तो पिऊन निर्माण होणाऱ्या आनंदाचे वर्णन वैदिक मंत्रांमध्ये केलेले आहे. हा चुकीचा अर्थ काढला आहे. कॉफी ही मनाला घातक आहे तर सोमरस हा मन स्वच्छ करतो. दोन्हींना समान लेखणे मूर्खपणाचे आहे. प्राचीन काळी सोमवल्ली विपुल प्रमाणात उपलब्ध होती. आता ती अधिकाधिक दुर्मिळ होत चालली आहे. हे खरोखरच वैदिक धर्माच्या ऱ्हासाला अनुसरुन आहे. अलीकडच्या वर्षामध्ये कोल्लेनगोडच्या राजाने हे काम महत्त्वाचे मानून जेथे जेथे सामयाग होईल तेथे सोमवल्ली न चुकता पुरविण्याचे ठरविले आहे.

-----

## प्रकरण २४

# कलियुगात पशुबळी असावा का?

विषयाचा मुद्दा पुढे असा येतो की प्राचीन काळात मानवजातीने उच्च आदर्श आणि उदात्त चारित्र्य प्राप्त केले. जगाच्या कल्याणासाठी माणसे प्राण्यांचे बलिदान करीत असत. कारण त्यांच्या हृदयात खूप जिव्हाळा होता आणि ते निस्वार्थी होते. ते गायी आणि घोडे सुद्धा आहुती म्हणून देत असत आणि श्राद्धासाठी मांस घेत असत. मधल्या काळात गृहस्थाश्रमी म्हणून त्यांनी कर्ममार्ग अनुसरला (कर्माचा मार्ग) आणि विश्वाच्या कल्याणासाठी देवतांना संतुष्ट करण्यासाठी, आत्मानंद प्राप्तीसाठीही ते स्वतः धार्मिक विधी करीत असत. पण तसे करण्यात ते कोणत्याही फळाची अपेक्षा बाळगत नसत. नंतर त्यांनी संन्यास घेऊन सर्व कर्माचा, सर्व पूजा, सर्व उपचार यांचा त्याग केला. ती अशी सुसंस्कृत आणि थोर चारित्र्याची माणसे होती की जर त्यांचा भाऊ, राजा निर्वंश मरण पावला तर हृदयात कोणतीही वासना न ठेवता आणि त्यांच्या ब्रह्मचर्या पासून थोडेही दूर न जाता ते त्याच्या पत्नीपासून पुत्र प्राप्त करीत असत. राज्याच्या गादीला वारसा न मिळाल्याने राज्यात अराजक निर्माण होऊ नये हाच असे करण्यात त्यांचा हेतू असे.

आपल्या ह्या कलियुगात, त्यांच्यासारखे कृतीत निष्काम असलेले, मनाला जिंकलेले संन्यासी होण्यासाठी, सर्व कर्मांचा त्याग करणारे आणि जे स्त्रियांच्या सहवासातही हृदयात शुद्ध राहतात अशी माणसे आपल्याकडे नाहीत. म्हणून अश्व आणि गायीचे बलिदान, श्राद्धात मांस, पतीच्या भावाकडून पुत्रप्राप्ती या गोष्टींपासून दूर राहण्यास सांगितले गेले आहे. प्रमाण म्हणून पुढील श्लोक पाहा,

अश्वालंभं गवालंभं संन्यासं पलपैतृकम् ।
देवरेणा सुतोत्पत्तिं कलौ पंच विवर्जयेत ।

एका दृष्टिकोनानुसार वरील श्लोकातील 'अश्वालंभम्' ऐवजी 'अग्नियाधानम्' पाठ घ्यावा. (भाग १२, प्रकरण ८ पाहा) हा पाठ स्वीकारला तर त्याचा अर्थ असा होईल की ज्या यज्ञात पशू बळी दिले जात नाहीत ते सुद्धा करू नयेत. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर त्याचा अर्थ असा की सर्व यज्ञांना पूर्ण बंदी. हविर्यज्ञ प्रकारामध्ये पहिला अग्नियाधान आहे. त्यांवर बंदी घालायची तर त्याचा अर्थ असा की पाकयज्ञासारखे लहान यज्ञ सोडून कोणताही यज्ञ करू नये.

थोर व्यक्तींनुसार असा दृष्टिकोन चुकीचा आहे. भगवत्पाद, शंकराचार्य, ज्यांचे जीवित- कार्य वैदिक धर्माची पुनर्स्थापना हेच होते, ते वेदांचे नित्य पठण थांबवता कामा नये असे ठामपणे सांगतात. (वेदो नित्यं अधियताम्) वेदांनी आपल्यावर सोपविलेले विधी केलेच पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. ''तदुदितम् कर्म स्वानुष्ठियताम्'' वैदिक विधींमध्ये होमाला

अग्रस्थान आहे. ते जर टाळले तर इतर कोणते वैदिक विधी आपण करायचे ? काही ठरावीक प्रकारचे होम कलियुगात करणे अनावश्यक आहे असे नाही.

ह्या श्लोकानुसार, अग्नियाधानम्ला मनाई केली तर कोणताही मोठा यज्ञ केला जाणार नाही. तर मग मनाई केलेल्या प्रकारच्या यज्ञांमध्ये गवालंभाचा (गायीचा बळी) का उल्लेख केला आहे ? जर अग्नियाधानम्ला मला परवानगी नाही तर गवालंभाला मनाई नाही असे न म्हणता तो चालू आहे.

धर्मशास्त्रातील दुसऱ्या एका श्लोकाप्रमाणे, जोवर वर्णाश्रम व्यवस्था कलियुगात पाळली जाते, कितीही लहान प्रमाणात का होईना आणि जोपर्यंत वेदध्वनी वातावरणात व्याप्त आहेत तोवर अग्नियाधानम्सारखी कर्मे केली पाहिजेत आणि ज्यात कर्म नसते असा संन्यासाश्रम पाळला जावा. ठरावीक प्रकारचे पशुबळी, श्राद्धात मांस आणि पतीच्या भावाकडून पुत्रप्राप्ती ह्यांना कलियुगात मनाई केली आहे.

-----

## प्रकरण २५

# एकमेव ध्येय

थोडक्यात सांगायचे तर वेदमंत्रांचे पठण करून एखाद्या देवतेला अग्नीत आहुती अर्पण करणे म्हणजे यज्ञ. एका अर्थाने मंत्र स्वतःच आवाहन केलेल्या देवतेचा आकार बनतात. दुसऱ्या अर्थाने मंत्र हे अग्नीत अर्पण केलेल्या सामुग्रीसारखे आवाहन केल्या जाणाऱ्या देवतेचे पोषण असतात. ते त्याची शक्ती वाढवितात आणि एकापेक्षा अधिक हेतू साध्य करतात. आपण सरकारला कर भरतो. तथापि - व्यवसाय कर, शेतसारा, वाहन कर आणि इतर कर यांसारखे विविध कर निरनिराळ्या कार्यालयांकडून गोळा केले जातात. त्यासाठी विविध दस्तऐवज आहेत. तसेच प्रत्येक कर्म किंवा धार्मिक विधीकरिता एक स्वतंत्र देवता, एक स्वतंत्र मंत्र, एक प्रकारची विशिष्ट सामुग्री इ. असूनही ह्या सर्वाचे ध्येय एकच आहे. त्या परमेश्वरालाही समर्पण होणे. आपल्याला माहीत आहे की निरनिराळ्या खात्यांत भरलेले कर हे शेवटी एकाच शासनासाठीच असतात. तसे आपण जाणले पाहिजे की विविध देवतांसाठी केलेल्या होमापोटी एकच ध्येय - परमात्मा आहे.

आपण जे कर भरतो तो राजा किंवा अध्यक्ष आपल्याला व्यक्तिशः परिचित नसतो. परंतु परमेश्वर, परम असा राजा आपल्यापैकी प्रत्येकाला आपण जितके स्वतःला ओळखतो त्यापेक्षा अधिक चांगला ओळखतो. होम असे म्हटले जाणारे योग्य कर आपण भरतो की नाही हे त्याला माहीत असते. परमेश्वराला फसवता येत नाही.

वर सांगितल्याप्रमाणे, प्रत्येक होमासाठी तीन आवश्यक गोष्टी असतात : मंत्र, हवन सामुग्री, आणि आवाहन करावयाची देवता, वाचा, हात (शरीर) आणि मन हे तीन एकत्र आणून आवाहन करणे आवश्यक असते.

-----

## प्रकरण २६

# यज्ञकर्ता

जो सामुग्री आणि दक्षिणा यावर खर्च करून यज्ञ करतो तो यजमान होय. यज् (आपण पूर्वी पाहिले आहे.) म्हणजे पूजा करणे. यजमानचा मूळ अर्थ जो यज्ञ करतो, तो असा आहे. हल्ली तामीळनाडू मध्ये मुडलाली हा यजमान समजला जातो. (परमसद्गुरुंनी पूर्वीच उल्लेख केल्याप्रमाणे दक्षिणेकडे नियोजन करणाऱ्यास वा खर्चाची रक्कम देणाऱ्यास मुडलाली असे म्हणतात). मुडलाली यशाचा मोबदला देतो. म्हणून त्याला आपण होमात जो दक्षिणा देतो त्याला यजमान हे पद दिले आहे. सामान्य लोकही मुडलालीस यजमान समजतात यावरून तमीळ भूमीमध्ये वैदिक संस्कृती किती खोल रुजलेली आहे हे दिसते.

तामीळनाडू मध्ये वैदिक परंपरा किती खोल रुजली आहे ह्याची साक्ष देणारा आणखी एक शब्द आहे. जेथे लोकांना फुकट अन्न दिले जाते त्या ठिकाणाला तमीळींकडून चत्तिरम म्हटले जाते. उत्तरेकडे त्यासाठी सुसंगत शब्द धर्मशाळा आहे. (वैदिक धर्म आणि तामीळनाडू हे परिशिष्ट पहा.)

दक्षिणेकडील चत्तिरम ह्या शब्दाच्या उपयोगाचे स्पष्टीकरण तुम्ही कसे करू शकाल? तो "सत्रम्" ह्या शब्दावरून आलेला आहे जे एका वैदिक यज्ञाचे नाव आहे. इतर यज्ञामध्ये एक यजमान असतो जो सामुग्री आणि दक्षिणेचा खर्च करतो. पुरोहित त्याच्याकडून दक्षिणा घेतात आणि त्याच्या वतीने होम करतात. एखाद्या सत्रामध्ये सर्वच यजमान असतात. अगोदरच उल्लेख केल्याप्रमाणे कोणताही यज्ञ सर्व मानव जातीचे कल्याण करतो. जे त्यात सहभागी होतात त्यांची अंतःकरणे शुद्ध करतो - जे त्या विधीचे साक्षीदार असतात त्यांनाही लाभ होतो. पण पुण्य मुख्यतः यजमानाला मिळते.

एखाद्या सत्राचे वैशिष्ट्य असे असते की ते चालविणारे सर्वच पुरोहित यजमान असतात. हा एक प्रकारचा समाजवादी यज्ञ असतो, ज्यात पुण्याचे समान वाटप होते. ह्या प्रकारच्या यज्ञावरून, जेथे कोणीही येऊ शकतो आणि हक्क म्हणून भोजन करू शकतो असे ठिकाण किंवा व्यवस्थापनावरून हा सूचक शब्द उगम पावलेला आहे. एखाद्या चत्तिरम मध्ये जो अन्नदान करतो तो स्वतःला अन्न घेणाऱ्यांपेक्षा अधिक श्रेष्ठ समजत नाही. ह्यावर विश्वास ठेवायला कारण आहे की सत्रांना तमीळनाडूच्या परंपरेत विशेष स्थान आहे.

ऋत्विक ब्राह्मणांमध्ये तीन वर्ग आहेत. 'होता' (होतार) हा देवतांना आहुती स्वीकारण्याचे आवाहन करीत, देवतेच्या स्तुतीपर असलेले ऋग्वेदातील स्तोत्र /ऋचा म्हणतो. त्याला यज्ञात उच्च स्थान दिले गेल्यामुळे आजही जो उच्च पदावर असलेल्याचे दाखवतो त्याचे

बाबतीत, ''अरे, तो होता असल्याचे दाखवीत आहे' असे म्हटले जाते.

विविध देवतांच्या स्तोत्रांनी ऋग्वेद पूर्ण भरलेला आहे. यजुर्वेदात बहुतेक यज्ञक्रियांच्या पद्धती आणि त्याबाबतचे मार्गदर्शन आहे. जो ब्राह्मण यज्ञकर्माकडे लक्ष देतो त्याला ''अध्वर्यु'' म्हणतात. 'उद्‌गाता' देवतांना संतुष्ट करण्यासाठी सामवेदातील मंत्र सुरात म्हणतो. एक ब्राह्मण यज्ञकर्मावर पर्यवेक्षणाचे काम करतो त्याला 'ब्रह्मा' म्हटले जाते.

वेदांना स्वतःलाच ब्रह्म म्हटले जाते. म्हणून जो ते शिकतो (विद्यार्थी) त्याला ब्रह्मचारी म्हटले जाते. यज्ञातील पर्यवेक्षक, ब्रह्मा, त्याचे कार्य अथर्ववेदानुसार करतो. अशा प्रकारे 'होता', अध्वर्यु, उद्‌गाता आणि 'ब्रह्मा' हे यज्ञात चार वेदांचे प्रतिनिधित्व करतात. नंतरच्या काळात असे मत आले की 'ब्रह्मा' हा अथर्ववेदाच्या आणि 'होता', 'अध्वर्यु' आणि 'उद्‌गाता' हे अनुक्रमे ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद संबंधित आहेत. तसा तो (ब्रह्मा) संबंधित नाही. प्रत्यक्ष आचरणातही आपल्याला असे दिसते की यज्ञात भाग घेणारे हे पहिल्या तीन वेदांमध्ये प्रवीण असतात आणि अथर्ववेदात नसतात. ह्या कारणास्तव असा दृष्टिकोन ठेवला गेला की सोमयागापासून अश्वमेध यज्ञांपर्यंत सर्व यज्ञ हे ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेदाच्या आधाराने करायचे. (यज्ञविधीमध्ये 'ब्रह्मा' चे पर्यवेक्षणाचे कार्य फारच थोडे असते. यज्ञविधी चालू असताना अध्वर्युला त्याची वारंवार अनुज्ञा घ्यावी लागते. 'ओम्' असा उच्चार करून 'ब्रह्मा' ती अनुज्ञा देत असतो. सोमयाग यज्ञात त्याची भूमिका ह्याहून थोडी अधिक असते. ह्याबद्दलचे नियम अथर्ववेदात दिलेले आहेत. सोमयागामध्ये ब्रह्मा हा 'ब्राह्मणाचाम्सी' 'अग्निघर' आणि 'पोता' ह्या तीनही ऋत्विकांचा प्रमुख असतो. त्याचे कार्य अथर्ववेदात (१९-२०) मध्ये वर्णिलेले आहे.

यज्ञविधीतील चुका किंवा त्रुटी निदर्शनास आणणे व त्यासाठी प्रायश्चित्त किंवा परिमार्जन सांगणे हे 'ब्रह्मा' चे उत्तरदायित्व आहे.

अथर्ववेद स्वतःच म्हणतो की त्यानेच 'ब्रह्मा' ची स्थिती निश्चित केलेली आहे. त्याच्या गोपथ ब्राह्मणमध्ये म्हटले आहे की अन्य तीन वेदांकडून यज्ञविधी करता येणार नाही. त्यात असेही म्हटले आहे की अथर्ववेदी ब्राह्मणाशिवाय इतर कोणीही ब्रह्मा होऊ शकत नाही.

असे असून देखील ह्या ना त्या कारणासाठी आपस्तम्बसारख्या धर्मशास्त्राच्या लेखकांनी यज्ञविधीतून अथर्ववेदाला वगळले असून अन्य वेदांच्या ब्राह्मणांना यज्ञकर्मात सहभागी होण्याची अनुमती दिली. तथापि अथर्ववेदी ब्राह्मण आवश्यक नाहीत असे त्यांनी म्हटले नाही.

काही यज्ञ स्वतंत्रपणे अथर्ववेदात येतात. वाल्मीकीच्या रामायणानुसार इंद्रजिताने ह्या वेदात सांगितलेला निकुंभिला यज्ञ केला. इतर तीन वेदांचे विस्तृत प्रमाणात अनुसरण होते. जरी आपण रूढीने चार वेदांसंबंधी (चतुर्वेद) बोलत असलो तरी ऋक्, यजुर् आणि साम हे एकत्र

केले जातात आणि त्यांना त्रयी म्हटले जाते.

(सामवेदात तीन प्रकारच्या यज्ञांचा उल्लेख येतो : शांतिकम् शांतीसाठी, पौष्टिकम्, शक्तीसाठी आणि अभिचारिकम् शत्रूंना इजा करण्यासाठी.)

----

## प्रकरण २७

# चार वेद

''अनंताः वै वेदाः ।'' वेद अनंत आहेत. तथापि ऋषींनी आपल्यासाठी वेदांचा एक भाग प्रकट केला आहे पण तो आपले ह्या आणि पुढील जगातील कल्याण करण्यासाठी पुरेसा आहे. आपण ब्रह्मासारखी अनेक विश्वे बनविणार नाही की त्यासाठी आपल्याला सर्व वेदांचे ज्ञान व्हावे. ह्या जगात आपल्या कल्याणाची हमी देण्यासाठी जेवढे आवश्यक आहेत तेवढेच जाणून घेण्याची गरज आहे.

चार वेदांपैकी प्रत्येकात वेगवेगळे 'पाठ' आणि 'पाठभेद' किंवा 'पाठांतरे' आहेत. (विभिन्न पाठ, भाषांतरे, निराळे रुप) एकच संगीतरचना किंवा राग भिन्न भिन्न शैलीत गायली जाते. (एक संगीत घराणे किंवा एक संगीत शैली) उदाहरणार्थ एकच रचना किंवा राग, महावैद्यनाथ अय्यर, कोनेरीराजपुरम् वैद्यनाथ अय्यर आणि शरभ शास्त्री यांच्यासारख्यांच्या भिन्न शैलींत प्रकट केला जातो. (महावैद्यनाथ अय्यर (१८४४-१८९३) आणि कोनेरी राजपुरम वैद्यनाथ अय्यर (१८७८-१९२०) हे महान कर्नाटकी गायक, शरभ शास्त्री (१८७२-१९०४) हे प्रसिद्ध बासरीवादक होत.) काही शैलींमध्ये इतरांपेक्षा अधिक रचनेच्या सङ्गती (म्हणजे सुस्वर पंक्तींमधील बदल) असतात. त्याप्रमाणे काही पाठांमध्ये इतरांपेक्षा अधिक सूक्ते आहेत. मंत्रांच्या क्रमातही भेद असू शकेल.

प्रत्येक पाठांतर किंवा प्रत्येक भाषांतराला शाखा किंवा आवृत्ती म्हटले जाते. विविध शाखा ह्या अड्यार (मद्रास) मधील महान वटवृक्षासारख्या वैदिक वृक्षाच्या फांद्या आहेत. त्या लहान किंवा मोठ्या फांद्या ऋक्, यजुर, साम आणि अथर्व ह्या चार वेदांपैकी एखाद्या किंवा दुसऱ्या वेदाच्या असतात.

आधुनिक भारतविद्यातज्ज्ञांचा असा दृष्टिकोन आहे की ऋग्वेद प्रथम आला आणि नंतर यजुर्वेद आणि याच क्रमाने पुढचे वेद आले. आपल्या शास्त्रानुसार सर्व वेद शाश्वत / सनातन आहेत. एक वेद एका काळातील दुसऱ्याच्या अगोदर किंवा नंतर असे विधान करणे चुकीचे आहे. कारण निर्मिती बरोबरच मानवाकडे आलेल्या यज्ञाशी वेद निगडित आहेत. कोणत्याही शाखेच्या भागांचा संहिता, ब्राह्मण आणि आरण्यक यांचा काळ ठरविण्याबाबतही हाच मुद्दा मांडला जातो. वेदांचे असे साम्राज्य आहे की तेथे कोणत्याही संशोधनाला जागा नाही. ऋषींना भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ यांचे ज्ञान होते तरी त्यांनी काळाच्या पलीकडील स्थितीत राहून वेद शोधले असा आपला विश्वास असेल तर त्यांचा काळ ठरविण्याचा प्रयत्न करणे हे अर्थहीन आहे असे लक्षात येईल.

खुद्द ऋग्वेदातील अनेक उताऱ्यांमध्ये यजुर्वेद आणि सामवेदाचा उल्लेख आहे. ऋग्वेदात (दहावे मंडळ, ९० वे सूक्त) येणाऱ्या पुरुषसूक्तात इतर वेदांचा उल्लेख आहे. एखादा वेद दुसऱ्याच्या पूर्वी किंवा नंतरच्या काळातील असा नव्हता हे आपल्या लक्षात येत नाही काय?

मी विधान केले आहे की प्रत्येक शाखेत संहिता, ब्राह्मण आणि आरण्यक असतात. जेव्हा आपण वेदाध्ययनाबाबत बोलतो (वेद पाठांतर किंवा अभ्यास) तेव्हा आपल्या मनात सामान्यतः संहिता भाग असतो. ऋग्वेदाची संहिता असलेले पुस्तक जेव्हा आपण प्रसिद्ध करतो तेव्हाही त्याला आपण ऋग्वेद म्हणतो. संहिता खरोखरच शाखेचा पाया, श्वासोच्छ्वास असतो. संहिता या शब्दाचा अर्थ 'व्यवस्थित संकलित केलेले' असाच आहे.

ऋग्वेद संहिता ही सर्व काव्यरूपात आहे. नंतरच्या काळात ज्याला श्लोक म्हटले गेले ते वेदातील ऋक् होत. ऋक् म्हणजे स्तोत्र. ऋग्वेद संहिता ही निरनिराळ्या देवतांच्या स्तुतीपर स्तोत्रांनी पूर्ण भरलेली आहे. प्रत्येक ऋक् एक मंत्र असतो आणि एखाद्या देवतेच्या स्तुतीपर असलेल्या अनेक ऋकांचे एकत्र येऊन त्याचे एक स्तोत्र बनते.

ऋग्वेद म्हणजे ऋक् संहितेत १०,१७० ऋक् आणि १,०२८ सूक्ते आहेत. तो दहा मंडले किंवा आठ अष्टकांमध्ये विभागलेला आहे. (चारही वेदांच्या संहितेत एकूण २०,५०० मंत्र आहेत.) तो सूर्यसूक्तापासून सुरू होतो आणि त्याच देवतेच्या सूक्ताने समाप्त होतो. ह्याच कारणास्तव काहींना विश्वास वाटतो की वेदांचे, सूर्य पूजनाचे ग्रंथ म्हणून वर्णन केले पाहिजे. जर अग्नी हा आत्म्याचा प्रकाश (सत्च्या ज्ञानाचा प्रकाश) मानले तर ह्या मताशी आपणही सहमत होऊ. ऋग्वेदाच्या शेवटी असलेल्या सूक्तात जो श्लोक आहे तो कोणत्याही देशाच्या राष्ट्रगीतापेक्षा अधिक उच्च अर्थ असल्याचा उल्लेख केला पाहिजे : ती सर्व राष्ट्रातील सौहादासाठीची प्रार्थना आहे, खरे आंतरराष्ट्रीय राष्ट्रगीत आहे :

संगच्छध्वं संवदध्वं - सं वो मनांसि जानताम् देवाभागम् यथा पूर्वे संजाना उपासते.

ॐ संगच्छध्वं संवदध्वं
सं वो मनांसि जानताम्
देवाभागम् यथा पूर्वे
संजाना उपासते
समानो मंत्रः समितिस्समानि
समानं मनश्चित्तमेषम्
समानं मंत्रमभिमंत्रयेवः
समानेन वो हविषा जुहोमि
समानि व आकुतिः
समाना हृदयानि वः

समानमस्तु वो मनो 
यथावसुखहासति- ।।

(ह्याचा स्थूलमानाने मराठी अनुवाद असा) एक मन होवो अवघ्या मानवजातीचे. एक असो ध्येय सकळिकांचे. एक होवोत सर्वांची अंतःकरणे-प्रेमाने आणि एक ध्येय - एक मन असल्याने आम्ही सर्वजण सुखी होवोत - !

यजुस् हा शब्द 'यज्' म्हणजे आराधना करणे ह्या शब्दापासून आलेला आहे. ''यज्ञ'' शब्दाचेही तेच मूळ आहे. (आपण पूर्वी पाहिलेले आहे) मूळ आहे. जसे ऋक् म्हणजे स्तोत्र तसे यजुस् म्हणजे यज्ञाशी संबंधित असलेली पूजा. यज्ञ म्हणविल्या जाणाऱ्या धार्मिक कृत्यात ऋग्वेदातील स्तोत्रांचे व्यावहारिक उपयोजन हा यजुर्वेदाचा मुख्य हेतू आहे. यजुर्वेद, विधींच्या प्रत्यक्ष कृत्याचे वर्णन गद्यात करतो. जर ऋग्वेद देवतांचे मुखाने स्तवन करणे हा हेतू साध्य करतो तर यजुर्वेद तोच हेतू विधीद्वारे साध्य करतो. यजुर्वेदाचे दोन मोठ्या एकमेकांपासून भिन्न असलेल्या वेदांमध्ये : शुक्ल-यजुर्वेद आणि कृष्ण-यजुर्वेद असे विभाजन झाले म्हणून हा इतर वेदांपेक्षा वेगळा आहे असे म्हटले जाते. शुक्ल म्हणजे शुभ्र आणि कृष्ण म्हणजे काळा. शुक्ल-यजुर्वेदाच्या संहितेला वाजसेनीय संहिता म्हटले जाते. वाजसेनी हे सूर्यदेवाचे एक नाव आहे. सूर्यदेवाने ही संहिता याज्ञवल्क्याला शिकविली.

ह्यासंबंधी एक मोठी गोष्ट आहे पण मला ती थोडक्यात सांगू द्या. याज्ञवल्क्यापूर्वी यजुर्वेद अविभाजित ग्रंथ होता. याज्ञवल्क्य यजुर्वेद प्रथम वैशंपायनांकडून शिकले. नंतर त्या दोघांमध्ये काही गैरसमज निर्माण झाला आणि गुरूने शिष्याला त्याने त्याला जे शिकविले होते ते टाकून द्यायची आज्ञा दिली. याज्ञवल्क्यांनी तसे केले आणि ते सूर्यदेवाच्या आश्रयाला गेले. त्याने त्याला अनंत असलेल्या (वेद) ग्रंथात भर असा नवा वेद शिकविला. अशा प्रकारे आपल्याला वाजसेनीय किंवा शुक्ल यजुर्वेद मिळाला. वैशंपायनांकडून अगोदरच शिकविल्या गेलेल्या यजुर्वेदाला 'कृष्ण' नाव मिळाले, म्हणून कृष्ण-यजुर्वेद.

कृष्ण-यजुर्वेदात, संहिता आणि ब्राह्मणे पूर्णपणे भिन्न भाग नाहीत. संहितेतील मंत्रांना ब्राह्मणे ठिकठिकाणी जोडली आहेत.

ऋग्वेदाची महानता म्हणजे तो सर्व देवतांच्या स्तवनांनी भरलेला आहे. विद्वानांचे असे मत आहे की त्याशिवाय त्यात आपल्या जीवनासाठीची शिकवण आहे. विवाहविधी हे ह्या वेदातील त्या भागावर आधारलेले आहेत, जो सूर्याच्या कन्येच्या विवाहासंबंधी आहे. पुरूरवा आणि उर्वशी यांच्यातील संवादासारखे नाट्यमयता असलेले उतारे यात आहेत. नंतर कालिदासाने त्याच्या नाट्यकृतींपैकी विक्रमोर्वशीय ही (विक्रमोर्वशियम्) ह्या भागावर रचली. उषा (पहाटेची देवता) सूक्ते आणि तसेच यासारखे मंत्र हे विलक्षण उच्च काव्यगुण असल्याचे

सौंदर्यवादी विवेचक मानतात.



ऋग्वेदाला चारही वेदांमध्ये प्रथम स्थान दिले गेल्याने त्याला साहजिकच उच्च स्थान प्राप्त झाले आहे. तो म्हणजे यजुर्वेदातील कर्म आणि सामवेदातील गीते यांची कूस आहे.

यजुर्वेदाचे महत्त्व हे आहे की तो कर्मयोगाचा-कर्ममार्गाचा व्यवस्थित क्रम लावतो. कृष्ण-यजुर्वेदातील तैत्तिरीय संहिता दर्श-पूर्णमास, सोमयाग, वाजपेय, राजसूय, अश्वमेध यांसारख्या यज्ञांशी संबंधित आहे. (या पदांचे स्पष्टीकरण भाग १९ च्या प्रकरण ५ मध्ये केलेले आहे.) शिवाय त्यात ऋग्वेदात न आढळणारे स्तोत्रांसारखे अनेक मंत्र आहेत. उदाहरणार्थ, लोकप्रिय असलेल्या श्रीरुद्रातील मंत्र हे यजुर्वेदातील आहेत. ऋग्वेदात पाच 'पंचरुद्र' नावाची सूक्ते आहेत पण जेव्हा आपण श्री रूद्राचा उल्लेख करतो तेव्हा आपण त्वरित यजुर्वेदातील ह्या देवतेचा विचार करू लागतो. म्हणूनच अप्पय्या दीक्षितांसारखे थोर शैव यजुर्वेदी म्हणून न जन्मल्याबद्दल शोक करतात - ते सामवेदी होते. चार वेदांच्या अनुयायांमध्ये यजुर्वेदीचे वर्चस्व आहे. उत्तरेकडील बहुतेक (ब्राह्मण) शुक्ल-यजुर्वेदी आहेत, दक्षिणेकडील बहुतेक कृष्ण-यजुर्वेदी आहेत. यजुर्वेदी ज्या दिवशी उपाकर्म करतात त्यादिवशी सुटी दिली जाते. (आता तशी सुटी दिली जात नाही.) अशी सुटी ऋग्वेदी आणि सामवेदींसाठी नसते. याचे कारण यजुर्वेदी बहुसंख्य आहेत. ऋग्वेदातील पुरुषसूक्त थोड्या फार फरकाने यजुर्वेदात येते. हल्ली ते सामान्यतः यजुर्वेदीय स्तोत्र मानले जाते.

अद्वैतांसाठी यजुर्वेदाला विशेष महत्त्व आहे. तत्त्व आणि त्याचे स्पष्टीकरण यात सूत्र, भाष्य आणि वार्तिक असे तीन भाग असतात. सूत्र सूत्रमय पद्धतीने तत्त्व सांगते. भाष्य हे त्यावरचे निवेदन आणि वार्तिका त्या निवेदनाचे स्पष्टीकरण होय. वार्तिककार हा शब्द अद्वैतवाद्याना सुरेश्वराचार्यांची आठवण करून देतो. कोणत्या निवेदनावर किंवा भाष्यावर त्यांनी वार्तिक लिहिले ? शंकराचार्यांचे उपनिषदावरील भाष्य सूत्र समजले जाते. याशिवाय त्यांनी ब्रह्मसूत्रावरही भाष्य लिहिले. त्यांचे शिष्य सुरेश्वर यांनी त्यांच्या गुरूंच्या भाष्यावर वार्तिका लिहिली. ह्या कार्यात त्यांनी दहा उपनिषदांपैकी दोन निवडले ज्यावर शंकराचार्यांनी भाष्य लिहिले - तैत्तिरीय उपनिषद् आणि बृहदारण्यक उपनिषद्. हे दोन्ही अनुक्रमे कृष्ण आणि शुक्ल यजुर्वेदातील आहेत, याचा अर्थ दोन्ही यजुर्वेदातील आहेत. यजुर्वेदाचे आणखी एक वेगळेपण म्हणजे दशोपनिषदांपैकी - ईशावास्योपनिषद् आणि बृहदारण्यक उपनिषद् हे पहिले आणि शेवटचे उपनिषद् यातील आहेत.

'साम' म्हणजे जे मनाचा समतोल किंवा शांतता आणते ते. विरोधक किंवा शत्रूला तोंड देण्यासाठी चार प्रसिद्ध मार्ग आहेत : साम, दाम, भेद आणि दंड. पहिली पद्धत म्हणजे मन वळविण्याची आहे, शत्रूशी प्रेमाने मैत्री करणे. सामवेद आपल्याला दैवी शक्तींना, अगदी परमात्म्याशी सख्य करायला समर्थ बनवते. आपण एखाद्या व्यक्तीला सुखी कसे करतो ?

त्याची स्तुती करून. जर स्तुतिमाळला संगीत दिले आणि त्याचे गायन केले तर तो दुपटीने संतुष्ट होईल. ऋग्वेदातील अनेक मंत्र सामवेदात तालासह स्वरात म्हटले जातात. असे आपले सामगान असते. जेव्हा ऋचा उदात्त, अनुदात्त आणि स्वरित अशा स्वरभेदांनुसार म्हटल्या जातात. तेव्हा ठरावीक नियमानुसार संगीतबद्ध साम स्वरात म्हटल्या जातात. सात स्वरांवर आधारलेले आपले संगीताचे मूळ सामवेदात आहे. सर्व देवता सामगानाने संतुष्ट होतात. आपण होमात आहुती देऊनच नव्हे तर उद्गाता/पुरोहित स्वरात साम म्हणून देवताच्या कृपेचे लाभार्थी होतो. (सामवेद संहितेत ऋग्वेदाचा अर्चिका हा भाग आणि 'गान' म्हणून ओळखला जाणारा भाग आहे. 'गान' हे 'क्रमगान' 'आरण्यगान' आणि 'ऊदयगान' ह्या तीन विभागांत विभागित केलेले आहे.) सोमयज्ञात सोमवल्लीचा अर्क आहुती म्हणून दिला जातो. त्यात सामगान महत्त्वाचे असते.

जरी सामन ऋग्वेदातील मंत्र असले तरी ते देवतांना संतुष्ट करण्यास आणि आत्मिक उन्नयन करण्यास समर्थ आहेत कारण ते संगीतबद्ध केलेले असतात. हे सामवेदाचे वेगळेपण आहे. श्रीकृष्ण परमात्मा गीतेत म्हणतो : "वेदानां सामवेदोऽस्मि" (वेदांपैकी मी सामवेद आहे.) (वेदानां सामवेदोऽस्मि, देवानामास्मि वासवः । इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ।। ) (गीता- १०.२२) चांगल्याप्रमाणे वाईटासह परमेश्वर सर्वकाही आहे. तरी सुद्धा ज्यात त्याचा दिव्य गुण विशेष चमकतो अशा गोष्टीसंबंधी तो अर्जुनाशी बोलतो, त्यात तो सामवेदाचा उल्लेख करतो. ललिता-सहस्त्रनाम (ललिता देवीची एक सहस्त्र नावे) अंबेला सामगान-प्रिया असे नाव आहे. (जिला सामगानात आनंद मिळतो), तिला ऋग्वेद-प्रिया किंवा यजुर्वेद-प्रिया म्हटले नाही. श्यामशास्त्री त्यांच्या एका रचनेत मीनाक्षीचा सामगान-विनोदिनी असा उल्लेख करतात. (श्यामशास्त्री (१७६२-१८२७) हा चरणातिक संगीताचा महान वाग्गेयकार म्हणजे शब्द गीतकार होता. वाग्गेयकार केवळ गीतांची शब्दरचनाच करीत नाही तर तो त्याचे संगीतरूप व आशय निश्चित करतो. शिव अष्टोत्तरम् (शिव अष्टोत्तर-शतम्, शिवाची १०८ नावे) त्यात शिवाचे "साम-प्रियाय नमः" असे पूजन केले जाते. तेवारम, एखादा जसा छांदोग्य साम म्हणतो तसा शिवाची स्तुती करतो. (छांदोग्य-साम ओड्म् वायान). अप्पय्या दीक्षित यांनी ईश्वर किंवा शिव, अंबा आणि विष्णू या रत्न-त्रयीने (तीन रत्ने) सर्वोच्च पातळी व्यापलेली असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. ह्या तिघांचा सामवेदाशी विशेष संबंध आहे.

अथर्वण म्हणजे पुरोहित, धर्मगुरू. ह्या नावाचा एक ऋषी होता. अथर्वण ऋषीने जो वेद प्रकट केला तो अथर्ववेद. ह्यात अशा मंत्रांचा समावेश आहे की त्यांच्यामुळे एखादे दुर्दैव किंवा अचानक आलेले अरिष्ट आपण दूर ठेवू शकतो आणि त्याच्या शत्रूचा नाश करू शकतो. अथर्ववेद हा गद्य आणि पद्य यांचे मिश्रण आहे. अथर्ववेदातील मंत्रांप्रमाणे इतर वेदांतील मंत्रही

तोच हेतू साध्य करतात. ह्याचे वैशिष्ट्य म्हणजे इतर वेदांमध्ये उल्लेख नसलेल्या देवतांचे संदर्भ ह्यात आहेत आणि ह्यातील मंत्र भयानक प्रेतात्म्यांना उद्देशून आहेत. ज्याला मांत्रिक म्हटले जाते त्यांचा उगम ह्या वेदात आहे.

पण हेही सांगायला पाहिजे की ह्यात महान सत्याविषयी सांगणारे मंत्रही आहेत. त्यात पृथ्वी-सूक्तः पृथ्वीचे स्तोत्र आहे. जे ह्या ग्रहाला त्यावरील सर्व सजीवांसह श्रेष्ठत्व देते.

यज्ञप्रसंगी देखरेख करणारा ब्रह्मा हा अथर्ववेदाचे प्रतिनिधित्व करणारा असतो हे उल्लेखनीय आहे. अथर्ववेदाची संहिता उत्तरेकडे क्वचित म्हटली जाते आणि संपूर्ण दक्षिणेकडे अजिबात ऐकली जात नाही. आपण लक्षात ठेवले पाहिजे की दहा महत्त्वाच्या उपनिषदांपैकी तीन ह्या वेदातील आहेत - प्रश्न, मुंडक आणि मांडुक्य. असे मानले जाते की जे मोक्ष संपादू इच्छितात त्यांना त्यांचे ध्येय साध्य करण्यासाठी मांडुक्य उपनिषद सोडून कशाचीही गरज नाही.

शिलालेखांवरून आपल्याला समजते की काही शतकांपूर्वीच्या काळापर्यंत अथर्ववेदाच्या अनुयायी वर्ग होता. वैदिक संपद्रायांविषयीची माहिती, तिण्डीवनम जवळील पेरणी, एण्णाईरम आणि कांचीपुरम शेजारील वालाजवाद जवळील एक ठिकाण इ. ठिकाणी आढळणाऱ्या शिलालेखांतून मिळते. (ही ठिकाणे तामिळनाडूत आहेत.) नंतरच्या चोल राजांच्या कारकिर्दीत तमीळ प्रदेशात अथर्ववेदाचे अध्ययन केले जात होते.

ओरिसामध्ये ब्राह्मणाच्या अठरा शाखा आहेत. त्यांपैकी एक अथर्वणिक, म्हणजे अथर्ववेदी आहे. जरी त्यांची संख्या कमी असली तरी सौराष्ट्रासारख्या गुजरातच्या काही भागात आणि कोसल (उत्तर प्रदेशात) येथे आजही अथर्ववेदी आढळतात. (परमसद्‌गुरू आणि श्री जयेंद्र सरस्वती स्वामी ह्यांच्या प्रयासामुळे अथर्ववेदाच्या अभ्यासाचे दक्षिणेत पुनरुज्जीवन झाले आहे. तामिळनाडूतील विद्यार्थी ह्याचसाठी गुजरातमधील सिनोर येथे पाठविले गेले आहेत.)

गायत्री हा मंत्रांचा मंत्र आहे आणि तो तीनही वेदांचे सार आहे. याचा अर्थ असा की यात अथर्ववेद वगळला आहे. एका दृष्टिकोनानुसार एखाद्या ब्रह्मचाऱ्याला अथर्ववेद शिकण्याला प्रारंभ करण्यापूर्वी पुन्हा उपनयन करावे लागते. सामान्यतः एखाद्या मुलाला ब्रह्मोपदेश विधींच्या वेळी जो गायत्री मंत्र दिला जातो त्याला ''त्रिपाद गायत्री'' म्हटले जाते - कारण त्याला तीन पदे किंवा तीन पाय असतात. प्रत्येक पदाने एका वेदाचे आवश्यक ते चैतन्य व्यापलेले असते. अथर्ववेदाला स्वतंत्र गायत्री आहे आणि इतर वेदांच्या लोकांना जर हा वेद शिकायचा असेल तर त्यांना त्या वेदातील सूचना प्राप्त करण्यासाठी दुसऱ्यांदा उपनयन करावे लागते. पहिल्या तीन वेदांच्या अनुयायांना केवळ एकच गायत्री आहे आणि जे एका वेदाचे आहेत त्यांना इतर दोन वेद शिकायचे असतील तर त्यांना पुन्हा उपनयन करावे लागत नाही.

-----

## प्रकरण २८

# एकमेव सत्याचा शोध

अनुयायांमध्ये तरी भेद असले तरी सर्व वेदांचे एकच सामाईक ध्येय आहे. हे ध्येय कोणते? ते म्हणजे संपूर्ण विश्व आणि त्यात राहणारे सर्व सजीव, आपल्यापैकी प्रत्येकाच्या आत्म्याचे उन्नयन आणि त्याचे अंतिम सत्याशी शाश्वत ऐक्य व्हावे.

आपण वेदांचा आणखी काही कारणांसाठी अभिमान बाळगू शकतो. ते एकच एक मार्ग दाखवत नाहीत आणि असे जाहीर करीत नाहीत की ''हा एकच मार्ग आहे.'' किंवा परम पुरुषासंबंधीच्या त्यांच्या दृष्टिकोनातून ते ''हाच एक देव आहे'' असेही निग्रहाने म्हणत नाहीत. त्याऐवजी ते असे सांगतात की एखादा कोणत्याही मार्गाला श्रद्धेने चिकटून राहिला किंवा भक्तीने कोणत्याही देवतेचे पूजन करीत राहिला तरी तो सत्याच्या दिशेने जाईल. इतर कोणत्याही धर्माचा ग्रंथ मोक्षाच्या अनेक मार्गांसबंधी असे सांगत नाही. उलट, त्यांच्यापैकी प्रत्येक निग्रहाने असे सांगतो की केवळ त्यानेच दाखविलेला मार्ग मुक्तीकडे नेईल. (साल्वेशनः 'मुक्ती' या संकल्पनेचा पर्यायी शब्द, बहुधा ख्रिश्चन धर्मीयात अधिक प्रचलित आहे.) केवळ वेदच असा दृष्टिकोन मांडतात की एक आणि एकमेव सत्याच्या शोधासाठी निरनिराळे लोक निरनिराळे मार्ग घेऊ शकतात.

------

## प्रकरण २९

# ब्राह्मण, आरण्यक

आतापावेतो वेदांवर बोलताना मी प्रत्येक शाखेच्या संहिता भागाविषयी बोललो आहे. आपण पाहिले आहे की संहिता ह्या वेदांचे मुख्य भाग आहेत. त्याशिवाय प्रत्येक शाखेला एक ब्राह्मण आणि आरण्यक असते.

ब्राह्मण हे करावयाचे विविध विधी-कर्म यांची योजना करतात आणि त्यांची रीत स्पष्ट करतात. ते संहितेमध्ये येणाऱ्या मंत्रांच्या शब्दांचे विवरण करतात. आहुती द्यायच्या वेळेस ते शब्द कसे समजून घ्यायचे ते सांगतात. ब्राह्मणे यज्ञकर्माचे मार्गदर्शन करतात.

'आरण्यक' हा शब्द अरण्य ह्यापासून आलेला आहे. तुम्ही दण्डकारण्य आणि वेदारण्य अशा स्थानांविषयी ऐकले असेल. अरण्य म्हणजे वन. संहितेत किंवा ब्राह्मणात कशातही, एखाद्याने वनात जाऊन रहाण्यास उद्युक्त केलेले नाही. खेड्यातच राहून गृहस्थाने यज्ञासारखे वैदिक विधी करायचे. अशा विधींनी त्याचे मन शुद्ध झाले की तो एखाद्या विरागी सारखा, स्वतःला चिंतनात मग्न ठेवण्यासाठी वनात जातो. हे सर्व वानप्रस्थाश्रमाच्या अवस्थेसाठी पात्र होण्यासाठी अंतरंग शुद्ध आणि परिपक्व होण्यासाठी यज्ञासारखे वैदिक विधी करायचे असतात.

आरण्यके एखाद्याला जीवनातील तपस्वासारख्या एका अवस्थेसाठी तयार करतात. ते संहितेतील मंत्रातील मूळच्या संकल्पना आणि ब्राह्मणांमध्ये आलेले तपशीलवार विधी विशद करतात. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर ते वेदात लपलेला अर्थ, त्यांचे रूपकात्मक भाग स्पष्ट करतात. खरोखरच ते आपल्या ग्रंथातील गूढ संदेशावर प्रकाश टाकतात. आरण्यकाच्या दृष्टीने यज्ञकृत्यापेक्षा त्यातील सखोल अर्थ आणि महत्त्व यांची जाणीव महत्त्वाची होय. आधुनिक विद्वानांच्या मतानुसार वनातील आश्रमवासीयांनी केलेल्या आध्यात्मिक शोधाचे रूपकात्मक उतारे यांचा समावेश आरण्यकामध्ये आहे.

बृहदारण्यक उपनिषद् हे नाव दोन्ही आरण्यक आणि उपनिषद असल्याचे सुचविते आणि ते अश्वमेध यज्ञाच्या तत्त्वज्ञानात्मक विवेचनाने सुरू होते.

-----

## प्रकरण ३०

# उपनिषदे

उपनिषदे आरण्यकाच्या शेवटी येतात. संहिता जर वृक्ष असेल तर, ब्राह्मण हे फूल आणि आरण्यक हे फळ (म्हणजे अपरिपक्व अवस्थेतील), उपनिषदे ही पक्व-अंतिम फळे (फळ याचा अर्थ वृक्षाचे फळ. तसेच कोणतीही कृती किंवा प्रयत्नाचा परिणाम किंवा पुरस्कार म्हणून प्राप्त झालेला लाभ.) आहेत. उपनिषदे हे साधकाला जीवात्मा आणि परमात्मा यांतील अद्वैत जाणण्याची माध्यमे आहेत. संहिता आणि आरण्यक यांचा हेतू आपल्याला ज्ञानमार्गाला नेण्याचा असतो. उपनिषदांमध्ये सर्वत्र अनेक देवतांचा उल्लेख असला तरी ह्या ग्रंथांचा हेतू अंतिम सत्याचा शोध आणि अशी अवस्था प्राप्त करणे हाच आहे, की ज्या अवस्थेत आपण स्वतः कर्मत्याग करण्याइतके प्रौढ आणि प्रगल्भ होतो. ह्यावरच वेदांचे कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड यांच्यात-धार्मिक कामे आणि ज्ञानाशी (अज्ञान दूर होणे) संबंधित भाग विभागलेले आहेत. त्यांना अनुक्रमे पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा असेही म्हटले जाते.

महान ऋषी जैमिनी यांच्या कर्मकाण्डाच्या चिकित्सेवर आधारलेल्या शास्त्राला पूर्वमीमांसा म्हटले जाते. वैदिक विधी आणि कर्तव्ये यांनी बनलेले कर्मकाण्ड हे स्वतःच त्या ग्रंथाचे फल आहे; असा त्यांचा उपदेश आहे. त्याचप्रमाणे व्यासांनी त्यांच्या ब्रह्मसूत्रात ज्ञानकाण्डाचा शोध घेतला आणि ते या निष्कर्षाप्रत आले की वेदांच्या मूलभूत हेतूचे ते प्रतिनिधित्व करतात. उपनिषदिक ज्ञानकाण्ड कर्मकाण्डापेक्षा तुलनेने लहान आहे. जैमिनीसूत्रात एक हजार भाग आहेत. (सहस्राधिकारिणी), तर व्यासांच्या ब्रह्मसूत्रात फक्त १९२ भाग आहेत. एखाद्या झाडाची पाने ही त्याच्या फुले आणि फळांपेक्षा खूप जास्त असतात, तसेच वैदिक वृक्षाच्या बाबतीत कर्मकाण्ड हे ज्ञानकाण्डापेक्षा खूप मोठे आहे.

इतर देशांमध्ये तत्त्वज्ञ बौद्धिक पातळीवर सत्य समजून घेण्याचा प्रयत्न करतात. उपनिषदाचा शोध वेगळा आहे, मनाने आणि बुद्धीने आकलन झालेले सत्य आतून समजून घेणे हा त्याचा शोध आहे. हलवा गोड असतो हे माहीत असणे पुरेसे आहे का ? तो खाऊन तुम्ही त्याचा गोडवा अनुभवायला हवा. इतर तत्त्वज्ञानाच्या प्रणालीपेक्षा उपनिषदे वेगळी कशी आहेत ? त्यांच्यात मंत्र, पवित्र शब्द असतात आणि त्यांचे ध्वनी उर्जेने भरलेले असतात. उपनिषदांकडून विचारार्थ पुढे ठेवलेली सत्ये ही ऊर्जा अंतस्थ सत्यात रूपांतर करते. इतर देशांतील तत्त्वज्ञानाच्या प्रणाली बौद्धिक शोधाच्या पलीकडे जात नाहीत. वेदांतल्या कर्मकाण्डामध्ये साधकासाठी शिस्तीवर विसंबून सोपवलेली कर्मे आणि कर्तव्ये आणि त्याला शुद्ध करण्यासाठी एक जीवनमार्ग आहे. असे जीवन कंठल्यानंतर आणि शेवटी सर्व कर्मांचा, वैदिक कर्मांचाही त्याग करून तो उपनिषदातील सत्याचे चिंतन करतो. निव्वळ बौद्धिक

आकलनाऐवजी ही सत्ये वास्तव बनतील. जीवात्मा आणि परमात्मा यांच्यात काहीच फरक नाही हेच सर्वोच्च सत्य आहे.



ही सर्वोच्च स्थिती प्राप्त करणे की ज्यात जीवात्मा पूर्णपणे ब्रह्ममध्ये विलीन होतो. कर्मांचा त्याग करून तो संन्यासी होतो, त्यामुळे त्याला परिपक्वता येते. जेव्हा तो दीक्षा घेतो तेव्हा त्याला चार मंत्र, चार (तत्त्वे) महावाक्ये शिकविली जातात. ती चार जीवात्म्यांचा ब्रह्माशी संबंध प्रकट करतात. ह्या महावाक्याचे निदिध्यास नावाच्या पद्धतीने चिंतन केले तर साधक जीवात्मा आणि ब्रह्म यांचे ऐक्य जाणण्याच्या स्थितीत येईल. ही चार महावाक्ये चार निरनिराळ्या उपनिषदांत येतात. अनेक विधी असतात जे तुम्हाला करायचे असतात, अनेक प्रार्थना तुम्हाला म्हणायच्या असतात आणि अनेक आज्ञा तुम्हाला पाळावयाच्या असतात - ह्या सर्व संहिता आणि ब्राह्मणानुसार असतात. जेव्हा उच्च आदर्श, माणसाचे सर्वोच्च ध्येय मिळविण्याची वेळ येते तेव्हा तुम्हाला उपनिषदे आणि त्यातील महावाक्ये यांच्याशिवाय पर्याय नसतो.

''ज्ञान हे ईश्वर आहे हे जाणणे ब्रह्म'' (प्रज्ञान्म् ब्रह्म) : हे महावाक्य ऋग्वेदाच्या ऐतरेय उपनिषदात येते. ''मी ब्रह्म आहे'' (अहं ब्रह्मास्मि) हे महावाक्य यजुर्वेदाच्या बृहदारण्यक उपनिषदामध्ये आहे. ''ते तू आहेस'' किंवा परमात्मा आणि तू, एक आणि एकसारखेच आहात'' (तत्त्वमसि) हे सामवेदाच्या छांदोग्य उपनिषदातील आहे. चौथे महावाक्य, ''हा जीवात्मा ब्रह्म आहे''. (अयमात्मा ब्रह्म) हे अथर्ववेदाच्या माण्डुक्य उपनिषदातील आहे.

आचार्य त्यांच्या शिकवणीचे सार असलेल्या सोपान पंचकामध्ये, संहिता (वेदांची) पठण करण्यासाठी, ब्राह्मणांनी नेमून दिलेली कर्मे करण्यासाठी, शेवटी ब्रह्माशी एक होण्याच्या हेतूने दीक्षा घेऊन महावाक्यांवर चिंतन करण्यासाठी उद्युक्त करतात.

उपनिषदांमध्ये वेदांना त्यांचे अंतिम प्रकटीकरण आढळते. उपनिषदांना 'वेदान्त' म्हटले जाते. ते दोन प्रकारे वेदांचा अंतिम भाग बनतात. प्रत्येक भागात प्रथम संहिता, नंतर ब्राह्मण, त्याच्यानंतर आरण्यक आणि शेवटी उपनिषद येते. उपनिषदे वेदांचे अर्थ आणि हेतू यांवर प्रकाश टाकतात आणि ते त्या ग्रंथाचे एकापेक्षा अधिक अर्थाने प्रतिनिधित्व करतात. त्यांचा ग्रांथिक भाग वेदांचा शेवटचा भाग आहे, त्यांचा अर्थ, त्यांच्याच अंतिम सत्याचे प्रतिनिधित्व करतात. एखाद्या खेड्यात किंवा शहरात एक मंदिर असते; त्याला गोपुर असते; त्या गोपुराला एक शिखर असते. उपनिषदे ही आपल्या तत्त्वज्ञानाच्या (आध्यात्मिक) प्रणालीचे शिखर असतात.

'उप-नि-षद्' म्हणजे 'जवळ बसणे'. उपनिषदे ही गुरूने शिष्याला आपल्या जवळ

बसवून (त्याच्या पायाशी बसवून) दिलेले उपदेश आहेत. "ते जे एखाद्याला ब्रह्माकडे नेते" असा अर्थसुद्धा तुम्ही घेऊ शकता. उपनयनाचा दोन प्रकारे अर्थ लावता येईल : मुलाला गुरूकडे नेणे; किंवा त्याला ब्रह्माकडे नेणे" त्याचप्रमाणे उपनिषद हा शब्द दोन अर्थांने घेता येईल.

एखादा विद्यार्थी शिक्षकापाशी बसून शिक्षण घेतो म्हणजे 'रहस्य' (गुप्त गोष्ट किंवा गूढ) त्याच्याकडे स्वाधीन केले जाते. असे ज्ञान, जो पुरेसा परिपक्व नाही आणि जो त्यांचे मोल हृदयात जतन करीत नाही त्याला देणे अपेक्षित नसते. म्हणून जेथे सूक्ष्म आणि गूढ सत्ये विशद केलेली असतात असे शब्द उपनिषदांमध्ये आढळतात : "हे उपनिषत आहे. हे उपनिषत् आहे." वेदांचे मर्म म्हणून मानले जाते त्याला 'रहस्य' म्हटले जाते. उपनिषदांमध्ये उपनिषत् हा शब्द त्याच अर्थाने येतो.

-----

# प्रकरण ३१

## ब्रह्मसूत्र

मी म्हटले की प्रत्येक तत्त्वज्ञानाला किंवा प्रणालीला एक सूत्र (सूत्रमय विधाने असलेले ग्रंथ), भाष्य आणि वार्तिक असते. शंकराचार्य, रामानुज, मध्व, श्रीकण्ठ (शैव सिद्धान्ताचे आचार्य) यांच्या प्रणाली वेदाच्या आहेत. हे सर्व आचार्य त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या समर्थनार्थ वेदांचा अधिकार उदाहरण म्हणून पुढे ठेवतात आणि त्यांच्या भिन्न तत्त्वज्ञानाच्या आकलनानुसार त्यांनी भाष्यासाठी तीच दहा उपनिषदे निवडली आहेत. उपनिषदे सूत्ररूपात नाहीत तरी ती वेदान्तिक प्रणालीनुसार सूत्रांची जागा (शक्ती) घेणारी मानले पाहिजे.

सूत्र कसे समजायला हवे? त्याने सत्य अतिशय संक्षिप्त रूपात सांगितले पाहिजे. जे कमीतकमी शब्दांमध्ये एखादी कल्पना किंवा सत्य प्रकट करते ते सूत्र होय. ह्या व्याख्येनुसार उपनिषदांना सूत्रे म्हणता येणार नाही. तथापि, सर्व वैदांतिक शाखांना सूत्रांच्या रूपाने एक पायाभूत ग्रंथ असतो. हा ग्रंथ म्हणजे ब्रह्मसूत्र :

तत्त्वज्ञानाच्या विविध संप्रदायांनुसार भाष्य असलेल्या ब्रह्मसूत्रात व्यासांनी प्रमुख दहा उपनिषदांवरील भाष्य अतिशय सूत्रबद्ध रूपात सादर केले. ते बदरी वृक्षाखाली राहत असल्याने त्यांना बादरायण म्हटले गेले आणि त्यांचा ग्रंथ बादरायण -सूत्र म्हणून प्रसिद्ध झाला. मनुष्य काय आणि कोण आहे (जीवात्मा) ? ज्यात तो राहतो त्या जगाचे (जगत्) स्वरूप काय ? ह्या सर्वामागे कोणते सत्य आहे ? सर्व वैदान्तिक संप्रदायांचा पायाभूत ग्रंथ असलेले 'ब्रह्मसूत्र' ह्या सर्व प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घेते. व्यास त्यांच्या ग्रंथात त्यांचे स्वतःचे दृष्टिकोन पुढे ठेवीत नाहीत. ते हे सर्व उपनिषदांनी अगोदरच केलेल्या वेदान्ताच्या शास्त्राचा सूक्ष्म अभ्यास करण्यासाठी करतात. वेदांचा नंतरचा भाग असलेल्या उपनिषदांचा हा शोध असल्याने ब्रह्मसूत्राला उत्तरमीमांसा म्हटले आहे.

ब्रह्मसूत्रात ५५५ सूत्रे आहेत, त्यांचे, प्रत्येकात चार पदे असलेल्या चार प्रकरणांत विभाजन झाले आहे. एकूण १९२ भाग किंवा अधिकरणे आहेत. ब्रह्मसूत्राला भिक्षू-सूत्र म्हणतात, कारण त्यात साधकांचे अंतिम ध्येय असलेल्या संन्यासाचा विचार होतो. ते सर्व शरीरातील जीवात्मा संबंधी असल्याने त्याला 'शारीरक' असेही नाव आहे.

सूत्र याचा शब्दशः अर्थ दोर किंवा दोरा. विवाहात वधूकडून परिधान केल्या जाणाऱ्या मंगळ-सूत्रात हा शब्द येतो. दोरा किंवा दोरी ह्या शब्दाचा अर्थ मनात ठेवून आमच्या आचार्यांनी त्यांच्या भाष्यात त्या शब्दावर कोटी केली आहे : ''वेदान्त-वाक्य-कुसुम-ग्रथनार्थवत्-सूत्राणाम्''. वेदवृक्ष म्हटल्या जाणाऱ्या वृक्षाची फुले असलेली उपनिषदे सर्व

पृथ्वीवर विखुरलेली आहेत, आपण त्यांचा हार करण्यासाठी ती कशी गोळा करू शकतो ? आपले आचार्य म्हणतात की 'फुले असलेली उपनिषदे ब्रह्मसूत्रात हार बनविण्यासाठी एकत्र गुंफलेली आहेत'.

सर्व हिंदुतत्त्वज्ञानप्रणाली ब्रह्मसूत्रावर आधारलेल्या आहेत, पण ब्रह्मसूत्र स्वतःच उपनिषदांवर आधारलेले आहे. म्हणूनच सर्व विचारमंथन करणाऱ्या वैदिक संप्रदायांचे ''उपनिषदिक प्रणाली' असे वर्णन करणे रूढ झाले आहे. वेदान्त असे म्हणत पाश्चिमात्य जेव्हा आपल्या तत्त्वज्ञानाची स्तुती करतात तेव्हा त्यांच्या मनात उपनिषदेच असतात. जर एखादा माणूस ह्या जगातील क्षुल्लक आनंदापासून दूर वळतो आणि ज्ञानासंबंधी बोलतो, तेव्हा लोक त्याला म्हणतात, ''अरे, तू वेदान्त सांगतोस काय ?

वेद जर मूर्तिमंत पुरुष मानले तर उपनिषदे ही त्याचे मस्तक किंवा मुकुट असतील. म्हणून ह्या ग्रंथांना 'श्रुति-शिरस्' म्हटले जाते.

-----

# वेद आणि वेदान्त हे एकमेकांच्या विरुद्ध आहेत काय?

वेदांच्या कर्मकाण्डात उल्लेखलेले विधी त्याच ग्रंथाचा भाग असलेल्या ज्ञानकाण्डात नाकारलेले आहेत. कर्मकाण्ड तुम्हाला वेगवेगळ्या देवतांची पूजा करावयास सांगतात आणि त्यासाठी नियम घालून देतात, उपनिषदांतून आलेले ज्ञानकाण्ड देवता पूजकाचा पशूपेक्षा अधिक चांगला नसलेला, मंदबुद्धी म्हणून उपहास करते.

वेदांचा नंतरचा भाग पूर्वीच्या भागाचे खंडन करतो हे विचित्र वाटते. पहिला भाग पूर्णतः कर्माशी संबंधित आहे तर दुसरा किंवा शेवटचा भाग पूर्णतः ज्ञानाशी संबंधित आहे. ह्या फरकामुळेच लोकांनी ग्रंथाचे दोन भाग केले आहेत : वेद (पहिला भाग) कर्मकाण्डासाठी आणि उपनिषदे (वेदान्त) ज्ञानकाण्डासाठी.

गीतेमध्ये भगवान वेदान्त शिकवितात आणि त्यातच ते कर्मकाण्डाला फटकारतात. असे मानले जाते की बुद्ध आणि महावीर वेदांवर प्रथम हल्ला करणारे होते. तसे ते नाही. ह्या दोन धार्मिक नेत्यांच्या फार पूर्वीच श्रीकृष्ण परमात्मा वेदांच्या विरुद्ध बोललेले आहेत. गीतेत ते एका ठिकाणी अर्जुनाला सांगतात : ''वेद हे सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांशी निगडित आहेत. तू ह्या गुणांच्या पलीकडे जायला हवेस. वैदिक विधींना चिकटून राहणारे वासनेमुळे स्वर्गप्राप्तीची इच्छा बाळगतात आणि सौख्य आणि भौतिक उत्कर्षाचा विचार करीत बसतात. ते पुन्हा पुन्हा जन्म घेतात आणि त्यांचे मन कधीही समाधीत स्थित होत नाही.'' (यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ।। कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ।। भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ।। त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन । निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ।। भ.गी. २-४२ ते ४५) दुसऱ्या एका ठिकाणी ते म्हणतात की ''मी वेदांकडून जाणला जाऊ शकत नाही, यज्ञामुळे नाही, खूप अभ्यासानेही नाही''. (न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्नच क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः । एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ।। भ.गी. ११.५८.)

आत्तापर्यंत मी वेद हे सर्व धर्मांचा उगम आहेत असे जे बोललो त्याचे हे (श्रीकृष्णाचे सांगणे) खंडन करीत नाही का?

काही विचारानिशी आपल्या लक्षात येईल की वस्तुतः ह्यात विरोध नाही. आपल्या सद्य स्थितीत, तीन गुणांच्या थोडे तरी पलीकडे जाणे आणि उपनिषदात सांगितलेली जीवात्म्याची सत्य स्थिती जाणणे आपल्याला शक्य होईल काय? काही अंशाने आपल्याला ह्या

स्थितीकडे नेणे हा वैदिक विधींचा हेतू आहे. हे जग सत्य आहे असा आपला जोवर विश्वास आहे तोवर आपण त्यांच्या कृपेने सौख्य प्राप्त होण्यासाठी देवतांचे पूजन करतो आणि हे जग जे आपण सत्य समजतो त्याचाही अशा पूजनाने लाभ होतो. देवता सत्य आहेत असे समजून आपण त्यांना मदत करतो आणि त्या मोबदल्यात त्यांच्याकडून आपल्याला मदत केली जाते. ह्या पृथ्वीवर सुखाने राहताना आपण स्वर्गात जाण्याची आणि स्वर्गातील सुख उपभोगायची इच्छा बाळगतो. ते ठीक आहे. पण आपण जर ह्या पायरीवर थांबलो तर आपण आपल्या सर्वोच्च ध्येयावरची आपली नजर गमावल्यासारखे होणार नाही का ? परमात्म्याशी एकरूप होणे हे आपले ध्येय, उद्दिष्ट नाही का ? ह्याकडे दुर्लक्ष करणे आणि ऐहिक सुखाला लटकून राहणे, हा मूर्खपणा नाही का ?

आपल्या ह्या अप्रगल्भ स्थितीत हे जग असत्य असल्याचे मानणे शक्य नाही. हे जाणून वेद आपल्याला जगाच्या सुखासाठी हे विधी देतात. निराकार परमात्म्यापासून भिन्न नसलेले आपण आपल्या अपूर्णतेमुळे समर्पण करण्यास असमर्थ आहोत. म्हणून वेदांनी एक पद्धत तयार केली; जीत अनेक देवतांची आराधना केली जाते. काळाच्या ओघात आपण असे विधी करीत असता आणि देवतांचे पूजन करीत असता, पुढील सुज्ञपणा आणि प्रकाशमानता असलेल्या अवस्थेत, की जिच्यात हे जग असत्य वाटेल आणि विधी हे अनावश्यक वाटतील अशा स्थितीकडे जाण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. अनेक देवतांचे पूजन करण्यापेक्षा आपण अशा स्थितीला पोहोचले पाहिजे की जिच्यात आपले परमात्म्यात विसर्जन करण्याशिवाय आपल्याला अस्तित्व नाही हे आपण जाणू. आपण वैदिक धार्मिक विधी अशा जाणिवेने केले पाहिजेत की ते आपले मन शुद्ध करून आणि एकतत्त्वानिष्ठ करून आपल्याला त्या उच्च स्थितीकडे जाण्यासाठी तयार करतील.

जर आपण विश्वाचे सुख ह्या एकमेव हेतूने हे विधी केले आणि यज्ञ करीत स्वर्गस्थांशी देवाणघेवाण करीत राहिलो (त्यांना आहुती देऊन आणि त्याबदल्यात त्यांच्याकडून लाभ मिळवीत) तर आपण त्या सत्‌च्या कधीही सन्मुख होणार नाही. जरी आपण स्वर्गात गेलो तरी आपल्याला आत्मज्ञान होणार नाही. आपला स्वर्गातील वास आपण येथे मिळविलेल्या पुण्याच्या प्रमाणात असतो आणि तो कायम नसतो. कधी ना कधी आपल्याला ह्या जगाकडे परतावे लागते आणि आईच्या गर्भात राहावे लागते. वेदप्रणित धार्मिक पूजन आणि विधी हे काही प्रमाणात आपला सध्याची मनाची अप्रगल्भ स्थिती ठीक करणे होय. पण त्यांचा खरा हेतू, आपल्याला ह्या अप्रगल्भ स्थितीकडून पुढे नेणे आणि अंतःकरणात प्रकाश पसरविणे होय. धार्मिक विधींच्या पुढे जाण्याचे टाळणे हे चुकीचे होईल.

प्रथमतः वैदिक विधी करण्यास त्वरित नकार देणे हे योग्य नाही : तसेच ते सोडून देण्यास नकार देणे हेही योग्य होणार नाही. हल्ली लोक ह्या विधींच्या विरुद्ध आहेत. ते

उद्‌गारतात, ''काय ? कोणाला यज्ञ करायचे आहेत ? आम्ही वेद का म्हणावेत ? चला, सरळ उपनिषदांकडे जाऊ या.'' काहीजण केवळ बौद्धिक आकलनावरून उपनिषदासंबंधी वक्तृत्वपूर्ण बोलतील. पण त्यांपैकी कोणालाही वेदांनी मांडलेला अंतरंगातील अनुभव नसतो आणि खऱ्या आत्मज्ञानाने उच्च अवस्थेला पोहोचलेले दिसत नाहीत. ह्याचे कारण असे आहे की धार्मिक विधी करून त्यांनी उच्च प्रकारची दृष्टी प्राप्त करून घेतलेली नाही. जर हे एका अर्थाने चुकीचे असेल तर कर्मापासून निघून ज्ञानमार्गाकडे जाण्यास नकार देणे हेही तितके समर्थनीय ठरणार नाही.

जर एखाद्याला बी. ए. पदवी घ्यायची असेल तर आरंभाशी सुरुवात करावी लागते. त्याला पहिली पासून पदवी पर्यंत प्रगती करावी लागते. असे पात्र झाल्याशिवाय स्वाभाविकपणे बी. ए. च्या वर्गासाठी तो प्रवेश घेऊ शकणार नाही. त्याच वेळेस पहिलीतच नापास होत राहणे हे मूर्खपणाचे नाही का ?

पूर्वी नंतरच्या प्रकारातील अनेक लोक (जे ज्ञानमार्ग स्वीकारला आणि कर्ममार्गाला चिकटून होते) होते, यांचे झाले; आता पहिल्या प्रकारातील लोकांचे (ज्यांना कर्म मार्गासाठी सिद्ध न होता ज्ञानमार्ग स्वीकारायचा असतो) वर्चस्व आहे. श्रीकृष्णाच्या काळात धार्मिक विधींना चिकटून राहणाऱ्यांची संख्या जास्त होती. जे हेतू न समजून घेता वैदिक विधी करणारे आणि जे त्याच्या पलीकडे जाण्यावाचून राहतात त्यांच्यावर त्यांचा (श्रीकृष्णाचा) टीकेचा रोख होता. दुर्दैवाने ही वेदांवर टीका अशी गैरसमजूत झाली आहे. भगवंताने स्वतःच कधीही वेदांवर टीका केली नसती. त्यांना वाचविण्यासाठीच त्याने पुन्हा पुन्हा पृथ्वीवर अवतार घेतला. त्याच्या काळातील, संकुचित कर्ममार्गाला चिकटून राहणाऱ्या लोकांविरुद्ध तो बोलला आहे. जर तो आपल्याला उपदेश करण्यासाठी अवतरला आहे तर तो जे वैदिक विधींना झिडकारून उपनिषदांच्या अभ्यासात व्यग्र होणाऱ्यांच्या विरुद्ध होईल. मला असे वाटते की तो कर्माने पछाडलेल्यांपेक्षा ह्या लोकांवर कठोर टीका करेल.

वैदिक विधीविना उपनिषदांमध्ये पदवी मिळविण्याचा प्रयत्न करणे हा कर्ममार्गाकडून ज्ञानमार्गाकडे जाण्यात अयशस्वी होण्यापेक्षा मोठा गुन्हा आहे. शेवटी मी पूर्वी सांगितलेले पुन्हा सांगायचे तर एखाद्याला महाविद्यालयात प्रवेश घेण्यासाठी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाच्या पायऱ्यांद्वारा जावे लागते. जो मनुष्य पात्र होण्याविना बी. ए. च्या वर्गात प्रवेश घेण्याचा आग्रह धरतो ते कोणत्याही प्रकारे संभवनीय नसते. जो पाहिल्या वर्गात राहू इच्छितो तो कमीतकमी काहीतरी शिकतो. दुसऱ्या प्रकारचा काहीही शिकण्यास असमर्थ असतो.

वेद आणि वेदान्त यात मतभेद नाहीत. कर्मकाण्ड आपल्याला वेदान्त किंवा ज्ञानकाण्डासाठी तयार करते. पहिले ह्या जगाशी आणि अनेक देवतांशी संबंधित आहेत आणि त्यांचे अनुयायी तीन गुणांना मान देतात. पण तीन गुणांच्या पलीकडे जाणे आणि आपल्या ह्या

विश्वातील अस्तित्वाचा त्याग करणे ही पहिली पायरी आहे. आपण कर्मकाण्डात दिलेले विधी त्यांचा खरा हेतू मनात ठेवून केले तर आपण नक्कीच ज्ञानकाण्डाला पात्र होऊ.

येथे काही प्रश्न निर्माण होतात. वेदध्वनी आणि यज्ञ हे, जो वेद पठण करतो आणि यज्ञ करतो त्यालाच नव्हे तर सर्व सजीवानांही लाभ करून देतात. जर एखादा मनुष्य (जो वेदाध्ययन करतो आणि यज्ञ करतो) हे जग असत्य आहे असे मानून त्याचा त्याग करेल आणि ज्ञानी होईल तर ह्या जगाचे आणि त्याच्या कल्याणाचे काय होईल ? जरी तुम्हाला हे जग असत्य वाटत असेल तरी हे जग अनेक दुःखांचे कारण आहे ह्या अर्थाने सत्य आहे. ज्ञानी मनुष्य जगातील दुःखे नाहीशी करण्यासाठी यज्ञासारखे कोणतेही विधी करीत नाही. मग ह्या जगाच्या कल्याणासाठी कोण काम करील?

याचे उत्तर हे आहे की, ज्ञानी माणूस त्याच्या जाणिवेच्या उदात्त स्थितीत असतो आणि त्या स्थितीत जगाच्या कल्याणाची हमी देण्यासाठी त्याला यज्ञ किंवा इतर कोणतेही विधी करावे लागत नाहीत. त्याचे जीवन हा स्वतःच एक यज्ञ असतो आणि त्याच्याद्वारे जगाला जरी तो हे जग असत्य किंवा परमात्म्याची लीला समजत असला तरी ईश्वराचे आशीर्वाद मिळतील. लोक ज्ञानी माणसाच्या भोवती का गोळा होतात; जरी तो त्यांच्यापासून दूर राहत असला तरी त्याच्या पाया का पडतात ? याचे कारण असे की त्यांना त्याच्या कृपेचा लाभ होतो. त्याला कृपाप्रसाद देण्याची इच्छा असो वा नसो, त्याच्याद्वारे ईश्वरी प्रसाद जगात येतो. त्याच्या उपस्थितीत लोकांना शांतीचा अनुभव येतो आणि काही वेळेस त्यांच्या भौतिक गरजांचेही समाधान होते. ज्ञानी अंतःकरणात जाणतो की त्याच्याशिवाय अन्य देवता नाही; असा तो, इतर देवतांपेक्षा अधिक कृपाप्रसाद देतो. म्हणून असा विचार करणे चूक आहे की तो यज्ञ करीत नाही म्हणून तो जगाच्या कल्याणासाठी काही करीत नाही.

इतर धर्मांचे अनुयायी हिंदुत्वाबाबतच्या दृष्टिकोनात चुकले आहेत. ते वेदान्तिक प्रणाली ही वैदिक यज्ञपद्धतीपासून अलग करतात आणि असे म्हणतात की हिंदूंना वैयक्तिक मोक्ष महत्त्वाचा वाटतो. ते जगाच्या कल्याणाकडे दुर्लक्ष करतात. ध्यान, योग, समाधी ही वैयक्तिक मोक्षाची साधने आहेत. हिंदू हे येशु ख्रिस्त आणि प्रेषित मोहमद यांच्या अनुयायांपेक्षा वेगळे आहेत कारण ते प्रेम आणि बंधुत्व शिकवीत नाहीत आणि ते त्यांच्यात सामाजिक जाणिवेच्या वाढीसाठी मदत करीत नाहीत.

ज्याला आमच्या धर्माचे योग्य आकलन झालेले आहे त्याला कळेल की हिंदुत्वाचे वैदिक धर्म आणि वेदान्तिक असे दोन भाग करणे चुकीचे आहे. संन्याशाप्रमाणे एखादा माणूस जीवनाच्या शेवटी वेदान्ती आणि ज्ञानी बनून स्वतःसाठी मोक्षास पात्र होतो. आपण लक्षात ठेवले पाहिजे की तो त्याच्या जीवनातील एक स्थिती सोडून जातो की ज्यात त्याने वेद पठण करून आणि विधी करून जगाच्या कल्याणासाठी काम केलेले असते. खरोखरच, त्याच्या ह्या

कार्यामुळेच तो मनाने शुद्ध बनतो आणि वेदान्तिक मार्ग आणि त्याच्या स्वतःच्या ह्या जगातील अस्तित्वापासून मुक्तता मिळविण्यास पात्र ठरतो.



हे लक्षात ठेवले पाहिजे की वेदान्तात पूर्णत्व मिळवून आणि ज्ञानी झाल्यानंतर कोणतेही विधी न करता तो केवळ त्याच्या उपस्थितीने जगाला कृपाप्रसाद देत राहतो. वैयक्तिक मोक्ष की सामूहिक कल्याण अशा धर्माच्या दोन ध्येयापैकी कोणता श्रेष्ठ आहे ह्या प्रश्नाचा मी विचार करीत नाही. तो स्वतंत्र विषय आहे. सध्या हा समाजकल्याणाचा विषय बाजूला ठेवू या. आता ह्या प्रश्नाचे उत्तर द्यायचे की धर्माचा निष्ठावान असल्याने एखादा परमात्म्याच्या सत्यस्वरूपाच्या अंतर्यामी अनुभवाने ज्ञानी होत नसेल तर तो धर्म असो वा नसो, काय फरक पडतो ?

सर्व विधी, सर्व उपासना सत्‌ची जाणीव करून देण्यासाठी असतात. आपल्या लाखो भेदांसह आणि असंख्य निर्बंधासह वर्णाश्रम जो एकत्वाच्या अवस्थेला येण्यासाठी सर्वभेद नष्ट करून प्राथमिक सिद्धता करू शकतो. जर आपण वर्णाश्रमातील सर्व भेद पाहून कर्माच्या पलीकडील स्थितीकडे जाण्यात अयशस्वी झालो तर आपण चूक करीत असू. जे वेदातील फक्त कर्मकाण्ड महत्त्वाचे आणि ज्ञानकाण्ड काहीही हेतू साध्य करीत नाही, असे मानतात त्यांच्यावर श्रीकृष्ण टीका करतात. असे करण्यात ते वेदान्तावर टीका करतात असे वाटते. वास्तवात ते, त्यांच्या शब्दांत जे "वेद-वाद-रतः" आहेत, जे वेदांच्या वरपांगी तपशीलामुळे त्यांचा खरा अर्थ न समजता फसले जातात आणि जे ज्ञानाच्या अनुभवाच्या पातळीवर जाण्यासाठी प्रयत्न करीत नाहीत, त्यांना दोष देत आहेत.

प्रथमतः आपण वेदांनी सांगितलेले विधी केले पाहिजेत, पण त्यातही ही जाणीव ठेवावयास हवी की ते विधी आपल्याला उच्च स्थितीला नेणाऱ्या पायऱ्या आहेत; ज्या स्थितीत आपल्याला आत्मशांती मिळेल, ज्या स्थितीत विधी आणि कर्तव्ये असणार नाहीत; त्याचप्रमाणे देवतांचे पूजन केले पाहिजे पण ह्या विश्वासाने की जेथे आपण जाणू की असे पूजन अशा अंतिम मुद्याकडे नेईल की पूजक आणि पूज्य देवता हे एकच आहेत. त्या कार्यातील सर्व भेद ओळखले पाहिजेत आणि त्याप्रमाणे जीवन जगले पाहिजे. वेगवेगळ्या विभागांतील लोकांना वेगवेगळी कर्तव्ये आहेत, त्यांनी आपली कर्तव्ये योग्य प्रकारे पार पाडण्यात मदत व्हावी म्हणून प्रत्येकाला रूढी आणि विधी सोपविलेले आहेत. असे भेद ठेवताना अंतरंगात अशी जाणीव हवी की अंतिमतः हे भेद नाहीतच, सर्व जण एकच आहेत.

जर वेद अध्ययन करायचे आणि पठण करायचे आणि वैदिक विधी आचरायचे तर वेद अध्ययन केले आणि पठण केले गेले पाहिजेत आणि त्याप्रमाणे आचरण केले पाहिजे. कारण ह्या मार्गाने आपल्याला सत्‌च्या परमोच्च अनुभवाची स्थिती प्राप्त होईल, ज्या अवस्थेत ह्या वेदांचीच गरज भासणार नाही. प्रथम फुले आणि त्यापासून फळे. फूल जरी सुंदर दिसत असले

तरी तेव्हा ते कोमेजते किंवा जमिनीवर पडते तेव्हा फळ बाहेर येते. एखादे झाड फुलण्यापूर्वी फळे धारण करीत नाही. त्याचप्रमाणे वैदिक शिस्तीच्या जीवनातून जाण्यापूर्वी वेदान्तात उडी मारणे हे सुज्ञपणाचे होणार नाही किंवा वास्तवाच्या जवळ असल्यासारखे होणार नाही. कर्मकाण्डाला चिकटून राहणे आणि वेदान्तिक ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न नाकारणे हेही तितकेच चुकीचे आहे : आम्हाला फक्त फुले हवीत आणि फळे नकोत अशी इच्छा करण्यासारखे आहे. हे आपण जे सर्व काही करतो त्यात संतुलनाची प्रमाणबद्धतेची जाणीव हवी.

गीतेसारखाच बृहदारण्यकात एक उतारा आहे : जो आत्म्याच्या स्वरूपाला जाणतो - त्याच्यासाठी वेद हे वेद राहणार नाहीत, देव देव असणार नाहीत, ब्राह्मण ब्राह्मण असणार नाहीत. (ब्रह्म तं परादाद्यो अन्यत्रात्मनो ब्रह्म वेद, क्षत्रं तं परादाद्यो अन्यत्रात्मनः क्षत्रं वेद, लोकाःपरादुर्यो अन्यत्रात्मनो लोकान् वेद, देवाः तं परादुर्यो अन्यत्रात्मनो देवान्, वेद, भूतानि तं परादुर्यो अन्यत्रात्मनो भूतानि वेद, सर्वं तं परादाद्यो अन्यत्रात्मनः सर्व वेद, इदं ब्रह्म, इदं क्षत्र, इमे लोकाः, इमे देवाः, इमानि भूतानि, इदं सर्व यद् अद्यं आत्मा. - बृहदारण्यक उपनिषद ४-५-७)

आपण पाहिले की, 'श्रुती' म्हणजे वेद, पण त्यात फक्त संहिताच नव्हे तर ब्राह्मण, आरण्यके आणि उपनिषदांचा समावेश आहे. गीता ही श्रुती नाही आणि ती स्मृतीच्या विभागातील असल्याचे मानले जाते. अध्ययनाच्या चौदा शाखांपैकी (चतुर्दश-विद्या) एक असलेल्या धर्मशास्त्राबाबत बोलेन तेव्हा, मी स्मृतीसंबंधी बोलेन. स्मृती म्हणजे गीता सांगते की, ''वैदिक विधी आणि पूजन जर तुम्हाला ज्ञानमार्गाला नेत नसेल तर ते व्यर्थ होय.'' आपल्या धर्माच्या प्रमाणग्रंथाच्या तीन प्रकारांत पुराणे आहेत - इतर दोन श्रुती आणि स्मृती - विधींशी चिकटून राहणाऱ्या जीवनाबाबत त्यांचा तोच दृष्टिकोन आहे. दारूका वनातील ऋषींना त्यांच्या यज्ञकृत्याचा फार अभिमान होता, पण परमेश्वराने त्यांच्या अभिमानाला आवर घातला - त्याने हे कसे केले ते शैव पुराणात सांगितले आहे. भागवत आपल्याला सांगते की यज्ञपत्नी, ऋषींच्या साध्यासुध्या आणि नम्र पत्नी यज्ञपुरुषाच्या रूपात महाविष्णूला कशा पाहू शकल्या. पण त्यांचे पती जे विधींशी बद्ध असलेले होते ते परमेश्वराला पाहू शकले नाहीत आणि त्यांना पश्चात्ताप झाला.

प्रमाण म्हणून श्रुती ह्या स्मृती आणि पुराणांपेक्षा वरच्या आहेत. आध्यात्मिक प्रगतीसाठी विधी पुरेसे नाहीत हे सिद्ध करण्यासाठी श्रुतीचा पुरावा आहे हे दाखविण्यासाठी मी बृहदारण्यकातील उताऱ्याचा संदर्भ दिला होता. तरीही कोणी वाद घालेल की श्रुतीचे कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड असे विभाजन झालेले आहे आणि ज्ञानकाण्डात ज्ञानाच्या शोधाचा चांगला उल्लेख करणे हे साहजिकच आहे. म्हणून साधकाचे अंतिम ध्येय विधी असू शकणार नाहीत हे सांगण्यात विशेष काही नाही.

तथापि, विधीच सर्वकाही आहे आणि तेच अंतिम ध्येय या दृष्टिकोनावर कर्मकाण्डातच टीका आहे. श्रीकृष्ण गीतेत सांगतात की खरा हेतू जाणून वेदांमध्ये सांगितलेले यज्ञ करणे स्तुत्य आहे. (''एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे'') तरी ज्ञानात हे सर्व धार्मिक विधी कळसास पोहोचले आहेत. (''सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते'') वैदिक कर्मकाण्डातच अशीच कल्पना उदाहरणांद्वारे जोरदारपणे व्यक्त झालेली आहे. : जो ईश्वराला जागृत न करता फक्त विधी करतो तो धूर उत्पन्न करण्यासाठी अग्नीला आहुती देतो आणखी दुसरे काही नाही. (तैत्तिरीय काठक, पहिला प्रश्न, शेवटचा अनुवाक, चौथे वाक्य) जर तुम्ही अग्नीला सरपण पुरविले तर तुम्ही त्यावर भात शिजविण्यासाठी भांडे ठेवले पाहिजे. जो ज्ञानात स्वतःला परिपक्व होण्यासाठी स्वतः परिश्रम करीत नाही तो स्वयंपाकगृहात चुलीवर भांडे न ठेवता ती प्रज्वलित करतो असे वेद म्हणतात. मोठे यज्ञकुंड निर्माण करून जर तुम्ही त्यात काहीच आहुती दिली नाही तर त्याचा काय उपयोग ? परिणाम केवळ धूर आणि धूरच. तुमच्या कर्माचे फळच आहुती म्हणून तुम्ही अर्पण करीत आहात अशा जाणिवेने आहुती दिली पाहिजे. नाहीतर धुराशिवाय अन्य काही नसेल.

ब्रह्मयज्ञामध्ये आत्मभावाची आहुती दिली पाहिजे. संयमाच्या अग्नीमध्ये इंद्रियसुखे अर्पण केली पाहिजेत. पाच वायूंचे यज्ञात समर्पण केले पाहिजे. (गीता म्हणते - ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्, ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ।। दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते । ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञनैवोपजुहवति ।। श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुहवति । शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ।। सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे । आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ।। भ.गी. ४-२४ ते २७) वैदिक यज्ञात हविर्द्रव्य आणि कर्माची आहुती हे त्याचे ध्येय आहे. एखादा मनुष्य कितीही यज्ञ करो पण सत् न जाणता करेल तर मूर्ख ठरेल. वेदही असे म्हणतात की असा मनुष्य मंदबुद्धी असतो. त्याची बुद्धी कशी व्हावी असे तुम्हाला वाटते ? ती यज्ञाच्या अग्नीच्या धुराप्रमाणे असते, ती सर्व गोष्टी काळवंडते आणि कशातच शेवट होत नाही.

जेव्हा वैदिक विधी ईश्वरार्पण वृत्तीने केले जातात तेव्हा ते ह्या जगाशी बद्ध करण्याऐवजी, तुमची बंधने थोडीथोडी सैल करतील. जर तुम्ही कोणत्याही फळाची अपेक्षा न ठेवता परमेश्वराला संतुष्ट करण्यासाठी विधी केले तर तुमचे मन शुद्ध होईल आणि तुम्ही तीनही गुणांच्या पलीकडे जाल. हा यज्ञाचा अर्थ आणि हेतू आहे. इंग्रजीमधील सॅक्रिफाईस ह्या शब्दावरून ह्याचा अर्थ कळेल. याग म्हणजे सुद्धा त्याग. जेव्हा आपण अग्नीत आहुती देतो तेव्हा आपण म्हणतो ''न मम'' (माझे नाही). हा स्वतःचे नाकारण्याचा दृष्टिकोन म्हणजे जीवन आणि यज्ञविधीचा आत्मा आहे. जे काही यज्ञात अर्पण केले ते परत मिळविणे शक्य आहे का ? जरी ते तसे झाले तरी ते लवकरच भंग पावेल. अशा रीतीने तुम्ही तुमचा अहंकार

आणि स्वामित्वाची जाणीव (अहंकार-ममत्व) भस्मसात केली पाहिजे. जो अशा उदात्त आदर्शाची जाणीव न ठेवता स्वर्गगमनासारखा क्षुल्लक हेतू ठेवून यज्ञ करतो तो मूर्ख नाही का?

कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड यांमध्ये विरोध नाही. कर्मकाण्डातच ज्ञानाला उच्च स्थान दिले आहे आणि कर्माच्या मर्यादांचा उल्लेख केला आहे. वेदांच्या संहिता भागामध्ये तत्त्वज्ञानात्मक सत्य असलेली स्तोत्रे आहेत. उदा. ''नासदीयसूक्त'' ''पुरुषसूक्त'' आणि ''त्र्यंबक मंत्र'' याची नोंद घेतली पाहिजे. नचिकेताग्नि सारख्या उपनिषदांमध्येच विधींचा (कर्म) उल्लेख आहे. जर कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड यामध्ये विरोध असेल तर ह्याचे स्पष्टीकरण कसे कराल ? आपण पात्रतेकडून पुढच्या पात्रतेकडे असे पदवी पर्यंत जायला पाहिजे ही यातील अंतर्भूत कल्पना आहे, म्हणजेच आपण कर्मकाण्डापासून ज्ञानकाण्डाकडे जायला हवे.

आपण अगोदरच पाहिले आहे की गीता (जी स्मृती आहे) सांगते की, ईश्वराला अर्पण करण्याचा हेतू ठेवून केलेले धार्मिक विधी हे ज्ञान मिळविण्याचे साधन आहे. हीच कल्पना श्रुती ग्रंथामध्ये, ईशावास्य उपनिषदात आढळते. दहा मुख्य उपनिषदांपैकी पहिले ह्या विधानापासून आरंभ करते : ''वैदिक विधी करीत शंभर वर्षे जगा. ईश्वरार्पण वृत्तीने करा. मग ते तुम्हाला बद्ध करणार नाही. ('ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् । तेन व्यक्तेन भुंजीया मा गृधः कस्यास्विद्धनम् ।। कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छत समाः । एवं त्वसि नान्यथेतोऽस्ति न् कर्म लिप्यते नरे ।।' ईशावास्य उपनिषद १,२.) म्हणून, उपनिषदे निष्क्रियता शिकवितात असे मानणे चुकीचे ठरते.

कर्म हे वेदांचे ध्येय नाही. जरी वैदिक विधी हे विश्वाच्या कल्याणाचा, तुमचे मन शुद्ध करण्याचा आणि देवतांना प्रसन्न करण्यासारखा उदात्त हेतू ज्यांत आहे असे असले तरी ते करण्याच्या स्थितीच्या पलीकडे जायला हवे. तुम्ही अशा पातळीच्या वर जायला हवे आहे की जेथे तुम्हाला जाणवेल की परमात्म्याशिवाय काहीही अस्तित्वात नाही. हे इंद्रियगोचर जग खरे नाही, स्वतंत्र अस्तित्व असलेल्या देवता नावाची कोणतीही वस्तू नाही आणि 'मी' (अहम्) नाही. जेव्हा तुम्ही ह्या स्थितीला पोहचाल तेव्हा तुम्हाला वेदांची सुद्धा गरज भासणार नाही : हे वेदांमध्येच सांगितलेले आहे.

वेद हे परमेश्वराने घालून दिलेले नियम आहेत. सर्व लोकांनी, त्याच्या सर्व प्रजेने त्याच्या आज्ञा पाळल्या पाहिजेत. ज्या मनुष्यात अंतर्बाह्य ब्रह्म म्हणजे परमात्मा भिनलेला आहे त्याला त्याच्या कर्माच्या संबंधात ह्या नियमाची कास धरायची गरज नाही. म्हणून असे म्हटले जाते की अशा लोकांसाठी वेद हे म्हणून राहण्याचे थांबतात. (आपण सुद्धा वेदांना नियम म्हणून मान देत नाही. आपल्यालाही वेद हे वेद नाहीत. पण आपल्याला ज्ञानाची झुळूकही प्राप्त

झालेली नसते.)



जर तुम्ही जाणले नाही की उपनिषदांनी दिलेले कर्मकाण्ड हे पराविद्येकडे (पराविद्या - श्रेष्ठ ज्ञान) नेणारे आहे, तर वेद हे शाळेत शिकविल्या जाणाऱ्या इतिहास किंवा भूगोल ह्यासारख्या इतर विषयांसारखा अपराविद्या असेल. (अपराविद्या - कनिष्ठ ज्ञान) ह्याच कारणास्तव मुण्डक उपनिषदाने वेदांचा समावेश अपराविद्येत केलेला आहे. (तत्रापरा, ऋग्वेदो, यजुर्वेदः सामवेदः अथर्ववेदः, शिक्षा, कल्पो, व्याकरणं, निरुक्तं, छंदः ज्योतिषमिति । अथ परा यया तदक्षरम् अधिगम्यते ।। - मुण्डक उपनिषद १-१-५) हे उपनिषद जो वैदिक विधी क्षणभंगुर मौज, भौतिक लाभासाठी, निव्वळ पशूप्रमाणे करतो अशा मनुष्याचे वर्णन करते.

जो ज्ञानी परमात्म्याशी जोडला गेलेला असतो त्याला देवता ह्या त्याच्या स्वतःच्या बाहेरच्या नसतात कारण त्याही त्याच परमात्म्यापासून उद्‌भवलेल्या आहेत. खरोखरच त्या देवता त्याचा एक भाग म्हणून राहतात कारण तो परमात्मा होण्यासाठी परमात्म्यात विलीन झालेला असतो. जेव्हा तो ती देवता स्वतःपेक्षा वेगळी असल्याचे मानून पूजन करतो, जर त्याला असा परमोच्च देवात विलीन झाल्याचा आतील अनुभव नसेल तर त्याने ती आत्म्याचा एक भाग म्हणून केले पाहिजे. जरी भेदांवर आधारलेल्या प्रणालीनुसार बाह्य कर्मे करणे आवश्यक असले तरी आपण एका सत्याची जाणीव ठेवली पाहिजे की जेथे सर्व भेद संपतील अशा मूलभूत ब्रह्माशी आपण जोडले जाऊ आणि सर्व भेद अस्तित्वात राहणे थांबेल. बृहदारण्यक उपनिषद घोषित करते : "जो ह्या देवता त्याच्यापासून स्वतंत्र वेगळ्या वस्तू म्हणून त्यांचे पूजन करतो त्याला सत्य कळत नाही. कारण देवांना तो पशूसारखा असतो." (ब्रह्म वा इदमग्र आसीत्तदात्मानमेवावेत् अहं ब्रह्मास्मीति । तस्मात्तसर्वमभवत्तद्यो. तद्धैतत्पश्यन्नृषिर्वामदेवः प्रतिपदेऽहं मनुभवं सूर्यश्चेति । तदिद मप्येतर्हि य एवं वेदाहं ब्रह्मास्मीति स इदं सर्वं भवति तस्य न देवाश्च नाभूत्या ईशते । आत्मा ह्येषां स भवति अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽ हमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम् । यथा ह वै बहवः पशवो मनुष्यं भत्र्युरेवमेकैकः पुरुषो देवान्भुनक्त्येकस्मिन्नेव पशावादीयमादनेऽप्रियं भवति किमु बहुषु तस्मादेषां तन्न प्रियं यदेतन्मनुष्या विद्युः - बृहदारण्यक उपनिषद् १-४-१०)

येथे पशू हा शब्द अत्यंत अर्थपूर्ण आहे. वरवरच्या अर्थाने पशू म्हणजे मानवासारखी ज्याला सहावी अतीन्द्रिय शक्ती नसते आणि तो प्राण्याच्या पातळीवर राहतो. मला त्याचा 'आतला' अर्थ सांगू द्या. आपण गाय का पाळतो ? कारण ती आपल्याला दूध देते. म्हणून आपण तिला गवत, पेंड, सरकी इ. खाऊ घालतो. आपण देवांना संतुष्ट करण्यासाठी यज्ञात आहुती देतो. त्या मोबदल्यात ते आपल्याला पाऊस, पिके इ. स्वरूपात वरदान देतात. जसे की आपण पाहिले आहे की हे स्वर्गस्थ आपल्यापेक्षा श्रेष्ठ असतात पण त्यांना असीम असे शाश्वत सुख माहीत नसते.

तैत्तिरीय उपनिषद (२-८-१) आणि बृहदारण्यक उपनिषद (४-३-३३) हे विविध श्रेणीतील मानव, पितर, स्वर्गस्थ यांनी अनुभवलेल्या शाश्वत सुख, आनंद यांच्याशी संबंधित आहेत. (भीषास्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषास्मादग्निश्चेन्द्रश्च । मृत्यार्धावति पंचम् इति । सैषानन्दस्य मीमांसा भवति । युवा स्यात्सधुयुवाध्यायकः । आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठः । तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् । स एको मानुष आनन्दः । ते ये शतं मानुषा आनन्दाः । तैत्तिरीय (२-८-१) (स यो मनुष्याणां राद्धः समृध्दो भवन्यन्येषामधिपतिः सर्वैर्मानुष्यकैर्भोगै; सम्पन्नतमः स मनुष्याब्याणां परम आनन्दो थऽये शतं मनुष्याणामानन्दाः (बृहदारण्यक ४-३-३३) (खरं तर, त्यांना मर्त्य असलेल्या ज्ञानी मनुष्याला आलेल्या आनंदाच्या अनुभवाचा एक अंश इतकीही जाणीव नसते.) शाश्वत सुख, आनंद हे सौख्याचा गणिती पध्दतीसारखे आहे. हे प्रत्येक श्रेणीने अनुभवलेले सौख्य पहिल्यापेक्षा पुढच्याचे शंभर पटीने मोठे असते. अशा सर्व चढत्या क्रमाने असते. स्वर्गस्थापैकी इंद्र, बृहस्पती आणि प्रजापती यांना ज्ञात असलेले सौख्याचे प्रमाण स्वतंत्र दिलेले असते. ज्ञानी माणसाकडून अनुभवले गेलेले सौख्य हे सर्वोच्च असते. ब्रह्मज्ञानाचे (ब्रह्मानंद) सौख्य. अशा प्रकारे देवही सौख्याबाबत अपूर्ण आहेत. कृपेची सर्वोच्च स्थिती प्राप्त करण्यासाठी ते काहीही प्रयत्न करीत नाहीत. ते आपल्याकडून मिळणाऱ्या, आपण करीत असलेल्या यज्ञाकडून, पूजेमधून मिळणाऱ्या लाभांकडे, आशेने पाहत असतात. ह्या कारणास्तव त्यांना आपणाप्रमाणे-मानवाप्रमाणे ज्ञानी होणे आवडत नाही हे स्पष्टपणे बृहदारण्यक उपनिषदात सांगितले आहे. स्वर्गस्थांना, जे मानव आत्म्याला जाणतात ते आवडत नाहीत. का ? तर जेव्हा एखादा स्वतःला जाणेल, तो कोणताही यज्ञ आणि देवतांना संतुष्ट करण्यासाठी इतर विधी करणार नाही.

आपल्या घरगड्याचे उदाहरण घ्या. आपण त्याला थोडी मजूरी देतो आणि आपल्याला हेही माहीत असते की जर आपण त्याच्या जागेवर नवीन मनुष्य नेमला तर आपल्याला अधिक पैसे द्यावे लागतील. त्याला शाळेत जायचेय, एखादी दुसरी परीक्षा उत्तीर्ण व्हायचे आहे, कालांतराने त्याला अधिक चांगली नोकरी मिळेल आणि त्याचे जीवन चांगले चालेल. जर तो खरंच परीक्षेला बसला तर आपल्याला तो उत्तीर्ण व्हावा असे खरेच वाटेल ? नाही. आपल्याला तो अनुत्तीर्ण व्हावा असे वाटेल. जर तो उत्तीर्ण झाला तर तो स्वतःसाठी चांगली नोकरी मिळवेल आणि आतापेक्षा अधिक चांगले सामाजिक स्थान मिळवेल. मग आपल्याला त्याच अल्प मजुरीवर नवीन नोकर मिळविणे सोपे जाणार नाही. आपण स्वर्गस्थांच्या संबंधात असेच आहोत. त्यांना आपण ज्ञानी होणे आवडणार नाही कारण ज्ञानी झाल्यावर आपण त्यांचे पूजन करणे थांबवू.

जर देवांना ज्ञानी प्रिय नसेल तर त्याचा अर्थ असा की जो ज्ञानी नाही तो त्यांना प्रिय

असतो. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर जो देवांना प्रिय असतो तो अज्ञानी असतो. म्हणून व्याकरणात मूर्ख माणसाला देवानांप्रिय असे नाम आहे. ह्या शब्दाचा उगम उपनिषदात आहे. ब्रह्मसूत्रावरील भाष्यामध्ये शंकर भगवत्पाद, जो परमात्मा आणि जीवात्मा भिन्न आहेत असे मानतो त्याला देवानांप्रिय म्हणतात; ''इदम् तावद देवानांप्रियः प्रष्टाव्याह. (हे तुम्हा मूर्खाला विचारले पाहिजे.) तुम्हाला कदाचित असे वाटेल की देवानांप्रिय ही मोठी सन्मानाची पदवी असावी.

(अशोकाच्या आज्ञांमध्ये सम्राटाचा उल्लेख देवानांप्रिय असा आहे. अशोकाच्या काळापूर्वीही पाणिनीने ह्या शब्दाचा अर्थ मूर्ख असा सांगितला आहे. ह्या कारणास्तव नंतरच्या काळातील वैदिक धर्माच्या अनुयायांनी बुद्धधर्मीय अशोकाला मुद्दाम हीन लेखण्यासाठी मूर्ख ह्या अर्थाचा शब्द वापरला असे मानणे हे चूक ठरेल. मी अगोदरच सांगितल्याप्रमाणे, आपले आचार्य त्यांच्या ब्रह्मसूत्राच्या भाष्यात ज्याला वेदांचा खरा हेतू समजत नाही अशा व्यक्तीचा ''देवानांप्रिय'' म्हणजे मूर्ख असा उल्लेख करतात. पण अशोकाच्या आज्ञेत (शिलालेख) तेच नाम वेदविरोधकाला, जो अवैदिक, बौध्द मताचा आहे त्याला दिले आहे.

जो वैदिक परंपरा पाळतो आणि उपनिषदांमध्ये विचारार्थ मांडल्याप्रमाणे ज्ञानी बनतो तो देवांना संतुष्ट करण्यासाठी यज्ञ करीत नाही. तो आता त्यांना अधिक काळ प्रिय राहात नाही. कारण बुद्ध धर्मात यज्ञांना मनाई केलेली आहे अर्थातच स्वर्गस्थांना त्या धर्माचे अनुयायी आवडत नाहीत. मग बुद्ध धर्माचा मोठा पाठीराखा अशोक ह्याला ''देवानांप्रिय'' असे का म्हटले गेले ? बुद्धीस्ट म्हणून त्याने वैदिक विधी केले नसतील पण त्याचवेळेस तो ज्ञानी होण्यासाठी वेदान्ताच्या प्रभावाखाली आला नसावा. अशोकाने देवानांप्रिय हे नाव मिळविले ते ह्या अर्थाने की जो वेदान्ताची शिकवण अनुसरत नाही तो ज्ञानी होत नाही.

(हे संभवनीय आहे की अशा बाबतीत ज्याला परिचय नाही अशा एखाद्या शिल्पकाराने किंवा सरकारी अधिकाऱ्याने 'देवानांप्रिय' सम्राटाला मोठा सन्मान देणारी असावी असे समजून पदवी कोरली असावी.)

जेव्हा स्वर्गस्थांना प्रिय असलेल्या एखाद्याने ज्ञानमार्गाकडे वळून यज्ञ करणे थांबविले तर ते त्याच्या पुढे अडथळे ठेवतात. ऋषींना त्यांच्या चिंतनात आणि तपश्चर्येत व्यत्यय आणणाऱ्या अप्सरांचा कथा आपण पुराणात वाचतो.

एखादा मनुष्य ज्ञानी होईपर्यंत स्वर्गस्थांसाठी असलेले विधी करीत असतो. त्या मोबदल्यात ते त्याला विविध लाभ देतात. त्यांना त्यांची आहुती दिली जावी लागते. जर एखाद्या माणसाने आपल्याला मदत केली तर आपल्याला त्या मोबदल्यात मदत करावी लागते हेही तसेच नाही का ? जे स्वर्गस्थ आपल्याला पाऊस आणि इतर लाभ देतात त्यांना आपण मदत

केलीच पाहिजे. म्हणूनच आपण यज्ञ करतो. आपल्या सर्वांचा प्रतिनिधी म्हणून एखादा ब्राह्मण आणि इतर कोणी देवांना हविर्भाग देतो (आहुतीतील भाग). हे सर्वांच्या वतीने एकाने कर भरण्यासारखे आहे.

स्वर्गस्थांसाठी जो वैदिक विधी करतो तो त्यांना दुभत्या गायीसारखा असतो. गाय जेव्हा भाकड होते तेव्हा माणसाला (मालकाला) तिचा काय उपयोग? स्वर्गस्थ एखाद्या व्यक्तीवर संतुष्ट राहतील जोवर दुभती गाय असेल (यज्ञ आणि इतर विधी करेपर्यंत). जर त्याचे दुभती गाय असणे थांबले तर त्यांना तो प्रिय असणार नाही, ते त्याला त्रास देतील. त्याचा अर्थ असा की देवांना मानव एकापेक्षा अनेक अर्थांनी गाय आहे : एका अर्थाने तो अज्ञानी आहे. (ज्ञानी नाही), आणि एका अर्थाने तो जेव्हा विधी करणे थांबवतो तेव्हा ते त्याला संरक्षण देत नाहीत. (आपण भाकड गायीची काळजी घेतो का?)

देव आपल्यापेक्षा वेगळे नाहीत हे जाणणे हा सुज्ञपणा आणि ज्ञानप्रसाराचा एक भाग आहे. वेदान्त आपल्याला हे सत्य समजण्यासाठी असा मार्ग सुचवितो की आपण आपल्या कर्म आणि देवतापूजनापासून मुक्त होऊ आणि अशा स्थितीला पोहोचू की जेथे आपण आणि सर्वजण यांच्यात भेद असणार नाही. ह्या देशात वेदान्त जतन केला गेला ह्याची प्रशंसा मला सांगू द्या.

जरी वेद अनंत असले तरी ऋषींनी आपल्यासाठी थोडे आणले. पण ह्या कलियुगात त्यावरही प्रभुत्व मिळविणे अवघड आहे म्हणून त्यांनी त्यांचे ११८० शाखांमध्ये विभाजन केले, प्रत्येकाला एक संहिता, ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद आहे. नंतर ह्यांपैकी अनेक विस्मृतीत गेले. आता शिल्लक राहिलेलेही लुप्त होण्याचे संकट आहे कारण ह्या पिढीतील लोकांनी वेदांचे अध्ययन अशा दुःखद स्थितीला आणले आणि स्वतःला गुणगौरव प्राप्त केला!

आपल्याकडे ज्यांच्या संहिता किंवा ब्राह्मणे अभ्यासली गेली नाहीत अशा शाखांची उपनिषदे आहेत. त्यांचे ग्रंथही उपलब्ध नाहीत. हल्ली ऋग्वेदाच्या शांखायन शाखेच्या संहितेचे पठण केले जात नाही; वस्तुतः आपण ती गमावलेली आहे. पण ह्या शाखेचे कौषीतकी उपनिषद अजूनही अस्तित्वात आहे. ऋग्वेदातील बाष्कल मंत्रोनिषद् अजून उपलब्ध आहे : मला असे सांगण्यात आले आहे की मद्रासच्या अड्यारच्या वाचनालयात त्याचे भूर्ज पत्राचे हस्तलिखित आहे. पण बाष्कला शाखेची संहिता किंवा ब्राह्मण आपल्याला ज्ञात नाही. कठ उपनिषद् हे कृष्ण यजुर्वेदाच्या कठ शाखेचे आहे. मी सांगितले नाही का की उपनिषद् आरण्यकाच्या शेवटी येते. कठोपनिषद अतिशय लोकप्रिय आहे आणि प्रमुख उपनिषदांपैकी आहे, पण त्याचे आरण्यक उपलब्ध नाही. दक्षिणेकडे अथर्ववेद पूर्णपणे विसरला गेला आहे आणि देशाच्या एखाद दुसऱ्या भागात अभ्यासला जातो. परंतु ह्या वेदाचे अजूनही दशोपनिषदांपैकीची मुंडक आणि मांडुक्य ही उपनिषदे अस्तित्वात आहेत.

हे सर्व दर्शविते की कर्माच्या संबंधित असलेल्या अनेक शाखा लुप्त झाल्या किंवा विसरल्या गेल्या आहेत, अनेक ज्ञानाची साधने असलेली उपनिषदे जतन केली गेली आहेत. आपल्याला सुज्ञपणा आणि प्रकाशाचा मार्ग दर्शविणाऱ्या, आपला वारश्याचा एक भाग असलेल्या उपनिषदाची मोठी काळजी घेतली जात आहे.

उपनिषदे मोठ्या संख्येने आहेत असे मानले जाते. दोनशे वर्षापूर्वी कांचीपुरमच्या एका तपस्व्याने १०८ उपनिषदांवर भाष्ये लिहिली. त्याने 'उपनिषद् ब्रह्मेंद्र' असे नाव मिळविले. त्याचा मठ अजूनही कांची येथे आहे.

-----

## प्रकरण ३३

# दहा उपनिषदे

भगवत्पाद शंकराचार्य यांनी अद्वैताच्या दृष्टिकोनातून असंख्य उपनिषदांपैकी दहा उपनिषदे निवडली, त्यांच्यानंतर आलेल्या रामानुज, मध्व आणि इतरांनी त्यांच्या स्वतःच्या तत्त्वज्ञानानुसार त्याच उपनिषदांवर भाष्ये लिहिली. दहा उपनिषदांच्या नावांची यादी सहज लक्षात राहावी म्हणून पुढील कडव्यात ती दिली आहेत.

'ईश-केन-कठ-प्रश्न-मुंड-मांडुक्य-तित्तरि ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यकं दशा'

शंकराचार्यांनी त्यांच्या भाष्यात हाच क्रम ठेवला आहे. ईश म्हणजे ईशावास्य उपनिषद् (किंवा ईशउपनिषद) हे शुक्ल यजुर्वेदाच्या संहितेच्या शेवटी येते. ह्या उपनिषदाचे नाव त्यातील अगदी पहिलाच शब्द 'ईशावाक्य' ह्यापासून आलेले आहे. नंतरचे 'केन' हे केनोपनिषद आहे. ईशावास्योपनिषद स्पष्ट करते की संपूर्ण विश्व ईश्वराने व्यापलेले आहे आणि आपण आपली सर्व कर्मे त्याला अर्पण करून त्याला प्राप्त केले पाहिजे.

लाकडाचा केलेला हत्ती लहान मुलाला खरा वाटतो. प्रौढ माणसे जाणतात की जरी आकाराने तो हत्तीसारखा असला तरी खरे तर लाकूड आहे. मुलाच्या बाबतीत लाकूड झाकलेले आहे आणि हत्ती प्रकट झालेला आहे ; प्रौढाच्या बाबतीत तो प्राणी झाकलेला आहे आणि लाकूड प्रकट झालेले आहे. तसे हे सर्व विश्व आणि पाच तत्त्वे परमेश्वर म्हटल्या जाणाऱ्या लाकडाचे बनलेले आहेत. ह्या सर्वांकडे आपण सर्वोच्च देवता म्हणून मानले पाहिजे.

मरत्तै मरैत्तदू मामदा यानै
मरत्तै मरैत्तदू मामदा यानै
परत्तै मरैत्तदू पारमुदल भुतम्
परत्तील मरैंत्तददू पारमुदल भुतम्

तिरूमूलर ह्या कडव्यात म्हणतो की, ''आपल्याला पंच महाभूते सदैव पाहण्याची सवय झाली तरी आपण त्यात लपलेल्या परमात्म्याला विसरता कामा नये. आपण हे जाणले पाहिजे की तो हे सर्व व्यापतो आणि आपण हे शिकले पाहिजे की प्रत्येक गोष्ट ईश्वराने भरलेली आहे. शंकराचार्य 'दंतिनी दारु विकारे' बद्दल बोलतात तेव्हा नेमकी हीच कल्पना व्यक्त करतात. प्रथम कोण आले, तिरूमूलर की शंकराचार्य ह्या वादात मी पडू इच्छित नाही. थोर व्यक्ती समान विचार करतात हेच खरे.

केनोपनिषदाला तलवकार उपनिषद असे सुद्धा म्हटले जाते कारण ते सामवेदाच्या जैमिनी शाखेच्या तलवकार ब्राह्मणात येते. ह्या उपनिषदात देवांसंबंधी एक गोष्ट येते. ज्याचा

मुकुट / माथा आणि पाय अज्ञात आहेत अशा परमात्म्याला स्वर्गस्थांनी त्यांच्या उर्मटपणामुळे जाणले नाही. मग अंबिका देवांच्या राजाला, इंद्राला ज्ञान देण्यासाठी अवतरली. तिने त्याला आपली सर्व शक्ती त्या महाशक्तीपासून उत्पन्न झाली असल्याचे स्पष्ट केले.

आचार्यांनी ह्या उपनिषदावर दोन प्रकारची भाष्ये लिहिली आहेत, पहिले इतर उपनिषदांप्रमाणे शब्दशः आणि दुसरे वाक्यशः असे. त्यांच्या 'सौंदर्यलहरी' मध्ये जेव्हा ते अंबेची प्रार्थना करतात तेव्हा त्यांच्या मनात केनोपनिषद असते. ''तुझे पाय माझ्या मस्तकावर ठेव, जे पाय वेदमातेने धरले आहेत.'' उपनिषदांना (वेदान्त) ''वेद-शिरस्'' ''श्रुति-शिरस्'' वेदांचा माथा किंवा मुकुट म्हटले जाते - वेदांचा शेवट असलेली उपनिषदे सुद्धा त्याचा मुकुट आहेत. अंबेचे पाय वेदमातेच्या मस्तकावर ठेवलेले आहेत म्हणजे ते उपनिषदांकडून धरले गेले आहेत. केनोपनिषदामध्ये अंबा ज्ञानांबिका म्हणून आपल्याला दिसते (ज्ञानाची देवता). तिच्या अनेक नावांपैकी 'सामगानप्रिया' हे ललितासहस्रनामामध्ये (ललितेची एक सहस्र नावे) आहेत. सामवेदाच्या एका उपनिषदात अंबेचे वैभव विशेष रूपाने प्रकट केलेले आहे.

आपण पाहतो ती वस्तू आणि जे आपण ती वस्तू पाहतो तो कर्ता : जे पाहिले जाते ते कर्म आणि पाहतो तो कर्ता. आपण आपले शरीर वस्तूप्रमाणे पाहू शकतो. आपण तिच्याबद्दल ज्ञान घेऊ शकतो, ती चांगली आहे की नाही हे माहीत करून घेतो. म्हणजे अशी एक त्याशिवाय वस्तू आहे जी ती पाहते, त्या कर्त्याला ''आम्ही'' म्हटले जाते. जो पाहतो तो आत्मा. ज्याला कर्ता म्हटले जाते तो आत्मा कशाकडूनही पाहिला जात नाही. जर तो पाहिला जाऊ शकेल तर तो वस्तू होईल आणि पुढे त्याचा अर्थ असा, पाहू शकणारी आणखी एक वस्तू आहे आणि तो खरा ''आम्ही'' असेल. जो खरा आम्ही आहे तो आत्मा केवळ कर्ता होऊ शकेल आणि कधीही वस्तू नाही. आपण शरीरासारख्या वस्तू बाजूला ठेवू आणि आपल्याला म्हणजे आम्ही नावाचा कर्ता अनुभवू, पण आपण आम्हाला (कर्ता) जाणू शकणार नाही. ''जाणणे'' म्हणजे आपल्याशिवाय अन्य काहीतरी जाणून घेणे होय. आत्म्याला आपल्यापेक्षा भिन्न आहे असे समजणे मूर्खपणा होय. खरा 'आम्ही' हा आत्माच होय. 'जाणणे' हा शब्द असे सुचवितो की जे ते (आम्ही) जाणतो तो जे (आत्मा) जाणले जाते ह्यापेक्षा भिन्न आहे. आपल्यात खऱ्या आत्म्यापेक्षा भिन्न काय असू शकते ? आत्म्यापेक्षा अन्य काय आहे की जे आत्म्याला जाणू शकते ?'' काहीही नाही. आपण आत्मज्ञान म्हणतो त्याचा शब्दशः अर्थ आत्मा जाणणे. पण आत्मा जाणणे हा वाक्यांश कर्ता वस्तू जाणतो ह्या अर्थाने वापरला जातो का ? नाही. आत्मज्ञान म्हणजे आत्म्याचा अनुभव घेणे आणि तसे 'ज्ञान' किंवा ''जाणणे'' समजणे. म्हणूनच केनोपनिषद् म्हणते की ''जो म्हणतो की तो आत्म्याला ओळखतो त्याला तो माहीत नसतो.'' आणि पुढे ''जो म्हणतो की त्याला माहीत नाही त्याला तो माहीत असतो. जो म्हणतो त्याला माहीत आहे त्याला माहीत नसतो आणि जो म्हणतो की त्याला माहीत नाही

त्याला माहीत असतो.'' (यदि मन्यसे सुवेदेति दहरमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपम यदस्य त्वं यदस्य देवेषय नु मीमांस्यमेव ते मन्थे विदितम् ।।
नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च । यो नस्तद्वेद तद्वेद नो वेदेति वेद च ।।
यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः । अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ।। - केनोपनिषद् २-१, २ आणि ३)

नंतर कठोपनिषद् येते. ते कृष्ण - यजुर्वेदाच्या कठ शाखेत येते. ह्या उपनिषदात यमाकडून ब्रह्मचारी नचिकेताला केलेल्या उपदेशाचा समावेश आहे. ते एका कथेने सुरू होते आणि ती कथा गहन तत्त्वज्ञानात्मक सत्याकडे नेते. गीतेमध्ये ह्या उपनिषदातील वचने आहेत.

मी आत्ताच जो कर्ता-वस्तू यांचा संबंध सांगितला त्याचे सखोल स्पष्टीकरण कठोपनिषदाच्या समारोपाच्या भागात येते. आपण धान्याचे कणीस त्याच्या देठापासून कसे अलग करतो? आपण बोरूमधून गर कसा काढतो? कठोपनिषद म्हणते, की तसे आपण वस्तूमधून म्हणजे शरीरामधून कर्ता काढला पाहिजे. ''वासना, क्रोध, द्वेष, भय हे सर्व मनाशी संबंधित असतात, आत्म्याशी नव्हे. भूक तृष्णा इ. शरीराशी संबंधित असतात ते माझे नसतात.'' ह्या गोष्टी आत्म्याशी निगडित नसल्याने सरावाने आपण ''त्यांचे वस्तुरूप करून'' नाकारू शकतो. जर आपण तसे एकाग्रतेने केले तर कालांतराने, यथावकाश शरीर आणि मन म्हणजे आपण ह्या आपल्यात रुजलेल्या कल्पनेवर मात करू शकतो. मग आपण शरीर आणि मनाला दूषित करणाऱ्या अशुद्ध गोष्टींविना शुद्ध आत्मा म्हणून राहू शकतो. (अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा, सदा जनानां हृदये संनिविष्टः । तं स्वात् शरीरात् प्रबृहेन् मुंजादिवेषीकां धैर्यण । तं विद्यात् शुक्रममृतामिति ।। - कठोपनिषद् - ६-१८)

कठोपनिषद हे आत्म्यास शरीर आणि मनापासून वेगळे करण्याच्या आध्यात्मिक साधनेची तुलना बोरूपासून चमकदार, शुद्ध आणि मऊ गर बाहेर काढण्याबरोबर करते. तुमच्यापुढे केळ्याचे पान आहे. जेव्हा ते कोमजते तेव्हा तुम्ही सुद्धा खाली वाकता का ? तुमचे शरीर म्हणजे हे केळ्याच्या सोपटापेक्षा तुम्हाला अधिकचे चिकटून असा मांसाचा गोळा आहे असा विचार करा. हे सोपट म्हणजे ''आपण'' नव्हे तर वस्तू आहे. तसेच तुम्हाला, आत्मा हा कर्ता अशा संबधाने शरीराला वस्तू म्हणून मानण्याची सवय लागली पाहिजे. ह्या जगातील आपल्या जीवनात - आपण आपल्या शरीरात वास करतो तेव्हा - शरीराला 'मी' किंवा हे 'माझे' नाही असे शरीराला वागवायला शिकले पाहिजे. मोक्ष किंवा मुक्ती म्हणजे कैलास किंवा वैकुंठाकडे वर जाणे नव्हे तर ते स्थान येथे आणि आत्ताच मिळू शकते. मोक्ष म्हणजे काय ? तो सर्व भारातून मुक्त झाल्यावर शाश्वत वरदान असतो. जो ह्या जगात आपल्या शरीराचे भान न राहता आत्मानंदात राहतो त्याला ''जीवन्मुक्त'' म्हटले जाते.

कृष्ण परमात्मा ह्याच कल्पनेविषयी गीतेत म्हणतात - जो ह्या जगात असताना

(इहैव) त्याच्या शरीरापासून मुक्त होण्यापूर्वी स्वतःच्या वासना आणि क्रोधावर नियंत्रण ठेवतो (''प्राक्शरीरविमोक्षणात्'') - तो योगात स्थित राहतो आणि शाश्वत आनंद प्राप्त करतो. (शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् । कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ।।) ''इहैव'' = इह एव, ह्या जगात असताना. जर तुम्ही ह्या जगात असताना आत्म्याला एक आतील अनुभव म्हणून जाणले तर तुमच्या मृत्यूच्या वेळेस तुमच्या शरीराने तुमचा त्याग केला आहे ह्याची जाणीव तुम्हाला होणार नाही. कारण असे आहे की मरणापूर्वीच, जेव्हा तुम्ही ह्या जगात असता तेव्हाच तुमच्यासाठी तुमचे शरीर अस्तित्वात नसते. मग ते नष्ट करण्यासाठी मृत्यू म्हणण्यासारखे काहीतरी हवे का ? हे शरीर म्हणजे तो नव्हे हे जो पूर्ण जाणतो त्याला मृत्यू नसतो. (जेव्हा तुम्ही शरीर म्हणता तेव्हा मनाचाही त्यात समावेश होतो.) जेव्हा तो जाणतो की शरीर म्हणजे 'मी' नव्हे ('तो' नव्हे) तेव्हा त्याच्या मरणाचा प्रश्न कोठे राहतो? मृत्यू फक्त त्याच्या शरीराला असतो.

ज्या माणसाला मृत्यू नसतो तो 'अमृत' (अमर) असतो. वेदांच्या कर्मकाण्डात येणारी पुरुषसूक्तासारखी स्तोत्रे सुद्धा अशा अमरत्वाविषयी सांगतात. ही कल्पना उपनिषदांमध्ये पुन्हा पुन्हा येते.

शरीर आणि त्याच्याद्वारे काम करणारे मन हे दुःखाचे कारण असतात. सर्व धर्म या बाबतीत सहमत आहेत की मुक्ती ह्या स्थितीत दुःखाची जागा शाश्वत सुख घेते. तथापि, अद्वैताशिवाय, धार्मिक परंपरांच्या अनुसार अशा वरदानासाठी मनुष्याला दुसऱ्या एखाद्या जगात मृत्यूनंतर जावे लागते. शंकराचार्य भगवत्पाद सांगतात की जर एखादा स्वतःचे शरीर म्हणून स्वतःला ओळखणे थांबवेल आणि तो आत्म्याशी स्थित झाला तर त्याला खरी मुक्ती ह्याच जगात मिळू शकते.

''तदेतत् अशरीरत्वम् मोक्षाख्याम्'' असे ते त्यांच्या सूत्रभाष्यात (१-१-४) ठामपणे सांगतात. आपण जसा एखादा आवाज त्याचा उगम माहीत नसता ओळखतो तसा 'अशरीरी' हा शब्द सर्वत्र समजला जातो. (अशरीरी ध्वनी) त्याचा अर्थ शरीराविना. ''अशरीरत्त्वम्'' शरीरहीनत्त्व (अशारीरिक) ही स्थिती अशी असते की एखाद्याला त्याच्या शरीराच्या अस्तित्वाची जाणीव नसते. आचार्य म्हणतात, ही मुक्ती असते. शरीरविहीन, अमूर्त राहणे याचा अर्थ आत्महत्या करणे असा नाही. जेव्हा आपण आपल्या वासना एकेक कमी करू तेव्हा अशा स्थितीला येऊ की त्या सर्व पूर्ण नष्ट होतील. जेव्हा त्यांचे अशा प्रकारे निर्मूलन होईल तेव्हा शरीराची जाणीव आपोआप थांबेल. केवळ आत्मा प्रकाशत राहील. अशा स्थितीला येण्यासाठी दुसऱ्या जगात जाण्याची गरज नाही. जेव्हा वेद आणि वेदान्त ह्याच कल्पनेचा संदर्भ देतात तेव्हा ते म्हणतात, ''इहैव इहैव'' (येथेच प्रत्यक्ष, येथेच प्रत्यक्ष) - मुक्तीची कल्पना येथे आणि आत्ताच.

ह्या अमृत स्थितीला पोहोचण्यास आपल्याला विरोध करणारे आपले दोन शत्रू आहेत: गीतेनुसार ते वासना आणि क्रोध हे होत. श्रुतीचा एक भाग असलेल्या छांदोग्य उपनिषदात याला आधार आहे. त्यात प्रिय अप्रिय असे शब्द एक ठिकाणी येतात. त्या शब्दांचा अर्थ असा ''जे एखाद्याला आवडते आणि ज्याचा एखादा द्वेष करतो'' पहिला वासनेने किंवा कामाने दर्शविला जातो आणि दुसरा रागाने. छांदोग्य उपनिषद् म्हणते की, ज्याला शरीर नसते (ज्याला त्याच्या शरीराची जाणीव नसते) त्याच्यावर वासना किंवा क्रोध यांचा परिणाम होत नाही. म्हणजे (ते म्हणते) जर तुम्हाला वासना आणि क्रोध यांच्यापासून मुक्त व्हायचे असेल तर तुम्ही ह्या जगात असतानाच, आत्ताच, तुम्हाला स्वतःला शरीराविना (तुमच्या शरीरापासून मुक्त) बनविले पाहिजे. (मधवन् मर्त्यं वा इदं शरीरं आत्तं मृत्युना अस्य अमृतस्य अशरीरस्य आत्मनो अधिष्ठानं आत्तो वै सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोः अपहतिः अस्ति अशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ।। (छांदोग्य उपनिषद् ८-१२-१)

जीवात्मा अहंकाराच्या बाबतीत तीन भागात विभागलेला आहे : ''गौणात्मा'', ''मिथ्यात्मा'' आणि ''मुख्यात्मा''. ह्याचा शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्राच्या भाष्यात उल्लेख आलेला आहे.

गौण-मिथ्यात्मनो सत्त्वे पुत्रदेहादिबाधनात्
सद्ब्रह्मात्माहमित्येवम् बोधे कार्यम् कथम् भवेत्

सूत्रभाष्य १.१.४

आपली मुले आणि मित्र हे स्वतःसारखे आहेत असे मानणे आणि त्यांची सुखे आणि दुःखे स्वतःचीच आहेत असे मानणे हा मानवी स्वभाव आहे. 'गौणत्व' म्हणजे 'गौण' याचा अर्थ जे औपचारिक असते ते. आपल्याला माहीत असते की आपली मुले आणि मित्र आपल्यापेक्षा भिन्न आहेत आणि तरीही ते आपले आहेत असा आपल्याला विश्वास ठेवायचा असतो.

आपल्याला आपली मुले आणि मित्र यांच्यापेक्षा आपले शरीर आपल्या अधिक जवळ असते ह्या संदर्भाने 'मी पणाची भावना' म्हणजे 'मिथ्यात्मा'

शरीरापासून आत्मा भिन्न असल्याची एक स्थिती दिसून येते आणि तो शुध्द (आत्मा) अंतस्थ ब्रह्माशी संबंधित असतो : त्याला मुख्यात्मा म्हटले जाते.

जेव्हा आपण पहिले दोन - गौणात्मा आणि मिथ्यात्मा - हे आपणपासून वेगळे केले जातात तेव्हा आपण आपल्या मुलांपासून, मित्रांपासून आणि आपले शरीर तसेच त्याच्या संवेदना यांच्यापासून मुक्त होऊ. नंतर ''मी ब्रह्म आहे'' या आत्मज्ञानाचा उषःकाल येईल. आता आपल्याला काहीच करायचे नाही. हाच या सूत्रभाष्याच्या उद्धरणाचा अर्थ आहे.

स्वामी विवेकानंदांना भारतातील लोकांना जागृत करायचे होते, त्यांनी रामकृष्ण मिशनसाठी कठोपनिषदातील मंत्र निवडला (उठा, जागे व्हा) (उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्य वरान्निबोधत । क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया, दुर्गं पथस्तकवयो वदन्ति ।। - कठोपनिषद - ३-१४) हे उपनिषद अनेक लोकप्रिय वचनांचा उगम आहे. उदाहरणार्थ, त्यात एक मंत्र असा आहे, जो सांगतो की आत्मा हा अध्ययनाच्या किंवा एखाद्याच्या बुद्धीच्या जोरावर जाणला जाऊ शकत नाही आणि (नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन यमेवैष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ।। - कठोपनिषद् २-२३) ''आत्मा हा शरीराचा म्हणजे रथाचा मालक (रथी) आहे आणि शरीर हा रथ आहे, बुद्धी ही सारथी आहे'' हा दुसरा मंत्र. आत्मानं रथिन विद्धि शरीरं रथमेव तु बुद्धिं तु, सारथिं विद्धिमनः प्रग्रहमेवच ।।'' - कठोपनिषद् ३.३

''हृदयाच्या पोकळीतील अंगुष्ठमात्र परमात्मा तेजस्वी असतो''. (अङ्गुष्ठमात्रः पुरुषो मध्य आत्मनि तिष्ठति । ईशानो भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ।। एतद्वैतत् ।। अङ्गुष्ठमात्रः पुरुषो ज्योतिदिवाधूमकः । ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्वः ।। एतद् वैतत् ।। - कठोपनिषद् ४-१२-१३)

आपण ''दीपाराधन'' विधीच्या वेळेस म्हणतो तो मंत्र आहे (न तत्र सूर्यो भाति) : ''तेथे सूर्यही, चंद्रही तारेही चमकत नाहीत. विजेचा लखलखाट नसतो. अग्नीसुद्धा चमकत नाही. जेव्हा तो (परमात्मा) प्रकाशतो तेव्हा हे सर्व त्याच्या प्रकाशाने चमकतात.''( न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं, नेम विद्युतो भाति कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं, तस्य भासा सर्वमिदं विभाति ।। - कठोपनिषद् ५-१६) आपले सर्व ज्ञान त्या महान प्रकाशातून येते. आपण आपल्या मर्यादित प्रकाशाने त्या पुरुषावर प्रकाश टाकू शकत नाही.

नंतर कठोपनिषद्, जे श्रीकृष्ण गीतेत संसाराचा किंवा भौतिक अस्तित्वाचा प्रतीक असलेल्या वैश्विक पिंपळ (अश्वत्थ) वृक्षाबाबत सांगतात त्याचा उल्लेख करते. (ऊर्ध्वमूलोऽवावशाख एषोऽश्वत्थः सनातनः । तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते । - कठोपनिषद ६-१) जर हृदयातील सर्व वासनाचा नाश झाला तर मनुष्य अमर होईल आणि येथेच तो ब्रह्म जाणेल.

कठोपनिषदा नंतर अथर्ववेदातील प्रश्नोपनिषद्, मुण्डकोपनिषद् आणि माण्डुक्योपनिषद् येतात. प्रश्न म्हणजे शंका, विविध जीवांचे उगमस्थान कोणते? कोणत्या देवता त्यांचे पोषण करतात? जीवन शरीराला प्रेरणा कशी देते? जागृती, निद्रा आणि स्वप्नावस्था यांच्याबाबत सत्य काय? ओम् शी एकनिष्ठ झालो तर कोणता हेतू साध्य होईल? परमात्मा आणि जीवात्मा यात काय संबंध आहे? ह्या प्रश्नांना प्रश्नोपनिषदात उत्तरे दिली आहेत.

''मुण्डन म्हणजे हजामत, फक्त उच्च दर्जाची प्रगल्भता असलेले तपस्वी आणि संन्यासी मुण्डकोपनिषदाचे अध्ययन करण्यास पात्र असतात - असे म्हटले जाऊ लागले. हे उपनिषद अक्षरब्रह्माविषयी बोलते, अक्षर म्हणजे 'अमर/अविनाशी' आणि आपण 'पंचाक्षर' 'अष्टाक्षर' इ. बाबत बोलतो. सर्व ध्वनींचा उगम ''प्रणव'' किंवा ''ओंकार'' आहे. विशेषतः प्रणव-अक्षरब्रह्म प्राप्त करण्यासाठी परिणामकारक आहे. (पंचाक्षर आणि अष्टाक्षर हे अनुक्रमे पाच व आठ अक्षरे असलेले 'ओम् नमः शिवाय' आणि 'ओम नमो नारायणाय्' हे मंत्र आहेत.)

मुण्डकोपनिषदातील एक मंत्र आपल्याला ओंकाराच्या धनुष्याच्या दोरीला आत्म्याचा बाण लावून ब्रह्म नावाचे ध्येय अविचलित होऊन मिळविण्यास सांगते. (प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते । अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत ।। - मुंडकोपनिषद् २-२-४) बाणाप्रमाणे तुम्ही ब्रह्माशी एक व्हायला हवे. जीवात्मा आणि परमात्मा यांची तुलना शरीरावर म्हणजे पिंपळाच्या झाडावर बसलेल्या दोन पक्ष्यांबरोबर केली आहे. हेही ह्या उपनिषदात आहे. जीवात्मा (वैयक्तिक आत्मा) एकटाच कर्माचे फळ खातो आणि परमात्मा पक्षी केवळ त्याचा साक्षी असतो. हा बायबल मधील ॲडम (आत्मा) आणि ईव्ह (जीव) कथेचा आधार आहे. ॲडम सफरचंद खात नाही पण ईव्ह खाते. (द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिष्यस्वजाते । तयोरन्य पिप्पलं स्वादु अत्ति = अनश्नन् अन्यो अभिचाकशीति ।। - मुंडकोपनिषद् ३-१-६)

भारतीय संघराज्याचे बोधवाक्य - ''सत्यमेव जयते'' हे ह्या उपनिषदातून घेतलेले आहे. (सत्यमेव जयते नानृतं, सत्येन पन्था विततो देवयानः । येनाक्रमन्ति ऋषयो हि आप्तकामाः, यत्र तत् सत्यस्य परमं निधानम् ।। - मुण्डकोपनिषद् ३-१-६)

त्यात एक असाही मंत्र आहे, तो सांगतो, संन्यासी ह्या जगात जीवनमुक्त झाल्यावर विदेही होतो. (शरीराविना मुक्त झालेला) (वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्याः संन्यासयोगातयतयः शुद्धसत्वाः । ते ब्रह्मलोकेषु पुरान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ।। - मुंडकोपषिद् ३-२-६) हा मंत्र जेव्हा 'पूर्णकुंभात' तपस्वींना सन्मानाने बोलावले जाते तेव्हा म्हटला जातो. (आचार्य आणि अन्य लोकोत्तर पुरुषांचे स्वागत जलाने भरलेल्या व आंब्याच्या झाडाची पाने, दर्भ व तृण इत्यादींनी सजविलेल्या पूर्णकुम्भाने किंवा पात्राने करण्याची परंपरा आहे.)

मुण्डकोपनिषद् ज्ञानीविषयी म्हणते : निरनिराळ्या नावाच्या नद्या, त्यांची नावे (यथा नद्यः स्पन्दमानाः समुद्रे अस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान् नामरूपादिविमुक्तः परात् परं पुरुषमुपैति दिव्यम् ।। - मुंडकोपिनषद ३-२-८) आणि आकार सागरात सामावतात, त्याचप्रमाणे नाव आणि रूप यांपासून मुक्त झालेला ज्ञानी ब्रह्माशी अतूटरित्या एकरूप होतो. पुढचे उपनिषद आहे, मांडूक्योपनिषद्.

मण्डुक म्हणजे 'बेडूक'. बेडूक उपनिषद असे नाव का ? एक कारण मला असे सुचते की, बेडूक पायरी पायरीने जात नाही. तो एका पायरीवरून चौथ्या पायरीवर उडी मारतो. माण्डुक्योपनिषदात, निद्रा आणि स्वप्न यांद्वारे जागृतीपासून तुर्यावस्था किंवा चौथ्या पायरीवर पोहोचण्याचा मार्ग दाखविते. ओंकारास (अक्षर उपासनेने) स्वतःला समर्पण करून (तीव्र ध्यान करून) एखादा एका झेपेत चौथ्या पायरीवर पोहोचू शकतो. म्हणून कदाचित ह्या उपनिषदाला माण्डुक्य म्हटले जाते. आधुनिक संशोधक विद्वानानुसार माण्डुक्य उपनिषद हे ज्या लोकांचे बेडूक हा प्रतीक होता अशा लोकांचे होते. (असेही म्हटले जाते की ह्या उपनिषदाशी संलग्न असलेल्या वरुणाने बेडकाचे रूप धारण केले होते.)

माण्डुक्योपनिषदाचा पाठ अतिशय संक्षिप्त आहे आणि यात केवळ बारा मंत्र आहेत. परंतु साधकांमध्ये त्याने विशेष स्थान प्राप्त केले आहे कारण ते अर्थाने संपृक्त आहे. ते प्रणवाच्या चार पदांनी जीवात्मा आणि ब्रह्म यांचे ऐक्य दर्शविते. ह्या उपनिषदाच्या अखेरीस येणारा एक प्रसिद्ध उतारा आहे, ज्यात ''शिव-अद्वैत'' यात संपूर्ण विश्व विलीन झालेले असते अशा तुरिया अवस्थेचा अनुभव वर्णन करतो. (अमात्रः चतुर्थः अव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवः अद्वैतः) एवमोङ्कार आत्मैव, संविशति आत्मजाऽऽत्मानम् य एवं वेद य एवं वेद ।। - मांडुकोपनिषद १२) शंकर भगवत्पादांच्या गुरूंचे गुरू गौडपादाचार्य यांनी ह्या उपनिषदावर भाष्य केलेले आहे. (माण्डुक्योपनिषद-कारिका) आणि शंकराचार्यांनी त्याच्यावर त्यानंतरचे भाष्य केले आहे.

आता, तैत्तिरीय उपनिषद्. मागे मी वैशंपायन आणि त्यांचे शिष्य याज्ञवल्क्य यांच्यात निर्माण झालेल्या गैरसमजुतीचा संदर्भ दिलेला होता. रागाच्या भरात गुरूने त्याच्या शिष्याला जो वेद त्यांनी शिकविला होता तो टाकून द्यायला सांगितला होता. याज्ञवल्क्याने त्या आज्ञेनुसार केले. नंतर सूर्याने त्याला शुक्ल-यजुर्वेद शिकविला, तो वेद तोपर्यंत जगात प्रकट झालेला नव्हता.

याज्ञवल्क्य, मंत्रामुळे प्राप्त केलेल्या बळावर वैशंपायनाकडून प्रथम शिकलेला वेद टाकून देणारा हंस झाला. आता त्या गुरूंच्या इतर शिष्यांनी, आज्ञेनुसार तित्तिरी पक्ष्याचे रूप धारण केले आणि याज्ञवल्क्याने जे टाकून दिले होते ते वेद ग्रहण केले. म्हणून यजुर्वेदाच्या ह्या शाखेला तैत्तिरीय शाखा म्हणू लागले. तैत्तिरीय हे नाव ह्या शाखेच्या संहिता, ब्राह्मण आणि आरण्यकालाही लावले जाते. तैत्तिरीय उपनिषद हे तैत्तिरीय आरण्यकाचा भाग आहे आणि कदाचित इतर कोणत्याही उपनिषदापेक्षा हे अधिक अभ्यासले जाते. धार्मिक कृत्यांमध्ये वापरले जाणारे अनेक मंत्र ह्यातून घेतलेले आहेत. शिक्षावल्ली, आनंदवल्ली आणि भृगुवल्ली ही त्याचे तीन भाग आहेत.

शिक्षावल्लीत, शिक्षणासंबंधीच्या बाबी, ब्रयचर्याश्रमाचे नियम, त्याचे महत्त्व, वेद

पठणाचा क्रम, प्रणवाचे चिंतन हे विषय आहेत. आवहन्ती होम शिक्षावल्लीत आहे. (आवहन्ती वितन्वाना । कुर्वाणाऽचीरमात्मनः । वासांसि मम गावश्च । अन्नपाने च सर्वदा । ततो मे श्रियमावह । लोमशां पशुभिः सह स्वाह । आमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । विभायन्तु ब्रह्मचारिणः प्रमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । शमायन्तु ब्रह्मचरिणः स्वाहा । - तैत्तिरीय उपनिषद १-४-२) शिष्य विना अडथळा त्यांच्याकडे अध्ययनाला यावेत याची खात्री व्हावी म्हणून आचार्याकडून हा केला जात असे. आजसुद्धा आपल्या अनुभवावरून लक्षात येते की ह्या होमाचा परिणाम म्हणून जी वैदिक विद्यालये बंद पडणार होती त्यांना, अनेक नवीन विद्यार्थ्यांच्या प्रवेशामुळे पुन्हा जीवन मिळाले.

शिक्षावल्ली, ''आत्म-स्वराज्य'' ह्या आपल्याला राजकारणामुळे परिचित असलेल्या अर्थापेक्षा श्रेष्ठ असलेल्या शाश्वत स्थितीचा उल्लेख करते. (सुवरित्यादित्ये । मह इति ब्रह्मणि । आप्नोति स्वाराज्यम । आप्नोति मनसस्पातिम् । वाक्यतिश्चक्षुष्यत्तिः । श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः । एतत्ततो भवति । आकाशशरीरं ब्रह्म । सत्यात्प्राणारामं मन आनन्दम् । शान्तिसमृद्धममृतम् । इति प्राचीनयोभ्योपासस्व ।। - तैत्तिरेय उपनिषद (१-६-२)

''सत्य बोल, धर्माचे आचरण कर : असा शिष्यांना केलेल्या कळकळीच्या आज्ञांचा समावेश ह्या उपनिषदात आहे. वेदांचे अध्ययन कधीही टाळू नये असे आवाहन विद्यार्थ्यांना केलेले आहे. त्यांना विवाह करणे आणि संतती प्राप्त करण्याचे सांगितले आहे की त्यामुळे वेदांचे अध्ययन पिढ्यानुपिढ्या चालू राहील. ''मातृ-देवो भव, पितृ-देवो भव, आचार्य-देवो भव, अतिथी-देवो भव हे सर्व मंत्र ह्या उपनिषदात आहेत. यात दानाचे आणि धर्माचे महत्त्व यावर जोर दिलेला आहे. (वेदमनुच्य आचार्य : अन्तेवासिनम् अनुशास्ति । सत्यं वद । धर्मंचर । स्वाध्यायान् मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेसीः । सत्यान् न प्रमदितव्यम् । धर्मान् न प्रमदितव्यम् । कुशलान् न प्रमदितव्यम् । भूत्यैः न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यानि अनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि । यानि अस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि । ये क च अस्मच्छ्रेयांसो ब्राह्मणाः । तेषां त्वया SS सनेन प्रश्वसितव्यम् श्रद्धया देयम् । अश्रद्धया अदेयम् । श्रिया देयम् । ऱ्हिया देयम् । भिया देयम् । संविदा देयाम् । - तैत्तिरेय उपनिषद १-११-१,२,३)

पूर्वी आनंदाच्या गुणाकार तक्त्याविषयी बोललो आहे त्यात अगोदरच्या आनंदापेक्षा पुढचा आनंद शंभर पटीने मोठा असतो. तैत्तिरीय उपनिषदाच्या आनंदवल्ली भागात हे तुम्हाला दिसते. ह्या सारणीतील सर्वोच्च आनंद म्हणजे ब्रह्मानंद (ब्रह्म जाणण्याचे सौख्य) होय. ह्याच भागाच्या प्रकरण ३० च्या मधील टिपा पाहा.

ह्या उपनिषदात मानवाच्या निरनिराळ्या कोषांचा उल्लेख आहे. पहिला ''अन्नमय-

कोष'' आहे, मांस जे अन्नग्रहणाबरोबर वाढते. त्याच्या आत प्राणमय-कोष आहे. नंतर मनोमय-कोष येतो जो विचार आणि भावनांचे कारण होतो. चौथा विज्ञानमय-कोष आहे. आणि शेवटी पाचवा आनंदमय-कोष. येथे आत्मा सुखात राहतो. प्रत्येक कोष हा मस्तक, पंख, शरीर, पोट यांच्यासह मूर्तिमंत असलेल्या एखाद्या पक्ष्यासारखा असतो - ह्यात तत्त्वज्ञानात्मक अर्थ आहे. ह्या उपनिषदात नेहमी उद्धृत केला जाणारा मंत्र आहे (यतो वाचो ...) तो म्हणतो : ज्याला ज्यापासून वाणी आणि मन दूर जाते असा ब्रह्मानंद ज्ञात आहे, अशा मनुष्याला कसलेही आणि केव्हाही भय नसते. (यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह । आनन्दं ब्रह्मणो विद्वान । न बिभेति कुतश्चनेति । एतं ह वाव न तपति । किमहं साधु नाकरवम् । किमहं पापकरवमिति । स य एवं विद्वानेते आत्मानं स्पृणुते । उभे ह्येवैष एते आत्मानं स्पृणुते । य एवं वेद । इत्युपनिषत् । - तैत्तिरेय उपनिषद (२-९-१)

''भृगुवल्ली'' हा वरुणाने त्याच्या मुलाला केलेला उपदेश आहे. गुरूकडून एखाद्या विद्यार्थ्याला केलेली आज्ञा असा तो समजायचा नाही. वरुण त्याच्या मुलाला त्याच्या स्वतःच्या प्रयोगातून आणि अनुभवातून एकेक पायरी वर जाण्यास प्रोत्साहन देतो. भृगु तपश्चर्या करतो आणि त्याला अन्नमय कोष सत्य वाटतो. ह्या स्थितीपासून तो हळूहळू प्राण, मन आणि ज्ञान ह्या कोषांमधून पुढे जातो आणि तो आनंदमय कोष ह्या सत्याप्रत येतो. आत्मा हेच अंतिम सत्य आहे ह्याचा त्याला अनुभव येतो.

ह्याचा अर्थ असा नाही की तैत्तिरीय उपनिषदाने अन्नमय कोष प्रतिनिधित्व करीत असलेल्या भौतिक जगाला नाकारले आहे. ह्या जगात असताना, त्याच्या उद्योगात भाग घेत असताना, आपण सर्वोच्च सत्याचे भान ठेवले पाहिजे. त्यासाठी, आत्मिक प्रगतीचे माध्यम म्हणून आपण आपले जीवन अधिक धार्मिक करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणून जे आनंदमय कोषापर्यंत पोहोचले आहेत त्यांनाही इशारा दिलेला आहे : ''अन्नाविषयी वाईट बोलू नका. ते फेकून देऊ नका. भरपूर अन्न पिकवा.'' (अन्नं न निन्द्यात् । तद्व्रतम् । प्राणो व अन्नम् । शरीरमन्नादम् । प्राणे शरीरं प्रतिष्ठितम् । शरीरे प्राणः प्रतिष्ठितः । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् । स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् वेद प्रतितिष्ठति । अन्नवान्नादो भवति । महान्भवाति । प्रजयापशुभिर्ब्रह्म वर्चसेन । महात्कीत्या । - तैत्तिरेय उपनिषद ३-७-१) 'अधिक धान्य पिकवा' ह्या मोहिमेसाठी शासनाने सुद्धा हा मंत्र वापरलेला आहे. तैत्तिरीय उपनिषद ह्या मंत्राने समारोप करते : ''मी अन्न आहे, मी अन्न आहे, जो ते खातो ...'' (अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादो S हमन्नादोS हमन्नादः । अहं श्लोककृदहं । श्लोककृदहं श्लोककृत । अहमस्मि प्रथमजा ऋतस्य पूर्वं देवेभ्यो अमृतस्य न भायि । यो मा ददाति स इदेव मा वाः । अहं अन्नं अन्नमदन्तमास्मि । अहं विश्वं भुवनं अभयभवाम् । सुवर्ण ज्योति । य एवं वेद इत्युपनिषत् ।। - तैत्तिरेय उपनिषद ३-१०-६)

ऐतरेय उपनिषद हे ऋग्वेदाच्या ऐतरेय आरण्यकाचा भाग आहे. ऐतरेय ऋषींनी ह्याचा सर्वत्र प्रसार केला म्हणून हे नाव आले. हे उपनिषद म्हणते पित्यापासून उगम पावलेला जीव (जीवात्मा) मातेच्या गर्भात प्रवेश करतो. तो ह्या जगात जन्मतो आणि त्याच्या पुण्यशील आणि पापमय कर्म असलेल्या जीवनातून जातो. नंतर तो पुन्हा पुन्हा निरनिराळ्या जगात जन्मतो. केवळ आत्मा जाणल्याने त्याला ह्या इंद्रियगोचर अस्तित्वाच्या बंधनापासून मुक्तता मिळते.

वामदेव नावाच्या ऋषीला, तो त्याच्या आईच्या गर्भात असतानाच त्याला आपले पूर्वीचे सर्व जन्म माहीत होते. तो सर्व तटबंद्यातून पार गेला आणि आकाशात उंच सूर मारणाऱ्या गरुडाप्रमाणे मुक्ती शोधत फिरला. ह्या संदर्भात प्रज्ञान, आत्म्याचे थेट आकलन याची खूप स्तुती झाली. ते म्हणजे निव्वळ, ज्ञानाद्वारे (प्रज्ञान) ब्रह्माची प्राप्त करणे असे नाही. वस्तुतः प्रज्ञान हेच ब्रह्म होय. (एष ब्रह्मेश इन्द्र एष प्रजापतिरेते सर्वे देवा इमानि च पंच महाभूतानि पृथिवी वायुराकाश आपो ज्योतिषीत्येतानि मानि च क्षुद्रामिषाणीव । बीजानीतराणि चेतराणि चाण्डजानि च जारुजानि च स्वेदाजानि चोद्‌भिजानि चाश्वा गावः पुरुषा हस्तिनो यत्किंचेदं प्राणि जंगमं च पतत्रि च यच्च स्थावरं । सर्वं तत् प्रज्ञानेत्रं प्रज्ञाने प्रतिष्ठितं प्रज्ञानेत्रो लोकः प्रज्ञा प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म ।। - ऐतरेय उपनिषद ३-१-३) 'प्रज्ञानं ब्रह्म' हे ऋग्वेदातील महावाक्य होय.

छांदोग्य आणि बृहदारण्यक उपनिषदे ही मुख्य दहा उपनिषदापैकी शेवटची दोन आहेत आणि सर्वात मोठी आहेत. ती दोन इतर आठ एकत्र केली तरी त्याहून अधिक मोठी आहेत. पहिले हे सामवेदाच्या छांदोग्य ब्राह्मणाचा एक भाग आहे. छांदोग्य म्हणजे ''छंदोग'' शी संबंधित, जो साम गातो. तमीळ तेवारम हा परमेश्वराचे ''छंदोगान कान'' असा संदर्भ देतो. झेंद-अवेस्ता हा झोरोस्ट्रीअन लोकांच्या ग्रंथाच्या उगमाचा माग छंदोग्य - अवेस्ता असा होतो.

जसे गीतेमध्ये कठोपनिषदातील परिच्छेद आहेत, तसे ब्रह्मसूत्रात छांदोग्य उपनिषदातील आहेत. ह्या दोन्ही उपनिषदांमध्ये अनेक ऋषींचा उपदेश एकत्र केलेला आहे.

छांदोग्य उपनिषदाचे प्रारंभिक मंत्र ओंकाराचा ''उद्‌गीता'' म्हणून संदर्भ देतात आणि एखाद्याने त्यावर कसे चिंतन करावे हे स्पष्ट करतात. अक्षि, आकाश, मधु, शांडिल्य, प्राण आणि पंचाग्नि अशा अनेक विद्यांचा त्यात उल्लेख आहे. वेगवेगळ्या प्रकारे अंतिम सत्य जाणण्यास त्या मदत करतात. ''दहर विद्या'' ही सर्वांचा कळस आहे : ती म्हणजे आपल्या हृदयाच्या छोट्याशा अवकाशात बाहेरच्या श्रेष्ठ अवकाशातील परमात्म्याला आकलन करणे होय. ह्या उपनिषदात गोष्टींच्या रूपाने अनेक सत्यांचे विवरण केलेले आहे.

'रैक्वाच्या कथेद्वारे आपल्याला, ज्याने ब्रह्म जाणलेले आहे त्याचे विलक्षणी बाह्य वर्तन

समजते. नंतर ज्याला आपले गोत्र माहीत नव्हते पण गौतमाने त्याला शिष्य म्हणून स्वीकारले अशा सत्यकामाची प्रसिद्ध कथा आहे. गुरू विचार करतात की सत्यकाम खरा ब्राह्मण आहे कारण तो स्वतःसंबंधी काहीही लपवून ठेवत नाही. विद्यार्थ्याला अध्यापन करण्यापूर्वी त्याला अनेक परीक्षांमधून जाणे भाग पडे. गुरूची पत्नी विद्यार्थ्याच्या चिंतेपोटी, तिच्या पतीशी त्याच्यासाठी बोलते. जेव्हा आपण अशा कथा वाचतो तेव्हा आपल्यासमोर प्राचीन काळातील गुरुकुलवासाचे नेमके चित्र उभे राहते.



श्वेतकेतू हा वृत्तीने सत्यकामापेक्षा भिन्न होता आणि त्याला त्याच्या अध्ययनाचा गर्व होता. त्याचे वडील उद्दालक आरुणी त्याला नम्रता शिकवतात आणि शेवटी त्याला मंत्र देतात, ''तत् त्वम् असि'' (ते तू आहेस), हा मंत्र जीवात्मा आणि ब्रह्म यांतील अभेद घोषित करतो. ''तत् त्वं असि'' हे सामवेदातील महावाक्य आहे. (स य एषोऽणिमैतदाम्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयात्विति । तथा सोम्येति होवाच ।। - छान्दोग्य उपनिषद ६-६-८७)

श्वेतकेतूपेक्षा भिन्न स्वभाव असलेले, अध्ययनाच्या सर्व शाखांवर प्रभुत्व मिळविले होते असे नारद ऋषी नम्र होते आणि आत्म्याबद्दल अज्ञानी राहिल्यामुळे त्यांना दुःख होत होते. ते छांदोग्य उपनिषदात समाविष्ट असलेल्या सनतकुमारांच्या उपदेशात ज्ञान शोधतात. तैत्तिरीय उपनिषदात भृगुला पायरीपायरीने अधिक उच्च ज्ञान मिळविण्याचे शिकविले जाते (अन्नमय कोषाकडून आनंदमय कोषाकडे). ह्यात सनतकुमार नारदाला आकाराच्या शुद्धतेकडून आतील इंद्रियांच्या अंतःकरणाच्या शुद्धतेकडे जायला सांगतात. त्याच वेळेस सर्व बंधने काडकन तुटतील आणि आनंद (ब्रह्म) जाणले जाईल म्हणतात.

प्रत्येक शिष्याला त्याच्या प्रगल्भतेनुसार एकाच उपदेशाचा वेगवेगळा लाभ कसा होतो ह्याचे उदाहरण देणारी दुसरी कथा आहे. प्रजापतीने देवांचा राजा इंद्र आणि असुरांचा राजा पुरोचन ह्यांना एकच उपदेश केला. ''जो त्याच्या डोळ्यांनी पाहतो तो आत्मा.'' तो सूचकपणे डोळ्यांमागे, ज्ञान इ. मागे असलेल्या वस्तूचा निर्देश करतो; जे ह्या सर्वांचा आधारभूत आहे. हे न समजता ते दोघे त्यांना स्वतःला आरशामध्ये पाहतात आणि ती प्रतिमा म्हणजे आत्मा असल्याचे मानतात. तुम्ही तुमचे शरीर आरशामध्ये पाहता आणि विरोचन ते तेच आहे ह्या निर्णयावर येतो. ह्या कल्पनेतून पुढे नास्तिकवाद, जडवाद आणि लोकायत पद्धतीचा विकास झाला. जरी इंद्राने हा आरशाचा चुकीचा दृष्टिकोन घेतला तरी शेवटी (अन्नमय कोषाकडून आनंदमय कोषाकडे जाणाऱ्या भृगुच्या तैत्तिरीय उपनिषदातील कथेप्रमाणे) तो क्रमाक्रमाने जड शरीराकडून तरल निद्रारूप देहाकडे जातो, नंतर तुरिया अवस्थेकडे किंवा मांडुक्योपनिषदात सांगितलेल्या स्थितीकडे जातो - तुरिय म्हणजे आत्मा.

बृहदारण्यक उपनिषद शेवटी येते. ''बृहद्'' म्हणजे ''मोठे''. ते खरोखरच मोठे

उपनिषद आहे. बृहदारण्यक. सामान्यतः उपनिषद त्या शाखेच्या आरण्यकाच्या शेवटी येते. ईशावास्योपनिषद शुक्ल यजुर्वेदाच्या संहितेमध्ये येते, बृहदारण्यक उपनिषद हे त्याच वेदाच्या आरण्यकात येते : खरे तर संपूर्ण आरण्यकच हे उपनिषद बनते. त्याचे दोन भाग आहेत : माध्यंदिन शाखा आणि काण्व शाखा. शंकराचार्यांनी नंतरची शाखा त्यांच्या भाष्यासाठी निवडली.

ह्या उपनिषदात सहा प्रकरणे आहेत. पहिले दोन ''मधुकाण्ड''. नंतरचे दोन याज्ञवल्क्याच्या नावाने असलेले ''मुनिकाण्ड'' आणि शेवटचे दोन ''खिल काण्ड''. जे आनंदाच्या सुगंधाने भरलेले आहे असे ते मधुकाण्ड म्हणून समजले जाते. परब्रह्माचे मूर्तिमंत स्वरूप हे सर्व जग आहे ह्याची आपल्याला जाणीव झाली तर हे सर्व सजीवांना अमृत असेल आणि सर्व सजीव हे मधाप्रमाणे असतील. मग आत्मा हा सर्वांचे अमृत असेल. ही कल्पना मधुकाण्डात व्यक्त केलेली आहे. आत्मा ''हेही नाही'' आणि ''तेही नाही'' (नेति नेति) असे सुप्रसिद्ध वचन ह्या उपनिषदात आहे : (स वा एष महानज आत्मा योऽयं विज्ञानमयः प्रणेषु य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी सर्वस्येयानः सर्वस्याधिपतिः स न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयातेष सर्वेश्वर एव भूताधिपतिरेष भूतपाल एष सेतुर्विधरण एषां लोकानामसम्मेदाय तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेनैतमेव विदित्वा मुनिर्भवति । एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजान्ति । एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायश्च वित्तैषणायश्च लोकैषणायश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैष्णा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः । स एष 'नेति नेत्यात्माऽगृह्यो न गृह्यतेंऽशीर्यो न हि शीर्यतेऽसंगः । न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्येतम हैवेते न तरत इत्यतः पापकरवमित्यतः कल्याणमकरवमित्युभे ३ हैवैष्य एते तरान नैनं कृताकृते तपतः । - बृहदारण्यक उपनिषद - ४-४-२२) आत्मा कोणत्याही प्रकारे वर्णन केला जाऊ शकत नाही. ''न-इति'' - ''नेति'' अशा 'नेति' 'नेति' रीतीने तुम्ही आत्मा जाणण्यासाठी प्रत्येक गोष्ट सोडून देता - विश्व, शरीर, मन, प्रत्येक गोष्ट. आत्म्याला जाणल्यानंतर, हे सर्व भौतिक जग आणि सर्व सजीव हे या एकाच आनंदतत्त्वाचे बनलेले आहेत असा दृष्टिकोन तुमच्यात विकसित होतो.

पहिल्या काण्डात गार्ग्य ब्राह्मणाने अजातशत्रू ह्या क्षत्रियाकडून घेतलेला उपदेश आहे. ही गोष्ट दाखविते की अजातशत्रू आणि जनकासारखे राजे हे ब्रह्मज्ञानी होते. आपल्याला हेही समजते की ब्रह्माच्या स्वरूपावरील राजसभेतील चर्चेत स्त्रियासुद्धा ऋषींच्या इतक्याच समानतेने भाग घेत असत. उदाहरणार्थ, जनकाच्या विद्वत् सभेत गार्गी होती. बृहदारण्यक उपनिषद याज्ञवल्क्याच्या दोन पत्नींविषयी सांगते : दोघीपैकी कात्यायनी ही कोणत्याही सामान्य गृहिणीप्रमाणे होती आणि दुसरी मैत्रेयी ही ब्रह्मवादिनी होती (जी ब्रह्माचा शोध घेते

आणि त्यासंबंधी बोलते). याज्ञवल्क्याने मैत्रेयीला केलेला उपदेश दोन्हीमध्ये मधुकाण्डात आणि मुनीकाण्डात येतो. येथे कथाकथन आणि विस्तृत तत्त्वज्ञानात्मक विवेचन यांचा सुंदर संयोग आहे.



याज्ञवल्क्य ह्या जगाचा त्याग करण्याच्या बेतात असताना तो त्याची संपत्ती दोन्ही पत्न्यांमध्ये विभागतो. कात्यायनी संतुष्ट असते, ती आणखी काही मागत नाही. दुसऱ्या बाजूला मैत्रेयी तिच्या हिश्श्याची चिंता करीत नाही. ती पतीला सांगते : ''तुम्ही तुमचे घर सोडून जात आहात, नाही का; कारण तुम्हाला ह्या संपत्तीपेक्षा संन्यासात अधिक मोठे सुख मिळेल? ते सुख कोणते? त्याबाबत तुम्ही सांगणार नाही का?''

याज्ञवल्क्य उत्तर देतो : ''मैत्रेयी तू मला नेहमीच प्रिय राहिली आहेस. हा प्रश्न विचारून तू मला अधिकच प्रिय झाली आहेस.'' तो नंतर कोणी कोणाला प्रिय असतो ह्या विचाराचा अर्थ काय ह्याचा शोध घेण्यास तो पुढे जातो. प्रेम आणि जिव्हाळा यांचा शोध हा खराच शोध आहे. तो म्हणतो : ''पतीला पत्नी प्रिय असते ते पत्नी म्हणून नव्हे तर स्वतःच्या आत्म्यासाठी प्रिय असते. तसा पत्नीला पती प्रिय असतो तो तिच्या आत्म्यासाठी असतो. मुले आपल्याला प्रिय असतात त्याचे कारण ते नसून आपला आत्मा असतो. तसाच प्रकार आपल्या संपत्तीच्याबाबत असतो आपल्याला एखादी वस्तू किंवा व्यक्तीबद्दल प्रेम असते कारण ती आपल्या आत्म्याला सुख देते. ह्याचा अर्थ असा की आत्माच जिव्हाळा, प्रेम, आनंद यांसारखा असतो. आपण जे आपल्याला प्रिय आहेत त्यांचा त्याग करतो आणि संन्यास घेतो ह्याशिवाय आत्मा इतर गोष्टीपेक्षा स्वतंत्रपणे समजून घेणे होय. जेव्हा आपल्याला तो, आत्मा समजतो तेव्हा आपल्याला समजते की त्याच्याशिवाय अन्य काही नाही. प्रत्येक गोष्ट आपल्याला प्रिय होईल. जेव्हा आपल्याला ठरावीक लोक किंवा वस्तू आवडतात तेव्हा आपल्याला ठरावीक लोक किंवा ठरावीक वस्तू आवडत नाहीत. जर आपण असे आवडणाऱ्या लोकांना किंवा वस्तूंना जोडलेले राहण्याचे थांबवू आणि आत्म्याला जाणू तर आपल्याला, आत्म्याशिवाय अन्य काहीच नाही याची जाणीव होईल. मग आपण कोणाचाही द्वेष करणार नाही आणि काहीही भेद न करता सर्वांवर प्रेम करू.

ह्या जगाचा त्याग करण्यापूर्वी याज्ञवल्क्याने जनकाच्या राजसभेत, कहोल, उद्दालक, आरुणी आणि गार्गी यांच्यासमवेत अंतिम सत्य या विषयावर वादविवाद ठेवला. त्याने जनकाला केलेल्या उपदेशासह ह्या वादविवादाचा समावेश मुनी-काण्डात आहे. अंतर्यामी (आतील नियंत्रक) ही कल्पना विशिष्टाद्वैताची आहे. (विशेष असे अद्वैत). ह्याचा आधार उद्दालक आरुणीने विचारलेल्या प्रश्नाला याज्ञवल्क्याने दिलेल्या उत्तरात आहे.

अद्वैतानुसार हे सर्व इंद्रियगोचर विश्व माया आहे. अंतर्यामीच्या कल्पनेमागे हे जग शरीर आहे, त्यात परमात्मा त्याचे जीवन म्हणून राहतो. जसे याज्ञवल्क्य ठरावीक स्तरावर

मान्य करीत असले तरी अन्य वेळी त्याचे दृष्टिकोन पूर्णपणे अद्वैती आहेत. श्रेष्ठ अद्वैती असलेल्या याज्ञवल्क्याचे मैत्रेयीला शेवटचे समारोपातले शब्द आहेतः ''जरी तुझ्या नजरेत तू थोडी जरी द्वैती असशील, म्हणजे तू तुझ्याशिवाय अन्य गोष्टींकडे पाहतेस, तू तुझ्याशिवाय अन्य गोष्टींचा गंध घेतेस, चव घेतेस, स्पर्श करतेस आणि ऐकतेस. जेव्हा तू आत्मा जाणशील तेव्हा ह्या सर्व वस्तू अस्तित्वात असण्याचे थांबतील. जे पाहणे, ऐकणे, चव घेणे, वास घेणे आणि इतर यांचे उगमस्थान आहे - ते तू कशी पाहशील, ऐकशील, चव घेशील, वास घेशील ? अद्वैताचे स्पष्टीकरण केल्यानंतर याज्ञवल्क्य जनकाला सांगतो, ''पाण्यात पाणी मिसळल्यासारखे सर्व परमात्म्यात एक होतात. (सलिल एको द्रष्टाऽद्वैतो भवत्येष ब्रह्मलोकः सम्राडिति हैनमनुशशास याज्ञवल्क्य एषास्य परमा गतिरेषास्य परमा सम्पदेस्वस्य परमो लोक एषोऽस्य परम आनन्द एतस्यैवानन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति ।। - बृहदारण्यक उपनिषद (४-३-३२) ''जो सर्व वासनांतून मुक्त होतो तो ह्या जगातही (त्याच्या शरीरासह) ब्रह्मासारखा राहतो आणि जेव्हा तो मरण पावतो तेव्हा तो ब्रह्माशी जोडला जातो. (तदेष श्लोको भवति । तदेव सक्तः सह कर्मणैति लिंगं मनो यत्र निषक्तमस्य । प्राप्यान्तं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययम् । तस्माल्लोकात्पुनरैत्यस्मै लोकाय कर्मण इति तु कामयमानोऽथा कामयमानो योऽ कामो निष्काम आप्तकाम आत्मकामो न तस्य प्राणा उत्क्रामान्ति ब्रह्मैव सन्ब्रह्मप्येति तदेष श्लोको भवति । यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामायेस्य हृदि श्रिताः । अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुत इति । तद्ययाहि निर्त्वयनी वल्मीके मृता प्रत्यस्ताशयीतैवमेवेदं शरीरं शेतेऽथायमशरीरोमृतः प्राणो ब्रह्मैव तेज एव सोऽहं भगवते सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः । - बृहदारण्यक उपनिषद ४-४-६ आणि ७)

ह्या उपनिषदाचे खिल-काण्ड बनलेली शेवटची दोन प्रकरणे विखुरलेल्या कल्पना एकत्र आणतात. (जर एखादी वस्तू मोडली किंवा भंगली तर तिला ''खिल'' म्हणतात. जी संपूर्ण आहे किंवा न तुटलेली आहे तिला ''अखिल'' म्हणतात.)

खिल काण्डातील कथा उदाहरण देते की इच्छुकांच्या प्रगल्भतेनुसार एकाच प्रकारच्या उपदेशाचे कसे वेगवेगळ्या प्रकारे भिन्न अर्थ लावले जातात. देव, मानव आणि दानव प्रजापतीकडून बोध घेतात. प्रजापती फक्त एक शब्द त्याचा बोध म्हणून उच्चारतो, ''द'', ज्यांचा इंद्रियांवर संयम नसतो असे देव त्याचा अर्थ ''दाम्यत्'' (तुमची इंद्रिये ताब्यात ठेवा) असा घेतात. मालकी विषयी हव्यास असलेले मानव त्या शब्दाचा अर्थ ''दत्त'' (द्या, उदार व्हा) असा घेतात. स्वभावाने क्रूर असलेले दानव त्याचा अर्थ ''दयध्वम'' असा घेतात (दयाळू व्हा).

बृहदारण्यकाच्या समारोपाच्या भागात येणारा मंत्र, फक्त खूप मजेशीर वाटतो असे नव्हे तर दिलासा देणारा वाटतो. तो काय म्हणतो ? जर एखाद्याला ताप आलेला असेल तर तो तपश्चर्या करीत आहे असे मानले पाहिजे. जर आजारपण आणि दुःख हे तप म्हणून समजले

तर तो उच्च विश्वात जात आहे. (एतद्वै परमं तपो यद्व्याहितस्तप्यते परमं हैव लोकं जयति य एवं वेद ...) (५-११-१)

ह्या विधानाचा अर्थ काय आणि त्यात मजेशीर काय? आणि ते दिलासा देणारे काय?

नवस पाळल्याने, उपवासाने, तपस्वी जीवन जगून आणि शारीरिक दुःख सहन करून, आपण आपल्या शरीराला कमी जोडलेले राहू, आणि आपल्या पूर्व जन्मातील पापे नाहीशी होतील. जेव्हा शरीर यातनातून जाते (शारीरिक तप) तेव्हा शरीराने केलेले अपराध शरीराकडून पुसून टाकले जातात.

म्हणूनच पुराणे तपश्चर्या केलेल्या महात्म्यांच्या गोष्टी सांगतात. अंबिका स्वतः, जी विश्वाची माता आहे - तप करते. तिच्या पतीच्या, परमेश्वराच्या शब्दाकडे लक्ष न देता, ती (सती म्हणून) तिच्या वडिलांनी (दक्ष) केलेल्या यज्ञात उपस्थित राहते. ती तेथे झालेल्या मानखंडनेमुळे होमाच्या अग्नीमध्ये बलिदान करते आणि हिमवानाची कन्या म्हणून तिचा पुन्हा जन्म होतो. तिच्या पूर्व जन्मात तिने तिच्या पतीच्या आज्ञेचे उल्लंघन केल्याची भरपाई आणि त्याच्याशी पुन्हा एक होण्याच्या हेतूने ती उग्र तपश्चर्या करते. कालिदास ह्याचा सुंदर आणि हृदयद्रावक तपशील देतो. हिमालयात हिवाळ्यात किती कडक थंडी असेल. पण त्या ऋतूत पार्वती (म्हणजे अंबिका) बर्फाळ खडकांवर बसून किंवा गोठलेल्या तलावावर उभे राहून तप करते. उन्हाळ्यात सूर्य प्रखरपणे तळपत असता ती भोवताली अग्नी पेटवून तप करते. चारी बाजूंनी अग्नी आणि वर सूर्य तळपतो आहे अशा तपाचरणाला ''पंचाग्नी'' म्हटले जाते.

शूचौ चतुर्णाम् ज्वलताम् हविर्भुजाम्,
शुचिस्मिता मध्यगता सुमध्यमा
विजित्य नेत्रप्रतिघातिनिम् प्रभा,
मनन्यदृष्टिः सवितारमैत
तथातिप्तम् सवितुर्गभासतिभिर्-,
मुखम् तदियम् कमलश्रियम् दधौ
अपांगयोः केवलमस्य दीर्घयोः,
शनैः शनैः श्यामिकया कृतम् पदम्

- कुमारसम्भवम ५-२० आणि २१)

अनेक महात्म्यांनी असे तप केलेले आहे.

आपले काय? जर त्या महान व्यक्ती, एक किंवा दोन प्रमादांचे गुन्हेगार असतील, आणि आपण तर आपल्या पापांचा हिशेबही ठेवू शकत नाही. परंतु आपल्याला त्यांनी केलेल्या तपाच्या एक अंशा इतकेही तप करण्याची शक्ती आणि इच्छा नसते. मग आपण आपली पापे कशी नाहीशी करणार आहोत?

अशा विचारांनी जेव्हा आपण त्रस्त असतो तेव्हा उपरिनिर्दिष्टं मंत्रामुळे दिलासा मिळतो. आपले जीवन शिस्तबद्ध नसल्यामुळे आपण एक किंवा दुसरे दुःख सहन करीत असतो. उपनिषदिक मंत्र आपल्याला दिग्दर्शन करताना दिसतात : "तुम्ही सहन करीत असलेले दुःख हे तप आहे असा विचार करायला तुम्ही शिकले पाहिजे. जर तुम्ही तसे केले तर तुम्ही तुमच्या पापापासून मुक्त व्हाल आणि स्वतंत्र व्हाल." जरी अशा सोप्या शब्दात तो संदेश दिलेला नसला तरी असा त्या मंत्राचा अर्थ आहे.

आपण नेहमी "ज्वर-ताप" किंवा "ताप-ज्वर" (शब्दशः उष्ण ताप) बद्दल बोलतो. ताप म्हणजे "उकडणे" किंवा "शिजवणे". मूळ 'तप' म्हणजे जाळणे आहे. "तपन्" हे सूर्याचे एक नाव आहे. आपण जरी शास्त्रात सांगितलेले तप केले नाही तरी आपल्याला आलेला ताप हा ईश्वराने आपल्याला पापापासून मुक्त होण्यासाठी दिलेला आहे असे मानले पाहिजे.

आपण मलेरियाने आजारी असता, उबदार पांघरुणे घेऊनही आपण कुडकुडत असतो. हिवाळ्यात बर्फावर राहून तप करण्याऐवजी हे दुःख सहन करण्याचा आपला दृष्टिकोन असला पाहिजे. जेव्हा तुम्हाला विषमज्वर किंवा न्युमोनिया झालेला आहे आणि ताप १०५ अंश किंवा १०६ अंश आहे तर तुम्हाला वाटते का की तुमचे शरीर भाजले जात आहे ? तुम्ही करू न शकणाऱ्या पंचाग्नीच्या ऐवजी देवाने तुम्हाला हा ताप दिलेला आहे असा विश्वास ठेवून तुम्ही स्वतःला दिलासा दिला पाहिजे.

कालांतराने तुम्ही हा दृष्टिकोन स्वीकारण्यास शिकाल आणि कोणतेही आजारपण सहन करण्याची शक्ती वाढवाल. डॉक्टरांना बोलावणे किंवा औषधाच्या बटव्याकडे धाव घेण्याऐवजी "आजारपण अटळ आहे." असे तुम्ही स्वतःला सांगत सहजपणे घ्याल. जेव्हा आपल्या पापाचे ओझे कमी करण्याचे कारण म्हणून आपण आजारी पडतो तेव्हा त्याच्यावर औषध शोधणे योग्य आहे का? शिवाय आपण डॉक्टरांची फी, औषधे यांवरील खर्चात बचत करतो. व्यथांना व्यथा न मानण्याचा उच्च दृष्टिकोन घेण्याचे शिकणे हा इतरापेक्षा अधिक मोठा लाभ आहे. ह्याला तितिक्षा असे म्हटले जाते.

हे सर्व थोडक्यात उपनिषदिक मंत्रामध्ये दर्शविलेले आहे. आपण आपल्या पापाचे परिमार्जन करू शकत नाही म्हणून शोक करीत असतो - जेव्हा आपण तप करण्यास असमर्थ असतो - जेव्हा आपण एखाद्या रोगाने त्रस्त असतो तेव्हा तो देवाचा, आपल्याला तप करायला लावण्याचा मार्ग आहे अशा वास्तवातून दिलासा मिळवावा.

बृहदारण्यक उपनिषदाच्या शेवटच्या प्रकरणात, वेदान्ताचा कर्मकाण्डाला विरोध नाही, ह्या वस्तुस्थितीला जोरदार पुष्टी मिळते. येथे उल्लेखलेले पंचाग्नी-विद्या आणि विधी हे सद्‌गुणी संतती (सुप्रजा) प्राप्त करण्यासाठी केले जातात.

-----

## प्रकरण ३४

# वेद आपल्याला काय शिकवितात ?

वेद अनेक विषयांबद्दल सांगतात. तर वेदान्त बनलेल्या उपनिषदांमध्ये स्पष्ट केलेली आत्मज्ञानाची संकल्पना हीच सर्वात महत्त्वाची शिकवण आहे हे आपण कसे मान्य करायचे? अग्निहोत्र, सोमयाग, सत्र आणि इष्टी आणि इतर पूरक विधी अशा अनेक यज्ञांचा ते उल्लेख करतात. हेच (यज्ञ) त्यांचे (वेदांचे) मुख्य हेतू बनतात असा दृष्टिकोन आपण का ठेवू नये?

कोणते विधी विवाहप्रसंगी केले जातात? किंवा अंत्यसंस्काराचे वेळी कोणते विधी केले जातात? एखादे राज्य (किंवा कोणताही देश) कसे चांगले चालविले जाते? आपण सभेमध्ये/ कायदे मंडळात कसे वागले पाहिजे? तुम्हाला वेदामध्ये अशा अनेक प्रश्नांची उत्तरे सापडतील. तर मग आपल्या ग्रंथांचे मुख्य उद्दिष्ट काय?

वेद तुम्हाला यज्ञ करणे, पूजापद्धती, चिंतनाची पद्धत याविषयी सांगतात. शरीराला आत्म्याकडून प्रेरणा कशी मिळते? शेवटी त्याचे (शरीराचे) काय होते? आत्मा पुन्हा शरीरात कसा प्रवेश करतो? ह्या पवित्र ग्रंथांमध्ये आपल्याला अशा प्रश्नांना उत्तर मिळते. आपल्याला त्यातून आपले शरीर कसे आरोग्यपूर्ण ठेवायचे, शत्रूच्या आक्रमणापासून आपण आपले कसे संरक्षण करायचे ह्या गोष्टी समजतात. मग वेदाचे उद्दिष्ट काय?

उपनिषदे सांगतात की सर्व वेद एकाच सत्याचा निर्देश करतात. (कठोपनिषद) ते सत्य कोणते? वेद एकाच स्वरात, ओंकाररूपात स्वतःला प्रकट करणाऱ्या त्या परमात्म्याविषयी सांगतात. (सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद् वदन्ति । यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्तितत्ते पदे संग्रहेण ब्रवीमि-ओमित्येतत् ।। -कठोपनिषद- २-१५)

सदाशिव अय्यर नावाचे एक न्यायाधीश होते. त्यांना परमशिव नावाचा म्हैसूरमध्ये राहणारा एक भाऊ होता. ''वेदांचा भूस्तर शास्त्राशी संबंध आहे'' त्याने लिहिले आहे. ''त्या पूर्वीच्या काळात, भारतातील लोक सूर्य आणि चंद्राकडे नवलाईने, आदराने पाहात'' असे काही पाश्चात्त्य म्हणतात ''शास्त्राने फार प्रगती केलेली नव्हती असा तो काळ होता. त्याकाळी लोक त्यांच्या मगदुराप्रमाणे नैसर्गिक घटनांकडे पाहत असत. आपल्या विचारांचे गीतात रूपांतर करण्यास सर्व समर्थ नसतात. पण काहींच्याकडे ती बुद्धी असते. मंत्रांच्या रूपात लोकांनी गायलेल्या गीतांचे वेद झाले''.

जरी उपनिषदे सांगतात की वेद एकाच परमात्म्याविषयी बोलतात तरी अशी समजूत आहे की ते विविध वस्तूंबाबत बोलतात. रामायणात एक प्रसिद्ध श्लोक आहे -

वेदवेद्ये परे पुंषिजते दशरथात्मजे

वेदः प्रचेतसादासित्साक्षाद्रामायणात्मना

"वेदवेद्ये" = जो वेदांकडून जाणला जातो. तो कोण आहे ? "परे पुंषि" = परमात्मा. वेदांकडून जाणला जाणारा परमात्मा राम म्हणून पृथ्वीवर अवतरला. जेव्हा तो दशरथाचा पुत्र म्हणून जन्मला तेव्हा वेदांनी वाल्मीकीचे पुत्र - रामायणाचे रूप घेतले. ह्या श्लोकानुसार वेदांचे उद्दिष्ट हे परमात्मा किंवा ओंकार, एकमेव सत्य होय. कठोपनिषद म्हणते "सर्वे वेदाः" तसे गीतेमध्ये भगवान म्हणतात : सर्व वेदांनी जे काय जाणावयाचे, ते मीच आहे. (वेदैश्च सर्वेरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् - भ-गी- १५-१५)

ह्या सर्वांचा विचार करून, आपण हे जाणतो की जरी वेद अनेक विषयांचे प्रतिपादन करीत असले तरी ते सर्व एकत्रित एकाच उद्दिष्टांबद्दल, एकमेव सत्याबद्दल बोलत असतात. प्रश्न असा येतो की एकमेव वस्तू हेतू असता अनेक वस्तूंचा विचार ते का करतात ?

अनेक विविध वस्तू, बहुविध विषयांच्या ज्ञानाद्वारे ही एकमेव वस्तू समजेल. योग, चिंतन, तपश्चर्या, यज्ञ आणि इतर विधी आणि विवाहासारखे कार्यक्रम, राज्यकारभाराच्या बाबी, सामाजिक जीवन, काव्य : ह्या सर्वाचा उद्देश काय ? ते एकमेव सत्य होय आणि तेच वेदांचेही ध्येय आहे. ही सत् वस्तू सोडून सर्व वस्तू, पदार्थ बदलू शकतात. त्या लक्षात ठेवलेल्या आणि नंतर विसरलेल्या कथांप्रमाणे असतात. (आपल्या अज्ञानाने) जगाच्या बहुविधते मागच्या त्या एकमेव वस्तूचे आकलन आपण करू शकत नाही. आपल्याला माहीत असलेल्या विविध वस्तूंच्याद्वारा वेद आपल्याला त्या एकमेव सत्याकडे घेऊन जातात.

एकमेव सत्य प्राप्त करण्यासाठी आपणास, आपल्या मनाला शिस्तीची विविध प्रकारे सवय लावावी लागेल. यज्ञ करून, तप आचरून, धर्मकृत्ये करून, गोपुर बांधून, प्रजेसाठी जलाशय बांधून, विवाहासारख्या संस्कारात, सामाजिक कार्यात सहभागी होऊन हे सर्व आपली जाणीव शुद्ध करतात आणि शेवटी नेहमी चंचल असलेले मन स्थिर (चित्तवृत्ती विरोध) करतात. ह्या सर्व कर्मांचा हेतू ब्रह्मप्राप्तीच्या आपल्या प्रयत्नात आपल्याला मदत करणे होय.

"वेद" (विद् पासून) म्हणजे जाणणे. उपनिषदे स्पष्ट करतात की : "आत्मा हा असा आहे की तो जाणल्यावर सर्व काही जाणणे शक्य होते." वेदांचे ध्येय आत्म्यावर प्रकाश टाकणे होय. त्यांच्या पहिल्या भागात सांगितलेले विधी आणि दुसऱ्यात सांगितलेले ज्ञान यांचे एकच ध्येय आहे - ईश्वर, ब्रह्म किंवा आत्मा जाणणे. आपल्या ग्रंथांच्या आरंभाचा आरंभ आणि शेवटाचा शेवट यांचे एकच अंतिम ध्येय आहे. 'मंत्रपुष्प' समारंभात, थोर व्यक्तीच्या स्वागताच्या वेळेस, "यो वेदादौ स्वरः प्रोक्तो वेदान्ते च प्रतिष्ठितः" हा मंत्र म्हटला जातो. हे शब्द वर उल्लेखलेल्या सत्याचा पुरावा आहेत. मंत्राचा अर्थ असा : "वेदांच्या आरंभी आणि शेवटी स्थापित झाले आहे ते एकमेव सत्य - ईश्वराचे वास्तव आहे". आरंभीची कृत्ये आणि

शेवटचे ज्ञान यांच्या ध्येयात काहीच फरक नाही.

हजारो पद्धतींत विभागलेली धार्मिक कृत्ये आणि एकमेव असलेले ज्ञान ह्या दोन्हींची उद्दिष्टे एकच आहे. ते म्हणजे वेदांना समाईक विषय आहे. इंद्रिये आत्मा जाणण्यास असमर्थ असतात. त्यांना फक्त बाह्य वस्तूंची जाणीव असते आणि ते त्यांच्या मागे जातात. ह्याचा कठोपनिषदात उल्लेख आहे. (परांचि खानि व्यतृणत स्वयंभूः, तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन, कश्चिद् धीरः प्रत्यगात्मानमैक्षत् आवृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ।। - कठोपनिषद ४-१) जेव्हा एखाद्याचे लक्ष हातातील वस्तूपासून विचलित होते तेव्हा आपण म्हणतो, ''पराक्कु पारप्पड्ड'' (तमीळ मध्ये) आपला विषय/वस्तू आत्मा हा आहे. त्यापासून बाजूला वळणे आणि भोवताली पाहणे - अन्यत्र पाहणे - म्हणजे पराङ्मुख असणे - ते पराक्कु पारप्पड्ड सारखेच आहे. हीच कल्पना कठोपनिषदाने व्यक्त केलेली आहे. परंतु आपले मन आपल्या ध्येयावर स्थिर राहत नाही. म्हणून बाह्य कृत्ये करून आपण सुज्ञपणा आणि आपली दृष्टी आत वळविण्याची प्रगल्भता मिळवू. मन आणि इंद्रिये यांच्याकडून ओढले जाण्यास नकार देणे, यातून अशी अंतर्दृष्टी विकसित करू शकू आणि त्यासाठी आपण वैदिक कृत्ये केलीच पाहिजेत.

सर्व इतर गोष्टींचे ज्ञान घेऊन किंवा जाणून, त्यांचा शोध घेऊन, आपण आकलनास समर्थ होऊ की जे जाणून आपण प्रत्येक गोष्ट जाणू. म्हणून वेदअध्ययनाच्या अनेक शाखा, अनेक प्रकारची उपासना, अनेक प्रकारची कृत्ये, अनेक कला, अनेक सामाजिक कामे या विविध विषयांची वेद चर्चा करतात. आपले शरीर वेगवेगळ्या कर्मांत जोडून आपण आपल्या शरीराची जाणीव गमावतो. विविध गोष्टींच्या अध्ययनात, विविध तत्त्वज्ञानाच्या प्रणालींचे परीक्षण करण्यात आणि विविध देवतांची उपासना करण्यात मन आणि बुद्धी यथावकाश विलीन होईल.

इतर गोष्टींपेक्षा वाईट कृत्यात गर्क असता आपल्याला आपल्या शरीराची अधिक जाणीव असते. वाईट विषयाबद्दल विचार करून आपले मन उद्धट बनते. त्याऐवजी जर आपण वैदिक विधी केले आणि उपासना केली आणि कल्याणासाठी वैदिक मंत्र म्हटले तर शरीराच्या आणि मनाच्या वासना गळून पडतील. हळूहळू अंतर्दृष्टी प्राप्त करण्यासाठी आपण आपली प्रगल्भता आणि सुज्ञपण विकसित करू. अशा प्रकारे आपल्याला येथेच (इहैव) मुक्ती मिळेल. कशापासून मुक्ती ? संसारापासून, जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून, जेव्हा आपण हे जाणू की शरीर आणि मन म्हणजे आपण नाही, तेव्हा आपण त्यांच्यापासून मुक्त होऊ - उपनिषदांमध्ये सांगितल्याप्रमाणे- आपण जगातील अस्तित्वापासून स्वतंत्र होऊ.

ह्या जगातच मोक्ष मिळविणे हा वेदांचा हेतू आहे. आणि तेच त्यांचे वैभव आहे. इतर धर्म माणसाला त्याच्या अन्य जगात जाण्यानंतर मुक्तीचे आश्वासन देतात. आपल्याकडे अशा

प्रकारच्या मुक्तीची संकल्पना नाही. ज्यांनी अशा प्रकारची मुक्ती मिळविली ते आपल्याला सांगण्यासाठी ह्या जगात परत येणार नाहीत. म्हणून आपल्याला त्याबाबत शंका असतात किंवा आपण अजिबात त्यावर विश्वास ठेवीत नाही. पण आपण जर वासनांचा त्याग केला आणि आत्म्यावर चिंतन करीत राहिलो तर मुक्ती येथे, ह्याच लोकात मिळेल असा आदर्श आपणापुढे ते ठेवतात. मोक्ष हा ताबडतोब आपल्या आवाक्यात येईल ह्यात शंकेला काहीही जागा नाही. (मोक्ष परलोकात नव्हे तर येथेच मिळेल असा हा संदर्भ आहे)

अन्य मार्ग, मलेरियाने त्रस्त झालेल्या माणसाला क्विनाईन देण्यासारखे, तात्पुरते बरे करण्यासारखे आहेत. मलेरियाच्या रुग्णाचा ताप कमी झाला नाही तर त्याचे मूळ कारण शोधून नाहीसे केले पाहिजे. वैदिक धर्म मुळापर्यंत खोल जातो आणि ज्या काही परमात्म्यापासून दूर नेणाऱ्या गोष्टी, त्या तोडून टाकतो. अशा प्रकारे जाणलेले स्वातंत्र्य शाश्वत असते आणि ते (जगातील अस्तित्व असताना असणारे क्लेश आणि दुःख यांच्यापासून 'तात्पुरती सुटका' असे नसते.)

वेदातील कर्मकाण्ड अशी तात्पुरती सुटका देणाऱ्या बाबींबद्दल सांगते. तथापि हे समजून घ्यायला हवे की अडचणींनी ग्रस्त अशा माणसास, तो आंतरिक आनंदात राहील अशी स्थिती कशी प्राप्त होणार? वैदिक विधी करून तात्पुरता इलाज मिळविणाऱ्याची जाणीव अशुद्धतेतून मुक्त होते आणि तो चिरंतन शांतीसाठी पात्र होतो. यज्ञ, नवस, लोककल्याणाची कामे इ. प्रकार आपल्याला अंतिम ध्येयाकडे नेत नाहीत परंतु ते आपल्याला शारीरिकदृष्ट्या आपल्या जाणिवेतील अशुद्धता कमी करण्यास, आपली जाणीव शुद्ध करण्यास आणि अंतिम ध्येयासाठी आपले मन आपल्या प्रयत्नात केंद्रित करण्यास आवश्यक आहेत.

वेदांमध्ये अनेकविध विषयांसंबंधी तपशिलाने सांगितले गेले आहे परंतु त्या सर्वांचा, सत्य आणि ज्ञान ह्यासंबंधीचा वेदान्तिक शोध घेण्यासाठी आपल्याला मार्गदर्शन करणे हा एकच हेतू आहे. कोणत्याही कार्याचा, भाषणाचा, लेखाचा इ. चा समारोपाचा भाग नेहमी अर्थपूर्ण असतो. एखाद्याने त्याच्या भाषणात किंवा लेखात काय म्हटले हे जर शोधून काढायचे असेल तर आपण ते सर्व वाचून न पाहता पहिला परिच्छेद वरवर पाहतो, मधला भाग सोडून, शेवटच्या परिच्छेदाकडे येतो. तेथे आपल्याला त्या भाषणाचा किंवा लेखाचा संदेश मिळतो. पहिला किंवा शेवटचा परिच्छेद चाळून आपण त्यातील मजकूर काय आहे ते ठरवू शकतो. वेदांचे पहिले आणि शेवटचे भाग परमात्म्याविषयी सारखेपणाने बोलतात; तो वेदांचा विषय म्हटले जाऊ शकते.

शासन अनेक कायदे करते. पण नंतर, त्यांच्या अंमलबजावणीच्या काळात, त्यांच्या हेतूविषयी शंका उद्‌भवतात. मग त्याचा अर्थ निश्चित करण्यासाठी दुसरा कायदा केला जातोः त्याला स्पष्टीकरणाचा कायदा म्हटले जाते. अशा रीतीने वेदांच्या स्पष्टीकरणाचा ईश्वराचा

शाश्वत कायदा म्हणून मीमांसा अस्तित्वात आली. वेदांच्या विशेषज्ञानाच्या चौदा शाखांपैकी एक असलेल्या मीमांसेविषयी मी नंतर बोलेन (भाग १२ पाहा) पण येथे एका दृष्टिकोनाचा मला उल्लेख करणे आवडेल.

मीमांसा शास्त्रानुसार, वेदांच्या घोषणा किंवा वचने यांचा अर्थ किंवा उद्देश निश्चित करण्याचे सहा मार्ग आहेत. हे ह्या श्लोकात सांगितले आहेत.

उपक्रम-उपसंहारौ अभ्यासोपूर्वताफलम्
अर्थवादोपपत्ती च लिंगम् तात्पर्य-निर्णये

उपक्रम आणि उपसंहार ह्यांची एकत्रित पहिली पद्धत बनते. इतर पाच अभ्यास. अपूर्वता, फल, अर्थवाद आणि उपपत्ती हे आहेत. ह्या सहा पद्धती वेदातील उतारेच नव्हे तर वेदविषयक लेख किंवा प्रवचने यांच्या अर्थनिश्चिततेसाठी वापरल्या जातात.

उपक्रम म्हणजे एखाद्या ग्रंथाचा प्रारंभिक भाग, चर्चा आणि उपसंहार म्हणजे निष्कर्ष. जर पहिला आणि शेवटचा भाग एकाच कल्पनेबाबत बोलत असतील तर तो त्या ग्रंथाचा विषय आहे असे समजले जाते. अभ्यास म्हणजे तीच गोष्ट पुन्हापुन्हा करणे. जर ग्रंथात एकच दृष्टिकोन वारंवार सांगितला असेल तर तो त्याचा विषय समजला जातो. अपूर्वता म्हणजे पूर्वी न उल्लेखलेली किंवा प्रथमच उल्लेखलेली कल्पना. ग्रंथात किंवा भाषणात नवीनच व्यक्त झालेला दृष्टिकोन हा त्याचा हेतू किंवा संदेश असल्याचे मानले जाते. फल म्हणजे फलस्वरूप प्राप्ती, लाभ, बक्षीस किंवा परिणाम. ग्रंथात किंवा भाषणात म्हटले जाते, ''तुम्ही जर असे वागलात तर तुम्हाला असे / फळ किंवा लाभ होईल'', याचा अर्थ असा की ग्रंथाचा किंवा भाषणाचा हेतू हा की ज्यामुळे सुचविलेल्या पद्धतीने तुम्ही कृती करावी ज्यामुळे तुम्हाला त्याचे फळ मिळेल.

समजा, एखाद्या ग्रंथात किंवा भाषणात अनेक मुद्दे हाताळले आहेत. आता, त्यांवर आधारलेली एक गोष्ट सांगितली आणि ओघात एका विशेष बाबीचे कौतुक होते. हा मुद्दा ग्रंथाचा किंवा भाषणाचा हेतू समजला जावा. येथे वापरली जाणारी पद्धत ''अर्थवाद'' होय. एखादा मुद्दा तर्कबुद्धीने स्थापित करायचा तर तो त्याचा विषय मानला पाहिजे. ही तुमची ''उपपत्ती''.

एका सभ्य गृहस्थाने पहिले आणि शेवटचे श्लोक वाचून त्यावर आधारलेला त्याचा दृष्टिकोन मला सांगितला : ''वेदांचा मुख्य मुद्दा अग्नी पूजन आहे (अग्नी उपासना) उपक्रमामध्ये 'अग्निमिळे' असे आहे आणि उपसंहारामध्येही अग्नीचे स्तोत्र आहे. आरंभ आणि शेवट दोन्ही तसे असल्याने वेदांचा हेतू अग्नी पूजा आहे. (त्यांचे सार)'' ह्या दृष्टिकोनात सत्याचे तत्त्व आहे. अग्नी हा आत्माचा प्रकाश, ज्ञानाचा प्रकाश आहे. ज्ञानाचा प्रकाश दुसरा तिसरा काही नसून जो ज्ञाता, ज्ञात आणि ज्ञान असलेल्या आत्म्याचे चैतन्य आहे : हा वेदांचा

अंतिम संदेश आहे.

प्रस्तुत स्तोत्र शब्दार्थाने समजून घेणे आणि वेद हे अग्निपूजन आहे असे सांगणे हे बरोबर नाही. आपल्या ग्रंथाची थोरवी एकाच देवतेचे श्रेष्ठत्त्व न सांगण्यात आहे. वेद आत्म्याचे पूजन केले पाहिजे असे म्हणतात, आत्मा सर्वच देवता दर्शवितो : (आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो, निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इदं सर्वं विदितम् ।। - बृहदारण्यकोपनिषद ४-५-६) ''खरोखरच, हे मैत्रेयी, तो आत्माच आहे ज्याचे आकलन व्हावे, तो पाहिला जावा, ऐकला जावा आणि त्यावर विचार केला जावा. आत्मा जाणला गेला पाहिजे. जेव्हा आत्मा जाणला जातो तेव्हा सर्वच जाणले जाते.'' याज्ञवल्क्य स्वतःची पत्नी मैत्रेयी हीस जे सत्य सांगतो तोच वेदांचा अंतिम संदेश आहे.

ध्येय ह्याचा ध्वनित अर्थ काय? आता आपण येथे आहोत. जेथून आपण आरंभ करतो ते ठिकाण, आपल्याला अंतिमच्या दुसऱ्या ठिकाणी जायचे आहे, असा अर्थ ध्येय ह्या शब्दाने सुचविलेला आहे.'' ''अतः'' म्हणजे जे अंतरावरील निर्देश केलेले ध्येय. ''इतः'' म्हणजे आपण आता जेथे आहोत ते स्थान. 'येथून' आपल्याला 'तेथे' ध्येय म्हणून जायचे आहे.

पण, वस्तुतः 'ते' आपले येथेच (हे) ध्येय नाही का? होय, आपण जाणू की ते 'ते' आणि 'हे' (किंवा येथे आणि तेथे) ब्रह्मच आहेत- दुसऱ्या शब्दांत 'ते' आणि 'हे' एकच आहेत तेव्हा आपण असे जाणू की प्रत्येक गोष्ट ब्रह्म आहे. आपण 'हे' जे काही असल्याचे समजतो ते 'ते' ने दर्शविलेली स्थिती होय.

अतः प्रमाणेच वेद परमात्म्याचा उल्लेख ''तत्'' असा करतात. कोणत्याही विधीच्या किंवा कर्माच्या शेवटी ''ओम् तत् सत्'' असे म्हणण्याची परंपरा आहे. त्याचा अर्थ ''ते सत्य आहे''.

आपण काही शब्दांना त्वम् हा उपसर्ग जोडतो : पुरुषत्वम्, महत्त्वम् इ. येथे त्वम् म्हणजे गुण किंवा पदार्थाचा दर्जा. महत् चा गुण महत्त्वम्. पुरुषाचा गुण पुरुषत्वम्. ठीक आहे. जेव्हा आपण अंतिम सत्याचा ''तत्त्वम्'' असा उल्लेख करतो तेव्हा आपल्याला काय म्हणायचे असते ? तत्त्वम् म्हणजे 'ते असणे'. जेव्हा आपण तत् च्या शोधासंबंधी बोलतो तेव्हा आपण ब्रह्माच्या गुणाचा शोध घेत असतो. (ब्रह्मत्व)

जर वेद परमात्म्याला तत् (दूरचा पदार्थ) म्हणून संबोधित असतील तर ते आपल्याला कसे उपयोगी ठरेल ? प्रत्यक्ष तसे नाही. जे दूर असते ते जवळही असते. वेद सांगतात : ''दूरात् दूरे अंतिके च''

एकदा एका मुलीच्या पालकांनी त्यांच्या नातेवाईक असलेल्या मुलाशी तिचे लग्न

ठरविले. (दक्षिणेत मुलीचे लग्न तिच्या मामाशी किंवा आतेभावाशी लावण्याची रूढी आहे.) पण ती मुलगी म्हणाली: ''मी जगातील सर्वात माणसाशी लग्न करीन.'' ती तिच्या निर्णयाबाबत आग्रही होती आणि तिचे पालक हताशपणे तिला म्हणाले, ''तुला काय आवडेल ते कर''.

त्या मुलीला वाटले की राजा सर्वात महान आहे आणि ती त्याच्याशी लग्न करेल. एकदा राजा पालखीतून जात असता एक तपस्वी जवळून गेला. राजा खाली उतरला आणि संन्याशापुढे नतमस्तक झाला आणि पुन्हा पालखीत बसला. हे पाहून त्या मुलीने स्वतःशी विचार केला : इतके दिवस राजा महान आहे असे मी समजत होते ते चूक आहे. तपस्वी अधिक मोठा दिसतोय. मी त्याच्याशीच लग्न केले पाहिजे.'' ती त्या साधूमागे गेली.

मार्गात एका पिंपळाच्या झाडाखाली स्थापन केलेल्या गणपतीच्या मूर्तीची पूजा करण्यासाठी तो साधू थांबला. त्या मुलीने ते पाहिले आणि ती निर्णयावर आली : हा देव संन्याशापेक्षा अधिक श्रेष्ठ दिसतोय. मी त्याच्याशीच लग्न केले पाहिजे.'' तिने त्या साधूचा पाठलाग सोडला आणि ती गणपतीच्या मूर्तीपाशी बसली.

ते निर्जन ठिकाण होते आणि ईश्वराची पूजा करण्यास कोणीही भक्त येत नसे. काही दिवसांनंतर एक कुत्रा आला आणि त्याने तिथे लघुशंका केली. आता त्या मुलीने ठरविले की कुत्रा हा गणपतीपेक्षा मोठा असला पाहिजे. ती कुत्र्याच्या पाठीमागे गेली आणि जसा तो दुडुदुडु धावत होता. ती त्याच्यामागे जात असता एक मुलाने त्याला दगड मारला आणि कुत्रा दुःखाने मोठ्याने विव्हळला. एका तरुणाने हे पाहिले आणि क्रूरतेबद्दल त्या मुलाला दम दिला. ती मुलगी स्वतःशीच म्हणाली, ''मला वाटले मुलगा कुत्र्यापेक्षा श्रेष्ठ असेल. पण येथे तर एक तरुण त्याला समज देण्यास येतो. मग तोच सर्वात महान असला पाहिजे.'' शेवटी असे सिद्ध झाले की तो तरुण दुसरा तिसरा कोणी नसून तिच्या आईवडिलांनी तिच्यासाठी निवडलेला तिचा वर होता.

कथेतील मुलगी तिला जे दूर वाटत होते त्याचा पाठपुरावा करीत राहिली पण शेवटी ती ज्याचा शोध घेत होती ते तिच्या जवळच होते असे सिद्ध झाले.

''ईश्वर दूर आहे असे समजून तुम्ही त्याचा शोध घेता. जोपर्यंत तुम्ही अज्ञानी असता तोपर्यंत तो खरोखरच दूर असतो. तुम्ही जरी त्याला जगभर शोधले तरी तुम्हाला तो सापडणार नाही. वास्तवात तो तुमच्या बरोबर असतो.'' ''दूरात दूरे अंतिके च,'' असे श्रुती म्हणते. (सर्वात दूर असलेल्यापेक्षा दूर आणि सर्वात जवळच्यापेक्षा जवळ)

जेव्हा आपण दूर क्षितिजाकडे पाहतो तेव्हा ते आपल्याला पृथ्वी आणि आकाश यांचा मीलन बिंदू असल्याचे भासते. समजा तेथे एक नारळाचे झाड आहे. आपल्याला वाटते की आपण तेथे पोहोचलो तर आपण पृथ्वी आणि आकाश जेथे भेटतात तेथे पोहोचू. पण आपण जेव्हा प्रत्यक्ष झाड होते तेथे पोहोचू तेव्हा क्षितिज मागे सरलेले आढळते. आपण जसे पुढे जाऊ

तसे क्षितिज आपल्यापुढे जाते. ''आपण येथे नारळाच्या झाडाखाली आहोत पण क्षितिज अजूनही दूर आहे. आपल्याला त्याला गाठण्यासाठी पुढे जावे लागते.'' क्षितिजाला गाठणे हे शक्य आहे का ? जेव्हा आपण नारळाच्या झाडापासून दूर होतो तेव्हा क्षितिज जवळ वाटत होते. जेव्हा आपण तेथे गेलो तेव्हा क्षितिज आणखी पुढे गेल्यासारखे वाटले. मग क्षितिज कोठे आहे ?'' तुम्ही जेथे आहात तेथेच क्षितिज आहे. तुम्ही आणि क्षितिज एकाच ठिकाणी आहात. ज्याला आपण ''तत्'' ईश्वर म्हणतो, जो आपल्यापासून दूर आहे असे वाटते तो तुमच्या जवळच असतो. नाही, तो तुमच्यातच असतो. ''तो तू आहेस'' असे वेद घोषित करतात. - तो तू आहेस (किंवा तू तो आहेस.)

ते तू आहेस (तत् त्वम् असि) हे वेदांचे महावाक्य आहे. 'त्वम्' चा इथे अर्थः एखाद्या वस्तूचा गुण, आवश्यक गुणधर्म असा नाही. त्या शब्दाला दोन अर्थ आहेत : आवश्यक तो गुण (असणे) हा एक अर्थ आहे आणि 'तू' हा दुसरा अर्थ. आचार्यांनी 'त्वम्' हा शब्द त्यांच्या 'सौंदर्यलहरी' मध्ये कोटी-श्लेष म्हणून वापरला. तत् आणि त्वम् ह्या दोन शब्दांचे ते एकत्रीकरण आहे आणि तत्त्वम् हा शब्द वापरात आला. शोधाच्या शेवटी ज्या सत्याकडे येतो ते ''तत्त्व'' होय - ते एकमेव सत्य परमात्म्याचा निर्देश करते. (ह्या शब्दाचा उपयोग तत्त्व ह्या अर्थाने देखील केला जातो. मात्र शब्दशः ह्याचा अर्थ 'ते पण' असा आहे.)

ज्याला आपण 'मी' म्हणतो, आपण ''मी'' काय असल्याचे मानतो, ते खरोखरच ईश्वर असते : किंवा अशी ईश्वराची जाणीव असते. जर तुमच्यात हे सत्य स्पष्ट पाहण्याचा प्रकाश नसेल तर तुम्ही ईश्वर म्हटली जाणारी गोष्ट आकलन करू शकणार नाही. 'मी' ची जाणीव म्हणजे आपण 'ते' स्पष्ट असल्याचा विश्वास ठेवतो. ''ते आणि तू एकच आहात, बाळा,'' हा वेदांचा अंतिम संदेश आहे.

आपण जे 'हे' (इदम्) म्हणतो ते काहीतरी उगमाशिवाय नाही. खरेतर 'हे' म्हटली जाणारी वस्तू उगमाशिवाय नाही. 'बी' शिवाय वृक्ष नसतो. पर्वत, महासागर, आकाश आणि पृथ्वी, मानव आणि पशू आणि इतरांसह असलेल्या ह्या विश्वाला त्याचे मूळ आहे. क्रोध, भय आणि प्रेम, इंद्रिये, शक्ती आणि ऊर्जा यांना त्यांचे मूळ असते. ज्याला आपण 'हे' म्हणतो त्यालाही मूळ आहे. आपण जे ऐकतो, पाहतो आणि गंध घेतो, जे स्मरणात ठेवतो, जे आपल्याला उष्ण किंवा थंड वाटते, जे आपण अनुभवतो - हे सर्व 'इदम्' ने आच्छादलेले आहे. बौद्धिक शक्ती, शास्त्रीय शोध, अजून लागायचे असलेले शोध हे सर्व ''इदम्'' खाली येतात आणि ह्या सर्वांना मूळ कारण आहे. मूळाशिवाय ''हे'' किंवा ''इदम्'' नसते. प्रत्येक वस्तूला मूळ किंवा बीज असते. म्हणून विश्वालाही मूळ कारण असलेच पाहिजे : तसेच त्यात असलेली सर्व शक्ती, सर्व ऊर्जा यांनाही मूळ कारण असलेच पाहिजे.

हे सत्य जाणण्यासाठी चिंचेचे अंकुरलेले बी पाहा. जेव्हा तुम्ही ते फोडून उघडाल,

तुम्हाला त्यात सूक्ष्म रूपात झाड दिसेल. त्याला मोठे होण्याची सुप्त शक्ती असते. अशीच सर्व बीजांची परिस्थिती असते.

मंत्राना बीजाक्षरे असतात (बीज अक्षरे किंवा बीज शब्दावयव). छोट्या बीमध्ये असलेल्या झाडाप्रमाणे ह्या शब्दांमध्ये अमित शक्ती असते. जर मन केंद्रित करून बीजाक्षर एक लक्ष वेळा उच्चारले गेले तर त्याची शक्ती तुमच्या आवाक्यात येईल.

जगात जी काही शक्ती, जी काही हुशारी, जी काही कौशल्ये आणि बुद्धी आहे हे सर्व आद्यरूपात असते. ढोलाच्या तालावर वेद जणू घोषित करतात : ''हे सर्व मूळ कारणाशिवाय उद्‌भवलेले नाही. जी शक्ती मूळ किंवा बीजामध्ये असते तीच संपूर्ण विश्वात असते. ते बीज किंवा मूळ कोठे असते ? आत्मा हे सर्व आतून पाहात असतो, ज्याला आपण ''इदम्'' म्हणतो ते हेच मूळ असते.

जेव्हा तुम्ही आरशासमोर उभे राहता तेव्हा तुम्हाला तुमची प्रतिमा दिसते. जर तुम्ही चार आरसे एका ओळीत समांतर ठेवले तर तुम्हाला तुमच्या हजारो प्रतिमा दिसतील. सर्व प्रतिमांचा उगम एकच (मूळ कारण) असतो. त्यांचा उगम एक असतो तसा ह्या सर्व प्रतिमा पाहणाराही एकच असतो. जो अब्जावधी सजीवांच्यामध्ये असतो आणि त्या सर्वांना पाहतो तो 'ईश्वर' होय. जे दिसले जाते त्यांना जे पाहते ते मूळ. ते मूळ म्हणजे ज्ञान आणि ते सर्व विश्वाचे उगमस्थान. हे ज्ञान तुम्हाला कोठे मिळते? ते तुमच्यात असते. अनंत, श्रेष्ठ ज्ञान तुमच्यात अंशतः असते - एक भाग म्हणून संपूर्ण तुमच्यात असते.

हा लहान बल्ब पाहा. तुमच्याकडे एक मोठा बल्ब आहे. तो निळा आहे, हा हिरवा आहे. अनेक आकाराचे आणि मापाचे दिवे असतात. पण त्यांची शक्ती एकच असते. विद्युतशक्ती, ती सर्वत्र असते. ती पंखा फिरवीत ठेवते, दिवा जळत ठेवते. शक्ती तीच आहे आणि अनंत आहे. जेव्हा ती तारेतून वाहते तेव्हा ती मर्यादित बनते. जेव्हा विजेचा चमचमाट होतो, जेव्हा पाणी धबधब्यातून कोसळते तेव्हा शक्तीचे प्रकटीकरण होते. तसे ते अंतिम सत्य स्वतःच चमकून जाईल असे तुम्ही तुमच्यात बाणवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सर्व वैदिक कर्मे, सर्व पूजा, सर्व कर्मे, महावाक्यांचे चिंतन, वेदान्त- ह्या सर्वांचा हेतू ते सत्य तुम्हाला जाणवो-तुमच्यात प्रकट होवो, एका क्षणातच, हा असतो.

वेद कुटुंब आणि सामाजिक जीवन ह्या विषयांचे प्रतिपादन करतात, राजाची कर्तव्ये पण त्यात उल्लेखलेली आहेत. काव्य, रोगनिवारण, भूगर्भशास्त्र किंवा कोणतेही शास्त्र ह्या आत्मज्ञानाच्या पायऱ्या आहेत. प्रथम तत् आणि त्वम् च्या एकरूपतेची अनुभूती चमकून जाणाऱ्या विजेप्रमाणे क्षणभर येते. केनोपनिषद या ब्रह्मानुभूतीचे वर्णन 'क्षणार्धात चमकून जाणाऱ्या विजेप्रमाणे असते' असे करते. परंतु तीव्र एकाग्रतेने केलेल्या अभ्यासानंतर तुम्ही ह्या

अनुभूतीत निमग्न व्हाल. (तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा इतीन्न्यमीमिषदा हत्यधिदैवतम् ।। (केनोपनिषद ४-४)

हे प्रवाह धबधब्यासारखे कोसळताना निर्माण झालेल्या विजेसारखे आहे. जेव्हा तुम्ही ह्या जगात आहात, जेव्हा तुम्ही तुमच्या शरीरात आहात, तेव्हाच हा मोक्ष, मुक्ती आहे. आणि जेव्हा तुम्ही हे शरीर त्यागाल, तुम्ही स्वतःच शाश्वत सत्य व्हाल. ह्याला विदेहमुक्ती म्हणतात. (शब्दशः शरीराविना मुक्ती) जीवनमुक्ती आणि विदेहमुक्ती यांतील फरक केवळ बाहेरून पाहण्यासारखा आहे. ज्ञानी मनुष्यासाठी दोन्ही एकसारखेच आहेत.

येथेच आणि आत्ताच ब्रह्माचे आंतरिक ज्ञान हे वेदांचे ध्येय आहे. आपण जगातील घटना वर्तमानपत्रांतून समजून घेतो. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या केंद्रात बातमीदार नेमून तसेच वृत्त प्रतिनिधींच्याद्वारे बातम्या गोळा केल्या जातात. अशा काही गोष्टी असतात की त्या अशा माध्यमांकडून जाणल्या जाऊ शकत नाहीत. सामान्य माणसाकडून आकलन होऊ शकत नाहीत. त्यांच्या बाबतीत माहिती घेण्यासाठी आपल्याला विशेष वर्तमानपत्र नको का ? वेद अशा प्रकारचे वृत्तपत्र आहे. सामान्य बातमीदाराकडून ज्या गोष्टी माहीत होत नाहीत आणि अशा ठिकाणी घडतात की जेथे तारयंत्रणा नसते अशा बातम्यांसंबंधी ते आपल्याला सांगतात. ह्या वर्तमानपत्राद्वारे, अंतर्ज्ञानाच्या शक्तीमुळे ऋषींनी ह्या बाबतीत आपल्याला ज्ञान दिले आहे की जे ह्या जगापलीकडील बाबींचे असते आणि सामान्य माणसाच्या आकलनापलीकडे असते.

तथापि, वेदांतील काही भाग मात्र त्याज्य आहे. 'त्याज्य' याचा अर्थ चूक म्हणून नाकारणे नव्हे. वेदातील कोणत्याही भागाबाबत काहीही चुकीचे असू शकत नाही. तसा विचार करणे सुद्धा धर्माचा घात करण्यासारखे होय. त्या ग्रंथांमध्ये महत्त्वाच्या विषयाच्या प्राथमिक बाबी किंवा त्यांना आधार देणाऱ्या गोष्टी आहेत. आपल्या पूर्वजांच्या व्यवस्थेनुसार महत्त्वाचा भाग जतन करून ठेवणे आणि इतर प्राथमिक किंवा आधारभूत वगळायचा. आपल्या विकासाच्या स्थितीत काही गोष्टी आवश्यक असतात पण आपण जसे पायरीपायरीने वर जातो तसे त्या वगळायच्या असतात.

नंतर काही परिच्छेद अतिशय महत्त्वाचे आहेत आणि त्यांना विधीचे बळ आहे. ते पूर्णतः स्वीकारायचे असतात. ज्या गोष्टी वगळायच्या असतात त्या ''अर्थवाद'' किंवा ''अनुवाद'' ह्या श्रेणीच्या असतात.

एखाद्या संकल्पनेचे महत्त्व आपल्यावर ठसविण्यासाठी, उच्च पातळीवर नेण्यासाठी वेद आपल्याला काही गोष्टी सांगतात. ज्या आदेशांशी ह्या गोष्टी संलग्न आहेत त्या पूर्णपणे स्वीकारल्या पाहिजेत परंतु त्या ठसविण्यासाठी सांगितलेल्या गोष्टी अर्थवाद म्हणून सोडून दिल्या पाहिजेत. त्या आचरणात आणण्याची गरज नाही.

अनुवाद म्हणजे काय ? एखाद्या नवीन नियम किंवा संकल्पनेबाबत बोलण्यापूर्वी वेद आपल्याला अगोदरच माहीत असलेल्या गोष्टी सांगतात. नवीन नियम किंवा संकल्पनेकडे येण्याऐवजी जीवनात आपल्याला ज्ञात असलेल्या पण वेदांनी निवेदन न केलेल्या गोष्टी सांगत राहतात. हा अनुवाद होय.

अनुवाद आणि अर्थवाद हे महत्त्वाचे नाहीत. ते वेदांचा संदेश किंवा अंतिम हेतू सांगण्यासाठी नाहीत. एखाद्या अधिकारी व्यक्तीशिवाय आपल्याला जे माहीत होत नाही आणि वेद ज्याला विधी म्हणतात हा प्रमुख वाद, खरे तत्त्व हा वेदांचा खरा उद्देश होय.

ह्याचे आणखी स्पष्टीकरण करायचे तर वेदांकडून उल्लेखलेले परंतु इतर लौकिक माध्यमातून जाणले जाऊ शकणारे ते वैदिक अधिकाराविरुद्ध नाही. जे माहीत नाही ते माहीत करून देणे हा वेदांचा हेतू आहे. आपल्याला ज्ञात आणि अज्ञात गोष्टी वेद सांगतात परंतु अज्ञात विषयांबद्दल सांगणे हाच त्यांचा मुख्य हेतू आहे. आपल्याला जे माहीत नाही त्याची प्रस्तावना म्हणून ते आपल्याला ज्ञात गोष्टी दयेपोटी सांगतात. जर ज्ञात गोष्टी सांगण्याचा वेदांचा हेतू असता तर आपल्याला अज्ञात गोष्टी ते कशासाठी सांगतील. परंतु जर आम्हाला जे पूर्वीच ज्ञात आहे ते सांगणे हाच वेदांचा हेतू - सत्य साधणे असेल तर आम्हाला जे ज्ञात नाही त्याचे प्रतिपादन वेद का करतात ? जर आम्हाला ज्ञात नसलेल्या विषयांचे प्रतिपादन वेद इतक्या विस्ताराने करीत आहेत तर त्यांना बगल देऊन जे आपल्याला ज्ञात आहे केवळ तेच धारण करायचे हे हास्यास्पद होणार नाही का ? असे करणे हे धर्मबाह्य होईल. तरी एक प्रश्न उपस्थित होतो की, आपल्याला ज्ञात असलेल्या गोष्टींचा इतक्या विस्ताराने ते का विचार करतात ?

वेद ह्या बाबतीत मौन राहू शकले असते. बरे, आपल्याला ज्ञात असलेले म्हणजे काय ? आणि आपल्याला ज्ञात नसलेले म्हणजे काय ?

भौतिक जगातील ऐहिक गोष्टींसंबंधी दोन मते आहेत. आपण ज्या गोष्टी पाहतो त्या सर्वांचे स्वरूप एकच असते की त्या सर्व स्वतंत्र असतात ह्यावर दुमत आहे. आपल्या भौतिक कल्पनेवर आधारलेल्या सर्व वस्तू आपण एकमेकांपासून भिन्न असल्याचे मानतो. ह्याच आधारावर जगातील दैनंदिन कामे योग्य रीतीने अमलात आणली जातात. पाणी ही एक वस्तू आहे. तेल ही दुसरी वस्तू आहे. दिवा पेटविण्यासाठी (वातीला पुरवठा करण्यासाठी) आपल्याला तेलाची गरज असते. आपण त्यासाठी पाणी वापरू शकत नाही. परंतु जर दिवा भडकला आणि जवळच्या वस्तूंना आग लागली तर तो आपल्याला पाणी टाकून विझवावा लागेल. तेलाने आग फक्त पसरेल. अशा प्रकारे एक वस्तू दुसऱ्यापासून भिन्न आहे आणि प्रत्येकीचा चांगला वापर कसा करायचा हे ठरवावे लागते. प्रत्येक वस्तू एक दुसरीपासून दूर असते हा दृष्टिकोन द्वैताचा एक भाग आहे. वेदातील अनेक विधी, अनेक पूजापद्धती ह्या

द्वैतावर आधारलेल्या आहेत. अद्वैत म्हणून आपण ह्या गुणाबाबत शंका उपस्थित करू नये. वेद द्वैताच्या पलीकडे जातात याचा आपण शोध घेतला पाहिजे. जर तसे नसेल तर त्यांचा संदेश द्वैत; असा निष्कर्ष आपल्याला काढावा लागतो. त्यांच्यात प्रकट झालेले सत्य काय आहे ? अनेक स्तोत्रांमध्ये आणि बहुतेक उपनिषदांमध्ये अद्वैत हे सत्य घोषित झालेले आहे. परंतु हे बाह्य अनुभव समोर ठेवून नव्हे. अंतिम वैदिक दृष्टिकोन असा आहे की सर्व वस्तू एकमेकांपासून भिन्न नाहीत तर त्या एकाच आत्म्याचे बाह्य प्रकटीकरण आहे. आपल्या धार्मिक आणि तत्त्वज्ञानात्मक साहित्याचे दोन भाग आहेत. पूर्वपक्ष आणि सिद्धान्त. पूर्वपक्षात ज्या मुद्याला नाकारायचे तो मांडलेला असतो. जर आपण केवळ हाच भाग वाचला तर त्या साहित्याला जे सांगायचे त्याच्या विरूद्धचा प्रभाव पडणे शक्य आहे. स्वतःच्या मताव्यतिरिक्त दुसरे मत खंडन करायचे असले तरी ते मांडावे लागते हा पूर्वपक्षाचा हेतू असतो. सिद्धान्त भागामध्ये स्वतःचे मत स्थापित करण्यापूर्वी विरुद्ध प्रणालीचे खंडन केलेले असते. दर्शनामध्ये किंवा तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांमध्ये असलेल्या तत्त्वांच्या विरुद्ध गोष्टी लपविलेल्या किंवा दुर्लक्ष केलेल्या नाहीत पण त्यांची टीका आणि शंका यांना उत्तरे दिलीच पाहिजेत.

अगोदर सांगितल्याप्रमाणे वेदांच्या पूर्वपक्षाशी अद्वैत संलग्न आहे. आणि नंतरच्या भागात त्याचे खंडन करायचे का ? नाही. तसे नाही. ज्ञानकाण्डात उपनिषदे अद्वैतावर भर देतात तो वेदांचा समारोपाचा भाग आहे. द्वैत सांगणारे कर्मकाण्ड प्रथम येते. वेद प्रथम आपल्याला ज्ञात असलेल्या द्वैतावर बोलतात व नंतर माहीत नसलेल्या अद्वैतावर बोलतात. (''वेद प्रथम ज्ञात विषयाबद्दल बोलतात'' येथे हे सत्य सांगावयाचे आहे की दृश्य जगत हे आमच्या प्रत्यक्ष दृष्टीला खंडित आणि अनेक रूपांत दिसते. ''आम्हाला माहीत नसलेले अद्वैत'' याचा अर्थ सर्व वस्तुमात्रातील एकत्व हे आम्हाला प्रत्यक्ष दृष्टीला दिसत नाही किंवा ते स्पष्ट रूपाने प्रकट नाही असा आहे.) याचा अर्थ असा की अद्वैताचा उपदेश हे वेदांचे परमोच्च ध्येय आहे.

वेदातील पूर्वपक्षात असलेले द्वैत का नाकारलेले नाही ते मी आपणास सांगतो, द्वैताच्या दृष्टिकोनातून ग्रंथ आणि पूजाअर्चा ही कर्मे अद्वैताच्या अनुभवाच्या मार्गावर वाटचाल करण्यात अडथळा नाहीत. उलट अचूक प्रगती करण्यासाठीची ती साधने आहेत. याकरिता ते वेदांच्या मुख्य संदेशाच्या विरुद्ध असणारा दृष्टिकोन तयार करतात आणि पुढील भागात हे ग्रंथ आणि पूजाअर्चा यांचे खंडन केले आहे असे समजण्याचे कारण नाही. प्रथम फूल नंतर फळ. तसे आपल्याला अद्वैताकडे जावे लागते. फूल फळाच्या विरुद्ध नसते. होय ना ? फळ सर्वोच्च विकास दाखविते म्हणून आपण फुलाला तुच्छ समजतो का ?

अद्वैताच्या दृष्टीने विरुद्ध प्रणालीला विरोध करण्याची गरज नाही. जेव्हा त्याची पातळी मर्यादा ओलांडते तेव्हा विरोध करण्याची गरज भासते. ह्याच दृष्टीने शंकराचार्य आणि

इतर अद्वैताचे प्रतिनिधी यांनी द्वैत आणि इतर प्रणालीचा विरोध केला.

ईश्वराच्या कृपेमुळे आत्तापर्यंतच्या वैज्ञानिक प्रगतीने आत्मिक गोष्टींना हानी पोहोचविलेली नाही. खरोखरच आधुनिक शास्त्र आपल्याला अद्वैताच्या जवळ नेते. त्यातील सत्य वेदाशिवाय कोणीही जाणू शकणार नाही. विज्ञानाच्या आरंभीच्या शतकांमध्ये असा विचार केला गेला की जगातील सर्व वस्तू ह्या भिन्न आणि एकमेकांपासून स्वतंत्र आहेत. नंतर शास्त्रज्ञ ह्या निर्णयाप्रत आले की सर्व पदार्थांचा आधार हा भिन्न घटकांनी बनलेला असतो. आणि जगातील असंख्य वस्तू ह्या घटकांच्या विविध प्रकारच्या एकत्रीकरणाने बनतात. आता तर अणुविज्ञान विकास पावल्यावर असे समजले आहे की सर्व घटकांचा एकच उगम, एकच ऊर्जा आहे. (अगणित वस्तू ह्या दोन किंवा तीन विभिन्न घटकांच्या एकत्र येण्यामुळे निर्माण झाल्या हे अणुविज्ञानास अवगत होण्याच्या अनेक वर्षे पूर्वी परम सद्‌गुरूंनी हे म्हटले होते. त्यांचे पुढे म्हणणे होते की, वैज्ञानिक ह्यापुढील संशोधनातून असाही शोध लावतील की सर्व मूल घटकांचा उगम एकच आहे. परमसद्‌गुरूंनी आधीच सांगितलेल्या गोष्टी सत्यात उतरत आहेत हे आश्चर्य नव्हे काय?)

जे आत्म्याचे चिंतन करतात आणि सत्य जाणतात ते आत्मा आणि ज्ञान व जाणीव यांतून तयार झालेली शक्ती ओळखतात. आणि जे ज्ञान आहे ते केवळ आंतरिक वस्तूच नव्हे तर जीवात्म्याला देखील संपूर्ण द्वैतवादी करून झाकून टाकते.

जी वस्तू ऊर्जा असेल किंवा चैतन्य असेल, जिच्याविषयी निशानी (शास्त्रज्ञ) आणि ज्ञानी बोलतात, जी आपल्याला दृश्य नसते, आपण फक्त निरनिराळ्या असंख्य रूपांत पाहतो. आपण एखादी वस्तू द्वैतभावाने पाहतो यासाठी आपल्याला वेदांचा आधार घेण्याची गरज नाही कारण ती स्पष्टच (वस्तू) आहे. जे आपले बुद्धी आणि डोळे ओळखतात त्यांच्यासाठी आपल्याला वेदांच्या पुराव्याची का गरज आहे ? ज्याची आपल्याला जाणीव नाही असे सत्य ते सांगत असतील पण आपल्याला जे माहीत आहे त्यावरून आपण ते जाणू शकतो आणि हे सत्य अंतिम सार म्हणून सांगितले गेले असेल तर हा त्यांचा अंतिम संदेश म्हणून स्वीकारायला पाहिजे. हा संदेश एक तत्त्व आहे की जीवात्मा परमात्मा होण्यासाठी परमात्म्यात अद्वैतरूपाने विलीन झालेला असतो.

-----

## प्रकरण ३५

# उपनिषदांच्या उपदेशाचे सार

उपनिषदांच्या उपदेशाचे सार काय? उपनिषदांमध्ये सांगितलेली ही (जीवात्मा आणि परमात्म्यांचे ऐक्य) आदर्श स्थिती आपण कशी ओळखायची?

आधुनिक शास्त्रज्ञांच्या दृष्टीने हे इंद्रियगोचर विश्व, काळ आणि अवकाश यांनी व्याप्त आहे. (त्याचे अस्तित्व काळ आणि अवकाश यांच्या चौकटीत असते) उपनिषदे सांगतात की काळ आणि अवकाश या घटकांपासून मुक्त झाल्यावरच आपण ह्या विश्वाच्या मूळाशी असलेले सत्य जाणू शकू. मी तुम्हाला क्षितिजासंबंधी सांगितले - जेथे आपण असतो नेमके तेथेच क्षितिज असते. ह्या सत्याचे ज्ञान आपल्याला अवकाशापलीकडे नेते. अशाच प्रकारे आपण काळाच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

हे शक्य आहे का?

यावर विश्वास बसावा म्हणून दैनंदिन जीवनातील एक उदाहरण देता येऊ शकेल. वेळ घालविण्यासाठी आपण दूरच्या देशातील कांगो म्हणा (आता झैरे म्हटले जाते.) येथे चाललेल्या कलहाचा वर्तमानपत्रातील वृत्तान्त चाळतो. जर पाकिस्तान किंवा (स्वदेशातील काश्मीर) अशा घराजवळचा वाद किंवा कलह उद्भवला तर आपण कांगो विसरतो आणि पाकिस्तान किंवा काश्मीरकडे वळतो. वर्तमानपत्रेच कांगोचा मजकूर कोपऱ्यात टाकतील आणि पाकिस्तान किंवा काश्मीरमधील स्थितीवर, प्राधान्याने प्रगतीवर प्रकाश टाकतील. पण जेव्हा कलह आणखी जवळ म्हणजे तमीळ आणि तेलुगू मधील तिरूत्तणी येथे सुरू होतो, (तिरूत्तणी हे तामिळनाडूमध्ये त्या राज्याच्या आणि आंधप्रदेशाच्या सीमेवर वसलेले आहे. काही वर्षांपूर्वी जेव्हा ह्या राज्यांना मान्यता मिळाली तेव्हा तेथे असलेल्या सुब्रह्मण्यमच्या प्रसिद्ध मंदिरामुळे हा भाग आंध्र प्रदेशात समाविष्ट व्हावा ही आंध्राची मागणी व तसे होऊ नये म्हणून तमीळांनी त्याला केलेला विरोध यातून वाद निर्माण झाला होता. आपण ह्याठिकाणी हे लक्षात घेतले पाहिजे की परमसद्‌गुरू येथे ह्याचा उल्लेख तमीळ श्रोत्यांसमोर करीत आहेत.) तेव्हा पाकिस्तान किंवा काश्मीर विसरले जातात आणि हा सीमावाद आपणाशी संबंधित असल्याने आपले ध्यान वेधून घेतो. आता जेव्हा आपल्याला आपल्या शेजारी झालेल्या रस्त्यावरील भांडणाविषयी कळते तेव्हा बाहेर जाऊन स्वतः कशाबाबत भांडण आहे हे पाहण्यासाठी आपण वृत्तपत्र फेकून देतो. पुन्हा, आपण रस्त्यातील भांडण पाहत असताना एक मित्र किंवा शेजारी येतो आणि आपल्याच घरी पत्नी आणि आई यांच्यात झगडा चालू असल्याचे सांगतो. मग आपण काय करतो ? रस्त्यातील भांडण आपण विसरतो आणि त्वरित घराकडे धावतो.

कदाचित आंतरराष्ट्रीय स्तरावर कांगोचा वाद खूप महत्त्वाचा असेल. पण आपण त्यापासून कमी महत्त्वाच्या कलहाकडे देतो. आपला प्रत्येक प्रश्नातील रस हा खऱ्या महत्त्वाच्या प्रश्नाच्या व्यस्त प्रमाणात असतो का? कांगो हे अवकाशातील आपण आहोत तेथून दूर आहे. दूर घडणाऱ्या गोष्टींपेक्षा जवळ घडणाऱ्या गोष्टींशी आपला संबंध अधिक असतो. याचाच अर्थ हे सर्व क्षितिजाकडे, आपण जेथे आहोत तेथे येण्यासारखे आहे.

आता आपली दृष्टी आत वळवू या. आपल्या जाणिवांतच काही विसंगती असल्याचे भान आपणास आले. तर इतर सर्व कलह, कांगो वादासारख्या दूरच्या बाबी होतील. हा आतील संघर्ष सोडविण्याचा प्रयत्न करू या आणि शांत राहण्याचा प्रयत्न करू या. ह्या शांततेत स्थान, अंतर आणि इतर सर्व घटक हद्दपार होतील. जेव्हा आपण झोपलेलो असतो तेव्हा आपल्याला ज्ञान किंवा अवकाशाची जाणीव नसते पण ज्ञानात म्हणजेच आंतरिक सत्याच्या जागृत अवस्थेत अवकाशाच्या जाणिवेशिवाय आपण ज्ञानाचा अनुभव घेऊ.

काळाचा घटक तसाच आहे. आपले वडील दहा वर्षांपूर्वी वारले तेव्हा आपण सांत्वन करण्यापलीकडे रडलो. आज आपण जेव्हा त्यांच्या मृत्यूचा विचार करतो तेव्हा आपल्याला तितक्या तीव्रतेने दुःख होत नाही, हे कसे? ज्या दिवशी आपली प्रिय व्यक्ती मरण पावते त्या दिवशी आपण शोक करतो पण पुढच्या दिवशी नाही, असे का? मागील वर्षी आपल्याला बढती मिळाली किंवा लॉटरीचे बक्षीस मिळाले, त्यावेळेस आपण आनंदाने उड्या मारल्या; नाही का? जेव्हा आपण आज त्याचा विचार करतो तेव्हा आपल्याला तितकाच आनंद होत नाही, असे का?

म्हणजेच अवकाशातील अंतर या घटकाप्रमाणेच, काळातील अंतर, नजीकता हा घटकही आपण एखाद्या घटनेने किती प्रभावित होऊ हे ठरवितो. जरी आपण बाहेर वळलो आणि काळ व अंतर यांची जाणीव ठेवली तर आपण काहीही प्रयत्न न करता त्यांचा प्रभाव संपतो. मग आत्मविश्वास येतो की जर आपण आत वळलो तर काळ आणि अवकाश अशा दोन्हीपासून आपण मुक्त होऊ. आपण जेव्हा झोपलेलो असतो तेव्हा प्रयत्न न करता काळ आणि अवकाश हे विसरलेलो असतो. पण त्यावेळेस आपल्याला त्यांच्यापासून मुक्त झाल्याची जाणीव नसते. तायुमानवर यांनी सांगितलेल्या स्थितीकडे आपण जायला पाहिजे, अशी स्थिती की जिच्यात आपण न झोपता झोपलेलो असतो आणि ज्ञानपूर्ण असतो आणि आपण काळ आणि अवकाश यांपासूनच्या मुक्तीच्या वरदानात निमग्न असतो. नंतर आपल्यावर कशाचाही, अगदी आपल्यासमक्ष असलेल्या, घरातील भांडणाचाही परिणाम होणार नाही. आपल्याला भोसकल्याची जखम झाली तरी त्याचा आपल्यावर परिणाम होत नाही - ती जखम कांगोसारख्या दूर ठिकाणी घडत असलेल्या घटनेसारखी असेल. जेव्हा आपल्या उपस्थितीत पती, पत्नी किंवा मूल, यासारखी आपली प्रिय व्यक्ती मरण पावते - त्यांचा मृत्यू दहा

वर्षापूर्वीच्या वडिलांच्या मृत्युसारखा दूरच्या काळात घडल्यासारखा असेल.

थोडा वेळ आपण अद्वैत आणि द्वैत यांचा वाद विसरू या. आपण आपल्या आवश्यकतेविषयी विचार करू या. कोणती आहे ती आवश्यक स्थिती ? शांती-निश्चलता.

आपल्यावर चांगल्या आणि वाईट गोष्टींचा एकसारखाच परिणाम होतो. आपण शोक करतो. आपण हसतो. दोहींचा शोक आणि हर्ष यांचा आपल्यावर प्रभाव असतो. अधिक हसणेही आपल्या पोटात वेदना निर्माण करते, कमजोर करते. जेव्हा आपल्याला खूपच गुदगुल्या केल्या जातात तेव्हा आपण रागाने म्हणतो ''थांबव,'' आपण रडतो. जेव्हा आपण आनंदाने नाचतो, तेव्हाही आपण थकतो. आपल्याला कशाचाही व्यत्यय न येता, कोणत्याही भावनेपुढे शरण न जाता शांत पडून राहावे असे वाटते. अशी आपली गरज असते. द्वैतही नाही, अद्वैतही नाही.

ह्या उद्दिष्टासाठी आपण काय केले पाहिजे ह्याचा विचार करू या. जर आपण एखाद्या घटनेचा कसा परिणाम होतो किंवा भावना दूर केली जाते ह्याचा विचार केला तर एक मुद्दा स्पष्ट होईल. ''जेव्हा कांगो युद्ध सुरू झाले तेव्हा आपण त्या वादाच्या वर्तमानपत्रातील अहवालात गर्क झालेलो असतो. नंतर त्यातील आपला रस कमी कसा झाला ? त्याचा आता आपल्यावर का परिणाम नाही ?'' जर आपण ह्या दिशेने विचार केला तर आपल्या लक्षात येईल की कोणत्याही घटनेचा परिणाम-कशाचाही-तो जसा जसा पुढे अवकाशात ढकलला जातो तसा हळूहळू कमी होतो. जर आपण विचार केला की दहा वर्षांपूर्वी आपले वडील वारले तेव्हा त्यांच्या मृत्यूचा आपल्यावर जो परिणाम झाला तसा आज आता होत नाही, तर आपल्या लक्षात येईल की जसा जसा काळ मागे पडतो तसतसा आपल्यावर भूतकाळातील घटनांचा परिणाम कमी कमी होत जातो. म्हणून जर आपल्याला अलिप्त राहायचे असेल तर आपण जे जवळच घडते ते कांगोसारख्या दूरच्या ठिकाणी घडते आहे असा विचार करण्याची सवय लावली पाहिजे.

त्याचप्रमाणे आपण चालू क्षणी घडलेल्या सुखद किंवा दुःखद घटना दहा वर्षांपूर्वी घडलेल्या आहेत असा विचार करायला शिकले पाहिजे. असा दृष्टिकोन घेण्यासाठी आपण परिश्रमपूर्वक स्वतःला प्रशिक्षण द्यायला पाहिजे. कोणताही आनंद किंवा दुःख चिरकाल टिकणारे नसते. ते सर्व सापेक्ष आहे (म्हणजे त्यांना त्यांची स्वतःची अशी सलग आणि स्वतंत्र शक्ती नसते, ते अन्य घटकांवर अवलंबून असतात). दुसऱ्या कशाचाही भाग बनणे किंवा कशावर तरी अवलंबून असण्यापेक्षा आपण स्वतःस परिपूर्ण अवस्था प्राप्त केली पाहिजे. मग आपण सर्व प्रभावांपासून मुक्त होऊ आणि आंतरिक शाश्वत शांतता मिळवू. अशा प्रकारे आईनस्टाईनचा सापेक्षता वादाचा सिध्दान्त आत्मविद्येला लावू शकतो.

काळ आणि अवकाशापासून मुक्त होण्यासाठी ज्वलंत आस हवी हे उपनिषदाच्या

संदेशाचे सार आहे. काळ आणि अवकाश यांच्यापासून मुक्त होण्याच्या आपल्या तीव्र इच्छेच्या प्रमाणात ते असते. आपल्याला ईश्वरकृपेचे वरदान मिळेल आणि आपण त्या महान आदर्शाकडे जाऊ शकू.

उपदेशासाठी आपल्याला पर्वतांवर किंवा अरण्यात जाण्याची गरज नाही. काळ आणि अवकाश घटनेपासून प्रभावित न होण्याचे शिकवतात. त्यासाठी आपल्याला ईश्वराची प्रार्थना करणे, घटना मागे भूतकाळात दूरवर ढकलणे, ह्यासाठी लागणारी क्षमता वाढविणे याची गरज असते.

दहा उपनिषदांपैकी पहिले असलेले ईशावास्य म्हणते : ''जे गतिमान असते आणि निश्चलही असते. ते दूरही असते आणि जवळही असते. ते खरेच आत असते. (तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वान्तिके । तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ।। यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति । सर्वभूतेषु च आत्मानं ततो विजुगुप्सते ।। यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक - एकत्वमनुपश्यतः ।। स पर्यगाच् छुक्रमकायमव्रणम् अस्नाविरम् शुद्धमपापविद्धम । कविर्मनीषि परिभूः स्वयंभूर्याथातश्यतोऽर्थान् ।। व्यदधाच् छाश्वतीभ्यः समाभ्यः ।। - ईशावास्योपनिषद ५,६,७,८) हे विधान काळ आणि अवकाश यांचा निर्देश करते आणि दोन्हांपासून मुक्त होण्याची तीव्र इच्छा निर्माण करते. पुढचा मंत्र काळ, अवकाश आणि सर्व प्राणिमात्रांना स्वतःच्या आत्म्यात पाहायला सांगतो. मग द्वेष, संभ्रम किंवा दुःख यांना कारण राहणार नाही म्हणजे आपल्यावर ह्या कशाचाही परिणाम होणार नाही. ह्या उपनिषदाचा दुसरा एक मंत्र म्हणतो 'आत्मा हा सर्वव्यापी, अवकाशाच्या पलीकडे जाणारा, आणि गोष्टी अनंत काळात त्यांच्या स्वरूपाप्रमाणे ढकलून देणारा असतो.

एकंदरीत, जे आधुनिक विज्ञान शिकविते तेच उपनिषदे काळ आणि अवकाश यांच्या मूलभूत सत्याविषयी सांगतात. पण हा एक फरक आहे. विज्ञानासाठी सत्य हे केवळ गृहीत / आधारतत्त्व असते. उपनिषदांच्या दृष्टीने ते सत्य अनुभव म्हणून आतून जाणायचे असते.

हे वेदांचा समारोपाचा भाग असलेल्या उपनिषदांचे सार आहे.

-----

## प्रकरण ३६

# वेदशाखा

वेद अनंत आहेत, त्यांना शेवट नाही असे जर म्हटले जाते तर मग 'वेदान्त' हा वेदांचा शेवटचा भाग आहे असे आपणास कसे म्हणता येईल ? वेदांचा सार-संदेश, वेदांनी उद्घोषित केलेले 'सत्य', आत्मदर्शनासाठी वेदांनी दिलेली शिकवण हे 'उपनिषद' म्हटल्या जाणाऱ्या प्रत्येक वेदाच्या समारोपाच्या म्हणजेच शेवटच्या भागात आलेले आहे व त्यालाच 'वेदान्त' असे म्हणतात.

अनंत असलेल्या वेदांचे इतक्या शाखा-उपशाखांमध्ये विभाजन का केले गेले ? माणसाला आत्मानुभूती यावी व त्यासाठी त्याची सिद्धता करावी या हेतूने अंतःकरण शुध्दीकरिता आवश्यक ते सर्व वेदामध्ये अंतर्भूत आहे. ह्याकरिता त्याला आवश्यक आहेत स्तोत्रे, यज्ञविधी आणि अन्य कर्मांत म्हटले जाणारे मंत्र तसेच यज्ञविधी करण्यामागील तत्त्वे त्याला तपासून घ्यावी लागतात आणि अंतिमतः परमसत्याची अनुभूती यावी म्हणून 'निदिध्यास' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ध्यानसाधनेच्या अभ्यासातून त्याला परमात्म्याचा शोध घ्यावा लागतो. अनंत वेद काही त्याला अभ्यासण्याची गरज नाही आणि कोणत्याही स्थितीत ते अशक्यप्रायही आहे. जो वेदांच्या पर्वतावर केवळ तीनच पावले वर जाऊ शकला अशा थोर भारद्वाज ऋषीची गोष्ट मी पूर्वी सांगितली, ती तुम्हाला आठवत असेलच.

स्वतःला शुद्ध करण्यासाठी, अशुद्धतेपासून मुक्त होण्यासाठी आणि शेवटी परमात्म्याशी एकरूप होण्यासाठी माणसाला जे शिकायला पाहिजे तो आवश्यक ग्रंथभाग वेगळा केला जातो, तीच वेदाची एक शाखा असते.

ब्राह्मणाच्या, जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या जीवनाशी संबंधित सर्व कृत्यांचा समावेश एका भागात असतो. ब्राह्मणाने संहितेतील मंत्रांचे पठण केले पाहिजे. मंत्र म्हणत ब्राह्मणात सांगितलेले यज्ञ केले पाहिजेत, आरण्यकांनी केलेला सेतू ओलांडला पाहिजे, आपल्या अंतरंगाशी संबंधित असलेल्या उपनिषदांचा अभ्यास करुन अंतरंग बाह्यरंगाशी जोडले पाहिजे. अशा प्रकारे तो आतून बाहेरुन एक होऊन मुक्त होतो.

सुज्ञ आणि प्रगल्भ माणसांना त्यांच्या जगातील अस्तित्वापासून मुक्त होण्यास एक मंत्र पुरेसा आहे. परंतु शुद्ध होण्यासाठी सामान्य माणसाला अनेक धर्मकृत्ये आणि अनेक प्रकारे पूजाअर्चा करावी लागते. त्याला जप आणि चिंतन करावे लागते. प्रत्येक शाखेत मंत्र, धार्मिक विधी आणि मुक्ती प्राप्त करण्यासाठी आत्मबोधाच्या शास्त्राचा उपदेश असतो. (अभ्यासलेल्या शाखा नावाचे ह्याच भागातील प्रकरण ३८ पाहा.)

-----

## प्रकरण ३७

# ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर

जे ब्राह्मण नाहीत त्यांचे काय? त्यांनाही अंतरंगात शुद्ध होण्याची गरज नाही का? जरी त्यांना वैदिक विधी करायचे नाहीत किंवा मंत्रपठण करायचे नसले; तरी त्यांनी त्यांच्यावर सोपवलेले कार्य करून शुद्ध व्हायचे असते. मनुष्य कोणत्याही जातीचा असो त्याने आपले पारंपारिक काम ईश्वरार्पण बुद्धीने केले तर तोही मुक्त होईल; गीतेत सांगितले आहे ''स्वकर्मणा तम् अभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।।''

एकाला युद्ध करायचे काम असते, दुसऱ्याला व्यापाराचे आणि पशुपालनाचे, तिसऱ्याला हाताने करायची शारीरिक कामे असतात. ब्राह्मण समाजासाठी कोणते काम करतो?

भौतिक जीवनातही परमात्म्याची कृपा महत्त्वाची नाही का ? सर्व जातींना ती कृपा मिळेल अशी कामे करणे हा ब्राह्मणाचा व्यवसाय आहे. देवता ह्या परमेश्वराच्या अधिकाऱ्यांप्रमाणे असतात. विश्वातील सर्व प्राण्यांना त्या देवतांचे प्रिय बनविणे हे ब्राह्मणाचे कर्तव्य आहे. तो करीत असलेली कर्मे, म्हणत असलेले मंत्र हे सर्व जातींच्या कल्याणाच्या हेतूने असते. त्याला हे भौतिक शक्तींनी करावे लागत असल्याने धार्मिक विधी आणि नवस यांची शिस्त, मंत्राला बल मिळण्यासाठी, इतरांपेक्षा अधिक पाळावी लागते. जर हे जाणले गेले की त्याला इतर समाजासाठी सुद्धा विधी करावे किंवा नवस करावे लागतात तर त्याला विशेष काम (विशेष अधिकार) दिलेले आहे, अशा चुकीच्या कल्पनेला लोकांच्या मनात थारा राहणार नाही.

ह्याशिवाय ब्राह्मणाला भौतिक जीवनाशी संबंधित असलेल्या शास्त्र आणि कलाही, आणि इतर सर्व जातींच्या परंपरेने आलेला व्यवसाय हे सर्व शिकून घ्यावे लागते आणि त्यांना मार्गदर्शन करावे लागते. त्याचे उपजीविकेचे साधन हे अध्यापकाचे आहे आणि त्याने इतर व्यवसाय करू नयेत. त्याचा पेशा मोठ्या जबाबदारीचा आहे आणि तो लोकांचे शारीरिक संरक्षण, व्यापार, कष्ट यांपेक्षा महत्त्वाचा आहे. ज्या कला, कारागिरी व अशाच कौशल्याने इतर जमाती स्वतःचे चरितार्थ चालवितात, मनाचे पोषण करतात आणि ज्ञान देतात अशांचे जतन करणे हे ब्राह्मणाचे कर्तव्य आहे.

जर अशी जबाबदारी पार पाडणारा मनाने उमदा नसेल तर तो इतरांना वरच्या पातळीवर नेऊ शकणार नाही. त्याच वेळेस एक अडचण अशी की तो इतरांमध्ये मिळू मिसळू शकणार नाही. तो बुद्धिनिष्ठ काम करीत असल्याने तो इतरांपेक्षा श्रेष्ठ आहे असे जर तो समजत असेल तर ती एक त्याला स्वतःलाच अडचण ठरेल. म्हणून ब्राह्मणाने पवित्र स्थितीत असले

पाहिजे. इतरांपेक्षा श्रेष्ठ मानण्याची अनेक कारणे असल्याने त्याच्यात थोडासुद्धा अहंकार किंवा उर्मटपणा असणार नाही ह्याची खात्री करायला हवी. म्हणूनच चाळीस संस्काराच्या उपचारांनी त्याला ठोकून पाणी (तेज) दिले जाते आणि त्यांच्यातील अशुद्धता पिळून बाहेर काढली जाते. (सोळाव्या प्रकरणात ह्याचा तपशीलवार विचार केला आहे.)

जर मंत्र प्रभावी व्हायचे असतील तर मंत्र म्हणणाऱ्याने शिस्तबद्ध असले पाहिजे आणि त्याने प्रतिज्ञा पाळल्या पाहिजेत. उदाहरणार्थ, विंचू दंश झालेल्या माणसाला बरे करण्याचा मंत्र. जो ते मंत्र म्हणतो त्याने काही कठोर नियम पाळलेच पाहिजेत. जर त्याने त्यात आळस केला तर मंत्राचा काहीच परिणाम होणार नाही - असे मांत्रिक स्वतःच सांगतात. प्रत्येक मंत्राच्या पठणासाठी नियम असतात, केव्हा म्हणायचा किंवा म्हणायचा नाही ती वेळ. नियमांचा भंग केला तर त्याचा परिणाम होणार नाही. मंत्र जेव्हा ग्रहणाच्या काळात म्हटले जातात तेव्हा ते अधिक परिणामकारक असतात असे म्हटले जाते.

ब्राह्मणासाठी आंतरिक शुद्धतेसाठी करायचे अनेक विधी वैदिक शाखेत असतात.

-----

## प्रकरण ३८

# सध्या अभ्यासल्या जाणाऱ्या वेदशाखा

फार पूर्वी लोकांमध्ये उल्लेखनीय सामर्थ्य होते आणि त्यांच्याकडे मोठी योग शक्ती आणि बौद्धिक शक्ती होती. म्हणून ते अनेक वैदिक शाखांवर प्रभुत्व मिळवू शकले. महान ऋषींच्या ठायी वेद स्वतःच विशाल वीज चमकावी तसे अकस्मात स्फुरणातून प्रकटले. इतर त्यांच्या असामान्य सामर्थ्याच्या, जोरावर वेदच नव्हे तर ज्ञानाच्या अन्य शाखांवर प्रभुत्व मिळवू शकले. वेद हे अमर्याद सागराप्रमाणे अनंत असल्याने सर्वच जण त्यांवर प्रभुत्व मिळवू शकले नाहीत. तरी प्राचीन काळी काही लोक अनेक शाखांमध्ये प्रवीण असत.

नंतरच्या काळात माणसे त्यांची स्वर्गीय शक्ती गमावू लागले. कलियुगात ती खरोखर अतिशय दुर्बळ झाली. माणसाचे जीवनमान कमी झाले आणि त्याचे आरोग्य आणि बुद्धी यांचाही ऱ्हास झाला. ही सर्व परमात्म्याची लीला होय. मानवी शक्ती आणि बुद्धी यांचा असा क्षय का व्हावा? ह्या प्रश्नाला उत्तर देणे कठीण आहे. पिढ्यानुपिढ्या अनेक लोक वेदाभ्यास करतात. यज्ञ करतात आणि आत्म्याचा शोध घेतात मग त्यात वाढ होणे हे नैसर्गिक नाही का? तसे ते का होत नाही? पुन्हा ह्या प्रश्नाला उत्तर देणे कठीण आहे.

परमात्मा अद्भुत आणि नित्यनूतन पद्धतीने हे विश्वनाट्य करीत आहे. जरी डार्विनसारखे शास्त्रज्ञ उत्क्रांतीविषयी बोलत असले तरी आत्मिक शक्ती, बौद्धिक प्रकाश, चारित्र्य आणि योगशक्ती यांबाबत आपण मोजमापात खाली खाली जात आहोत.

कृत युगापासून मानवी शक्तीचा ऱ्हास सुरू झाला. त्याकाळी मनुष्य हाडाचा सांगाडा राहीपर्यंत जगत असे. जरी त्याचे रक्त वाळून गेले आणि मांस नष्ट झाले तरी हाडे कोसळेपर्यंत तो जगत असे. कृत युगातील लोकांकडे ज्ञानशक्ती खूप होती. त्यांना ''अस्थी-गत-प्राण'' म्हटले जाई.

त्रेता युगात लोक ''मांस-गत-प्राण'' होते म्हणजे मांस असेपर्यंत जगत आणि रक्त जरी वाळले तरी नष्ट होत नसत. त्यांच्याकडे यज्ञ करण्याची क्षमता होती. द्वापार युगात लोक ''रुधिर-गत-प्राण'' होते आणि ते रक्त वाळेपर्यंत जगत असत. ते करीत असलेल्या पूजेबद्दल ते प्रसिद्ध होते. आपण कलियुगात ''अन्न-गत-प्राण'' आहोत आणि अन्न (पोषण) टिकेपर्यंत आपल्या शरीरात जीव राहील. आपल्याला चिंतन करण्याचे, विधी आणि पूजा करण्याचे थोडेच सामर्थ्य आहे. पण आपणाला ईश्वराचे-राम, कृष्ण आणि असेच नामजप करण्याचे सामर्थ्य आहे. ईश्वराचे नाव पुटपुटून आपण मुक्त होऊ हे खरे आहे. तरी सुद्धा आपण वेद मृत होऊ देता कामा नये. निर्मितीपासून ते आपल्यासाठी मागे ठेवले गेले आहेत. ते आपण नष्ट होऊ

द्यायचे का?

जेव्हा श्रीकृष्ण ह्या जगातून गेले तेव्हा जगावर भयंकर काळोख पसरला. त्यांच्या स्वतःच्या नावातच काळोख आहे. (कृष्ण म्हणजे काळा). त्यांचा जन्मही काळोखात, तुरुंगाच्या अंधाऱ्या कोठडीत मध्यरात्री झाला. परंतु तो जगाला प्रकाशझोत, दयेचा प्रकाश झोप, दयेचा प्रकाश ठरला. जेव्हा श्रीकृष्णानी हे जग सोडले तेव्हा ज्ञानाची हानी झाली आणि भूमीवर काळोख पसरला. मूर्तिमंत पाप असलेला कली अधिकारपदावर आला. ही सर्व परमात्म्याची लीला आहे, ती अगम्य आहे. श्रीकृष्ण प्रकाशझोत म्हणून आला पण नंतर अशी परिस्थिती निर्माण केली की सर्वत्र काळोख उत्पन्न झाला. नंतर करुणेने त्याने ठरविले की ह्या विश्वाचा लय होऊ नये. त्याने विचार केला की कलीच्या विषाला उतारा देऊन विश्वाला वाचविता येईल. हा उतारा म्हणजे वेद होते. त्यांची काळजी घेऊन कली ते नाहीसे करणार नाही हे पाहणे जग वाचविण्यास पुरे होईल. प्रत्येक गोष्ट वेढणाऱ्या अंधारात ते मानवजातीचा मार्ग उजळवून टाकणाऱ्या दिव्याचा हेतू साध्य करतील. कलियुगात ते पूर्वीच्या युगाप्रमाणे तितक्याच तेजाने चमकणार नाहीत. पण ईश्वराने ठरविले की मानवाच्या हितासाठी कमीतकमी तेजाने का होईना ते चमकले पाहिजेत आणि त्याने ती हमी अंशतः त्याचाच अवतार असलेल्या वेदव्यासांद्वारे दिलेली आहे.

भगवान कृष्णाचा निश्चय अंमलात आणणाऱ्या ऋषीला त्यावेळी वेदव्यास म्हटले जात नसे. त्यांचे नावही कृष्ण होते आणि ते एका बेटावर जन्मले म्हणून त्यांना ''द्वैपायन'' हे नाव होते. ''बादरायण'' हे आणखी एक नाव आहे. कृष्ण द्वैपायन यांना विविध ऋषींकडून प्रकट केल्या गेलेल्या वेदांच्या सर्व ११८० शाखा ज्ञात होत्या. त्या एका मोठ्या प्रवाहात एकत्र मिसळून गेल्या होत्या. विशेष ईश्वरी देणगी मिळालेली असल्याने आपले पूर्वज त्या सर्व स्मरणात ठेवू शकत असत. आपल्यासारख्या दुर्बळ लोकांसाठी व्यासांनी त्यांचे चार भागांत विभाजन केले आणि प्रत्येकाच्या शाखांमध्ये उपविभाग केले. ते एका नदीवर धरण बांधण्यासारखे आणि ते पाणी निरनिराळ्या कालव्यांतून नेण्यासारखे होते. व्यास सहजपणे वेदविभाजनाचे कार्य करू शकले कारण ते दिव्य दृष्टी असलेले योगी होते आणि त्यांनी तपश्चर्येद्वारे ती शक्ती प्राप्त केलेली होती.

ऋग्वेदी शाखांमध्ये विविध देवतांना आवाहन करण्याचे मंत्र आहेत. यजुर्वेद शाखेत यज्ञ करण्याबाबतचे मंत्र आहेत. सामवेदाच्या शाखा देवतांना संतुष्ट करणारी गीते आहेत आणि अथर्ववेदाच्या शाखांमध्ये यज्ञाव्यतिरिक्त, संकटांना दूर करण्यासाठी म्हणायचे आणि शत्रूंचा नाश करणारे मंत्र आहेत. सामवेदांमध्ये सर्वात जास्त भाग, १००० आहेत. ऋग्वेदात २१ होते; यजुर्वेदात १०९ (शुक्ल-यजुर्वेद १५ आणि कृष्ण-यजुर्वेद ९४) आणि अथर्ववेदात ५० आहेत.

एका विद्वानानुसार विष्णु पुराण ११८० शाखा असल्याचा उल्लेख करते, अन्य

आवृत्तीत ११३३ भाग उल्लेखिले आहेत - ऋग्वेद २१, यजुर्वेद १०१, सामवेद १००० आणि अथर्ववेद ११.

कलियुगातील लोक त्यांच्या पूर्वजांपेक्षा गौण असल्याचा विचार करून कृष्ण द्वैपायन यांना वाटले की त्यांनी चारपैकी कोणत्याही एका वेदाच्या एका शाखेचा अभ्यास करावा. ईश्वरानेच ही कल्पना त्यांच्या डोक्यात घातली. व्यासांनी ऋग्वेद शाखा पैलकडे सोपविल्या, यजुर्वेद शाखा वैशंपायन यांना, सामवेदाच्या शाखा सुमंतु यांना दिल्या.

वेदांचे चार भागांत विभाजन आणि ११८० शाखांमध्ये उपविभाजन केल्यामुळे कृष्ण द्वैपायन यांना ''वेदव्यास'' म्हणण्यात येऊ लागले. व्यास याचा शब्दशः अर्थ 'निबंध' किंवा 'रचना' असा आहे. उद्देशाचे वर्गीकरण म्हणजे सुद्धा व्यास होय.

कृष्णा द्वैपायनांच्या व्यवस्थेनुसार जरी व्यक्तीला (ब्राह्मणाला) केवळ एका शाखेचे अध्ययन करणे बंधनकारक असले तरी त्याचा अर्थ असा नाही की अधिकांच्या अध्ययनास प्रतिबंध आहे. हेतू एवढाच आहे की किमान एका तरी शाखेचा अभ्यास करावा. व्यासांच्या काळानंतर ह्या चार वेदांपैकी एकापेक्षा अधिक शाखांचे अध्ययन करणाऱ्या पंडितांची उदाहरणे आहेत. (व्यासांनी ते विभाजन सुमारे ५००० वर्षापूर्वी केले. हे ऐतिहासिकदृष्ट्या सिद्ध झालेले आहे. हा काळ स्वीकारण्याऐवजी आपल्या शास्त्रानुसार, आधुनिक इतिहासकार महाभारताचा काळ हा इ.स. पूर्व १५०० असल्याचा पुरावा देतात. हे नंतरचे मत अलीकडच्या काळात बदलले, त्यानुसार त्याचा काळ ५००० वर्षापेक्षा मागे जातो. अनुमानानुसार व्यासही त्याच काळात होते.

मी म्हणालो की एकापेक्षा जास्त शाखांच्या अध्ययनाला प्रतिबंध नव्हता. आजही चतुर्वेदी, त्रिवेदी आणि द्विवेदी अशा नावाचे ब्राह्मण उत्तर भारतीय आढळतात.

आपल्याकडे सी.एम. त्रिवेदी नावाचे एक राज्यपाल होते. दुबे आणि दवे ही नावे द्विवेदीपासून आलेली आहेत. चारही वेदांचे अध्ययन केलेल्या कुटुंबातून आलेल्यालाही चतुर्वेदी म्हटले जाते. बंगालमध्ये त्याला चॅटर्जी म्हटले जाते. ज्यांनी तीन वेदांवर प्रभुत्व मिळवले ते त्रिवेदी असतात. हल्ली तर एक वेद अभ्यासलेला मनुष्य आढळणेही कठीण आहे पण काही कुटुंब स्वतःला त्रिवेदी किंवा चतुर्वेदी म्हणतात. ह्यावरून असे दिसते की भूतकाळात एकापेक्षा अधिक वेद अभ्यासलेल्या व्यक्ती असल्याच पाहिजेत. 'ज्ञानसंबन्धर' स्वतःला ''नानमरै ज्ञानसंबन्धर'' म्हणतो. (चारही वेदांचे ज्ञान असलेला) स्वतः अंबामातेने त्याला स्तनपान केले असल्याने त्याला चारही वेदांवर प्रभुत्व मिळवणे सुलभ झाले असावे.

वेदव्यासांनी वेदांचे विभाजन केल्यानंतर ५००० किंवा अधिक वर्षांमध्ये अनेक शाखा नष्ट झाल्या. ११८० पैकी ६ किंवा ७ शाखा अस्तित्वात असल्याची दुर्दैवी स्थिती आहे.

ऋग्वेदाच्या २१ शाखांपैकी केवळ एक शाखा अस्तित्वात आहे. तिला शाकल शाखा म्हणतात; किंवा ती ऐतरेय उपनिषदात येते म्हणून ऐतरेय शाखा म्हटले जाते. शुक्ल यजुर्वेदाच्या केवळ दोन शाखा अस्तित्वात आहेत, पैकी महाराष्ट्रात काण्व शाखेचे आणि माध्यंदिन शाखेचे उत्तर प्रदेशात मोठ्या संख्येने अनुयायी आहेत. कृष्ण यजुर्वेदाच्या ९४ शाखांपैकी तैत्तिरीय शाखेचा अनुयायी वर्ग मोठा आहे विशेषतः दक्षिणेकडे. आपण सामवेदाच्या १००० शाखापैकी ९९७ गमावल्या आहेत. तमीळनाडू मध्ये कौथुम शाखेचे अनुयायी तलवकार शाखेच्या अनुयायांपेक्षा अधिक आहेत, महाराष्ट्रात राणायनीय शाखेचे थोडे अनुयायी आहेत. अथर्ववेदाच्या ५० शाखांपैकी एकही अस्तित्वात नसल्याची भीती व्यक्त झाली होती. पण चौकशी नंतर सिनोर, गुजरात येथे ह्या वेदाच्या शौनक शाखेत प्रवीण असलेला एक ब्राह्मण आढळला. आम्ही येथून (तमीळनाडू) त्याच्याकडून शिकण्यासाठी विद्यार्थी पाठविले.

ऋग्वेदाचे ऐतरेय ब्राह्मण आणि कौषीतकी ब्राह्मण (शांखायन ब्राह्मण असेही म्हटले जाते) उपलब्ध आहेत. ह्यांचे आरण्यकाचे भाग असलेले ऐतरेय उपनिषद आणि कौषीतकी उपनिषद अस्तित्वात आहेत.

आपल्याकडे शुक्ल - यजुर्वेदाचे शतपथ ब्राह्मण आहे. किरकोळ फरकांसह हे माध्यंदिन आणि काण्व शाखा अशा दोन्ही शाखेत आहेत. सर्व वेदांच्या स्पष्टीकरणाचा हेतू ह्या प्रचंड कार्यामुळे साध्य होतो. ह्या वेदातील फक्त एकच आरण्यक अस्तित्वात आहे ज्याचे बृहदारण्यक बनते. मी अगोदरच उल्लेख केला आहे की ईशावास्य उपनिषद हे ह्या वेदाच्या संहितेमध्ये आहे.

कृष्ण यजुर्वेदाचे केवळ तैत्तिरीय ब्राह्मण अस्तित्वात आहे. ह्या वेदाच्या आरण्यकापैकी तैत्तिरीय आपल्याकडे आहे; तैत्तिरीय उपनिषद आणि महानारायण उपनिषद हे त्याचे भाग आहेत. नंतरच्यामध्ये महानारायण, ह्यात नित्य वापरले जाणारे अनेक मंत्र आहेत. मैत्रायणी आरण्यक आणि त्याच नावाचे उपनिषद हे कृष्ण यजुर्वेदातील आहेत. पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे कठ शाखेचे फक्त कठोपनिषद उपलब्ध आहे, संहिता, ब्राह्मण आणि आरण्यक नाही.

(त्याचप्रमाणे कृष्ण यजुर्वेदाचे श्वेताश्वतरोपनिषद अस्तित्वात आहे पण संबंधित शाखेचा इतर एकही भाग नाही.)

सामवेदाच्या नऊशे सत्त्याण्णव शाखा लोप पावल्या आहेत आणि त्याच्या ब्राह्मणांपैकी सात किंवा आठ ब्राह्मणे टिकून आहेत - ताण्ड्य, आर्षेय, देवताध्याय, संहितोपनिषद, वंश (षड्विंश, छांदोग्य, जैमिनीय) ह्या वेदाच्या तलवकार आरण्यकाला तलवकार ब्राह्मण असेही म्हटले जाते. केनोपनिषद त्याच्या शेवटी येते : म्हणून तेही तलवकार

उपनिषद म्हणून ओळखले जाते. छांदोग्य ब्राह्मणाचे छांदोग्य हे उपनिषद आहे.

पूर्वी उल्लेखलेल्याची पुनरावृत्ती करायची तर अजूनही आपल्याकडे ही तीन उपनिषदे उपलब्ध आहेत. प्रश्न, मुण्डक आणि माण्डुक्य (नृसिंह - तापिनी हेही ह्या वेदाचे आहे.) ह्या वेदाचे केवळ एकच ब्राह्मण राहिलेले आहे ते म्हणजे गोपथ.

आपल्या दुर्लक्षामुळे ११८० शाखांपैकी ७ किंवा ८ शाखा शिल्लक असतील तर ह्या गंभीर गुन्ह्याबद्दल आपण गुन्हेगार आहोत, त्यासाठी काहीही प्रायश्चित्त नसेल.

ज्याला दक्षिणेत द्रवीडदेश म्हटले जाते. तेथे केरळातील 'नंपूत्री' (तंबुद्री) कडून वैदिक अभ्यास जिवंत ठेवला गेला आहे आणि अलीकडच्या काळापर्यंत आंध्र प्रदेशात त्यांचे चांगले जतन केले गेले. दरवर्षी विजयवाडा येथे नवरात्री उत्सवात वेदाच्या विद्यार्थ्यांच्या परीक्षा आणि वैदिक विद्वानांच्या सभा भरविल्या जात, हे त्यासाठी प्रोत्साहन होते. जे त्या सभेत भाग घेत त्यांना प्रशस्तिपत्रकाबरोबर रोख बक्षीस दिले जाई. संपूर्ण देशभरातून ब्रह्मचारी आणि पंडित परीक्षा आणि सभा यामध्ये भाग घेण्यासाठी येत असत. प्रशस्तिपत्रकाला खूप मोल होते. प्रशस्तिपत्रकासह घरी परतणाऱ्या पंडितांचा मार्गात घरच्यांकडून सन्मान होत असे. आंध्र प्रदेशात विवाहात वैदिक पंडितांना पुरेशी मोठी रक्कम देण्याची प्रथा होती. अशा प्रेरणांमुळे त्या राज्यात वेदअध्ययनाची भरभराट झाली.

ब्राह्मणाने पैशाच्या मागे लागता कामा नये, तो जर तसे करील तर तो ब्राह्मण राहत नाही. तथापि, आपल्याला हाही विचार करावा लागतो की आजकाल वैदिक पंडिताशिवाय अन्य कोणताही व्यवसाय किंवा पेशा हा अधिक आकर्षक आहे. वेदाध्ययन करणारा आपला चरितार्थ चालवू शकत नाही. अशी स्थिती असल्याने, वैदिक पंडित चिंतेविना राहू शकतील अशी व्यवस्था करणे हे आपले कर्तव्य ठरते. वेद-विद्यार्थ्यांच्या आणि पंडितांच्या किमान गरजा भागविल्यामुळेच तेलुगू देशात वेद अध्ययनाची भरभराट झाली.

भारतभर वेद-अध्ययनाच्या प्रसारासाठी आम्ही प्रयत्न करीत आहोत आणि विशेषतः तमीळनाडू-पाठशाळांसाठी (वेद शाळा) निधी उभारण्याची योजना आखली जात आहे. (परम सद्गुरूंच्या प्रेरणेने कांची मठानेच स्वतः ही योजना सुरू केली आहे. विस्तृत माहितीसाठी परिशिष्ट २ पाहा.) तमीळनाडू मध्ये नायक सारख्या हिंदू राज्यकर्त्यांच्या राजवटीत वेदाध्ययनाला आश्रय मिळत असे. नंतर राजघराण्यांकडून प्रोत्साहन मिळत असे. (तंजावर आणि मदुराई येथील नायकत्व त्याच सुमारास १६ व्या शतकात निर्माण झाले.) जो ब्राह्मण वेदाच्या एका संपूर्ण शाखेवर प्रभुत्व मिळवीत असे त्याला 'श्रोत्रीय' म्हटले जाई - श्रुती पासून म्हणजे वेदापासून आलेला शब्द. तमीळ राजांचे अशा ब्राह्मणांना जमीन दान देणे रूढ होते आणि काही वेळेस संपूर्ण गाव दिले जाई, ते करमुक्त असे. जुन्या ग्रंथांमध्ये त्याचे वर्णन

'इरैयिली' असे केले जाते. ब्राह्मणांना दिलेल्या देणग्यांमुळे त्या जमिनीला ब्राह्मणदेश असे नाव दिले जाई. राजाच्या आज्ञांमध्ये 'ब्रह्मदेयम्' असा शब्द वापरला जाई. चारही वेदांमध्ये पारंगत असलेल्या ब्राह्मणांना दिलेल्या गावाला 'चतुर्वेदीमंगलम्' असे नाव दिले जाई. जे सर्व वेळ वेदांचे अध्यापन आणि अध्ययन यात घालवीत. त्यांना उत्पन्नाचे अन्य साधन नसे. त्यांना (किस्ती हा) जमिनीवरचा कर माफ असे. ही सूट नबाबांच्या कारकिर्दीत, ईस्ट इंडिया कंपनीच्या काळात आणि तिचे वारस असलेले बिटिश सरकार यांच्या काळातही चालू होती. जरी इंग्रजांनी वेद-अध्ययनाला प्रोत्साहन देण्यासाठी काही केले नाही तरी श्रोत्रीयांच्या गावांना करात सूट दिली. तथापि कालांतराने ब्राह्मणांनी पुरावे देऊन जमिनी विकल्या आणि शहरात स्थायिक होण्यासाठी त्यांच्या पूर्वजांच्या गावाचा त्याग केला. हे म्हणजे, प्रदीर्घ अशा वैदिक परंपरेचा संबंध तोडणे, हे सुद्धा अतिशय दुर्दैवी होते.

आपल्या देशाला युगायुगाची परंपरा, वैभवशाली परंपरा आहे - तिला जगाच्या कोणत्याही भागात तुलना नाही. तिच्या लोकांचा एक भाग असलेल्यांनी, पिढ्यानुपिढ्या, फक्त स्वतःच्याच नव्हे तर संपूर्ण समाजाच्या कल्याणासाठी काम केले, आणि त्यांनी हे भौतिक गोष्टींमध्ये स्वतःला समाविष्ट न करून घेता. नंतर त्यांनी (ब्राह्मण) अशा परंपरेचे अद्वितीय महत्त्व जाणले नाही आणि पाश्चात्त्य जीवनशैली स्वीकारण्यासाठी त्यापासून स्वतःस दूर नेले. लवकरच अशी परिस्थिती उद्‌भवली की आत्म्याच्या शोधात स्वतःला पूर्णपणे वाहून घेणाऱ्या वर्गाचे महत्त्व इतरही लोक विसरून गेले.

-----

# ब्राह्मणांची कर्तव्ये

जर इतका वेळ माझे ऐकून कोणता हेतू साध्य झाला असेल तर, वैदिक शिक्षणाच्या प्रसारासाठी आपणास कोणती पावले उचलणे योग्य ठरेल हे तुम्ही (ब्राह्मणांनी) ठरवायचे आहे. पंचमहायज्ञांपैकी ब्रह्मयज्ञ तुम्ही दररोज केला पाहिजे. ब्रह्मयज्ञातील ब्रह्म ह्या शब्दाचा अर्थ वेद. शाश्वत सत्य म्हणून मंत्रांची शक्ती आपण आपल्यात जतन केली पाहिजे. ती कधीही न विझणाऱ्या दिव्याप्रमाणे तेजाने प्रज्वलित राहिली पाहिजे. म्हणून आपण ब्रह्मयज्ञ करतो. आपल्या वैदिक शाखेच्या ऋषीला आपण आहुती दिली पाहिजे. हे जर करता आले नाही तर कमीतकमी आपण गायत्री-जप रोज करू शकतो. गायत्री हे वेदांचे सार आहे, अर्क आहे. त्याचे पठण करण्यास पात्र होण्यासाठी तुम्ही गुरूकडून दीक्षा घेतली पाहिजे. अशा प्रकारे तुम्ही शिकलेल्या गायत्री मंत्राचे रोज मनात किमान एक सहस्र वेळा स्मरण करावे. ह्याशिवाय तुम्ही कमीत कमी हा मंत्र सकाळ, दुपार आणि संध्याकाळ असा प्रत्येकी दहा वेळा म्हटला पाहिजे आणि तुम्ही हे अवश्य केलेच पाहिजे. सूर्य ही गायत्री मंत्राची अधिपती देवता. रविवार हा सूर्याचा वार असून सुटीचा दिवस आहे. त्या दिवशी तुम्ही पहाटे चारला उठले पाहिजे आणि स्नानानंतर एक सहस्र वेळा गायत्री जप केला पाहिजे. ह्याने तुमच्या आणि अखिल जगताच्या कल्याणाची खात्री होईल. (भाग १७ पाहा)

सर्व ब्राह्मणांनी पुरुषसूक्त, श्रीसूक्त, श्री रुद्र इ. म्हणायला शिकलेच पाहिजे. मी येथे विशेषतः कचेरीत जाणाऱ्या ब्राह्मणांशी बोलत आहे. वैदिक शिक्षणासाठी पूर्णपणे वाहून घेणे त्यांना अवघड जाईल म्हणून त्यांनी हे किमान ग्रांथिक ज्ञान घेतले पाहिजे. अशा स्थितीत जर त्यांनी अडचणींना तोंड देत काही साध्य केले तर ते श्रेयस्कर होईल. आत्ताच तुम्ही सुरुवात केली तर तुम्ही तुमचा अभ्यास पूर्ण करू शकाल. पण तुमच्या ठिकाणी श्रद्धा आणि समर्पण हवे. वेद ही एक विद्या आहे जी हजारो वर्षांतून आपल्याकडे आली आहे. जर तिचा तुम्ही निश्चयाने अभ्यास केला तर तुम्ही नक्कीच यशस्वी व्हाल. पीएच.डी. किंवा तत्सम पदवी मिळविण्यासाठी ५० किंवा ६० वर्षाचे वृद्ध लोक शोधकार्यात गर्क असल्याचे तुम्ही पाहिले नाहीत का ? जर तुम्हाला इच्छा असेल तर कार्य कितीही कठीण असो तुम्हाला कोणतीही गोष्ट साध्य करायला मार्ग सापडेल. जे चाळीसाव्या वर्षी वेदांबाबत अज्ञ होते पण नंतर जे उत्साहाने वेद म्हणायला शिकले, अशा व्यक्तींची उदाहरणे आहेत. वस्तुतः आमच्या वेदरक्षण निधी ट्रस्टमधील कर्मचाऱ्यांमध्ये अशी माणसे आहेत. म्हणून श्रद्धेबरोबरच निश्चयाची गरज आहे.

नोकरीत असलेले आणि मध्यम वयाचे किंवा वृद्ध ब्राह्मणांचा प्रश्न बाजूला ठेवू. ते वेद म्हणू शकतात की नाही, किंवा त्यांना ते शिकायचे असोत नसोत, पण त्यांची मुले वेद ग्रंथामधील उपदेश घेत आहेत हे त्यांनी पाहिले पाहिजे. कदाचित मुलांना वेदांच्या पूर्ण

अभ्यासक्रमासाठी पाठविले जाऊ शकत नसेल, पण पालकांनी ठरविले पाहिजे की त्यांच्या मुलांच्या आठव्या वर्षी उपनयन झाल्यावर आठ वर्षाच्या काळात रोज संध्याकाळी त्यांचा एक तास मुलांना वेद शिकविले जातील. एखाद्या वसाहतीत किंवा खेड्यातील सर्व मुलांना वेद शिकविणसाठी सहकारी तत्त्वांवर वेदांचे अध्यापक नेमले जाणे शक्य आहे. गरीब ब्राह्मणांच्या मुलांना ही मदत होऊ शकेल.

यावर, अस्तित्वात असलेल्या ज्या पाठशाळा सांप्रत असमाधानकारक अवस्थेत आहेत त्या बंद करणे भाग पडू नये असे प्रयत्न केलेच पाहिजेत. ह्या संस्थांना बळ दिले पाहिजे आणि त्या संस्थांमध्ये प्रवेश घेण्यासाठी अधिकाधिक विद्यार्थ्यांना प्रोत्साहन दिले पाहिजे. हे कार्य पूर्ण करण्यास शिक्षक आणि विद्यार्थी यांना पैशांची पूर्ण मदत केली पाहिजे.

मला पुन्हा सांगायचे आहे की ब्राह्मणांना किमान रक्कम आणि भौतिक सोयी यांच्यापेक्षा जास्त काहीही दिले जाता कामा नये. परंतु आज आपल्याला असे दिसते की त्यांना मोहात पाडू शकतील अशा अनेक आकर्षक नोकऱ्या आहेत. जर त्यांना आवश्यकतेपेक्षा अधिक आर्थिक अनुकूलता दिली गेली नाही तर त्यांचा अध्ययन व अध्यापन ह्या स्वधर्मात पूर्ण सहभाग न राहण्याचा धोका आहे. आपण त्यांना काही निश्चित सुख-सोयी दिल्या पाहिजेत, ज्यायोगे असे ब्राह्मण दुर्मिळ होण्याच्या दुर्दैवी परिस्थितीला आम्हाला तोंड द्यावे लागू नये. पूर्वी ठाऊक नसलेल्या अनेक नवीन सुख-सोयी, मौजेची नवीन क्षेत्रे उपलब्ध झाली आहेत. फक्त काही ब्राह्मणांनी हे सर्व सोडून, स्वधर्माला चिकटून राहावे अशी अपेक्षा करणे अवाजवी ठरेल. आपण असा दृष्टिकोन स्वीकारला तर वैदिक धर्माची हानी होईल. म्हणून जे कोणी ब्राह्मण, विशेषतः त्यांच्या स्वधर्मात जे व्यस्त असतील, त्यांना आर्थिक आणि अन्य सामग्री देणे हे आपले कर्तव्य आहे. त्यांना चैनीच्या गोष्टी द्यायच्या नसल्या तरी इतर नोकऱ्यांनी त्यांना भुलवू नये इतक्या पुरेशा सोयी मात्र द्यायला पाहिजे. हे लक्षात ठेवून आम्ही अनेक योजना आखल्या आहेत.

-----

## प्रकरण ४०

# वेद-भाष्य

वेदध्वनी जिवंत ठेवला पाहिजे. त्यासाठी ब्राह्मणांनी वेद पाठ करून रोज त्यांचे पठण केले तर ते पुरेसे होईल. ध्वनीची शक्ती, म्हटल्या गेलेल्या मंत्रांची शक्ती मानवजातीच्या कल्याणासाठी पुरेशी आहे. तुम्हाला आठवत असेल की मी म्हणालो होतो की वेदमंत्रांचा अर्थ माहीत नसला तरीही वेद म्हणणे हे 'वीर्यवत्तर होय' तरी सुद्धा ह्या विधानाने माझा दृष्टिकोन पूर्णपणे व्यक्त होत नाही. (ह्याच भागाचे प्रकरण १४ पाहा)

एखाद्या विद्यार्थ्याला वेदपाठ करणे आणि त्यांच्या अर्थाचा अभ्यास करण्यात अनेक वर्षे घालवावी लागतात. इतका काळ त्याला वैदिक शाळेत अडकवून ठेवणे सोपे नाही. मी तसे का म्हटले ह्याचे मी स्पष्टीकरण केले पाहिजे. ''वेदांचा अर्थ माहीत असणे महत्त्वाचे नाही आणि आपल्याला त्याचे ध्वनी हवे आहेत.'' एखाद्या विद्यार्थ्याने मंत्रांचे अर्थ कळल्यावरच वेदपठण करावे हे त्याच्याकडून फारच अपेक्षा केल्यासारखे होईल. त्याचा अर्थ असाही होईल की स्तोत्रे पाठ करायला कोणीही पुढे येणार नाही. अशा स्थितीत ध्वनी कसे जिवंत ठेवता येतील ? म्हणून मी थोडे गांभीर्याने आणि थोडे मजेने म्हणालो की ''अर्थ महत्त्वाचा नाही, ध्वनी पुरेसा होईल....''

वेद पठण करून ध्वनी जिवंत ठेवणाऱ्या लोकांची मोठी संख्या असली पाहिजे. त्याशिवाय त्यांच्यापैकी काहींना अर्थ शिकविण्याची व्यवस्था असली पाहिजे. तसे आम्ही वेद-भाष्ये (वेदांवरचे भाष्य) शिकविण्यात गांभीर्याने कार्यरत आहोत. वेद अर्थाने गूढ आहेत म्हणून अनेक महान व्यक्तींनी त्यांच्यावर भाष्ये लिहिली आहेत. त्यांचे प्रयत्न वाया जाऊ नयेत.

आपण आपल्या घरात विवाह, श्राद्ध, उपाकर्म इ. अनेक विधी करतो आणि ह्या कार्यक्रमात पुरोहिताने सांगितल्याप्रमाणे आपण वेदमंत्र म्हणतो. आपण, अशा विधींचा पूर्ण त्याग केला आहे अशा स्थितीला ईश्वरांच्या कृपेने पोहोचलेलो नाही. तथापि, वैदिक व्यवहारास उतरती कळा लागली आहे, तो हा दुर्बल होत चालला आहे. ह्याचे महत्त्वाचे एक कारण म्हणजे आपल्याला म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांचा अर्थ माहीत नसतो. हल्ली सुशिक्षित लोकांच्या, पुरोहिताच्या मागे अर्थ न समजता मंत्र म्हटले जाण्याने त्यांचा त्यात खरा सहभाग नसतो.

आपण लोकांना मंत्र पठण (त्यांचे अर्थ माहीत न होता) करणे फायदेशीर असल्याचे पटवून देऊ शकत नाही. प्रत्येक कार्यक्रमासाठी वेगवेगळी स्तोत्रे असतात आणि ती वेगवेगळ्या आशयाची असतात. जर आपण ह्यांचे महत्त्व ओळखले तर त्यांना शास्त्रीय पाया आहे हे आपण जाणू शकू. शिवाय जेव्हा आपल्याला त्यांचा अर्थ कळेल तेव्हा त्यात भावनिक

आवाहन असते ते स्पष्ट दिसेल. म्हणून अर्थ जाणून घेणे म्हणजे मंत्र म्हटल्या जाणाऱ्या कार्यक्रमात खरा सहभाग घेणे होय. ह्याच कारणास्तव अकारण मोठ्याने शब्दफेक करण्याची श्राद्ध मंत्राबरोबर (अनादराने) तुलना होऊ लागली. श्राद्धाच्या वेळेस म्हटल्या जाणाऱ्या मत्रांसह सर्व मंत्रांचे अर्थ पुरोहितासह, विधी करणाऱ्या यजमानाला कळलेच पाहिजेत; आपण ह्या हेतूसाठी एक योजना विकसित करायला पाहिजे.

प्रथम पुरोहिताला स्वतःलाच त्या मंत्रांचा अर्थ आणि तो अधिकारी म्हणून जे विधी करतो त्यांचा अर्थ कळला पाहिजे. आजकाल बहुतेक पुरोहितांना ते जे काही म्हणतात त्याचा अर्थ माहीत नसतो. जर ज्याच्या वतीने विधी केला जातो त्या यजमानाने पुरोहितास विचारले, की ह्याचा अर्थ काय? तर तो उत्तर देण्यास असमर्थ असतो. मग तुम्ही कर्त्याचा किंवा यजमानाचा त्या विधीवरचा विश्वास कसा अपेक्षिता?

बरेच मध्यमवयीन लोक मंत्रांचा अर्थ जाणून घेण्यास उत्सुक असतात असा मला विश्वास आहे. मला वाटते की त्यांना पुरोहिताने म्हटलेले मंत्र पोपटासारखे पुन्हा म्हणावे लागतात म्हणून त्यांचा विधींमधील विश्वास गमावण्याकडे कल आहे. धार्मिक विधी करणारे (उपाध्याय) मंत्रांचा अर्थ सांगू शकतील असे वेद-भाष्यात प्रावीण्य त्यांनी मिळवावे. यासाठी आम्ही प्रयत्न करीत आहोत.

वेदांच्या सहा अंगापैकी एक अंग असलेल्या निरुक्तानुसार (ह्याचा विचार भाग ९ मध्ये केला गेला आहे.) अर्थ माहीत नसता वेद म्हणणाऱ्या ब्राह्मणाला दूषणे मिळतात.

धार्मिक विधीतील विश्वास वाढावा म्हणून अनेक महान व्यक्तींनी वेदांवर भाष्ये लिहिलेली आहेत. ऋग्वेदाच्या पहिल्या काण्डाच्या पहिल्या ४० सूक्तांवर श्रीमध्वाचार्यांनी भाष्य लिहिलेले आहे. स्कंदस्वामी ह्यांनी देखील ऋग्वेदावर भाष्य लिहिले आहे. कृष्ण यजुर्वेदावर भट्ट भास्करांचे भाष्य आहे आणि शुक्ल यजुर्वेदावर महिधरांचे आहे. अलीकडच्या काळात दयानंद सरस्वती आणि अरविंद घोष आणि त्याचप्रमाणे त्यांचे शिष्य कपाली शास्त्री यांनी स्पष्टीकरणात्मक भाष्ये (चर्चा) लिहिली आहेत. (स्वामी दयानंद सरस्वती (१८२४-८३) आर्य समाजाचे सुधारक आणि संस्थापक त्यांना वेद आणि सहा दर्शने (किंवा तत्त्वज्ञान प्रणाली) महत्त्वाचे वाटले) (श्री अरविंद (१८७२-१९५०) देशभक्त आणि क्रांतिकारक, नंतर तत्त्वज्ञान आणि गूढ शास्त्राकडे वळले. ह्यांनी पाँडिचेरीमध्ये योगाश्रम स्थापन केलेला आहे) जरी इतकी भाष्ये असली तरी श्री सायणाचार्यांचे भाष्य विशेषतः प्रसिद्ध आहे. परदेशी भाषाशास्त्रज्ञासह अनेक विद्वान त्यांना अधिकारी म्हणून मानतात.

जर यजुर्वेदाचे शुक्ल आणि कृष्ण असे दोन भाग स्वतंत्र मानले तर पाच वेद आहेत. सायणाचार्यानी सर्व पाचांवर भाष्ये लिहिली. त्यांच्या पूर्वी स्पष्टीकरणात्मक भाष्ये लिहिली गेली पण सर्व वेदांवर भाष्ये लिहिणारे ते पहिलेच आहेत.

जरी सायणाचार्यांचे भाष्य अनेक शतके अभ्यासले गेले असले तरी आता अशी वेळ आली आहे की त्यात विद्यार्थ्यांना गोडी वाटण्याचे थांबेल अशी भीती वाटते. अर्थ न समजता जे वेदपठण शिकले ते पुरोहित बनले आणि ज्यांनी काव्य आणि इतर विषयांचा अभ्यास केला ते मंत्रपठण सुद्धा शिकले नाहीत. इतका वेदाभ्यासाचा ऱ्हास झाला. ह्याच वेळेस वेद-भाष्य अभ्यास चालू ठेवण्याचे उद्दिष्ट ठेवून षष्ट्यब्दपूर्ती ट्रस्ट स्थापन झाला. (हा ट्रस्ट १९५४ मध्ये परम सद्गुरूंच्या ६० व्या जन्मदिवशी स्थापन झाला.)

जेव्हा ट्रस्ट सुरू होऊन परीक्षा सुरू झाल्या तेव्हा वेद-भाष्य दुसरे तिसरे काही नसून वैदिक भाष्याची छापील पुस्तके दुकानात ठेवणे इतकाच मानला गेला. प्रकाशकांना भीती होती की फार प्रती विकल्या जाणार नाहीत. ट्रस्टच्या निर्मितीनंतर आम्ही विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीच नव्हे तर वेद-भाष्याच्या प्रती देण्यास आरंभ केला. आता आम्हाला काळजी होती की नवीन विद्यार्थ्यांसाठी पुरेशी प्रतींचा साठा आहे का ? पराशक्ती, सर्वोच्च देवतेच्या कृपेमुळे आम्ही वेद-भाष्याच्या अभ्यासाचे पुनरुज्जीवन करू शकलो आणि तिची कृपा असेपर्यंत विद्यार्थी हा विषय शिकण्यास तयार असतील आणि पुस्तकाच्या पुरेशा प्रती उपलब्ध असतील.

विवाह, उपनयन किंवा सीमान्त समारंभाच्या आदल्या दिवशी आपण विधीच्या वेळेस म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांचा अर्थ स्पष्ट समजून घेण्यासाठी जो वेद-भाष्य जाणतो अशा वैदिक पंडिताचा सल्ला घेतला पाहिजे. प्रत्यक्ष कार्यक्रमाच्या वेळेस आपल्याला फार थोडा वेळ असतो. आपण अगोदरच मंत्रांचा अर्थ आणि आशय समजून घेतला तर आपला सहभाग अधिक फलदायी असेल. (ह्या विषयाचा सविस्तर ऊहोपोह प्रकरण १६ मध्ये पाहा.)

हल्ली आपल्याला विवाहाच्या तयारीसाठी एक महिन्याचा कालावधीही मिळत नाही. कोणता बँड, कोणाचे नृत्य, वरात कशी काढायची, वरपक्षाच्या लोकांना तोंड कसे द्यायचे इ. प्रश्न असतात. विवाहाच्या धार्मिक विधींचा आत्मा म्हणजे त्यावेळेस म्हटले जाणारे मंत्र यांना आपण फार कमी महत्त्व देतो. विवाहात हे मंत्र म्हणणाऱ्या पंडितांनाही कमी महत्त्वाचे मानले जाते. कदाचित ज्या थोड्यांची मंत्रांवर श्रद्धा असेल तर त्यांच्या लाभासाठी आणि ज्ञानप्रसारासाठी काही ब्राह्मणांना वेद-भाष्याचे प्रशिक्षण दिले पाहिजे.

आपण विवाह, उपनयन समारंभाच्या निमंत्रण पत्रिका छापतो आणि मित्र आणि नातेवाईकांना मोठ्या प्रमाणात वाटतो- खरे तर आपण संपूर्ण शहर किंवा खेड्याला समारंभाला बोलावतो. आपण हजारोनी खर्च करतो. पण आपण धार्मिक विधी आणि त्याचा आशय यांच्याकडे लक्ष देत नाही, हे योग्य नाही.

समारंभात म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांचा अर्थ आपण समजून घेतला तर त्यापासून आपल्याला अधिक लाभ होईल. आपण हे विधी करतो कारण त्यांचा त्याग करण्याचे धाडण्यास आपल्यात नसते. त्याचप्रमाणे आपणास म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांचा अर्थ माहीत नसता विधी

करणे हे चुकीचे आहे हे आपल्याला कळले पाहिजे. म्हणून आपण ह्या बाबतीत पंडिताची मदत घेतली पाहिजे. पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे धार्मिक विधींमध्ये मंत्रांचा आशय आणि अर्थ यांचे ज्ञान अधिक लाभदायक असते. आपला उपनिषदातील 'यदेव विद्यया करोति तदेव वीर्यवत्तरं भवति'. ह्या सुवचनावर विश्वास असला पाहिजे.

उपनयनाच्या वेळेस ब्रह्मचारी (कर्ता) मंत्र म्हणतो तसे विवाहात फक्त वर म्हणतो. अशा समारंभात निमंत्रितांनी काय करावे अशी अपेक्षा असते ? ते फक्त अल्पोपाहार किंवा भोजन किंवा गप्पा मारण्यासाठी, नृत्य पाहण्यासाठी, किंवा 'नागस्वरम्' संगीत ऐकण्यासाठी येतात. ह्या पद्धतीने त्यांनी स्वतःला मजेत ठेवावे अशी त्यांची भूमिका असावी काय ? नाही. वैदिक मंत्र आपल्या आदरास पात्र आहेत. जेव्हा ते म्हटले जात असतात तेव्हा आपण जाणीवपूर्वक ते ऐकून त्यांचा मान ठेवला पाहिजे. मंत्र सर्वांचे कल्याण करतात. ते जर निमंत्रित आणि इतरांनी ऐकले आणि त्यांचा अर्थ समजून घेतला तर कर्त्याची भूमिका नसली तरी ते पुण्य मिळवू शकतील.

अश्वमेधाचे उदाहरण घ्या. ज्याने इतर राज्यकर्त्यांना जिंकलेले आहे असा महाराज किंवा सार्वभौम राजा जो आहे. तो हा यज्ञ करण्यास पात्र असतो. इतिहासाच्या ठरावीक काळातील सम्राट, सर्व जगभर ज्याची अधिसत्ता पसरली आहे अशा सम्राटाला हा यज्ञ करण्याचा हक्क आहे. आता प्रश्न हा उद्‌भवतो की एखाद्या पिढीमध्ये एखादा अश्वमेध यज्ञ करून एवढे पुण्य मिळविण्यास समर्थ असेल. अशा प्रकारे पुण्य मिळविण्यास मोठ्या प्रमाणात लोकांना अपात्र अशक्य करणे म्हणजे वेद पक्षपाती नाहीत का? फक्त ज्याच्याकडे विपुल शक्ती आहे आणि अनेक स्रोत ज्याला उपलब्ध आहेत असाच यज्ञापासून लाभार्थी होण्यास समर्थ आहे का? चांगल्या आचाराचे आणि चारित्र्याचे लोक यांना हे पुण्य नाकारले तर शक्तिशाली सम्राटच ते मिळवू शकतो, हे त्यांना फसविण्यासारखे नाही का? वेद असे एखाद्याच्या बाबतीत पक्षपाती का?

वास्तवात वेदांशी हा पक्षपात जोडता येणार नाही. जो माणूस वैदिक विधी करतो त्याला तो लाभदायी असतो. पण त्याच वेळेस तो संपूर्ण जगाचे भले करतो. मी जर काळोखात दिवा लावला तर फक्त मलाच नव्हे तर सर्वच उपस्थित असलेल्यांना तो प्रकाश देणार नाही का?

वैदिक कृत्ये करणाराला इतरांपेक्षा विशेष लाभ होऊ शकतील. शास्त्र असा मार्ग दाखविते की कर्त्याप्रमाणेच इतरांनाही तशीच फळे मिळू शकतील - वेदांनी स्वतःच ह्याचा उल्लेख केला आहे की जरी सामान्य लोक अश्वमेध यज्ञ करू शकत नसतील तरी तो कसा करतात हे ते जाणून घेऊ शकतील. ते यज्ञाच्या वेळेस म्हटल्या जाणाऱ्या स्तोत्रांकडे लक्ष देऊ शकतील आणि त्यांचा अर्थ समजून घेऊ शकतील. अशा रीतीने ते सम्राटाने केलेल्या यज्ञाचे

सर्व फायदे मिळवू शकतील. वेदांमध्ये अश्वमेध यज्ञांच्या विभागात ह्या वस्तुस्थितीचा उल्लेख आहे.

तसेच, विवाह असो वा अंत्यसंस्कार, जर आपण विधी समजून घेतला आणि अर्थाच्या पुरेशा ज्ञानाने मंत्र ऐकले तर आपणही पूर्ण पुण्य मिळवू शकू.

-----

## प्रकरण ४१

# माझे कर्तव्य

वैदिक परंपरा जिवंत ठेवायची जबाबदारी तुमची आहे हे तुम्हाला वारंवार ठासून सांगणे माझे कर्तव्य आहे. तुम्ही माझे ऐका वा न ऐका, मला तुम्ही जे करायला हवे आहात ते मी तुम्हाला करण्यास भाग पाडण्यास समर्थ असो वा नसो, मी माझ्यात शक्ती असेपर्यंत मी तुम्हाला न कंटाळता ते सांगत राहीन. वेदांसाठी आचार्यांनी हा मठ स्थापन केला. मी तुम्हाला अन्य प्रकारे फसवत असेन तर ते जाऊ द्या, वेदधर्माच्या संरक्षणाची आचार्यांनी माझ्या खांद्यावर टाकलेली जबाबदारी पार पाडण्यास मी अयशस्वी झालो तर त्यांचे नाव धारण करणारा मी मोठा गुन्हेगार असेन. तेच तेच सांगणे कंटाळवाणे वाटले तरी ते मनावर न घेता, ह्या धर्माचे जतन करण्यासाठी मी पुन्हा पुन्हा तेच बोलत आहे. ''हे कार्य तुमचे आहे, हा तुमचा धर्म आहे''.

ह्या सर्व गप्पा नाहीत. आपल्या आदर्शासाठी अनेक प्रत्यक्ष योजना अमलात आणल्या जात आहेत. येथे मी तुमच्याकडे याचना करण्यासाठी आलेलो आहे. जर तुम्हाला वाटत असेल की मी तुमच्याकडे याचना करीत नाही तर वेदांसाठी मी तुम्हाला आज्ञा करीत आहे असे समजा. काहीही असो, जे कार्य मी घेतलेले आहे ते पार पाडलेच पाहिजे.

वेदं ओदिय वेदियर्क्कोर मझै
नीति मन्नर नेरियिनरक्कोर मझै
मादर करपुडै मगैयर्क्कोर मझै
मादम मूनरू मझै एनप्पेय्युमे

ह्या प्रसिद्ध तमीळ कवितेनुसार, जर महिन्यात तीन वेळा पाऊस पडला तर पृथ्वी थंड होईल आणि पिके मुबलक येतील. जो ब्राह्मण योग्य रीतीने वेद म्हणतो त्याच्यासाठी एकदा पाऊस पडतो, जो राजा न्यायाने राज्य करतो त्याच्यासाठी एकदा पाऊस पडतो; आणि जी स्त्री पतीशी नित्य एकनिष्ठ राहते तिच्यासाठी एकदा पाऊस पडतो.

राज्यकर्ते न्यायाने, धर्माला धरून राज्य करतात ह्याची खात्री करणे माझ्या हातात नाही. माझ्यासारख्या संन्याशाला सरकारशी काही कर्तव्य नाही. पण माझा विश्वास आहे की मठाधिपती म्हणून धर्माचे संरक्षण करण्यात दोन इतर बाबींची माझ्यावर जबाबदारी आहे. एखादी स्त्री धार्मिक आहे, पतिव्रता आहे हे धर्माचा प्रमुख कसा पाहू शकेल? आजकाल दिसणारा कल हा स्त्रीधर्माविरुद्ध दिसतो. मला 'गुरू' ही पदवी आहे आणि ज्या गोष्टी त्यांच्या धर्माला गौण समजायला लावणाऱ्या आहेत त्याच्याविरुद्ध इशारा देणे माझे कर्तव्य आहे. जेव्हा बालविवाह प्रचलित होते तेव्हा स्त्रियांना वाममार्गाला जाण्याला वाव नव्हता. एखाद्या मुलीचा

वयात येण्यापूर्वी विवाह झाला तर तिचा पतीशी घट्ट जिव्हाळा निर्माण होईल. ह्या वयात जर तिचे लग्न झाले नाही तर ती मानसिकदृष्ट्या दुभंगेल. पण आपले हात 'शारदा कायद्याने' बांधलेले आहेत. (शारदा कायदा : बालविवाह प्रतिबंधक कायदा. १९२९ मध्ये मुख्यत्वेकरून हरबिलास सारडा ह्यांच्या प्रयत्नाने अमलात आला. परम सद्‌गुरू ह्या विषयावर भाग १८ मध्ये विवाह संस्काराचा विषय येतो, तेव्हा बोलतात. हे प्रवचन बहुधा सर्वसमावेशक नवीन हिंदू कोड होण्यापूर्वीचे असावे.)

मी माझे हात झटकून टाकले नाहीत कारण शारदा कायद्याविरुद्ध लोकमत तयार करता येऊ शकेल आणि सरकारला त्याचा आदर करणे भाग पडेल. शेवटी लोकमतानुसार अनेक कायदे बदलले आहेत. दुर्दैवाने एकूण पालक आणि स्त्रिया यांचा दृष्टिकोन विकृत झालेला आहे. त्यांच्या मुलींचा विवाह वेळेवर करण्याऐवजी पालक सहशिक्षण असलेल्या महाविद्यालयात पाठवितात आणि नंतर पुरुषांबरोबर कामासाठी पाठवितात. जेव्हा मी हे पाहतो तेव्हा आतून माझ्या रक्ताचे अश्रू होतात. हा कल थांबविण्याच्या माझ्या सामर्थ्यावरचा माझा विश्वास कमी होतो.

जर ब्राह्मणांनी वेदपठण चालू ठेवले तर राज्यकर्ते न्यायाने राज्य करतील आणि स्त्रिया त्यांच्या स्त्रीधर्मात स्थिर राहतील ह्या आशेने वेदधर्म जपण्याकडे माझे प्रयत्न वळले आहेत.

ह्यासाठी तुम्ही तुमच्या मुलांचे तसेच तुमच्या पैशाचे दान केले पाहिजे. सुस्थितीत असणाऱ्या लोकांनी गरिबांच्या मुलांना आर्थिक मदत केलीच पाहिजे ज्यायोगे त्यांना वेद शिकण्यास प्रोत्साहन मिळेल. आम्हाला शिक्षकांचा पगार देण्यासाठी, पुस्तके विकत घेण्यासाठी, वैदिक शाळेच्या व्यवस्थापनासाठी पैशाची गरज आहे. आम्ही निधी उभारण्यासाठी एक साधी योजना आखली आहे. तुम्ही महिन्याला एक रुपया द्यायचा आणि मोबदल्यात तुम्हाला वेदमातेच्या आशीर्वादाबरोबर कांची मठातील पूजेनंतर श्रीचंद्रमौलिश्वराचा प्रसाद (पोस्टाने) मिळेल. जर तुम्ही तुमची देणगी तुमच्या जन्मनक्षत्राचा उल्लेख करून पाठविली तर प्रत्येक महिन्यात ज्यादिवशी ते नक्षत्र असेल त्यादिवशी तो प्रसाद पाठविला जाईल.

हल्ली आपल्याला श्रीवेंकटाचलपतीला आवाहन करणारी साखळी पत्रे मिळतात आणि त्याबरोबर एक धमकी असते, ''जर तुम्ही ह्या पत्राच्या प्रती अमुक एका संख्येने लोकांना पाठविल्या नाही तर तुम्ही आंधळे व्हाल किंवा अपंग व्हाल''. भीतीपोटी विविध पत्त्यांवर पाठविण्यासाठी अनेक लोक त्या पत्राच्या प्रती करतात. मलाही कधीकधी वाटते आपणही वेदधर्मच्या प्रसारासाठी असेच काहीतरी करावे!

मी तुम्हाला जास्त मागत नाही - दरमहा फक्त एक रुपया. तुम्ही तुम्हाला आवडो वा न आवडो सरकारी कर देतातच ना? हे घ्या - एक रुपया - माझ्याकडून लादलेला वसूल.

माझे सरकार चालविण्यासाठी तुम्ही हा कर देता, माझे सरकार प्रचंड सरकारी यंत्रणेच्या तुलनेत मोहरीच्या दाण्यापेक्षा मोठे नाही. ह्यासाठी तुम्ही तुमचे थोडे सुख नाकाराः तुमचे सागर किनाऱ्यावर सहलीस जाणे, तुमचे चित्रपटास जाणे. असे केल्याने तुम्ही तुमचे कर्तव्य अंशतः पार पाडू शकाल आणि माझे कर्तव्य पार पाडले जाईल.

-----

## प्रकरण ४२

# वेदांची महानता

वेदांच्या वैभवाला सीमा नाही. विश्वाच्या व्यापारात, ज्याची तुलना होऊ शकत नाही अशा प्रकारे त्यांचे प्रकटीकरण होते.

जगातील सर्व पवित्र स्थानांमध्ये काशी अग्रेसर आहे. जेव्हा आपण तीर्थक्षेत्रांचा गुणगौरव करतो तेव्हा ते काशीइतके पवित्र आहे असे म्हणतो. ह्यावरून आपल्याला त्या नगराचे महत्त्व कळते. दक्षिणेकडे जे तीर्थक्षेत्र आहे त्याला दक्षिण काशी म्हटले गेले आहे. हिमालयात उत्तर काशी आहे. तमीळनाडूमधील वृद्धाचल वृद्ध काशी म्हणून ओळखले जाते. तामीळनाडूच्या तेरूनेल्वेली जिल्ह्यात ''तेन्काशी'' नावाचे एक शहर आहे. (ह्याचाही अर्थ दक्षिण काशी असा आहे.) आपण एखाद्या तीर्थक्षेत्राविषयी अभिमानाने बोलताना ते काशीसारखे आहे असे म्हणण्याची प्रथा आहे. पण कुंभकोणम् हे काशीपेक्षा मोठे मानले जाते. (महिम्यात ते काशीपेक्षा कणभर मोठे आहे). कुंभकोणमच्या उच्च स्थानाची स्तुती करणारे हे कडवे पाहाः

अन्यक्षेत्रे कृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति
पुण्यक्षेत्रे कृतं पापं वाराणस्यां विनश्यति
वाराणस्यां कृतं पापं कुंभकोणे विनश्यति
कुंभकोणे कृतं पापं कुंभकोणे विनश्यति

''कोणत्याही (सामान्य) ठिकाणी केलेले पाप तीर्थक्षेत्री नष्ट होते. कोणत्याही तीर्थक्षेत्री केलेले पाप वाराणशीमध्ये म्हणजे काशीमध्ये नष्ट होते. वाराणशीत केलेले पाप कुंभकोणम मध्ये नष्ट होते आणि कुंभकोणम येथे केलेले पाप कुंभकोणम येथेच नष्ट होते''.

काशीची थोरवी म्हणजे सर्व तीर्थक्षेत्रांची तुलना काशीबरोबर केली जाते. जेव्हा एखादे ठिकाण काशीपेक्षा श्रेष्ठ आहे असे म्हटले जाते तेव्हाही त्याचा ध्वन्यर्थ काशी अद्वितीय आहे असाच होतो. तुलनेची गोष्ट म्हणून तिने वैशिष्ट्य प्राप्त केले आहे. एका महान व्यक्तीने काशीवर एक काव्य केले आहे. ''क्षेत्राणामं उत्तमानां अपि यद् उपमया काऽपि लोके प्रशस्तिः'' अशी त्याची सुरुवात आहे. त्याचा अर्थ असाः ''ज्याच्या बरोबर तुलना केली असता खूप प्रशंसा झालेली स्थानेही प्रसिद्ध पावतात - ती म्हणजे काशी''.

त्याचप्रमाणे तुम्ही जेव्हा तीर्थांबद्दल बोलता तेव्हा तुम्ही त्यांची गंगेबरोबर तुलना करता किंवा म्हणता की ते त्या गंगा नदीपेक्षा अधिक पवित्र आहे. मागील वाक्यांवरून आपण असा निष्कर्ष काढू शकतो की सर्व पवित्र स्थानांमध्ये काशी प्रथम येते आणि सर्व तीर्थामध्ये गंगा सर्वात जास्त पवित्र आहे.

तसेच जेव्हा एखाद्या कृतीची स्तुती करायची असेल तेव्हा ''वेदांइतके'' महान असे म्हटले जाते. रामायण हे अतिशय प्रसिद्ध काव्य आहे. त्याच्या अनेक आवृत्त्या आहेत. भारतातील कोणतीही भाषा घ्या. रामकथा ही नाटक, काव्य, संगीत इ. साहित्याचा विषय असलेली दिसेल. रामायणाचा महिमा असा की ते वेदाच्या पदापर्यंत पोहोचले. ''वेदः प्राचेतसादासित्साक्षाद्रामायणात्मना'' वेद स्वतःच रामायण म्हणून प्रचेतसाचा पुत्र वाल्मीकीला प्रसविले.

महाभारतही वेद म्हणून प्रसिद्ध आहे : वस्तुतः त्याला पाचवा वेद म्हटले जाते. (''पञ्चमो वेदः'')

वैष्णव तिरूवायमोझीला वेद म्हणून गौरवितात. ते नम्माइ्वारचे साहित्य आहे, त्याला शठकोपन किंवा मारन म्हटले जाते. ते म्हणतात : मारन शठकोपनने तमीळ वेद रचला. ''नीतिशास्त्रावरील प्रसिद्ध साहित्य 'तिरूक्कुरल' ह्यालाही तमीळ वेद म्हटले जाते.

कुरूल, तिरूवल्लुवर च्या लेखकाच्या काळात मदुराईमध्ये कडाई संगम होता. (मदुराईच्या तिसऱ्या आणि अखेरच्या अकादमीमध्ये ग्रंथकर्तृत्व असलेले ४९ विद्वान होते.) त्या नगरात सुंदरेश्वराकडून भेट मिळालेले एक आसन होते. (सुंदरेश्वर हा शिव असून मदुराईच्या सुप्रसिद्ध मीनाक्षी मंदिराच्या मीनाक्षीचा जीवनसांगाती आहे.) फक्त पात्र माणूस त्यावर बसू शकत असे. अयोग्य माणसाला बाजूला ढकलून दिले जाई. अशी गोष्ट शक्य होती काय ? आपण यावर विश्वास ठेवू शकत नाही. पण आपण जेव्हा यंत्रात नाणे सरकवल्यावर आपल्याला तिकीट मिळते तेव्हा यावर विश्वास बसतो.

(येथे परमगुरू तिरूवल्लुवर आणि त्याचे कुरल यांची कथा सांगतात, त्यांच्या काळातील कवी तमीळला संस्कृतसारखे श्रेष्ठ मानत कारण तिच्यात आता कुरल सारखे साहित्य होते, जे वेदाइतके होते. ही कथा प्रकरण ५, भाग २ मध्ये ''वेद, त्यांच्या मूळ रूपात'' यात येते.)

तमीळनाडूमधील शैव तिरूवाचकम् ला तमीळ वेद म्हणतात. भारतातील ख्रिश्चनांना बायबल हा ''सत्य-वेद'' होय. यावरून आपल्याला समजते की वेदांना विशेष सन्मानाचे स्थान आहे. वैदिक नदी चिरतरुण आहे आणि आपल्या भूमीतून ती रक्तासारखी उभी आडवी प्रवास करते. ही नदी कधीही आटू देता कामा नये. हिंदू माणसाला वेद जिवंत आणि दुमदुमणारी परंपरा म्हणून टिकविण्यासारखी दुसरी जबाबदारी नाही.

वेदांच्या ध्वनीचे सर्वत्र अस्तित्व असले पाहिजे, सर्व अवकाश वेदध्वनींनी भरून टाकले पाहिजे. त्यात जतन करून ठेवलेली सत्ये दूरवर पसरली पाहिजेत आणि त्यांनी आपल्याला आज्ञा दिलेल्या धार्मिक विधींची भरभराट झाली पाहिजे. वैदिक धर्म शक्तिशाली

राहिला आणि आपण आपल्या भूमीत जतन करून ठेवला तरी पुरेसे होईल. एखाद्या माणसाच्या शरीराच्या सर्व भागांत वेदना आहेत पण त्याचे हृदय भक्कम आहे तर तो जगेल. त्याचप्रमाणे ह्या भूमीत वेदांची भरभराट झाली तरी सर्व राष्ट्रे भरभराटीस येतील आणि शांततेने आणि सुखाने राहतील. ही वैदिक धर्माची प्रार्थना आहे.

''लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु।''

-----

# प्रकरण ४३

## वेदांचे सहा अवयव

हिंदुत्वाच्या मुलभूत ग्रंथामध्ये, वेदांच्या नंतर महत्त्वाची असलेली सहा अंगे आहेत. वेदपुरुषाची ही सहा अंगे आहेत- मुख, नाक, डोळा, कान, हात आणि पाय. ह्यांना 'षडंगे' असे म्हणतात. तमीळ शब्द 'चडान्गु'. कोणत्याही समारंभाचा निर्देश करणारा शब्द हा ह्या शब्दापासून (षडान्गे) आलेला आहे. (परिशिष्ट १ पाहा) तमीळ तेवारम ह्या ओळीत षडान्गाचा उल्लेख करतो, "वेदामो (दु) आरू अन्गम आयिनान".

पूर्वी सर्व नैतिक आणि धार्मिक आज्ञा मंदिरांच्या दगडी भिंतीवर कोरलेल्या असत. एका अर्थाने मंदिरे ही प्राचीन आणि मध्ययुगीन काळात उपनिबंधकाचे कार्यालय असे, जेथे सर्व धर्माची (कृती, योगदान) नोंद होत असे. त्रावणकोर संस्थानात 'तिरूमनूतिरा ओलै' नावाचा एक अधिकारी असे. (आता त्रावणकोर हे केरळ राज्यात आहे.) पूर्वी तमीळनाडू मध्ये सर्व राजांकडे असा एक अधिकारी असे. तो हल्लीच्या निजी सचिवासारखा असे. राज्यकर्त्याच्या आज्ञा किंवा संदेश लिहून काढणे आणि राजाचा निरोप संबंधित लोकांना पाठविला जात असे.

त्याकाळी राजाला सर्व खाजगी धर्मादाय संस्थांची माहिती देणे भाग असे. वस्तुतः त्यांना राजाची अनुमती लागत असे आणि त्यांना राजाज्ञेवरून त्या स्थापन कराव्या लागत. त्या (आज्ञा) ओलै यास "शिळा किंवा तांब्यावर कोरावयाचे". या समारोपाच्या शब्दांनी लिहाव्या लागत, ज्याठिकाणी दाने स्वीकारली जात तेथे ही आज्ञा दिली जात असे. तेथील अधिकाऱ्यांना स्थानिक मंदिराच्या भिंतीवर त्या कोरून घ्याव्या लागत. मंदिरांमध्ये सापडणारे बहुतेक सर्व शिलालेख ह्या स्वरूपाचे आहेत.

कोरलेली अक्षरे तांब्याच्या पत्र्यावर असत. जर एकापेक्षा अधिक पत्रे लागत असतील तर त्यांना छिद्रे पाडून त्या एकत्र एका कडीने ठेवल्या जात. स्थानिक मंडळ किंवा सभा यांना ह्या कोरीव आज्ञा मान्य कराव्या लागत. ते तांब्याचे पत्रे मंदिरात जमिनीखाली 'क्षेम' म्हटल्या जाणाऱ्या ठिकाणी ठेवले जात. भूमीचे जीवनमान, तिचे विधिलिखित (तिचा उपयोग) हे परमेश्वराच्या हातात सोपवलेले होते आणि ती जीवनाचे उभे स्मारक असणे हे साहजिकच होते. त्याचे काम निबंधकाच्या कार्यालय, शिलालेख विभाग आणि इ. सारखेच होते.

आता मला स्थानिक सभेच्या विषयाकडे येऊ द्या.

प्रत्येक खेड्यात एक ब्राह्मण सभा असे. ज्यांना वेद आणि मंत्र-ब्रह्म ज्ञात असत त्यांना मुक्तपणे सभासदत्व मिळत असे. ज्यांच्यावर किंवा ज्यांच्या नातेवाईकांवर ठरावीक गुन्ह्याचे

आरोप असत त्यांच्या सभासदत्वास प्रतिबंध केला जात असे. ज्यांना सभासदत्व हवे असे अशांची नावे भूर्जपत्रावर लिहिली जात आणि त्या सर्वातून एका लहान मुलाला एक उचलायला सांगितले जाई. ज्याचे नाव त्यावर लिहिलेली असे त्याला सभासद करून घेतले जाई. स्थानिक सभेच्या अशा निवडणुकीचा तपशील ''उत्तरमेरूर'' लेखात आहेत. (इ. स. च्या दहाव्या शतकातल्या उत्तरमेरुर लेखावरून चोळ राज्यकर्त्यांची स्थानिक स्वराज्य संस्था किती प्रगत झालेली होती हे स्पष्ट होते. परमसद्‌गुरू ह्यांनी ह्याचे विस्तृत विवेचन केले असून ते पुढील भागात समाविष्ट करू.) पाणीपुरवठा, कर अशा अनेक भिन्न विषयांकडे लक्ष देण्यासाठी सभेचे अनेक विभाग असत. सर्व दानधर्म, मग तो जमीन किंवा पैशाच्या स्वरूपात असो तो ह्या सभेद्वारेच होत असे. म्हणूनच मंदिराला गायी अर्पण केल्या जात किंवा दिवे लावले जात. सभेच्या सभासदांना ह्या सर्वासाठी लेखी संमती द्यावी लागत असे. म्हणून आपल्याला त्यांच्यापैकी काही जणांची नावे कळली. 'षडानानिरतन' आणि 'षडानावि' अशासारख्या पदव्या काही ब्राह्मणांना दिल्या जात, असे समजते. दुसरी पदवी ही षडान्गविद् याचे भ्रष्ट रूप आहे - षड्+अन्ग+विद्= ज्याला वेद अध्ययनाची सहा अंगे ज्ञात आहेत. जुन्या लेखांवरून अगदी खेड्यातही, षडांगात निष्णात असलेले अनेक ब्राह्मण होते असे आपल्याला समजते. म्हणूनच वैदिक विधींना तमीळनाडू मध्ये 'चडान्गु' म्हणू लागले. जो ब्राह्मण आपली मुलगी विवाहात सुंदरमूर्तीश्वामी यांना देत असे त्याला 'चडान्गवि शिवचारियार' म्हटले जाई.

सहा अंगे अशी : शिक्षा (ध्वनी शास्त्र), व्याकरण, निरुक्त (शब्दकोश, व्युत्पत्ती शास्त्र), कल्प (धार्मिक विधींचा ग्रंथ), छंदस् (छंदःशास्त्र) ज्योतिष (खगोलशास्त्र-फलज्योतिष). ब्राह्मणाला ह्या सर्वांचा परिचय असलाच पाहिजे. तो वेदांमध्ये निष्णात असलाच पाहिजे हे स्पष्टच होते. प्रथम त्याने ते पठण करायास शिकले पाहिजे आणि सहा अंगांतील कौशल्य त्याला त्यांच्या अर्थाची सखोल दृष्टी मिळविण्यास मदत करतील.

शिक्षा हे वेदपुरुषाचे नाक, व्याकरण हे मुख, कल्प हा हात, निरुक्त हा कान, छंदस् हा पाय आणि ज्योतिष हा त्याचा डोळा आहे. जेव्हा आपण एकेका अंगाविषयी पाहू तेव्हा प्रत्येक शास्त्र शरीराचा एकेक अवयव म्हणून का ओळखला जातो ह्याचे कारण कळेल.

----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - ६

प्रकरण १

# वेदपुरुषाचे नाक

शिक्षा, वेदपुरुषाचे नाक हे वेदांच्या सहा अवयवांमध्ये प्रथम येते. येथे नाकाचे कार्य वास घेण्याचे असे समजायचे नाही. त्याला श्वसनाचे कार्य आहेच परंतु ते श्वसनाच्या अनेक इंद्रियापैकी एक आहे. वेद मंत्रांचा प्राण म्हणून शिक्षा काम करते.

वैदिक मंत्राचा प्राण कोठे एकटवलेला आहे? प्रत्येक शब्दावयवाचा उच्चार त्याच्या मोजपट्टीनुसार स्पष्ट केला पाहिजे. उच्चाराच्या शुद्धतेचा हेतू असतो. ह्याशिवाय प्रत्येक शब्दावयव उंचावला जातो, खाली आणली जातो किंवा एकसारखा उच्चारला जातो - उदात्त, अनुदात्त, स्वरित (एकसारखा उच्चारला जातो तो 'स्वरित') ह्या मुद्यांकडे लक्ष दिले तर ध्वनीची शुद्धता राहील. जर प्रत्येक शब्दायवय स्पष्ट आणि ध्वनीच्या अचूकतेनुसार उच्चारला तर मंत्र अपेक्षित फळ देतो. एखाद्या मंत्राच्या अर्थापेक्षा त्याच्या उच्चारातील आणि ध्वनीचा तंतोतंतपणा अधिक महत्त्वाचा आहे. दुसऱ्या शब्दांत, सांगायचे तर जरी अर्थ समजला नाही तरी ध्वनिरूप योग्य असले तर मंत्र अपेक्षित लाभ देईल. मंत्रांचा संग्रह असलेल्या वेदांचा प्राण हा त्यांचे ध्वनी होत.

विंचूदंशापासून बरे करण्याचा विंचू उतरविण्याचा मंत्र आहे. त्याचा अर्थ प्रकट केला जात नाही. त्याचे सामर्थ्य त्याच्या ध्वनीमध्ये आहे. ठरावीक ध्वनींना ठरावीक शक्ती जोडलेली असते. काही वेळा विचारले जाते की श्राद्धाचे मंत्र संस्कृतमध्ये का आहेत ? ते इंग्रजी किंवा तमीळ मध्ये का नाहीत ? जे असे प्रश्न उपस्थित करतात त्यांना समजत नाही की यात भाषा महत्त्वाची नसून ध्वनी महत्त्वाचा आहे. जर चेटूक करणाऱ्याचे दात पाडून टाकले तर त्याच्या चेटूकाचा (जादूचा) परिणाम होणार नाही; का? कारण तो मनुष्य त्याचे शब्द योग्य रीतीने म्हणू शकणार नाही.

वेदांबाबत मंत्राचा उच्चार सर्वाधिक महत्त्वाचा आहे. ह्यासंबंधी आपण काय करू शकतो? शिक्षा हे शास्त्र, वैदिक वर्णाच्या गुणांशी संबंधी आहे - ते त्यांचे खरे स्वरूप ठरविते. मनुष्यवाणीतील ध्वनींच्या शास्त्राला ध्वनिशास्त्र म्हटले जाते आणि ते कोणत्याही भाषेपेक्षा वैदिक भाषेसाठी अधिक महत्त्वाचे आहे. त्याचे कारण असे की, वर्ण उच्चारण्यातील किंचित बदल त्याच्या सामर्थ्यावर परिणाम करतो. काही वेळेस अपेक्षाच्या उलट परिणाम होतो.

म्हणूनच वेदांच्या सहा अंगांमध्ये, वेदांच्या ध्वनिशास्त्राच्या महत्त्वामुळे शिक्षा ह्या अंगाला प्रथम स्थान दिलेले आहे. ते तैत्तिरीय उपनिषदात आहे. त्याच्या शिक्षावल्लीचा आरंभ ''आपण आता शिक्षाशास्त्र स्पष्ट करू या'' असा होतो. ('शिक्षाम् व्याख्यासामः वर्णः, स्वरः, मात्रा, बलम्, साम, सन्तानः इत्युक्त शिक्षाध्यायः') ह्या शास्त्राचे नाव येथे तसेच इतर अनेक

वैदिक ग्रंथांमध्ये दीर्घ 'ई' सह (शिक्षा) येते. शंकराचार्य त्यांच्या भाष्यात ''दैरघ्यम छन्दसम्'' मध्ये मत व्यक्त करतात : त्याचा अर्थ असा की, वेदांमध्ये 'इ' हा 'ई' सारखाच येतो. अशी उदाहरणे तमीळ काव्यातही आढळतात. वेदांची भाषा असलेल्या छन्दसविषयी परमसद्गुरूंनी दिलेले प्रवचन ह्या ग्रंथाच्या परिशिष्टामध्ये आहे. मी तुम्हाला सांगितले की वैदिक भाषेला संस्कृत नव्हे तर 'छन्दस' म्हटले जाते. छन्दस वरून आलेला छन्दसम हा शब्द वैदिक रिवाज दाखवतो.

-----

प्रकरण २

# योग आणि वाणी

जेव्हा तुम्ही संवादिनी, नागस्वरम आणि बासरी वाजवता, तेव्हा निरनिराळ्या बाह्य मार्गांतून विविध प्रमाणात बाहेर टाकल्या जाणाऱ्या हवेमुळे ध्वनी निर्माण होतो. ध्वनी निर्माण करण्यासाठी आपल्या गळ्यात अशीच व्यवस्था असते. केवळ गळ्याचाच ह्या प्रक्रियेत समावेश असतो असे नाही. आपण कसे बोलतो किंवा गातो? बोलणे किंवा गाणे हा एक सराव/क्रिया आहे जिचा उगम पाठीच्या मज्जारज्जूत असलेल्या, बेंबीच्या खाली असलेल्या मूलाधारामध्ये असतो. (योगशास्त्रानुसार 'मूलाधार चक्र' हे शरीरातील सहा चक्रांपैकी एक चक्र आहे. 'चक्र' चा शाब्दिक अर्थ चाक असा आहे, परंतु येथे मात्र 'केंद्र' किंवा 'कमळ' असा आहे. मूलाधार हे वेटोळे घातलेल्या व योग्याच्या शरीरातील निद्रिस्त नागिणीचे आसन असून ते गुद व जननेंद्रियाच्या मध्यावर आहे. काहीजण चक्राला नाडीचक्र म्हणतात स्वाधिष्ठान, मणीपूर, अनाहत, विशुद्ध आणि आज्ञा ही शरीरातील अन्य चक्रे आहेत. सहस्र-पद्म (सहस्रदल कमल) हे ब्रह्मरंध्राच्या अगदी जवळ असते. आपण जेव्हा गातो किंवा बोलतो तेव्हा ह्या बिंदूपासून विविध प्रमाणात श्वास वर आणला जातो. ईश्वराने निर्माण केलेले हे मानवी यंत्र संवादिनी, नागस्वरम् किंवा बासरीपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे. ही वाद्ये फक्त ध्वनी निर्माण करू शकतात. परंतु अ,क,च इ. वर्ण स्पष्ट करू शकत नाहीत. हे सामर्थ्य फक्त मनुष्याकडेच आहे. प्राणी एक दोन प्रकारचे ध्वनी निर्माण करू शकतात पण त्यांच्याकडे स्पष्ट उच्चारण्याची कुवत नसते.

ईश्वराने स्पष्ट उच्चाराचे सामर्थ्य मानवालाच फक्त दिले आहे ह्यावरून आपण त्याचे मूल्यमापन करू शकतो. अशा आश्चर्यकारक ईश्वरीय देणगीची आपण उधळपट्टी करू नये किंवा रिकामटेकड्या शिळोप्याच्या गप्पा किंवा निरर्थक बोलण्यात ती वाया घालवता कामा नये. आपण तिचा उपयोग दिव्य शक्ती प्राप्त करण्यासाठी किंवा त्यायोगे मानवाचे कल्याण करण्यासाठी केला पाहिजे. आणि आपल्या आत्म्याचेही उन्नयन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ऋषींनी संकलित केलेल्या वैदिक मंत्रांच्या साह्याने ही सर्व उद्दिष्टे साध्य होऊ शकतील.

तुम्ही ही वस्तुस्थिती जाणली तर तुम्हाला कळेल की आपल्याला वैदिक मंत्रांच्या उच्चारणासाठी मार्गदर्शन करण्यास शिक्षा म्हटल्या जाणाऱ्या शास्त्राची विशेष गरज का असते. आपल्या वाडवडिलांनी विकसित केलेल्या ह्या शास्त्राने आजही भाषातज्ञांचे कुतूहल जागृत केलेले आहे. ते आपल्याला, वर्णाचा अचूक उच्चार कसा करायचा हे शिकविते आणि पोटाच्या खळग्यातून आलेला श्वसनाचा मार्ग नियंत्रित केला जातो ह्याचे सूक्ष्म वर्णन करते. पुढे ते असेही वर्णन करते की श्वास शरीराच्या कोणत्या भागावर आदळायला हवा आणि श्वास तोंडातून कसा बाहेर पडावा.

एका अर्थाने विविध मार्गाने आपल्या शरीराशी जोडणारी हवा म्हणजे योगशास्त्राचे प्रकटीकरण होय, ज्याच्यामुळे आपल्या भावना आणि शक्ती आकारास येतात अशा आपल्या श्वासाचा मार्गामुळे नाड्यांमध्ये कंपने निर्माण होतात. एक म्हण आहे, ''जे अनंतात आहे ते सूक्ष्मात आहे.'' पूर्वी उल्लेखल्याप्रमाणे आपल्यातील कंपने बाहेरही कंपने निर्माण करतात आणि हीच विश्वातील कार्याचे कारण असतात. म्हणूनच ज्यांनी श्वसनावर नियंत्रण ठेवून यौगिक पूर्णत्व प्राप्त केले आहे त्यांच्या इतकीच शक्ती ज्यांनी मंत्रांवर प्रभुत्व मिळविलेले असते त्यांची असते. एक मंत्रयोग आहे तर दुसरा राजयोग आहे.

मानवी आवाजाद्वारे मंत्रातील वर्ण कसा निर्माण करायचा, त्याचा ध्वनी कसा हवा हे शिक्षाशास्त्र स्पष्ट करते. ते प्रत्येक शब्दावयवासाठी कालावधी किंवा मात्रा ठरवून देते. मात्रा ठरविताना ऱ्हस्व आणि दीर्घ वर्णाचा विचार केला जातो. संधी केलेले शब्द त्यांचा विग्रह न करता कसे उच्चारायचे ह्याचेही वर्णन शिक्षा शास्त्र साध्य करते. ('संधीचा अर्थ भाग ५ च्या प्रकरण १० मध्ये आहे.) मंत्रांचे अचूक पठण करण्यासाठी ज्यांची मदत होते अशा सर्व बाबींचा समावेश ह्या शास्त्रात होतो.

विविध शब्दावयवांचे ध्वनी कसे निर्माण करायचे ह्याचे तपशीलवार वर्णन शिक्षा करते. 'क' चा ध्वनी मान आणि गळा यांच्यामधून काढायचा. (कण्ठस्थ- काही जण याचे 'लालव्य' असे वर्गीकरण करतात.) 'ग' चा उच्चार अनुनासिक आहे. 'ञ' चा उच्चार करण्यासाठी जीभ विशिष्ट ठिकाणी दाताना चिकटली पाहिजे. (दन्तव्य)- हे ह्या शास्त्रात सांगितले आहे; तसेच 'ण' उच्चारण्यासाठी जिभेचा वरच्या टाळूला कसा स्पर्श व्हायला हवा. 'म' सारखा वर्ण ओठ पूर्णपणे एकत्र मिटून येतो आणि 'व' सारखे (दन्त-ओष्ठ) हे दात आणि ओठ असे दोन्ही वापरून निर्माण होतात. हे सर्व शास्त्रीय आहे आणि त्याच वेळेस मंत्रयोग आणि शब्दयोगाचा एक भाग आहे.

-----

## प्रकरण ३

# मूलभाषा-संस्कृत

वेदांविषयी बोलताना मी म्हणालो की शब्दाच्या अर्थापेक्षा त्याचा ध्वनी महत्त्वाचा आहे. त्याच्यावरून मला आठवण होते. वैदिक भाषेत ज्याला छन्दस म्हणतात आणि त्यावर आधारलेल्या संस्कृतमध्ये असे शब्द आहेत की त्यांचे ध्वनीच त्यांचा अर्थ व्यक्त करतात. 'दन्त' हा शब्द घ्या. तुम्हाला माहीत आहे त्याचा अर्थ दात आहे. दन्त शब्दाचा ध्वनी निर्माण करण्यासाठी आपल्याला आपले दात वापरावे लागतात. जिभेचा दातांवर आघात करावा लागतो. जेव्हा तुम्ही दंतविहीन माणसाला 'दन्त' म्हणायला सांगाल तेव्हा तुम्हाला हे लक्षात येईल की तो हा शब्द स्पष्टपणे तोंडातून काढू शकणार नाही.

अशा लहान निरीक्षणांवरून तुलनात्मक भाषाशास्त्र एक महत्त्वाची वस्तुस्थिती शोधू शकते, कोणता शब्द कोणत्या भाषेत प्रथम आला. संस्कृत, ग्रीक, लॅटिन, जर्मन, फ्रेंच इ. ह्या एकत्रितपणे सांगतात की त्या इंडो-युरोपियन समूहातील आहेत आणि एकाच मातृभाषेपासून आलेल्या आहेत. पाश्चात्त्य भाषाकोविद संस्कृतला मूळ भाषा, इंडो-युरोपियन भाषांची माता मानायला तयार नाहीत. पण 'दन्त' सारखे शब्द संस्कृत ही मूळ भाषा असल्याची वस्तुस्थिती दर्शवितात.

इंग्रजी शब्द dental चा विचार करा. 'दन्त' आणि डेन्ट यांत खूप साम्य आहे. फ्रेंच आणि लॅटिन अशा भाषांमध्ये सुद्धा दात यासाठी असलेला शब्द जरी तो संस्कृतसारखा 'द' कार नसला आणि 'ड' कार असला तरी डेण्ट जवळचा आहे. ''तुम्ही संस्कृत शब्द दन्तची उत्पत्ती डेन्टल पासून का मानत नाही ?'' असे विचारले जाऊ शकते. पण तुम्ही वस्तुस्थितीचा विचार केला पाहिजे की दन्त हा शब्द म्हणताना तुम्हाला तुमच्या दातांचा उपयोग करावा लागतो, 'डेन्टल' करताना नाही. तुमच्या जिभेचे टोक तुमच्या वरच्या टाळूला स्पर्श करते तेव्हा डेन्टल ह्या शब्दाचा ध्वनी तुम्हाला मिळतो. केवळ संस्कृतमध्येच शब्दाचा ध्वनी स्वतःच शब्दाचा अर्थ प्रकट करतो. म्हणून तेच शब्दाचे मूळ रूप असले पाहिजे. या कारणास्तव इंग्रजी, फ्रेंच, लॅटिन इ. सारख्या भाषा संस्कृतमधून आल्या असल्याच पाहिजेत.

काही शब्दांचे वर्ण बदलून तुम्हाला मूळ शब्दाच्या अर्थाशी संबंधित असे नवीन शब्द मिळतात. सिंह म्हटल्या जाणाऱ्या प्राण्याच्या स्वभावाचा संबंध तुम्ही बहुधा कोणत्या गुणाशी जोडता ? तो म्हणजे 'हिंसा'. हिंसा याचे परिवर्तन 'सिंह' असे होते. ऋषींमध्ये कश्यप हे पहिले होते. मागे जात, सुर, असुर मानव ह्यांचा त्यांच्याशी संबंध जोडता येतो. त्यांनी सत्य जाणले किंवा सत्य पाहिले. ज्ञानाला दृश्य असेही म्हटले जाते. एक ऋषी म्हणून ते पाहणारे / प्रेक्षक / 'पश्यक', ह्या 'पश्यक' चेच 'कश्यप' झाले.

तमीळ मध्ये जो पाहतो / द्रष्टा तो 'पारप्पन'. ह्या अर्थाने जे सत्य जाणतात. ते, म्हणून तमीळनाडू मधील ब्राह्मणांना 'पारप्पन' म्हटले जाऊ लागले. पण हल्ली तो शब्द तिरस्कारदर्शक अर्थाने वापरला जात आहे.

-----

# प्रकरण ४

## उच्चार

शिक्षा हा भाग उच्चारण, स्वर, मात्रा, बल, साम आणि सन्तान यांचा विचार करतो. (ह्या पदांचा अनुवाद ढोबळ मानाने उच्चारण, किंवा बोलणे, स्वर किंवा आघातपूर्वक उच्चारण, स्वरोच्चारणाचा अवधी, बळ किंवा जोर, सातत्य किंवा संधी असा करता येईल.) प्रत्येक मंत्राचा ध्वनी अगदी अचूकपणे ठरविलेला आहे. विविध ध्वनींचा उगम शरीराच्या विविध भागांत आहे आणि ते कसे उच्चारले जातात याचे शास्त्रीय आणि व्यावहारिक महत्त्व, असा सर्व तपशिलाचा ह्या अंगात विचार आहे जर असे सांगितले गेले असेल की, ''तुम्ही तुमचे ओठ असे जोडा आणि तुम्ही बोलताना असा ध्वनी निर्माण होईल''. तुम्हीं याची प्रत्यक्षात खात्री करून घ्या आणि तुम्हाला ते सत्य असल्याचे आढळेल.

येथे मला एका मजेशीर वास्तवाचे स्मरण होते. 'प' 'म' 'व' यांच्यात ओठ उपयोगात येतात. क,ज्ञ,च,त्र,त आणि न यांच्यात नसतात. एका कवीने ओठांशिवाय वाचता येऊ शकेल असे रामायण रचले आहे. त्याला 'निरोष्ठ-रामायण' म्हटले जाते. (मल्लिकार्जुन भट्ट याने 'निरोष्ठ रामायण लिहिले असून तो काकतीय राजा प्रतापरुद्र देव (१३-१४वे शतक) ह्याच्या दरबारात होता.) ओष्ठ म्हणजे ओठ. औष्ट्रक हा शब्द उंटासाठी आहे. त्यापासून तो शब्द आला. तमीळ शब्द ओट्टगै याचा तोच उगम आहे. 'निरोष्ठ' म्हणजे ओठांशिवाय, निरोष्ठ-रामायण हे त्याच्या लेखकाने स्वतःचे कौशल्य दाखविण्यासाठी रचले असावे. मला दुसरे कारण आढळते. कवीला धार्मिक विधीतील मंत्रांच्या शुद्धतेबद्दल काळजी वाटत असावी आणि त्याला वाटले असावे की श्रीरामचंद्रांची कथा ओठ एकत्र न आणता वाचली जावी.

'पाणिनीय शिक्षा' मध्ये एक सुंदर श्लोक आहे. याचे नावच सुचवते, की त्याचा लेखक, पाणिनि हा आहे. तो सांगतो की आपण वैदिक शब्द म्हणताना किती काळजी घेतली पाहिजे.

व्याघ्री यथा हरेत् पुत्रान्
दंष्ट्राभ्यां न च पीडयेत् ।
भीतापतनभेदाभ्यां
तद्वद् वर्णान् प्रयोजयेत् ।।

वैदिक शब्दांचा स्पष्ट उच्चार केला पाहिजे. त्यांच्या ध्वनींच्या वैशिष्ट्यात थोडीही विकृती नको. त्यांचा उच्चार करताना जोर लावायला नको. कोणतीही क्षति नको - ध्वनींची थोडीही हानी नको - आणि उच्चारात हिंसा सुचविलेली नको. वाघीण आपल्या पिलांना कशी नेते-वाघीण आणि मांजरी आपल्या पिलांना त्यांच्या दातांनी घट्ट धरून नेतात, तरी तसे करण्यात थोडीही इजा त्यांच्या पिलांना होऊ देत नाहीत. वैदिक श्लोक / स्तोत्र अशाच

पद्धतीने म्हटले पाहिजेत; शब्दावयव हळुवारपणे तरी स्पष्टपणे उच्चारले पाहिजेत. वरील कडव्याचा लेखक, पाणिनि याने व्याकरणावर अतिशय महत्त्वाचे साहित्य लिहिले आहे. हा विषय वेदान्गात शिक्षा नंतर येतो. त्याच्याशिवाय अनेकांनी शिक्षेवर लिहिले आहे. ह्या श्रेणीतील तीस ग्रंथ आहेत. (अभिचल, चंद्रकोमी, याज्ञवल्क्य, वशिष्ठ, कात्यायन, पराशर, मांडव्य, नारद आणि लोमश हे शिक्षाशास्त्राचे अन्य काही लेखक असून त्यांच्या रचना अस्तित्वात आहेत) पाणिनि आणि याज्ञवल्क्य हे विशेषतः महत्त्वाचे आहेत.

प्रत्येक वेदाला एक 'प्रातिशाख्य' जोडलेले असते, ते वैदिक ध्वनींचे परीक्षण करते. त्यावर प्राचीन भाष्ये आहेत आणि त्यांचाही शिक्षेमध्ये समावेश केलेला आहे.

-----

## प्रकरण ५

# लिप्या

वाणीच्या भिन्न गटांचा निर्देश करणारी चिन्हे आणि खुणा यांवर एखाद्या भाषेच्या लिपीची उत्क्रांती आधारलेली असते. इंग्रजीसह अनेक पाश्चात्त्य भाषा रोमन लिपीमध्ये लिहिल्या जातात. ब्राह्मी नावाची एक लिपी आहे आणि अशोकाच्या आज्ञा त्या लिपीत कोरलेल्या आहेत. वस्तुतः बहुतेक भारतीय भाषांच्या लिप्या ब्राह्मीपासून उत्क्रांत झाल्या आहेत आणि त्यात संस्कृत लिहिली जाणारी देवनागरीच नव्हे तर तमीळ आणि ग्रंथ लिपीचाही समावेश आहे.

ब्राह्मी लिपीला दोन शाखा आहेत. त्या दोन पैकी पल्लव ग्रंथ लिपी ही दक्षिणेत प्रचलित होती आणि ती पासून बहुतेक द्रविडी भाषांच्या लिप्या उत्क्रांत झाल्या आहेत. (ब्रह्मदेश, कंबोडिया, थायलंड इ. देशातील भाषांची लिपी ब्राह्मीवर आधारित असावी. खरोखरच त्यांचे द्रविड भाषांशी साम्य आहे.)

तेलुगू लिपीचे एक वैशिष्ट्य आहे. सर्व लिप्यांमध्ये अक्षरे घड्याळाच्या काट्याप्रमाणे लिहिली जातात, पण तेलुगू मध्ये ती उलट दिशेने लिहिली जातात म्हणजे वळसे डावीकडे असतात. पराशक्ती, परमोच्च देवता ईश्वराच्या डाव्या बाजूला असते आणि तिच्याशी डाव्या हाताने करायच्या पूजेचा संबंध जोडला आहे (वाम-मार्ग). ह्या कारणास्तव श्रीचक्राची काही अक्षरे तेलुगूत लिहिली जावीत असे मानले जाते. (श्रीचक्र हे 'यंत्र' किंवा 'आकृति' असून परमेश्वराच्या पूजेसाठी त्याचा उपयोग केला जातो.) आंध्र भाषेत शैव वृत्ती आहे. भारताच्या इतर भागांत मुलाला प्रथम अष्टाक्षरी (विष्णूची प्रार्थना) लिहिण्यास शिकविले जाते. पण आंध्र प्रदेशात ती 'शिव-पंचाक्षर' असते. ह्या राज्याच्या तीन कोपऱ्यात शिवाची पवित्र स्थाने आहेत : दक्षिणेकडे कालहस्ती, पश्चिमेकडे श्रीशैलम् आणि उत्तरेकडे कोटीलिंगक्षेत्रम्. ह्या तीन लिंगांनी आरेखित झालेल्या ह्या प्रदेशाला 'तेलुगू-देश' (त्रिलिंग पासून) म्हटले जाते. अप्पय्या दीक्षित यांनी आपण आंध्रात न जन्मल्याबद्दल पश्चात्ताप व्यक्त करणारे कडवे रचले आहे -

आंध्रत्वं आंध्रभाषाशचाप्यांध्रदेशा स्वजन्मभूः
तत्रापि यजुषि शाखा नल्पस्य तपसः फलम्

अप्पय्या दीक्षित जन्माने सामवेदी होते. ''वेदांपैकी मी सामवेद आहे'', असे भगवान गीतेत म्हणतात. पण शिवाचे महान भक्त दीक्षित आंध्रमध्ये न जन्मल्याबद्दल आणि यजुर्वेदी असल्यामुळे खंत व्यक्त करतात, ते म्हणतात, ह्याचे कारण म्हणजे माझी तपश्चर्या पुरेशी नसावी. यजुर्वेदात शिव-पंचाक्षर असल्याने तो स्मरणात राहील.

पुन्हा मला लिपीच्या प्रश्नाकडे वळू द्या. मी अगोदरच म्हटले आहे की भारतातील

हल्लीच्या बहुतेक सर्व लिप्या ब्राह्मीपासून आलेल्या आहेत. पण त्यांच्यातील मूळ ब्राह्मीचे घटक शोधून काढणे कठीण आहे. म्हणून जे आपल्याला समजण्यास किंवा सिद्ध करण्यास कठीण वाटते त्यास 'ब्राह्मी-लिपी' म्हणून उल्लेखिले जाते. नंतर ते- 'ब्रह्म-लिपी', निर्मात्याचे आपल्या कपाळावरील लेखन (आपली नियती) असा वापर सुरू झाला. आता जे काही समजण्यास किंवा सिद्ध करण्यास कठीण वाटते ते 'ब्रह्म-लिपी' म्हटले जाते. 'खरोष्टी' ही दुसरी एक जुनी लिपी आहे. 'खर-ओष्ठ' म्हणजे गाढवाचे ओठ - ह्यांचे भात्याशी साम्य आहे. ह्या लिपीत वळसे बाहेर येतात. पर्शियन खरोष्टी मध्ये लिहिली जाते.

आज युरोपियन भाषांची जशी रोमन लिपी आहे तशी ब्राह्मी ही आपली समान लिपी आहे. आता 'देवनागरी' ही तिच्यातील बदलांसह उत्तर भारतातील बहुतेक भाषांची समान लिपी आहे. आपल्या लक्षात येत नाही की प्रत्येक अक्षर विशेष ध्वनीचे प्रतिनिधित्व करत असते. तमीळ मध्ये 'न' साठी दोन भिन्न अक्षरे आहेत. एकाच ध्वनीसाठी दोन अक्षरे का असावीत, आपल्याला नवल वाटते, हे त्या भाषेचे वैशिष्ट्य वाटते. पण ह्या दोन्ही 'न' मध्ये सूक्ष्म फरक आहे.

तेलुगूमध्ये एकच 'न' आहे. इतर भाषांमध्येही तसेच आहे. तमीळ आणि तेलुगू मध्ये दोन प्रकारचे 'र' आहेत. दोन्ही प्रकार दोन्ही भाषेत भिन्न आहेत. तमीळ मध्ये एका प्रकारातील दोन 'र' विशेष अशा ध्वनीचे व्यंजन बनते. (कुर्रम, मर्रम, सोरुने इ.) (कंसातील शब्दांचा उच्चार भारतातील अनेक भागांतील लोकांना परिचित असलेल्या उच्चाराप्रमाणेच केला जातो.) तेलुगूत तो वेगळा आहे. तमीळमध्ये घोड्याला 'कुडिरै' असा शब्द आहे. तेलुगूत 'कुर्रम' आहे - दोन्ही र चा पूर्ण उच्चार केला जातो. तमीळ मध्ये असा ध्वनी नाही. तेलुगू मध्ये काही अद्वितीय ध्वनी आहेत. काही शब्दांमध्ये 'ज' चा उच्चार 'झ' असा केला जातो. आंध्रचे लोक शाला हा शब्द त्साला असा उच्चारतात. देवनागरी आणि ग्रंथ लिपींमध्ये ५० मूळाक्षरे आहेत. तेलुगूत ५२ मुळाक्षरे आहेत (ज आणि च च्या गटातील जास्त मुळाक्षरांसह) तेलुगू बोलणारे लोक काही वेळेस थ आणि ध यांची अदलाबदल करतात. मला असे सांगण्यात आले की ते तुम्हाला त्यागराजाच्या रचनांमध्ये आढळेल. (उदाहरणार्थ, नाद नामक्रिया रागातील 'करुणाजलधे' ही रचना - येथे 'जलधे' चा उच्चार 'जलथे' असर केला जातो. त्यागराज (१७६९-१८४७) कर्नाटक संगीतातील महान रचनाकार.)

जेव्हा आपण उतारे एका भाषेतून दुसऱ्या भाषेच्या लिपीत (लिप्यंतरण करून) लिहितो तेव्हा ही वैशिष्ट्ये लक्षात ठेवली पाहिजेत. इंग्रजीत सुद्धा एकाच ओष्ठ्य वर्णासाठी दोन अक्षरे - V आणि W आहेत. एका प्राध्यापकाने मला त्या दोन्हीत फरक असल्याचे सांगितले. इंग्रजी व्ही हा खालचा ओठ दुमडून वरच्या दातांची रांग ठेवून उच्चारायचा. डब्ल्यू उच्चारताना दातांचा ओठांना स्पर्श होत नाही पण ते वळतात. सरस्वती आणि ईश्वर सारख्या

शब्दात व्ही वापरायचा. (Saraswati, Ishwara असे नको.)

इतर भाषेपेक्षा संस्कृत ध्वनी लेखनाचे तत्त्व स्पष्ट करते. इंग्रजीत स्पेलिंग अनिश्चित आणि गोंधळात टाकणारे आहे. मला वृत्तपत्रात बातमीचा मथळा वाचतानाची आठवण आहे : "Legislature wound up". नकळत मी तो शब्द जखम या अर्थी वुन्ड असा वाचला. प्रत्यक्षतः तो वाईन्ड चे तिसरे रूप (पास्ट पार्टिसिपल) म्हणून वापरलेला होता. विन्ड म्हणजे वारा पण तो वेगळ्या प्रकारे उच्चारला जातो. हे सर्व गोंधळात टाकणारे आहे. पुट हा शब्द कट किंवा बट सारखा उच्चारला जातो का ? वॉक आणि चॉक मध्ये एल हा अनुच्चारित आहे.

असा प्रकार तमीळ बाबत नाही, तिच्यात संस्कृत सारख्या इतर भाषेतील शब्द आहेत. इतर भारतीय भाषामध्ये व्यंजनांच्या मालिकेत तमीळ मधील एका शब्दासाठी चार निरनिराळी अक्षरे आहेत. उदाहरणार्थ, क हे अक्षर कण् (तमीळमधील डोळा) आणि संस्कृत मधील मुख साठी (तमीळ मध्ये मुकम् असा लिहिला जातो) गंगा हा शब्द कंगा आणि घटम् (संस्कृतमध्ये भांडे) हा कटम् असा लिहिला जातो. गदेसाठी (भीमाचे शस्त्र) आणि कथेसाठी गदै आणि कथै असे न लिहिता कटै असा लिहिला जातो.

तमीळ मध्ये 'क' हा 'ख', 'ग' आणि 'घ' साठी येतो. (परम सद्गुरूंनी म्हटल्याप्रमाणे तमिळ सोडून अन्य द्रविड भाषांना धरून बहुतेक सर्व भारतीय भाषांत ('क' 'च' 'त' 'ट' 'प') ह्या पाचही वर्गात सर्व अक्षरे आहेत. 'त' हा 'द' आणि 'ट' साठी येतो. अगदी विरुद्ध अर्थाचे शब्दातही जवळची/एकसारखी अक्षरे असतात : दोषम् आणि तोषम् म्हणजे, दोष आणि सुख हे एकसमान लिहले जातात. ग्रंथ लिपीतील शब्द योग्य उच्चारासाठी तमीळमध्ये घेतले आहेत - स, ह, ज, ष, क्ष, इत्यादी काव्याची परंपरा अनुसरताना तमीळ मध्ये ही अक्षरे वापरली गेली नव्हती. पण हल्ली काही लेखक ही ग्रंथ लिपीतील अक्षरे काव्यातही वापरत नाहीत. त्यांना तमीळ शब्दकोशातील संस्कृत शब्दापासून सुटका करून घेणे कठीण जाते. संस्कृत ध्वनी दाखविणारी अक्षरे भाषेपासून सुटका करून घेणे हे ते करू शकतात कारण तमीळ वर्णमालेत त्यांना समान अक्षरे नाहीत. ह्याने गोंधळ होतो. जर एखाद्या लेखकाने तमीळ पद्धतीने 'चातकम्' असे लिहिले तर ते 'साद (ह) कम्' किंवा 'जातकम्' असे वाचले जाऊ शकते. तमीळ मध्ये सुरुवातीपासूनच सर्व व्यंजने नाहीत. ही उणीव भरून काढण्यासाठी भर घातलेली अक्षरे का वगळावीत? हा काय तमीळचा विजय आणि संस्कृतचा पराभव आहे का? भाषेवरून का संघर्ष व्हावा? आपल्या नसलेल्या भाषांबद्दल आपल्या मनात कडवटपणा बाळगण्याची गरज नाही.

केवळ तमीळ शब्द असलेले शब्द लिहिण्यास तमीळ लिपी पुरेशी आहे. जेव्हा इतर भाषेतील ख, ग, घ, इ. ध्वनी असलेले शब्द वापरण्याची वेळ येते तेव्हा अडचण येते. संस्कृत, तेलुगू, कन्नडा आणि इ. भाषांमध्ये संपूर्ण क वर्ग, च वर्ग त वर्ग आणि प वर्ग यांसाठी अक्षरे

आहेत. आपण पाहिले की इंग्रजीत शब्दांचा उच्चार त्यांच्या स्पेलिंगप्रमाणे करू शकत नाही. तसे तमीळ मध्ये नाही. परंतु त्या भाषेतही लिपी स्वयंपूर्ण नाही. तुम्ही मान्य करणार नाही, पण मी माझ्या अनुभवावरून काय शिकलो हे तुम्हाला सांगतो.

उत्तरेकडील एकजण तमीळ वर्णमाला चांगली शिकला, म्हणजे त्याने सुटी अक्षरे चांगली आत्मसात केली. पण त्याला शब्दांचे उच्चार योग्य करण्यात मदत करणारे कोणी नव्हते. त्याला मुळातून 'तेवारम्' आणि 'तिरूवाचकम्' वाचायचे होते म्हणून त्याला तमीळ भाषा शिकायची होती. वर्णमाला शिकल्यानंतर त्याने पुस्तकातून तेवारम् वाचायचा प्रयत्न केला. जरी त्याला त्या भाषेचे ज्ञान नव्हते तरी त्याला वाटले की अर्थ न समजताही तो महान संतांची स्तोत्रे वाचून पुण्य कमावू शकेल. नंतर एक दिवस तो माझ्याकडे आला आणि म्हणाला, "मी तेवारम् म्हणणार आहे". मला आनंद वाटला आणि त्याला म्हणण्यास सांगितले.

त्याच्या पठणाने माझी करमणूक झाली. त्याने वाचलेला वेचा प्रसिद्ध होता - प्रत्येक गोष्ट उमामहेश्वराच्या रूपात पाहण्याचा अप्परचा अनुभव त्याने तिरूवैयार येथे गायलेला होता आणि ते गीत मादरपिरैक्कन्नियनै ... होते. तो पहिलाच शब्द चुकला. मादर ऐवजी तो मातर म्हणाला. मला ते विचित्र वाटले. नंतर तो क आणि ट वर जोर देत मलैयान महलोडु असे आणि मलैयान मकळोतु ऐवजी म्हणाला. पाडी ऐवजी तो पाती म्हणाला. मी हसण्याच्या बेतात होतो. त्याचे म्हणणे असेच चालू राहिले. तो पुकुवर ऐवजी पुहुवर म्हणाला.

मी त्याचे शांतपणे ऐकत राहिलो कारण मला वाटले उत्तरेकडचा एक तमीळ काव्य शिकतो आहे तर त्याला प्रोत्साहन द्यायला पाहिजे. पण मला लवकरच आढळले की मी त्याचे ते विलक्षण अनिश्चित वाचन सहन करू शकत नाही. मी त्याला मित्रत्वाने तो चुकीचे उच्चार करत असल्याचे सांगितले. त्यावर तो म्हणाला, "मी काय करू शकतो? हे सर्व पुस्तकात आहे." तो जे काही म्हणाला ते बरोबर होते आणि त्यावरून असेही दिसले की तमीळ मध्ये शब्द जसे उच्चारले जातात तसे लिहिले जात नाहीत. जी अक्षरे शब्दाच्या मध्ये येतात ती जशी लिहिली जातात तशीच उच्चारली जात नाहीत. आम्ही मकलोतु असे लिहितो आणि महलोडु असे म्हणतो; अतर्काक् लिहितो आणि म्हणतो अदर्काह. शब्दाच्या मध्यावर आणि शेवटी क चा ह होतो. शब्दाच्या आरंभीचा त हा त च राहतो पण मध्यावर तो द होतो. उदाहरणार्थ ततै (वडील) चा उच्चार तदै आणि कटवूल (ईश्वर) आणि इतम् (स्थान) यांचा उच्चार कडवूल आणि इडम् असा होतो. अशा गोष्टी तमीळ व्याकरणाच्या पुस्तकात तपशिलाने दिलेल्या असतात.

संस्कृतप्रमाणेच तमीळ मध्येही व्याकरणावर उत्कृष्ट साहित्य आहे - उदा. तोल्काप्पियम् आणि नन्नूल. ते शब्दोत्पत्ती आणि उच्चारण यासंबंधी आहेत. उदा. काही नियम आहेत : अमुक अमुक शब्दानंतर स चा च होतो, क चा ह होतो.

सामान्यपणे बोलायचे तर तमीळ मधील शब्दाच्या आरंभीच्या क चा ध्वनी क च राहतो. त्याचप्रमाणे त चा उच्चारही तोच राहतो. पण मध्यावर किंवा शेवटी त्याचा द होतो. जर तो आरंभी असेल तर प चा प च राहतो. मध्यावर तो ब होतो (तमीळ मध्ये शब्दाच्या मध्यावर किंवा शेवटी सुटा प आलेला दिसत नाही. 'अपु' (प्रेम), इंपम् (आनंद) - ह्या शब्दांमधील प इतर अक्षरांशी जोडलेला आहे. (अन्बु, अम्बु, इन्बम) जप, शापम्, कफम्, शुपम् (शुभम्) यातील अक्षरे प वर्गातील स्वतंत्रपणे आलेली आहेत पण ते संस्कृतमधील आहेत (तमिळ मध्ये शुबम असा उच्चार)

च ची एक गंमत आहे. तमीळ मध्ये क, त, प, इ. अक्षरे शब्दाच्या आरंभी असतील तर त्यांचा तोच ध्वनी राहतो. पण च हे अक्षर आरंभीचे असेल तर श असा उच्चारला जातो. चट्टी (स्वयंपाकाचे भांडे) आणि चिवप्पु (लाल) ह्यांचा उच्चार शट्टी आणि शिवप्पु असा केला जातो. जेव्हा च्च सारखी अक्षरे एकत्र येतात तेव्हा त्यांचा श्श असा उच्चार होतो - उदा. अच्चम् (भीती) पच्चै (हिरवा). चोल (बोलणे) चा उच्चार शोल असा होतो पण पेयेरच्चोल आणि विनैच्चोल हे पेयेरश्शोल आणि विनैश्शोल होतो. तमीळ पासून आलेल्या मल्याळम मध्ये शब्दारंभी आलेला च चा उच्चार च होतो : चिवप्पु हा चिवप्पु असतो. शब्दाच्या मध्ये आलेला च्चा चा उच्चार श्श होतो, च्च होत नाही. उदा. काविश्शेरी, नेल्लीश्शेरी. तमीळ लोक काविच्चेरी आणि नेल्लीच्चेरी असाच करतात. अच्चन (वडील) आणि एझुत्तच्चन अशा शब्दांमध्ये मात्र बदल नसतो.

तमीळ भाषेची शक्ती तिच्या व्याकरणावरील साहित्यावरून लक्षात येते - शब्द केव्हा आणि कोठे बदलतो. तथापि शब्द आणि उच्चार यांत एकवाक्यता नसते.

फक्त संस्कृतमध्येच दोन अपवाद सोडून ध्वनीनुसार उच्चार असतात. एक म्हणजे पूर्वी येणारा विसर्ग. विसर्गाचा सामान्यतः एकच उच्चार होतो 'ह' - पूर्ण ह नाही. तमीळनाडू मध्ये तो पूर्ण ह उच्चारला जातो आणि उत्तरेकडील लोक एकत्र उच्चार करतात म्हणून त्यांची थट्टा केली जाते. पण त्यांचे उच्चार शिक्षेप्रमाणे अचूक असतात. प पूर्वी विसर्ग असला की तो फ होतो.

दुसरा अपवाद : सुब्रह्मण्य, ब्रह्म, वह्नी (अग्नी) यांचे उच्चार सुब्रम्हन्य, ब्रम्ह आणि वन्ही असे केले जातात. पण सर्वच ह जोडून येणारे शब्द असे नसतात. उदा. जह्वर (खोल), जिह्वा, गुह्य (रहस्य) आणि प्रल्हाद हिरण्यकश्यपु ह्या दानवाचा मुलगा आणि विष्णुचा महान भक्त.)

-----

# प्रकरण ६

# सर्व वर्ण असलेली भाषा

इतर भाषा सोडून संस्कृत मध्ये फ हा ध्वनी आहे. वस्तुतः मानव काढू शकणार नाही असा एकही ध्वनी त्या भाषेत नाही. कल्पना केल्याप्रमाणे झ हे अक्षर तमीळचे वैशिष्ट्य आहे असे नाही. (प्रत्यगवक्र स्पर्शसंघर्षी ध्वनि) ते संस्कृतचे उगमस्थान असलेल्या वैदिक भाषेत आहे. यजुर्वेदातील ड सामवेदातील तशाच वेचांमध्ये झ असा उच्चारावा लागतो. ऋग्वेदातही काही ठिकाणी ड हा असाच उच्चारावा लागतो. ऋग्वेदाच्या पहिल्या सूक्तातील पहिलाच शब्द, अग्निमिळे हा जवळजवळ अग्निमिझे करावा लागतो - पूर्णपणे ळे साठी झे नाही.

फ्रेंच मध्ये झ च्या जवळचा ध्वनी आहे. संस्कृत किंवा त्या भाषेत त्या ध्वनीसाठी स्वतंत्र अक्षर नाही. फ्रेंच मध्ये ज आणि ग हे झ साठी वापरतात. संस्कृत मध्ये ळ हे अक्षर त्यासाठी येते.

(मला सांगण्यात आले की चिनी भाषेत झ आहे.)

तमीळ मधील तीन टिंबांचे आयतम् म्हटले जाणारे चिन्ह (.˙.) (आयतमः विनस्लोच्या कॉम्प्रिहेन्सिव तमिळ-इंग्लिश शब्दकोशात 'आयतम्' ची व्याख्या अशी - आपल्या ध्वनीपेक्षा अस्पष्ट असा स्वर किंवा ज्याच्या स्वरूपाची स्वतःची विशेषता अथवा तंतोतंतपणा. तो मुख्यत्वे व्यंजन व काही वेळा स्वर होतो आणि तरीही तो अन्य अक्षराबरोबर जोडला जात नाही.) संस्कृतमध्येही आहे. पाणिनि सूत्र असे आहे. - हः कप पौच. त्यानुसार क पासून सुरू होणाऱ्या शब्दाच्या आरंभी विसर्ग आला तर पूर्वी सांगितल्याप्रमाणे ह असा उच्चार होणार नाही. (रामः + करुणाकरः) पण आयतम् मधील ह चा उच्चार होतो. प कारापूर्वी येणाऱ्या विसर्गाचा फ होतो.

रामः + करुणाकरः = राम .. करुणाकरः . रामः + पंडितः = राम फ पंडितः. ह्या फ ध्वनीला उपत्मानीय म्हटले जाते. (त्याला 'प' आणि 'फ' च्या पूर्वी उच्चारला जाणारा महाप्राण विसर्ग म्हटले जाते.) त्म हे अक्षर असा ध्वनी सुचवते की जो स्वयंपाक घरात चूल पेटविण्यासाठी फुंकणीने वारा घालताना येतो. जेव्हा तुम्ही फुंकता तेव्हा फ हा ध्वनी येतो. इंग्रजी शब्द फ्लूट चे पहिले अक्षर फ आहे, नाही का?

आणखी एक फ संबंधी मुद्दा. आपण सामान्यतः फ चा उच्चार प असा करतो. पण आम्ही (दक्षिणेत) त्यानुसार कॉफी चा उच्चार कापी असा करतो असा विचार करणे चूक आहे. संस्कृत मध्ये कपिशा म्हणजे गडद तपकिरी - कॉफी चा रंग. आमची कॉफी गोऱ्या माणसांची कॉफी.

ज्याला तमीळ लोक कुर्रियलुकरम् म्हणतात तो संस्कृत मध्ये आहे - ऋ आणि ॡ. लोक दोन्ही लिहितात Rigveda, Rugveda. ह्या शब्दाचे पहिले अक्षर रि नाही आणि रु नाही. तो वस्तुतः कुर्रियलुकर ध्वनी व्यक्त करतो. तो ऊ आणि इ मधला आहे. आपण कृष्ण हा शब्द रोमन लिपीमध्ये क्रिशण असा लिहितो. उत्तरेकडे तोच शब्द कृष्ण असा लिहितात. आंध्रातील लोक हृदयम् चा उच्चार हुदयम् असा करताना ऐकून मजा वाटते. संस्कृतमधील ऋ कार आणि ॡ कार यांना वाचिक रूप आहे. पण ॡ कार दुसऱ्या व्यंजनाबरोबर येतो. ऋ कार चे उदाहरण म्हणजे ऋग्, ऋषी ; ॡ कार क्लृप्त.

संस्कृत मध्ये ऋ आणि ॡ यांचा व्यंजनांमध्ये समावेश होत नाही पण ते स्वर मानले जातात : अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः

संस्कृत मध्ये ऱ्हस्व ए किंवा ओ नाही. ही त्या भाषेची उणीव आहे. पराशक्ती, सर्वोच्च देवता सर्व ध्वनींचे मूर्त स्वरूप आहे. मग संस्कृत सारख्या भाषेत सर्व ध्वनी का नसावेत? हे दोन्ही स्वर का नसावेत? पाणिनिच्या सूत्रावरील पतञ्जलीचे भाष्य पाहताना मला संस्कृत मध्येही हे दोन्हीही ऱ्हस्व असल्याचा शोध लागला आणि तो दिलासा देणारा शोध होता. पतञ्जली म्हणतो की सामवेदाच्या सात्यमुग्री आणि राणायनीया शाखांचे पठण करताना ऱ्हस्व ए आणि ओ वापरले जातात. (छन्दोगानाम सात्यमुग्री राणायनिया अर्धम - एकारम् अर्धम ओकारम च आधिपते.)

अशा प्रकारे संस्कृत मध्ये सर्व ध्वनींचा समावेश होतो. प्रत्येक अक्षराचा ध्वनी अगदी अचूकपणे निश्चित केलेला आहे अशी तिला लिपी आहे.

-----

## प्रकरण ७

# भाषा आणि लिप्या : भारतीय आणि परदेशी

आपल्या भाषांचे वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक शब्द स्पष्टपणे उच्चारला जातो. इंग्रजी शब्द वर्ल्ड world घ्या. यातील पहिल्या अक्षराला स्पष्ट रूप नाही, ते वे किंवा वो असे रूप नाही. आर/r या अक्षराचा उच्चार वगळता आहे. असे अनेक अस्पष्ट शब्द परकीय भाषांमध्ये आहेत. ते अव्यक्त गटात येतात. आपल्या देशातील सर्व भाषा स्पष्ट आहेत.

इतर देशांमधील स्पेलिंग आणि उच्चार यात मेळ नाही. क ह्या ध्वनीसाठी इंग्रजीत तीन अक्षरे आहेत, के/k, सी/ c आणि क्यू/q. असे आपल्या भाषांबाबत नाही. इंग्रजीतील फ तीन वेगळ्या प्रकारे येतो उदा. फेअर फिलॉसॉफी उदा. रफ. इंग्रजीतील सी/ c हे अक्षर स सारखे वाटते पण आरंभी सी/ c असलेल्या अनेक शब्दांमध्ये त्याचा क सारखा उच्चार असतो. सी/c चा उच्चार असतो. सी/c चा उच्चार स सारखा सेल cell सेल्युलॉईड celluloid सिनेमा cinema अशा काही शब्दांमध्ये आहे. station स्टेशन आणि नेशन nation यांच्यामध्ये तर स्पेलिंग आणि उच्चार यात काहीच सुसंगती नाही.

रोमन लिपीत २६ अक्षरे आहेत आणि शिकायला सोपी आहेत. आपल्या भाषेतील मुळाक्षरांना अनेक अक्षरे आहेत आणि तुलनेने शिकायला कठीण आहेत. पण एकदा तुम्ही शिकला की पाश्चात्त्य भाषांपेक्षा आपल्या भाषा वाचायला आणि लिहायला अधिक सोप्या आहेत. उदाहरणासाठी इंग्रजी घ्या. एम.ए. झालेल्या व्यक्तीलाही स्पेलिंग आणि उच्चारासाठी शब्दकोश पाहावा लागतो.

परंतु भारतीय भाषांमध्ये संस्कृत स्पेलिंग आणि उच्चारासाठी सर्वोत्कृष्ट आहे. मला असे म्हणायचे नाही की इतर देशांतील भाषा आपल्यापेक्षा गौण आहेत. त्याच वेळेस आपल्या देशाचा विचार करता मी संस्कृत बरोबर तुलना करता इतर भाषांना तुच्छ लेखत नाही. संस्कृत पूर्णपणे परमात्म्याचे शब्दब्रह्म रूपात प्रकटीकरण करते हे अधोरेखित करण्यासाठी मी काहींचा उल्लेख केला.

जर आपण सर्वच भाषा आपला समान वारसा आहे हा दृष्टिकोन ठेवला तर आपण इतरांच्या भाषांची निंदा करणार नाही. आपण हे नेहमी विसरतो की भाषेचा हेतू संपर्क, कल्पनांची देवाणघेवाण करणे हा असतो. हे जाणण्यात आपल्याला अपयश आले आहे आणि हेच आपल्या मातृभाषेचे अतिरेकी प्रेम आणि इतर भाषांचा द्वेष यांचे कारण आहे. आपल्याला नेहमी विशाल अंतःकरणाचे असायला सांगितले जाते आणि आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन वाढवायला सांगितले जाते पण भाषेबाबत आपण संकुचित वृत्तीचे राहिलो. मी जेव्हा ह्याचा विचार करतो तेव्हा मला वाईट वाटते.

-----

## प्रकरण ८

# अक्षमाला

रुद्राक्ष म्हणजे रुद्राचा - शिवाचा डोळा. रुद्राक्षमाला म्हणजे अशा डोळ्यांचा हार. अक्ष म्हणजे डोळा. तमीळ मध्ये रुद्राक्षाला तिरूक्कणमणी (डोळ्याची पवित्र बाहुली) म्हणतात.

अक्षमाला किंवा स्फटिकमाला याचा अर्थ काय? येथे अक्ष म्हणजे डोळा असा अर्थ नसून अ पासून क्ष पर्यंतची मुळाक्षरे. संस्कृत मुळाक्षरांमध्ये अ प्रथम येतो आणि क्ष शेवटी येतो. एखाद्या विषयाचे ए ते झेड समजणे म्हणजे तो विषय संपूर्ण समजणे होय. तीच कल्पना सांगण्यासाठी आपण संस्कृत मध्ये म्हणतो. अ-कारादि क्ष कारान्तम्. अ पासून क्ष पर्यंत ५० अक्षरे आहेत. म्हणून अक्षमालेत ५० मणी असतात. अर्थात ५१ वा मणी बाकीच्यांपेक्षा अधिक मोठा असतो आणि त्याला मेरू म्हटले जाते. आख्यायिका असे सांगते की सूर्य त्याच्या दैनिक भ्रमणात मेरूपर्वता पलीकडे जात नाही. आपण जेव्हा ईश्वराचे नाव घेत किंवा मंत्र म्हणत एक आवर्तन करतो तेव्हा प्रथम घड्याळानुसार मेरूपर्यंत आणि नंतर उलट दिशेने पुन्हा मेरू पर्यंत असे आपण १०० वेळा मोजलेले असते.

-----

प्रकरण ९

# स्पष्ट उच्चारण आणि स्वरात म्हणण्याचे महत्त्व

तुम्ही एखाद्या मंत्राचे स्पष्ट उच्चारण आणि स्वरात म्हणण्यात चूक करता कामा नये. जर तुम्ही तसे केले तर तुम्हाला अपेक्षित लाभ मिळणार नाहीत पण कदचित जो हेतू ठेवला त्याच्या विरुद्ध परिणाम होईल. म्हणून मंत्र अगदी काळजीपूर्वक म्हटले पाहिजेत. ह्यावर जोर देणारी तैत्तिरीय संहितेमध्ये एक कथा आहे.

त्वष्ट्याला, काही कारणामुळे इंद्राचा सूड घ्यायचा होता आणि त्याने जो इंद्राचा वध करू शकेल असा पुत्र मिळविण्यासाठी एक यज्ञ केला. (त्वष्टा-त्वष्टु देवलोकातील सुतार) जेव्हा त्याने त्याचा मंत्र म्हटला ''इंद्रशत्रुवर्धस्व ......'' तो स्वरात म्हणण्यात चुकला. त्यात त्याने इंद्र (इंद्रः स्वर्गातील देवांचा अधिपती) हा शब्द न उंचावता किंवा खाली न घेता म्हणावयास पाहिजे होता. त्याने त्रु आणि र्ध हे त्याने उंचावयास हवे होते. (ते दोन्ही उदात्त स्वर आहेत). त्याने तसे म्हटले असते तर त्याचा अर्थ असा झाला असता, ''त्वष्ट्याचा पुत्र इंद्राचा वधक म्हणून मोठा होवो. '' त्याने इंद्रातील द्र उंचावला आणि शत्रु हा शब्द स्पष्ट म्हटला आणि वर्धस्व मधील र्ध खालील स्वरात म्हणाला. म्हणून आता मंत्राचा अर्थ '' ह्या मुलाचा (माझ्या) वधक इंद्र मोठा होवो'' असा झाला. मंत्रातील शब्द बदलले नव्हते पण दोषपूर्ण उच्चारणामुळे जो परिणाम अपेक्षित होता. त्यापेक्षा विरुद्ध परिणाम झाला. अशा प्रकारे पिताच इंद्राच्या हातून त्याच्या पुत्राच्या मृत्यूला कारण झाला (वृभ हा त्याचा पुत्र होता.)

कथेचे सार ह्या कडव्यात आहे जे आपल्याला चुकीच्या स्वरात म्हणण्याबाबत इशारा देते.

मन्त्रोहीनः स्वरतो वर्णतो वा
मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति
यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ।।

कोणत्या शस्त्राने त्वष्ट्याचा मुलगा ठार मारला गेला? इंद्राच्या वज्राने नाही परंतु पित्याच्या चुकीच्या मंत्र म्हणण्याने.

-----

## प्रकरण १०

# किंचित फरक असलेल्या आवृत्त्या

मी वैदिक शब्दावयवांची शुद्धता टिकविण्याचे महत्त्व सांगितले आहे. भारतभर, हिमालयापासून रामेश्वर पर्यंत आणि सर्व युगांतून, कोणत्याही छापील पुस्तकाशिवाय आणि देशाच्या एका भागाचा दुसऱ्या भागाशी दळणवळण नसता, वेद हे मौखिक परंपरेने शिकवले जात आहेत. आणि तरीही वेदग्रंथांचे ९९ टक्के अनुसरण अक्षरशः केले जाते.

म्हणजे एक टक्का भेद आहे, नाही का? होय, निरनिराळ्या प्रांतात, भागांमध्ये आहे. असा किंचित भेद असणे योग्य आहे का? जर मंत्रातील एकही शब्दावयव चुकीचा झाला तरी परिणाम दुर्दैवी असतो असे ठासून सांगूनही एकाच मंत्रात भिन्न भागात, भिन्न काळात एक टक्का भेद असावा हे आपण कसे स्वीकारावे? जर मूळ वेद त्यांच्या रूपात एकच आहेत, तर एक टक्का जुन्याचा त्याग म्हणजे अनपेक्षित परिणाम नाही का?

ह्या प्रश्नाला उत्तर आहे. तुमच्या डॉक्टरांनी सांगितल्यापेक्षा वेगळे औषध तुम्ही घेतले तर तुम्हाला त्याचा त्रास होईल. तसेच तुम्ही जर शब्दावयव बदलून मंत्र म्हटला तर तुम्हाला विपरीत परिणाम भोगावा लागेल. दिलेले औषध बदलू नये हा नियम रुग्णाला लागू होतो. डॉक्टरला नव्हे. डॉक्टरांनी दिलेले औषध रुग्ण स्वतःच्या मनाप्रमाणे बदलू शकत नाही. पण डॉक्टर बदल करू शकतो, नाही का? एखाद्या व्याधीसाठी एकापेक्षा अधिक औषधे असतात. म्हणून जर डॉक्टरांनी औषध बदलले तर त्यात चूक नाही. एकच व्याधी असलेल्या दोन रुग्णांवर औषधोपचार करताना डॉक्टर दोघांना एकच प्रकारचे औषध देईल, पण त्यांच्या स्वरूपाप्रमाणे थोडे बदल करील.

असेच, भिन्न भागांमध्ये ऋषींनी थोडेसे बदल सुचविले, पण ते विपरीत परिणाम घडविणारे नव्हते. ह्या बदलांसह मंत्रांनी अपेक्षित लाभ दिले. वास्तविक ऋषींनी, विशिष्ट भाग अभ्यासण्याचा अधिकार आहे अशा लोकांच्या हितासाठी हे बदल केले. ह्यासंबंधीचे नियम स्पष्टपणे प्रातिशाख्यात दिलेले आहेत.

विविध भागांतील मंत्रातील शब्दावयवात विचार करण्याजोगा बदल नसतो. त्यांचा एकमेकांशी संबंध नसतो असे नाही. एकूणच त्यांचे उच्चार एकसारखेच असतात. जरी अक्षरे भिन्न असली तरी त्यांच्यात संबंध दिसून येतो.

-----

## प्रकरण ११

# वेदांचे गायन आणि प्रांतिक भाषा

जर आपण भारतातील भाषांची वैशिष्ट्ये यांचा संबंध वेदांच्या उच्चारणाशी जोडला तर आपल्याला असे आढळेल की त्या भाषेतील विद्वान आणि त्यांच्यातील भेद हे त्या प्रांतात वेद कसे म्हटले जातात त्यावर आहेत. माझ्या स्वतःच्या भाषाशास्त्रीय संशोधनावरून मी काही निरीक्षणे मांडतो.

ड,र,ल,ळ आणि झ ही अक्षरे ध्वनिशास्त्रानुसार जवळची आहेत. एखाद्या मुलाला रेल किंवा राम म्हणायला सांगा, बहुतेक तो डेल, डाम असे म्हणेल. त्याचे कारण असे की ड हा र च्या जवळचा आहे. बरेच लोक शिवरात्री ऐवजी शिवलात्री म्हणतात. आणि काही तुळिप्पोल (तमीळ मध्ये थोडा) ऐवजी तुळिप्पोरा म्हणतात. येथे ल आणि र समान भासतात. र आणि ड कसे बदलतात हे मी सांगितले. ल चा सुद्धा ड होतो. ल हा ळ च्या जवळचा आहे. जे शब्द आपण लळिता, नळिन आणि शीतळ असे उच्चारतो ते आपल्याला संस्कृत पुस्तकांमध्ये ललित, नलिन, शीतल असे आढळतील. ळ आणि झ हे घनिष्ठ मित्र आहेत हे सांगण्याची गरज नाही. मदुराई हे तमीळ मधील शहर आहे पण येथे लोक वझ-पझम ऐवजी वाळ-पळम् म्हणतात. ते झ साठी ळ वापरतात. झ हे अक्षर एकमेव तमीळ भाषेत असल्याचे आम्हाला वाटते.

इथे एक कल्पना मला तुम्हाला सांगायला आवडेल, जी तुम्हाला नवीन वाटायचा संभव आहे. तमीळमधील एकमेवाद्वितीय अक्षर झ हे वेदांमध्ये सुद्धा आहे. जैमिनी ही सामवेदाची एक शाखा आहे. तिला तलवकार शाखा असेही म्हणतात. इतर वेदांतील किंवा शाखांमधील ड किंवा ळ हे तलवकार शाखेतील झ सारखे भासतात. ज्यांनी ह्या शाखेचा योग्य अभ्यास केलेला आहे ते ड किंवा ळ साठी झ म्हणतात. तो पूर्ण झ नसतो परंतु त्याच्या काहीतरी जवळचा किंवा ज्यात झ अंतर्भूत असे काही.

ऋग्वेदातील काही ठिकाणी झ कार येतात. बहुधा ड आणि ळ यांची अदलाबदल होते. जेथे यजुर्वेदात ड कार असतो तेव्हा ऋग्वेदात ळ कार असतो. वेदातील पहिलाच मंत्र अग्निमीडे आहे. विस्तृत प्रमाणात अनुयायी असलेल्या यजुर्वेदात अग्निमोडे हा येतो. ऋग्वेदात तो अग्निमीळे असा येतो. हा ळे बराचसा झे सारखा उच्चारायचा. यजुर्वेदातील श्रीरुद्रातील स्तोत्रात मीडुष्टमाय शब्द आढळतो. तोच शब्द ऋग्वेदातही आढळतो. मीडु मधील डु हा ळु ऐवजी झु सारखा वाटतो - शब्दावयव कसा म्हणतात त्यात झ कार अंतर्भूत असतो.

सामान्यपणे बोलायचे तर ऋग्वेदातील ळ हा यजुर्वेदातील ड आहे आणि तलवकार सामवेदात झ आहे. वेदांचे अनुयायी आधिक्याने असलेल्या प्रांताचा विचार करू, आणि त्या

प्रांतात बोलल्या जाणाऱ्या भाषेची खास वैशिष्ट्ये पाहू.

अशा दृष्टिकोनाचा प्रचार केला जातो की वेद हे आर्यांचे होते आणि त्यांचा द्रविडांशी काहीही संबंध नव्हता. असे प्रांत जेथे तमीळ, तेलुगू आणि कानडी बोलली जाते असे दक्षिणेकडील ३/४ प्रांत विचारार्थ घेऊ.

तमीळमध्ये झ, तेलुगू मध्ये ड आणि कानडी मध्ये ळ ही वैशिष्ट्ये आहेत. तमीळ मध्ये जेथे झ आढळतो तो तेलुगुत ड आणि कानडीत ळ असतो. संस्कृत शब्द प्रवाळ घेऊ. तो तमीळ मध्ये पवझम, तेलुगूत पकडालु आणि कानडीत हवाळा आहे.

पवझम हा शब्द तसेच कानडीतील पकडालु प्रवाळपासून आलेला आहे. कोणत्या भाषेत मूळ संस्कृत शब्द तमीळ पेक्षा अधिक प्रमाणात बदलला : प्रवाळ मधील वा चा क झाला पण तो ह्या भाषेच्या वैशिष्ट्यानुसार झाला. कानडीत कसा बदलला ? संस्कृतचा प्र तमीळ आणि तेलुगूत प झाला. हा लहान बदल. पण कानडीत प्र चाह होतो. तोही त्या भाषेच्या वैशिष्ट्याप्रमाणे. म्हणून पम्पा चा हम्पा होतो आणि नंतर हम्पी. (तुम्ही हम्पीच्या भग्नावशेषा संबंधी ऐकले असेल). (तुंगभद्रेच्या काठावरील 'हम्पी' चे भग्नावशेष हे विजयनगरच्या साम्राज्याचे निदर्शक आहेत.) दुधासाठी असलेला तमीळ शब्द पाल कानडीत हालु आणि पुहझ (कीर्ती) होगलु होतो. त्याच रीतीने प्रवाळ चा कानडीत हवाळ होतो.

प आणि ह यांच्या संबंधाने बोलणे हा माझा हेतू नाही. संस्कृत मधील ळ हा तमीळ मधील झ आणि तेलुगूत ड असल्याचे मला निदर्शनास आणून द्यायचे होते. कानडीत काही बदल नाही. ळ तसाच ळ राहतो.

संस्कृत मधील शब्दांबाबत फक्त हा भेद आहे असे नव्हे तर द्रविड समूहाच्या भाषांबाबतही आहे. ह्याबाबत पुहझ (पुगझ) हे वर दिलेले उदाहरण आहे - तो काही संस्कृत शब्द नाही.

संशोधनाच्या सद्यस्थितीवरून आपल्या हे लक्षात येते : आपले लोक एकाच कुटुंबातले आहेत. ते आर्य आणि द्रविड असे वांशिक दृष्ट्या विभागलेले नाहीत. परंतु एका बाजूला संस्कृतशी जवळीक असलेल्या भाषा बोलणारे लोक आणि दुसऱ्या बाजूला द्रविडी भाषा बोलणारे लोक असे विभागले आहेत. पुढे संशोधन असेही उघड करेल की हा भेद खरा नाही. आणि ह्या दोन्ही प्रकारच्या भाषा एकाच खोडापासून आलेल्या आहेत. काही भाषाशास्त्रज्ञ संस्कृत आणि तमीळ मधील नात्यांची तपासणी करीत असल्याचे कळते. आपण अगदी पूर्वीच्या काळात गेलो तर त्या दोन्ही भाषा एकाच खोडापासून आलेल्या असल्याचा शोध लागेल. पण त्या काळाच्या नंतरच्या हजारो वर्षांत द्रविडी भाषांमध्ये स्वतंत्र उत्क्रांती झाली असली पाहिजे. त्या अर्थाने मी द्रविडी भाषा संस्कृत पासून भिन्न असल्याचे म्हणतो.

तमीळ मधील झ तेलुगूमध्ये ड आणि कानडीत ळ असावा ह्याचे विशेष कारण होते असे मला वाटते. ह्या तीन भाषा बोलल्या जाणाऱ्या प्रांतांमध्ये वेदांचे पठण कसे होते ह्याच्याशी

हे भेद संबंधित होते अशा निर्णयाप्रत मी आलो आहे.

महाराष्ट्र आणि कर्नाटक यांसह पश्चिमेकडील प्रांतात (भारतीय द्वीपकल्पाच्या) ऋग्वेद हा प्रमुख वेद आहे. नाशिक पासून कन्याकुमारीपर्यंत ऋग्वेदाचे विस्तृत प्रमाणात अनुयायी आहेत. येथे कानडी ही एक भाषा बोलली जाते आणि त्यात ळ ह्या अक्षराला विशेष स्थान आहे. वैदिक उगम असलेल्या, द्रविडी प्रांतिक भाषांमध्ये, कानडीत ळ हे वैशिष्ट्य आहे.

पूर्व किनारपट्टी आणि बंदरांनी बनलेल्या आंध्र प्रदेशात आपण गेलो तर येथे १०० पैकी ९८ (ब्राह्मण) लोक यजुर्वेदी आढळतील. उरलेले दोन टक्के ऋग्वेदी आहेत. प्रत्यक्ष तेथे कोणीही सामवेदी नाहीत. यजुर्वेद्यांचे प्राबल्य असल्याने तेथे ऋग्वेदाचा ळ आणि इतर भाषांचाही ळ, ड असतो.

तमीळनाडूतही आंध्र प्रदेशाइतके नसले तरी यजुर्वेदी मोठ्या प्रमाणावर आहेत. येथे ८० टक्के यजुर्वेदी, १५ टक्के सामवेदी आणि ५ टक्के ऋग्वेदी आहेत. प्राचीन काळी सामवेदींचा मोठा गट होता - याचा पुरावा आहे. तमीळनाडू मध्ये सामवेदाच्या सर्व १००० शाखांचे ब्राह्मण होते, हे संभवनीय आहे. तेवारम् मध्ये ''अयिरम्-शाखै-उदैयन'' अशी ईश्वराने स्तुती केली आहे. (१०० वैदिक शाखांमध्ये एक)

सामवेदींमध्ये कौथुम शाखा बहुसंख्य आहे. पूर्वीच्या काळी जैमिनीय किंवा तलवकार शाखेचे अनुयायी मोठ्या संख्येने होते. कोझियर हे चोल भूमीवरचे आहेत. आजही ते सर्व सामवेदी आहेत आणि ते तलवकार शाखेचे अनुसरण करतात - तिरूनेल्वेलीत (जो पांड्य प्रदेश म्हणून ओळखला जातो) राहणारे कोझियर अजूनही ह्याच शाखेचे आहेत. प्रारंभी चोल भूमीवरच नव्हे तर पांड्य भूमीवरही सामवेदाचे अनुयायी मोठ्या प्रमाणात होते.

प्राचीन काळापासून कोझियर हे तमीळनाडू मध्ये ब्राह्मण म्हणून समजले जात असतील. ते खरेच त्या प्रदेशाचे ब्राह्मण ''आदिवासी'' होत. ते कसे ते मी तुम्हाला सांगतो. तमीळ स्मार्त ब्राह्मणांमध्ये 'वडमस' (वडमर) म्हटला जाणारा एक पंथ आहे. ते उत्तरेकडून, विशेषतः नर्मदेच्या खोऱ्यातून तमीळनाडू मध्ये आले असले पाहिजेत. त्यांची नावेच दर्शवितात की ते उत्तरेकडील आहेत. कोझियर हे पूर्वीपासून तमीळनाडूचे रहिवासी असले पाहिजेत. (तमीळनाडू मधील लोकगीतात 'वडम' या शब्दावर श्लेष म्हणजे कोटी केलेली आढळते. 'वडा' हा संपूर्ण दक्षिणेतील लोकप्रिय खाद्यपदार्थ आहे. तमीळ भाषेमध्ये 'मा' म्हणजे 'पीठ' किंवा डोसा आणि इडली बनविण्यासाठी पीठ कालवून तयार केलेली पीठी होय. यावरून वडम् शब्दावर असा विनोद केला जातो की 'काय वडा की डोसा'. परम सद्‌गुरूंनी स्वतः हा विनोद ह्या प्रवचनात सांगितला आहे.)

वडमर विषयी मी जे बोललो, त्याचा अर्थ असा नव्हे की, आज जसे काही लोक

म्हणतात तसे की दक्षिणेकडील सर्व ब्राह्मण उत्तरेकडून आले, तसे मला म्हणायचे आहे, खरे पाहता, वडमर ह्या शब्दातच, सर्व ब्राह्मण उत्तरेकडून आले नसल्याचा पुरावा आहे. (वडमर : वडक्कू किंवा उत्तरेकडून आलेले लोक. या ठिकाणी उत्तरेचा अर्थ तमीळनाडूच्या उत्तर दिशेकडून आलेले इतकाच घ्यावा. अन्य ठिकाणी उत्तरेचा अर्थ उत्तर भारतातून आलेले असा आहे.) जर तमीळनाडू किंवा दक्षिणेतील अन्य भागांमधील सर्व ब्राह्मण मूळचे उत्तरेतील असते तर वडमर नावाच एकच पंथ वेगळा कसा केला गेला? अगदी प्रारंभापासून बाकीचे ब्राह्मण तमीळनाडूचे असले पाहिजेत. कोझियर हे त्या पहिल्या ब्राह्मणांपैकी आहेत.

वडमर हे मूळचे नर्मदेच्या खोऱ्यातील होते हे दाखविणारा एक पुरावा आहे. दक्षिणेतील ब्राह्मणांपैकी केवळ तेच त्यांच्या संध्यावंदनेत पुढील श्लोक म्हणतात, ही सर्पापासूनच्या संरक्षणाबद्दलची प्रार्थना आहे.

नर्मदायै नमः प्रातः नर्मदायै नमो निशी
नमोस्तु नर्मदे तुभ्यं त्राहि माम् विष-सर्पतः

कोझियरांमध्ये ६३ नायनमारापैकी, सोमाशिमार नायनार नावाचा एक मोठा माणूस होऊन गेला. सोमाशी हा भक्ष्य पदार्थ नाही पण त्याचा अर्थ जो सोमयाग करतो तो सोमयाजीन होय. श्रीरामानुजाचार्यांच्या वडिलांनी हा याग केला होता आणि त्यांना 'केशव सोमयाजी' म्हटले जात असे. सोमयागात सामवेदाला महत्त्वाचे स्थान आहे.

जर तमीळनाडू मध्ये मोठ्या प्रमाणात कोझियर ब्राह्मण होते याचा अर्थ असा की त्यावेळेस सामवेदाच्या तलवकार शाखेचे अनुयायी खूप होते. मी चोल आणि पांड्य राज्यांबद्दल बोललो पण पल्लव आणि चेर भूमीबद्दल नाही. भूतकाळात पल्लव साम्राज्य नव्हते. मूवेंदर हे चर, चोल आणि पांड्य होत. ज्या प्रदेशात पल्लव राज्य उभे झाले तो भाग त्याकाळी चोल प्रदेशाचा एक भाग होता. म्हणून जे ब्राह्मण उत्तरेकडून प्रथम आलेले वडमर तमीळनाडूच्या उत्तर भागात म्हणजे पल्लव प्रदेशात स्थायिक झाले. साहजिकच त्यांना औत्तर वडमर म्हणू लागले. वडमारांमध्ये सामवेदी आहेत पण ते तलवकार शाखेचे नाहीत तर कौथुम शाखेचे आहेत. तमीळ भाषा एका अभिजात स्थितीला आल्यानंतर (प्रथम दर्जाची बनल्यावर) बऱ्याच काळाने वडमर तमीळ भूमीत आले. म्हणून त्यांचे वेदपठण आपल्या विषयाशी सुसंगत होणार नाही. संगम साहित्य विकसित झाल्यानंतरच्या काळातील पल्लवांच्या बाबतीत तेच म्हणता येईल.

आता चेर भूमीकडे वळू या. केरळमध्ये मल्याळम बोलली जाते. तमीळ, तेलुगू आणि कानडी बद्दल बोलत असता मी ह्या भाषेबद्दल बोललो नाही कारण ही भाषा इतर तीन भाषांच्या बराच काळानंतर आली. सुमारे एक हजार वर्षांपूर्वी केरळ हा तमीळ भूमीचा एक भाग होता आणि त्याची भाषाही तमीळ होती. मल्याळमची उत्क्रांती तमीळमधून झाली. तमीळ झ चा

तेलुगूमध्ये ड आणि कानडीमध्ये ळ होतो पण मल्याळम मध्ये तो झ च राहतो. तमीळी लोक नदीला पुझै म्हणतात, केरळी लोक पुझ म्हणतात. तमीळ आलप्पुझै आणि अम्बलप्पुझै म्हणतात (दोन्ही केरळ मधील स्थानांची नावे) तर केरळी आलप्पुझै आणि अम्बलप्पुझ म्हणतात.

मल्याळम भाषेचा प्रश्न बाजूला ठेवू, केरळ मधील वैदिक परंपरेकडे वळू. नंपूतिरिस म्हटल्या जाणाऱ्या ब्राह्मणांची शास्त्रीय पद्धतीने वेदांचा अभ्यास करण्याची दीर्घ परंपरा आहे. त्यांच्यात त्रिवेदी आहेत. (ज्यांनी ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांत प्रावीण्य मिळविलेले आहे आणि अनेक सामवेदी तलवकार शाखा अनुसरतात.) पाञ्चान्मन कुटुंब ही तसे एक आहे आणि त्याच्या पाठीशी चांगली वैदिक परंपरा आहे. ते तलवकार शाखेचे आहेत. तमीळनाडू मध्ये सामवेदींमध्ये कौथुम शाखा अनुसरणारे बरेच आहेत पण केरळ मधील सामवेदी तलवकार शाखेचे आहेत.

पिढ्यानुपिढ्या नंपूतिरिस तलवकार शाखेचे पठण करीत आहेत. ते इतर शाखेतील ड किंवा ळ चा उच्चार झ असा करतात - म्हणते ते तमीळनाडू मधील रूढी पाळतात. तलवकार शाखेच्या भूर्जपत्राची आणि छापील अशा दोन्ही आवृत्त्यांमध्ये, तमीळनाडू आणि केरळ मध्ये संबंधित ठिकाणी झ आलेला आहे.

अशा रीतीने आपल्या लक्षात येते की, सामवेदाच्या तलवकार शाखेचे अनुयायी देशाच्या कोणत्याही इतर भागापेक्षा तमीळनाडू मध्ये फार पूर्वीपासून जास्त आहेत. ह्या शाखेबरोबर इतरत्र न सापडणारा झ आला. तमीळ संगम साहित्याच्या भाष्यकारापैकी एक नच्चिनार्क्किणियर आहे. तो तोल्काप्पीयम (प्रसिद्ध तमीळ व्याकरणाचे पुस्तक) वरील भाष्यात चार वेदांचा उल्लेख करतो : तैत्तिरीयम, पौडीकम, तलवकारम् आणि सामम्. पूर्ण वेदांना शाखा मानण्याची चूक त्याने केली. तथापि, त्याच्या यादीवरून आपल्याला कळते की तलवकार शाखेला तमीळनाडू मध्ये वेदांचे स्थान होते. तैत्तिरीय ही कृष्ण-यजुर्वेदाची शाखा आहे. ऋग्वेदाच्या शाङ्खायन शाखेच्या कौषीतकि ब्राह्मणाला पौष्य म्हटले जाते. ज्याला नच्चिनार्क्किणियर पौडियम म्हणतो त्याचा आझवार पौझियम असा उल्लेख करतात - येथेही तुम्हाला झ आणि ड चा संबंध दिसतो.

भिन्न प्रांतांत बोलल्या जाणाऱ्या भाषांच्या वैशिष्ट्यांनी वेदांच्या विविध शाखांमधील उच्चारणातील भेद निर्माण केले. आतापावेतो मी मलाच द्रविड प्रांतातील भाषांची मर्यादा घातली होती. आता मी भारताच्या इतर भागांतील आणि जगातील इतर भाषांच्या संदर्भात त्याच विषयावर बोलणार आहे.

उत्तरेकडे ज ऐवजी य आणि व ऐवजी ब वापरण्याचा प्रघात आहे - अशा दोन्ही साहित्यिक आणि बोली भाषांत व ऐवजी ब चा वापर विशेषतः बंगाल मध्ये लक्षात येतो आणि उत्तर प्रदेश मध्ये येतो आणि उत्तर प्रदेश आणि पंजाब इ. मध्ये य साठीज येतो.

बंगाल मध्ये ते ह्या वचनाचे पालन करतात - वबयोरभेदम् - व आणि ब मध्ये भेद नाही. तमीळमध्ये सुद्धा भीष्म चा विट्टुमर आणि भीम चा बीम असा उच्चार केला जातो. बंगाल मध्ये व चा ब असा उच्चारला जातो. वस्तुतः बंगाल हाच वंग पासून आला.

बंगाली वंगभाषीला म्हणतात (बंगालचे रहिवासी). एकदा त्यांच्या लक्षात आले की ब चा सर्वत्र ब करणे योग्य नाही आणि ह्या प्रश्नावर विचार करण्यासाठी त्यांनी एक परिषद बोलाविली - तिला वंग परिषद म्हटले जाते. तिच्या अनेक निर्णयांपैकी एकानुसार येथून पुढे बंगाली पुस्तकातील भाषेतील सर्व ब कार व कार करून छापायचे होते. त्यांनी निर्णय कठोरपणे पाळला. पण तसे करताना निसर्गतः असलेल्या ब चा व मध्ये बदल केला - उदाहरणार्थ बंधू चा वंधू, बंगबंधू चा वंगबंधू केला.

अगोदर निरीक्षण केल्याप्रमाणे उत्तरेकडील प्रांतांमध्ये सुद्धा ब ऐवजी व वापरला जातो. उदाहरणार्थ, बिहार हे नाव विहार पासून आले. (एकेकाळी ह्या प्रांतात बुद्धांचे अनेक विहार, मंदिरे किंवा मठ होते) रासबिहारी हे नाव रासविहारीपासून आले. ह्या प्रघाताचे आपण कसे स्पष्टीकरण देऊ ? अशी वचने ह्या भागांमधील वैदिक शाखांच्या प्रातिशाख्यामध्ये दिलेली आहेत. तेथील लोकांनी प्रातिशाख्यातील नियम त्यांच्या सामान्य लेखन आणि बोलीतही केला. वैदिक शास्त्रांनी घालून दिलेले नियम ह्या प्रांतात श्रद्धेने पाळले जातात.

संपूर्ण देशाचा विचार करता हे लक्षात येईल की यजुर्वेदी बहुसंख्येने आहेत : कृष्ण-यजुर्वेदाचे दक्षिणेकडे आणि शुक्ल-यजुर्वेदाचे उत्तरेकडे अनुसरण होते. शुक्ल-यजुर्वेदाची माध्यंदिन नावाची एक शाखा आहे आणि उत्तरेकडे तिचे असंख्य अनुयायी आहेत. त्यांच्या प्रातिशाख्यात म्हटले आहे की य ऐवजी ज आणि ष ऐवजी क वापरता येईल. दक्षिणेकडे आम्ही ''यत् पुरुषेन हविषा'' (पुरुष सूक्तात) म्हणतो- उत्तरेकडील आवृत्तीत तेच ''जत् पुरुषेन हविका'' येते. आमची अशा म्हणण्याने करमणूक झाली आणि आम्हाला वेदांचे असे विकृतीकरण केल्याचा रागही आला. त्याचवेळेस वैदिक ध्वनींची शुद्धता आम्ही दक्षिणेत ठेवतो याचा अभिमानही वाटला.

जे वर्ण जवळचे आहेत त्यांच्यातच अदलाबदल होतो. तमीळमध्ये सुद्धा ज आणि य हे जवळचे आहेत याची उदाहरणे आहेत. जावा (जावक बेट) चा तमीळ साहित्यात यावक असा उल्लेख होतो. सामान्यतः शब्दाच्या आरंभी ज आला तर तो तमीळ मध्ये श लिहिला जातो पण जर तो मध्यावर आला तर तो य होतो. - अज (न) आणि पंकज (म) यांचे अय (न) आणि पंगय (म) होतात. ष हे श चे रूप आहे. जसे ष आणि क हे परिवर्तनीय आहेत तसेच श आणि क आहेत. तमीळ मध्ये कै (हात) हा तेलुगूत शै होतो. करणे (काम) हे हाताचे (तमीळमध्ये शेय्वडू) काम होय. तमीळमधील कै पेक्षा तेलुगूतील शेय हाताचे कार्य दाखविते. संस्कृत मध्ये कर याचा अर्थ करणे तसाच हात असाही आहे. - ''शंकर म्हणजे जो कल्याण करतो; करोमि

म्हणजे मी करतो.'' तमीळ मध्ये सुद्धा शै हा शब्द मूलतः हातासाठी होता आणि नंतर कै वापरला जाऊ लागला. आता शै हे त्या भाषेत क्रियापद आहे. श (किंवा ष) चा क आणि नंतर कै होतो. आणखी एक मुद्दा : श आणि क्ष हे जवळचे ध्वनी आहेत. क्ष चा क होणे हे स्वाभाविक आहे. ''अक्षम्-अक्कम् ; दक्षिणनम्-दक्काणम् ; क्षणम्-कणम्.'' अशी उदाहरणे अनेक पटीत असतील.

तमीळमध्ये ब चा व होतो असे आपण पाहिले, त्याच वेळेस उत्तरेकडील भाषांमध्ये दुसरे बदल आहेत. तसेच तमीळमध्ये ज चा य आणि श चा क होतो तसे उत्तरेकडे य आणि श चे ज आणि क होतात. हे तेथे ज्या वैदिक शाखेचे अनुसरण असेल त्याप्रमाणे आणि त्याची जी शिक्षा असेल त्याप्रमाणे होते. म्हणूनच उत्तरेकडील लोक ''यत् पुरुषेन हविषा'' ऐवजी ''जत् पुरुषेन हविका'' म्हणतात.

हा बदल उत्तरेतील अनेक शब्दांमध्ये दिसतो : यमुना ऐवजी जमुना : योगी ऐवजी जोगी : युग-युग ऐवजी जुग-जुग : यात्रा ऐवजी जत्रा. ष चा क होत असल्याने ऋषी चा रिकी होतो. आपण पाहिले की क्ष आणि ष जवळचे आहेत. दक्षिणेत लक्ष्मी ऐवजी लषिमी म्हणताना ऐकू येते - ते लिहितातही तसेच. उत्तरेकडे क्ष ऐवजी क वापरला जातो. - उदा. क्षीर साठी खीर. तेच तमीळ वापरात तेच येते - लक्ष्मी ऐवजी इल्लक्कुमी.

आता आपण इतर देशांकडे प्रथम ज्या भूमीने ख्रिश्चन धर्माचा उदय पाहिला तो, पॅलेस्टाईन आणि इस्त्राईल सारखे सेमेटिक देश यांच्याकडे वळू या. जुना करार हा कुराणाचा पाया आहे. काही व्यक्ती ख्रिस्ती आणि इस्लाम धर्मात सारख्या आहेत, पण अरेबिक मध्ये त्यांचा उच्चार भिन्न होतो. जोसेफ चा युसुफ होतो जेहोवा चा येहोवा होतो. ख्रिश्चन राष्ट्रांमध्येही भेद आहेत. काही भाषांमध्ये ज कार प्रामुख्याने दिसतो. जेसू आणि येसू हे ख्रिश्चन धर्माच्या संस्थापकाचे नाव वेगवेगळे लिहिले जाते. ज कार हे ग्रीकचेही वैशिष्ट्य आहे. ह्या सर्वांचे मूळ आपण वेदात पाहू शकतो. जेहोवा किंवा येहोवा हे वैदिक देवता यहवन सारखेच आहे. द्यौ-पितर (द्यावा-पृथ्वी) चा ज्युपिटर होतो. इतर भाषांकडून जेव्हा संस्कृतमधील शब्द घेतले जातात तेव्हा त्यातील पहिले अक्षर गमावले जाते. म्हणून द्यौ-पितर चा यौ-पितर आणि नंतर ज्युपिटर होतो.

जे मूलतः यहवन आणि द्यौ-पितर होते ते जेहोवा आणि ज्युपिटर असे ज काराच्या रूढीने बदलले.

प्रारंभी वैदिक धर्म सर्वत्र पाळला जात होता. ग्रीक आणि शेजारील प्रदेशात माध्यंदिन शाखा अनुसरली जात असणे हे संभवनीय आहे.

-----

## प्रकरण १२

# शिक्षा शास्त्राचा प्रभाव

मागे आपण पाहिले की ठरावीक वैदिक शब्दांची ठरावीक प्रांताशी जवळीक आहे आणि तेथे बोलल्या जाणाऱ्या भाषेने ते शब्द आत्मसात केले आहेत. आपल्याला हेही समजले की वेद सर्व देशांमध्ये विकास पावले. आपल्याला जवळून माहीत असलेल्या तमीळनाडू मध्ये वैदिक धर्माचे आचरण झाले नाही असा कोणताही काळ नव्हता. (परम सद्गुरू येथे तमीळ श्रोत्यांना संबोधित करीत आहेत.)

सामवेदाच्या तलवकार शाखेचे गुणविशेष असलेला झ हा तमीझ ह्या नावामध्येच आहे. असा दावा करण्यात माझे बरोबर आहे का की हे भरकटणे आहे ? समजा विधान असे आहे : तमीळमधील झ आणि उत्तरेकडील भाषांमधील ज, हे तमीळनाडू आणि उत्तर प्रांत येथे असणाऱ्या वैदिक ग्रंथांमध्ये भेद करणारी अक्षरे आहेत. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर प्रांतिक भाषांमध्ये जे जे होते ते ते त्या प्रदेशात असलेल्या वेद शाखांनी आत्मसात केले. वैदिक झ ज आणि ब हे तमीळ आणि बंगाली लोकांची अक्षरे झाली म्हणजे त्या भाषकांच्या बोलण्यात ती येतात, असे मी विधान करतो तेव्हा ते मी उलटसुलट करतो का? तमीळ म्हणजे निश्चितपणे तमीझच होय.

शिक्षा शास्त्राच्या नियमांचा प्रभाव प्रांतिक भाषांवर पडला हा अचूक दृष्टिकोन आहे. प्रातिशाख्याचे नियम एकाच प्रदेशात लागू होतात असे नव्हे तर ती शाखा असलेल्या सर्व ठिकाणी लागू होतात. जर एखादा ब्राह्मण कामरूप (आसाम) किंवा काश्मिर मध्ये तलवकार म्हणत असेल तर तो झ उच्चारेल तेव्हा मंत्रात इतर ड किंवा ळ वापरतील. जर गुजराथ किंवा महाराष्ट्र किंवा भारताच्या कोणत्याही प्रांतातील ब्राह्मण कृष्ण-यजुवेदातील मंत्र म्हणत असेल तर त्याला झ आणि ळ ऐवजी ड म्हणावा लागेल. त्याचप्रकारे कानडीच नव्हे तर कुठलाही ऋग्वेदी ब्राह्मण ळ वापरेल आणि इतर मंत्र म्हणताना ड किंवा झ वापरेल. प्रातिशाख्य हे वैदिक मंत्रांचे ध्वनी फक्त ठरावीक प्रदेशापुरते नव्हे तर संपूर्ण देशाला निश्चित करून देते. काळाच्या ओघात प्रचलित शाखेची अक्षरे स्थानिक भाषा आत्मसात करते.

ज्या महिन्यात पौर्णिमेच्या दिवशी मृगशीर्ष हे नक्षत्र असते त्यावरून त्या महिन्याला मार्गशिर्षी असे नाव पडले. मार्गशिर्षी हा तमीळमध्ये मार्गझी. षी चा डी होतो आणि डी चा झी होतो. त्या भाषेच्या विद्वानांनुसार ष चा ड होतो. पुरुषाला तमीळमध्ये पुरूडन आणि नहुषाला तमीळ काव्यात नगुडन म्हटले जाते. कम्बर विभिषनला विडनान म्हणतो. पण मार्गशिर्षी चा मार्गशिर्डी आणि नंतर मधला शिर हा वगळला जातो, मग त्या शब्दाचे अंतिम रूप मार्गडी व्हायला नको का? झ कार ची उपस्थिती कशी स्पष्ट कराल? दुसऱ्या भाषेत शेवटी त्या

महिन्याचे नाव मार्गझी कसे होते ? तमीळनाडू मध्ये प्रबळ असलेल्या झ ने तलवकार शाखेत भर घातली.

ह्या शाखेचे लोक झ वापरतात आणि कृष्ण-यजुर्वेदी ड वापरतात, नाही का ? ही सवय नकळत अजूनही आहे. तेलुगू वैष्णव मंदिरातील पूजेच्या वेळेस तमीळ दिव्यप्रबंधम् गातात. तिरूपतीला भगवंतापुढे तमीळ तिरूप्पावै म्हटले जाते. ते मार्गझी-त-तिंगळ ह्या शब्दांनी सुरू होते. तेलुगूना झी उच्चारणे कठीण आहे. मग, ते मार्गळी किंवा मार्गली म्हणत नाहीत, हे कसे ? ते मार्गडी-त-तिंगळ म्हणतात, झ कार ऐवजी ड कार. जेव्हा ते तमीळनाडू मध्ये प्रचलित असलेल्या सामवेदातील मंत्र म्हणतात तेव्हा नकळत झ कार ऐवजी ड कार वापरतात. ड हा यजुर्वेदीच्या रक्तात आहे म्हणून ते मार्गझी ऐवजी मार्गडी म्हणतात.

-----

## प्रकरण १३

# महिन्यांची नावे

तमीळ मार्गझी ते मार्गशिर्षी पर्यंतच्या आमच्या शोधावरून तुम्हाला कल्पना आली असेल की एका भाषेतील विद्वानाचा दुसऱ्या भाषेतील विद्वानाशी कसा मतभेद असतो. इतर महिन्यांच्या मूळ संस्कृत नावांमध्ये तमीळमध्ये कसा बदल झाला हे तुमच्या लक्षात येईल. पूर्वी पाहिल्याप्रमाणे ज्या महिन्यात पौर्णिमा येते त्यावेळच्या नक्षत्रावरून त्याचे नाव ठरते. चित्रा पौर्णिमा हा शुभ दिवस असतो. तमीळ चित्तरै हा संस्कृत चित्र पासून फारसा बदल दाखवत नाही.

वैशाख हा विशाखा नक्षत्राशी जोडलेला आहे : तो तमीळ मध्ये 'वैकासि' आहे. जसा मदुराई चा मरूडै होतो तसा संस्कृत वैशाखी तमीळमध्ये वैकासि होतो. (बंगालमध्ये त्याला बैसाखी म्हणतात). नम्माझवार विशाखा नक्षत्रावर जन्मले. हल्ली वैशाख पौर्णिमा बुद्ध पौर्णिमा म्हणून साजरी होते.

आनुषी हा महिना अनुष (अनुराधा) नक्षत्राशी संबंधित आहे. ह्या महिन्यात पूर्ण चंद्र ह्या नक्षत्रावर येतो. तमीळमध्ये ह्या महिन्याला आनि म्हटले जाते - मूळ नावातील ष कार सोडून दिला जातो.

दोन आषाढ आहेत - पूर्वाषाढा आणि उत्तराषाढा, पूर्वाषाढाला तमीळमध्ये पूराडम म्हणतात : तमीळ नावात मूळ शब्दातील र्व चा अपभ्रंश होतो आणि श वगळला जातो. त्याचप्रमाणे उत्तराषाढाचा तमीळमध्ये उत्राडम होतो. संस्कृतमधील आषाढ हा तमीळ महिना आडि आहे.

श्रावण हा श्रवण नक्षत्राशी जोडलेला आहे. तमीळ ओणम मध्ये मूळचा श्र वगळला आणि वण चा ओणम झाला. हे महाविष्णूचे पवित्र नक्षत्र असल्याने आदरार्थी तिरू (श्री समान) त्याच्या नावापूर्वी योजला जातो - तसे आपल्याकडे तिरूवोणम. (आद्रा हे शिवाला पवित्र असलेले नक्षत्र. त्याला तमीळमध्ये आडिरै म्हणतात आणि त्याला तिरू जोडून तो तिरूवाडिरै होतो. इतर नक्षत्रांच्या तमीळ नावांच्या अगोदर तिरू जोडण्याचा प्रघात नाही. दक्षिणेत कार्तिगै महिन्यात दिव्यांचा सण येतो - मूळ संस्कृत नाव कृत्तिका. ह्या काळात फक्त कार्तिगे ला तिरू जोडला जातो. पण हरीला आणि हराला पवित्र असलेले - विष्णू आणि शिव - यांना तिरू जोडला जातो. हा ह्या वस्तुस्थितीचा एक पुरावा आहे की तमीळ लोकांची धार्मिक संस्कृती अशी आहे की ते ह्या दोन देवांमध्ये भेद करीत नाहीत. ह्या महिन्यात पौर्णिमा श्रवण नक्षत्रावर येते. तमीळ नाव आवनी, मूळ नावातील श्र वगळला जातो.

तमीळच्या अक्षरे वगळण्याच्या भाषिक अपूर्वाईसाठी सिंहल हे उदाहरण आहे. (आज हे राष्ट्र श्रीलंका म्हणून ज्ञात आहे) स आणि श चा तमीळमध्ये अ होतो. जर कानडीमध्ये सहस्त्र सासिरम, तमीळमध्ये आयीरम होतो.

आयीरमवरून मला इतर संख्येचे स्मरण होते. तमीळ संख्या ओनरू, इरण्डू, मुन्रू (एक,दोन,तीन) यांच संस्कृत मधील एक, द्वि, त्रि यांच्याशी काही संबंध नाही. पण अंचू आणि एट्टू (पाच आणि आठ) यांचा संस्कृत मधील पंच आणि अष्ट यांच्याशी संबंध दिसतो. इंग्रजी दोन / टू आणि तीन / थ्री ह्यांचा संस्कृत मधील द्वि आणि त्रि यांचा संबंध आहे. सेक्स्टा हेप्टा ऑक्टो नोन डेका - ह्यांचा स्पष्टपणे षष्ट, सप्त, अष्ट, नव दश यांच्याशी संबंध आहे. पण पहिलाच अंक वन one ह्याचा संस्कृत एक शी संबंध दिसत नाही. पण त्याचा तमीळमधील आन्रूशी संबंध दिसतो. तेलुगू समानार्थी तमीळ ओन्रूतील ओ चा बनतो आणि त्यातील क संस्कृतमधून येतो - ओकटी. जर आपण ह्या सर्वाचा विचार केला तर, जसे आपण वंश दृष्ट्या एक आहोत त्याचप्रमाणे भाषांबाबतही एक आहोत. संस्कृत आणि द्रविडी भाषा यांचे एकच समाईक मूळ असले पाहिजे.

सिंहलीत सिंह मधील स आणि ह वगळला आणि तो शब्द ईळम झाला आणि ळ चा झ होऊन तो इझम झाला.

आषाढ प्रमाणेच प्रोष्ठपदाला / भाद्रपदाला पूर्वा आणि उत्तरा आहेत. प्रोष्ठपदाचा तमीळमध्ये पूरट्टाडी : अष्टचा अट्ट होतो. उत्तरा-प्रोष्ठपदा हा तमीळमध्ये उत्रट्टडी आहे. पौर्णिमा ह्या नक्षत्रात येते किंवा तमीळ महिन्याच्या पुरट्टाशीत येते. तो प्रोष्ठपदावरून आला आहे.

आपण आश्वयुजला अश्विनी किंवा अस्वती म्हणतो. आश्वयुज नक्षत्रात पौर्णिमा येते म्हणून त्याचे नाव आश्वयुजी आणि तमीळमध्ये ऐप्पशी.

संस्कृत कार्तिक (कृत्तिकाचे विशेषण) चा तमीळ समानार्थी कार्त्तिगै यात फारसा बदल झाला नाही. तिरूक्कार्त्तिगै हा दिव्यांचा सण पौर्णिमेला येतो. मी मार्गशीर्षी चा मार्गझै कसा होतो यापासून सुरुवात केली. त्या महिन्याची पौर्णिमा तिरूवादिरै, शिवाचा पवित्र दिवस म्हणून साजरा होतो.

पुष्य हा तमीळ मध्ये पूशम् आहे. (तमीळनाडू मध्ये आम्हाला पूशमची सवय झाली आहे की आम्ही पुनर्वसूचे पुनर्पुशम् केले. अर्थात पुनर्पुष्य सारखे संस्कृत समानार्थी नाही.) पौष्य म्हणजे पुष्य शी निगडीत आहे ते. पुष्य हे तैष्य म्हणूनही ओळखले जाते. त्या महिन्याचे तमीळ नाव तैष्य मधील मधले अक्षर वगळून झाले.

मघा नक्षत्रावरून माघ महिना आला - तमीळमध्ये माशी. शेवटी येणारा शी हा, वैकाशी, पुर्ट्टशी आणि ऐप्पशी यांची आठवण करून देतो.

पूर्व-फाल्गुन  आणि उत्तर-फाल्गुन अशी दोन नक्षत्रे आहेत. ह्या संस्कृतातील नावांमधील फाल्गुन शब्द वगळला. म्हणून पूर्व-फाल्गुन चा तमीळमध्ये केवळ पुरम् झाला आणि उत्तर-फाल्गुन चा केवळ उत्रम झाला. उत्तर-फाल्गुन नक्षत्रात ज्या महिन्यात पौर्णिमा येते तो तमीळींसाठी पंगुनी होय. हा दक्षिणेतील अनेक भागात सणाचा दिवस असतो. आम्ही तो पंगुनी-उत्रम्-तिरू-क-कल्याणम् नावाने साजरा करतो.

महिन्यांच्या तमीळ नावांच्या अभ्यासावरून संस्कृत वर्णाचे तमीळमध्ये कसे बदल होतात, ह्याची आपल्याला कल्पना आली.

-----

# प्रकरण १४

## शिक्षा शास्त्राचे इतर उल्लेखनीय पैलू

सामान्य नियम असा आहे की वेदांच्या ध्वनींमध्ये काहीही फरक केला जाऊ शकत नाही, स्वरांना काहीही पर्याय नको. पण शाखांमधील भेदावर आधारलेल्या किंचित बदलांना अनुमती देणारे नियम आहेत. ते नियम शिक्षा शास्त्राप्रमाणे आहेत. स्वरांतील किंचित बदलांना अनुमती आहे. ऋग्वेदाच्या काही स्तोत्रांमध्ये अ कार आणि ए कार इतर वेदांपेक्षा लांबविलेला आहे. काही शाखांमध्ये म् आणि ञ आहेत - त्यांना अनुस्वार म्हणतात. (अनुस्वार हा प्रत्यक्षतः 'पश्चात ध्वनि' आहे. एका विद्वानाच्या मतानुसार तो स्वरानंतर येणारा शुद्ध अनुनासिक आहे.) हा भेद अक्षरे किंवा शब्दावयव जे स्वर आणि आघात ठरवितात त्यांच्यावर तितकासा अवलंबून नसतो.

वैदिक परंपरेत ध्वनीला फार महत्त्व आहे म्हणून त्याला आवश्यक ते महत्त्व दिले गेले पाहिजे. अशा प्रकारे शिक्षा शास्त्र हे वेदपुरुषाचे श्वसनेंद्रिय आहे.

संस्कृत मधील ५० अक्षरे ही वैदिक ध्वनींवरून आली आहेत. जर तुम्ही त्यात ज्ञ ची भर घातली तर ५१ अक्षरे होतील. ह्या अक्षरांना मातृका म्हणतात. शब्दाला एकापेक्षा अधिक अर्थ असतात. महत्त्वाचे म्हणजे मातृ किंवा माता म्हणजे अंबा, विश्व माता. ही ५१ अक्षरे तिचे रूप बनवितात - अंबा, पराशक्ती त्यांना मूर्तरूप देते. ह्या परमोच्च देवतेची निर्मिती विश्व आणि ही निर्मिती ध्वनीमुळे पूर्ण झाली तर अंबा ही त्या ५१ अक्षरांचे मूर्त रूप होय. शाक्त तंत्र म्हणतात की ५१ अक्षरे ही अंबेची गात्रे आहेत आणि तिच्या पवित्र शरीराच्या भिन्न भागांशी संबंधित आहेत. ५१ शक्ती पीठे ही ह्या अक्षरांपैकी एक दुसऱ्याशी संलग्न असतात.

शिक्षा शास्त्र हे जर वेदवुरुषाचे श्वसनेंद्रिय मानले तर आपण हेही लक्षात घ्यायला हवे की अंबेला मूर्तस्वरुप देणाऱ्या ५१ अक्षरांना ते प्रकाशित करते, ही वस्तुस्थिती गौरवास्पद आहे.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

भाग - ७

प्रकरण १

# वेदपुरुषाचे मुख

व्याकरण हे वेदपुरुषाचे मुख आहे. व्याकरणासाठी तमीळ शब्द इलक्कणाम आहे. भाषेच्या लक्षणांशी व्याकरणाचा संबंध असतो. म्हणजे तमीळमध्ये इलुक्कुमाणन्. त्याचप्रमाणे त्या भाषेत लक्षणांचा इलक्काणाम् होतो.

संस्कृत व्याकरणावर अनेक साहित्यकृती आहेत. सर्वात जास्त वापरली जाणारी आणि महत्त्वाची असलेली कृती महान ऋषी पाणिनींची होय. त्यांच्या व्याकरणसूत्रावर टीपा वार्तिक वररुचीने लिहिलेली आहे. (ही अष्टाध्यायी ह्या नावाने देखील ओळखली जाते.) पतंजलीने ते पाणिनीच्या सूत्रावर भाष्य लिहिले आहे. ह्या संस्कृत व्याकरणावरील प्रमुख साहित्यकृती आहेत. व्याकरण आणि इतर शास्त्रांमध्ये एक फरक आहे. इतर विषयांच्या बाबतीत त्यांच्यावरील मूळ सूत्रांना त्यांच्या भाष्यापेक्षा अधिक मूल्य असते. व्याकरणाच्या बाबतीत सूत्रांपेक्षा वार्तिकाला अधिक आणि भाष्यांपेक्षाही अधिक महत्व असते.

एका गणनेनुसार सहा शास्त्रे आहेत. त्यापैकी व्याकरण एक आहे. चार शास्त्रे विशेषतः महत्त्वाची आहेत : व्याकरण सोडून तर्क, मीमांसा आणि वेदान्त. व्याकरणही वेदांच्या षडंगापैकी (वेदांची सहा अंगे) एक आहे.

"सूचनात सूत्रम्" असे म्हटले जाते. (सूत्र हे एक कशाचे तरी सत्याचे किंवा तत्त्वाचे सूचक/लक्षण असते.) प्रत्येक शास्त्राला एक भाष्य असते आणि असे भाष्य विशेष नावाने ओळखले जाते. फक्त व्याकरण भाष्याला (पतंजलीचे) महाभाष्य, महान भाष्य म्हटले जाते.

-----

## प्रकरण २

# व्याकरण आणि शिव

शिवमंदिरांना एक 'व्याकरणदान' म्हटला जाणारा मंडप असतो. तमीळ मध्ये त्याला वक्कानिक्कुम मंडपम् म्हटले जाते. तमीळनाडूमध्ये चोल प्रदेशात अनेक मंदिरांमध्ये असे मंडप आहेत. असा एक मंडप मद्रासजवळ तिरूवोर्रियूर मध्ये आहे. शिव मंदिरामध्ये व्याकरण मंडप कशाला हवा ? भाषेचा शिवाशी काय संबंध ? दक्षिणामूर्ती रूपातील शिव निःस्तब्ध नाही का ?

नृत्तावसाने नटराज-राजो ननाद ढक्कां नवपञ्चवारं
उद्धर्तुकामः सनकादिसिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्रजालम् ॥

मी थोडक्यात ह्या कडव्याबाबत बोलणार आहे. निःशब्द निश्चल राहतो (शिव दक्षिणामूर्ती रूपात) पण तोच शिव (त्याच्या दुसऱ्या रूपात) सदैव नृत्य करीत राहतो आणि त्याच्या नृत्यातून भाषेचे शास्त्र निर्माण झाले.

नृत्य करणाऱ्या परमेश्वराचे नटराज हे नाव आहे. नट हा विट आणि गायक असलेल्या समूहाचा एक सभासद असतो. ('नट' हा नर्तक आणि अभिनेता आहे तर 'विट' हा संगीत व साहित्याचा जाणकार असून तो राजदरबारातील विदूषक आहे. 'गायक' हा संगीतकार आहे.) नट नृत्य करतो. नटराज म्हणजे सर्व नर्तकांचा राजा असतो - नर्तकांत त्याच्याहून वरचढ कोणी नाही - आणि त्याला महानटही म्हटले जाते. संस्कृत शब्दकोशात अमरकोशात (अमरकोश म्हणजे वर्णानुक्रमाने तयार केलेला शब्दकोश समजू नये.) हे दोन शब्द आहेत : ''महाकालो महानटः'' तमीळमध्ये ''अंबल-क-कुट्टाडूवान्''. राजाज्ञांवरून आपल्याला असे समजते की पूर्वी ब्राह्मणांसुद्धा अशी तमीळ नावे होती - उदाहरणार्थ ''अंबल-क-कुट्टाडूवान् भट्टन्''

मुंबईमध्ये निर्णय-सागर नावाची एक प्रकाशन संस्था होती. तिने 'काव्यमाला मालिका' नावाने जुने संस्कृत काव्य प्रकाशित केले. 'प्राचीन लेखमाला' ह्या नावाच्या मालिकेत काही पुस्तके होती. त्यांपैकी एकात वेंगी राज्यातील राजाज्ञा असलेल्या ताम्रपटावरील मजकूर पुनर्मुद्रित केला आहे. वेंगी हे गोदावरी आणि कृष्णा यांच्या मध्ये वसलेले आहे.

तेलुगु प्रदेशातील चोल राजे आणि तंजावूर मधील चोल हे विवाहाने संबंधित होते. राजराज चोल (नरेंद्र) याने तंजावूरवर राज्य केले. त्यानेच बृहदीश्वराचे मंदिर बांधले. (मंदिराचे बांधकाम इ. स. १००९ मध्ये पूर्ण झाले.) वेंगीच्या राजाच्या नातवाच्या कुटुंबातील कलोट्टुंग चोल याने तंजावूरच्या चोल राजवंशाचा एक सभासद म्हणून राज्य केले. एकदा त्याने चोल

राज्याला भेट दिली आणि परत जाताना वेंगी येथे वैदिक अध्ययनाला प्रोत्साहन देण्यासाठी आपल्याबरोबर ५०० ब्राह्मण नेले. आंध्र प्रदेशातील द्रविडलु हे त्या ब्राह्मणांचे वंशज होत.

त्या सर्व ब्राह्मणांची नावे, त्यांची गोत्रे, ते ज्या विषयात प्रवीण आहेत ते विषय, त्यांची कर्तव्ये ह्या सर्वांचा उल्लेख ताम्रपटावर आहे. त्यांना दिलेल्या जमिनीचा, तसेच दाते आणि प्राप्तकर्ते यांच्या नावांचा उल्लेख आहे. तमीळनाडूमधून आणलेल्या ब्राह्मणांना वेद आणि शास्त्रे शिकवावी लागत. म्हणून त्यांना भूमिदाने दिलेली होती.

''रूपावतार-वक्तुः एको भाग'' : हे शब्द त्या शिलालेखातील आहेत. त्याचा अर्थ असा - ''जो ब्राह्मण रूपावतार मध्ये प्रवीण आहे त्याला एक भाग''. रूपावतार हा व्याकरणावरील ग्रंथ आहे.

तिंडीवनम् (तमीळनाडू मध्ये) एण्णायिरम् येथे एक ३४० विद्यार्थ्यांची शाळा आहे. त्यापैकी ४० जणानी रूपावतारचा अभ्यास केला. असे राजेंद्र चोल १ चा शिलालेख म्हणतो. त्रिभुवन, पाँडेचरी येथेही राजाधिराज (इ.स. १०१८-१०५०) यांचा आश्रय असलेली एक शाळा आहे. तेथे रूपावतार शिकविले जाई. आपल्याला, वीर-राजेंद्र देव यांच्या (इ.स. १०६७) लेखावरून कळते की हे व्याकरणावरील साहित्य कांची जवळील तिरूमुक्कूडल येथील एका शाळेत शिकविले जाते.

'सिद्धान्त कौमुदी' हा व्याकरणावरील एक प्रसिद्ध ग्रंथ आहे. तो ग्रंथ म्हणजे भट्टोजी दीक्षित यांचे पाणिनिच्या सूत्रांवरचे भाष्य आहे. ते अप्पय्या दीक्षितांचे एक शिष्य होते. ते अडयप्पलम् येथे जन्मले आणि ते १०४ साहित्यकृतींचे लेखक होते, त्यांच्या अनेक कृती शैव विषयांवरच्या आहेत. त्यांचा कुवलयानंद हा काव्यावरचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

अर्ध-मात्रा-लाघवेना पुत्रोत्सवम् मान्यते वैयाकारणाः

हा श्लोक व्याकरणकारांनी अनुभवलेला आनंद सांगतो : त्यांना अर्ध्या मात्रेचा लाभ झाला तरी तो एखाद्या दीर्घ काळ निपुत्रिक असलेल्या माणसाला मुलगा झाल्यावर होणाऱ्या आनंदा इतक्या आनंदोत्सवाचे कारण असतो.

सूत्रे संक्षिप्त आणि काटेकोर असतात. 'सिद्धान्त कौमुदी' सुद्धा 'अल्पाक्षरत्व आणि नेमकेपणाबद्दल प्रसिद्ध आहे, त्यात पाल्हाळ नाही, मुख्य विषय टाळून इतर विषयावर बोलणे नाही. सूत्रे पाल्हाळिक असू शकतील पण भट्टोजी दीक्षितांचे त्यावरील भाष्य तसे नाही. सुमारे ४०० वर्षांपूर्वी लिहिले गेलेले ते भाष्य अजूनही लोकप्रिय आहे आणि व्याकरणाचे ते पहिलेच पुस्तक विद्यार्थ्यासाठी नेमलेले आहे. (भट्टोजी दीक्षित यांनी 'तत्त्वकौस्तुभ' लिहिले आणि आपले गुरू अप्पय्या दीक्षित यांना अर्पण केले. त्यात त्यांनी ब्रह्माशिवाय अन्य काही सत्य नाही, उपनिषदाची शिकवण आहे म्हणून नव्हे, हे मत सिद्ध केले. गुरूच्या आज्ञेनुसार त्यांनी

मध्वाचार्यांच्या द्वैत तत्त्वज्ञानावर हल्ला करणारे लेखन केले. विध्वंसनम् ही कृती तत्त्वज्ञानी लोकांमधील वादास कारण ठरले पण भट्टोजी दीक्षितांचे व्याकरणावरील भाष्य सर्व प्रणालींना मान्य झाले.)

'सिद्धान्त' कौमुदी पूर्वी 'रूपावतारम्' हा व्याकरण ग्रंथ विद्यार्थ्यांमध्ये प्रसिद्ध होता. रूपम् म्हणजे ध्वनीचे पूर्ण रूप ; अवतारम् म्हणजे अवतरण. पण ह्या संदर्भात 'इतिहास' हा ग्रंथ मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजचे प्राचार्य रंगाचारी यांनी प्रसिद्ध केला.

जे विद्वान रूपावतारम शिकवीत त्यांना भूमिदान केले गेले (वेंगी लेखावरून), ही गोष्ट, त्याकाळी संस्कृत व्याकरणाला असलेले महत्त्व दाखवून देते.

वेंगी लेख ८५० वर्षे मागे जातो. पूर्वी उल्लेखल्याप्रमाणे ज्या ब्राह्मणांना देणग्या मिळाल्या त्यांची नावे त्यात दिलेली आहेत. त्यापैकी अनेक जणांना षडांगविद ही पदवी असे. (सहा वैदिक अंगे शिकलेले). काहींना तमीळ नावे असत - अंबल-क-कूट्टाडुवान भट्टन, श्रीरंगम् मंदिराशी संलग्न आहे. दोन्ही ब्राह्मण स्मार्त होते. एकाचे वैष्णव नाव होते. शिवा इतकेच विष्णूबद्दल सदैव आदरभाव असे. ज्या माणसाला तिरूवरंगमुडयान भट्टन् म्हटले जाई ते नाव वैष्णव म्हणून घेतले जात नसे. त्याला संस्कृत समानार्थी नाव रंगास्वामीन् होय. उडयान म्हणजे स्वामीन्, स्वम् मालकी दर्शवितो.

नटराजाचे तमीळ नाव तिरूवंबल कूट्टाडुवान. मला नटराजाविषयी आणि त्याचा व्याकरणाशी संबंध यावर बोलायचे होते. पहिला शब्द नृत्तावसाने असलेल्या श्लोकाकडे परत जाऊ या. नटराज भयकारी नृत्य करतो. आपल्याला जीवनभर तालावर नाचावे लागते ते सर्व नृत्य ह्यात आले आहे. नटराजाच्या मूर्तीच्या मस्तकावर काहीतरी पसरलेले दिसते, काहीतरी दोन्ही बाजूला पडलेले दिसते. ते काय असते ? त्या देवाच्या जटा असतात. मला हल्ली वेगाने घेतले जाणारे फोटो आठवले. तो वेगाने घेतला जातो, तो वस्तूचा गतिमान क्षण टिपतो. त्या जटा गतिमान स्थितीच्या द्योतक आहेत. नटराज वेगाने नृत्य करतो, पण क्षणभर थांबल्यासारखा वाटतो. त्याच्या जटा त्याच्या चेहऱ्याच्या दोन्ही बाजूंनी गोल पसरल्यासारख्या वाटतात. त्याकाळातील शिल्पकाराने नटराजाची मूर्ती तयार करण्यासाठी मनाने फोटो घेतल्यासारखा तो क्षण पकडला असावा.

नटराजाच्या एका हातात ढक्का किंवा डमरू नावाचा ढोल आहे. ह्या वाद्याचा ताल नृत्य करणाऱ्या देवाच्या पदन्यासाला, त्याच्या पायाच्या हालचालीला अनुसरून असतो. त्याच्या ढोलाच्या ठोक्याचा ''ननाद ढक्काम्'' ह्या शब्दांत संदर्भ दिलेला आहे.

प्रामुख्याने तीन प्रकारची वाद्ये असतात. ढक्का, तवील (नागस्वरम् साथ देणारा ढोल) कातडीची बनविलेली, कंजिर (एक प्रकारचा हातातील ढोल), मृदंग ; वीणा, व्हायोलिन

सारखी तंतुवाद्ये ; नागस्वरम्, फ्ल्यूट / बासरी सारखी वायुरंध्र वाद्ये. ढोलाच्या शेवटच्या ठोक्याला चप्पू म्हटले जाते. (कर्नाटक संगीतात चप्पू म्हणजे मृदंगाच्या वरच्या उजव्या बाजूवर तळहाताने वाजविणे. तो मृदंगाचा शेवटचा ठोका असतो.) तसेच नटराजाच्या नृत्याच्या शेवटी (नृत्तावसाने) डमरू चप्पू ध्वनी निर्माण करतो.

जेव्हा नटराज नृत्य करतो तेव्हा सनक आणि त्याचे भाऊ, पतञ्जली, व्याघ्रपाद आणि इतर त्याच्याभोवती उभे राहतात. ते महान ऋषी आहेत, म्हणून ते ते नृत्य पाहू शकतात. ज्यांना ज्ञानाची अतर्दृष्टी आहे तेच नटराजाचे नृत्य पाहू शकतात. भगवानाने स्वतःच अर्जुनाला दिव्य चक्षू दिले ज्यामुळे तो त्यांचे विश्वरूप पाहू शकला. व्यासाने तीच शक्ती संजयाला दिली, म्हणून तो धृतराष्ट्राला हे अद्भुत रूप वर्णन करून सांगू शकला. केवळ ते (अर्जुन आणि संजय) कृष्णाचे वैश्विक रूप पाहू शकले. (न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा, दिव्यं ददामि ते चक्षुः, पश्य मे योगमैश्वरम् - भ.गीता ११-८) कुरुक्षेत्रावरील इतर ते पाहू शकले नाहीत. महान प्रयत्न केल्यामुळे देव, ऋषी आणि योगी यांनी नटराजाचे नृत्य पाहण्याची दिव्य दृष्टी प्राप्त केली. गीतेमध्ये अशा दृष्टीला दिव्य चक्षू म्हटले आहे.

सनक आणि इतरांनी (सनक आणि इतर : ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र. सनक सोडून सनन्द् सनातन आणि सनत्कुमार हे होत) त्यांनी साध्या डोळ्यांनी ते नृत्य पाहिले. विष्णूने मड्डला नावाचा ढोल वाजविला. ब्रह्माने वेळ सांभाळली. नृत्याच्या शेवटी समारोपाच्या ठोक्यांनी (चप्पू) १४ ध्वनी निर्माण केले. हे चौदा ध्वनी 'नवपंचवार' शब्दाने कडव्यात उल्लेखलेले आहेत. (नृत्तावसाने ...) ; नव म्हणजे नऊ आणि पंच म्हणजे पाच, एकूण चौदा. ''ननाद ढक्कां नवपंचवारम्''. नटराजाच्या ढक्काने निर्माण केलेले ध्वनी चौदा, तसे वेदाध्ययनाच्या शाखांची संख्या चौदाच (चतुर्दश-विद्या) ह्या चौदा विद्यांच्या पायावर हिंदू धर्म उभारलेला आहे, नटराजाच्या चप्पूने चौदा ध्वनी निर्माण केले, ते ह्या श्लोकाप्रमाणे सनक आणि इतरांच्या उन्नतीसाठी (आत्मिक) होते. मंदिरांमध्ये दक्षिणामूर्तीच्या शिल्पाशेजारी चार वृद्धांच्या आकृती पाहिल्या असतील. ते सनक ऋषी आहेत. त्या चारांना कसा उपदेश केला त्याचा उल्लेख तेवारम आणि तिरूवाचकम् सारख्या शैव साहित्यात आहे, एवढेच नाही तर आझवारांच्या वैष्णव गीतांमध्येही आहे.

शिवाचे सत्य जाणणे आणि त्याचे वैभव आपल्याच आत अनुभवणे याची ही नटराजाच्या ढोलाकडून निर्माण केलेले चौदा ध्वनी माध्यमे आहेत. नंदीकेशवाने त्याच्या शिवभक्तिसूत्रात ह्या चौदा ध्वनींवर भाष्य केले आहे.

नटराजाच्या नृत्याच्या वेळेस उपस्थितांमध्ये पाणिनि होता. गुणाढ्याने 'पैशाची' नावाच्या प्राकृत भाषेत लिहिलेल्या बृहत्कथा ह्या ग्रंथात त्याची (पाणिनि) कथा येते. क्षेमेंद्रने त्याचा सारांश संस्कृतमध्ये केला आणि त्यावर आधारलेला 'कथा-सरित्-सागर' हा ग्रंथ

सोमदेवाने लिहिला. हा ग्रंथ, अरेबिअन नाईटस्, पंचतत्र, आणि इसापच्या कथा यातील काही कथांचे उगमस्थान आहे. पेरूंकथै हे बृहत्कथा चे तमीळ शीर्षक तमीळ आवृत्तीचे आहे.

पाणिनिची कथा 'कथा-सरित्-सागर' मध्ये सांगितलेली आहे. मगध राज्यातील पाटलीपुत्र (हल्लीचे पाटणा) येथे वर्षोपाध्याय आणि उपवर्षोपाध्याय नावाची दोन माणसे होती- दुसरा धाकटा होता. उपाकोसला नावाची उपवर्षोपाध्यायाची मुलगी होती. पाणिनि आणि वररूची हे वर्षोपाध्यायाचे विद्यार्थी होते. पाणिनिने अध्ययनात फारच थोडी प्रगती केली. म्हणून त्याच्या गुरूने त्याला हिमालयात जाऊन तपश्चर्या करायला सांगितले. विद्यार्थ्याने तसे केले आणि ईश्वराच्या कृपेने त्याला नटराजाचे तांडव नृत्य पाहण्याची शक्ती लाभली. देवाच्या दिव्य देणगीमुळे पाणिनिने खरोखरच ते तांडव पाहिले आणि त्याला समारोपाच्या वेळेस ते चौदा ध्वनी ऐकू आले. त्याला ते ध्वनी म्हणजे व्याकरणाची प्रमुख चौदा सूत्रे होती आणि त्यावर त्याने त्याची 'अष्टाध्यायी' रचली. संस्कृत व्याकरणाचा स्रोत असलेल्या ह्या ग्रंथाचे नावच सूचविते की त्यात आठ प्रकरणे आहेत.

उपाकर्म कार्यक्रमाच्या वेळेस हे चौदा ध्वनी म्हटले जातात. ते महेश्वराच्या (नटराजाच्या) डमरूमधून उद्भवल्यामुळे त्यांना 'महेश्वर सूत्रे' म्हटले जाते. संगीत वाद्ये वाजवून मानव फक्त अस्पष्ट ध्वनी काढू शकतो. परमेश्वराचा हात हा मूर्तिमंत नादब्रह्म आणि शब्दब्रह्म असतो म्हणून समारोपाच्या वेळेस त्याचा चप्पू चौदा अक्षरांची मालिका (हार) सारखा वाटतो.

अइउण् । ऋलृक् एओङ । ऐओच् । हयवरट् । लण् । ञमङणनम् । झभञ् । घढधष् । जबगडदश् ।

खफछठथ - चटतव् । कपय् । शषसर् । हल् । इति माहेश्वराणि सूत्राणि ।

उपक्रमाच्या वेळेस तुम्ही जेव्हा ही सूत्रे ऐकता तेव्हा तुमची करमणूक होते. ते सर्व कशाबाबत आहेत हे न समजता तुम्ही ते पुरोहिताच्या मागे म्हणत असता. जेव्हा शिवाने नृत्य थांबविले, गोल गोल फिरणे थांबविले तेव्हा शेवटचे ठोके त्याने त्याच्या डमरूवर वाजविले.

पैंजणाचा जल जल असा ध्वनी, डमरूचा टिमु टिमु असा ध्वनी, तवीलचा ढुम ढुम असा वाजतो असे आपण म्हणतो, नाही का ? अर्थातच ते त्या वाद्यांनी काढलेले प्रत्यक्ष ध्वनी नव्हेत. तथापि ते शब्द आपल्याला त्या ठोक्यांची थोडीशी कल्पना देतात. आपण ढोलाचा ध्वनी वर्णन करण्यासाठी पि पि म्हणत नाही किंवा बासरीचा ध्वनी वर्णन करण्यासाठी ढुम ढुम म्हणत नाही. वीणेसारख्या वाद्याच्या तारा छेडून निर्माण होणाऱ्या ध्वनीचे वर्णन टोयंग टोयंग असे होते. ह्यावरून असे समजते की जरी संगीत वाद्ये स्पष्ट ध्वनी निर्माण करीत नसले तरी ते मानवाच्या वाणीतील स्वरांसारखा परिणाम निर्माण करतात. मग नटराजाकडून त्याच्या पंचकृत्य नृत्याच्या वेळेस वाजविलेले ढोल स्पष्ट ध्वनी का निर्माण करू शकणार नाहीत. ?

(नटराजाच्या नृत्यास 'पंचकृत्य' परमानन्द ताण्डव' असे म्हणतात.) या नृत्यातून नटराज तो आपल्या डमरूच्या ध्वनीतून 'सृजना' चे कार्य करतो, आपल्या 'अभय हस्ताने' (भिऊ नका अशी मुद्रा) विश्वाचे 'रक्षण' करतो आणि एका हातात धारण केलेल्या अग्नीने 'विध्वंस' चे कार्य करतो. मूसलकावर ठेवलेल्या पायाने तो तिरोधान किंवा तिरोभावाचे म्हणजेच गौण्य किंवा मायेचे कार्य पूर्ण करतो व आपल्या पवित्र डाव्या चरणाकडे अंगुलिनिर्देश करून भक्तांवरील अनुग्रह किंवा कृपादान करण्याचे काम करतो.)

पाणिनिने चौदा ध्वनींचा कसा उपयोग करून घेतला ? शब्द किंवा शब्दावयव उच्चारण्यासाठी त्याने सूत्रांवरून एक सूची बनविलली. (परम सद्गुरू स्वतः 'संज्ञा' ह्या शब्दाचा येथे उपयोग करतात.) त्याने केलेल्या व्यवस्थेनुसार, पहिले आणि शेवटचे अक्षर किंवा शब्दावयव हे मधले अक्षर आणि शब्दावयव दर्शवतील. उदा. हयवरट चा पहिला शब्दावयव ह, आणि हल चे शेवटचे अक्षर ल एकूण हल होतो. त्यात मधली व्यंजने येतात. तसेच पहिल्या सूत्राचे पहिले अक्षर 'अ' आणि चौथ्या सूत्राचे शेवटचे अक्षर 'क' मिळून अक-ह्यात सर्व स्वर येतात. पहिल्या सूत्राचे पहिले अक्षर 'अ' आणि चौदाव्या सूत्राचे शेवटचे अक्षर 'ल' मिळून अल-ह्यात सर्व अक्षरांचा समावेश होतो.

''हलांतस्य'' हे एक 'अष्टाध्यायी' मधील एक सूत्र आहे. 'अल' याचा अर्थ लेखन होतो.

'अ' कार हे सर्व भाषांमधील पहिले अक्षर आहे. उर्दूत अलिफ, ग्रीकमध्ये अल्फा. दोन्ही अल् पासून आले आहेत. म्हणून इंग्रजीतही अल्फाबेट आहेत. एकेकाळी वैदिक धर्म विश्वभर प्रचलित होता ह्याचा पुरावा म्हणजे ही वस्तुस्थिती होय.

अशा प्रकारे आपल्याला समजते की नटराजाच्या डमरूमधून उद्भवलेल्या महेश्वर-सूत्रांवरून व्याकरणाचा मुख्य स्रोत बनला आहे. परमेश्वर हा शब्दशास्त्राचे कारण असल्याने (ध्वनी आणि वाणी संबंधीची सर्व शास्त्रे) शिवाच्या मंदिरांमध्ये व्याकरण मंडप बांधले गेले ; विष्णूच्या तीर्थक्षेत्री नाही.

नटराजाच्या शेजारी पतंजली आणि व्याघ्रपाद आहेत. मी एकदा शिर्काझी (तमीळनाडू मधील) येथील एका मंदिरात गेलो होतो. तेथे नटराजाच्या शेजारी पतंजली आणि व्याघ्रपाद होते. त्यांच्या मूर्तींच्या खाली त्यांची नावे कोरली होती. पतंजलीचे नाव 'पदंचोल्ली' असे दिसत होते - ज्याने ती नावे कोरली त्याच्या अज्ञानामुळे होतो. पण मी आनंदात होतो, श्लेषाने का होईना ते नाव चपखल होते आणि काहीतरी योग्य असण्याचे अज्ञान हे कारण होते. 'पद' ह्याला व्याकरणात अर्थ आहे. ''पदवाक्य प्रमाण''. येथे पद म्हणजे व्याकरण. म्हणून पदंचोल्ली (ह्यातील दुसऱ्या अर्ध्याचा अर्थ तमीळ) म्हणजे जो व्याकरण म्हणतो.

मी जेव्हा हे कोरीव काम पाहिले तेव्हा मला दुसऱ्या एका गोष्टीची आठवण झाली. आपण गुणाक्षर न्यायाविषयी बोलतो. येथे गुण म्हणजे एक वाळवीसारखा लाकूड आणि

माडाची पाने खाणारा कीटक. त्याच्या ह्या खाण्याच्या क्रियेत काहीवेळेस योगायोगाने अक्षरे तयार होतात. जर काही तरी नकळत किंवा सहजपणे अर्थपूर्ण घडत गेले तर ते गुणाक्षर-न्याय प्रमाणे असे म्हटले जाते. हा शब्द पतंजलीला 'पदंचोल्ली' असे लिहिल्याने लागू पडतो.

काही वर्षांपूर्वी 'साहित्य-रत्नाकर' हा ग्रंथ पाहण्यात आला. ह्या काव्य साहित्याचा लेखक यज्ञनारायण दीक्षित होता. ज्याने हा ग्रंथ ४०० वर्षांपूर्वी तंजावरच्या रघुनाथ नायक ह्याच्या राजवटीत रचला. दीक्षित हा शिवाचा परम भक्त होता आणि त्याच्या एका स्तोत्रात व्याकरणाचा उल्लेख आहे :

आदौ पाणि-निनादतोऽक्षर-समाम्नयोपदेशेनयः
शब्दानामनुशासनान्यकलयतशस्त्रेण सूत्रात्मना
भाष्यं तस्य च पादहंसकरवैः प्रौढाशायम तं गुरुम्
शब्दार्थप्रतिपत्ती - हेतुमनिशां चंद्रावतंसम् भजे

..... साहित्य-रत्नाकर, ११.१२४

ह्या कडव्यातील अक्षर-समाम्नयम् म्हणजे व्याकरण, शब्द एकत्र करणे. ईश्वराच्या श्वसनाने वेदरचना होते. त्याच्या हाताने निर्माण झालेला वारा (ढोल वाजवत असतानाचा) म्हणजे अक्षर-वेद, महेश्वर-सूत्रे. ह्याला शब्दानुशासन म्हटले जाते. पाणि-निनादतः म्हणजे तुझ्या हाताने निर्माण केलेले ध्वनी किंवा त्याद्वारे पाणिनिकडे आलेले ध्वनी. असे शब्दांना दोन अर्थ आहेत. कल्पना अशी आहे की ईश्वराने स्वतःच्या हाताने निर्माण केलेल्या ध्वनीने पाणिनिने त्याचे व्याकरण तयार केले.

कडवे असे म्हणते : तुझ्या हाताच्या हालचालीने व्याकरणातील सूत्रे तयार केली गेली आणि तुझ्या पायांच्या हालचालीने (नृत्यात पायाच्या हालचालीला 'पदन्यास' असे म्हणतात.) त्यावरचे भाष्य निर्माण केले गेले. महाभाष्याचा लेखक पतंजली हा प्राक्कालातील नाग, आदिशेषाचे मूर्तिमंत रूप होता. आदिशेष हा आता परमेश्वराच्या पायातील पैंजण होता. हे लक्षात ठेवून कवी म्हणतो की शिवाने त्याच्या पायाच्या हालचालीने भाष्य निर्माण केले. ध्वनी आणि अर्थ यांचा उगम शिवात आहे असे म्हणत तो समारोप करतो.

अशा प्रकारे, शिव हा व्याकरणाचा मुख्य स्रोत आहे. म्हणूनच जेथे व्याकरण शिकविले जाते असे मंडप त्याच्या मंदिरांमध्ये मंडप असतात.

-----

## प्रकरण ३

# व्याकरणावरील साहित्य

ह्या कडव्यात (मागील प्रकरणात) आपण पाहिले की कवी शिवाला चंद्रावतंस म्हणतो. त्याचा अर्थ असा की ज्याचे शिरोभूषण चंद्र आहे असा देव. चंद्रशेखर आणि इंदूशेखर यांचा अर्थ तोच आहे. इंदुशेखर हा शब्द ठळकपणे दोन व्याकरण ग्रंथांच्या शीर्षकांमध्ये येतो. एक आहे शब्देंदूशेखरम् आणि दुसरा परिपोषेंदूशेखरम्. ज्या विद्यार्थ्याने शब्देंदूशेखरम् पर्यंत अभ्यास केला तो त्याविषयातील निष्णात समजला जातो.

शिक्षेवरचे जर सुमारे तीस ग्रंथ आहेत तर व्याकरणावरच्या ग्रंथांची संख्याही कितीही असू शकते. त्यातील सर्वात पहिले पाणिनिची सूत्रे, त्यावरचे पतंजलीचे भाष्य आणि वररूचीची वार्तिका (अगोदर उल्लेखलेले) हे आहेत. मी हे विधान एका विश्वासावर करतो की वररूची आणि कात्यायन ही एकच व्यक्ती आहे. काहींना वाटते की तसे नसावे. वररूची हा विक्रमादित्याच्या दरबारातील नऊ रत्नांपैकी एक होता.

भर्तृहरीचे 'वाक्यपादियम्' हाही महत्त्वाचा व्याकरण ग्रंथ आहे. संस्कृत व्याकरणावरील नऊ उल्लेखनीय ग्रंथ आहेत. नव व्याकरण हनुमान हे सूर्याकडून शिकला असे मानला जाते. श्रीरामाने त्याची 'नव-व्याकरण वेत्ता' अशी स्तुती केली आहे. ह्या नऊ ग्रंथांपैकी ऐंद्रम हे एक इंद्राकडून केले गेले आहे. असे म्हटले जाते की मूळ तमीळ व्याकरणाचे पुस्तक 'तोल्काप्पियम्' हे एंद्रमचे अनुसरण आहे.

-----

## प्रकरण ४

# संस्कृत आणि तमीळ व्याकरण

'इलक्कणम्' हा व्याकरणासाठी असलेला तमीळ शब्द संस्कृत 'लक्षण' शब्दावरून आला आहे, तसेच त्यातील व्याकरणासंबंधी अनेक शब्दांचे मूळ संस्कृत आहे. उदा. तमीळ व्याकरणात दोन शब्द, पकुती (पहुती) आणि विकुती (विहुती) वापरले जातात. ह्या शब्दाचे उदाहरण द्यायचे तर रामनुक्कू (रामन् साठी), रामन् हा पकुती आणि कू हा विकुती. दोन्ही संज्ञा पकुती आणि विकुती ह्या संस्कृत व्याकरणावरून आल्या आहेत. ''तुम्ही असे कसे म्हणता?'' असा प्रश्न विचारला जाऊ शकेल. ''प्रकृती हा मूळचा तमीळ शब्द. पकुत्तल पासून आलेला नाही का?''

पकुती एका अर्थाने ज्याचे विभाजन झालेला तमीळ शब्द आहे. पण मी म्हणतो की आणखी एक पकुती आहे जो संस्कृत प्रकृती पासून आला आहे. ह्या अर्थाने पकुती रामन् हा रामनुक्कु मधील शब्दाचे वर्णन पकुती असे केले जाते. विकुती हा शब्द संस्कृत शब्द विकृती वरून आला : पकुत्तल असा विकुत्तलसारखा शब्द नाही. ह्या वादातीत वस्तुस्थितीवरून विकुती हा विकृतीवरून, आपण निष्कर्ष काढू शकतो की पकुती हा प्रकृती पासून आला आहे.

(विकृतीला प्रत्यय असेही म्हटले जाते, जो त्याच प्रकृतीला अनेक अर्थ देतो. जेव्हा रामनै अडित्तेन असे म्हटले जाते - (१) रामन्ला मारा - प्रत्यय ऐ हा जोडला की मार दिला जाणारा रामन असा अर्थ होतो. जर रामनाल अडिपट्टेन- (१) रामनकडून मारला जाणारा - रामनला जोडला जाणारा अल्, प्रकृती असा अर्थ करते की जो मारतो तो.)

तमीळपेक्षा संस्कृत अधिक श्रेष्ठ आहे असे सांगण्याचा माझा हेतू नाही. आपल्याला आनंदी करण्यासाठी श्रेष्ठत्वाची भावना केव्हा येते? जेव्हा हे आपले आणि ते त्यांचे असा भेद आपल्याला जाणवतो तेव्हा ही भावना येते. आपल्यात वंशीय अहंकार असतो तेव्हा जे आपले असते त्याचे गुणग्रहण आणि जे दुसऱ्याचे असते त्यावर टीकात्मक बोलण्याचा मोह होत असतो. आपण जर वंशभेदाला मनात थारा दिला तर ते चूक होईल. आपल्या भाषा ह्या एकाच कुटुंबातून आल्या, एकाच सांस्कृतिक परंपरेतून आल्या असे समजले तर इतर भाषांशी तुलना करून आपण आपल्या भाषेविषयी गर्वाने बोलणार नाही.

व्याकरण ह्या विषयावर मी काही वास्तव सांगितले आणि माझा, एका भाषेपेक्षा श्रेष्ठ ठरविणे हा हेतू नाही.

-----

## प्रकरण ५

# संस्कृत : वैश्विक भाषा

संस्कृत ही मानवजातीची भाषा आहे ; ही आंतरराष्ट्रीय भाषा आहे आणि देवांची सुद्धा भाषा आहे. देवांना गीर्वाण म्हटले जाते ; म्हणून संस्कृतला गैर्वाणी म्हटले जाते. तमीळ काव्याचा सम्राट कम्बर तिचे देवभाषा असे वर्णन करतो ; संस्कृत कवी दण्डी त्याच्या काव्यादर्शः मध्ये तिला दैवी वाक् म्हणतो (स्वर्गीय वाणी) : ''संस्कृतम् नाम दैवी वाक्''

संस्कृतमध्ये अस्पष्ट शब्दावयव नाही. इंग्रजी भाषा पहा. त्यात स्पष्ट ए कार किंवा ओ कार नाही. असे संस्कृतमध्ये नाही. र हा अस्पष्ट म्हटला जात नाही किंवा तो अनुच्चारितही नसतो.

शिवाय संस्कृतमध्ये ज्याची व्युत्पत्ती लागू शकत नाही असा एकही शब्द नाही. कोणताही शब्द असो त्याची फोड करून त्याचा अर्थ स्पष्ट करता येतो. संस्कृत ही भाषा ऐकायला स्पष्ट/खणखणीत आणि मंगलदायक आहे. ती काही लोकांची आहे असा संकुचित दृष्टिकोन ठेवून प्रतिकूल मत बनवू नका.

संस्कृत बोलणे म्हणजे गोंगाट करणे आणि कसाबसा तुमचा संदेश पोहोचविणे नव्हे. त्यातील ध्वनी, ध्वनिशास्त्रशुद्ध केलेले आणि त्यातील शब्द आणि वाक्ये पृथक्करणाने शुद्ध केलेली आहेत. म्हणून ह्या भाषेला संस्कृत (संस्कृतम्) म्हटले जाते. अशी शुद्धता आणणे हा शिक्षाशास्त्राचा आणि मोठ्या प्रमाणात व्याकरणाचा हेतू आहे.

संस्कृत भाषा बोलणे म्हणजेच शुद्ध होणे, सुसंस्कृत होणे. देवांची भाषा असल्याने ती दैवी कृपा आणते. संस्कृत मधील ध्वनी नाडीमध्ये लाभदायक कंपने निर्माण करतात आणि मज्जातंतूच्या व्यवस्थेला बळकटी आणतात, त्या योगाने ते आपल्या आरोग्यात भर घालतात.

-----

## प्रकरण ६

# भाषिक अभ्यास आणि धर्म

शिक्षा, व्याकरण आणि मी ज्या विषयांवर बोललो - ते - छन्दस् आणि निरुक्त- ही वेदांगे भाषेशी संबंधित आहेत. नंतर मी म्हणालो की मी आपल्या धर्माच्या मूलभूत गोष्टींबाबत बोलेन, मी भाषिक अभ्यास आणि व्याकरणाविषयी बोलत आहे. नंतर मी छन्दशास्त्राविषयी बोलणार आहे. धार्मिक साहित्य म्हणजे आपण नेहमी देव, पूजन, भक्ती, ज्ञान, धर्म आणि इ. बाबतचे समजतो. मी अशा साहित्याबद्दल बोलणे योग्य होणार नाही का?

जेव्हा आपण वेदांचा विचार करतो तेव्हा अनेक गोष्टी उद्‌भवतात, धर्माशी सुसंगत अशा गोष्टी. कल्प, मीमांसा, पुराणे आणि धर्मशास्त्र अशा. मला अजून बोलायच्या गोष्टींमध्ये धर्माला महत्त्वाचे स्थान आहे. पण मध्येच भाषेचे शास्त्र आले, ज्याचा धर्माशी स्पष्टपणे काही संबंध नाही.

वैदिक दृष्टीने प्रत्येक गोष्टीचा परमेश्वराशी संबंध असतो. धार्मिक आणि अधार्मिक असा विषयांचा भेद करण्याचा प्रश्नच नाही. शरीरहिताच्या संबंधी असलेले वैद्यकीय शास्त्र, आयुर्वेद हेही शेवटी आत्मिक उन्नतीसाठी - किंवा भौतिक उन्नतीसाठी लष्करी शास्त्र (धनुर्वेद) असते. म्हणून तेही पारंपरिक विशेष ज्ञानाचा एक भाग आहेत. तसेच राजकीय अर्थशास्त्र सुद्धा आत्म-शास्त्र आहे.

ह्या क्षेत्रांमधील साहित्याला एवढा मान का दिला जातो? सर्व विषय, सर्व साहित्य माणसाला, त्याच्या जीवनाच्या प्रत्येक पैलूत शिस्त, सुसंस्कृतपणा आणि शुद्धता शिकवतात आणि त्याला मोक्षमार्गावर नेण्यात मदत करतात म्हणून ती गुणांनी धार्मिक मानली जातात.

ध्वनी हे परमात्म्याच्या आकलन झालेल्या रूपापैकी एक श्रेष्ठ रूप आहे आणि भाषा निश्चितच त्याच्याशी संलग्न आहे. ती सुसंस्कृत आणि शुद्ध करण्याचे कार्य आणि ती आत्म्याच्या कल्याणाचे साधन बनविण्याचे कार्य शिक्षा आणि व्याकरण यांचे आहे.

व्याकरणाचा शब्दब्रह्माशी संबंध आहे. संगीताचे ध्येय असलेल्या नादब्रह्माची उपासना करणे ही एक त्याची शाखा आहे. जर ध्वनींचा स्पष्ट उच्चार केला आणि वाणीमध्ये त्यांचा वापर केला तर ते संवादाचे / दळणवळणाचे साधन हा हेतू साध्य करील शिवाय आपल्याला आतून स्वच्छ करेल. असे भाषेचे शास्त्र उपयुक्त आहे.

पाणिनिच्या सूत्रावरील पतंजलीच्या भाष्याचा मी अगोदरच उल्लेख केला आहे, त्याला महाभाष्य म्हटले जाते. ह्या साहित्यकृतीच्या नावातील महा हा शब्द आपल्या परंपरेत व्याकरणाला किती श्रेष्ठ महत्त्व दिले जाते ह्याचे निदर्शक आहे. सुविख्यात अध्यापकांनी

वेदांवर, ब्रह्मसूत्रावर, उपनिषदांवर, भगवद्गीतेवर आणि इ. वर भाष्ये लिहिली आहेत. पण कोणत्याही ग्रंथाला महा हा उपसर्ग नाही. साम्राज्याच्या कारभारातून मिळणाऱ्या आनंदाइतका आनंद एखादा विद्वान महाभाष्याचे अध्ययन करून मिळतो अशी म्हण आहे.



महाभाष्यम वा पथनियम्
महाराज्यम् वा शासनियम्

पूर्वी राज्यकर्त्यांनी व्याकरणशास्त्राचे कसे पोषण केले आणि त्याचा प्रसार केला हे सिद्ध करणाऱ्या वेंगी शिलालेखासारख्या पुराव्याचा एक अंश मला नुकताच आढळला.

पूर्वीच्या मध्य प्रांतात (हल्लीचा मध्य प्रदेश) धार नावाचे एक राज्य होते. कलेचा मोठा आश्रयदाता असलेला आणि कवी आणि कलाकार यांना मोठमोठ्या भेटी देणाऱ्या भोजराजाची राजधानी होती तेच हे धार होय. आता धारमध्ये एक मशीद आहे. एकदा एक बळद मशिदीत सापडले, तपासल्यावर तिथे काही संस्कृतलेखन उघड झाले. पण लिपी विभाग स्वातंत्र्यानंतर काही वर्षे संशोधन करू शकले नाहीत. नंतर मशिदीच्या अधिकाऱ्यांनी परवानगी दिल्यावर त्यांनी त्यांच्या संशोधनाचा अभ्यास केला.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांना तक्त्याच्या रूपात व्याकरणाचे श्लोक कोरलेले एक चक्र दिसले. भोजराज्याच्या काळात जेथे सरस्वतीचे मंदिर होते तेथे आता मशीद आहे. वाणीची देवता सरस्वतीच्या मंदिराचा भाषेचे शास्त्र (व्याकरण) हा एक भाग असलाच पाहिजे अशी कल्पना त्या चक्राच्या मागे होती - व्याकरण हे वेदपुरुषाचे मुख होय. त्यांचे म्हणणे असे होते की एका दृष्टिक्षेपात ह्या चक्रावरून व्याकरण शिकता येईल. ह्याचे कारण असे की भाषेचे शास्त्र हे पूजा करण्यास योग्य आहे आणि त्या व्याकरण कोरलेल्या चक्राची स्थापना मंदिरात केली गेली. वाग्देवीच्या (सरस्वती) कृपेने, बऱ्याच काळानंतर जरी त्या ठिकाणी मशीद बांधली गेली तरी, आपल्याला ते चक्र प्राप्त झाले. लिपी शास्त्र विभागाने, इंग्रजी भाषांतरासह ते कोरलेले लेखन प्रसिद्ध केले.

अशा प्रकारे आपल्या लक्षात येते की व्याकरणासारखी शास्त्रे केवळ भौतिक कामासाठी म्हणून मानली जात नव्हती तर वास्तविक पूजा करण्यास योग्य मानली जात होती. म्हणूनच राज्यकर्त्यांनी त्यांना प्रोत्साहन दिले.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

भाग - ८

प्रकरण १

# वेदपुरुषाचे चरण

आपण (तमिळी) नेहमी ऐकतो लोक छन्द-त-तमिझबबत बोलतात. भक्त लोक म्हणतात, देवाची भजने नेहमी छन्द-त-तमिझ मध्ये गायली पाहिजेत. (परम सद्‌गुरूंनी 'भक्त लोक' हा शब्द वस्तुतः तमीळ 'अडियार' या शब्दासाठी वापरला आहे. ह्याचा अर्थ भक्त म्हणजे जे लोक परमेश्वराचे चरण आपल्या मस्तकी धारण करतात किंवा जे परमात्म्याच्या चरणाशी राहतात असा आहे.) छंद (म्) हा शब्द छंदस वरून आला आहे.

मी सांगितलेच आहे की छंदस म्हणजे वेद. भगवान गीतेत म्हणतात की वेद हे निर्मिती म्हटल्या जाणाऱ्या पिपल (पिंपळ) वृक्षाची पाने आहेत. - ''छन्दांसि यस्य पर्णानि'' (ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित ।। (भ. गीता १५-१) भगवान वेद ऐवजी छन्दस हा शब्द वापरतात. तरी पण मी ज्यावर बोलणार आहे त्याचा अर्थ वेद नसून, छन्दशास्त्र आहे आणि ते वेदपुरुषाचे जणू चरण आहेत.

ऋग्वेद आणि सामवेद हे पूर्णतः पद्यरूपात आहेत. यजुर्वेदात दोन्ही गद्य आणि पद्य आहे. मोठा भाग पद्य असल्याने वेदांना छन्दस म्हटले जाते.

तुमच्या सूटसाठी शिंपी तुमची मापे घेतो. त्याशिवाय तो योग्य प्रकारे कापड कापू शकणार नाही. तसे पद्य आपल्या विचारांना आणि भावनांना योग्य रूप देते. तुमचा सदरा अमुक इतके इंच रुंद, अमुक इतके इंच लांब असावा लागतो, नाही का ? तसेच पद्याचेही. त्याचे माप, चरण आणि शब्दांची संख्या याद्वारे व्यक्त झालेले असते. हे मापन जे सांगतात ते छन्दस होय आणि ज्यावर ते आधारलेले आहे ते पाठ म्हणजे पिंगलाची छन्दस सूत्रे होय. (येथे वैदिक छंदाचे वर्णन केले असून वेदात ह्याच्या ऋग्-सर्व अनुक्रमणि, अथर्ववेदीय बृहत-सर्व अनुक्रमणिका, बृहत देवता, आणि ऋग प्रतिशाख्य सारणि आहेत. अन्य प्रकारच्या काव्याचे छन्दशास्त्र ह्या विषयावर छन्दोमंजिरी व वृत्तरत्नाकरमध्ये विवेचन केलेले आहे.) ज्यांनी मंत्राची दीक्षा घेतलेली असते ते त्या मंत्राशी संबंधित ऋषीच्या नावाचा उल्लेख करून हाताने डोक्याला स्पर्श करतात, छन्दाचा उल्लेख करून नाकाला स्पर्श करतात, त्या मंत्राच्या देवतेचा उल्लेख करून हृदयाला स्पर्श करतात.

पद्यातील सर्व वैदिक मंत्र हे छन्दस मध्ये असतात. अवैदिक पद्य हे श्लोकरूपात असते. प्रोजला गद्य म्हणतात आणि काव्याला पद्य म्हणतात. तमीळमध्ये काव्याला शेय्युल, तेलुगुमध्ये पद्यम् म्हणतात. छन्द हा शब्द काव्याच्या वृत्ताला उद्देशून आहे. काव्यात अनेक प्रकारची वृत्ते आहेत. श्लोक हे अर्थातच वृत्ते असतात. रामायण आणि पुराणे ज्यात रचली गेली आहेत असे अनुष्टुभ नावाचे एक वृत्त आहे.

प्रत्येक कडव्यात असलेल्या चरणांची संख्या नियंत्रित करणारे नियम आहेत. आर्या हे वृत्त मात्रांवर, लघु आणि दीर्घ अक्षरे यांच्यावर आधारलेले आहे. राम हा शब्द घ्या : रा हे दीर्घ अक्षर दोन मात्रांचे आहे आणि म हे अक्षर एक मात्राचे आहे. अक्षरे दीर्घ आहेत की लघु आहेत ह्याचा विचार न करता, त्यांची संख्या प्रत्येक चरणात निश्चित केलेली असते अशी कडवी असतात. इतर वृत्ते मात्रांवर आधारलेली असतात.

-----

## प्रकरण २

# पाद किंवा चरण

मी म्हणालो की छन्दस हा वेदपुरुषाचा चरण आहे. काव्यालाही त्याचा चरण असतो. तमीळ पद्यात इरडिक्कुरल् (दोन पादांचे कडवे), नालडियार (चार पादांचे कडवे) इ. असतात : येथे अडि याचा अर्थ तोच म्हणजे पाद, चरण आहे. नालडियार म्हणजे चार अडियर नाही. महान भक्तांना अडियर म्हटले जाते कारण ते परमेश्वराच्या चरणकमलाशी असतात. (संस्कृत मध्येही आचार्यपाद, गोविंदपाद आणि भगवत्पाद असे समानार्थी शब्द आहेत.) नालडियार म्हणजे चार चरणांची असलेली कडवी.

जसे चरणाला पाद किंवा संस्कृत मध्ये पद म्हटले जाते तसे तमीळ मध्ये अडि म्हटले जाते. एखाद्या निश्चित संख्येत पाद असले पाहिजेत आणि त्याचे वृत्तात ठरावीक संख्येत अक्षरे किंवा शब्दावयव असले पाहिजेत. पाद (पद), अडि, चरण कडव्यातील ओळ दर्शविणारे, सर्व भाषांमध्ये समान अर्थाचे शब्द आहेत. सर्व मानवजातीमध्ये काहीतरी समान आहे, मानव वंशातील ऐक्य दर्शविणारे काहीतरी आहे, हे अंतःकरणात समाधान निर्माण करणारे आहे.

मंत्राच्या किंवा कडव्याच्या एक चतुर्थांशाला पाद म्हटले जाते. तमीळ मध्ये ह्या चार भागांपैकी एका भागाला काल म्हणतात (पाय). पाय मानवी शरीराचा एक चतुर्थांश भाग असतो. मस्तकापासून कमरेपर्यंत, शरीराचा एक द्वितीयांश आणि कमरेपासून पायांपर्यंत दुसरा अर्धा. नंतरच्या अर्ध्याच्या अर्धा, म्हणजे एक चतुर्थांश हा तमीळ मध्ये काल किंवा पाय. त्या भाषेत कमरेला अरै म्हणजे अर्धा म्हटले जाते.

तमीळ मध्ये काल म्हणजे पूर्ण आणि पदम् किंवा पादम् हा पायासाठी वापरला जातो. पण काही संदर्भात काल हा शब्द पायासाठी वापरला जातो. उदाः उल्लंगाल आणि पुरंगाल (अनुक्रमे तळपाय आणि त्यावरचा पाय) या शब्दांमध्ये फक्त पायाचा उल्लेख असतो. संस्कृतमध्ये सुद्धा पाद म्हणजे दोन्ही पाय किंवा पूर्ण पाय.

-----

## प्रकरण ३

# पाद आणि शब्दावयव - मात्रा

वैदिक मंत्र किंवा सामान्य कवितेचे कडवे हे चार भागांमध्ये विभागलेले असते. बहुतेक वृत्तांमध्ये चार चरण असतात आणि प्रत्येक चरण तितकीच अक्षरे किंवा मात्रा ह्यामध्ये विभागलेले असते. जेव्हा चरण समान नसतात तेव्हा त्याला विषम वृत्त म्हटले जाते : वि + सम = विषम. सम हा शब्द अभेद किंवा समानतेची स्थिती दाखवितो. (ह्याचा अर्थ 'तोच' किंवा 'सर्वसम' असाच आहे.) जेव्हा आपण काहीतरी अयोग्य करतो, आपल्या तटस्थतेला (मध्यम स्थिती) सोडून करतो तेव्हा आपली कृती विषम स्वभाव दाखविणारी असते. हा शब्द कपटीपणा किंवा धूर्तपणा ह्या अर्थाने वापरला जातो. पण विषमचा शाब्दिक अर्थ असमान होय.

पुन्हा सांगायचे तर, एखाद्या कडव्यातील सर्व चरण जर असमान असतील तर ते विषम म्हटले जाते. जर एकाआड एक ओळ किंवा पाद समान असतील तर त्यांना अर्धसम वृत्ते म्हटले जाते. येथे पहिले आणि दुसरे चरण तसेच तिसरे आणि चौथे चरण असमान असते. पण पहिले आणि तिसरे, दुसरे आणि चौथे चरण समान असते.

बहुतेक सर्व कवितांमध्ये पाद समान असतात. मला वाटते तुम्हाला परिचित असेल अशा एका श्लोकाद्वारे मला हे स्पष्ट करू द्या.

ह्या कडव्याचे चार चरण -

१. शुक्लांबरधरं विष्णुं    २. शशिवर्णं चतुर्भुजं
३. प्रसन्नवदनं ध्यायेत्    ४. सर्वविघ्नोपशांतये

ह्यातील प्रत्येक पादाला आठ मात्रा आहेत. फक्त स्वरांशी संयुक्त असलेले स्वर आणि व्यंजनाचे मात्रा म्हणून गणन होते. इतर व्यंजनांचे गणन होत नाही. तरच तुम्हाला आठ ही संख्या मिळेल. पहिल्या पादातील आठ मात्र अशा : १ शु ; २. क्लां ; ३ ब ; ४ र ; ५ ध ; ६ रं ; ७ वि ; ८ ष्णुं. इतर पादांना तशाच आठ मात्रा असतील.

चार चरणांचे कडवे, प्रत्येकी आठ मात्रांचे एक चरण असलेले वृत्त अनुष्टुभ असते. हे वेदांमध्ये आणि नंतरच्या काळातील पद्य साहित्यात वापरले गेले आहे.

-----

## प्रकरण ४

# काव्याचा उगम कसा झाला?

वैदिक मंत्रांमध्ये जशी स्वरांची विविधता असते तशी काव्यात नसते. स्वराघात असलेल्या वैदिक मंत्राशी सुसंगत अशा आघात नसलेल्या स्वरांच्या काव्यरचनेचे जनकत्व वाल्मीकीकडे जाते. पण त्याचा हा शोध त्याच्या जाणीवपूर्वक प्रयत्नाचा भाग नव्हता.

एक दिवस, एका झाडाच्या फांदीवर क्रौंच पक्ष्याची जोडी क्रीडा करताना दिसली. इतक्यात त्यापैकी एक पक्षी एका शिकाऱ्याच्या बाणाला बळी पडला. ऋषीला त्याची दया आणि करुणा वाटली पण लगेच त्याला राग आला. त्याने शिकाऱ्याला शाप दिला, ते शब्द उत्स्फूर्तपणे आले.: '' हे शिकाऱ्या, तू जोडीदाराबरोबर आनंदाने क्रीडा करणाऱ्या एका क्रौंच पक्ष्याला ठार मारलेस. तुला कधीही चिरंतन टिकणारे सुख न मिळो. ''

मा निषाद प्रतिष्ठां त्वं अगमः शाश्वतिः समाः
यत् क्रौञ्चमिथुनादेकं अवधिः काममोहितम् ।

अनपेक्षितपणे, पक्ष्यांबद्दलच्या करूणेने वाल्मीकीने शिकाऱ्याला शाप दिला. परंतु, लगेच त्याला पश्चात्ताप झाला. ''मी त्या शिकाऱ्याला तसा का शाप दिला?'' तेव्हा तो तसा गंभीरपणे विचार करीत असता, एक विलक्षण सत्य त्याच्या मनात चमकून गेले. तो दिव्य दृष्टी असलेला ऋषी नव्हता का? त्याच्या लक्षात आले की त्याच्या शापाच्या शब्दांना अनुष्टुभ वृत्ताच्या पद्य कडव्याचा वेश आहे. शब्द त्याच्या नकळत ओठातून बाहेर पडले होते (तसे त्याला नकळत करुणा आणि क्रोध पाठोपाठ आला), ह्याचे त्याला आश्चर्य वाटले.

त्याने नकळत रचलेल्या कडव्याला एक दुसरा अर्थ आहे. शिकाऱ्याला उद्देशून असलेले शब्द महाविष्णूलाही उद्देशून होते. कसे? ''हे लक्ष्मीच्या पती, वासनेने मोहित झालेल्या जोडप्यातील एकाचा वध केल्याने तुला चिरंतन कीर्ती लाभेल.'' येथे रावण आणि त्याची पत्नी मंदोदरी ह्या जोडीचा संदर्भ आहे आणि रावणाला त्याच्या वाईट वासनेने सीतेचा मोह झाला होता. त्याचा वध करून श्रीरामाने कीर्ती मिळविली. वाल्मीकीला त्याच्या नकळत काव्य रूपाने हे शब्द आले. ही ईश्वराची इच्छा जाणून, ह्या ऋषीने त्याच वृत्तात रामायण रचले.

'श्लोका'चा (वैदिक स्वरातील विविधतेशिवाय असलेल्या) जन्म अशा रीतीने झाला. उच्च विचारांच्या प्रकटनात सुलभता येऊन या रचनाबंधामुळे, वेदांप्रमाणेच, ते विचार स्मरणात राहणे सोपे होईल म्हणून श्लोक हे माध्यम गवसल्याचा विलक्षण आनंद वाल्मीकीना झाला.

वृत्तबद्ध पद्याइतके गद्य लक्षात ठेवणे सोपे नाही. म्हणून प्राचीन काळी प्रत्येक गोष्ट काव्यपंक्तीत असे. छापखान्याच्या आगमनानंतर गद्याचा विकास झाला (एका विशेष

अर्थाने). त्यानंतर प्रत्येक गोष्ट पाठ करण्याचे टाळून, तयार संदर्भासाठी पुस्तके मोठ्या प्रमाणात निर्माण होऊ लागली.

तथापि, एखादी कल्पना व्यक्त करण्यासाठी किंवा निरोप देण्यासाठी (किंवा माहिती देण्यासाठी) काव्यात अधिक सौंदर्य आणि शक्ती आहे. रामायण हे पहिले पद्य साहित्य म्हणून त्याचे नाव 'आदिकाव्य' आपल्याला भगवानाकडून प्रसाद म्हणून छन्दस चे वरदान मिळाले आहे. (सूक्तासारखी वैदिक स्तोत्रे काव्यरचना मानली जात नाहीत, शिवाय वेदमंत्रांची 'रचना' केली गेली नाही तर ते ऋषींना 'दिसले'.) (देवाच्या कृपेसारखे). छन्दसने, पुराणांमध्ये आणि इतर पद्य वाङ्मयात असलेल्या विविध देवतांच्या स्तोत्रांत वापरल्या गेलेल्या अनेकविध वृत्तांना जन्म दिला.

-----

## प्रकरण ५

# काही वृत्ते

इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, भुजंगविजृम्किता, सुग्धरा ही भक्तिपर स्तोत्रात आणि अन्य काव्यरचनेत वापरली जाणारी काही वृत्ते आहेत. यातील काही क्लिष्ट असून अत्यंत उच्च प्रतीची प्रतिभा लाभलेले कवीच त्यांची रचना करु शकतात.

मी आधीच म्हटल्याप्रमाणे एका चरणात आठ अक्षरे असणारे वृत्त हा अनुष्टुप छंद होय. बृहती हा नऊ अक्षरांचा, पडक्ती हा दहा अक्षरांचा, त्रिष्टक हा अकरा अक्षरांचा आणि जाति हा बारा अक्षरांचा, छंद आहे. आमच्या छंदशास्त्रात २६ अक्षरांचे 'भुजंग बिजृभ्रित' नावाचे वृत्त असून ते 'उत्कृति' प्रकारात येते. यापेक्षा अधिक अक्षरांच्या छंदाला 'दण्डक' असे म्हणतात. यात अनेक प्रकार आहेत. अप्परस्वामीगल यांची तिरू-तणदगम् ही रचना या दण्डक प्रकारातली आहे.

काही वृत्तांची नावे नितान्त सुंदर आहेत. एका वृत्तात केलेल्या काव्यातील शब्दांचा ओघ पाहून क्रीडा करताना पुढे झेपावणाऱ्या वाघाचे स्मरण होते. त्या वृत्ताला यथार्थतेने 'शार्दुलविक्रीडित' असे म्हणतात. शार्दुल म्हणजे वाघ, विक्रीडित म्हणजे केलेला खेळ (हे वृत्त अतिदूती प्रकारातले असून यात १९ अक्षरे असतात.) प्रत्येक चरणातील १९ अक्षरे १२ आणि ७ अशा दोन समूहात विभागलेली असतात. आद्य शंकराचार्यच्या 'शिवानंदलहरी' या काव्याचा २६ व्या कडव्यापासून पुढचा काही भाग याच वृत्तात आहे. 'मूक पंचशती' या कामाक्षी स्तोत्राच्या ''स्तुति-शतक'' या भागाच्या प्रारंभीचे काही श्लोक देखील याच 'शार्दूल विक्रीडित' या वृत्तातच आहेत. या स्तोत्राच्या 'मंद स्मित शतक' या अखेरच्या भागाचे मात्र शंभर श्लोक पूर्णपणे याच वृत्तात आहेत. 'भुजंगप्रयात' हे आणखी एका वृत्ताचे नाव आहे, जे भुजंग म्हणजे सापाचे सरपटणे सूचित करते. आमचे आचार्य सुब्रह्मण्यम यांचे 'भुजंगम्' हे याच वृत्तात आहे. १२ अक्षरांचे असलेले हे वृत्त 'जगति' प्रकारातले असून याचे प्रत्येक चरण सहा-सहा अशा दोन गटात विभागलेले असते, जसे की - मयूराधिरूढं-महावाक्यगूढं.

आमचे आद्य शंकराचार्य यांचे 'सौंदर्यलहरी' हे 'शिखरिणी' वृत्तात आहे. याच्या प्रत्येक चरणात १७ अक्षरे असून हे वृत्त 'अत्यष्टी' प्रकारातले आहे. या वृत्ताची १७ अक्षरे ११ व ६ अशा दोन भागात विभागलेली असतात. 'मूकपंचशती' चे पादारविंद शतक हे या वृत्तात आहे. 'स्रग्धरा' नावाचे वृत्त बंधाऱ्यातील पुराचे पाणी सोडण्याच्या दारातून बाहेर उसळणाऱ्या पाण्याच्या लोंढ्यासारखा काव्यपंक्तींच्या प्रवाहाचा ध्वनी सूचित करतात. या वृत्ताच्या चरणात २१ अक्षरे सात-सात अक्षराच्या तीन गटात विभागलेली असून हे वृत्त 'प्रकृति' या प्रकारातले आहे. शंकराचार्यांनी शिव आणि विष्णू यांची चरणापासून मस्तकापर्यंत आणि मस्तकापासून

चरणापर्यंत पादादि-केशान्त आणि केशादि-पादान्त वर्णन करणारी स्तोत्रे याच वृत्तात आहेत.

'इंद्रवज्रा' या वृत्ताचा मी यापूर्वीच उल्लेख केला आहे. हे वृत्त 'त्रिष्टुभ' प्रकारातले असून याच्या प्रत्येक चरणात ११ अक्षरे असतात. अन्य एका वृत्ताचे नाव ''उपेंद्रवज्रा'' असे आहे. या दोनही वृत्तांचे मिश्रण असलेल्या 'उपजाति' या वृत्तात कालिदासाने आपल्या 'कुमारसम्भवम्' या काव्याची रचना केलेली आहे.

ही सर्व वृत्ते वेदकाळानंतरची असून काव्यरचना तसेच विविध देवतांच्या स्तोत्रात यांचा उपयोग केला गेला आहे. गायत्री, उष्णिक, अनुष्टुभ, बृहती, पङ्ती, त्रिष्टुभ आणि जगती ही वेदसाहित्यातली वृत्ते आहेत.

'गायत्री' हा महामंत्र म्हणजे मंत्रांचा राजा आहे. सामान्यपणे एखाद्या विशिष्ट मंत्रातून ज्या देवतेचे आवाहन केले जाते, त्या देवतेचेच नाव त्या मंत्राला दिले जाते. 'शिव-पंचाक्षरी', 'नारायण-अष्टाक्षरी', राम-भयोदशी' या मंत्रांच्या नावातच त्या मंत्राच्या देवतेचे नाव व त्या मंत्रात असलेल्या अक्षरांची संख्या एकत्रच दिलेली असतात. गायत्री मंत्राची देवता सविता असून गायत्री हे त्या मंत्राच्या वृत्ताचे सुध्दा नाव आहे. मंत्रामध्ये वापरल्या गेलेल्या वृत्ताच्या ध्वनी आणि स्वरातून मंत्राप्रमाणेच दिव्य शक्ती प्रकट होते असे दिसून येते.

अन्य अनेक मंत्र आणि श्लोकांपेक्षा भिन्नत्त्वाने गायत्री मंत्राचे तीन चरण असून प्रत्येकात आठ याप्रमाणे संपूर्ण मंत्रात एकूण २४ अक्षरे असतात. या मंत्राचे तीन चरण असल्याकारणाने गायत्री मंत्राला त्रिपदा गायत्री असे म्हटले जाते. गायत्रीचे अन्य प्रकारही आहेत. 'अग्निमिळे' हा पहिला वैदिक मंत्र गायत्री वृत्तात आहे.

पद्यामध्ये २४ अक्षरी गायत्री वृत्ताचा उपयोग केला जातो तर वैदिक स्तोत्राहून अन्य रचनातून प्रत्येकी सहा अक्षराचे चार चरण असतात. 'उष्णिक' या वृत्तात प्रत्येकी सात अक्षरांचे चार चरण असतात.

येथपर्यंत मी अशा वृत्तांचीच चर्चा केली आहे जी त्यातील अक्षरे दीर्घ आहेत की ऱ्हस्व आहेत हे न पाहता त्यातील अक्षरसंख्येवर आधारित आहेत. छंदशास्त्रामध्ये दीर्घ आणि ऱ्हस्व अक्षरांना क्रमशः गुरू आणि लघु असे म्हटले जाते. ज्या कवितातून 'लघु' किंवा 'गुरू' याचा विचार केला जात नाही त्या रचनेला 'वृत्त' म्हणतात व ज्या रचना 'मात्रा' वर आधारित असतात त्यांना 'जाति' असे म्हणतात. जाति या प्रकारात लघु अक्षराची एक मात्रा व गुरू अक्षराच्या दोन मात्रा मोजल्या जातात. यात अक्षर संख्येऐवजी मात्रांच्या संख्येचा विचार केला जातो.

'मूक पंचशती' चे आर्या शतक हे आर्यावृत्तात आहे. आर्यांच्या दृष्टीने 'अम्बा' ही उच्चपदावर अधिष्ठित असल्याने तिच्या स्तुतिस्तोत्र गायनात रचलेल्या काव्यपंक्तींया आर्या

देखील तितक्या उच्च श्रेणीच्या असतात आणि म्हणूनच ती स्तुतिस्तोत्रे ही अक्षरसंख्येवर आधारित मात्रावर आधारित आर्या या मात्रावृत्तात रचली गेली आहेत. तुम्ही जर अक्षरसंख्येचा विचार कराल तर वृत्त पंक्ती पंक्तीला बदलत आहे या विचाराने तुम्ही भ्रमात पडण्याचा संभव आहे.

-----

## प्रकरण ६

# छंदशास्त्राची उपयुक्तता

वेदमंत्राचे स्पष्ट व शुद्ध उच्चारण शिकविणाऱ्या शिक्षाशास्त्राला मंत्राचा 'रक्षक' म्हणता येईल. परंतु छंद मात्र मंत्राचे स्वरूप (आकृतिबंध) नियमानुसार योग्य आहे की नाही हे ठरवितो. अर्थात मंत्राचे स्वरूप कधीच चुकीचे असू शकणार नाही. कारण वारंवार सांगितल्याप्रमाणे वेद ऋषींनी निर्माण केलेले नाहीत आणि ते त्यांच्या चिंतनाचे फलित नाही. भगवंताने मंत्र ऋषींच्या समोर प्रकट केले. मानव, पशू, वृक्ष आणि सृष्टीतील अन्य सजीव प्राणी आणि निर्जीव वस्तू हे निसर्गनियमानुसार अस्तित्वात असतात. त्याचप्रमाणे वेदमंत्रांचा छंद स्वाभाविक रूपाने योग्य स्वरूपात असला पाहिजे. शिकविला किंवा पठण केला जात असलेला मंत्र किंवा सूक्त आपणापर्यंत मूळ शुद्ध स्वरुपात येत आहे की नाही हे ठरविण्यासाठी आपणास छंदाचे साहाय्य होते. आपण स्तोत्राच्या छंदानुसार स्तोत्राच्या शुद्धतेची तपासणी करून त्यात काही दोष आढळल्यास या विषयातील जाणकारांशी विचार विमर्ष करून ते दोष दूर करू शकतो.

स्वयमेव प्रकटलेल्या मंत्राशिवाय कवींच्या ज्या काव्यरचना असतात त्यातील काव्यपूर्ण चिंतनात्मक विचार व प्रतिभाविलासाला योग्य आकार देण्यास छंद मदत करतात. संगीतात जे तालाचे स्थान तेच काव्यात छंदाचे महत्त्वपूर्ण स्थान आहे.

काव्याला आवश्यक स्वरूप देण्यासाठी त्या काव्याची रचना निश्चित अक्षरसंख्येच्या वृत्तात आणि लयीमध्ये केली जाते. अशी वृत्तरचना केल्यामुळे त्या काव्याचे पाठांतर सुलभ होऊन ती स्मरणात ठेवणे शक्य होते. काव्याला निश्चित स्वरूप आणि अपेक्षित प्रभावाचा हेतू पूर्ण करण्यासाठी आवश्यक असे हे छंदाचे नियम आजकालचा समाज मोडीत काढीत आहे. हा बदलता कल ध्यानात घेऊन 'कवी' देखील आपल्या रचना छंदात न करता मनाला येईल त्याप्रमाणे करीत आहेत. मुक्त होणे याचा खरा अर्थ उच्च अशा स्वतंत्रतेकडे घेऊन जाणाऱ्या अनुशासन पद्धतीचे दृढतेने पालन करणे होय हे समाजाला कळत नाही.

छंदाच्या साहाय्याने आपण वाट्टेल त्या मंत्राचे मूळ स्वरूपात जतन करू शकतो. छंदामुळे आपण मूळ मंत्रात एकाही अक्षराची भर घालू शकत नाही किंवा एकही अक्षर त्यातून कमी करू शकत नाही. आत्मोन्नती हा वेदाचा खरा हेतू आहे, मग आपण वेदमंत्रात एखादे अक्षर घालावे किंवा कमी करावे काय?

-----

## प्रकरण ७

# वेदांचे चरण, मंत्रांचा श्वास

प्रत्येक मंत्राला, त्या मंत्राने ज्या देवतेचे आवाहन केले आहे ती देवता, स्वतःचा छंद आणि ज्या ऋषीने तो मंत्र जगापुढे प्रकट केला तो ऋषी असतो. स्वतःच्या हाताने मस्तकाला स्पर्श करून त्या मंत्राच्या ऋषीच्या नावाचा उच्चार करणे याच्यामागे विशिष्ट संकेत आहे. त्या ऋषीचे चरण आपल्या मस्तकी धारण करण्याचा भाव या कृतीत आहे. ज्या ऋषीकडून तो मंत्र आपल्याला प्राप्त झाला त्या ऋषीविषयीची कृतज्ञता आपण या कृतीतून व्यक्त करतो. त्यानंतर आपण हाताने आपल्या नासिकेला स्पर्श करून स्तोत्राचा छंद किंवा वृत्त याचा उच्चार करतो. छंद स्वराचे रक्षण करतो आणि स्वर हा मंत्राचा संजीवक श्वास आहे म्हणून आपण नासिकेने श्वास घेत असल्यामुळे हाताने नाकाला स्पर्श करतो. श्वासाशिवाय जीवन असू शकत नाही. सर्व वेदांचा विचार केला असता शिक्षा ही वेदांची नासिका तर छंद हे त्यांचे चरण असून योग्य छंद ही मंत्राची नासिका होय.

जेव्हा आपण मंत्राच्या पठणाला प्रारंभ करतो तेव्हा आपण या मंत्राच्या अधिदेवतेचे ध्यान केले पाहिजे व ती अधिदेवता आपल्या हृदयात उपस्थित आहे अशी आपणास जाणीव झाली पाहिजे. मंत्राच्या अधिदेवतेच्या नामाचा उच्चार करताना याच कारणासाठी आपण आपल्या हृदयाला स्पर्श करतो.

वेदपुरुष हा छंदावर उभा आहे. 'छंदः पादो वेदस्य' असेच म्हटले गेले आहे. वैदिक मंत्रांना छंदांचा असा आधार आहे.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग -१

## निरुक्त

### प्रकरण -१ - वेदपुरुषाचे कान

# वेदपुरुषाचे कान

निरुक्त हा वेदांचा शब्दसंग्रह किंवा 'कोश' आहे. शब्दकोशास 'निघंटू' असेही म्हणतात. तामीळमध्येही शब्दकोशाला निघंटू असेच म्हणतात. निरुक्तामध्ये शब्दांची उत्पत्ती, त्यांचे मूळ दिलेले असल्याने उत्पत्तीशास्त्राचे काम करणाऱ्या निरुक्ताला वेदपुरुषाचे कान म्हणतात. यात वेदातील दुर्बोध शब्दांचा अर्थ दिलेला असून विशिष्ट संदर्भात त्या शब्दांचा उपयोग कसा व का केला गेला आहे याचेही स्पष्टीकरण दिलेले आहे. निरुक्तावर अनेकांनी काम केले असून या संदर्भात 'यास्क' यांचे योगदान अत्यंत महत्त्वपूर्ण आहे.

'हृदय' या शब्दाचे उदाहरण घ्या. वेदांनी स्वतःच या शब्दांच्या मूळ स्थानाचा मागोवा घेतला आहे. 'हृदि अयम्' म्हणजे ईश्वर हृदयात राहतो. 'हृद' याचा अर्थ मानवी हृदय असा आहे. परंतु त्या शब्दानंतर 'अयम्' शब्द जोडला गेल्याने ज्यात ईश्वर वास करतो असा अर्थ आल्याने त्या शब्दाचे आत्मिक महत्त्व सूचित केले गेले आहे. आपल्याला सर्वोच्च स्थानी नेणे हाच प्रत्येक शास्त्राच्या उद्देश असतो. परमेश्वराचा निवास हृदमध्ये असल्याने हृदय म्हटले आहे. याप्रमाणे प्रत्येक शब्दास काही पार्श्वभूमी असते. निरुक्त या कारणांचा शोध घेत शब्दाची विशेषता नजरेस आणते.

'धातू' ला इंग्लिश भाषेमध्ये 'रूट' म्हणतात. त्या भाषेत फक्त क्रियापदांच्या रूटबाबत सांगितले आहे. नामाच्या नाही. संस्कृत भाषेमध्ये सर्व शब्दांचे धातू आहेत, जे 'रूपांतरित' किंवा 'परिवर्तित' स्वरूपात अन्य भाषांमधून स्वीकारले गेले असले पाहिजेत. त्यामुळे आपणास त्या भाषांत अनेक शब्दांचे मूळ सापडत नाही. अर्थात अशा प्रकारचा अभ्यास केवळ ते शब्द मूलतः त्या भाषेचेच असतील तरच करता येणे संभव आहे. 'अवर' (Hour) हा इंग्लिश शब्द घ्या, उच्चारानुसार (त्यातील H अनुच्चारित न ठेवता) असल्याने या शब्दाचा उच्चार 'होर' असा किंवा 'होअर' असा हवा. कधीकाळी या शब्दाचा उच्चार खरोखरच 'होर' असा केला जात असावा. संस्कृत मध्ये होराशास्त्र असे एका शास्त्राचे नाव आहे. 'होरा' हा शब्द 'अहोरात्र' म्हणजे दिवस-रात्र यापासून आलेला असून होरा म्हणजे अडीच नाडिकांचा 'एक तासाचा अवधी असा आहे. इंग्लिश अवर हा शब्द निश्चितपणे संस्कृत 'होरा' या शब्दापासून आलेला आहे. याचप्रमाणे हार्ट Heart हा इंग्लिश शब्द 'हृद' संस्कृत शब्दापासून आलेला आहे. याप्रमाणे असे अनेक शब्द आहेत ज्यांचे मूळ संस्कृत भाषेत शोधता येते. अन्य भाषांमध्ये हे शब्द बदलत जाऊन वर्तमान स्वरूपात यायला बराच काळ लागला असणार. त्यामुळे आज जे कोणी त्या शब्दांचा उपयोग करतात त्याचे मूळ (रूट) त्यांच्या भाषेत सापडत नाही.

एखाद्याने बोललेल्या भाषेतील शब्दांचा अर्थ न कळता त्याचे बोलणे ऐकल्यास काय

होईल? त्याचे बोलणे ऐकून न ऐकल्याप्रमाणे निरर्थक ठरेल. दुसऱ्या शब्दात आपण त्या भाषेच्या बाबतीत 'बहिरे' ठरतो. निरूक्त हे भाषेतील प्रत्येक मूळापर्यंत जाऊन त्या भाषेचा अर्थ जाणण्यास मदत करते आणि याच कारणाकरिता निरुक्ताला वेदपुरुषाचे कान असे म्हटले जाते. निरूक्त श्रुतीचा कान आहे. मुळात श्रुती म्हणजे कानाने ऐकलेले असाच आहे.

पाश्चात्त्य विद्वानांनी काशीच्या पंडितांकडून व्याकरण व निरुक्ताचा अभ्यास केला आणि निरुक्तातील शब्दांचे व्युत्पत्ती शास्त्र आत्मसात केले. याच्या साहाय्याने त्यांनी नवे भाषाशास्त्र विज्ञान विकसित केले. त्यांचे भाषाशास्त्र मूलतः आमच्या व्याकरण आणि भाषाशास्त्रावरून तयार केलेले आहे.

आपल्या संशोधनातून पाश्चात्त्य विद्वानांनी असा निष्कर्ष काढला आहे की सर्व भाषांचे एकच उगमस्थान आहे. जगातली सर्व माणसे मूलतः एकाच प्रदेशात राहणाऱ्या मानवाचे वंशज आहेत. जेथे प्राक्काळात एकच भाषा बोलली जात होती. या भाषेचे मूळ माहेर असलेला तो प्रदेश कोणता याबद्दल मतभेद आहेत, परंतु त्याबद्दल आम्हाला चिंता करण्याचे कारण नाही. कारण मुळातच पृथ्वीवरील सर्व प्रदेश हे आमचेच घर आहे अशीच आमची धारणा आहे. तामीळ भाषेतील प्रसिद्ध वचन आहे. 'स्वदेशो भुवनत्रयम्' तीनही भुवने ही आमची मातृभूमी आहे. 'यादुम मुरे' वाक्याचा अर्थ आहे पृथ्वीवरील सर्व प्रदेश आमचेच आहेत आणि आम्ही सर्वजण एकाच हाडामासाची माणसे आहोत.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

भाग -१०

प्रकरण १

# वेदपुरुषाचा चक्षू

आपल्या वैदिक धर्माच्या मूळ अध्ययनाच्या चौदा वेदांगांपैकी आत्तापर्यंत शिक्षा, व्याकरण, छंद आणि निरुक्त व भाग ५ मध्ये चार वेदांबद्दल मी माझे विचार मांडले. शिक्षा, व्याकरण, छंद आणि निरुक्त हे वेदाच्या षडंगांपैकी म्हणजेच वेदपुरुषाच्या सहा अवयवांपैकी चार अंगे आहेत. मी राहिलेल्या दोन वेदांगांपैकी प्रथम ज्योतिषाबद्दल बोलणार आहे. ज्योतिष हे खगोलविषयक विज्ञान असून ज्योतिष हा वेदपुरुषाचा चक्षू आहे आणि त्यात तीन स्कंध किंवा भाग आहेत. म्हणूनच ज्योतिषाला 'स्कंध-त्रयात्मकम्' असे म्हटले जाते. गर्ग, नारद आणि पराशर या ऋषींनी या विषयांवर 'संहिता' म्हणजे ग्रंथ लिहिलेले आहेत. सूर्यदेवाने आपले स्वरूप बदलून असूरांचा 'सज्जाकार'' असलेल्या 'मय' याला हे शास्त्र शिकविले त्याला सूर्यसिद्धान्त असे म्हणतात. खगोलशास्त्रावर अंतराळशास्त्रज्ञ ऋषी आणि अन्य काही लेखकांनी ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांपैकी काही वहाहमिहिर, आर्यभट्ट आणि भास्कराचार्य व अलीकडच्या काळात संदरेश्वर श्रौती यांनी 'सिध्दान्त कौस्तुभ' नावाचा ग्रंथ लिहिलेला आहे.

ज्योतिषशास्त्राला वेदपुरुषाचा चक्षू असे का म्हटले जाते?

डोळा कोणते काम करतो? जवळच्या वस्तूंचे ज्ञान स्पर्शाने होऊ शकते. डोळ्यांनी आपल्याला दूरच्या वस्तू दिसतात. ज्याप्रमाणे दूरच्या गोष्टी पाहण्याकरिता आपणास डोळ्यांची मदत होते त्याचप्रमाणे आकाशातील ग्रहताऱ्यांची, भूतकाळातील कैक वर्षांपूर्वीची किंवा भविष्यकाळातील अनेक वर्षानंतरची आकारमाने इ. विषयीची स्थिती जाणण्यास ज्योतिषशास्त्राची आपणांस मदत होते.

आकाशातील सूर्य, चंद्र आणि अन्य ग्रह-तारे यांची स्थिती आपण थेटपणे जाणू शकतो. आपण जवळच्या वस्तू, अंधत्व असले तरी, ज्याप्रमाणे हाताच्या स्पर्शाने जाणू शकतो, त्याचप्रमाणे आपण आकाशातील वर्तमानकालीन ग्रह-ताऱ्यांची स्थिती ज्योतिषशास्त्राच्या मदतीविना जाणू शकतो. ५० फूट अंतरावरील वस्तू आपणास डोळ्यांनी ओळखता येते. त्याचप्रमाणे ग्रहांची ५० वर्षांपूर्वीची किंवा ५० वर्षानंतरची स्थिती जाणण्यासाठी तुम्हाला ज्योतिषशास्त्राचा आधार घ्यावा लागतो.

तथापि जवळच्या वस्तूचे संपूर्ण ज्ञान आपणास केवळ स्पर्शाच्या साहाय्याने होऊ शकत नाही. उदा. ती वस्तू हिरव्या रंगाची आहे की लाल हे आपणास स्पर्शाने कळणार नाही, त्यासाठी आपणास डोळ्यांच्या मदतीने ती वस्तू पाहावी लागते. त्याचप्रमाणे आपण एखादा ग्रह केवळ चर्मचक्षूने पाहू शकलो तरी त्याचा आमच्या जीवनावरील परिणाम आणि

त्याची आकाशातील स्थिती आमच्या भाग्यात काय बदल घडवू शकेल हे आम्हाला ज्योतिषशास्त्राच्या मदतीनेच पाहता येईल.

आणि म्हणूनच ज्योतिषशास्त्राला 'वेदपुरुषाचा चक्षू' म्हणण्याचे हेच कारण आहे. विभिन्न ग्रह, सूर्य आणि चंद्र यांची स्थिती पाहून वैदिक विधी केले जातात. हे निश्चित करण्याचे नियम आहेत. विशिष्ट कार्य करण्यासाठी योग्य दिवस आणि मुहूर्त ग्रहांची स्थिती पाहून निश्चित केला जातो. यावेळी देखील ज्योतिषशास्त्र डोळ्याची भूमिका पार पाडते.

वेदाच्या या अंगाला 'नयन' असे अत्यंत समर्पकपणे म्हटले जाते. या शब्दाचा अर्थ 'नेणे' असाच आहे. अंध माणसाला इच्छित स्थळी 'नेण्या' साठी दुसऱ्या व्यक्तीची मदत घ्यावी लागते. म्हणजे नेतो तो नयन असाच त्याचा अर्थ आहे. वैदिक विधीसाठी दिवस आणि मुहूर्त निश्चित करायला खगोल / ज्योतिषशास्त्र हा आमचा 'डोळा' आहे.

-----

प्रकरण २

# खगोलशास्त्र आणि ज्योतिषशास्त्र

खगोलशास्त्र हे उपग्रह आणि खगोल यांची स्थाने पाहते. ते शास्त्र, त्यांचा विश्वाच्या आणि व्यक्तीच्या जीवनावर कसा परिणाम होतो, ह्यात लक्ष घालीत नाही. हे आकाशस्थ गोल/ग्रह आपल्याला किती उपयुक्त आहेत किंवा ते आपल्याला कसे उपयुक्त करून घेता येतील हे त्या शास्त्राचे कार्य नाही. अशी कार्ये ज्योतिषशास्त्राची आहेत. ज्योतिषात खगोलशास्त्र आणि ज्योतिषशास्त्र असा दोन्हींचा समावेश होतो.

दिलेल्या वेळेत ग्रहांची, सूर्य-चंद्राची आणि सत्तावीस - अभिजित नक्षत्र धरून अठ्ठावीस नक्षत्रांची स्थिती लक्षात घेऊन, एखादा विधी करण्याच्या परिणामाबद्दल सांगणे हे ज्योतिषशास्त्राच्या क्षेत्रात येते. ग्रहांच्या भ्रमणावरून केलेल्या हिशोबावरून वैदिक विधी करण्यासाठी योग्य वेळ ठरविली जाते. ह्यासाठी गणिती क्रिया आवश्यक असतात.

ज्या स्थानी यज्ञ करायचा असतो त्या स्थानाची, यज्ञभूमीची मोजमापे काही अटींवर आधारलेली आहेत. जर अपेक्षित फळ मिळवायचे तर ह्यास (मोजमापांना) चिकटून राहावे लागते. अशा प्रकारे गणित हे वैदिक धर्माचे सेवक म्हणून विकास पावले.

-----

## प्रकरण ३

# प्राचीन गणिती ग्रंथ

आपण पाहिले की ज्योतिषशास्त्राचे तीन भाग आहेत. मठामध्ये ह्या शास्त्राचा विशेष अभ्यास केलेला एक विद्वान मनुष्य होता. एक पदवी देऊन त्याचा सन्मान करण्याची आमची इच्छा होती आणि 'त्रिस्कंध-भास्कर' म्हणजे ज्योतिषाच्या तीनही भागांचा सूर्य अशी पदवी ठरविली होती. स्कंध याचा शब्दशः अर्थ झाडाच्या खोडाला फुटलेली एक मोठी फांदी. ज्योतिषाच्या तीन शाखा अशा आहेत : सिद्धान्त, होरा आणि संहिता.

सिद्धान्त-शाखेचा अंकगणित, त्रिकोणमिती, भूमिती आणि बीजगणिताशी संबंध असतो. नंतरच्या शतकांमध्ये पाश्चात्त्य देशांमध्ये विकास पावलेले उच्च गणित आपल्या प्राचीन ज्योतिषात आढळते.

संस्कृतमध्ये 'व्यक्त-गणित' म्हटल्या जाणाऱ्या अंकगणितात बेरीज, वजाबाकी, गुणाकार आणि भागाकार यांचा समावेश असतो. 'अव्यक्त-गणित' म्हणजे बीजगणित. 'ज्य' म्हणजे पृथ्वी आणि 'मिती' म्हणजे मापनाची पद्धती. 'ज्यामिती' हा शब्द यज्ञस्थानाच्या मोजमापांच्या गरजेतून उत्क्रांत झाला. भूमिती हा शब्द ह्या शब्दापासून आला. geometry मधील geo हा शब्द 'ज्य' पासून आला. गणितातील व्यवसायाला 'समीकरण' म्हणतात ते equation प्रमाणेच असते.

वेदांचे सहावे अंग कल्प (मी त्यासंबंधी नंतर बोलणार आहे.) याचा पाचव्या अंगाशी म्हणजे ज्योतिषाशी खूप संबंध आहे. कल्पामध्ये 'शुल्ब-सूत्रे' नावाचा एक विभाग आहे. ही सूत्रे यज्ञवेदीच्या (आहुती देण्याची वेदी) अचूक मापांचा उल्लेख करतात. यज्ञभूमीच्या वैशिष्ट्याला 'चयन' म्हणतात. शुल्ब-सूत्रे अनेक चयनांशी संबंधित असतात. उदा. गरुडासारखा आकार. ती सूत्रे आपल्याला वीट-भट्टी बांधण्याविषयी-अमुक एक आकाराच्या चयनाला किती विटा लागतील, हे सांगतात. ह्या सर्वात सिध्दान्त स्कंध वापरला जातो.

आपस्तंब शुल्ब-सूत्रांमध्ये एक समीकरण आहे जे आजवर कोणीही सिद्ध करू शकले नाही. पाश्चात्त्यांना ते दोषपूर्ण वाटले याचे केवळ कारण म्हणजे ते, ते समीकरण सोडवू शकले नाहीत. आता त्यांनी ते बरोबर असल्याचे मान्य केले आहे. भारतीयांनी हजारो वर्षांपूर्वी गणितात जी प्रगती केली तिने पश्चिमेकडील लोकांना चकित केले आहे. अजूनही अनेक समीकरणे सोडवायची राहिली आहेत.

आपली शास्त्रे गणिताच्या 'रेखागणित', 'कुट्टक', 'अंगपाक', इ. शाखांचा उल्लेख करतात. 'अव्यक्त-गणिताला' 'बीजगणित' असेही म्हटले जाते.

आठशे वर्षांपूर्वी भास्कराचार्य नावाचा एक गणितज्ञ होता. त्यांच्या जीवनातील एक घटना, नियती किती निष्ठुर असते, त्याचे उदाहरण आहे. भास्कराचार्यांना लीलावती नावाची एक मुलगी होती. ते महान ज्योतिषी असल्याने त्यांना आढळले की तिच्या पत्रिकेत विवाहानंतर लवकरच विधवा होईल असे सुचविणाऱ्या मंगळाच्या अशुभ स्थितीमुळे येणारा 'मंगळ-दोष' आहे, पण त्यांना खात्री होती की, एक ज्योतिषी म्हणून चातुर्य आणि हिकमतीच्या जोरावर ते पूर्वलक्षणावरून जाणलेली त्यांच्या मुलींची नियती बदलू शकतील. सर्व ग्रह वधूला लाभणारे असतील अशा लग्नावर त्यांनी लीलावतीचा विवाह साजरा करण्याचे ठरविले. त्यांना वाटले की ह्याने (मुहूर्ताने) लीलावती ''दीर्घ-सुमंगली'' राहण्याची खात्री असेल.



त्याकाळी आज आपल्याकडे आहेत तशी घड्याळे नव्हती. वेळ मोजण्यासाठी जलपात्र वापरले जाई. त्याला वरचा एक आणि खालचा एक असे दोन भाग असत. वरच्या भांड्यातील पाणी एका छिद्रातून खालच्या भांड्यात ठिबकत असे. खालच्या भागावर काळाच्या घटकानुसार मापाच्या खुणा केलेल्या असत आणि पुढे - नाझिकै (नाडिका), दिवसाचा एक साठावा भाग किंवा २४ मिनिटस् असे, खालच्या भांड्यातील पाण्याची पातळी पाहून दिवसमान मोजले जाई. ('water clock' आणि 'hour-glass') अशी नावे अशा उपकरणांना आहेत. पाण्याचे लवकर बाष्पीभवन होत असल्याने काही वेळेस त्याऐवजी वाळू वापरली जात असे.

त्या काळातील प्रचलित प्रथेनुसार लीलावतीचा विवाह ती लहान असतानाच केला जाणार होता. ठरलेल्या दिवशी ती जलमापकाच्या जवळ बसली आणि ती त्या उपकरणाच्या आकर्षणाने त्यावर झुकली. ती जशी इकडेतिकडे चुळबुळ करीत असता, तिच्या नाकातील चमकीतील एक मोती सैल झाला आणि पडून त्या भांड्याच्या छिद्रात जाऊन बसला. खालच्या भांड्यात येणारा प्रवाह कमी झाला. म्हणून विवाहासाठी ठरलेली त्या घड्याळाने दाखविलेली वेळ योग्य नव्हती-शुभकाळ निघून गेलेला होता. लीलावतीसह कोणीही त्या जलघड्याळात पडलेला मोती पाहिला नव्हता. जेव्हा तिच्या वडीलांच्या आणि इतरांच्या हे लक्षात आले तेव्हा फार उशीर झालेला होता. त्यांच्या लक्षात आले की नियतीवर कोणीही मात करू शकत नाही.

नंतर भास्कराचार्यांनी एक गणितावरचा ग्रंथ लिहिला आणि त्याला 'लीलावती' हे नाव तिच्यावरून दिले. वडिलांनी त्यांच्या विधवा मुलीला गणित शिकविले आणि ती त्या विषयात अतिशय प्रवीण झाली. 'लीलावती' हा ग्रंथ अंकगणित, बीजगणित यांच्याशी संबंधित आहे. गणितातील प्रश्न श्लोकरूपाने गोष्ट म्हणून सांगितले गेलेले असे हे मजेशीर पुस्तक आहे. भास्कराचार्यांनी 'सिद्धान्त-शिरोमणी' हा ग्रंथ सुद्धा लिहिला, त्यात ग्रहगोलांची स्थिती आणि त्यांचे भ्रमण निश्चित करण्याचा विचार मांडला जातो.

'प्राचीनलेखमाले' तील एका आज्ञापत्रावरून आपल्याला समजून येते की एका गुर्जर (गुजराती) राजाने भास्कराचार्यांचे हे कार्य लोकप्रिय होण्यासाठी देणगी दिली होती.

युक्लिडच्या भूमितीचे ७,८,९ आणि १० भाग नष्ट झाल्याचे मानले जाते. संस्कृतमधील गणितावरील बाराही ग्रंथ अजूनही उपलब्ध आहेत. ''गुणाकारात अनेक वेळा बेरजा करणे ; भागाकारासाठी अनेकवेळा वजाबाकी करणे''. आपल्या प्राचीन गणितावरील ग्रंथांमधील अशा हिशेबाच्या सोप्या पद्धतीविषयी आपण अज्ञ आहोत.

वराहमिहिर भास्कराचार्याच्या फार पूर्वी होऊन गेला, सुमारे १५०० वर्षांपूर्वी त्याने 'बृहत-संहिता' आणि 'बृहज्जातक' अशा ग्रंथांसह अनेक ग्रंथ लिहिले. पहिले म्हणजे 'बृहत-संहिता' हे अनेक शास्त्रांचे सार आहे. आपल्या पूर्वजांनी विविध विषयांत केलेल्या प्रगतीची साक्ष त्यात समावेश असलेल्या बाबी देतात. 'बृहज्जातकात' सर्वकाही ज्योतिषाबाबत आहे.

आर्यभट हा त्याच्या 'आर्यभटीय-सिद्धान्ता' बाबत प्रसिद्ध आहे. तो सुद्धा १५०० वर्षांपूर्वी होता. हल्ली वापरात असलेले व्यक्त-गणित हे त्याच्या सिद्धान्तावर आधारलेले आहे. वराहमिहिर आणि आर्यभट यांची आजकालच्या गणितज्ञांकडून खूप स्तुती होते.

ही गणितावरची सर्व पुस्तके ग्रहगोलांच्या हालचाली संबंधी आहेत. प्राचीन गणनेनुसार सात ग्रह आहेत-पाच ग्रह आणि सूर्य व चंद्र. राहू आणि केतू यांना 'छाया ग्रह' म्हटले जाते आणि त्यांच्या कक्षा सूर्य आणि चंद्राच्या विरुद्ध असतात.

-----

## प्रकरण ४

# ग्रह आणि तारे

ग्रह हे ताऱ्यांपासून भिन्न कसे आहेत? ग्रह सूर्याभोवती फिरतात; तारे सूर्य 'मंडळात' नसतात. (ते सौर पद्धतीचे घटक नसतात) जर तुम्ही एखादा हिरा हातात घेतला आणि इकडेतिकडे हलवत राहिला तर तो चमकेल. तारे अशाच प्रकारे चमकतात आणि लुकलुकतात, पण ग्रह लुकलुकत नाहीत.

सूर्य आणि तारे हे स्वयंप्रकाशी आहेत. तारे पॉलिश केलेल्या हिऱ्याप्रमाणे चमकतात. गुरू आणि शुक्र हे मोठ्या ताऱ्यांसारखे चमकतात पण ते लुकलुकत नाहीत. सूर्यालासद्धा ताऱ्यांप्रमाणे तेज आहे. (तो प्रत्यक्षतः तारा आहे.) जर तुम्ही सूर्याकडे क्षणभर टक लावून पाहिले तर त्याच्या भोवतालचे धुकेमय वातावरण नाहीसे होईल. नंतर तो पाण्यात तरंगणाऱ्या तेजस्वी काचेच्या थाळीसारखा दिसेल आणि तो स्थिर असणार नाही. चंद्र तसा नसतो. सूर्य लुकलुकतो हे सिद्ध कसे करायचे मी तुम्हाला सांगेन. छपरातील झरोक्यातून सूर्याचा खाली येणारा प्रकाश पहा. तसेच खोलीत येणारा चंद्राचा प्रकाश पहा. तुम्हाला सूर्याची किरणे काही हालचाल दाखवतात पण चंद्राचे तसे नाही. ग्रहही चंद्रासारखेच असतात.

जर एखादा तारा मोठा असेल तर आपल्याला त्याचा प्रकाश चमकदार हिऱ्यातून बाहेर पडणाऱ्या रंगांसारखे सात रंगांत वक्रीभूत झालेले दिसतात (ता ना पि हि नि पा जा).

सूर्याला 'सप्ताश्व' (सात अश्व असलेला - सूर्यदेवाचा रथ सात अश्वाकडून ओढला जातो) म्हटले जाते. असेही म्हटले जाते की रथ ओढणारा एकच अश्व आहे पण त्याला सात वेगवेगळी नावे आहेत. 'अश्व' चा एक अर्थ 'किरण' असाही आहे. म्हणून 'सप्ताश्व' म्हणजे सूर्य सात प्रकारची किरणे किंवा रंग बाहेर टाकतो. अर्थात एकाच प्रकाशाचे सात रंगात विभाजन होते. तैत्तिरीय आरण्यकामध्ये स्पष्ट म्हटले आहे की तो एकच अश्व किंवा किरण ह्याला सात नावे आहेत : ''एको अश्वो वहति सप्तनामः''

तारे स्वयंप्रकाशित असतात तर ग्रह परावर्तित प्रकाशाने चमकतात. ताऱ्यांचा प्रकाश स्थिर नसतो. म्हणून आपण (दि स्टार ह्या जेन टेलरच्या कवितेत) म्हणतो,
("Twinkle Twinkle, little star, How I wonder what you are!")

तारे पूर्वेला उगवतात आणि पश्चिमेला मावळतात. ग्रहही पश्चिमेकडे प्रवास करतात पण रोज थोडे पूर्वेकडे जात राहतात. हे एखाद्या पूर्वेकडे वेगाने जाणाऱ्या आगगाडीत एखाद्या प्रवाशाने गाडीतच पश्चिमेकडे जाण्यासारखे आहे. अशा प्रकारे सात ग्रह पूर्वेकडे जात राहतात.

-----

## प्रकरण ५

# ग्रह आणि मानवी जीवन

मानवाची स्थिती, सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र आणि शनी, आणि छायाग्रह राहू आणि केतू ह्या नऊ ग्रहांच्या स्थितीतील बदलांशी सुसंगत असते. मानव सदैव सौख्य भोगू शकत नाही किंवा सतत दुःख सहन करीत नाही - म्हणजे तो सुख आणि दुःखाचे मिश्रण अनुभवत असतो. आज तो वरच्या स्थानी ढकलला गेला असेल. उद्या तो अगदी खोल ढकलला जाईल. फक्त मानवालाच दैवगती असते असे नाही. संस्थांना, अगदी राष्ट्रांना सुद्धा चढ-उतार असतात.

ऋषींना ग्रहांच्या स्थिती, त्यांच्या हालचाली आणि मानवाची नियती, त्याच्याकडून अनुभवली गेलेली सुख-दुःखे यांतील संबंध दिसला. ज्योतिषशास्त्राची 'होरा-स्कंध' नावाची एक शाखा आहे. एखादे काम किंवा व्यवसाय सुरू करते वेळेस जर आपल्याला ग्रहस्थिती समजली तर ते कसे आकारास येईल, त्यात आपण किती यशस्वी होऊ हे आपण शोधून काढू शकू. आपल्या जन्माच्या वेळेस असलेली ग्रहांची स्थिती आपल्या कुंडलीत मांडली तर आपल्या संपूर्ण जीवनातील आपल्या भाग्याचे भविष्य सांगता येईल.

मानवी जीवनातील चढ-उतार, त्याची सुख-दुःखे यांची विविध कारणे दिली जातात. हे त्याला आलेल्या आजारपणाची विविध कारणे शोधण्यासारखे आहे. डॉक्टर तो आजार वायू, पित्त आणि कफ ह्या धातूंच्या असंतुलनामुळे झाला असल्याचे स्पष्ट करेल. एखादा मंत्रवादिन रुग्णावर देव नाराज असल्याचे कारण सांगेल तर ज्योतिषी हे सर्व त्याच्या (रुग्णाच्या) ग्रहांमुळे असल्याचे निरीक्षण नोंदवेल. धर्मशास्त्रात प्रवीण असलेला एखादा पंडित त्याच्या आजाराचे कारण त्याच्या भूतकाळातील कृत्याची, त्याची कर्मे हे कारण देईल आणि मानसशास्त्रज्ञ त्याच्या शारीरिक व्याधींचा संबंध त्याच्या भावनिक असंतुलनाशी असल्याचे सांगेल. खरे कारण काय?

ही सर्व भिन्न कारणे सबळ असू शकतील. सर्व मिळून एक अनुभव देतात. जेव्हा पाऊस पडतो तेव्हा ओल येते आणि ते ठिकाण पंख असलेल्या पांढऱ्या मुंग्यांनी भरून जाते. बेडूक डरावडराव करतात. ही सर्व पावसाची लक्षणे आहेत. अनेक बाह्य लक्षणे ही भूतकाळातील कर्मांची फळे म्हणून प्रकट होतात. ती सर्व एकमेकांशी संलग्न आहेत. आपल्या कर्मानुसार आपल्या जीवनाचे नियंत्रण करणाऱ्या ग्रहांची गती असते. आपल्याला आपल्या पूर्व जन्मातील कर्मांचे परिणाम विविध प्रकारे जाणवतात. ग्रहांनी दर्शविलेले असे परिणाम शोधून काढण्यात ज्योतिषीय गणिताची मदत होते.

-----

## प्रकरण ६

# शकुन आणि लक्षणे

तुम्ही पाण्याचा कोठे शोध घेऊ शकता? भूजल कोठे आढळते? किंवा भूगर्भात पाण्याचे प्रवाह कोठे वाहतात? जमिनीखालील पाण्याचे कोणते चिन्ह तुम्हाला भूपृष्ठावर दिसते? सुगंधाची कशी निर्मिती होते? आपल्या घराची योग्य मापे कोणती? ह्या प्रश्नांची चर्चा ज्योतिषाच्या संहिता-स्कंधामध्ये केलेली आहे. तसेच शकुन आणि लक्षणे यांचीही.

'शकुन' ही एक गोष्ट आहे, 'निमित्त' ही अगदी वेगळी गोष्ट आहे. 'शकुन' याचा शब्दशः अर्थ एक पक्षी आहे. फक्त पक्ष्यांशी संबंधित लक्षणे शकुन ह्या गटात येतात. ह्या जगातील सर्व गोष्टी एकमेकांशी संबंधित असतात. सर्व घटना एकमेकांशी जोडलेल्या असतात. आपल्याला ह्या घटनांची गुंफण ज्यामुळे झाली ते अचूक मापन आणि पद्धत कळली तर आपल्याला सर्वकाही समजेल. त्या एकाच्या इच्छेनुसार आणि विशिष्ट अचूक पद्धतीनुसार ह्या जगातील प्रत्येक गोष्ट घडते. हस्तसामुद्रिक, 'आरुडम' (भविष्य सांगण्याची पद्धत), ज्योतिष हे सर्व आपसात जोडलेले आहे.

उजवीकडून डावीकडे उडत जाणारा पक्षी काय सुचवितो? अमुकअमुक पक्ष्यांच्या कूजनाने काय भाकीत केले जाते? ह्या प्रकारच्या प्रश्नांचा समावेश शकुन-शास्त्रात होतो. 'निमित्त' म्हणजे भविष्यकाळात घडणाऱ्या गोष्टीचे लक्षण. भगवद् गीतेत पहिल्या अध्यायात ३० व्या श्लोकात कुरुक्षेत्रावरील युद्ध सुरू होण्यापूर्वी अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो.

''निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव''
''न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वास्वजनमाहवे ।''

''तो 'निमित्त' हा अचूक शब्द वापरतो. आपण निष्काळजीपणे 'शकुन' हा शब्द वापरतो. जेव्हा आपल्या मार्गावर एखादी मांजर आडवी जाते तेव्हा ते निमित्त; जेव्हा आपल्या डोक्यावरून गरुड उडतो तेव्हा तो शकुन असतो.

अर्जुनाकडे पुन्हा जाऊ. भगवान गीतेत ११ व्या अध्यायात ३३ व्या श्लोकात अर्जुनाला सांगतात,

''तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ।।''

एखाद्याच्या शत्रूंना ठार मारणे (किंवा नातलगांना) हे पाप आहे असे मानून शोक करणाऱ्या अर्जुनाला कृष्ण सांगत आहेत. कृष्ण सांगतात, ''मी अगोदरच त्यांना ह्या युद्धात ठार करण्याचे ठरविले आहे. म्हणून ते जवळजवळ मृतच आहेत. मीच त्यांना ठार मारणार आहे. तू फक्त

साधन आहेस.'' (निमित्तमात्र भव)

निमित्त स्वतःच काही परिणाम घडवत नाही. ते फक्त, कोणत्यातरी घटकाने नेमून दिलेला परिणाम दर्शविते किंवा अन्य शब्दांत सांगायचे तर ते केवळ आपल्या पूर्व कर्माच्या फलांचा निर्देश करते.

-----

## प्रकरण ७

# आधुनिक शोध आणि प्राचीन ग्रंथ

असे अगदी थोडे शास्त्रीय शोध आहेत की ज्यांचा उल्लेख वराहमिहिराच्या 'बृहत-संहिता' मध्ये नाही.

आकाशात ग्रहगोल कसे राहतात? ते पडत नाहीत हे कसे? प्रत्येकाला वाटते की अशा प्रश्नांना न्यूटनला उत्तर सापडले. अगदी प्राचीन असलेल्या सूर्यसिद्धानाचे पहिलेच कडवे म्हणते की आकर्षणाचे बळच पृथ्वीला खाली पडण्याला रोखते.

शंकराचार्यांच्या उपनिषदांच्या भाष्यात पृथ्वीच्या आकर्षण शक्तीचा उल्लेख आहे. जर आपण एखादी वस्तू वर फेकली तर ती खाली जमिनीवर पडते. हे काही त्या वस्तूच्या स्वरूपामुळे नव्हे तर पृथ्वीच्या आकर्षणबळामुळे होय'. 'आकर्षण-शक्ती' म्हणजे आकर्षणबळ, एखादी गोष्ट खेचण्याची किंवा ओढण्याची शक्ती. प्राण म्हटला जाणारा श्वास वर जातो, अपान खाली खेचतो. म्हणून जे बळ काहीतरी खाली खेचते तो 'अपान' होय. आचार्य म्हणतात की पृथ्वीला अपान शक्ती आहे. प्रश्नोपनिषद (३.८) म्हणते :

''आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदत्येष ह्येनं चाक्षुषं प्राणवमनुह्लानः ।
पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्यान्तरा यदाः काशः स समानो वायुर्व्यानः ।।

म्हणजे ''पृथ्वीची देवता मानवी शरीराला अपान शक्तीने प्रेरणा देते.'' ह्यावरील भाष्यामध्ये शंकराचार्य म्हणतात की, जशी वर फेकलेली वस्तू पृथ्वीकडून आकर्षिली जाते त्याप्रमाणे वर जाणारा प्राण अपानाकडून खाली ओढला जातो''. ह्याचा अर्थ असा की आपल्या उपनिषदांमध्ये गुरुत्वाकर्षणाच्या नियमाचा संदर्भ आहे. अशी अनेक मौल्यवान सत्ये आपल्या प्राचीन शास्त्रांमध्ये खोलवर रुजलेली आहेत. त्यांच्या शोधापूर्वी अनेक शतके ज्या संकल्पना आपल्याला ज्ञात होत्या, त्यांच्याबाबतच्या आपल्या अज्ञानामुळे परकीयांनी विचारार्थ मांडलेल्या संकल्पनांना आपण अवास्तव मान देतो. आपले ज्योतिषसुद्धा काही हजारो वर्षे जुने आहे. तरीही जगात प्रचलित असलेल्या गणिती पद्धतींचा त्याने (शास्त्राने) पूर्वीच विचार केलेला होता.

कल्पाच्या प्रारंभी सर्व ग्रह एकाच रेषेत होते. पण अनेक शतकांमध्ये त्यांनी त्यांचा मार्ग बदललेला आहे. जेव्हा दुसरे कल्प सुरू होईल, तेव्हा ते पुन्हा एका रेषेत येतील.

कोणताही धार्मिक विधी करण्याच्या प्रारंभी आपण जो संकल्प करतो त्यात विश्वाचे वर्णन, कालचक्राचा संदर्भ आणि अशाच गोष्टींचा समावेश असतो. हे सर्व ज्योतिषाचा एक भाग असते.

काही शतकांपूर्वी आपल्याला केवळ पृथ्वीच्या आकर्षणशक्तीची माहिती होती असे नव्हे तर तिच्या सूर्याभोवतीच्या भ्रमणाविषयीचेही ज्ञान होते. आर्यभट, वराहमिहिर आणि इतरांनी, पाश्चात्त्य खगोलशास्त्रज्ञांच्या आणि शास्त्रज्ञांच्या फार पूर्वी ह्या केंद्रभूत मंडळाविषयी सांगितलेले आहे. १५४३ मध्ये पोलिश खगोलशास्त्रज्ञ निकोलस कोपर्निकसने एक पुस्तक प्रसिद्ध करून सूर्य विश्वाच्या केंद्रस्थानी असून पृथ्वी त्याभोवती फिरते असे सांगितले. अशा प्रकारे १६ व्या शतकापर्यंत युरोपातील लोकांचा असा विश्वास असे की विश्वाच्या मध्यावर पृथ्वी आहे आणि सूर्य तिच्याभोवती फिरतो. त्यांचा असाही विश्वास असे की ह्याचमुळे रात्र आणि दिवस होतात. जर कोणी वेगळा दृष्टिकोन व्यक्त केला तर त्याला धार्मिक नेत्यांकडून खांबाला बांधून जाळले जाई.

''पृथ्वी सूर्याभोवती फिरते, सूर्य पृथ्वीभोवती फिरत नाही.'' असे आर्यभटाने सांगितले. हे त्याने पाचव्या शतकात सांगितले. त्याचे सिद्धान्त पुढील खगोलशास्त्रज्ञांना ज्ञात होते. त्याची गणिते अचूक असल्याने ग्रहणांची भाकिते करता आली. त्याने आपल्या दृष्टिकोनाच्या मागे असलेल्या तर्काचे वर्णन करण्यासाठी एक सुंदर नाव दिले. 'लाघव-गौरव न्याय'. लघु म्हणजे हलके, लहान इ. आणि लाघव हा शब्द त्यापासून आलेला आहे. लघुच्या विरुद्ध 'गुरू' जड, मोठा इ. गुरू हा शब्दही वजनदार व्यक्तिमत्त्व, आचार्य किंवा शिक्षक यांसारखा थोर मनुष्य, ज्याने एखाद्या शास्त्रात प्रावीण्य मिळविलेले आहे. अशांचा निर्देश करतो. जर आचार्य गुरू असतील तर शिष्य लघू असला पाहिजे. विद्यार्थी हा लहान आणि त्याच्या गुरूशी तुलना करता हलका असतो. म्हणून तो गुरूभोवती फिरतो. हे 'लाघव-गौरव न्याय' ह्यावर आधारलेले आहे. पृथ्वीचे सूर्याभोवतीचे भ्रमणासाठी हे कारण पुढे करून आर्यभटाने पारंपरिक शास्त्रीय श्रद्धांची विज्ञानाशी सांगड घातली.

युरोपात पूर्वीच्या काळी धार्मिक नेते विज्ञानाला विरोध करीत आणि शास्त्रज्ञांना पाखंडी मानून जाळून टाकीत असत. पण आज हिंदू धर्म दुसऱ्या विश्वाची काळजी करण्यात ह्या जगाकडे दुर्लक्ष केल्याने विज्ञानाच्या प्रगतीत अडथळा बनला असा हास्यास्पद आरोप करण्यात, त्याच लोकांच्या वंशजांशी आपण सहमत होतो. खरे पाहता, आपली पारंपरिक शास्त्रे ही विज्ञानाची कोठारे आहेत.

''सूर्य स्थिर राहतो आणि पृथ्वी त्याच्याभोवती फिरते. पृथ्वी सूर्याभोवती परिभ्रमण करते त्यामुळे आपल्याला वाटते की सूर्य रोज पूर्वेकडे उगवतो आणि पश्चिमेकडे मावळतो. ''हे ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणामध्ये सांगितले आहे. ग्रंथाचा मूळ भाग स्पष्ट म्हणतो ''सूर्य उगवतही नाही आणि मावळतही नाही''.

पृथ्वी सूर्याभोवती फिरते हे भारतातील सर्व सुशिक्षित लोकांना माहीत होते हे तिरूमला नायकाचा मंत्री असलेल्या नीलकंठच्या 'शिवोत्कर्ष-मंजिरी'तील एका उताऱ्याने दाखवून दिले

आहे. त्याच्या ग्रंथातील एक कडव्याचा असा आरंभ होतो. ''भूमिर भ्रामयति'' आणि आपल्याला हेही समजते की त्या लेखकाचे चुलत आजोबा अप्पय्या दीक्षित यांनासुद्धा हे सत्य माहीत होते. ह्या श्लोकात काय आहे?

शिवाला 'अष्टमूर्ती' म्हटले आहे. पृथ्वी, पाणी, हवा, अग्नी, अवकाश, सूर्य आणि चंद्र, यजमान किंवा बळी देणारा-ते सर्व ईश्वराचे अवतार (मूर्ती) आहेत. त्यातील फक्त यजमानाला भ्रमण किंवा गती नाही. अप्पय्या दीक्षित म्हणतात की बाकीच्या सर्वांना भ्रमण आहे. त्यांच्या भावाचा नातू नीलकंठ दीक्षित यांच्या प्रश्नात असलेल्या श्लोकात त्यांनी असे म्हटल्याचा उल्लेख आहे.

आपण पाहतो की हवेला हालचाल असते, त्यायोगे अग्नी स्थिर राहत नाही, पाणी वाहत राहते. जेव्हा आपण आकाशात पाहतो तेव्हा आपल्या लक्षात येते की सूर्य आणि चंद्र त्यांच्या ठरलेल्या स्थानीच राहत नाहीत. अवकाशाच्या बाबतीत म्हणायचे तर ते ध्वनीने भरलेले आहे आणि ते स्थिर राहू शकणार नाही. परंतु पृथ्वी ठळकपणे स्थिर राहते. तरीसुद्धा अप्पय्या दीक्षित म्हणतात की तिला गती आहे. ''ती भ्रमण करते.''

आपण पृथ्वीच्या आकाराचा विचार करू या. युरोपियन लोक दावा करतात की पृथ्वी चेंडूसारखी असल्याचा त्यांनी प्रथम शोध लावला, पूर्वी असे मानले जात होते की ती थाळीसारखी सपाट आहे. ठीक आहे. आपण भूगोलासाठी कोणता शब्द वापरतो ? 'भूगोल शास्त्र' फक्त 'भूशास्त्र नाही'. 'आपल्याला फार पूर्वीपासून माहीत होते की पृथ्वी गोल, वाटोळी आहे.

विश्वाला त्याच्या सर्व आकाशगंगांसह आपण 'ब्रह्मांड' म्हणतो. त्याचा अर्थ ब्रह्माने तयार केलेले अंडे (वैश्विक अंडे). अंडे आकाराने अगदी गोल नसते, लंबगोलाकार असते. आधुनिक विज्ञानानुसार विश्वसुद्धा आकाराने लंबगोलाकार आहे. हे विश्व नेहमी गतिशील असते असे आधुनिक खगोलशास्त्रज्ञाचे निरीक्षण आहे. त्याला आपण वैदिक काळापासून 'जगत्' नावाने ओळखत होतो. त्या शब्दाचा अर्थ काय ? जे नेहमी स्थिर नसून गतिशील आहे, जे 'जात आहे'.

आपल्या देशात सुद्धा असे लोक होते की ज्यांचा पृथ्वी आपल्या आसाभोवती फिरते यावर विश्वास नव्हता. मला अशा एका विचारसरणीचे उदाहरण देऊ द्या. पृथ्वीचा परीघ २५,००० मैल आहे. जर ती २४ तासात स्वतःभोवती फिरते तर ती एका तासात १००० मैल किंवा १६ किंवा १७ मैल एका मिनिटात स्वतःभोवती फिरते. ज्यांना पृथ्वीच्या भ्रमणावर विश्वास नव्हता त्यांनी त्यांचा मुद्दा सिद्ध करण्याचा असा प्रयत्न केला. ''मायलापूर (मद्रासमध्ये) एक झाड आहे. कल्पना करा की एका फांदीवर एक कावळा बसला आहे. तो एका क्षणी ते स्थान सोडतो आणि उंच सूर मारतो आणि दुसऱ्या मिनिटाला तो मायलापूरच्या

त्याच झाडाच्या फांदीवर बसतो. जर पृथ्वीचे भ्रमण हे जर खरे असेल तर हे कसे शक्य आहे ? तो कावळा जेथून निघाला त्यापासून १६ किंवा १७ मैलावरील एखाद्या ठिकाणी उतरायला हवा.

ह्या विधानाला कसे उत्तर दिले गेले ते मी तपासून पाहिले नाही. पण ज्यांना हे शास्त्र माहीत आहे त्यांना विचारल्यावर ते म्हणाले, ''पृथ्वीला तिच्या वातावरणाने सुमारे २०० मैलांपर्यंत वेढलेले आहे. त्याच्या पलीकडे इतर वलये आहेत. जेव्हा पृथ्वी फिरते तेव्हा ती सुद्धा तिच्यासह फिरतात.'' आधुनिक विज्ञानाचा दृष्टिकोन सांगताना माझे थोडे चुकले असेल. काहीही असो, जेव्हा पृथ्वी फिरते तेव्हा वातावरणही फिरते यात शंका नाही.

ज्यांना अरेबिक संख्या म्हणतात त्या वस्तुतः भारताच्या आहेत. ही बाब खुद्द पाश्चात्त्यांनी शोधली. शून्य हे सुद्धा आपले योगदान आहे आणि त्याशिवाय गणित काहीही प्रगती करू शकले नसते. कोणत्याही संख्येला शून्याने भागले तर भागाकार अनंत येतो हे सत्य भास्कराचार्य स्थापित करतात. त्यांच्या एका गणिताच्या ग्रंथाच्या समारोपात आशीर्वादपर श्लोकात ते शून्याचा संबंध अंतिम सत्याशी जोडतात.

जसा भाजक लहान होत जातो तसा भागाकार वाढत जातो, नाही का ? जर तुम्ही १६ ला ८ ने भागले तर भागाकार २ येईल; त्याच संख्येला ४ ने भागले तर भागाकार ४ येईल. जर २ ने भागले तर भागाकार ८ येईल. जर शून्याने भागले तर ? भागाकार अनंत येईल. जर भाजक शून्य असेल तर कोणतीही संख्या असो भागाकार अनंत येईल. भास्कराचार्य त्याला 'खाहर' हे नाव देतात. 'खम् म्हणजे शून्य, 'हरम्' म्हणजे विभाजन-भास्कराचार्य म्हणतात, ''मी त्या अनंत असलेल्या परमात्म्याला वंदन करतो.

-----

प्रकरण ८

# अंधश्रद्धा नव्हे

''हिंदुशास्त्रे ही सर्व मूर्खपणा आहे.'' आपल्या धर्माचे टीकाकार म्हणतात, ''ते म्हणतात की पृथ्वीच्या उत्तरेला मेरू पर्वत आहे आणि तेथे राहणाऱ्या देवांचा एक दिवस म्हणजे आपले एक वर्ष आणि सूर्य पृथ्वीभोवती फिरतो. त्यांचा असा विश्वास आहे की खाऱ्या समुद्रासारखे उसाच्या रसाचे आणि दुधाचे महासागर आहेत, खरे तर सात प्रकारचे महासागर आहेत. ही सर्व वटवट आहे.''

महासागर खारट का असावा ? कोणी त्यात मीठ टाकले ? गोड किंवा दुधाचा महासागर का नसावा ? सात बेटांबाबत आणि सात महासागरांबाबत बोलणे मूर्खपणाचे आहे काय ? जी शास्त्रे सात महासागराविषयी म्हणतात ती पृथ्वीच्या स्थानाविषयी काय म्हणतात आणि असेच मेरू हा पृथ्वीच्या उत्तर टोकाला आहे'', ते म्हणतात, ''त्याच्या अगदी विरुद्ध ध्रुव तारा आहे''.

पृथ्वीचे उत्तर टोक उत्तर ध्रुव. ध्रुव तारा त्याच्या नेमका विरुद्ध दिशेला आहे का ?. ''दीर्घ काळापूर्वी'' शास्त्रज्ञ स्पष्टीकरण देतात, ''तसे होता''. पण नंतर मोठे बदल घडून आले आणि पृथ्वी थोडी कलली.'' जेव्हा ध्रुव तारा नेमका उत्तर ध्रुवाच्या विरुद्ध होता त्या काळाचा संदर्भ शास्त्रे देतात आणि त्याकाळी सात बेटे आणि सात महासागर अस्तित्वात असलेच पाहिजेत. जेव्हा स्वांगभ्रमण करणारी पृथ्वी कलली तेव्हा महासागर मिसळले गेले असावेत आणि खारट झाले असावेत आणि कालौघात सात बेटे पाच खंडे झाली असावीत.

जर पृथ्वीच्या उत्तर ध्रुवावर स्थान असेल ते मेरू असले पाहिजे जेथे आपला स्वर्ग किंवा नंदनवन आहे. ही पृथ्वी लिंबासारखी आहे असे मानू. त्याच्या वरच्या बाजूला एक ठिपका आहे तो मेरू शिखर मानू. त्या ठिपक्याच्या संदर्भाने त्या फळावरील कोणताही भाग दक्षिणेकडे असणार. तेथून तुम्ही कोठे जाणार, पूर्वेला किंवा पश्चिमेला ? तुम्ही फक्त दक्षिणेला जाऊ शकता. तुम्ही लिंबाच्या माथ्यावर खूण करून समजून घेऊ शकाल. पृथ्वीवरील सर्व देशांसाठी, सर्व वर्षांत उत्तर दिशा ही मेरू. 'सर्वेषामपि वर्षानाम मेरूत्तरतः स्थितः.''

उत्तर ध्रुवावर सहा महिन्याचा दिवस आणि सहा महिन्याची रात्र असते. हे आपल्याला प्राथमिक वर्गामध्ये शिकवले गेले असले पाहिजे. ह्याचा अर्थ असा की आपले एक वर्ष म्हणजे उत्तर ध्रुवावरील एक दिवस. आपले एक वर्ष हे देवांचा एक दिवस असे सांगण्याचा हा अर्थ होय.

जेव्हा पृथ्वी परिभ्रमण करते तेव्हा अति उत्तरेकडील आणि अति दक्षिणेकडील बिंदूंवर काही परिणाम होत नाही. काही ठिकाणी १८ तास सूर्य प्रकाशेल आणि काही ठिकाणी फक्त

६ तास. पृथ्वीवरील विविध स्थानासंबंधाने दिवस आणि रात्र यांच्या कालावधीत अनेक भेद आढळतात. केवळ काही दिवशी सूर्य थेट पूर्वेला उगवतो आणि एक अंशाचाही फरक न करता बरोबर माथ्यावर असतो. इतर दिवशी तो अन्य कोनांतून (ईशान्येकडून आग्नेयकडे) उगवतो. असा प्रकार उत्तर ध्रुवावर नसतो. तेथे सहा महिने सूर्य प्रकाशतो आणि दुसरे काही महिने अंधार असतो. आणि पुन्हा सूर्यप्रकाशमय महिन्यांमध्ये सूर्य ह्या स्थानाभोवती (उत्तरा ध्रुव) फिरत असल्याचे दिसते.

जेव्हा उत्तर ध्रुवावर सहा महिने सूर्य दिसतो, तो काळ उत्तरायण आणि तसाच प्रकाशमय कालावधी दक्षिण ध्रुवावर असताना दक्षिणायन.

उत्तर ध्रुवाला 'सुमेरू' आणि दक्षिण ध्रुवाला 'कुमेरू' म्हटले जाते. (सुमेरिया हा सुमेरू पासून आला. असे म्हटले जाते की त्या भूमीत वैदिक देवतांचे पूजन होत होते.) जसा उत्तर ध्रुव देवांचे निवासस्थान तसा दक्षिण ध्रुव पितरांचे निवासस्थान आणि नरक आहे. देवता आणि आत्म्याच्या रूपात असलेल्या पितरांना आणि नरकातील रहिवाशांना पाहण्यासाठी योगाद्वारे दिव्य दृष्टी प्राप्त करावी लागते. आपल्याकडे असी दृष्टी नाही. नाही म्हणून आपण त्यांचे अस्तित्व नाकारू शकत नाही. १८७५ मध्ये थिऑसॉफिकल सोसायटी स्थापन करणारी मॅडम ब्लावत्सकी रशियात जन्मली, अमेरिकेत राहिली आणि नंतर भारतात आली. ती जगातील देवता आणि आत्म्यांबद्दल बोलते. आपल्या काळातील महान शास्त्रज्ञ सर ऑलिव्हर लॉज, यांनी आत्मे आणि देवता यांचे अस्तित्व असल्याचे ठासून सांगितले आणि मानवाला त्यांच्यापासून लाभ होऊ शकतो असे प्रतिपादन केले आहे. जर तुम्ही विचारले की खगोल शास्त्राचा विचार केल्यानंतर ज्योतिष शास्त्राने अध्यात्माकडे का वळावे तर त्याला उत्तर असे आहे की त्या दोहोत काही भेद नाही. सर ऑलिव्हरसारखा शास्त्रज्ञही अध्यात्माकडे वळला होता. त्याचे उदाहरण ह्या विधानाला आधार आहे.

जेव्हा देव आणि मर्त्य एकमेकात मिसळले तेव्हा आपले शास्त्र अस्तित्वात आले. आपण धार्मिक विधी करताना जो संकल्प करतो त्याचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न केला तर या वस्तुस्थितीचे आपल्याला आकलन होईल. संकल्प निर्मितीच्या काळापासून आजपर्यंतच्या काळाचा मागोवा घेतो. ज्योतिषामुळे आपल्याला युगाच्या प्रारंभीची ग्रहस्थिती कळते. त्यावेळेस ते सर्व एका ओळीत होते.

आजकालच्या ग्रहगोलांच्या संबंधीचे हिशेब भूतकाळातील हिशेबापेक्षा भिन्न होते. जर हल्लीच्या शोधांचे अहवाल शास्त्रात आढळतात तसे दिसत नसले तरी त्याचा अर्थ ते चुकीचे होत असा नाही. हे शास्त्र जेव्हा ध्रुव ताऱ्याच्या विरुद्ध उत्तर ध्रुव होता आणि सर्व ग्रह एका ओळीत होते तेव्हापासून अस्तित्वात आहे. त्यानंतर निसर्गात व्यापक बदल झाले. दऱ्यांचे पर्वत, पर्वतांचे महासागर, महासागरांची वाळवंटे असे बदल झाले. भूरचना शास्त्रज्ञ अशा प्रचंड

बदलांविषयी सांगतात आणि खगोलशास्त्रज्ञ ग्रहांच्या भ्रमणमार्गाच्या बदलांविषयी सांगतात. म्हणून आपण आज जे पृथ्वी आणि ग्रहांच्या बाबत पाहतो ते शास्त्रात उल्लेखल्यापेक्षा भिन्न आहे.

ज्योतिषशास्त्रानुसार असलेला निर्मितीचा काळ हा आधुनिक शास्त्राशी कमी अधिक प्रमाणात जुळतो. त्रेता युग हे १,२९६,000 वर्षे आणि कृत युग १,७२८,000 वर्षाचे आहे. चार युगे मिळून ४,३२0,000 वर्षाचे महायुग होते. एक हजार महायुगांचा काळ १४ मनुंच्या कालावधी इतका होतो. एका मनुच्या राजवटीचा काळ म्हणजे मन्वंतर. पृथ्वीवर राजेशाही आणि लोकशाही आहे, पण ईश्वराने मनुला सर्व जगाचा राज्यकर्ता म्हणून नेमले आहे. मानवाच्या निर्मितीपासून एकापाठोपाठ १४ मनु जगावर राज्य करीत आहेत. 'मनुष्य' आणि 'मनुज' हे शब्द मनु पासून आलेले आहेत. तसेच इंग्रजी शब्द 'मॅन'. कोणत्याही विधीच्या संकल्पात आपण सातव्या मनुच्या, वैवस्वतच्या वर्षाचा उल्लेख करतो. जर आपण मागे पहिल्या मनुकडे - स्वयंभू मनुकडे गेलो तर आपण मानव जातीच्या उगमाच्या काळापर्यंत येतो, जो आधुनिक शास्त्राशी जुळतो.

संस्कृत शब्द 'मन' म्हणजे विचार करणे. मानव जातीतील मनु हा पहिला विचारशक्ती असलेला. इंग्रजीत एक म्हण आहे. ''मानव हा विचार करणारा प्राणी आहे.'' विचार करण्याच्या क्षमतेच्या विशेष गुणामुळे मनुच्या वंशजांना 'मनुष्य' म्हणू लागले.

चौदा मनुंचा जीवनकाल एकत्रित केला तर ब्रह्माचा एक दिवस होतो (दिनमान) म्हणजे ४,३२0,000,000 वर्षे. त्याची रात्र तितक्याच लांबीची. असा ब्रह्माचा एक दिवस ८,६४0,000,000 वर्षाचा, त्याचे वर्ष म्हणजे असे ३६५ दिवस आणि त्याचे जीवनमान अशी १00 वर्षे. ह्या विश्वाचे आयुष्यही तितकेच. जेव्हा ब्रह्मा याचे जीवन संपते केवळ 'ब्रह्म' राहील आणि विश्व नसेल. नंतर दुसरा ब्रह्मा पुन्हा सर्वत्र निर्मिती सुरू करेल. असे मानले जाते की हनुमान हा पुढील ब्रह्मा असेल.

भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक यांनी सात विश्वे बनलेली असतात. देव, मर्त्य आणि इतर ह्या जगांमध्ये राहतात. भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्लोक यांचा एक गट बनतो. ''भुर्भुवःस्वः'' असे आपण नेहमी धार्मिक विधी करताना म्हणतो. उरलेली चार उच्च स्तरावरील आहेत. जेव्हा ब्रह्मा रात्री झोपी जातो तेव्हा पहिल्या तीन विश्वांचा लय होतो. ह्याला ''अवांतर-प्रलय'' म्हटले जाते. इतर सर्व विश्वे त्याचा जीवनकाल संपेल तेव्हा नष्ट होतील.

शास्त्रज्ञ म्हणतात की सूर्याची उष्णता हळूहळू नकळत कमी होत आहे. सूर्याच्या उबदारपणाशिवाय पृथ्वीवर जीवन असणार नाही. सूर्याची उष्णता इतकी कमी होईल की पृथ्वीवरील जीवन असू शकणार नाही अशा काळाचा हिशेब शास्त्रज्ञांनी केला आहे. नंतर हे

विश्व स्वतःच नष्ट होईल. हा काळ शास्त्रांनी दिलेल्या पुढील "अवांतर-प्रलय'' काळाशी जुळतो.

ब्रह्माचा अर्धा जीवनकाळ संपलेला आहे. हा जीवनकाळ सात कल्पांमध्ये विभागलेला आहे. आता आपण चौथ्या कल्पाच्या, श्वेतवराहच्या अध्यपिक्षा अधिक काळापर्यंत आलेले आहोत. आपण धार्मिक विधी करतो तेव्हा संकल्पामध्ये ब्रह्मा किती वयाचा आहे, कोणत्या शकाच्या काळात आहोत आणि प्रभवापासून सुरू होणाऱ्या ६० वर्षांच्या कोणत्या संवत्सरामध्ये (बार्हस्पतीय किंवा जोव्हिअन चक्र असते) आहोत - दिवस, नक्षत्र आणि लग्न असा सर्व दिनमानाचा उल्लेख असतो. हिशेबानुसार ब्रह्माच्या प्रकटीकरणाचा दिनांक, हा आधुनिक शास्त्राने दिलेला विश्व अस्तित्वात आल्याच्या काळाशी सुसंगत ठरतो.

ब्रह्माला 'परार्ध-द्वय-जीविन' म्हटले जाते. त्याचा अर्थ असा तो दोन परार्ध जगतो. एक 'परार्ध' म्हणजे पराच्या अर्धा. जेव्हा ब्रह्माला 'परार्ध-द्वय-जीविन म्हटले जाते तेव्हा त्याचा अर्थ असा की तो २X१/२ पर इतकी वर्षे जगतो. दोन अर्ध पर म्हणजे एक पर. मग एक पर म्हणण्याऐवजी 'परार्ध-द्वय' का म्हणायचे. ह्याचे कारण असे की ब्रह्माने अगोदरच अर्ध पर पूर्ण केलेले आहे आणि आता ५१ वे चालू आहे. म्हणून अर्ध पर हा शब्द वापरणे अर्थपूर्ण आहे.

एक हजार चतुर्युगे टिकणाऱ्या ब्रह्मा याच्या एका दिवसाच्या (रात्रीच्या नव्हे) काळात चौदा मनु क्रमाने राज्य करतात. म्हणून एक मन्वंतर हे ७१ चतुर्युगाचे असते. आता २८ वे चतुर्युग, वैवस्वत मन्वंतर चालू आहे आणि त्यातील कलियुग आहे. आपल्या संकल्पात आपण ह्या सर्वाचा उल्लेख करतो आणि त्याशिवाय चंद्र, लग्न इ. अनुसार दिवसाचा उल्लेख करतो. ज्यासाठी आपण संकल्प करतो, आपण अंतराळात कोठे आहोत, ब्रह्मांडापासून तो विधी जेथे करतो ते स्थान कोठे आहे ह्याचाही उल्लेख करतो. हे सर्व पत्रावर दिनांक आणि पत्ता लिहिण्यासारखे आहे.

-----

प्रकरण ९

# अनुभवाचा पुरावा

इमारतीच्या छताच्या उघड्या भागातून येणारा प्रकाशकिरण एका विविक्षित ठिकाणी पडतो. सामान्यतः आपण पुढील वर्षी तो नेमका कोठे पडेल हे सांगू शकणार नाही. पण ज्योतिषाच्या साह्याने आपण अंदाज करू शकतो. तसे ते पूर्वी केले जात असे. छतापासून एक मणी अडकविलेला दोरा लटकवला जाई. ठरावीक दिवशी त्याची सावली कोठे पडेल ह्याचा अंदाज जो अचूक करण्यास समर्थ असे त्याला राजाकडून बक्षीस मिळत असे. जरी एखाद्याची क्षमता वादविवादातून सिद्ध झाली तरी त्याला ज्योतिषामध्ये प्रात्यक्षिकाद्वारे सिद्ध करावी लागत असे. ह्या शास्त्राने शिकविलेल्या पद्धती वापरून तुम्ही कोणालाही फसवू शकत नाही. सूर्य आणि चंद्र तुम्ही जे करता त्याचे साक्षीदार असतात. ''प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं''.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

**भाग - ११**

**कल्प**

**प्रकरण १ - वेदपुरुषाचा हात**

# वेदपुरुषाचा हात

वेदपुरुषाचा सहावा अवयव किंवा अंग म्हणजे कल्प, त्याचा हात. हाताला कर म्हटले जाते. कारण तो काम करतो. (किंवा आपण त्याच्या साह्याने काम करतो.) तेलुगूमध्ये त्याला 'से' म्हटले जाते. (भाग ६ प्र. ११). कल्प हे तुमच्या कामात सामावलेले शास्त्र आहे. एखादा वेदपठण करायला शिकतो, शिक्षा, व्याकरण, छंदस, निरुक्त आणि ज्योतिष अभ्यासतो. त्यानंतर तो काय करतो. त्याला करायला सांगितलेले विधी करते वेळेस तो ही शास्त्रे लागू करतो. स्वतःच्या लहरीनुसार वागण्याने लागलेली पापे त्याला धुवून टाकावी लागतात. तो हे चांगली कामे करून करतो. ह्यासाठी त्याला योग्य मंत्र, त्यांचे स्पष्ट उच्चार कसे करायचे ते आणि त्यांचा अर्थ माहीत असावा लागतो. शिवाय योग्य ती सामुग्री आणि ते विधी करण्यासाठी योग्य रचनेचे घर असावे लागते. ह्यांनी मिळालेली फले ईश्वराला अर्पण करावी लागतात. कल्प ह्या सर्वांच्या बाबतीत विचार करतो.

मनुष्य वेद का शिकतो? एखादा वेदांबाबतीत शुद्धता आणि शिक्षा, व्याकरण आणि वृत्ते शिकून त्यातील ध्वनींचा नाद प्राप्त करण्याचा तो का प्रयत्न करतो? विधींसाठी योग्य वेळ शोधण्यासाठी तो ज्योतिष का शिकतो? उत्तर असे आहे की कल्पाच्या आज्ञांची अंमलबजावणी करणे.

एखादा विधी कसा करायचा, चार वर्णांना आणि चार आश्रमांतील (अविवाहित विद्यार्थी-ब्रह्मचारी, गृहस्थ, वनवासी-वानप्रस्थाश्रमी, तपस्वी) लोकांना कोणते विधी सांगितले आहेत. ह्या विविध विधींच्या वेळेस कोणते मंत्र म्हणायचे आणि कोणती सामुग्री जमा करायची ? कोणती भांडी वापरायची आणि किती ऋत्विकाची-पुरोहितांची गरज असते? हे सर्व कल्पाच्या क्षेत्रात येते.

अनेक ऋषींनी कल्पसूत्रात योगदान दिलेले आहे. सहा ऋषींनी कृष्ण-यजुर्वेदासाठी कल्पसूत्रे रचली, ज्यांचे प्रामुख्याने दक्षिणेत अनुकरण केले जाते - आपस्तंब, बौद्धायन, वैखानस, सत्याषाढ, भारद्वाज, अग्निवेश, आश्वलायन आणि शांखायन यांनी ऋग्वेदासाठी कल्पसूत्रे लिहिली. पण यांतील पहिली मोठ्या प्रमाणावर अनुसरली जातात. शुक्ल-यजुर्वेदासाठी कात्यायनाचे कल्पसूत्र आहे. सामवेदाच्या कौथुम, राणायनीय आणि तलवकार शाखा यांच्यासाठी अनुक्रमे लाट्यायन, द्राह्यायन आणि जैमिनी यांनी कल्पसूत्रे रचली.

कल्पामध्ये प्रत्येक शाखेसाठी असलेल्या गृह्यसूत्रांचा आणि श्रौतसूत्रांचा समावेश असतो. (गृह्यसूत्र आणि श्रौतसूत्र, २१ होमांची चर्चा इ. भाग १६ मध्ये पहा). दोन्हींमध्ये गर्भधारणेपासून मृत्यूपर्यंत करावयाच्या सोळा संस्कारांचा विचार असतो. शरीराचे दहन ही सुद्धा एक अंतिम आहुती 'अन्त्येष्टी' म्हटली जाणारी असते आणि ती मंत्र म्हणत केली जाते. 'इष्टी' म्हणजे

बलिदान आणि अन्त्येष्टीमध्ये पवित्र अग्नीला द्रव्य किंवा सामुग्री म्हणून शरीर अर्पण केले जाते.

ब्राह्मणाला २१ यज्ञ करावे लागतात. सात हविर्याग अग्निहोत्रावर आधारलेले; सात पाकयज्ञ आणि सात सोमयाग. त्यापैकी सात हविर्याग आणि सात सोमयाग ह्यांचा गृह्यसूत्रांमध्ये समावेश नाही. ते श्रौतसूत्रातील आहेत. ह्यासह ब्राह्मणांसाठी ४० विधी आहेत - त्यांना संस्कार म्हटले जाते. संस्कार म्हणजे विधी करणाऱ्यास त्याला शुद्ध आणि सुसंस्कृत करतो तो.

अग्निहोत्र घरी केले जाते आणि यज्ञ (मोठ्या प्रकारचा) खास बांधलेल्या दालना मध्ये केले जातात. श्रौतसूत्रात मोठ्या यज्ञाबाबत सूचना असतात, तर गृह्यसूत्रे घरगुती विधीसंदर्भात असतात. पूर्वी दिलेली नावे ही श्रौतसूत्रांच्या लेखकांची आहेत.

कल्पसूत्रांचा चाळीस संस्कारांशी आणि सोळाव्या भागात असलेल्या आठ आत्मगुणांशी (जे व्यक्तीने जोपासायचे असतात.) (आठ आत्मगुण भाग १६ मध्ये) संबंध असतो. सात हविर्यज्ञ आणि सात सोमयाग (एकूण १४) सोडून, उरलेले २६ गृह्यसूत्राच्या वर्गात येतात. त्यात गर्भादान, पुंसवन, सीमान्त, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चौल, उपनयन आणि विवाह आहेत. त्यांच्यावर मी नंतर बोलेन.

आठ आत्मगुण असे आहेत, दया, सहनशीलता, मत्सरापासून सुटका, शुद्धता किंवा स्वच्छता, हेकटपणा नसणे, मन शांत ठेवणे, अभिलाषा न ठेवणे आणि निरिच्छपणा. हे सर्व सामान्य धर्मामध्ये आहेत. वैश्विक गुणात, आणि सर्व जातींकडून जोपासायचे आहेत.

जेव्हा आपण अभिवादन करतो (जसे आपण अग्नी किंवा शिक्षक किंवा ज्येष्ठ यांच्यापुढे दंडवत घालतो) तेव्हा इतर गोष्टींबरोबर आपण ज्या सूत्राचा अवलंब करतो त्याचा उल्लेख करतो. उदाहरण द्यायचे तर, सामवेदी द्राह्यायण सूत्राचा उल्लेख करतात. द्राह्यायणाने फक्त एक श्रौतसूत्र सुरू केले. गोभिलाने दुसरे एक गृह्यसूत्र लिहिले. पूर्वी जेव्हा मोठे यज्ञ करण्याची पद्धती रूढ होती तेव्हा त्यांच्याशी संबंधित असलेल्या श्रौतसूत्रांचा अभिवादनात उल्लेख केला जात असे. आपण श्रौतयज्ञ करीत नसू तरी ही प्रथा चालू राहिली आहे आणि गृह्यसूत्राशी संबंधित असलेल्या विवाहासारख्या कार्यक्रमात म्हणण्यात येते.

पूर्वी गरीब लोक सुद्धा श्रौतविधी करीत असत. लागणारी सामुग्री ते भिक्षा मागून आणीत. प्रतिवसंत सोमयाजी म्हटले जाणारे ब्राह्मण दरवर्षी वसंत ऋतूत सोमयाग करीत (त्या शब्दाचा अर्थ तोच आहे.) जर एखाद्या माणसाकडे कुटुंबाचा तीन वर्षाचा खर्च भागवू शकेल इतके उत्पन्न असेल तर तो प्रत्येक वसंत ऋतूत सोमयाग करीत असे.

आता सर्व क्षेत्रात ऱ्हास झालेला आहे. गोष्टी उलटसुलट झालेल्या आहेत. लोक त्यांच्या वार्षिक उत्पन्नाच्या तीनपट खर्च करतात पण उपहासाने म्हणायचे तर, व्यापारातील आणि व्यवसायातील उलाढालीतील बदलांमुळे श्रीमंतांसह सर्वानाच गरिबी आणि कष्ट सहन करावे

लागतात. प्रत्येक गोष्टीत संयम असला पाहिजे. आपल्या काळातील सर्व कुशलता आणि चातुर्य यांनी अनेक जणांना गरिबीकडे नेले आहे. श्रीमंत माणूस आपले सर्व खर्च भागवू शकत नाही ह्या स्थितीला आलेला आहे. केवळ संयमाने अशी चांगली कृत्ये करण्यास संधी मिळेल.

शिक्षा, पुंड्र आणि इतर धार्मिक विधी सूत्रासूत्रानुसार भिन्नभिन्न असतात. काहीजण उभी शिखा ठेवतात (मस्तकाच्या वर केसाची बट), काहीजण पूर्वशिखा ठेवतात (मस्तकाच्या पुढील भागात). तसेच कपाळावर मुद्रा लावण्यात भेद आहेत. काहीजण उभी मुद्रा (ऊर्ध्व-पुंड्र) आणि काही आडवी मुद्रा (त्रिपुंड्र) लावतात. हे सर्व एखाद्याकडून पाळल्या जाणाऱ्या परंपरेप्रमाणे असते.

यज्ञाचा चयन हा एक महत्त्वाचा भाग असतो. कल्पात दोन प्रकारची शुल्वसूत्रे आहेतः 'सामान्य' आणि 'विशेष'. कात्यायन, बौधायन, हिरण्यकेशी आणि इतर यांची शुल्वसूत्रे आहेत. दक्षिणेत 'अण्डापिलै-प्रयोग' नावाचे आहे. अण्डापिलै हा तिरूप्पनंतळ चा होता आणि तंजावूर जिल्ह्यातील तिरूविडैमरूदूर च्या गणेश देवतेवरून हे नाव ठेवले गेले. श्रौत कर्मे त्यांच्या पद्धतीनुसार केले जातात. श्रौत यज्ञ, घरात नव्हे तर 'यज्ञशाळेत' मोठ्या प्रमाणावर करायची असतात. मोठे यज्ञ दुर्मिळ झाल्याने, गृह्यसूत्रांना अधिक महत्त्व प्राप्त झाले आहे. शिवाय, विसंगत शास्त्रे, विसंगत रूढी अधिकाधिक लोकप्रिय होत आहेत.

ईश्वराचे चरणकमल धरणे हेच आपल्या सर्व शास्त्रांचे ध्येय आहे. आपण जे काही पठण करतो ते ईश्वराला अर्पण या स्वरूपात असले पाहिजे आणि ते आपल्याला आत्मिक मूल्य देऊ शकेल असे असावे. आपली शास्त्रे अशा श्रेणीची आहेत. वैदिक धर्मातील अत्यंत महत्त्वाचे असलेले श्रौत कर्मे करणे (हवी आणि सोमयाग) हे दुर्मिळ होत चालले आहे ही दुःखद गोष्ट आहे.

द्राह्यायन आणि कात्यायन सोडून आपस्तंब, बौधायन आणि आश्वलायन अशा ज्या इतरांनी कल्पसूत्रे सुरू केली त्यांनी दोन्ही, श्रौत आणि गृह्य सूत्रे लिहिली.

वरील दोन प्रकारची सूत्रे सोडून, आपल्याकडे धर्मसूत्रे आहेत. त्यांचा माणसाच्या व्यक्तिगत, घरगुती आणि सामाजिक जीवनाशी संबंध असतो. धर्मशास्त्र त्यावर आधारलेले आहे. इंग्रजी शब्द 'लॉ' ने आपल्याला जे समजते ते त्यांच्यापासून आलेले आहे. ती मनु, मिताक्षर आणि इत्यादींच्या नैतिक आणि विधी शास्त्रांचा पाया आहे. (पुढील धर्मसूत्रे आपल्याकडे हस्तांतर करण्यात आलेली आहेत. ऋग्वेदाची वसिष्ठ आणि विष्णु; कृष्ण-यजुर्वेदाची मनु, बौधायन, आपस्तंब आणि हिरण्यकेशी आणि सामवेदाची गौतम). अथर्ववेदाला अनुयायी नसल्यामुळे त्याची कल्पसूत्रे नाहीत.

कल्प विधींचा सूक्ष्म तपशील देते. एखाद्या ब्राह्मणाच्या सर्व कर्मांना वैदिक संबंध असतो.

ह्या वैदिक संबंधामुळे आणि केवळ त्यामुळेच, तो घेत असलेल्या प्रत्येक पावलागणिक विश्वाच्या कल्याणासाठी तो ती स्वर्गीय शक्ती प्राप्त करण्यास समर्थ होईल. कल्पसूत्रांमध्ये ब्राह्मणाने कसे बसावे, खावे, त्याचे कपडे त्याने कसे परिधान करावेत आणि इतर अशा संबंधी नियम आहेत.

वेदांचे हे अंग, घर बांधणे हा विषय हाताळते का ? ब्राह्मणाच्या निवासस्थानाची रचना अशी असावी की त्याला ग्रंथानुसार त्याची कर्तव्ये पार पाडण्यास मदत व्हावी. त्याने वैश्वदेव-बली कोठे द्यावा (संस्काराचे प्रकरण), त्या जागेचे दार कोठे असावे ह्याचा नियम आहे तर, ते दार शास्त्रीय पद्धतीने बांधले जायला हवे की नको ? अशा विधींसाठी आधुनिक सदनिका योग्य आहे का? जेथे औपासन विधी (संस्काराचे प्रकरण) करायचा त्या जागेच्या गुणाचे कल्पात वर्णन केलेले आहे. त्याचा उल्लेख पुढे संस्कार प्रकरणात आहे. विद्यार्थ्यांना जेथे अध्यापन केले जाते त्या वर्गखोलीच्या काही आवश्यक गोष्टी असतात. त्यात मेज आणि बाक इ. असले पाहिजेत. वर्गखोलीपासून प्रयोगशाळा भिन्न असली पाहिजे. तसेच घराचे स्थापत्य आणि वर्गखोलीचे स्थापत्य हे त्यांच्या कार्यानुसार बदलणारच.

मी पूजा करतो. जेथे मी पूजा करतो त्या जागेला काही विशेष गुण असला पाहिजे. बंगल्यात सर्व खोल्या सारख्याच असतात. जर अशा ठिकाणी पूजा करायची असेल तर, विधींचे पावित्र्य, वर्ण आणि आश्रमानुसार असलेले भेद पाळले जाणार नाहीत. कारण तेथे लोक गर्दी करून एकत्र येतील. बंगला गोऱ्या लोकांच्या जीवन-पद्धतीनुसार बांधलेला असतो. तेथे स्वतंत्रता हवी, त्याचवेळेस एकत्रितपणा हवा, प्रत्येकाला जागा हवी. जरी आपल्या रूढीनुसार आणि परंपरेनुसार आपल्याला स्थान हवे असेल तर नवीन पद्धतीची घरे कोणत्याही उपयोगाची नाहीत. आपली स्थापत्यकला आपल्या परंपरा आणि गरजा यातून विकास पावलेले आहे. सिमेंटची जमीन भोजनानंतर स्वच्छ ठेवली जाऊ शकणार नाही. जेव्हा धुतली किंवा पाण्याने घासली जाते तेव्हा खरकटे / उष्टे पसरेल. तमीळमध्ये एस्सिल / eccil हा शब्द मुखाशी, लाळेशी संबंध येऊन राहिलेले अन्न यासाठी आहे. ते अशुद्ध असते. बंगल्यात (किंवा सदनिका) राहणारे पाश्चात्त्य टेबलावर जेवतात. ही पद्धत आता शहरे आणि नगरांमध्ये सर्व जातींत नित्याची झाली आहे.

आपल्या स्थापत्य शास्त्रानुसार आपण आपली घरे बांधली पाहिजेत. गृहस्थ हा शब्दच गृह (घर) पासून आला आहे. ज्यांना भोजन, वास करणे आणि वेश अशा बाबतीत धार्मिक विधींची शुद्धता पाळावयाची आहे त्यांनी आपल्या स्थापत्य शास्त्रीय कल्पनानुसार घर बांधले पाहिजे. पण आता आपल्याला विरुद्ध शैलीच्या घरात राहण्याची सवय झाली आहे. प्रथम आपल्याला, रूढी आणि परंपरांचे अनुसरण करण्यातील अडचणी विचित्र वाटतील. शेवटी, तथापि, आपल्याला नवीन जीवन पद्धतीची सवय होईल आणि आपण धार्मिक गोष्टींचे पालन

करण्यात निष्काळजी होऊ. अशा प्रकारची घरे सोडून देण्याऐवजी, आपण धार्मिक आणि आपल्या धर्माचा भाग असलेल्या इतर परंपरा सोडून देतो.



जेव्हा मी धर्मशास्त्राविषयी बोलेन तेव्हा कल्पात असणाऱ्या ४० संस्कारांविषयी तुमच्याशी तपशीलवार बोलेन.

आपण चतुर्दश विद्यांपैकी १० विद्यांबाबत चर्चा केली आहे, १४ वेदांच्या विशेष ज्ञानासंबंधीच्या शाखा : चार वेद, शिक्षा, व्याकरण, छंदस, निरुक्त, ज्योतिष आणि कल्प. चार राहतात.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग १२

## मीमांसा - कर्ममार्ग

ह्या भागाचा मुख्य विषय असलेल्या पूर्व मीमांसेवरच्या विश्वासाचे परीक्षण करताना परमगुरू सांख्याबाबत सांगतात आणि योगालाही थोडक्यात स्पर्श करतात.

## प्रकरण १

# वैदिक नियमांचे स्पष्टीकरण

चौदा अध्ययनाच्या शाखांपैकी (चतुर्दश-विद्या), चार वेद आणि षडांगानंतर वेदांची चार उपांगे राहतात. 'उप+अंग='उपांग'. विषयाला जे काही पूरक आहे ते सुचविण्यासाठी 'उप' ह्या प्रत्यय जोडलेला आहे. 'सभानायक' म्हणजे सभापती; उपसभानायक म्हणजे दुय्यम सभापती, त्याचप्रकारे आपल्याकडे सहा अंगांनंतर (षडांगे) चार उपांगे आहेत. ती म्हणजे मीमांसा, न्याय, पुराणे आणि धर्मशास्त्र.

'माम' हा शब्द 'मीमांसा' ह्या शब्दाचे मूळ आहे; 'सन' हा प्रत्यय आहे. (गुणदर्शक प्रत्यय) मीमांसा म्हणजे पूज्यभावाने केलेली पवित्र जिज्ञासा; स्पष्टीकरण मानण्यासाठी किंवा पूजन करण्यासाठी योग्य काय ? मीमांसा हे वेदांचे स्पष्टीकरण आहे. वेदातील शब्दांच्या अर्थाचे आणि शब्दकोशाचे पद्धतीने व्युत्पत्तीचे स्पष्टीकरण निरुक्त करते. मीमांसा आणखी पुढे जाऊन मंत्रांची अर्थपूर्णता आणि त्यांचा हेतू यांचा शोध घेते. ते ह्या मुद्यांवर निर्णय देते.

आपण अगोदरच वेदांच्या कर्मकांडाविषयी आणि ज्ञानकांडाविषयी चर्चा केली आहे. कर्मकांडाला पूर्वभाग म्हटले जाते, प्रत्येक वैदिक शाखेचा पहिला किंवा प्रारंभीचा भाग आणि दुसरा किंवा समारोपाचा भाग हा उत्तरभाग असतो. असेच मीमांसेचेही पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा असे दोन भागांत विभाजन केलेले आहे. पहिल्यात वेदांच्या सर्वात महत्त्वाच्या, आहुती आणि इतर विधी यांचा समावेश आहे; दुसरा ज्ञानकांडात शिकवले जाणारे आत्मज्ञान हे त्यांचे खरे ध्येय असल्याचा पाठपुरावा करतो. मी जेव्हा उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रे हा विषय घेतला तेव्हा उत्तरमीमांसेबद्दल बोललो.

उत्तरमीमांसा म्हणजे ब्रह्मसूत्रे तसेच उपनिषदे; ब्रह्मविद्येची किंवा येथे वेदान्ताची रचना करतात. हा तीन महत्त्वाच्या तत्त्वज्ञानात्मक प्रणालींचा पाया आहे - अद्वैत, विशिष्टाद्वैत आणि द्वैत.

आपला आताचा विषय आहे पूर्वमीमांसा, खरे पाहता मीमांसा हा शब्दच नेहमी पूर्वमीमांसा दर्शवितो. पण त्याचा (पूर्वमीमांसेचा) उल्लेख उत्तरमीमांसेचा विचार पण मनात आणतो.

आपण पाहिले की प्रत्येक प्रणालीला त्याची सूत्रे, भाष्य आणि वार्तिका असतात. जैमिनी महर्षींचे पूर्वमीमांसा सूत्र आहे, त्याचे भाष्य शबरस्वामींचे आहे आणि त्याची वार्तिका कुमारिलभट्टाची आहे. कुमारिलभट्टाची भट्टदीपिका हे अत्यंत महत्त्वाचे पूर्वमीमांसा साहित्य आहे. कुमारिल हा कुमारस्वामी किंवा सुब्रह्मण्याचा अवतार होता. प्रभाकरने पूर्वमीमांसेवर

भाष्य लिहिले आहे, त्यात तो काही मुद्यांवर कुमारिलभट्टापेक्षा भिन्न दृष्टिकोन व्यक्त करतो. अशा प्रकारे दोन भिन्न संप्रदाय मीमांसेत ओळखले जातात - 'भट्ट-मत' आणि 'प्रभाकर-मत', आपण दोन विचारसरणींतील भेद विसरून सामान्यपणे मीमांसेचा विचार करू या. हे स्पष्ट आहे की कुमारिलभट्टाच्या दृष्टिकोनाचे प्रतिनिधित्व करते म्हणून ''भट्ट-मत'' हे नाव मिळते. तिरुप्पुदकुझी कृष्णातातचारियार यांचा भट्टसारम हा कुमारिलभट्टाच्या संकल्पनेचे सार असलेला ग्रंथ ह्या शतकाच्या प्रारंभी प्रसिद्ध झाला.

जैमिनीची पूर्वमीमांसा-सूत्रे हे विशाल कार्य आहे आणि त्याला बारा प्रकरणे आहेत, प्रत्येकाला अनेक पदे आहेत. प्रत्येक पदाला अनेक अधिकरणे आहेत. एकूण १००० अधिकरणे आहेत.

वेद हे ईश्वराचा कायदा आहेत. ते शाश्वत आणि अनंत असल्याने कायदाही शाश्वत आहे. ईश्वर म्हणविल्या जाणाऱ्या सम्राटाची आपण सर्व प्रजा आहोत. त्याने विश्वाची काळजी घेण्यासाठी इंद्र, वायू, वरुण, ईशान, कुबेर निर्ऋती आणि इतर असे अनेक अधिकारी, कर्मचारी नेमले आहेत. चौदाही जगांतील प्राण्यांची काळजी घेण्यासाठी त्यांना कायद्याची गरज असते. आपण, ईश्वराच्या प्रजेने ह्या कायद्याप्रमाणे कसे वागायले हवे, त्यांच्या राज्यावर राज्य करण्यासाठी ईश्वराकडून अधिकारी कसे नेमले जातात ? वेदांची चिकित्सा करून आपण ह्या प्रश्नांना उत्तरे मिळवू शकतो. ह्या जगातील कायद्यावर चर्चा करणारे आणि वकिलांच्या साह्याने शंका सोडविणारे न्यायाधीश असतात. धर्माचे आचरण कसे करायचे हे ठरविणारे वेद हे कायदे आहेत, ह्या कायद्याचा जैमिनी अर्थ लावतात. त्यांचे स्पष्टीकरण म्हणजे मीमांसा.

जेव्हा कायदेशीर वाद असतो तेव्हा तशाच दाव्यातील अलाहाबाद किंवा मुंबई उच्च न्यायालयाच्या निवाड्यानुसार निकाल दिला जातो. एका दाव्यात एका न्यायालयाने दिलेला निकाल दुसऱ्या न्यायालयात आलेल्या तशाच प्रकरणात लागू केला जातो. जैमिनीच्या मीमांसेत, सूत्रकारांचे दृष्टिकोन विचारात घेऊन आणि सयुक्तिक कारणानिशी वैदिक वेच्यांचे अर्थ विचारात घेऊन १००० समस्या हाताळलेल्या आहेत. स्पष्ट करायचे तर, प्रथम एक वैदिक विधान घेतले जाते; दुसरे, त्याच्या अर्थाविषयी प्रश्न (समस्या) उपस्थित केले जातात; तिसरे, विरुद्ध विचारसरणीचा मुद्दा सादर केला जातो (पूर्वपक्ष); चौथा, तो मुद्दा चुकीचा आहे असे दाखविले जाते; आणि पाचवा, तात्पर्याकडे (निर्णय) येणे. प्रत्येक समस्येच्या किंवा मुद्याच्या अर्थाकडे येणे, ह्यांनी अधिकरण तयार होते.

जैमिनीची सूत्रे संक्षिप्त आणि मुद्देसूद आहेत. त्यांच्यावरील शबराच्या भाष्याला 'शाबरम्' म्हणतात. त्यावर लक्ष्मीपुरम श्री श्रीनिवासाचारियार यांचे 'शाबर-भाष्य-भूषणम्' याने चांगला प्रकाश टाकला आहे. शबर चा नेहमीचा अर्थ शिकारी. रामायणातील शबरी ही मूळची शिकारी स्त्री होती असे म्हणतात. शबर ह्या मीमांसकाच्या भाष्यकारात ईश्वराचा दृष्टिकोन होता. असे

मानले जाते की जेव्हा तो अर्जुनाला पाशुपतास्त्र देण्यासाठी अवतरला तेव्हा त्याने भाष्य (शाबरम्) रचले.

त्याची १००० अधिकरणे असल्याने पूर्वमीमांसेला 'सहस्त्राधिकरिणी' म्हटले जाते. ह्या कामात दोष काढणाऱ्या (कुयुक्ती) वादांना तोंड देऊन वैदिक वेच्यांचा अर्थ निश्चित केला जातो.

जेव्हा पूर्वमीमांसा वेदातील कर्मकांडाच्या अर्थाचा विचार करते तेव्हा उत्तरमीमांसा उपनिषदातील ज्ञानकांडाचा विचार करते. उपनिषदे प्रामुख्याने परमात्मा आणि आपला त्याच्याशी अटळ असलेला संयोग यावर बोलतात. ब्रह्मसूत्रांमध्ये व्यास उपनिषदांनी स्थापन केलेल्या दिव्य कायद्याचा अर्थ निश्चित करतात. थोडेसे व्याजोक्तीने म्हणायचे तर ज्या ऋषींनी उत्तरमीमांसेवर सूत्रे लिहिली ते व्यास, ज्यांनी पूर्वमीमांसेवर सूत्रे लिहिली त्या जैमिनीचे गुरु होते.

सुरेश्वराचार्य यांनी अद्वैताच्या दृष्टिकोनातून तैत्तिरीय आणि बृहदारण्यक उपनिषदांवर भाष्ये लिहिली. हे नमूद करण्याजोगे आहे की ते पूर्वी पूर्वमीमांसेला चिकटून राहणारे होते. शंकराचार्यांचे शिष्य झाल्यावर त्यांनी कर्ममार्गावरून ज्ञानमार्गाकडे संक्रमण केले आणि आपल्या गुरूंच्या भाष्यावर भाष्य लिहिले. आचार्यांचे शिष्य होण्यापूर्वी आणि संन्यासी होण्यापूर्वी त्यांना मण्डनमिश्र म्हटले जात होते. कथा असे सांगते की, मण्डनमिश्राकडे श्राद्धाच्या वेळेस तात्त्विक वादासाठी शंकराचार्य गेले. त्या समारंभात विश्वदेव आणि पूर्वजाचे प्रतीक असलेले ब्राह्मण म्हणून भाग घेणारे व्यास आणि जैमिनी हे दोघे होते.

-----

## प्रकरण २

# मीमांसेमध्ये ईश्वर ही संकल्पना नाही

आचार्यांनी मीमांसक असलेल्या मंडनमिश्राशी का वाद केला असावा? (मीमांसक हा पूर्वमीमांसकाचा अनुयायी असतो. आम्हा उत्तरमीमांसकांना वेदान्ती म्हटले जाते) आचार्यांनी वैदिक धर्मात जोम आणला आणि त्याची बळकट पायावर पुनर्स्थापना केली, तर मग अशा गुरूने, त्यांनीच प्रोत्साहन दिलेल्या वेदांचे एक उपांग मीमांसेवर टीका का करावी?

ह्या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी, मीमांसा असो वा अन्य शास्त्र असो, आपण कोणत्याही शास्त्राच्या ध्येयाचा विचार केला पाहिजे. मी पूर्वी म्हटलेले पुन्हा सांगायचे तर, कोणत्याही शास्त्राचे ध्येय आपल्याला ईश्वराकडे नेण्याचे असले पाहिजे. मला असेही वाटते की व्याकरण, शब्दकोश, वृत्तविचार अशा विषयांना अंतिम विचार हाच असावा म्हणून त्यांचा समावेश वैदिक अध्यनाच्या चौदा शाखांमध्ये केला असावा. आता, पूर्वमीमांसेत ईश्वराची संकल्पना काय आहे?

येथे आपण विचार केला पाहिजे की वेदान्त किंवा उत्तरमीमांसा ईश्वराकडे कसे पाहते, कारण आचार्यांनी ह्या प्रणालीला पूर्ण पाठिंबा दिला होता आणि त्यांनी त्यावर भाष्यही केले होते. शेवटी आपल्याला आचार्यांचा, मुख्यत्त्वे विचार करायचा आहे. आणि त्यांना व्यासांची ब्रह्मसूत्रे महत्त्वाची वाटतात. ह्या ग्रंथाला ईश्वरांबंधी काय सांगायचे आहे?

ब्रह्मसूत्र सांगते की, कर्ता शास्त्रार्थवत्त्वात'' याचा अर्थ असा की ईश्वर हा विश्वाचा निर्माता आहे. इतर धर्माचे अनुयायी सुद्धा ईश्वराला ''कर्ता'' म्हणतात किंवा त्याला समानार्थी शब्द वापरतात. परंतु ईश्वर हा कर्त्यापेक्षाही अधिक आहे आणि त्याच्याकडे एक कार्य आहे. आपण चांगले किंवा वाईट करतो - सत्कर्मे किवा कुकर्मे. तो ईश्वरच आहे, जो आपल्याला अशा कर्माची फले देतो, फलं अत उपपत्तेः'' ईश्वर हा आपल्या कर्माचा फलदाता आहे. (आपल्या कर्माचे फल देणारा) आपण आपल्या मनाने, वाणीने आणि शरीराने चांगले किंवा वाईट करतो. ईश्वर हा त्या सर्वाचा साक्षी आहे आणि आपल्या कर्माची फले देतो. उत्तरमीमांसेनुसार ईश्वराचे हे दोन गुणधर्म (लक्षणे) आहेत.

पूर्वमीमांसा ईश्वरासंबंधी काय म्हणते?

सांख्य तत्त्वज्ञानाला पुष्टी देणारे आणि सहा दर्शनांपैकी असलेले सांख्य आणि मीमांसक हे दोन्ही वैदिकप्रणालीतील आहेत. परंतु सांख्यांचा, ईश्वर हा जगाचा (विश्व) कर्ता नाही ह्यावर विश्वास आहे. ''ईश्वर म्हणजे शुद्ध ज्ञान'' असे ते म्हणतात. ''हे विश्व, दगड आणि मातीने बनलेले अचेतन असे आहे. जे ज्ञान आहे ते अचेतन वस्तूचे कारण असू शकणार नाही. ईश्वर

हा विश्वाचा निर्माता आहे असे मानणे योग्य नाही.'' असा सांख्यांचा दृष्टिकोन आहे. सांख्यांचे समर्थक ईश्वराचे वर्णन करतात, जो जगापासून अलिप्त आहे आणि शुद्ध ज्ञान आहे त्याचे ''पुरुष'' असे वर्णन करतात. ह्या पुरुषाला आपले आचार्य अंतिम 'निर्गुण-ब्रह्म'' म्हणतात. (गुणांशिवाय असलेले ब्रह्म) तरीसुद्धा विश्वाची निर्मिती करणे आणि स्वतःला इतर कार्यांत व्यग्र करणे यासाठी तो ईश्वर, निर्गुण-ब्रह्म स्वतःच सगुण-ब्रह्म होतो असे विधान अबाधित ठेवून सांख्यांवर टीका करतात.

मीमांसक वेदांनी आपल्याला दिलेल्या विधींचा काय तो विचार करतात. ते ईश्वर आणि कोणी जगाची निर्मिती केली ह्या प्रश्नावर गप्प आहेत. तरी ते एका मुद्यावर ठाम आहेत - ईश्वर आपल्या कर्माची फले देत नाही. ते ईश्वर हा विश्वाचा निर्माता आहे किंवा नाही यांवर वाद करीत नाहीत. ते म्हणतात : ईश्वर आपल्या चांगल्या किंवा वाईट कर्मानुसार फले देतो असे म्हणणे चूक आहे. आपल्या कर्माची फले देणारा तो नसतो. आपण केलेली वैदिक कर्मेच आपल्याला काय फल मिळेल ते ठरवितात.''

सांख्य आणि मीमांसकांचे अनुयायी असे दोघेही त्यांच्या पद्धतीने वेदांनी आणि ब्रह्मसूत्रांनी सांगितलेली ईश्वराची लक्षणे (अगोदर उल्लेखलेली) नाकारतात. मीमांसकांचा विश्वास असतो की ईश्वर आपल्या कर्माची फले देत नाही; त्यांच्या मते आपण जी वैदिक कर्मे करतो ती स्वतःच आपल्याला फले देतात. वेद आणि शास्त्रे आपल्या कर्माकडे कसे पाहतात त्यावर आपले पुण्य किंवा पाप अवलंबून आहे. म्हणून आपले कर्मच जे काय असेल ते आपल्याला फल देते; ईश्वर नव्हे.

वेदांना मानणाऱ्या सर्व प्रणालींमध्ये केवळ सांख्य आणि मीमांसा असा दृष्टिकोन ठेवतात की ईश्वर हा विश्वाचा निर्माता नाही आणि तो आपल्या कर्माची फले देत नाही.

-----

## प्रकरण ३

# न्याय आणि मीमांसा : त्यांनी बुद्ध धर्माचा पाडाव केला

शंकराचार्यांच्या टीकेमुळे भारतातील बौद्ध धर्माच्या अनुयायांच्या वाढीला प्रतिबंध बसला असे बऱ्याच जणांना वाटते, हे बरोबर नाही. आचार्यांच्या भाष्यामध्ये वेदांच्या विरुद्ध असलेल्या त्या धर्माच्या सम्यक टीकेबाबत उतारे आहेत. त्यांनी सांख्य आणि मीमांसा ह्या वेद परंपरा मानणाऱ्या तत्त्वांवरही टीका केली. ईश्वर जगाचा निर्माता नाही आणि तो आपल्या कर्माची फले देत नाही ह्या दृष्टिकोनाचे त्यांनी खंडन केले. वेदांनी आणि ब्रह्मसूत्रांनी सांगितलेले ईश्वराच्या ठिकाणी असलेले गुण त्यांनी ठासून सांगितले आणि असा प्रतिवाद केला की ईश्वराशिवाय जग असूच शकणार नाही आणि आपली कर्मेच आपल्याला फले देतात हे चूक आहे. ईश्वराने त्याच्या संकल्पानेच ह्या विश्वाची निर्मिती केली आणि तोच आपल्या कर्माची फले देतो. भारतातील बौद्धधर्माच्या ऱ्हासाला ते कारणीभूत आहेत असे त्यांच्या भाष्यात पुष्टी देणारे काहीही आढळत नाही.

मग आपल्या देशात बौद्ध धर्माच्या अनुयायांची वाढ का थांबली ? कोणीतरी ह्या भूमीतील त्यांच्या ऱ्हासाला कारणीभूत होणाऱ्या त्या जोरदार आक्रमणाला जबाबदार असलेच पाहिजेच. हे कार्य कोणी केले ? मीमांसक आणि तार्किक असे त्याचे उत्तर आहे. जे तर्कशास्त्रात प्रवीण असतात त्यांना तार्किक म्हटले जाते. वेदाध्ययनाच्या १४ शाखांपैकी एक असलेल्या न्याय शाखेचा तर्क हा एक भाग आहे आणि तो मीमांसेनंतर येतो. न्यायात प्रवीण असलेले 'नैयायिक' व्याकरणाचा अभ्यास असलेले ''वैयाकरणी'' आणि पुराणात कुशल असलेले पौराणिक / पुराणिक होत.

तार्किक उदयानाचार्य आणि मीमांसक कुमारिलभट्ट यांनी निरनिराळ्या कारणास्तव बौद्ध धर्माला विरोध केला. उदयनाचार्यांनी त्या धर्माने ईश्वर नाकारला म्हणून कठोर टीका केली. मी अगोदर सांगितल्याप्रमाणे मीमांसकांना वैदिक विधी अतिशय महत्त्वाचे असतात. ईश्वर आपल्या कर्माची फले देतो यावर जरी त्यांचा विश्वास नसला तरी आपण करीत असलेले विधी आपल्याला फले देतात आणि धर्मशास्त्रातील आज्ञा श्रद्धेने पार पाडल्या पाहिजेत यावर त्यांचा विश्वास असतो. बौद्धधर्माने वैदिक विधी स्वीकारण्यास नकार दिला म्हणून त्यांनी प्रतिकार केला. कुमारिलभट्टाने त्या धर्मावर टीकात्मक विपुल लेखन केले आहे ते आणि उदयानाचार्य हे दोघे बौद्ध धर्माच्या वाढीस अडथळा आणण्यास प्रामुख्याने जबाबदार होते. आपले आचार्य त्यानंतर आले आणि त्यांना त्या धर्मावर विशेष हल्ला करण्याची गरज नव्हती. याउलट बौद्ध धर्माचे विरोधक कुमारिलभट्ट आणि उदयनाचार्य यांनी उचलून धरलेल्या प्रणालीतील दोष उघड करण्याचे त्यांचे महत्त्वाचे कार्य होते. ईश्वर हा विश्वाचा निर्माता आहे तोच आपल्या कर्माची फले देतो हे मत त्यांनी स्थापित केले.

बौद्ध धर्माच्या ऱ्हासामध्ये शंकराचार्यांची भूमिका असली पाहिजे अशा तुमच्या असलेल्या चुकीच्या कल्पना दूर करण्यासाठी मी ही वस्तुस्थिती सांगत आहे. कुमारिलभट्टाच्या 'तर्कपादम्' नावाच्या ग्रंथामध्ये एक विशेष प्रकरण आहे. त्यात बौद्ध धर्मातील कल्पना चुकीच्या आहेत असे मत मांडलेले आहे. उदयनाचार्यांनी सुद्धा 'बौद्धाधिकार' यात तसे केले आहे. ह्या भूमीवरील बौद्ध धर्माच्या ऱ्हासास हे दोन आचार्य कारणीभूत आहेत आणि भगवत्पाद शंकराचार्य नव्हे. इतिहासावरील आपल्या पुस्तकांमध्ये जे शिकविलेले असते ते खरे नव्हे.

-----

## प्रकरण ४

# बौद्ध धर्म आणि भारतीय समाज

माझ्या मते आपल्या इतिहासात खऱ्या अर्थाने बौद्ध धर्माचे असंख्य अनुयायी होते असा काळ नव्हता. आजकाल थिऑसॉफिक सोसायटीचे सभासद असलेले अनेक हिंदू इतर हिंदूप्रमाणे आपले सण साजरे करतात आणि हिंदू पद्धतीने विवाह करतात. श्रीरामकृष्ण परमहंसाचे अनेक भक्त आपल्या पारंपरिक रूढी पाळतात. श्री सी. रामानुजाचरियार अण्णा (श्री सुब्रह्मण्य अय्यर) आणि काही इतर रामकृष्ण मिशनच्या अगदी जवळचे आहेत पण तरी ते आपल्या पारंपरिक श्रद्धांना चिकटून राहतात.

जेव्हा महान माणसे उदयास येतात तेव्हा लोक त्यांच्या दयाळूपणा आणि सुज्ञपणा ह्या गुणांकडे ओढले जातात. त्यांच्यामागे स्थापन झालेल्या संस्थांमध्ये आपल्या सनातन धर्माचे थोड्याफार बदलाने पालन केले जाते. पण ह्या महान व्यक्तीचे असंख्य भक्त अजूनही जुन्या रूढी आणि परंपरांचे घरात पालन करतात.

अनेक लोक गांधीजींना एका नवीन धर्माचे (गांधीवाद) संस्थापक मानतात आणि राम व कृष्ण या अवतारांसारखे महान म्हणून मानतात. परंतु, त्यांच्या वैयक्तिक जीवनामध्ये त्यांच्यापैकी फारच थोडेजण त्यांची (गांधीजींची) शिकवण आचरणात आणतात - उदाहरणार्थ, विधवाविवाह, मिश्रविवाह आणि इतर. लोकांमध्ये गांधीजीबद्दल आदराची भावना निर्माण झाली याचं कारण म्हणजे त्यांचे त्यागमय वैयक्तिक जीवन, सत्यवाद, समर्पण आणि मानवसेवा. पण त्यांच्या कल्पना प्रत्यक्ष जीवनात आणणे ही वेगळी गोष्ट होती.

त्याचप्रमाणे बुद्धाने त्यांच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाने आणि अनुकरणीय वैयक्तिक जीवनाने विस्तृत सन्मान मिळविला. 'एक राजपुत्र, ह्या जगाची दुःखापासून मुक्तता करण्यासाठी, त्याची पत्नी आणि मुलाचा तारुण्यातच त्याग करतो." सिद्धार्थाच्या अशा तपशिलासह असलेल्या कथेने लोकांवर प्रभाव पाडला. त्यांची मने त्याच्या दयाळूपणाने आणि त्यागाने आणि आत्मबलिदानाच्या जाणिवेमुळे हेलावली गेली. परंतु त्याचा अर्थ असा नव्हता की ते त्याची शिकवण अमलात आणण्यास तयार होते. त्याच्या वैयक्तिक गुणांचे त्यांना कौतुक होते परंतु त्यांनी वर्णाश्रम पद्धती आणि यज्ञ व इतर विधी यांच्यासह धार्मिक जीवनाचा प्राचीन मार्ग चालू ठेवला. त्याच्या इच्छेच्या विरुद्ध लोक मोठ्या प्रमाणात साधू होण्यास पुढे न येता, वैदिक आचरण ठेवीत गृहस्थच / संसारी राहिले.

सम्राट अशोकाने बौद्ध धर्माचा खूप प्रचार केला पण सामान्यतः समाजात वैदिक धर्मात काहीही बदल झाले नाहीत. शिवाय सम्राटाने स्वतःच वर्णाश्रम धर्माला पाठिंबा दिला, हे त्याच्या प्रसिद्ध असलेल्या आज्ञांवरुन समजते. पण बौद्ध भिक्षू सोडून सर्व गृहस्थाश्रमींनी वैदिक

मार्ग अनुसरला. ते जरी, ईश्वर आणि इतर देवता ह्या प्रश्नावर बोलत नसले तरी महान बौद्ध भिक्षूंकडून लिहिल्या गेलेल्या पुस्तकांचा आरंभ सरस्वती स्तोत्रांनी होतो. ते अनेक देवांची आराधना करीत. विविध देवतांच्या उपासनेसंबंधी असलेल्या, तिबेटातून आपल्याला मिळालेल्या तांत्रिक ग्रंथांवरून हे समजते. जर तुम्ही श्रीहर्ष, विल्हण आणि इतरांचे संस्कृत आणि इलांगो अडिगल सारखे तमीळ काव्यग्रंथ वाचले तर, तुम्हाला जाणवेल की अगदी ज्या काळात समाजावार बौद्ध धर्माचा प्रभाव होता त्याच काळात बहुतेक सर्व लोकांकडून रूढी आणि वर्णाश्रमाचे पालन केले जात होते.

आजकालचे सुधारक व्यास, शंकराचार्य, रामानुजाचार्य आणि इतरांबद्दल अभिमानाने बोलतात. पण मी लोकांना सांगत असलेल्या रूढी आणि परंपरांचा ते स्वीकार करीत नाहीत. त्यांच्यापैकी काही जरी मला भेटायला येतात. त्यांना माझ्यात काही चांगले आहे असे वाटते, त्यांना वैयक्तिक माझ्याबद्दल आदर आहे म्हणूनच ना? तरी ते माझ्या कल्पना / विचार मान्य करीत नाहीत. तसेच ह्या देशात थोर व्यक्तींना, वैदिक परंपरांपेक्षा त्यांचा भिन्न दृष्टिकोन असूनही किंवा त्यांनी मुळात विरोध केला असला तरी वैयक्तिक त्यांच्या गुणांमुळे आणि निर्दोषत्वामुळे मान दिला जातो. कसे का होईना, आपले लोक वैदिक धर्म आणि त्याने स्थापन केलेल्या आचारधर्मात मुरलेले आहेत. आणि ह्या शतकापर्यंत ते पूर्वजांच्या धर्माचा आणि त्यांनी केलेल्या व्यवसायाचा त्याग करण्यास नाखूश होते. असा आपल्या लोकांचा दृष्टिकोन, बौद्धाच्या काळातही होता. त्याच्या तत्त्वावर उदयनाचार्य आणि कुमारिलभट्टाची टीका झाल्यावरही ज्यांनी प्रथम ती तत्त्वे स्वीकारली होती असे काही पुन्हा वैदिक धर्माकडे वळले.

-----

## प्रकरण ५

# शंकराचार्य आणि अवैदिक प्रणाली

शंकराचार्य, माणसाच्या जीवनातील शेवटची अवस्था किंवा आश्रम हा असा काळ मानतात की जेव्हा तो वैदिक कर्मांचा त्याग करतो आणि स्वतःला चिंतन आणि आध्यात्मिक शोधाला वाहून घेतो, पण त्याला बौद्धाप्रमाणे अलीकडील काळात / पूर्व जीवनात वैदिक कर्मे सोडून द्यावीत असे वाटत नाही. त्यांच्या मतानुसार, अनेक वर्षे वैदिक कर्मे केल्यावर, आपले भान शुद्ध केल्यावर, तो आध्यात्मिक जिज्ञासेला समर्पित होऊ शकतो. मीमांसा आपल्याला असे सांगते, प्रथम कर्म स्वीकारा आणि शेवटी बौद्धाकडून सुचविले गेल्याप्रमाणे कर्माचा त्याग करा.

शंकराचार्य बौद्ध धर्म, मीमांसा, सांख्य आणि न्याय अशा विचारप्रणालीबरोबर एका मुद्यापर्यंत जातात. एका ठरावीक पातळीपर्यंत त्यांचा स्वीकार करतात, पण दुसऱ्या पातळीवर ते हे सर्व अमान्य करतात. ह्या सर्वांपैकी प्रत्येक प्रणाली एका दृष्टिकोनाला अंतिम सत्य मानते. आपले आचार्य त्या सर्वांचे एका संपूर्ण सत्यात ऐक्य घडवून आणतात.

----

# प्रकरण ६

## सांख्य

सांख्यांच्या मतानुसार आत्मा म्हणजे 'पुरुष' आणि तो प्रत्येक गोष्टीपासून अलिप्त असूनही सर्वांचा पाया/मूळ आहे. त्यादृष्टीने माया, जी प्रत्येक गोष्ट क्रियाशील ठेवते ती प्रकृती होय. विश्व २४ तत्त्वांनी बनलेले आहे. त्यापैकी प्रकृती पहिली आहे आणि तिला 'प्रधान' हे नाव आहे. तीपासून दुसरे 'महत्' हे तत्त्व निर्माण होते. ते माणसाच्या प्रमाणे प्रकृतीची बुद्धी असते. 'महत्' पासून तिसरे तत्त्व 'अहंकार', स्वची जाणीव, त्याला 'मी' म्हणतात, ती स्वतंत्र गोष्ट येते.

स्वतः अहंकाराचेच दोनात विभाजन होते. पहिला ज्ञानग्रहणक्षम आणि मानवी जीवन जाणणारा, त्याचे मन, त्याची पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये असा. दुसरा भाग पाच 'तन्मात्रा' (तरल घटक) आणि विश्वातील पाच 'महाभूते' (जड घटक) यांनी बनलेला असतो. ज्ञानेंद्रियाच्या ह्या विभागाच्या साह्याने मनुष्य बाह्य गोष्टी जाणतो. डोळे वस्तू पाहतात, नाक गंध घेते, मुख चव घेते, कान ऐकतात आणि त्वचा स्पर्शाने जाणते. त्याच्या कर्मेंद्रियांनी तो विविध कर्मे करतो. मुख, बोलण्याचे कार्य करीत असल्याने तेही कर्मेंद्रिये म्हणून काम करते. हात, पाय, गुदद्वार आणि जननेंद्रिये ही सर्व कर्मेंद्रिये आहेत. ज्ञानेंद्रियाची आश्रयस्थाने, ध्वनी (कान), स्पर्श (त्वचा), रूप (डोळे), स्वाद किंवा चव (मुख), गंध (नाक) ही आहेत. ही पाच तन्मात्रा आहेत. ही तत्त्वे त्यांच्या जड रुपातील अवकाश (ध्वनी), हवा (स्पर्श), पाणी/जल (चव), पृथ्वी (गंध), अग्नी (रूप) अशी आहेत. ही महाभूते आहेत. अशा प्रकारे प्रकृती, महत्, अहंकार, मन, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच तन्मात्रा, पाच महाभूते - यांनी सर्व मिळून २४ तत्त्वे होतात.

ही तत्त्वे अद्वैतवादी वेदान्तींकडून स्वीकारली गेली आहेत. त्यानुसार ईश्वर (निर्गुण ब्रह्म) पुरुषाचे (निर्गुण आत्मा) प्रकृती किंवा मायेशी मीलन घडवितो. तथापि सांख्य ईश्वराबाबत गप्प बसतात.

सांख्य तत्त्वज्ञानानुसार असलेले सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण अद्वैतवाद्यांसह सर्वांकडून स्वीकारले गेले आहेत. सत्त्व हा गुण भलेपणा, स्पष्टता, प्रसन्नता दर्शवितो. रज हा गुण गती, कृती आणि भावना दर्शवितो. तमो गुण हा निद्रा, जाड्यता/शैथिल्य, आळस दर्शवितो. गीता 'गुणत्रय-विभाग योगात' पुष्कळ सांगते. भगवान म्हणतात, ''निस्त्रैगुण्यो भव'' (तीनही गुणाच्या पलीकडे जा आणि आत्म्यामध्ये रहा.) (प्र. ३२ भाग ५) सांख्याचाही विश्वास आहे की सर्व अनपेक्षित बदल हे गुणांच्या असमतोलपणामुळे होतात आणि ते समतोल ठेवायला हवेत. पण गीतेच्या प्रमाणे सांख्य आपल्याला हे साध्य करण्याचा मार्ग सांगत

नाहीत - ईश्वराची आराधना, त्याला शरण जाणे, आत्मज्ञान इत्यादी.

पुरुषाला केवळ चैतन्य आहे, प्रकृती जड आहे. प्रकृती स्वतः काही कार्य करण्यास असमर्थ आहे. पुरुषाच्या उपस्थितीत ती २४ तत्त्वांच्या साह्याने स्वतःला प्रकट करते. पण सांख्य उलट म्हणतात की पुरुष हा 'केवल-ज्ञान-स्वरुपिन्' आहे, त्याचा प्रकृतीशी संबंध नाही. ''कैवल्य'' हे नाव सांख्याने मोक्षाला दिले आहे. सर्व २४ तत्त्वांचा त्याग केल्यावर आणि जडपणातून मुक्त झाल्यावर एखादा त्या श्रेष्ठ पुरुषामध्ये स्थिर होतो ते कैवल्य होय. (तमीळमध्ये 'केवलम्' हा गौण किंवा अयोग्य म्हणून येतो)

त्या पुरुषामध्ये म्हणजे आत्म्यामध्ये लय पावणे आणि मायेसारख्या सर्व गोष्टीचा त्याग, हे अद्वैताचे ध्येय असते. ही स्थिती प्राप्त करण्यासाठी आचार्यांनी आपल्यासाठी एक मार्ग तयार केला आहे. तो मार्ग आपल्याला समर्पण वृत्ती आणि तत्त्वज्ञानात्मक/आध्यात्मिक जिज्ञासा सांगतो. सांख्य असे काही करीत नाही. त्याची शिकवण २४ तत्त्वांच्या त्यागाशी संबंधित आहे.

दुसरा असमाधानकारक दृष्टिकोन आहे. पुरुष (आत्मन्) स्वतःच ज्ञान आहे आणि त्याला काही कर्मे नसतात. प्रकृतीला कर्मे आहेत पण जी जड आणि ज्ञानविहीन आहे. ही जड प्रकृती स्वतःच २४ तत्त्वे म्हणून प्रकट कशी होऊ शकते? सांख्याच्या मते ही क्रिया पुरुषाच्या उपस्थितीत घडून येते. हे पटण्यासारखे स्पष्टीकरण नाही. ज्याला कर्म नाही अशा पुरुषाच्या उपस्थितीत / वर्चस्वाखाली प्रकृती कशी कार्य करू शकते? सांख्याचे समर्थक उत्तर देतात. चुंबकाच्या सान्निध्यात लोखंडाचा कीस / कण गतिमान होतात ना? चुंबकाला मुद्दाम त्यांना गतिमान ठेवायचे असते का? चुंबक तसाच राहतो आणि लोखंडाचे कण गतिमान असतात. तसेच पुरुष स्व-रूपात असतो आणि प्रकृती तिची गरज म्हणून क्रियाशील होते.

पुरुष आणि प्रकृती, अंधाने लंगड्याला वाहून न्यावे तसे एकत्र कार्य करतात. अपंग चालू शकत नाही आणि अंध पाहू शकत नाही. म्हणून अंध मनुष्याच्या खांद्यावर बसलेला अपंग मार्ग दाखवितो आणि अंध त्याच्या मार्गदर्शनानुसार चालतो. तसेच ज्ञान नसलेली प्रकृती पूर्ण ज्ञानी पुरुषाला वाहून नेते, पण ज्ञानाविना असलेली प्रकृती हीच जगातील सर्व कार्याच्या पाठीमागे असते. हे, एक गोष्ट किंवा रूपक म्हणून चांगले वाटेल पण हे जग चालविण्यासाठी निर्गुण ब्रह्म सगुण ब्रह्म (ईश्वर) होते, असे अद्वैतांनी दिलेल्या स्पष्टीकरणासारखे अर्थ निष्पन्न करीत नाही.

अद्वैत आणि सांख्य ह्यांत आणखी एक महत्वाचा फरक आहे. जरी सांख्य ज्ञानी पुरुषाला मानत असले तरी सर्व वैयक्तिक आत्मे हे महत्त्वाचा पुरुषासारखेच आहेत असे ते निःसंदिग्धपणे विधान करीत नाही. सांख्याच्या मते सर्व आत्मे स्वतंत्रपणे अस्तित्वात असतात. जरी सांख्य विचार काही वेळेस गोंधळात टाकणारे असले तरी ते आपल्या तत्त्वज्ञानाच्या मुलभूत प्रणालीपैकी एक असल्याचे मानले जाते. (सांख्य म्हणजे संख्यांचे गणन : त्यावरून सांख्य शब्द आला आहे.)

सांख्यसूत्राचा कर्ता कपिल महर्षी होय. ह्या प्रणालीतील उल्लेखनीय ग्रंथांपैकी ईश्वरकृष्णाचे 'सांख्य-कारिका' आणि विज्ञानभिक्षूचे 'सांख्य-सूत्रावरचे भाष्य' सांख्यसूत्रांवर गौडपादाचार्य आणि वाचस्पती यांची भाष्ये सांख्य साहित्यात महत्त्वाची आहेत. आदि शंकराचार्यांचे गौडपादाचार्य हे गुरू हेच होते का याबाबत मतभेद आहेत.

गीता सांख्याचा विचार करते. जेव्हा भगवान कृष्ण दोन मार्गांविषयी बोलतात - सांख्य आणि योग - तेव्हा त्यांना पहिले ज्ञान आणि नंतरचा 'कर्मयोग' म्हणायचे आहे. (राजयोग नव्हे)

पुरुषापासून प्रकृती भिन्न आहे ही जाणीव आपल्याला देण्यापलीकडे सांख्य जात नाही. तथापि, ह्या मुद्यापलीकडे जाऊन, पुरुषापासून प्रकृती भिन्न असल्याची जाणीव देण्यासाठी राजयोग आपल्याला एक व्यवहारी मार्ग - साधना सांगतो. ईश्वर ही संकल्पना आणि त्याच्या ठिकाणी समर्पण हा योगाचा एक भाग आहे आणि त्यात मन नियंत्रणाखाली आणण्याचे पाठ आहेत. सामान्यतः योग पतंजलीच्या राजयोगात येतो. त्यानुसार योग म्हणजे मनाचे कार्य किंवा 'स्व' च्या जाणिवेची आंदोलने थांबविणे. हा योग पाश्चात्त्य देशांमध्ये लोकप्रिय झालेला आहे.

जरी ईश्वराला समर्पण हा मीमांसेचा भाग नसला तरी ती वेदांचा अधिकार मान्य करते. सांख्यसुद्धा वेदांचा अधिकार मान्य करते आणि ईश्वर असल्याचे समर्थन करीत नाही.

एका बाजूला बौद्धमत, दुसऱ्या बाजूला विरोध असलेले न्याय आणि मीमांसा आणि ईश्वर ही संकल्पना न मानणारे पण वेदप्रामाण्य मानणारे सांख्य ह्यातून आचार्य स्वीकारार्ह घटक स्वीकारतात आणि अस्वीकारार्ह नाकारतात. ते ह्या सर्वांना थारा देणारी / त्यांचे उगमस्थान असलेली प्रणाली स्थापन करतात. ज्ञानाची उच्च स्थिती ह्या बौद्धमताच्या अंतिम संदेशाच्या विरुद्ध दृष्टिकोन आचार्यांचा नाही. पुरुष म्हणजे ज्ञान स्वतःच, आणि ते निर्गुण ब्रह्मसमान आहे आणि प्रकृती म्हणजेच माया - ह्या सांख्याच्या काही मूळ संकल्पना ते स्वीकारतात. त्याचवेळेस ते मीमांसेची वैदिक विधाने आणि न्याय यांचा ईश्वर स्वीकारतात. पण ते, त्यापैकी प्रत्येक विचार हा एकाच सत्याचा एक दृष्टिकोन / पैलू म्हणून पाहतात, प्रत्येकाच्या विचारसरणीला अंतिम ध्येय म्हणून नव्हे. ते ह्या सर्व भिन्न दृष्टिकोनांस, त्यांच्या सुसंगत विचारसरणीशी संलग्न करतात.

-----

## प्रकरण ७

# मीमांसा आणि आदि शंकराचार्य

आपण अगोदरच पाहिले की ईश्वराच्या बाबतीत मूक असलेल्या बौद्धमतावर उदयन आणि इतर न्याय प्रणालीच्या समर्थकांनी टीका केली. तर त्यात वैदिक विधींवर विश्वास नसल्याने कुमारिलभट्टासारख्या मीमांसकांनी हल्ला केला. मीमांसकांनी महत्त्वाचे मानलेले वैदिक विधी मन शुध्द करण्यास आणि सामाजिक व्यवहारातील योग्य आचरणासाठी आवश्यक आहेत यास्तव आचार्यांची ह्या दृष्टिकोनाबद्दल सहानुभूति होती. तथापि त्यांनी मीमांसकांना विरोध केला कारण त्यांनी ईश्वराला कर्मफलदाता म्हणून मानले नाही आणि सत्कर्मे केल्यावरही पुढे जाऊन ज्ञानमार्ग घेण्यावर मीमांसकांचा विश्वास नव्हता. ते त्यांच्या सर्वकर्माचा त्याग करून संन्यासी होण्याच्या त्यांच्या दृष्टिकोनाशी असहमत होते.

मीमांसकांमध्ये विशेषतः कुमारिलभट्ट आणि मण्डनमिश्र महत्त्वाचे आहेत. कुमारिलभट्ट ह्या मीमांसकाच्या शेवटच्या दिवसात आचार्यांनी वाद केला आणि त्याच्या दृष्टिकोनावर मात केली. तसेच मण्डनमिश्राचे अद्वैत वेदान्त्यामध्ये पक्षांतर झाले आणि सुरेश्वराचार्य हे नाव धारण करून ते आचार्यांचे एक प्रमुख शिष्य झाले.

वेदविद्येच्या चौदा शाखांपैकी मीमांसेला आचार्यांनी विरोध केला याचे कारण ती अस्वीकारार्ह वाटत होती म्हणून नव्हे. त्या प्रणालीत असलेल्या धार्मिक विधींशी ते सहमत होते पण परमेश्वराशी समर्पण वृत्तीबाबत त्यांचे वेगळे मत होते. त्यांना वाटत होते की धार्मिक विधींमुळे प्राप्त झालेले, स्वर्गासारखे लाभ सुद्धा ईश्वराला अर्पण केले पाहिजेत. अशा त्यागाच्या कृतीने मनाची शुद्धी होते. शंकराचार्यांची शिकवण अशी होती. जर आपण ईश्वराला फलदाता मानले, आपल्या कर्माची तोच फले देतो असे जाणले तर स्वर्गप्राप्तीसारख्या फलांचा आपल्याला मोह पडणार नाही. तेव्हाच फक्त, आपल्याला आत्मशुद्धीचा अधिक उच्च लाभ मिळविण्याची प्रेरणा मिळेल. आपल्या आचार्यांना वैदिक विधी पूर्णतः मान्य होते. पण मीमांसकांना तेच (वैदिक विधी) अंतिम होते, त्याहीपुढे, परम श्रेष्ठ भक्त होऊन आणि ईश्वर आणि आपण एक आणि एकच आहोत हे अंतिम ज्ञान मिळविण्यासाठी ते पुढे गेले नाहीत. अंतिम सत्याचे ज्ञान घेण्यात अयशस्वी झाल्याबद्दल शंकराचार्यांनी मीमांसकांवर टीका केली. त्यांनी वैदिक कर्मांना विरोध केला नाही हे त्यांच्या उपदेशावरून सिद्ध होते - त्या उपदेशाला 'सोपान-पंचक' म्हटले जाते - देहत्यागापूर्वी त्यांनी आग्रहाने सांगितले की वेद दररोज म्हटले पाहिजेत आणि त्यात सांगितलेले विधी केले गेलेच पाहिजेत. 'वेदोनित्यं अधियता तदुदितं कर्म स्वनुष्ठियताम्''

आचार्यांनी आपल्याला कर्मासाठी कर्म केल्यावर तेथे न थांबता त्याच्यापलीकडे जाण्यास सांगितले. विधी ईश्वराला अर्पण केले पाहिजेत. हे आत्मशुद्धीचे साधन आणि ज्ञानातील

उपदेश मिळविण्याचे साधन आहे. ती वेळ असते जेव्हा आपण आपली कर्मे सोडून देऊन, आपल्याला मिळालेल्या उपदेशावर चिंतन करण्याची. खरोखर त्यावर कठोर चिंतन करा, आणि ते आपले स्वतःचे आतील वास्तवाचा अनुभव बनवा. अशा प्रकारे शंकराचार्य आपल्याला पायरी पायरीने अंतिम मुक्तीकडे नेतात. त्यांनी मीमांसकांना विरोध केला कारण ते वैदिक कर्माचा हेतू जाणण्यात अयशस्वी झाले आणि त्यांनी त्याही पुढे जाणे नाकारले.

आपण मीमांसा प्रणाली, वेदांचे विवरण म्हणून मान्य केली पाहिजे कारण ती 'शब्द-प्रमाण' मानते, वेदध्वनी आणि तिला (मीमांसेला) ग्रंथांचा अर्थ कळला हा तिचा अधिकार म्हणून मानले पाहिजे. एक मजेशीर विचार माझ्या मनात येतो. मीमांसा ही आकलन होणाऱ्या ईश्वराला शरण जात नाही आणि त्याचे रूप समजून घेण्याचा प्रयत्न करीत नाही. त्याने काही फरक पडतो का ? वेद हे स्वतःच एक देवता आहेत. वेदांचे ध्वनी देवतेचे स्वरूप घेत नाहीत की जी आपल्याला आपल्या डोळ्यांनी दिसू शकेल; पण तिचे आपल्या कानांनी आकलन होऊ शकेल. आपण वेदध्वनींनी सांगितलेली कर्मे प्रश्न न विचारता करू या. अशी कृती समर्पणाची भावना ध्वनित करते आणि असा वेदांचा अर्थ मीमांसकांनी निश्चित केला आहे. म्हणून ते स्पर्शाने आकलन होणाऱ्या ईश्वरावर विश्वास ठेवो अथवा नको, त्यांना कानांनी ईश्वराचे आकलन होऊ शकते हे माहीत होते. (त्यांना वेदांच्या अर्थाचे चांगलेच आकलन झालेले होते.)

-----

## प्रकरण ८

# वेदवाङ्मयाचा अर्थ निश्चित करणे

आपल्याला माहीत आहे की वेदांमध्ये वाक्ये आणि अध्याय आहेत. आपल्याला त्यातील मजकूर आणि त्यांचा अर्थ कसा कळणार? आपण त्यांचा हेतू आणि त्यांच्या संदेश शोधून काढण्यासाठी काय केले पाहिजे?

वेदांचे अर्थ लावण्याचे नियम हे मीमांसा शास्त्रात आहेत. जर वेद हे कायदे असतील तर मीमांसा हे त्यांचा अर्थ लावण्याचा कायदा आहे. मी पूर्वी म्हणालो की शासन जेव्हा अनेक कायदे करते तेव्हा त्यांच्या हेतू आणि अंमलबजावणीबाबत अनेक शंका उपस्थित होतात. वेदांच्या संदर्भात मीमांसा असा कायदा आहे. वैदिक ग्रंथांचा अर्थ लावण्यासाठी त्याने निश्चित अशा पद्धतींची रचना केली आहे.

सहा पद्धतींचा उल्लेख आहे : उपक्रम - उपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, अर्थवाद, उपपत्ती - मीमांसेनुसार वैदिक मंत्रांचे अर्थ, आशय यांचे आकलन हे ह्या पद्धती वापरून होऊ शकेल. (मीमांसा शास्त्राच्या या सहा पध्दतींबाबत वाचकांनी कृपया भाग ५ चे प्रकरण ३४ पाहावे.)

-----

प्रकरण ९

# मीमांसेच्या श्रद्धा

मला आता मीमांसेच्या तत्त्वांवर थोडे अधिक बोलू द्या.

ईश्वर आहे की नाही याची चिंता करायला नको. ईश्वर असू द्या किंवा नसू द्या. आपले कर्तव्य म्हणजे वेदांनी सांगितलेली कर्तव्ये करणे आणि ती स्वतःच फले देतील. जे काही काम आपण करतो त्याची फले मिळतात, नाही का? मग आपल्याला त्यात ईश्वराची गरज कशाला हवी ? कर्म स्वतःच त्याचा परिणाम उत्पन्न करते. आपल्याच बागेतून केळीची पाने आणणाऱ्या माळ्याला आपण पैसे देतो का? तसेच कर्म करून मिळणाऱ्या फलाचे श्रेय ईश्वराला का द्यायचे? आपण जमिनीची मशागत करतो आणि त्यात भात पिकवतो. वैदिक कर्माच्या बाबतीत अगदी तसेच आहे. आपल्याला माहीत नसलेले, वेदांनी सांगितलेले आपण केले तरी आपल्याला ठरावीक फले मिळतील. हे विश्व ईश्वराने निर्माण केले आहे ह्याचा विचार आपण का करावा? ते आज जसे अस्तित्वात आहे तसे त्याचे अस्तित्वात असणे चालत आलेले आहे. ते अचानक उद्भवले यावर आपण का विश्वास ठेवावा? न कदाचित् अनिदृशम् जगत् हे जग आज जसे अस्तित्वात आहे तसे त्याचे अस्तित्वात असणे चालत आलेले आहे. कर्मे ; स्वतःच फले देतील - जेव्हा इंजिन फिरवले जाते तेव्हा मोटार सुरू होते हे सर्व तसे आहे.

मानवी मनाकडून आकलन न झालेल्या गोष्टींबद्दल वेद बोलतात. त्यांच्याकडून लादलेले विधी आपण केले तर साहजिकच त्यांची फले मिळतील. ध्वनी नित्य अस्तित्वात असतो. त्याला खरोखरच आरंभ नसतो आणि वेद हे हा ध्वनी आहेत. काळ आणि अवकाशाप्रमाणे ते नित्य आहेत.

जर तुम्ही वाईट गोष्ट केली तर परिणाम वाईट होतील, जर तुम्ही चांगली कामे केली तर तशी चांगली फले मिळतील. विधी फले देत राहतात आणि आपण त्यांचा आनंद लुटत राहतो - आणि आपण आपले तसेच चालू राहते. ह्यात कोणत्याही देवाची गरज नसते. आपण कधीही कर्मे थांबवता कामा नये कारण कर्म न करणे हे पाप आहे ते (कर्म न करणे) आपल्याला नरकात घेऊन जाईल.

कर्मे तीन प्रकारची असतात : 'नित्य', 'नैमित्तिक'' आणि 'काम्य'. नित्य-कर्म ह्या नावातच रोज करावयाच्या धार्मिक विधींची सूचना आहे. नैमित्तिक कर्मे ही काही विशेष हेतूसाठी किंवा कारणासाठी किंवा विशेष प्रसंगी केली जातात. उदाहरणार्थ, जेव्हा ग्रहण असते तेव्हा आपण स्नान करून पूर्वजांना आहुती दिली पाहिजे. जेव्हा एखादी थोर व्यक्ती आपल्या घराला भेट देते तेव्हा त्यांचा समारंभपूर्वक सन्मान केला पाहिजे - हे सुद्धा नैमित्तिक आहे. नित्य आणि नैमित्तिक विधी सर्वांनी करावयाचे असतात. काम्य-कर्म हा विशेष हेतू

असलेला विधी आहे. जेव्हा दुष्काळ पडतो तेव्हा आपण देवतांना आवाहन करण्यासाठी वरुण-जप करतो आणि त्याच्याकडून पाऊसरूपी वरदानाची अपेक्षा करतो. जेव्हा आपल्याला पुत्रप्राप्तींची इच्छा असते तेव्हा आपण 'पुत्रकामेष्टी' करतो. (पुत्र व्हावा म्हणून यज्ञ). ही कर्मे काम्य गटात मोडतात.

दैनंदिन करावयाच्या विधींची व्याख्या मीमांसेमध्ये केलेली आहे. "अकरणे प्रत्यवायजनकं, करणेऽभ्युदयं" - हे विधान दोन प्रकारांशी संबंधित आहे. काही विधी न करणे हे आपल्याला संकटे आणतात - त्यांचा एक प्रकार आहे. उलट काही विधी आपल्याला सौख्य आणतात - ह्यांचा दुसरा प्रकार आहे. चांगले घर, संपत्ती, पुत्र, कीर्ती, ज्ञान हे खालच्या पातळीवरील सौख्य आहे. मीमांसा ह्यासंबंधी आहे ते आणि भौतिक अस्तित्वापासून मुक्तीच्या अंतिम वरदानाविषयी बोलत नाही.

जर नित्य गटातील विधी केले नाही तर आपल्याला संकटांना तोंड द्यावे लागेल. समजा तुम्ही एका मनुष्याला संध्यावंदना करायला सांगितली आणि तो म्हणाला : "मी करणार नाही. त्यामुळे माझे भले होईल किंवा नाही ह्याची मला पर्वा नाही." मीमांसेकडे याचे उत्तर आहे : संध्यावंदना हे काम्य किंवा पर्यायी विधी नाही आणि ते न करणे तुम्हाला दुःख आणेल.

ठरावीक विधी करणे तुम्हाला सुख देईल याची कारणे ते देते. पण काही विधी न करण्याने वाईट परिणाम घडवतील ह्याचे तुम्ही कसे समर्थन करता ? संध्यावंदना न करणे हे पाप आहे ; पण ती करणे हे चांगले काही करेल असे नाही. कारण हा विधी विधानात केलेल्या गटातील आहे, "अकरणे प्रत्यवायजनक...".

मंदिरात देवतेची पूजा करणे, गरिबांना अन्न देणे अशा कृती लाभदायक असतात असे म्हटले जाते आणि वरील विधानात सांगितल्याप्रमाणे दुसऱ्या गटात येतात,"... करणे अभ्युदयं" ह्यात अर्थ आहे. पण "अकरणे प्रत्यवायजनकं..." असे म्हणणे यात काय अर्थ आहे ? ही म्हण स्पष्ट करण्यासाठी उदाहरणे आहेत का ? होय, आहेत.

आपण भिकाऱ्यांना भिक्षा देतो, किंवा देण्याने पुण्य मिळेल ह्या श्रद्धेने एखाद्या दुसऱ्या संस्थेला देणगी देतो. काही वेळेस आपण अशी उदारता दाखवत नाही कारण आपल्याला विशेष पुण्य मिळविण्याची उत्कट इच्छा वाटत नाही. अर्थात आपल्याला आपले कर्तव्य करायचे असते, पण लोकांना पैसे किंवा वस्तुरूपाने मदत न करणे हे पाप आहे असे म्हटले जाऊ शकणार नाही.

समजा, आपण एखाद्या मित्राकडून किंवा परिचिताकडून पाचशे रुपये उसने घेतले. "मी तुझे पैसे परत करून तुझे पुण्य हिरावून घेऊ इच्छित नाही." असे म्हणून त्या कर्जाची परतफेड नाकारणे हे आपल्याला किती समर्थनीय ठरेल ? अशा पद्धतीने धनको/सावकारापासून सुटका

करून घेणे शक्य आहे का ? तो साहजिकच आपल्याला सांगेल : "मी तुझ्याकडे माझे पैसे मागायला आलो. तू किंवा मी पुण्य मिळवू ह्याची मला पर्वा नाही." जर आपण कर्ज फेडण्यास नकार दिला तर आपल्याला न्यायालयात नेले जाईल आणि शेवटी दण्डासह त्या रकमेची परतफेड करावी लागेल. ही गोष्ट विधान सिद्ध करतेः 'अकरणे प्रत्यवायजनक..."

संध्यावंदन न करणे म्हणजे कर्जाची परतफेड न करणे. तमीळमध्ये पहाटे आणि संध्याकाळी/सूर्यास्तानंतर केल्या जाणाऱ्या वंदनेस "कालै-क-कडन आणि मालै-क-कडन" असे नेमके म्हटले जाते. (सकाळचे ऋण आणि संध्याकाळचे ऋण) हे सुंदर शब्द आहेत.

संध्यावंदनाचे असे काहीतरी उसने घेतलेल्याबरोबर वर्णन केल्याचे आश्चर्य वाटत असेल. वेदांची तैत्तिरीय संहिता म्हणते : ब्राह्मण मनुष्य तीन ऋणे घेऊन जन्मतो. ती म्हणजे, ऋषी-ऋण, देव-ऋण, देव-ऋण आणि पितृ-ऋण (म्हणजे ब्राह्मण ऋषी, देव आणि पितरांचा ऋणी असतो.) पहिले ऋण वेदपठण करून, दुसरे यज्ञ आणि इतर विधी करुन, तिसरे पितरांना आहुती देऊन आणि श्राद्ध करून फेडता येते. आपण ज्या बाबत अज्ञानी असतो अशांवर वेद प्रकाश टाकतात. त्यातील निवेदनानुसार ज्यांची श्रद्धा असेल त्यांना ते विधी करण्याचे कारण कळेल. इतर ज्यांना वाकड्या वाटेने जायचे आहे त्यांना त्यांच्या तर्कात ते विधी न करण्याची सबब मिळेल.

दोन भाऊ आहेत. एक न्यायाधीश आहे आणि दुसरा वैदिक पंडित आहे. "माझा भाऊ कोणत्याही न्यायालयात जात नाही. मग मी तरी का जावे ?" असे म्हणत पहिला न्यायालयात जाण्याचे नाकारू शकत नाही. अधिकारी त्याला म्हणतीलः "तू ह्या न्यायाधीशाच्या नोकरीसाठी अर्ज केलास. आम्ही या कार्यालयातील तुझ्या नेमणुकीचा आदेश दिला आणि तू ते स्वीकारलास" त्याचप्रमाणे आपण मोक्षासाठी - मुक्तीसाठी अर्ज केलेला आहे आणि आपल्याला ठरावीक विधी करण्याचे आदेश मिळालेले आहेत. ज्याने हे आदेश दिले तो आपल्याला दिसत नाही पण तो सर्व पाहतो आणि तो सर्वसाक्षी आहे. वेदान्ताचा असा दृष्टिकोन आहे.

मीमांसेची अशी श्रद्धा आहे की ज्यासाठी आपण अर्ज केलेला आहे असे कर्म त्याचे बक्षीस देईल. त्याच्या म्हणण्याप्रमाणे वैदिक विधींचे फल आपल्याला "आपोआपच" मिळेल.

आपल्या भूतकाळातल्या कर्माप्रमाणे ह्या जगातील आपला जन्म असतो आणि आपल्याला त्याला योग्य असे विधी करायचे असतात. जर आपण केले नाही तर आपल्याला दुःख सहन करावे लागेल. रूढी आणि विधींवर योग्य निष्ठा ठेवली पाहिजे. ब्राह्मणाचे कर्तव्य असे की त्याने वेदातील सत्ये जाणून, दुःखी लोकांचे सांत्वन करणे आणि लोकांच्या त्यांच्यात्यांच्या व्यवसायात सूचना देणे. त्याप्रमाणे, प्रत्येक मनुष्याने त्याला जन्माने मिळालेली कर्मे केलीच पाहिजेत. तेल्याने तेल निर्माण केले पाहिजे, चर्मकाराने पादत्राणे बनविली पाहिजेत

आणि इ. ब्राह्मणाने आपले शरीर, मन आणि आत्मा शुद्ध ठेवला पाहिजे आणि आपण काय भक्षण करतो त्याची त्याने काळजी घ्यावी. ह्याचे कारण म्हणजे त्याला परमात्म्याचे चिंतन करायचे आहेच पण ध्यानाच्या मार्गावर इतरांना आणायचे कर्तव्य आहे. अशी कर्तव्ये त्याने पार पाडावी म्हणून पूर्वीच्या काळी त्याला करमुक्त जमीन दान दिली जाई. त्याकाळी प्रत्येक कामकऱ्याला जमीन दिली जाई. जर त्याने काम करणे थांबविले तर समाजाला त्रास सहन करावा लागत असे. म्हणून त्याला दंड म्हणून ती जमीन परत करावी लागत असे आणि ती दुसऱ्या कामकऱ्याला दिली जात असे.

शास्त्रानुसार आपल्याला सोपविलेले कर्म न करणे केवळ पापकारक नाही तर व्यावहारिक अर्थाने हानिकारक सुद्धा आहे. पूर्वी एखादा अपेक्षिलेले त्याचे कर्म करीत असे म्हणून त्याला मान मिळत असे. लोक आपली पूर्वजांकडून आलेली कर्मे करीत नसल्याने आज आपले राष्ट्र शोचनीय स्थितीत आहे. प्रत्येकाने आपले विहित कर्म केले, जन्मामुळे त्याच्याकडून अपेक्षिलेली कामे केली तर व्यावहारिक अर्थाने ते सर्वांसाठी सुखकारक असेल. आज देशात इतके दारिद्र्य आहे याचे कारण म्हणजे प्रत्येकाकडून त्याचे विहित कर्म करणे अपेक्षिणारी, सामाजिक उत्कर्ष आणि ऐक्य टिकविणारी समाजव्यवस्था जतन करण्यातील आपले अपयश होय.

संध्यावंदन आणि तसे इतर हे आपले रोजचे विधी आहेत. नित्य-कर्म न करणे हे पाप आहे, करणे म्हणजे आपल्याला काही अवगुण प्राप्त होणार नाही. शिवाय सामान्यतः भले होईल, जर आपण आपले ऋण हप्त्याने फेडले तर आपण धनकोचे ऋणी राहणार नाही (हा एक लाभ); शिवाय आपण प्रामाणिक आणि विश्वासू म्हणून कीर्ती मिळवू. नित्य-कर्म केल्याने आपल्याला पाप जोडले जात नाही आणि ते आपल्यासाठी चांगलेच असणार. अशा तऱ्हेने त्यात दोन प्रकारचे लाभ आहेत.

"अकरणे प्रत्यवायजनकं, करणे भ्युदयं" ह्या विधानात पूर्ण असलेली कल्पना वेदसुद्धा मान्य करतात. आपण नित्य-कर्म करण्याचे कधीही राहू नये, उदाहरणार्थ अग्निहोत्रासारखे श्रौत आणि औपसनासारखे स्मार्त.

मीमांसकांचा असा दृष्टिकोन आहे की जो पर्यंत एखादा जिवंत आहे तो पर्यंत त्याने अग्निहोत्र केले पाहिजे. ते संन्याशाश्रमाला सुद्धा (जीवनातील शेवटची अवस्था, तपस्व्याची) सूट देत नाहीत. ह्या आश्रमात अग्निहोत्रासारखे विधी नाहीत. कर्मत्याग हा मीमांसकांच्या दृष्टीने अतिशय पापजनक आहे. तसे जाणीवपूर्वक करणे आणि संन्यासी होणे हे दुसरा धर्म जवळ करण्यासारखे आहे. ईशावास्योपनिषद (दुसरा मंत्र) म्हणते -

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजिविषेत् शतं समाः
एवं त्वयि, नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे

मनुष्य कर्म करीत शंभर वर्षे जगला पाहिजे. तैत्तिरीय ब्राह्मणात असे आहे की अग्निहोत्राचा अग्नी शांत करणे म्हणजे एखाद्या वीर पुरुषाची हत्या करण्यासारखे पाप आहे.

मीमांसेनुसार नित्य-कर्म सोडून देणे हे कुकर्म करण्यासमान आहे. मण्डनमिश्र आणि त्याच्यासारखे मीमांसक म्हणतात, ''संन्यासी कर्म सोडून देतो (कर्म-भ्रष्ट). त्याच्याकडे पाहणे पाप आहे आणि तुम्ही त्याची भरपाई केली पाहिजे. पापी माणसाकडे पाहणे, त्याच्याशी बोलणे, त्याला स्पर्श करणे, त्याच्याबरोबर जेवणे हे पाप मिळविण्यासारखे आहे. संन्याशाकडे पाहणे तितकेच पाप करण्यासारखे आहे.''

वेदातील ज्ञानकांड संन्यास, परब्रह्म, मुक्ती, ज्ञान आणि इतर गोष्टींचा उल्लेख करते. अशा सर्वसाधारण कल्पनांवर का हल्ला व्हावा? ह्यावर मीमांसकांचे काय मत आहे?

ते म्हणतात की उपनिषदे ज्ञान आणि परब्रह्माचा उल्लेख करतात, हे खरे आहे. पण वेद काय आहेत ? वेद ध्वनी आहेत, ते शब्दांनी बनलेले आहेत. ते अस्तित्वात का आले ? आपल्याला जे माहीत नाही ते माहीत करून देण्यासाठी. ज्या वस्तू आपल्याला डोळ्यांनी आकलन होऊ शकत नाहीत आणि त्या तर्काच्या पलीकडे असतात त्यांचे वर्णन करणाऱ्या शब्द-प्रमाणाची रचना वेद करतात. ज्या गोष्टी उपयोगाच्या नाहीत त्यासंबंधी न बोलणे हा त्यांचा हेतू असतो. सर्व शब्दांना दुहेरी हेतू असतो. ते तुम्हाला आदेश देतात : ''हे करा'' किंवा ''हे करू नका''

प्रवृत्तिर्वा निवत्तिर्वा नित्येन कृतकेन वा ।
पुंसां ये नोपदिश्येते तत् शास्त्रं अभिधीयते ।।

ज्या शब्दांनी काही हेतू साध्य होत नाही. अशा गोष्टी निरर्थक, गप्पा ह्या गटात मोडतात. समजा एक माणूस म्हणाला, ''कावळा काळा असतो'' हे शब्द तुम्हाला काही एक प्रकारे उपयुक्त आहेत का ? हे वाक्य उदाहरण म्हणून घेऊ : ''येथे उद्या एक प्रवचन होणार आहे.'' ह्याला काही हेतू आहे. ते थोडी माहिती देते आणि त्यात लोकांना, येऊन प्रवचन ऐकण्याचे निमंत्रण आहे. ह्या उपयुक्तता म्हणजे 'प्रवृत्ती'. जर एखादा म्हणाला की उद्या कुंभकोणमला चांगला संवाद आहे. तुम्ही मद्रासला आहात आणि ते प्रवचन ऐकण्यासाठी इतक्या कमी वेळात कुंभकोणमला कसे जाऊ शकाल ? कोणत्याही शब्दाला काही तरी साध्य असलेच पाहिजे. त्याने तुम्हाला कर्मात गुंतविले पाहिजे, ''प्रवृत्ती'' किंवा त्यापासून दूर ठेवले पाहिजे ''निवृत्ती''. जर वेद पाच भयंकर पापांचा उल्लेख करीत असतील आणि ती न करण्याची आज्ञा देत असतील तर ते ''निवृत्ती'' कारण ते (वेद) आपल्याला त्या भयंकर पापे करण्याविरुद्ध इशारा देत असतात.

जे शब्द प्रवृत्ती किंवा निवृत्ती असा कोणताही हेतू साध्य करीत नसतील तर निरुपयोगी

होत. वेदांचा एक भाग तुम्हाला हे किंवा ते करा असे सांगतो आणि दुसरा हे किंवा ते न करण्याचे सांगतो. (तुम्ही काय केलेच पाहिजे आणि काय करता कामा नये ह्याचे कायदे). पण आणखी एक भाग आहे जो कथाकथनासारखा आहे. जर त्या प्रवृत्ती आणि निवृत्तीच्या आज्ञा आणि मनाई यांच्या संबंधित असतील तर त्या अर्थपूर्ण असतात.

समजा, तुम्हाला जोम आणि सामर्थ्य देण्याचा दावा करणाऱ्या टॉनिकच्या जाहिरातीत सिंहाशी कुस्ती करणाऱ्या मनुष्याचे सचित्र उदाहरण असते. ह्या चित्राचा उद्देश काय असतो ? ही एक प्रकारची फसवणूक आहे, त्यामागे तुम्हाला टॉनिक विकत घेण्याचा मोह पाडण्याचा आणि पैसे कमावण्याचा हेतू असतो. वेदातील अशा कथा हेतूपूर्ण असतात कारण त्यात त्या आज्ञांशी निगडित असतात आणि त्या अर्थवाद गटातील असतात. (प्रकरण ३४ भाग ५). एखादा डॉक्टर त्याच्या औषधाची जाहिरात करताना त्याचे प्रशस्तिपत्रक का वापरतो ? ते (औषध) विकत घेण्यासाठी लोकांचे मन वळविण्यासाठी. अशा प्रकारे अर्थवादात सत्याबरोबर असत्य मिसळलेले असते. असत्य भागाला 'गुणवाद' म्हटले जाते. अजून एक शब्द आहे - 'अनुवाद'. त्याचा अर्थ जे ज्ञात आहे तेच सांगणे. उदाहरणार्थ, ''अग्नी जळतो'' हे विधान.

औषधातील घटकांचा उल्लेख करणे हे भूतार्थवादाचे उदाहरण आहे. नियमाचे पालन करण्यास उपयुक्त व्हावी म्हणून जरी असत्य असली तरी एखादी गोष्ट सांगणे म्हणजे 'गुणार्थवाद'. ''मद्य पिऊ नका'' ही आज्ञा आहे. (किंवा मनाई) मद्य प्राशन करून नाश झालेल्या माणसाची गोष्ट सांगणे हा अर्थवाद. त्याचा हेतू किंवा तात्पर्य म्हणजे कोणी मद्य प्राशन करू नये. एखादा मनुष्य मद्य प्राशन करून धुंद होतो हे सांगणे म्हणजे अनुवाद. अर्थवादाशी निगडित सर्व कथा किंवा विधाने यांनी आपल्याला वेदातील आज्ञांशी जुळवून घ्यायला भाग पाडले पाहिजे.

यज्ञाचा उल्लेख करताना दक्षिणा चांदी नव्हे तर सोन्याच्या रूपात द्यायला वेद सांगतात. तैत्तिरीय संहितेनुसार यज्ञात दक्षिणा म्हणून चांदी देऊ नये. ह्या संदर्भात निषेधाचे किंवा चांदीबाबतचा प्रतिबंध करणाऱ्या नियमाचे उदाहरण म्हणून एक मोठी कथा सांगितली जाते. (''हे करा.'' हा विधी. ''हे करू नका'' हा निषेध.) पण अशा अर्थवादातील शब्द स्वतःच हेतू साध्य करीत नाहीत.

वेदांतील ज्ञानकांडाच्या अनुयायांनी त्यांच्या प्रणाली विरुद्ध उपस्थित केलेल्या हरकतींना मीमांसक अशा तऱ्हेने तोंड देतात.

उपनिषदे जेव्हा ब्रह्माची चर्चा करतात तेव्हा करावयाच्या कोणत्याही कार्याचा तेथे उल्लेख नाही. ब्रह्माची प्रचिती ही एक अशी अवस्था आहे जिच्यात कोणतीही कृती नाही असे उपनिषदे स्वतःच सांगतात. वेद हे प्रमाणभूत केव्हा होतात, तर जेव्हा ते कर्माचरणाविषयी सांगतात तेव्हा उपनिषदे ही अर्थवादाच्या प्रकारात येतात. कारण ती अस्तित्वात असलेल्या

गोष्टीबद्दल बोलतात. आपण काय जाणले पाहिजे? अस्तित्वात असलेल्या गोष्टी की करावयाचे कर्म?



"ब्रह्म अस्तित्वात आहे. आत्मा ब्रह्म आहे." अशा निवेदनांमध्ये करायच्या कोणत्याही विधींचा उल्लेख नसतो. आपल्याला हे यज्ञ करणे भाग आहे आणि त्या हेतूसाठी आपल्याला अशा कर्मांबाबत सांगण्यासाठी, अस्तित्वात असलेल्या गोष्टींबाबत न बोलण्यासाठी वेदांची गरज आहे. जे अस्तित्वात आहे ते आपल्याला आता कळले नाहीतरी आज नाहीतर उद्या कळेल. वेदांचा जो भाग अस्तित्वात असलेल्या गोष्टींबाबत बोलतो तो अर्थवादाचा असतो. म्हणून उपनिषदांना अधिकारी मानले जात नाही. मग त्यांचे हेतू काय ? ते यज्ञ करणाऱ्याचे उन्नयन करण्यासाठी आहेत. त्याची खूप स्तुती करून अधिकाधिक कृत्ये करायला लावले जाते. संन्यासी होण्यासाठी कर्म त्याग करणे योग्य नाही. जीवात्मा हा ब्रह्मासारखाच असतो हे उपनिषदिक विधान जो कृत्ये (धार्मिक) करतो त्याची प्रशंसा करण्यासाठी आहे. जो मनुष्य टॉनिक घेतो (अगोदरच्या उदाहरणातील) तो कधीही सिंहाबरोबर लढू शकणार नाही. त्याच प्रमाणे वैयक्तिक जीव कधीही ब्रह्मापर्यंत पोहोचू शकणार नाही. उपनिषदे गोष्टीस्वरूपात आहेत आणि आपल्याला ब्रह्म, ज्ञान, मोक्ष, ईश्वर आणि इ. बाबत संवादाची गरज नाही. आपल्याला कर्मच सर्व काही आहे. असा मीमांसकांचा वादविवाद चालू राहतो.

-----

# शंकराचार्यांचे उत्तर

ह्या मुद्याला शंकराचार्यांचे काय उत्तर आहे?

वेद जे सांगतात त्याने आपण कोणत्याही कामात गुंतून गेले पाहिजे हा हेतू साध्य होतोच असे नाही. मीमांसक वेद स्वीकारतात पण त्यांच्या मतानुसार वेदात सांगितलेले कर्म हेतू साध्य करते. म्हणून कर्माने साध्य झालेला हेतू हा वेदांचा संदेश आहे; प्रत्यक्ष कर्म नव्हे. जर कर्मांविना राहणे, काही एक कामाविना राहणे हाच मोठा हेतू असेल तर वेदातील ज्ञानकांडात कोणतेही कर्म न करणे, काहीही न करणे ही अट प्रतिपादित आहे. मग ते (ज्ञानकांड) स्वीकारार्ह नाही का ? म्हणजे कर्मांविना राहणे हेच उपयुक्त आहे जर तसे राहणे हेतू साध्य करते - तोही वेदांचा संदेश असू शकतो. म्हणून वेदांचे मूलतः ध्येय कर्म नसून त्या कर्मामागील हेतू आहे.

वेद आपल्याला आज्ञा देतातः "मद्य पिऊ नका", ह्याला आपण कसा प्रतिसाद देतो. आपण काहीही न करून प्रतिसाद देतो. खरेच आपल्याला काहीच करायचेच नसते. ह्या वेदाज्ञेचा संदेश असा आहे की आपण मद्य पिऊन आपला ऱ्हास करून घेऊ नये. काहीही न करता राहणे ह्याला 'अभाव' म्हटले जाते. सर्व निषेध (मनाई) अभाव गटात येतात. मीमांसक मान्य करतात की वेदांनी काही कृत्यांना मनाई केली आहे. काही कृती न करणे जर लाभदायक असेल तर कोणतेही कर्म न करण्याने मोठा हेतू साध्य होण्याच्या शक्यतेला का आक्षेप घेता ? वेदान्ताचा असा मोठा उद्देश आहे कारण ज्या स्थितीत आत्मज्ञान होते अशा कर्मरहित राहण्याचा, निश्चल राहण्याचा विशेष हेतू साध्य होतो. हे अर्थवादाप्रमाणे नाकारता येणार नाही.

गीतेत कृष्ण म्हणतोः "सर्व कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते" (पार्था, सर्व कर्मे ज्ञानात त्यांचे ध्येय शोधतात) (प्रकरण ३२ भाग ५ पहा) सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण केली पाहिजेत. देवाधिदेवाच्या पायाशी ठेवली पाहिजेत. कर्मविहीन असणे आणि ब्रह्माचे वरदान अनुभवणे हा सर्वात मोठा उद्देश आहे. ह्या स्थितीत पुनर्जन्म नसतो आणि त्याचा अर्थ भौतिक अस्तित्वापासून मुक्तता होय. हा वेदांचा अंतिम संदेश आहे. कर्मकांड जर ते अर्थपूर्ण असेल तर आणि त्याने हेतू साध्य करायचा असेल तर ते ज्ञानकांडाशी मिळतेजुळते करायला हवे.

शंकराचार्य हे मंडनमिश्र, कुमारिलभट्ट आणि इतरांना हा दृष्टिकोन योग्य असल्याचे पटवून देण्यात यशस्वी झाले. त्यांच्या म्हणण्याचा सारांशः वेदातील कर्मकांड कर्माचा उल्लेख करते कारण ते करण्याने मनाची शुद्धता हा काहीसा उपयोग होतो. जर त्यांचे आचरण न करता साध्य होणारा हेतू हा आचरणाने जो साधला जातो त्यापेक्षा महान असेल तर तोच वेदांचा

संदेश जाणला पाहिजे जी ज्ञानकांडाची अंतिम शिकवण आहे. कर्मकांडाची साधकाला प्रारंभिक स्थितीत मदत होते. धार्मिक विधी करण्याने अंतरंगाची शुद्धता होते आणि ती आपल्याला ईश्वराकडे नेते. कर्मासाठी केलेले कर्म माणसाला कोठेही नेत नाही. तपस्वी परमात्म्याला प्राप्त करतो आणि स्वतःच परमात्मा होतो. ह्या संन्याशाच्या स्थितीबाबत वेद विधान करतात. ह्या विचारधारेने आचार्य मंडनमिश्राशी बोलले आणि त्यांच्या दृष्टिकोनाकडे त्याला वळविले आणि त्याला संन्यासाची दीक्षा दिली.

कर्मकांडात काही कृत्ये पापमूलक असल्याचे म्हटले आहे. एखादा मनुष्य ती करत राहतो कारण त्याला त्यात आनंद मिळतो. पण हा आनंद तात्पुरता असतो आणि तो अधिक मोठा आनंद शोधण्याच्या त्याच्या प्रयत्नातील अडथळा बनतो. वेदांच्या आज्ञांचा आदर करूनही मीमांसक पापमूलक कर्मांचा त्याग करतात. वैदिक कर्मे करून ते ठरावीक फल काही प्रमाणात मिळवितात. त्यांना ऐहिक जीवनातील अविनाशी कल्याण लाभते आणि ते पितृलोक (पितरांच्या) किंवा देवलोकात (देवांच्या, स्वर्गात) जातात. पण आनंदाकडे ते जर नेत नसतील तर त्यांचा काय उपयोग ? त्यांच्या पुण्याचे फळ जेव्हा संपते तेव्हा त्यांचा आनंद पण संपतो. ते जरी स्वर्गलोकात गेले असले तरी त्यांना तेथून ईहलोकात परत यावे लागते. ''क्षीणे पुण्ये मर्त्यलोकम् विशन्ति''

ते सुख कोणते जे शाश्वत टिकणारे आहे. ह्याचे उत्तर आहे की ज्ञानी जेव्हा परमात्मस्वरुपात पूर्ण विलीन होतो, तेव्हा जे सुख त्याला मिळते ते शाश्वत सुख होय. मग त्या अवस्थेत करावयाचे कोणतेही कर्म करत नाही. क्षुद्र क्षणिक आनंद मिळवून देणाऱ्या परमकर्मा त्याग केला पाहिजे आणि त्याऐवजी वेदान्त सांगितलेली श्रेष्ठ कर्मे केली पाहिजेत. परंतु जी कर्मे अविनाशी आनंद मिळवून देत नसतील तर ती करुन तरी काय उपयोग ?

तथापि, वैदिक कर्मे सोडून देऊन आपण थेट असे वरदान प्राप्त करण्यास समर्थ आहोत का? नाही. ज्ञान मिळविण्यास सोपे नसते. त्यासाठी जाणीव, मन हे शुद्ध आणि अचल असायला हवे. म्हणून वैदिक विधी आवश्यक आहेत.

पण ते स्वर्गप्राप्ती सारख्या तात्पुरत्या बक्षिसासाठी नव्हे तर अंतरंगातील अशुद्धता घालविण्यासाठी करावेत. कर्माने दिलेल्या फलामुळे आपण आपल्या अधिक उच्च मार्गापासून दूर जाता कामा नये. - ती (कर्मे) देवाच्या पायाशी श्रद्धेने ठेवली पाहिजेत. तो आपल्याला अधिक उच्च असलेले अंतरंगातील शुद्धतेचे फल देईल आणि नंतर मन आत्मिक जिज्ञासेसाठी, अंतयत्रिसाठी पक्व होईल. तो मार्ग सर्वोच्च धन्यतेकडे-अंतर्यामीच्या परमशांतीच्या स्थितीकडे नेणारा आहे.

-----

प्रकरण ११

# वेदान्त आणि मीमांसा

अद्वैताचे एका मुद्यापर्यंत मीमांसेशी एकमत आहे. ते वैदिक कर्मांचा तसेच कुमारिलभट्टाने स्पष्ट केलेल्या सहा प्रमाणांचा (ज्ञानेंद्रियाने आकलन होणाऱ्या गोष्टी) स्वीकार करते. शंकराचार्यांचा अद्वैतवाद, रामानुजांचा विशिष्टाद्वैत, मध्वाचार्यांचे द्वैत ही सर्व वेदान्तिक मते आणि ती सर्व वैदिक विधींच्या विरुद्ध नाहीत. अद्वैत मीमांसेची सर्व सहा प्रमाणे स्वीकारते, विशिष्टाद्वैत केवळ तीन स्वीकारते - प्रत्यक्ष, अनुमान आणि वेद. न्यायाबाबत बोलताना मी ह्या शब्दांचे स्पष्टीकरण करीन.

तीन वेदान्तिक आचार्य (शंकराचार्य, रामानुजाचार्य आणि मध्वाचार्य) मीमांसेला पूर्णपणे नाकारत नाहीत पण त्यांनी तयार केलेले मार्ग मीमांसेच्या दृष्टिकोनाच्या पलीकडे जातातः विशिष्टाद्वैत आणि द्वैताबाबत समर्पण आणि अद्वैताबाबत ज्ञान.

मीमांसेला कर्ममार्ग म्हटले जाते कारण ती कर्मच सर्वकाही असल्याची शिकवण देते. परंतु वेदान्त ज्या तीन मार्गांचा - कर्म, भक्ती आणि ज्ञान यांचा उल्लेख करते तोच अर्थ येथे (मीमांसेत) नाही. वेदान्तामध्ये कर्मासाठी कर्म केले जात नाही आणि ते अंतिम नाही, पण ते कोणत्याही कृपेची अपेक्षा न ठेवता ईश्वराला अर्पण केले पाहिजे. हा सुद्धा कर्ममार्ग किंवा कर्मयोग होय. हा कर्माबाबतचा दृष्टिकोन भगवानाने गीतेत स्पष्ट केला आहे. मीमांसकाच्या कर्ममार्गात भक्ती नाही. तरी वैदिक विधी विश्वाचे कल्याण साधतात, शिस्तबद्ध आणि ऐक्यपूर्ण सामाजिक जीवनाकडे नेतात आणि कर्त्याच्या अंतरंगात शुद्धता आणतात. मीमांसा कर्मालाच ध्येय समजते; वेदान्त त्याला अधिक उंचीवर जाण्याचे माध्यम समजते.

-----

## प्रकरण १२

# मीमांसेची प्रशंसा कशी केली जाते

वैदिक ग्रंथांचा अर्थ समजून घेण्यासाठी मीमांसेचा फार उपयोग होतो. ह्याच कारणास्तव त्यातील कर्ममार्गाला ज्यांनी विरोध केला त्यांच्यासह अनेक पंडितांनी मीमांसेचा पूर्ण अभ्यास केला आणि त्यावर ग्रंथ लिहिले. श्रेष्ठ वेदान्ती असलेले मन्नारगुडीचे (तंजावूर जिल्हा) राजू शास्त्री, तिरूविशनल्लुरचे वेंकटसुब्ब शास्त्री, त्याच ठिकाणचे नीलमेघ शास्त्री, रायमपेठचे कृष्णमाचारियार, नंदकुलत्तुरचे चिन्नास्वामी आणि इतर हे (मोठे विद्वान परमगुरूंनी वापरलेल्या शब्दांत ''पंडित-सिंह'') होते. त्यांनी मीमांसेचा सखोल अभ्यास केला. त्यात उपरोध असा की वेंकटसुब्ब शास्त्री आणि नीलमेघ शास्त्री यांचे गुरू असलेले तिरूविशनल्लुर रामसुब्ब शास्त्री (यांनी त्यांच्या 'पशु-मारक-मर्दनम्' ह्या ग्रंथात यज्ञसंस्थेला विरोध केला आहे) यांनी यज्ञविधींना विरोध केला. तथापि, जरी ते मीमांसेचा महत्त्वाचा भाग असलेल्या श्रौतकर्माच्या विरुद्ध होते तरी त्या प्रणालीतील सैद्धांतिक उच्च दर्जाने प्रभावित झाले होते आणि ते स्वतःला त्याविषयातील अधिकारी मानत.

मद्रासच्या मायलापोर येथील संस्कृत कॉलेजने लक्षणीय मीमांसक दिले आहेत.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग १३

## न्याय

ह्या भागाचा मुख्य विषय असलेल्या पूर्व मीमांसेवरच्या विश्वासाचे परीक्षण करताना परमगुरू सांख्याबाबत सांगतात आणि योगालाही थोडक्यात स्पर्श करतात.

## प्रकरण - १

# तर्काचे शास्त्र

न्यायाला तर्कशास्त्र असेही म्हटले जाते आणि त्याचा लेखक गौतम आहे. ह्या सर्व जगाचा कर्ता किंवा निर्माता परमेश्वर आहे हे तर्काने सिद्ध करणे हा त्याचा मुख्य हेतू आहे. खरे तर तर्कशास्त्र अनुमानाने परमेश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न करते. अशा तऱ्हेने तर्काला न्यायात महत्त्वाचे स्थान आहे.

अर्थातच कोणत्याही अभ्यासाला तर्कशास्त्र अत्यावश्यक आहे. वेद एखादे विधान करतात आणि मीमांसा त्याचा अर्थ निश्चित करते. आपला वेदांवर जरी विश्वास असला तरी ग्रंथातील वेच्यांच्या अर्थाबाबत आपल्या मनात शंका उद्‌भवतात. जर ह्या शंकांचे तर्काद्वारे निरसन झाले तर वेदांचा संदेश खात्रीपूर्वक प्रतिपादला जाऊ शकेल. जेव्हा आपण विवाहमंडप उभा करतो तेव्हा आपण बांबू किंवा लाकडाचे खांब हलवून त्यांच्या बळकटीची तपासणी करतो. त्याचप्रमाणे आपण सत्याची खात्री करून घेण्यासाठी त्यांचे योग्य परीक्षण करावयास हवे. सर्व तर्कशास्त्रीय कारणमीमांसा स्वीकारली गेली पाहिजे पण ती अधिकृत प्रमाणांशी निगडित पाहिजे. शिवाय युक्तिवादातील विधाने केवळ विरोधासाठी विरोध करणारी व केवळ दोष काढणारी नसावीत.

जेव्हा शंकराचार्य हे जग सोडून जाणार होते तेव्हा त्यांच्या शिष्यांनी त्यांना सारांशरूपाने उपदेश करण्याची विनंती केली. तेव्हा त्यांनी आपला उपदेश पाच श्लोकांच्या रूपात दिला. तो 'उपदेश-पञ्चक' किंवा 'सोपान-पञ्चक' या नावाने ओळखला जातो. ''दुस्तर्कात सुविरम्यतामं - श्रुतिमतस्तर्को' नुसंधीयतामं'' ही त्यातील एक ओळ आहे. त्या ओळीचा अर्थ असा की तुम्ही दुसऱ्याचे दोष काढणारी विधाने करण्याची सवय सोडून दिली पाहिजे आणि एखाद्या प्रश्नावर चर्चा करीत असता तुम्ही वेदांच्या दृष्टिकोनांचा मान ठेवून योग्य तर्क वापरला पाहिजे.

तर्करहित मार्गदर्शन म्हणजे जंगलात दिशाहीन भटकणे होय. पण हा तर्क अधिकृत प्रमाणांवर आधारलेला असावयास हवा. न्यायशास्त्र हे ह्याप्रमाणे वैदिक वेच्यांच्या अर्थाचा शोध घेत असते.

कणादानेही न्यायशास्त्र निर्माण केले : याला वैशेषिक असे म्हटले जाते. एखादी वस्तू दुसरीपेक्षा भिन्न आहे हे त्यांच्या विशेष गुणांवरून ठरविले जाते. वैशेषिक हे नाव त्याला अशा गुणांची गरज असते यावरून आले आहे. न्यायशास्त्रात ह्याविषयी पुष्कळ चर्चा आहे. जीवात्मा, विश्व, ईश्वर, मोक्ष किंवा मुक्ती अशा विषयांची परीक्षणे केली जातात. (वैशेषिकामध्ये मोक्षाला 'अपवर्ग' म्हणून ओळखतात.)

प्रत्यक्ष, अनुमान, उपमान आणि शब्द ह्या ज्ञानाच्या चार प्रमाणांद्वारे न्याय सत्याचा शोध घेते. प्रत्यक्ष म्हणजे थेट आकलन, अनुमान म्हणजे निष्कर्ष काढणे, उपमान हे साम्य किंवा तुलनेवरून काढलेले अनुमान आणि शब्द म्हणजे वेदांसारख्या विश्वासार्ह अधिकाराने झालेले निवेदन होय. प्रत्यक्ष हे थेट आकलन असते म्हणजे जे डोळे आणि कान इत्यादींनी आकलन झालेले. अनुमान हे न्यायाच्या केंद्रस्थानी आहे. अनुमान म्हणजे काय? आपण एखाद्या पर्वत शिखरावरून धूर वर येत असलेला पाहतो, आपल्याला केवळ धूर दिसतो, अग्नी दिसत नाही, कदाचित तो खडकांमुळे झाकला गेला असेल. पण आपल्याला जरी तो अग्नी दिसत नसला तरी आपण अनुमान करू शकतो की अरण्याला आग लागलेली आहे. ह्याला अनुमान म्हणतात. येथे अग्नीला साध्य म्हटले जाते आणि ज्याच्याद्वारे आपण त्याच्या अस्तित्वाचे अनुमान करतो त्यास साधन, लिंग किंवा हेतू असे म्हटले जाते.

आपल्या वेदान्त प्रणालीमध्ये आपण आपल्या गुरूने दिलेल्या ज्ञानाचा विचार केला पाहिजे. हे मनन म्हणजे स्वतःच्या तर्कशक्तीचा उपयोग करून मनात त्याची पुन्हा पुन्हा उजळणी करणे असते. (ह्याबाबत गुरूकडून निर्देश मिळालेला असतो.), येथे अनुमान साहाय्यभूत ठरते. ज्याचे आपण अन्य प्रकारे अनुमान करू शकत नाही त्या वस्तूंचे ज्ञान आपण अनुमानाने करत नाही का? आपल्या इंद्रियांकडून जीवात्मा किंवा परमात्मा यांचे सरळ आकलन होऊ शकत नाही. मुक्तीचे स्वरूप आणि ती कशी प्राप्त करायची हे आपल्याला कळत नाही. अशा गोष्टी आपल्याला अनुमानाने समजून घ्याव्या लागतात. ज्ञात वस्तूच्या आधारे वस्तूचे ज्ञान घेणे म्हणजे अनुमान. जेव्हा आपण गडगडाट ऐकतो तेव्हा आपण अनुमानाने जाणतो की आकाश ढगांनी व्यापलेले आहे.

वैदिक विधी करून आपण आतून शुद्ध झालो आहोत असे मानू या. आपल्याला चांगला गुरू प्राप्त झाला आहे आणि आपला त्याच्या निर्देशांवर विश्वास आहे. पण तो आपल्याला जे काही सांगतो त्यापेक्षा आपणास काही वेगळेच ऐकू आले तर साहजिकच आपल्या मनात शंका उद्भवतात. ह्या शंकांचे निरसन व्हायला हवे; त्याच्यावर चर्चा व्हायला हवी आणि मग निर्णयाप्रत यायला हवे. येथे आपल्याला अनुमानाप्रमाणे प्रमाणाकडे (ज्ञानप्राप्तीचे साधन किंवा उगम ह्याकडे) धाव घ्यावी लागते. न्याय आणि वैशेषिक दोन्हीही अनुमानावर आधारलेली जिज्ञासा करतात.

-----

## प्रकरण - २

# पदार्थ

आपली धार्मिक प्रणाली अशी आहे की जर आपण पदार्थांच्या (वर्ग, प्रकार) (शब्दशः म्हणजे शब्दाचा अर्थ किंवा वस्तू) मुळाशी गेलो आणि त्यांचा उगम समजून घेतला तर सत्य प्रकाशित होईल. आपण ह्यासाठी प्रमाणांचा (ज्ञानाचा उगम किंवा साधन यांचा) उपयोग करून घेतला पाहिजे. (ज्यायोगे आपण वस्तूंचे आकलन करतो ते प्रमाण असते.)

आपल्या इंद्रियांद्वारे म्हणजे डोळे, कान इ. यांनी आकलन केलेल्या वस्तू असंख्य नसतात. इतर अनुमानाने जाणून घ्याव्या लागतात. आणि वेदातील सत्ये जाणण्यास अनुमान आपल्याला मदत करते. म्हणून न्यायाला वेदांचे उपांग म्हटले जाते. (साहाय्यक अवयव.)

न्यायामध्ये पदार्थांचे सात वर्गांत विभाजन होते. त्यांपैकी दोन विभाग असे आहेत : 'विद्यमान' आणि 'अविद्यमान' - 'भावो अभावश्च', अभाव सातवा पदार्थ आहे. भाव किंवा विद्यमान याचे पुढे सहा उपवर्गांत विभाजन होते.

जे अस्तित्वात नाही ते, पदार्थ कसे असते? पदार्थ म्हणजे काय? शाब्दिक अर्थाने पदार्थ म्हणजे पदाचा किंवा शब्दाचा अर्थ. ज्याचा अर्थ 'नाही' असा आहे असा एकही शब्द नाही का? काही ठिकाणी ठरावीक वस्तू अविद्यमान असतात, काही ठिकाणी नसतात. आता येथे फुले नाहीत. जेथे पूजा केली जात आहे त्या मंडपात फुले आहेत म्हणजे फुलांचा अभाव हे मंडपाला लागू नाही. म्हणजे काही ठिकाणी आणि ठरावीक प्रसंगी (वस्तूंचा) अभाव असतो. अशाप्रकारे, अविद्यमानता (वस्तूची) काही ठिकाणी आणि ठरावीक वेळेस असणे ही वस्तुस्थितीसुद्धा पदार्थ म्हणून जाणली जाते.

सात पदार्थ असे आहेत : द्रव्य (वस्तू), गुण (गुणधर्म), कर्म (कृती), सामान्य (संबंध), विशेष (भेद), समवाय (निकटचा संबंध) आणि अभाव (अविद्यमानता). द्रव्य, गुण आणि कर्म हे पदार्थ सत्च्या वर्गातील आहेत. आपण त्यांचे अस्तित्व दाखवू शकतो. पण इतर चार पदार्थ तसे दाखवू शकत नाही. संपूर्ण रूपात द्रव्य दाखविता येते. पण ज्ञान, वासना, सौख्य, दुःख इ. गुण स्वतंत्र वस्तू म्हणून दाखविता येत नाहीत. तांबडा हा कमळाचा गुण आहे. तो फुलापासून वेगळा करता येत नाही. तो ज्यावर अवलंबून असतो ते द्रव्य. जरी सौख्य किंवा दुःख हे गुण दाखविता येत नसले तरी एखादी व्यक्ती सुखी किंवा दुःखी आहे हे आपल्याला कळू शकते : आपण त्याच्यात सौख्य किंवा दुःख पाहतो. जेव्हा आपण लाल कमळ पाहतो तेव्हा आपल्याला लाल म्हणजे काय ते कळते. कर्म म्हणजे काम, कृती. हालचाल करणे किंवा पळणे असे कर्म म्हणजे कार्य आणि तेही द्रव्यावर अवलंबून असते. जेव्हा एखादा मनुष्य पळतो, तेव्हा त्याचे पळणे त्याच्यापासून अलग करता येत नाही. पण आपण त्याला पळताना

पाहतो आणि तो बसलेला किंवा पडून राहिलेला नाही हे आपल्याला कळते. म्हणजे आपण त्याला पळताना पाहतो. सामान्य हा चौथा पदार्थ आहे आणि त्याचा अर्थ जाति (सामान्य, विशेष नव्हे). आपण अनेक गायी पाहतो. त्यांच्या स्थानी गायी असण्याचा सामान्य गुण आहे. ह्या सामान्य गुणाला जाति म्हटले जाते. वस्तूंमध्ये किंवा व्यक्तींमध्ये एक सामान्य गुण असतो, तरी भेद असतात. ह्याला विशेष म्हटले जाते. समजा गायींचा कळप आहे (त्या एकाच जातीच्या आहेत) : त्यातील विशिष्ट गायी त्यांच्या ठळक गुणधर्मामुळे आपण वेगळ्या अशा सांगू शकतो / ओळखू शकतो.

समवाय म्हणजे काय? वस्तूचा गुण किंवा तिच्याशी संबंधित कर्म तिच्यापासून वेगळे करता येत नाही. आपल्याला माहीत असलेली वस्तू तशीच राहायची असेल तर त्या संपूर्ण वस्तूचे भाग वेगळे करता येणार नाहीत. हा समवाय, वस्तूतील अगदी निकटचा गुण. अग्नीला तेजस्वी रूप असते. पण ती तेजस्विता अग्नीपासून वेगळी करता येणार नाही. आणखी एक समवायाचे उदाहरण आहे. जेव्हा एखादे द्रव्य किंवा पदार्थ दुसऱ्या पदार्थात मिसळतो तेव्हा तो संयोग. ते दोन्ही एकत्र न येता स्वतंत्र राहू शकतात. गुण किंवा गुणधर्मांनी वस्तू मिसळते तेव्हा समवाय असतो आणि जेव्हा कर्म आणि द्रव्य एक होतात तेव्हाही समवाय असतो. गुण आणि कर्म वस्तूपासून भिन्न करता येत नाही.

मी पूर्वीच 'अभावा'विषयी बोललो आहे.

ह्या सात पदार्थांपैकी प्रत्येकाचे पुढे उपविभाग पडतात. द्रव्य या पदार्थाचे पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, काल, दिक्, आत्मन्, मानस (मन) हे नऊ उपविभाग होतात. पहिल्या पाचांना 'पंचभूते' म्हटले जाते. त्यांच्या अनुषंगाने शरीरात पाच ज्ञानेंद्रिये आहेत. डोळे पाहतात, कान ऐकतात, जीभ चव घेते, स्पर्शेंद्रियामुळे ऊब आणि थंडी जाणवते, नाक गंध घेते, स्पर्शेंद्रिय केवळ त्वचा नसते; तर संपूर्ण शरीराला स्पर्शाची जाणीव होते. कारण स्पर्शज्ञान शरीरात असते म्हणून आपल्या पोटात दुखते, छातीत वेदना होतात इत्यादी....

हे विभाग शरीरातील वैयक्तिक अवयवांशी संबंधित असतात. दृष्टी डोळ्यांत असते, कान पाहू शकत नाही. कानांनी संगीत ऐकले जाते; डोळे आणि नाक ऐकू शकत नाही. जर एखादी वस्तू जिभेच्या संपर्कात आली तर तुम्हाला तिची चव कळेल; पण तिचा गंध नाही - नाकाला ऊस गोड असतो हे कळत नाही. म्हणून हे पाच गुण पाच अवयवांकडून वैयक्तिकरीत्या जाणले जातात. डोळा खरा आकार, 'रूप' जाणतो, म्हणजे रंग, आकार, आकारमान इ. पांढरा, पिवळा, हिरवा, लाल, करडा हे काही रंग आहेत. नाक सुखद आणि दुःखद गंध जाणते. उष्णता आणि थंडी यांची जाणीव त्वचेमुळे होते. जीभ वेगवेगळे सहा रस जाणते. अशाप्रकारे पाच भिन्न गुणांसाठी पाच भिन्न इंद्रिये आहेत, त्यांना इंद्रिये म्हणतात.

ज्ञानेंद्रियाविना वस्तूचा गुण ओळखला जाऊ शकणार नाही. जर आपल्याला सहा ज्ञानेंद्रिये असती तर आपण कदाचित सहा गुण जाणू शकलो असतो आणि जर आपल्याला हजार ज्ञानेंद्रिये असती तर आपण हजार गुण जाणू शकलो असतो. आपल्याला विश्वातील सर्व वस्तूंचे ज्ञान नाही. जर आपल्याला स्पर्शेंद्रिय नसते तर आपल्याला उष्णता आणि थंडी यांची जाणीव झाली नसती. आपल्याला थंडी किंवा उष्णता यांचे ज्ञान आहे असा दावा आपण करू शकत नाही. (म्हणजे आपल्याला थंडी किंवा उष्णता जाणवते) कारण ते अस्तित्वात आहेत. आपण केवळ ज्ञानेंद्रियांच्या साहाय्याने गुण ओळखू शकतो. रूप आणि ध्वनी जरी अस्तित्वात असले तरी अंध आणि बहिऱ्या माणसांना ते आकलन होऊ शकत नाहीत. सर्व पाचही गुण- रूप, स्वाद, गंध, स्पर्श आणि ध्वनी हे अनुक्रमे डोळा, जीभ, नाक, त्वचा आणि कान यांनी जाणले जातात. ईश्वराने पंचभूते, पाच घटक हे पाच गुणांशी जोडले आहेत. पृथ्वीला हे सर्व पाच गुण आहेत. तिला रूप आणि चव आहे. आपले शरीर, एक फळभाजी, गूळ - हे सर्व पृथ्वीतत्त्व आहे. पृथ्वीला गंध असतो. सुगंधित फूल हे पृथ्वीतत्त्वच असते. पृथ्वीचे शीत आणि उष्ण हे गुण आपण स्पर्शेंद्रियाद्वारे जाणू शकतो आणि तिला ध्वनीसुद्धा असतो. जर तुम्ही दोरीचे एक टोक जमिनीवर टाकले आणि दुसरे कानाला लावले तर तुम्हाला ध्वनी ऐकू येईल. पाण्याला पाचपैकी चार गुण आहेत पण गंध नाही. पाण्याचा गंध जेव्हा आपण त्यात सुवासिक द्रव्य मिसळतो तेव्हा येतो. जर आपण त्याच्या पृष्ठभागावर आघात केला तर त्याचा ध्वनी निर्माण होतो. पृथ्वीला जरी पाच गुण असले तरी तिचा विशेष गुण गंध हा आहे; त्याचा इतर चार घटकांमध्ये अभाव असतो. पाण्याचा विशेष गुण स्वाद होय. पाण्याविना रस असू शकत नाही. म्हणून स्वाद जाणणारी जीभ सदैव ओली असते. जर जीभ सुकून गेली तर तुम्हाला कोणताही स्वाद जाणता येणार नाही. वस्तुतः रस ह्याचाच अर्थसुद्धा पाणी आहे. अग्नीला गंधही नसतो आणि स्वादही नसतो. पण त्याला रूप, ध्वनी आणि स्पर्श असतो; रूप हा त्याचा विशेष गुण आहे. वायूला आकार/रूप नसते. पण त्याला ध्वनी आणि स्पर्श असतो - स्पर्श हा त्याचा विशेष गुण असतो. म्हणून आपल्याला वारा आपल्यावरून वाहतो तेव्हा जाणवतो. आकाश किंवा अवकाश याला एकच गुण आहे, ध्वनी.

सारांश : आकाश किंवा अवकाशाला एकच गुण असतो, ध्वनी; वायू किंवा हवा याला ध्वनीशिवाय स्पर्श हा एक गुण असतो; अग्नीला तीन गुण आहेत - ध्वनी, स्पर्श आणि रूप; पाण्याला ध्वनी, स्पर्श, रूप आणि रस हे गुण आहेत; पण पृथ्वीला हे सर्व पाच गुण आहेत. अशी ही पंचभूते किंवा पाच घटक आहेत.

द्रव्याचे उरलेले चार उपविभाग काल, दिक्, आत्मन् आणि मानस आहेत. 'तास', 'काल', 'आज', 'वर्ष', 'युग' असे शब्द काळ दर्शवितात. 'दिक्' म्हणजे दिशा किंवा क्षेत्र, होकायंत्राचे बिंदू, आपण इकडे तिकडे म्हणतो. थोडक्यात हे अवकाश किंवा आकाश दर्शविते. आत्मन् ही गोष्ट ह्या सर्वांना जाणते. तो किंवा ते हे दोन प्रकारचे असतात; सुज्ञ आणि

अज्ञ, परमात्मा आणि जीवात्मा. विश्वात जे काही घडते त्याचा परमात्मा केवळ साक्षी आहे तर जीवात्मा ह्या विश्वात अडकला जातो आणि दुःखाला प्राप्त होतो. जीवात्मे असंख्य आहेत पण परमात्मा एक आणि एकच आहे. जीवात्मा आणि परमात्मा ह्या ज्ञानाच्या आध्यात्मिक गोष्टी/बाबी आहेत.

वेदान्तानुसार ज्ञान स्वतःच आत्मा असते; समग्र अर्थाने आत्मा हेच ज्ञान असते. त्याशिवाय आणि त्याच्या बाहेरचे जाणण्यासारखे खरोखरच काहीही नसते. आपण भिन्न जीवात्म्याबद्दल बोलू शकत नाही. (जीवात्मे हे परमात्म्याहून भिन्न नाहीत ह्या कल्पनेनुसार). न्यायानुसार, आत्मा हे द्रव्य किंवा पदार्थ आहे, ज्ञान हा त्याचा गुण आहे.

परमात्मा म्हणजे ज्ञान, तो ज्ञानाने पूर्ण आहे कारण त्याला ज्ञात नाही असे काहीही नसते, असे न्यायशास्त्र वर्णन करते. जीवात्म्याला फार थोडे ज्ञान असते. म्हणून आपल्याला 'किञ्जिज्ञ' 'किञ्जिज्ञ' म्हणजे थोडे - म्हटले जाते. परमात्मा सर्वज्ञ, जो सर्व जाणतो असा असतो. आपण ज्ञान आणि अज्ञान यांच्यावर अवलंबून असलेल्या मिश्र स्थितीत असतो. न्यायशास्त्रसुद्धा म्हणते की परमात्मा सर्व व्यापून आहे, पण ते दोन्ही - आत्मा आणि परमात्मा एकच आहेत असे म्हणत नाही. ह्याला कारण म्हणजे, न्यायानुसार, प्रत्येकात ज्ञान स्वतंत्रपणे एक वेगळा घटक म्हणून अस्तित्वात असते. ते जेथे असते ते म्हणजे मन - आणि मनच दुःख किंवा सुख निर्माण करते.

न्यायामध्ये गुणाचे चोवीस आणि कर्माचे पाच गटांत विभाजन होते. आपण जर पदार्थांचे ज्ञान घेतले आणि मोक्षाकडे नेणाऱ्या अलिप्ततेचा विकास केला तर सत्याचे ज्ञान होईल, असे न्यायशास्त्र म्हणते. मुक्ती ही अशी स्थिती असते की त्यात आपल्याला दुःख किंवा सुखाची जाणीव नसते. जरी आपण मुक्तीच्या वेदान्तिक कल्पनेशी निष्ठा ठेवली तरी न्याय आपल्या गुरूकडून मिळालेल्या उपदेशावर विचार करण्याचा मार्ग सुचविते. आपण पंचभूते किंवा पाच घटक, जीवात्मा आणि मन जाणण्यास समर्थ असतो. पण आपण परमात्म्याला कसे ओळखायचे? तो एकटाच जाणला जाऊ शकत नाही. त्याला जाणण्यासाठी आपल्याला अनुमान, अनुमानाची पद्धती वापरावी लागते. इतर समजून घेण्यासाठी 'प्रत्यक्ष प्रमाणं' किंवा ज्ञानाची सरळ उगमस्थाने पुरेशी असतात. वेद ईश्वराचे अस्तित्व प्रकट करतात; न्याय ते अनुमानाने सिद्ध करते.

आता आपण एक लहानसे उदाहरण पाहू. आपल्याला माहीत असते की मी ज्यावर बसलो आहे ते सिंहासन कोणाकडूनतरी बनविले गेले असलेच पाहिजे. आपल्याला तो बनविणारा कोण हे माहीत नाही म्हणून आपण ते स्वतःच बनले असे वर्णन खोटे आहे असे म्हणू शकतो का? आपण इतर सिंहासने बनविली गेलेली पाहिली आणि त्यापासून आपण अनुमान काढतो की हेसुद्धा बनविणारा कोणीतरी असलाच पाहिजे. त्याचप्रमाणे हे विश्व

बनविणारा कोणीतरी असलाच पाहिजे. तो सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान आहे आणि दयाळू आहे - तो सर्वांचा तारणहार आहे. अशा बार्बीची चर्चा न्यायशास्त्रात असते : एका विधानाचे निवेदन केले जाते, हरकती घेतल्या जातात आणि उत्तरे दिली जातात.

-----

## प्रकरण - ३

# प्रमाणे

प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्याशिवाय उपमान आणि शब्द ही प्रमाणे आहेत. उपमान म्हणजे काय? ते म्हणजे ज्ञाताशी तुलना करून अज्ञात जाणून घेणे. एक गवा नावाचा प्राणी असतो. तो कसा दिसतो हे आपल्याला माहीत नसते. तो जंगली म्हशीसारखा असतो, तो गायीसारखा दिसतो असे म्हटले जाते. आपण जंगलाजवळच्या परिसरात जातो आणि तेथे आपल्याला एक गायीशी साधर्म्य असलेला प्राणी दिसतो, म्हणून आपण निष्कर्ष काढतो की तो गवा असलाच पाहिजे. येथे आपण उपमान पाहतो.

शब्द-प्रमाण हे वेदांचे निवेदन आणि थोर व्यक्तींचे शब्द असे वाचिक पुरावा असते. आपल्याला ज्ञात नसलेल्या गोष्टींबाबत हे ग्रंथ जेव्हा सांगतात तेव्हा त्यातील शब्द हे प्रमाणभूत मानले पाहिजेत. न्यायिक किंवा न्यायाचे स्पष्टीकरण देणारे यांचा विश्वास असतो की वेद हे ईश्वराचे शब्द आहेत. सत्याशी निगडित असलेल्या थोर माणसांचे शब्दसुद्धा वाचिक पुरावा असतात.

ही चार प्रमाणे कुमारिल भट्टाच्या मीमांसा प्रणालीने स्वीकारली आहेत. त्यात त्याने आणखी दोहोंची भर घातली : अर्थापत्ती म्हणजे अंतर्ज्ञानाने आकलन आणि अनुपलब्धी म्हणजे अनाकलन. अशी एकूण सहा प्रमाणे आहेत आणि ती अद्वैत तत्त्वज्ञानाचा एक भाग आहेत.

आपली शास्त्रे उदाहरणाद्वारे अर्थापत्तीची स्पष्ट कल्पना देतात. ''पिनो देवदत्तो दिवा न भुऽङ्क्ते.'' ह्या विधानाचा अर्थ काय? ''लठ्ठ देवदत्त दिवसा जेवत नाही.'' जरी देवदत्त दिवसा जेवत नसला तरी तो लठ्ठच राहतो. कसे? आपण कल्पना करतो की तो रात्री जेवत असला पाहिजे. काही खायचे नाही आणि सडपातळ राहायचे नाही हे काही तरी परस्परविरोधी आहे. येथे आपल्याला अर्थापत्ती देवदत्ताच्या लठ्ठ राहण्याचे कारण शोधण्यास मदत करते. तो रात्रीचा जेवतो हा आपला अंदाज अनुमानाच्या गटात येत नाही. अनुमान करण्यासाठी मूळच्या विधानातच एखादी सूचना किंवा सुगावा असला पाहिजे. अग्नीचा धूर, ढगांचा गडगडाट यासारखे 'लिंग' (प्रमाण) असले पाहिजे. येथे तसे काही लिंग (प्रमाण) नाही.

असेच उपमानाबाबत असते. आपण पाहिलेला प्राणी ज्याला गवा म्हटले जाते. तो असला पाहिजे अशा निर्णयाप्रत येतो, तेव्हा त्याचा अर्थ असा नाही की आपण अनुमान केले. कोणत्यातरी लक्षणावरून आपण तो प्राणी ओळखला नाही तर आपल्याला पूर्वी दिल्या गेलेल्या वर्णनाशी त्याचे दिसणे जुळते.

शेवटचे प्रमाण अनुपलब्धी आहे. अविद्यमान वस्तूचे ज्ञान आपण घेतो त्याचे हे साधन

आहे. मी न्यायानुसार असलेल्या सात पदार्थांपैकी शेवटच्या 'अभाव'बद्दल बोललो आहे. अनुपलब्धीद्वारे आपण अभाव जाणून घेऊ शकतो. समजा कोणीतरी आपल्याला म्हणाले, "जा आणि तबेल्यात हत्ती आहे का पाहा." आपण तबेल्याकडे तेथे हत्ती आहे की नाही हे स्वतः पाहण्यासाठी जातो. तबेल्यात हत्ती नाही असे आपल्याला आढळते : त्याची अविद्यमानता जाणणे म्हणजे अनुपलब्धी.

अर्थापत्ती आणि अनुपलब्धी हे मीमांसा आणि वेदान्त यांचा भाग आहेत; न्यायाचा नाही. (तथापि, अनुपलब्धीचा उल्लेख फक्त कुमारिल भट्टाच्या मीमांसा प्रणालीत आहे; प्रभाकराच्या प्रणालीत नाही.)

-----

## प्रकरण -४

# ईश्वर जाणण्याचा तर्कशुद्ध मार्ग

जेथे न्याय प्रमाणासह जिज्ञासा सोडून देते तेथे वैशेषिक त्याचे सूत्र घेते. वैशेषिकाचा संस्थापक, महान ऋषी कणाद यांच्यानुसार अंतिमतः प्रत्येक वस्तू अणूपासून बनलेली असते. ईश्वराने अणूंच्या भिन्नभिन्न मिश्रणाने विश्व बनविलेले आहे. न्याय आणि वैशेषिक या दोघांच्याही मते विश्व आणि जीवात्मा हे ईश्वरापासून भिन्न आहेत.

जसजसे आपण सजग जीवन आणि अगोचर अणू यांच्या उगमाचा शोध घेतो आणि पायरीपायरीने शोध घेत पुढे जातो तसतसे शेवटी आपल्याला जाणवते की प्रत्येक गोष्ट/वस्तू हे त्याच परमात्म्याचे प्रकटीकरण किंवा वेषांतर आहे. ह्या सत्याकडे येण्याचा न्याय हा मध्यवर्ती टप्पा आहे.

न्याय किंवा तर्क बुद्धिवादाला योग्य स्थान देते, पण जडवाद, नास्तिकवाद किंवा लोकायत संप्रदाय यांच्याकडे नेत नाही. बौद्धिक जिज्ञासेनंतर न्याय ह्या निर्णयाप्रत येते की जर हे विश्व इतक्या प्राण्यांसह सुव्यवस्थित, सर्व एकमेकांशी जोडलेले असे आहेत तर ते एखाद्या ईश्वराने नक्कीच बनविलेले असावे. न्याय जाणते की अशी काही क्षेत्रे आहेत ती मानवी तर्कबुद्धीने आकलन होऊ शकत नाहीत आणि जे सत्य तर्कबुद्धीने स्थापित होऊ शकत नाही, ते वेदांची जशी दृष्टी आहे तसे स्वीकारले पाहिजे. याचा अर्थ असा की न्याय, तर्कबुद्धी दुसऱ्याचे दोष काढण्याकडे न जाऊ देण्याची काळजी घेते. (लक्षात ठेवा की तर्काचा कुतर्क होऊ नये ह्या शंकराचार्यांच्या दृष्टिकोनाविषयी मी तुम्हाला सांगितले आहे.) आणि ती सत्यान्वेषणाकडे जाईल हे पाहते.

ज्ञानाच्या साधनाने कशाचे तरी परीक्षण करणे म्हणजे ते ज्ञान शुद्ध करणे होय. बौद्धिक स्पष्टता मिळविणे हाही त्याचा अर्थ आहे. जेव्हा स्पष्टता असते तेव्हा आपल्या बुद्धीच्या आवाक्याच्या पलीकडे असलेले जे सत्य असते ते आपल्या आत चमकून जाते. (दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर सत्याचे अंतर्ज्ञानाने आकलन होईल.)

बौद्धिक जिज्ञासा न ठेवता ईश्वरावर आणि शास्त्रावर विश्वास ठेवणे हे खरोखरच स्तुत्य आहे. पण ह्या भौतिक अस्तित्वाच्या पलीकडे आपल्याला जे नेईल असा पूर्ण विश्वास आपण मिळविण्यास समर्थ आहोत का? आळसात वेळ घालविण्यापेक्षा, सत्याचा शोध घेण्याचा बौद्धिक प्रयत्न न करणे, ह्यापेक्षा ईश्वर आहे ह्या निर्णयाप्रत येण्याचा प्रयत्न करणे अधिक चांगले नाही का? जी व्यक्ती असे करते ती व्यक्ती बौद्धिक पातळीवर चिंता न करणाऱ्या आळशी माणसापेक्षा अधिक सरस असते. कदाचित, नास्तिकाने जर त्याची जिज्ञासा चालू ठेवली तर त्याची नास्तिक वृत्ती सोडून देण्याइतकी बौद्धिक स्पष्टता त्याच्या अंगी येईल.

पण आळशी माणसाला अंतर्गत विकासाचे कोणतेही साधन नसते.


ह्याच कारणास्तव अगदी 'चार्वाकालाही' एक संप्रदाय म्हणून भारतात स्वीकारले गेले. ''चारू-वाकम्''= ''चार्वाकम्'' : जे कानाला सुखद आहे ते. ईश्वराची किंवा एखाद्या आत्म्याची पर्वा करणे, किंवा नवस आणि उपवास करणे किंवा इंद्रियांचे नियमन करणे यांची गरज नाही असा चार्वाकाचा विश्वास आहे. तुम्हाला आवडेल तसे तुमच्या लहरीप्रमाणे आणि तुमची इंद्रिये तुम्हाला सांगतात तसे वागा.

तथापि, जीवनात आपण सावधपणे सुखाचा शोध घेत असता दुःख हे अटळ असते. खरेच, दुःख वरचढ ठरेल. दुःखावर मात करणे हाच धर्माचा हेतू असतो.

-----

# आपणास सर्व प्रकारच्या ज्ञानाची गरज असते

आपण आपल्या मेंदूचा आणि मनाचा चांगला उपयोग केला पाहिजे. आपण वारंवार धार लावून ते तीक्ष्ण ठेवले पाहिजेत. त्यायोगे सत्याचा शोध घेण्यात आपणच आपल्याला मदत करू शकू. जग हे माया आहे असा विचार करणाऱ्या शंकराचार्यांनी सर्व शास्त्रे, सर्व कला, सर्व विज्ञान यांच्यावर का प्रभुत्व मिळविले? ते 'सर्वज्ञ-पीठावर' का आरूढ झाले?

मी म्हणालो की न्यायाला तर्क, आन्विक्षिकी म्हणूनही ओळखले जाते. 'शंकर-विजय' ह्या ग्रंथावरून आपणाला समजते की आचार्यांनी न्याय किंवा आन्विक्षिकी, कपिल महर्षींचे 'कपिलम्' (सांख्य), पतञ्जलीचे योग-शास्त्र (पातञ्जलम्), कुमारिलभट्टाची मीमांसा (भट्ट-शास्त्र) यांच्यावर प्रभुत्व मिळविले होते.

आन्विक्षिक्यैक्षितंत्रे परचितिरतुला
कपिले कपि लेभे
पितं पातञ्जलांभवः परमपि विदितं
भाट्ट घट्टार्थ-तत्त्वं

अद्वैतासंबंधी काही सांगत नसताही अद्वैत ती शास्त्रे स्वीकारते. म्हणून मला शंकराचार्य म्हटले जात असले तरी मी या सर्व शास्त्रांबाबत बोलत आहे. अद्वैत द्वैत, विशिष्ट अद्वैत, शैववाद, वैष्णववाद आणि इत्यादीपासून येते. जरी इतर टीका करणारे असले तरी अद्वैत त्या सर्वांना जवळ करते. इतर संप्रदाय पूर्णपणे चुकीचे आहेत असे अद्वैत सांगत नाही. जर अद्वैत त्यांना विरोध करीत असेल तर ते त्यांच्याविरोधी विधानांचे खंडन करण्यासाठी. त्यांची जेवढी पात्रता असते तेवढे स्थान अद्वैत देते.

-----

## प्रकरण - ६

# तर्कशास्त्रावरील ग्रंथ

गौतम ऋषींनी रचलेल्या न्यायशास्त्राला 'अक्षपाद' म्हणतात. ते नेहमी विचारांमध्ये इतके व्यस्त असत की त्यांना बाह्य जगाची नेहमी विस्मृती होत असे. आपण शास्त्रज्ञ, प्राध्यापक आणि अशा लोकांना वेंधळे म्हणतो आणि त्यांच्यावर फुटकळ विनोद करतो. गौतमसुद्धा वेंधळे होते. एक दिवस ते एका तत्त्वज्ञानात्मक प्रश्नावर विचार करीत जात असता ते एका विहिरीत पडले. ईश्वराने त्यांची सुटका केली आणि त्यांच्या पायाला डोळे बसविले. अशाप्रकारे ते जात असता त्यांच्या नवीन डोळ्यांचे मार्गदर्शन लाभत असे. म्हणून त्यांना 'अक्षपाद', पायाला डोळे असलेला म्हणू लागले. अशी कथा आहे.

वात्स्यायनाने न्याय-सूत्रावर भाष्य आणि उद्योतकरवर वार्तिक लिहिले. वाचस्पतिमिश्र ह्या महान अद्वैतवाद्याने 'न्याय-वार्तिक-तात्पर्य-टीका' नावाची टीका लिहिली. उदयनाचार्यांने या भाष्यावर भाष्य लिहिले : ती 'तात्पर्य-टीका-परिशुद्धी' म्हणून ओळखली जाते. त्यांनी 'न्याय-कुसुमाञ्जली'सुद्धा लिहिली. मी पूर्वी म्हटलेले आठवायचे तर ते भारतातील बुद्धधर्माच्या ऱ्हासाला कारणीभूत असलेल्यांपैकी अग्रणी होत. जयंतने न्याय-सूत्रावर 'न्याय-मंजिरी' नावाचे भाष्य लिहिले. अण्णभट्ट ह्याने 'तर्क-संग्रह' हा ग्रंथ लिहिला आणि त्यावर दीपिका नावाचे भाष्य लिहिले. सामान्यतः न्यायशास्त्राचे विद्यार्थी शेवटी उल्लेखलेल्या दोन ग्रंथांपासून अभ्यासाला आरंभ करतात.

कणादाच्या 'वैशेषिक-सूत्रा'वरचे 'रावण-भाष्य' उपलब्ध नसल्याचे मानले जाते. तथापि, प्रशस्तपादाचे 'पदार्थ-धर्म-संग्रह' हा भाष्यासारखा ग्रंथ अजून अस्तित्वात आहे. उदयनाने त्यावर भाष्य केले आहे. अलीकडचे, उत्तमूर श्री वीरराघवाचरियार यांनी वैशेषिक-रसायन नावाचे एक पुस्तक लिहिले.

वैशेषिकाला 'औलुक्य-दर्शन' म्हणू लागले. उलूक म्हणजे घुबड - इंग्रजी शब्द owl हा उलू पासून आलेला आहे. जे घुबडाचे आहे किंवा जे घुबडाशी संबंधित असलेले ते औलुक्य. कणादाला स्वतःला उलूक म्हटले गेले. नेहमी विचारात गर्क असलेला गौतम एक दिवस विहिरीत पडला, कणादसुद्धा दिवसा त्याच्या आध्यात्मिक शोधात इतका व्यस्त असे की त्याला अन्नासाठी भिक्षा मागायला रात्री बाहेर पडावे लागे. या वस्तुस्थितीवरून त्याला 'उलूक' हे टोपण नाव मिळाले. म्हणजे तो दिवसा दिसत नसे आणि रात्री बाहेर भटकत असे. (गीतेमध्ये भगवान म्हणतात की-

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।। (२:६९)

अज्ञ माणसाची रात्र ज्ञानी, दिव्य, सुज्ञ माणसाचा दिवस असतो. या अर्थाने सर्व ज्ञानी हे घुबड असतात.)

वैशेषिकाला त्याच्या संस्थापकाच्या म्हणजे कणादाच्या नावावरून काणाद-सूत्रसुद्धा म्हटले जाते. तामीळ काणाद शब्द नव्हे, त्याचा अर्थ न पाहिलेला होतो. एका विद्वानाने गमतीने म्हटले आहे की कणादाने पाहिल्यानंतर (कंडू, तामिळीत कंडू म्हणजे पाहिल्यानंतर) त्याच्या संप्रदायाची स्थापना केली. सर्व विषयांच्या अभ्यासात व्याकरण आणि वैशेषिक हे अतिशय उपयुक्त ग्रंथ असल्याचे मानले जाते. अशी म्हण आहे.

'कांडं पाणिनीयं च सर्वशास्त्रोपकारकं।'

व्याकरणासारखेच (ज्याचा उगम नटराजाच्या डमरूतून झाला), न्याय आणि वैशेषिक यांचाही शिवाशी संबंध आहे. वैशेषिक ग्रंथांमध्ये परमात्मा म्हणून उल्लेखिलेल्या महेश्वराला वंदन केलेले आहे. शैव संप्रदायाचा असा दृष्टिकोन असतो की ईश्वर हा जगाचा निमित्त किंवा कारण असतो.

-----

## प्रकरण - ७

# निर्मितीचे कारण

कारणांचे दोन गटात विभाजन होते : 'निमित्त' आणि 'उपादान'. तुम्हाला एखादे भांडे बनवायला मातीची गरज असते. म्हणून माती हे भांड्याचे उपादान होय. पण ते भांडे कसे बनते? ते स्वतःच भांडे बनते का? त्याला कुंभाराकडून आकार दिला जावा लागतो. म्हणून कुंभार हा कारण - तो निमित्त असतो. (ज्योतिषात आपण जे निमित्त म्हणतो ते वेगळे.)

न्याय आणि वैशेषिक यांचा विश्वास असतो की ईश्वराने अणू म्हटल्या जाणाऱ्या मूलभूत कणांनी हे विश्व बनविले आहे. मातीला भांड्याचा आकार देण्यासाठी कुंभाराची गरज असते. त्याच्याशिवाय भांडे असू शकणार नाही, दुसऱ्या शब्दांत, कुंभाराविना भांडे असू शकत नाही. म्हणून जेव्हा तो मातीला आकार देतो तेव्हा तो कारण असतो आणि भांडे परिणाम असते. याला 'आरंभ-वाद' किंवा 'असत्-कार्य-वाद' म्हटले जाते. सत् म्हणजे जे अस्तित्वात असते (सत्य) आणि असत् म्हणजे जे अस्तित्वात नाही ते (असत्य). भांडे फक्त मातीत नसते. अविद्यमान (नसलेले) भांडे मातीपासून बनविले जाते. त्याचप्रकारे ईश्वराने अणूपासून हे विश्व बनविले - त्याने जे निर्माण केले ते कण रूपात असत नाही. ही न्यायाची तत्त्वप्रणाली आहे.

आपल्याला माहीत आहे की सांख्याचे अनुयायी कोणत्याही ईश्वरावर विश्वास ठेवत नाहीत. त्यांच्या मतानुसार प्रकृती स्वतःलाच विश्वरूपात घडू देते. या दृष्टिकोनाची समकालीन नास्तिकांच्या दृष्टिकोनाशी गल्लत करू नये. मी असे म्हणतो कारण सांख्यसुद्धा ज्ञान असलेल्या पुरुषाला, निर्गुण-ब्रह्म समान असलेल्याला गृहीत धरते. त्यांच्या मतानुसार जड प्रकृती केवळ पुरुषाच्या उपस्थितीत अशी सुसंगतपणे कार्य करू शकते. पुरुषाची उपस्थिती हे कारण असते, पण त्याचा उघडपणे निर्मितीत समावेश झालेला नसतो. पिके सूर्यप्रकाशात स्वतःच वाढतात. पाणी आटते, कपडे कोरडे होतात आणि हे सर्व सूर्यामुळे होते. सूर्य, कोणते पीक वाढवायचे किंवा कोणता तलाव आटवायचा याची चिंता करतो का? जेव्हा तुम्ही हातात बर्फाचा गोळा धरता तेव्हा तुमचा हात बधिर होतो. तुमचा हात बधिर करणे हा बर्फाचा हेतू आहे असा युक्तिवाद करणे योग्य होईल का? तसाच पुरुष हा निर्मितीशी जोडला गेलेला नाही. पण त्याच्यापासून प्राप्त झालेल्या शक्तीने प्रकृतीच स्वतःतून जग निर्माण करते.

नैयायिकांचा निर्मितीबाबतचा दृष्टिकोन असत्-कार्य-वादाच्या तत्त्वांवर आधारलेला आहे, सांख्याच्या पुरस्कर्त्यांचा सिद्धान्त सत्-कार्य-वादावर आधारलेला आहे. नैयायिकाचा असा विश्वास असतो की अविद्यमान भांडे बनविण्यात माती हे उपादान (भौतिक कारण) आहे, कुंभार हा निमित्त किंवा सक्षम कारण आहे. सांख्याचे सत्-कार्य-वादी असा वाद करतात : "आरंभी मातीतच भांडे होते. तेली, तिळाच्या बियात असलेले तेल काढण्यासाठी

त्या रगडतो. तशाप्रकारे, मातीत सुप्त असलेले भांडे कुंभाराच्या कामाचा परिणाम म्हणून उद्‌भवते. तुम्ही फक्त माती वापरूनच भांडे बनवू शकता. तुम्ही तिळाच्या बिया वापरून भांडे बनवू शकत नाही आणि माती रगडून तेल मिळवू शकत नाही. भांडी ही सर्व मातीचे अणू असतात; अणूंना आकार देऊन ते अस्तित्वात येते.''

आपले आचार्य म्हणतात : आरंभ-वाद नसतो आणि परिणाम-वादही नसतो. ते ब्रह्म असते, त्याच्या शक्तीने माया निर्मितीच्या म्हणजेच सृष्टीच्या रूपाने दिसून येते. कुंभाराच्या दृष्टीने परमात्मा ही कोणती अन्य वस्तू नव्हे तर माती म्हणविला जाणारा तो स्वतःच असतो. म्हणून आरंभ-वाद योग्य नाही. परमात्म्याने स्वतःला विश्वात रूपांतरित केले असे म्हणणे म्हणजे दुधाचे दही होणे म्हणण्यासारखे आहे. दही अगदी दुधासारखे नसते. विश्व बनल्यावर परमात्मा पुन्हा अविद्यमान झाला असे म्हणणे चुकीचे होणार नाही का? म्हणून परिणाम-वादसुद्धा योग्य नाही. एका बाजूला शुद्ध ज्ञान राहते, केवळ जाणीव; आणि दुसऱ्या बाजूला, सर्व सजीव आणि जड वस्तूंसह असलेल्या या विश्वाच्या रूपाने त्याच्या मायेच्या शक्तीने तो स्वतःला प्रकट करतो. हे सर्व त्या सत्याचे, विविध रूपात असलेल्या सत्याचे दर्शन आहे. एखाद्या माणसाने अन्य वेश परिधान केला तर तो अन्य माणूस होऊ शकत नाही. तसेच या सर्व रूपांत, या विश्वाच्या मायेबाबत आहे. ह्या सर्व भासमान विविधतेसोबत एकच एक सत्य न बदलता असते हे म्हणणे म्हणजेच विवर्तवाद.

एखादी दोरी सापासारखी दिसणे या क्रियेत विवर्त आहे. उपादान-कारण (भौतिक कारण) म्हणजे दोराचे निमित्ताने-कारणाने (सक्षम कारणाने) सापामध्ये रूपांतर होत नाही. म्हणून येथे आरंभ-वाद लागू होत नाही. दोर स्वतःच सापात रूपांतरित होत नाही; पण अज्ञानामुळे (अविद्या) तो आपल्याला साप वाटतो. त्याचप्रकारे आपल्या अज्ञान किंवा अविद्येमुळे आपल्याला ब्रह्म हे जगासारखे आणि असंख्य वस्तूंसारखे वाटते.

ज्या सत्यावर आचार्यांनी प्रकाश टाकला आहे ते जाणण्यासाठी न्यायाने घातलेल्या मार्गावर आपण पुढे जाऊ शकतो. आपल्याला तर्काद्वारे पदार्थांचे (गट) कसे ज्ञान होते आणि सुखही नाही आणि दुःखही नसलेल्या अपवर्गाची जाणीव होण्यासाठी त्या (पदार्थ) पासून दूर व्हायला न्याय आणि वैशेषिक शिकवितात. पण ते आपल्याला वरच्या राज्यात नेत नाहीत. द्वैतालासुद्धा अशा मर्यादा आहेत. एक सत्य म्हणजे अद्वैत आकलन होणे आणि आपणही ते सत्य आहोत असे आतून जाणणे हे म्हणजे पूर्ण मुक्तीचा अनुभव घेणे होय.

न्यायाचे एक वैशिष्ट्य म्हणजे ते आपल्या भौतिक अस्तित्वाबद्दल असमाधानी करून अपवर्गाचा शोध घेण्यास प्रेरणा देते हे होय. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे ते ईश्वर हा कर्ता (निर्माता) आहे हे तत्त्व सिद्ध करण्यासाठी, बुद्धधर्माच्या, सांख्याच्या आणि चार्वाकाच्या विरुद्ध सर्व तर्काचे मार्ग अनुसरते.

-----

प्रकरण ८

# काही कथा, काही वाद

गंगेश मिश्रोपाध्याय आपल्या 'तत्त्वचिंतामणी' या ग्रंथात तर्काच्या ६४ पद्धतींची चर्चा करतात. आपण तत्त्वज्ञानात्मक प्रश्नांनी आपल्या मेंदूला ताण देत होतो म्हणून मला गंगेशाची गोष्ट सांगू द्या.

गंगेश त्याच्या तारुण्यात मंदबुद्धी होता. तो बंगालमधील कुलीन ब्राह्मण जमातीचा होता. कुलीन म्हणजे चांगल्या कुळातील किंवा वंशातील. बंगालमध्ये कुलीन कुटुंबातील तरुण पुरुषांना अनेक गौण मुली लग्नात देण्याची रूढी होती. काही वेळेस एखादा कुलीन पन्नासपेक्षा जास्त मुली घेत असे. गंगेशाला फक्त एकच पत्नी होती आणि तो त्याच्या सासुरवाडीला राहात असे. अशा मंदमतीला विवाहात एकापेक्षा जास्त मुली कोण देणार?

बंगाली लोक मासे खातात. वर्षातील सहा महिने ती भूमी जलमय असते. त्याकाळात भाजीपाला पिकविण्यासाठी जमीन नसते. म्हणून या काळात बंगाली लोक मासे खातात. बंगालच्या पूर्व भागात (आता बांगलादेश) माशाला जलपुष्प म्हटले जाते आणि त्याला भाजीपाला मानले जाते.

गंगेश मिश्राच्या सासुरवाडीला नियमितपणे मासे शिजविले जात. लोक त्याला 'गंगा' म्हणत. तो मंदमती असल्याने त्याला जेवणाच्या वेळेस तो फक्त हाडांच्या लायकीचा असल्याचे मानले जाई. इतरांना मांस वाढले जाई आणि प्रत्येकजण त्याची थट्टा करीत असे. तो जरी मंदमती होता तरी तो हे अधिककाळ सहन करू शकला नाही. एक दिवस तो घरातून पळाला आणि कोणालाही न सांगता काशीला गेला. त्याबाबत घरात कोणीही पर्वा केली नाही. ''त्या मूर्खाला पाहिजे तेथे जाऊ द्या.'' असे ते एकमेकांत म्हणत.

अनेक वर्षे गेली. एक दिवस गंगेश घरी परतला. लोकांना वाटले तो अजूनही बावळट असावा. जेव्हा तो जेवायला बसला तेव्हा त्याला नेहमीप्रमाणे हाडे वाढण्यात आली. त्यावर गंगेश उद्गारला, ''ना' हं गंगा किंतु गंगेश मिश्र'' (मी गंगा नसून गंगेश मिश्र आहे.) तो अजूनही पूर्वीसारखा मंदमती असता तर त्याला हाडे वाढणे ठीक झाले असते. आता त्याच्या नावाला 'मिश्र' हे जोडले आहे. याचा अर्थ असा की एका पात्रतेसह, पदवीसह घरी परतला आहे, आता तो विद्वान मनुष्य आहे. संदेश थोडक्यात पण स्पष्ट आहे.

सासऱ्याने जाणले की गंगा आता मोठा माणूस झाला आहे. याच गंगेश मिश्रानी 'तत्त्वचिंतामणी' हा ग्रंथ लिहिला. अनेकजणांनी त्यावर भाष्ये लिहिली आहेत. रघुनाथशिरोमणीने लिहिलेल्या ग्रंथाला 'धीतिति' म्हटले जाते. त्याच्या काळानंतर 'शिरोमणी'

ही पदवी वापरात आली. गदाधराने तत्त्वचिंतामणीच्या दहा वाक्यांवर भाष्य करणारा मोठा ग्रंथ लिहिला, आणि त्यातील एक वाक्यही अनावश्यक नाही. जर एखाद्या विद्यार्थ्याने गदाधरीचे (गदाधरीचा ग्रंथ) पाच मुद्दे वाचले तरी तो सुज्ञ माणूस होईल; जर दहा वाचले तर तो अधिक सुज्ञ होईल. त्यात प्रामाण्य-वादाची चर्चा आहे आणि जो त्याचे वाचन करील तो सर्वांपेक्षा अधिक बुद्धिमान होईल. गदाधरीचा अभ्यास तर्कशास्त्राच्या विद्यार्थ्यांकडून आजही केला जातो.

प्रामाण्य-वादाचे स्पष्टीकरण करायचे म्हणजे मेंदूला ताण द्यायचा. पण असे मानले जाते की आपल्या आचार्यांच्याकाळात पोपटसुद्धा त्यावर चर्चा करण्यास समर्थ होते. (प्रमाणासंबंधीचे मुद्दे म्हणजे प्रामाण्य-वाद)

शंकराचार्य भगवत्पाद मंडनमिश्रच्या नगरीला, महिष्मतीला गेले. तेथे त्यांना नदीवरून घरी पाणी आणणाऱ्या स्त्रिया दिसल्या. त्यांनी त्यापैकी एकीला मंडनमिश्राच्या घराबाबत विचारले. त्या नगरीत सामान्य स्त्रियासुद्धा शिकलेल्या होत्या. म्हणून त्यांनी आचार्यांना उत्तर श्लोकात दिले. हे पहा त्यापैकी एक कडवे :

स्वतः प्रमाणं परतः प्रमाणम्
कीराङ्गना यत्र च संगीरंति
द्वारस्थनीडांतरसन्निरुद्धाः
जानीहि तं - मण्डनपण्डितौकः।

भारतात पूर्वीच्याकाळी फक्त पुरुष शिक्षित होते आणि स्त्रियांना अशिक्षित राहू दिले जात होते असे म्हणणे किती चुकीचे आहे हे अशा घटनांवरून समजते. मानवजातीच्या स्त्रियाच नव्हे तर पक्षीही - या प्रकरणात तरुण मैना (कीराङ्गना) तत्त्वज्ञानावर चर्चा करीत असत. "जेव्हा तुम्ही अशा घराच्या दाराशी जाल की जेथील मैना स्वतः-प्रमाण आणि परतः-प्रमाण यांवर चर्चा करीत आहेत, ते घर मण्डनमिश्राचे समजा." असे ती स्त्री शंकराचार्यांना म्हणाली.

स्वतः प्रमाण आणि परतः प्रमाण हे प्रामाण्य-वादाचे भाग आहेत हे मी तुम्हाला अगोदरच सांगितले आहे. आता या वादाची थोडी कल्पना घेण्याचा प्रयत्न करू या. एक मजेशीर गोष्ट मला आठवते.

एक दाक्षिणात्य तर्कशास्त्र शिकण्यासाठी बंगालमधील नवद्वीपला गेला. देशातील बहुतेक तर्कशास्त्री बंगालमध्ये होते. हा तेथे गेलेला दाक्षिणात्य कवी होता. काव्याद्वारे तो थोडीशी कमाई करीत असे. त्यासाठी तर्क कठीण होते आणि त्याला त्याचा अर्थही लागला नाही. ते शिकण्याचे त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. ह्या सौदेबाजीत त्याने त्याची काव्यशक्ती

गमावली आणि आता त्याने सर्व पैसे घालविले होते. त्याने त्याची काव्यशक्ती परत मिळवली असती तर तो अजूनही थोडे पैसे कमावू शकला असता. त्याच्याठिकाणी थोडी काव्यशक्ती राहिली होती, तीबद्दल शोक करताना तो म्हणतो :

''नमः प्रामाण्य-वादाय मत्कवित्वाऽपहारिणै'' (माझी कवित्वशक्ती हिरावून घेणाऱ्या प्रामाण्य-वादाला मी नमन करतो.)

पोपट चर्चा करीत असलेला प्रामाण्य-वाद थोडक्यात पाहू या.

जेव्हा आपण एखादी वस्तू पाहतो तेव्हा आपण त्याबाबत काही कल्पना करतो. काही प्रकारचे ज्ञान बरोबर तर काही चुकीचे असते. जेव्हा आपण एखादा काचेचा तुकडा पाहतो तेव्हा तो आपल्याला स्फटिक वाटेल. हे चुकीचे ज्ञान आहे. योग्य ज्ञान 'प्रमा', चुकीचे ज्ञान 'भ्रमा' असते. नंतर 'संशय-ज्ञान' तसेच 'निश्चय-ज्ञान' असते. ज्याबाबत आपल्याला शंका असतात ते 'संशय-ज्ञान' आणि ज्याबाबत आपल्याला खात्री असते ते 'निश्चित-ज्ञान' होय. काहीवेळेस जरी आपले एखाद्या वस्तूचे ज्ञान (आपण जसे पाहतो) चुकीचे असले तरी आपण ते बरोबर मानतो. काच साखरेचा स्फटिक वाटणे हे त्याचे उदाहरण होय. असेही घडते की जेव्हा आपण एखादी वस्तू पाहतो त्याचवेळेस त्या वस्तूचे आकलन चुकीचे असल्याचे समजते. उदाहरणार्थ, तळ्यात एखादे झाड उलटे प्रतिबिंबित झालेले आढळते : हे 'अप्रमाण' असते. आपण एखादी वस्तू पाहतो त्याचक्षणी आपल्याला दोन प्रकारचे ज्ञान होते - प्रमाण आणि अप्रमाण. एकाक्षणी आपण एखादी वस्तू पाहून जे आपल्याला खरे वाटते ते 'प्रामाण्य-ग्रह-ज्ञान' आणि त्याक्षणी खोटे वाटते ते 'अप्रामाण्य-ग्रह-अस्कंधिकज्ञान' होय. प्रमा प्रमाणेच भ्रमातही प्रमाण-ज्ञान असते. म्हणून जेव्हा आपण काचेला खडीसाखर समजतो तेव्हा आपले ज्ञान प्रमाण वाटते.

जेव्हा एखादी वस्तू खरी वाटते (प्रमाण) किंवा खोटी (अप्रमाण) वाटते हे आकलन आत्मनिष्ठ असते (स्वतःतून निर्माण झालेले) की वस्तुनिष्ठ असते (वस्तूपासून आलेले) ? जर ते आत्मनिष्ठ असेल तर ते 'स्वतः-प्रमाण' असते; जर ते वस्तुनिष्ठ असेल तर ते 'परतःप्रमाण' असते. मण्डनमिश्राच्या घरचे पोपट या दोन प्रमाणांवर चर्चा करीत होते.

आपले आकलन प्रमाण आहे की अप्रमाण ही आत्मनिष्ठ गोष्ट नाही. ते ज्या वस्तूचे आकलन करतो त्या वस्तूच्या गुणांवर अवलंबून असते. जेव्हा व्यवहारात त्या वस्तूची उपयुक्तता कळते तेव्हा आपल्याला आपले आकलन बरोबर आहे की चुकीचे ते कळते. हा न्यायशास्त्राचा दृष्टिकोन असतो- आपले आकलन योग्य की अयोग्य हे वस्तूवर असते. मण्डनमिश्र आणि इतर मीमांसकांचा दृष्टिकोन विरुद्ध आहे. मण्डनमिश्राचा दृष्टिकोन असा आहे : ज्ञानाची निश्चितता ही ज्ञानावरच अवलंबून असते. आपले अप्रमाण असलेले ज्ञान हे बाह्य वस्तूवर अवलंबून असते. ''प्रामाण्यं स्वतः; अप्रामाण्यं परतः.''

हल्ली वाद या शब्दाचा अर्थ आपला दृष्टिकोन बरोबरच आहे असे हट्टाने मांडणे असा घेतला जातो. विरोधकाच्या दृष्टिकोनाच्या विरुद्ध जाऊन आपल्या दृष्टिकोनाचे मोजमाप करणे आणि सत्य शोधणे हा खरा त्याचा अर्थ आहे. याप्रकारे शंकराचार्यांनी मण्डनमिश्रासारख्या विद्वानांबरोबर वाद केले आणि समोरच्या माणसाचे म्हणणे ऐकून घेऊन मगच ते अद्वैत हेच अंतिम सत्य या मतापर्यंत आले. वाद म्हणजे विचारांची देवाण-घेवाण, दुसऱ्याचा दृष्टिकोन नाकारणे नव्हे. दुसऱ्याचे मत विचारात न घेता आपले मत योग्य असल्याचे मानणे 'जल्प' होय, 'वाद' नव्हे. तिसरा एक दृष्टिकोन आहे. स्वतःचा काहीच दृष्टिकोन नसतो पण विरोधी जाणे, याला 'वितंड' म्हणतात.

मंदमती गंगेश काशीहून मोठा विद्वान म्हणून आल्यानंतर, विशेषतः बंगालमध्ये न्यायशास्त्राला नवीन प्रेरणा मिळाली, म्हणजे बाराव्या शतकानंतर आणि त्याला 'नव्य-न्याय', नव्य म्हणजे नवीन असे म्हटले जाऊ लागले. त्या नावाला आणखी एक कारण आहे. गंगेश आणि त्याच्यानंतर आलेले हे बंगालमधील नवद्वीपचे होते. आता त्या भागाला नडिआद म्हटले जाते. श्री चैतन्य महाप्रभू (विश्वंभर मिश्र, १४८५ ते १५३३ च्या काळातील बंगाली वैष्णवातील महान व्यक्ती) नवद्वीपचे होते. ते महान विद्वान आणि अनेक शास्त्रांत प्रवीण होते आणि त्यांच्या ओठावर नेहमी कृष्णाचे नाव असे. त्यांनी मोक्षाचा मार्ग म्हणून भक्तीचा, विशेषतः भजनाद्वारे (भगवानाची स्तुती गाणे) प्रचार केला.

न्याय जगाला सत्य (मायेला नाही); परमात्मा हा जीवात्म्यापेक्षा भिन्न आहे असे मानते. तरी त्या शास्त्राने नास्तिकवादाला विरोध केला आणि ईश्वराचे अस्तित्व स्थापन केले. शिवाय त्याने आपल्याला अद्वैताकडे नेणाऱ्या मार्गाचा पाया घातला.

न्यायशास्त्र हे वेदांचे एक अंग आहे आणि वृत्तीने बौद्धिक स्वरूपाचे आहे. अध्ययनाच्या चौदा शाखांपैकी (चतुर्दश-विद्या) पुढे पुराणे येतात पण धर्मभोळ्या कल्पनांची फलोत्पत्ती म्हणून शिक्षितजन त्यांना विचारात घेत नाहीत.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

**भाग - १४**

## पुराणे

## प्रकरण - १

# वेदांचे भिंग

पुराणे ही वेदांचे भिंग आहेत. वेदांमध्ये थोडक्यात सांगितलेली तत्त्वे आणि धर्माचे नियम पुराणांमध्ये कथांच्या रूपात विस्तृत आणि स्पष्टीकरणात्मक केलेली आहेत. थोडक्यात विशद केलेला विषय मनावर खोल परिणाम करेल असे नाही. तेच आत्मसात केलेल्या कथाद्वारे सांगितले गेले तर ती तत्त्वे श्रोत्याच्या किंवा वाचकाच्या मनावर त्वरित चांगला परिणाम घडवितात.

वेद आपल्याला सत्य बोलण्याचा आग्रह धरतात. (सत्यं वद।) एखादा कोणत्याही स्थितीत सत्यवचनी राहून उच्चस्थानी कसा जातो हे हरिश्चंद्राच्या कथेवरून सांगितले जाते. "धर्मं चर।" (धर्माचे पालन कर, धार्मिक जीवन जग.) ही वेदांची दोन शब्दांतील आज्ञा आहे. महाभारतातील धर्मपुत्राच्या (युधिष्ठिराच्या) दीर्घ कथेद्वारे धर्मपालनाचे महत्त्व स्पष्ट केलेले असते. "मातृ-देवो भव" आणि "पितृ-देवो भव" (ज्याला माता ही देव आहे त्याच्याशी एक व्हा. - ज्याला पिता देव आहे त्याच्याशी एक व्हा) : श्री रामाच्या कथेत या दोन्ही आवाहनांचा जणू भिंगांद्वारे विस्तार केलेला असतो. नम्रता, सहनशीलता, दया, पावित्र्य असे धार्मिक गुण म्हणजे वैदिक आज्ञांचे विषय, ते प्राचीन काळातील पुरुष, पवित्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या स्त्रिया यांच्या उदात्त उदाहरणांनी स्पष्ट केलेले असतात. त्यांच्या कथा वाचून किंवा ऐकून आपण त्यांचे गुण आणि सद्‌गुण सिद्ध केलेले असतात.

ज्या पुरुष आणि स्त्रियांचा पुराणांमध्ये तपशील असतो त्यांना सत्त्वपरीक्षेतून जावे लागलेले असते. आपण अनेक चुका करीत राहतो. पण पुराणातील पात्रांचा ज्यांना आपल्यापेक्षा जास्त त्रास सहन करावा लागलेला होता त्यांचा विचार करा. त्यांच्यापैकी काहींना खरोखरच दिव्य कसोटीतून जावे लागले. तथापि, आपण असा ग्रह करून घेत नाही की धर्माचे पालन करणे म्हणजे दुःख सहन करणे. उलट धर्माचे पालन करताना जे आपल्या पावित्र्याच्या जोरावर संकटे आणि आव्हानांना तोंड देताना खडकासारखे उभे राहिले त्यांचे उदाहरण आपल्या मनावर कोरले जाते. त्यांच्या दुःखाच्या कथांनी आपण हेलावले जातो आणि आपली आतील अशुद्धता धुऊन निघते. शेवटी ते जे भव्य यश आणि कीर्ती मिळवितात ते आपल्या ठिकाणी धर्माचे भक्कम अनुबंध निर्माण करतात.

-----

प्रकरण - २

# पुराणे आणि इतिहास

असा नेहमी आरोप केला जातो की आपल्या देशाला इतिहासाची जाणीव नाही. माझ्या मते पुराणे ही इतिहास आहेत. पण आज आपल्या शिक्षित लोकांच्या दृष्टीने इतिहास म्हणजे ख्रिस्ताच्या जन्मानंतरच्या दोन हजार वर्षांचा इतिहास. पुराणात उल्लेखिलेल्या घटनांसह, त्यापूर्वीच्या कालखंडातील घटना याही इतिहास आहेत यावर त्यांचा विश्वास नाही. अलीकडील संशोधकांनी दाखवून दिल्यानुसार काही पौराणिक कथांमध्ये सत्यांश आहे असे काहीजण मानतात. पण ते या कथा त्यांच्या कल्पनेनुसार असलेल्या सिद्धांताला पुष्टी देणाऱ्या मानतात. उदाहरणार्थ - आर्य आणि द्रवीड हा भारतीय लोकांचा वंशभेद. बाकीच्या चमत्काराच्या कथा किंवा अमानवी घटना ते लोक कल्पित कथा किंवा खोटेपणाचे विणलेले जाळे असे मानून त्याची वासलात लावतात. आपल्या जाणिवेच्या पल्याड असलेल्या कथा ते आकलन करू शकत नाहीत म्हणून ते पुराणांना गहन गोष्ट मानतात.

आता मुलांना अशा लोकांनी लिहिलेल्या इतिहासाची पुस्तके वाचण्याशिवाय पर्याय नसतो. पण मला वाटते की मुलांना पुराणांबाबत अज्ञ ठेवणे चांगले नाही. माझ्या म्हणण्याचा हेतू इतिहास वाचू नये असा नाही; मला पुराणांचा इतिहास म्हणून उल्लेख केलेला आवडेल आणि तरुणांना त्यातून बरेच शिकता येईल, त्यांचे वर्तन आणि चारित्र्य घडविण्यास त्यातल्या अनेक गोष्टी उपयुक्त ठरतील. शाळांमध्ये शिकविल्या जाणाऱ्या इतिहासातून असा हेतू साध्य केला जात नाही.

ते म्हणतात की इतिहास वाचलाच पाहिजे. याचे एक कारण असे की त्यांचा विश्वास असतो की, 'इतिहासाची पुनरावृत्ती होते.' भूतकाळातील धडे आपल्याला भविष्यकाळात उपयुक्त ठरतात अशी त्यांची कल्पना असते. युद्धाकडे नेणारी परिस्थिती आणि महान संस्कृतीचा उदय आणि ऱ्हास यांविषयी आपल्याला इतिहासातून ज्ञान मिळते. अशा परिस्थितीवर आपण लक्ष ठेवू शकतो आणि हा इतिहासाचा उपयोग आहे असे आपल्याला सांगितले जाते.

कल्पानुकल्पे त्याच घटना घडत असतात. आपल्या शास्त्रानुसार रामायण, महाभारत, भागवत, दशावतार (विष्णूच्या दहा अवतारांची कथा) आणि पुराणे कल्पानुकल्पे त्याच भूमिका करतात. येथेही आपल्याला इतिहासाची पुनरावृत्ती होते असे दिसते.

आपण इतिहासापासून काही धडा शिकलो का, म्हणजे शाळांमधून शिकविल्या जाणाऱ्या इतिहासापासून चेंघीजखान, तैमूर, गझनी आणि मलिक काफूर अशी माणसे वारंवार कशी निर्माण होतात आणि त्यांनी विविध देशांचा ऱ्हास केला, निष्पाप लोकांची कत्तल केली,

हे आपण शिकतो. पण त्यांच्या अशा कृष्णकृत्यांचा तपशील वाचून अशा पुन्हा उद्‌भवणाऱ्या दुःखाच्या कारणांना प्रतिबंध करण्यास आपण समर्थ झालो का? हिटलर आणि मुसोलिनी यांनी लोकांची विटंबना करणारी कृत्ये केलीच. मंगोलियन वंशाचा शमैस्ट पंथाचा चेंघीजखान (११५५-१२२७) हा जगातील मोठा लष्करी नेता होता, त्याने चीन आणि मध्य आशिया जिंकला. तो सिंधूपर्यंत आला, पण भारत त्याच्या संकटातून वाचला. तैमूर (१३३६-१४०५) हा तुर्क-मोगल इतिहासातील नृशंस माणूस होता. हा चेंघिजखानाच्या आईकडून नात्याचा. तुघलक वंशाच्या ऱ्हासाच्या काळात त्याचे आक्रमण हे कत्तल, लुटमार आणि विध्वंस यांची कथा आहे. त्याने एक लाख हिंदू कैद्यांना ठार मारले. इस्लामची तलवार म्हटला जाणारा महमुद गझनी (१०००-१०२७) याने भारतावर सतरावेळा स्वाऱ्या केल्या. उतावळा आणि मूर्तिभंजक असल्याने त्याने सोमनाथसह असंख्य मंदिरांचा नाश केला आणि भारतातून आणलेल्या लुटीने अफगाण राजधानी समृद्ध केली. अल्लाउद्दिन खिल्जीच्या काळातील मलिक काफूरने १३०७ मध्ये मोहीम काढली. तो रामेश्वरपर्यंत गेला आणि ठिकठिकाणी अनर्थ केला आणि विपुल संपत्तीसह दिल्लीला परतला.

लाचेचे आणि भ्रष्टाचाराचे आरोप आणि इतर गैरव्यवहार जोडले गेल्याने, पक्षाभिमान आणि वशिलेबाजी यांच्यामुळे सरकारांनी पाठिंबा गमावल्याचे आपण आपल्या काळातील साक्षी आहोत. जेव्हा असे सरकार पडते तेव्हा दुसरा समूह सरकार बनवतो आणि तेसुद्धा त्याच कारणास्तव लोकांचा पाठिंबा गमावतात. इतिहासापासून काही धडा शिकण्यातील अपयशाचे हे उदाहरण आहे.

इतिहास हा धर्मातील पाठांसह शिकविला पाहिजे तरच लोकांना योग्य मार्गावर आणण्याचा हेतू साध्य होईल. पुराणे हे नेमकेपणाने करतात.

राजेलोकांच्या आणि इतरांच्या कारकिर्दीचे कालानुक्रमे वर्णन यापेक्षा जास्त इतिहासात काही नसते. तो त्यांच्या नैतिक चारित्र्याला महत्त्व देत नाही. दुष्ट राज्यकर्त्यांवर दुर्दैव ओढवले किंवा न्यायी आणि न्यायप्रिय राजाने उच्चस्थान प्राप्त केले. कर्मसिद्धांतानुसार ईश्वर लोकांचे भाग्य त्यांच्या कर्मावर, पुण्य आणि पापावर ठरवितो. एखाद्या माणसाच्या जीवनात असा न्याय दिला जात नाही. मनुष्याच्या कर्माची फळे त्याच्या पुढील जन्मांमध्ये मिळतात. इतिहासाचे, अशा प्रश्नाबाबतची चर्चा हे काम नाही, इतिहासकारांना अशा बाबतीत ज्ञान घेण्याचे सामर्थ्य नाही. हिटलरसारख्या दुष्ट राज्यकर्त्याला मृत्यूनंतर नरकात पाठविले गेले का आणि त्याला क्षुद्र जन्म मिळाला का असे प्रश्न पुराणांचे आहेत. ज्यांनी हे ग्रंथ लिहिले त्यांना अशा प्रश्नांबाबत अंतर्दृष्टी होती; या कथांचा हेतूच, नैतिक पाठ देणे हा असतो. इतिहासापासून आपण नैतिक विकास/मनाची सुधारणा साधू शकत नाही.

मी अगोदर म्हटल्याप्रमाणे पुराणे इतिहास असतात. शिवाय, त्यात पाप आणि

पुण्याच्या पाठांचा समावेश असतो. वस्तुतः, त्यांची कथांची निवड आणि कथन हे लोकांना धर्माच्या मार्गाजवळ नेण्याचे असते. ज्या व्यक्ती आपल्या जीवनात धर्माशी अढळ निष्ठा ठेवण्याच्या सद्गुणाने उच्च स्थितीत पोहोचल्या अशांचा तपशील पुराणांमध्ये असतो. त्याचवेळेस ज्यांना अधर्मामुळे याच जन्मात दुःख सहन करावे लागले अशांच्या कथाही सांगितल्या. खरेतर काही ना काही नैतिक बोध नसलेल्या पुराणकथा नसतात.

इतिहासात भूतकाळातील अनुभवांचे केलेले कथन हे भविष्यातील घटनांचे निर्देशक असते. चांगल्या माणसांच्या, ज्यांनी सत्कृत्ये केली आणि त्यापासून त्यांना लाभ झाला अशांच्या कथा आपल्याला प्रेरणास्रोत असतात. त्याचप्रमाणे ज्यांनी जगावर दुर्दैव आणले आणि त्यांना स्वतःलाही दुष्कृत्यांमुळे दुःख भोगावे लागले अशा दुष्ट माणसांच्या कथा आपल्याला इशारा देणाऱ्या ठरतात. इतिहासाचा अभ्यास अशा तऱ्हेने खरेच उपयुक्त ठरेल नाही? आपला नैतिक आणि आध्यात्मिक विकास साधण्यासाठी आपल्याला पुराणांकडे वळावे लागेल.

चांगले किंवा वाईट पाठ न देता, राजे आणि त्यांचे कलह यांची कालानुक्रमे यादी देणे हा (इतिहासाप्रमाणे) पुराणांचा हेतू नसतो. ज्यात आपल्या जीवनातील आचारधर्माचे मार्गदर्शन नाही अशा इतिहासाची आपल्याला गरज नाही. इतिहास आपल्याला आत्मिक फल देण्यास समर्थ असला पाहिजे.

पुराणातसुद्धा विविध घराण्यांची वंशावळ असते. ती चंद्र आणि सूर्य (चंद्रवंश आणि सूर्यवंश) यांपासून आलेल्या राजवंशाचा तपशील देतात आणि विविध राज्यांच्या एकापाठोपाठ आलेल्या राज्यकर्त्यांच्या याद्या असतात. अनेकवेळा राज्यकर्त्यांची फक्त नावे किंवा अगदी थोडक्यात संदर्भ दिलेला असतो. ज्यांचे जीवनपट आपल्याला बोध देणारे असतात अशांचा तपशील दिलेला असतो. उदाहरणार्थ, भागवत ध्रुवाचा पिता उत्तानपाद याची आणि ध्रुवाचा पुत्र यांची कथा सांगते; पण अगदी थोडक्यात. मात्र ध्रुवाची कथा तपशीलवार सांगितली जाते; ध्रुव हा आपल्यासाठी श्रद्धा, निश्चय आणि धैर्य यांचे उदाहरण असते.

इंग्रज इतिहासकार पुराणे खोटी मानतात. पण निष्पक्ष संशोधन करण्याच्या खोट्या सबबीखाली त्यांच्या हेतूंना सोयीस्कर होईल अशी कलाटणी ते इतिहासाला देतात; उदाहरणार्थ, त्यांचे 'फोडा आणि झोडा' हे धोरण, अशाच प्रकारे त्यांनी आर्य-द्रवीड हा सिद्धान्त पसरविला. जर पुराणे खोटी असतील तर या इंग्रजांनी लिहिलेल्या इतिहासाचे काय? आपल्या इतिहासाची पुनर्रचना करण्याचे प्रयत्न केले जात आहेत. परंतु या नव्या प्रयत्नांमध्येही पूर्वग्रहदूषित तपशील काढून टाकला जाऊ शकत नाही. हे इतिहासकार तटस्थतेचा आव आणतात. त्यावरून नवीन इतिहास किती सत्य असेल हे सांगणे कठीण आहे.

व्यासांनी अठरा पुराणे रचली. थोर माणसांनी विविध स्थल पुराणे लिहिली आणि

तमीळ कर्ता शेक्किझार हे सर्व वर्णनाबाबत अकलुषित होते. स्थल पुराणे मंदिरांसाठी प्रसिद्ध असलेल्या स्थानांचे इतिहास आहेत. त्यांना स्थानिक पुराणेही म्हणता येईल.

साम्राज्यांचा उदय आणि ऱ्हास किंवा युद्धे, आक्रमणे, राजवंश आणि इतर यांचे निव्वळ वर्णन म्हणजे इतिहास हा दृष्टिकोन योग्य नाही. प्रत्येक विषयाला स्वतःचा असा एक इतिहास असतो. पण राजकीय इतिहासाला प्रमुख स्थान दिले गेल्याचे आपल्याला आढळते. पुराणांमध्ये धर्माला महत्त्व दिले गेले आहे आणि अधूनमधून ती गौणरित्या राज्य करणारा वंश, पवित्र व्यक्ती तसेच सामान्य माणसे यांचे वर्णन करतात. त्यांच्यात सांस्कृतिक जीवन, कला आणि विज्ञान यांचे तपशील असतात. पुराणांचा भर धार्मिक आणि आत्मिक विषयांवर असतो.

-----

प्रकरण - ३

# पुराणे ही खोटी आहेत की रूपकात्मक?

ज्यांचा पुराणांवर विश्वास नाही ते म्हणतात की आजकालच्या दैनंदिन सत्याला अनुसरून अशी वर्णने त्यात नसतात. या ग्रंथांमध्ये असलेल्या कथा या देवतांचे आगमन आणि जाणे तसेच त्यांनी भक्तांना दिलेल्या वरदानाच्या गोष्टी असतात. टीकाकारांना अशी वर्णने खोटी वाटतात. एक स्त्री शापामुळे दगड बनते, एका वरदानामुळे शापभंग होतो; किंवा सूर्य उगवायचा थांबतो - अशा कथा खोट्या वाटतात कारण त्या शक्यतेच्या पलीकडे असतात आणि आपल्या स्वतःच्या कुवतीच्या पलीकडच्या असतात.

अशा गोष्टी आजकाल घडत नसल्याने असे दर्शविणे योग्य होईल का की त्या कधी घडल्याच नव्हत्या? वेदांचे पठण करणारे अनुकरणीय जीवन जगत असल्याने पूर्वी वेदातील मंत्रांना चमत्कृतिपूर्ण सामर्थ्य होते. त्याकाळी लोकांनी कठोर तपस्या केल्या आणि उच्च दर्जाचे योगिक सामर्थ्य वाढविले. अशा गोष्टी प्राचीन ग्रंथांमध्ये असतात. त्याकाळी लोक मंत्र, तप आणि योगाच्या साहाय्याने स्वतःमध्ये दिव्य शक्ती प्राप्त करत असत. जेथे प्रकाश असतो तेथे सावली असते. त्या दिव्य शक्तीमुळे त्याकाळात दिसून येणाऱ्या दुष्ट राक्षसी शक्तीसुद्धा असत. आजही देव आणि राक्षस यांच्यात लढाई चालू असते (चांगले आणि वाईट यांच्यातील युद्ध). फार पूर्वीच्या दीर्घकाळात तपस्येमुळे विशेष दृष्टी प्राप्त झालेले लोक या चांगल्या आणि वाईट शक्तींना जाणून असत. शास्त्रज्ञ म्हणतात की सर्व प्रकाशलहरी आणि ध्वनिलहरींचे आकलन मानवी ज्ञानेंद्रियांना होत नाही. काहीजण संशोधनावरून असेही म्हणतात की चांगल्या आणि वाईट देवता खरेच असतात.

आजही या जगात योगी आणि सिद्धपुरुष आहेत. त्यांना अग्नी आणि बर्फामुळे इजा होत नाही, ते पाऊस निर्माण करू शकतात किंवा थांबवू शकतात आणि त्यांच्याकडे आपल्या ज्ञानेंद्रियांना न समजणारी शक्ती असते. पण आपला अशा कृतींवर विश्वास नसतो आणि प्रत्येक गोष्टीवर आपण शंका घेत राहतो. असे सामर्थ्य किंवा सिद्धी प्राप्त झालेल्या लोकांची संख्या आज आपल्याला आढळते त्यापेक्षा अधिक असावी. पुराणांमध्ये अनेक चमत्कारांचे वर्णन असते.

इतिहासकार, चमत्कार हा इतिहासाचा भाग नाही असे मानून त्याचा विचार सोडून देतात. ज्ञानसंबंधर याने कून पाण्ड्यम्चा ताप, पंचाक्षर मंत्र म्हणून बल प्राप्त झालेल्या भस्माने बरा केला. पाण्ड्यन्चे कुबड घालवून त्याला सरळ केले. (तमीळमध्ये कून म्हणजे कुबड किंवा पोक). इतिहासकार अशा गोष्टींवर विश्वास ठेवत नाहीत. महेंद्र पल्लवने अप्परस्वामिगल यास दोराने दगडाला बांधले आणि त्याला कडिल नदीत फेकले. तो संथ प्रवाहात तरंगत राहिला. या

घटनेमुळे पल्लव राजा जैन धर्माकडून वैदिक धर्माकडे वळला.

इतिहासकार अशा घटना स्वीकारत नाहीत. तरी एक पल्लव आणि एक पांड्य राजा हे जैन धर्मातून शैवपंथात आले याचा परिस्थितजन्य पुरावा आहे. इतिहासकार कबूल करतात की सहाव्या आणि सातव्या शतकात तमीळनाडूमध्ये जैन धर्माचा ऱ्हास झाला आणि वैदिक धर्म (विशेषतः शैवपंथ) उच्चस्थानावर आला. त्याकाळात दोन महत्त्वाच्या राज्यकर्त्यांना त्यांचा धर्म बदलणे आवश्यक वाटले. याचा अर्थ असा की ज्ञानसंबंधर आणि अप्परच्या कथांमधील चमत्कार नक्कीच घडला असणार. या राज्यकर्त्यांनी या घटना दगडांवर किंवा तांब्याच्या पत्र्यांवर कोरल्या नाहीत, याचा अर्थ असा नाही की त्या घटना घडल्याच नाहीत.

गुरुपरंपरेतील रामानुजाचार्यांची एक कथा सांगितली जाते. होयसळवर (कर्नाटक) राज्य करणाऱ्या पित्तिदेव नावाच्या राजाच्या मुलीचे भूत त्यांनी काढले. त्यावर त्या राजाने वैष्णवपंथ स्वीकारला. इतिहासकार अशा भूत काढण्याच्या गोष्टींवर विश्वास ठेवत नाहीत. रामानुज अकराव्या शतकात होते. होयसळ राज्यात जैन पंथ दुर्बल झाला आणि वैष्णव उपासना आणि मंदिरे यांची भरभराट झाली. पित्तिदेवालाच विष्णुवर्धनदेव म्हणण्यात येऊ लागले. ही ऐतिहासिक घटना म्हणून निश्चित झाली. वर सांगितलेल्या कथेतील घटनांमुळे हे बदल झाले हे तुम्ही कसे नाकारू शकता? इंग्रजी-शिक्षित लोक पुराणातील अशा कथा खोट्या म्हणून सोडून देतात, कारण त्या शास्त्रीयदृष्ट्या सिद्ध होत नाहीत; हा दृष्टिकोन चुकीचा आहे.

आजही बऱ्याच ठिकाणी १० किंवा १२ फूट लांबीचे मानवी सांगाडे सापडलेले आहेत. आज लुप्त झालेल्या विशालकाय प्राण्यांचे सांगाडे सापडले आहेत की जे पुराणातील वर्णनाशी मिळते-जुळते आहेत. अशा संशोधनावरून असे दिसते की फार वर्षांपूर्वी माडाच्या झाडांइतके उंच राक्षस तसेच शरीर आणि हत्तीचे सोंड असलेले याळीसारखे प्राणी अस्तित्वात असले पाहिजेत. आर्क्टिक भागात सोळा फुटाचे पाय असलेला मानवी सांगाडा आणि हत्तीपेक्षा दहापट मोठ्या असलेल्या प्राण्याचे अवशेष सापडले आहेत.

हे प्राणी लाखों वर्षांपूर्वीचे असावेत हे निश्चित झालेले आहे. आपण जरी दंतकथांची मदत घेतली तरी असे आढळेल की आपल्या पुराणातील कथा खोट्या नाहीत.

जो मनुष्य माडाएवढा होता तो आता फक्त सहा फुटाचा आहे. कधी तो आपल्या अंगठ्याएवढा होता. युगायुगांमध्ये प्राण्यांचे शारीरिक गुणधर्म बदलतात हे पुराणात सांगितलेले आहे.

पुराणांचा अशाप्रकारे उपहास केला जातो. कारण त्यात वानर, माणसांच्याजवळ असणारी माकडे, मनुष्याचा चेहरा आणि प्राण्याचे शरीर असलेले प्राणी, दहा मस्तके असलेले

पात्र अशांचा उल्लेख असतो. हे सर्व खोटे आहे असे टीकाकार म्हणतात. तर काहींचा पुराणकथा प्रतीकात्मक आहेत, त्या रूपकात्मक आहेत असा विश्वास असतो.

हे खरे आहे की पुराणांमध्ये, काही तत्त्वे, सत्ये ही कथेच्या रूपात आलेली असतात. पण त्या कारणास्तव त्या कथा खोट्या आहेत असे म्हणता येणार नाही. आजदेखील आपण वर्तमानपत्रात दोन मस्तकाच्या आणि चार हातांच्या बाळाच्या जन्मासंबंधी किंवा मानवही नाही आणि प्राणीही नाही अशा जीवाच्या जन्माविषयी वाचतो. ते अशा मुलांना अनैसर्गिक म्हणतात. निसर्गाच्या चुकीचा तो परिणाम असतो. सामान्यतः निसर्ग चुकत नाही. ज्यांना आज अनैसर्गिक/विचित्र म्हटले जाते ते भूतकाळात मुद्दाम मोठ्या प्रमाणावर निर्माण केले गेले असावेत. त्याकाळातील लोकांना दिव्यशक्ती होती. त्याशिवाय अशा विचित्र मुलांचा जन्म अशक्य झाला असता. पुढे माहीत होणार आहे असे ज्ञान आणि आजच्यापेक्षा भिन्न प्राणी पूर्वी असतील हे सर्व आम्हाला ज्ञात आहे असा आमचा दावा नाही.

जे आपल्याला माहीत नाही आणि जे आपल्याला कळू शकणार नाही असे असत्य म्हणून समजणे हे कोणालाही मान्य होणार नाही. आपल्या काळातही आपण जे अविश्वासार्ह म्हणतो ते अधूनमधून घडते. आपण मुले आणि प्रौढ माणसांना त्यांचे मागील जन्म आठवतानाच्या बातम्या वाचतो. अलीकडच्या काळात पूर्वीपेक्षा अशा बातम्या अधिक नित्याच्या झाल्या आहेत.

कश्यपाला कद्रू नावाची पत्नी होती जिने सापांना जन्म दिला. अशा पुराणकथेवर आपण विश्वास ठेवत नाही. पण तुमच्यापैकी अनेकजणांनी एका मारवाडी स्त्रीने एका सापाला जन्म दिल्याची घटना मागील वर्षी (१९५८) मध्ये वाचली असेल. मी जेव्हा ती वाचली तेव्हा मला एका गोष्टीची आठवण झाली.

मी स्वामिगळ/संन्यासी होण्यापूर्वी एका कुटुंबाविषयी ही गोष्ट ऐकली होती. त्या कुटुंबातील मुली किंवा सुना केसात केतकीची फुले (तमीळमध्ये ताझांबु म्हणतात) माळत नाहीत. जेव्हा त्याचे कारण विचारले तेव्हा त्यांनी एक कथा सांगितली - कथा म्हणजे काही भरून काढण्यासाठी नव्हे.

''दहा किंवा पंधरा पिढ्यांपूर्वी'', त्या कुटुंबातील एक स्त्री म्हणाली, ''आमच्या कुटुंबात एका सापाचा जन्म झाला. त्या कुटुंबाला त्याच्या जन्माची लाज वाटली आणि त्यांनी ही स्थिती इतरांपासून लपवून ठेवली, पण तरीही त्याला घरातच वाढविले गेले, दूध पाजले गेले इ... या चमत्कारिक बाळाला बाहेर नेता येणे शक्य नव्हते. जेव्हा अगदी महत्त्वाचे काम असे तेव्हाच आई बाहेर जात असे. एक म्हण आहे : जर तुमचे दगडाशी लग्न झाले असेल तर तो दगड तुमचा पती आहे. त्याप्रमाणे जर तुम्ही सापाला जन्म दिला असेल तर तो साप तुमचे बाळ होय. एक दिवस त्या मातेला जवळच्या नातेवाईकाच्या लग्नाला जावे लागणार होते.

त्या घरात एक वृद्ध स्त्री होती. त्या सर्पबाळाची आजी की कोण होती ते आम्हाला माहीत नाही. त्याकाळी दूरच्या नातलगांची काळजी घेत. अन्यथा ते असहाय असत. हल्ली मुले स्वतःची घरे उभारण्यासाठी त्यांच्या मात्यापित्यांबाबत जास्तच चिंतातुर असतात. त्याकाळात एकत्र कुटुंब ही एक बळकट संस्था असे. मोठी आत्या किंवा आजोबांचे चुलत भाऊ यांची कुटुंबाकडून काळजी घेतली जाई. या कथेतील म्हातारी स्त्री अंध होती. सर्पबाळाच्या आईने या स्त्रीच्या देखभालीखाली त्याला ठेवले आणि ती लग्नाला गेली.

''सर्पबाळाला तुम्ही काय करायचे? तुम्हाला त्याला न्हाऊ घालायचे किंवा वेणीफणी घालायची असे नव्हे. कपडे घालायचे का? कडेवर घ्यायचे का? केवळ त्याला ठरलेल्या वेळी दूध पाजायचे. जाण्यापूर्वी आईने त्या स्त्रीला सांगितले, 'त्याला उकळविलेले दूध पाजा, उखळाचा दगड चाचपून पाहा आणि त्याच्या पोकळीत दूध ओता. तो साप ते पिईल.' तिने त्या सापाला असे पिण्याचे प्रशिक्षण दिले असावे.

''त्या स्त्रीने तिला जसे सांगितले होते तसे केले. पण एक दिवस ती जास्तच झोपली आणि त्या बाळाला दूध पाजण्याची वेळ निघून गेली होती. जेव्हा तो साप त्या उखळाकडे गेला तेव्हा त्यात दूध आढळले नाही. त्याने थोडा वेळ वाट पाहिली. पण तो लवकरच तो त्या उखळात मुटकुळे करून झोपी गेला. आता त्या वृद्ध स्त्रीने दूध आणले. ते गार झालेले नव्हते आणि त्यातून वाफेचा फुस्स असा आवाज येत होता. म्हणून तिने गरम दूध त्यात ओतले. कारण तिला साहजिकच उखळात मुटकुळे करून झोपलेला साप दिसला नव्हता.

''अरेरे! दूध इतके गरम होते की साप मरण पावला.''

लग्नाला गेलेल्या आईला एक स्वप्न पडले. त्यात तो सर्पबाळ तिला दिसला आणि तो तिला म्हणाला : आई, मी मृत झालो आहे. तू ये आणि मला केतकीच्या झाडांच्या राईत दहन कर. येथूनपुढे तुझ्या कुटुंबातील कोणतीही मुलगी किंवा सून केसात केतकीची फुले माळणार नाही.''

''त्या दिवसापासून, आमच्या कुटुंबातील बायका केतकीची फुले माळली नाहीत.'' गोष्टीचा शेवट करीत ती स्त्री म्हणाली.

मी जेव्हा हे वर्णन ऐकले तेव्हा आश्चर्यचकित झालो आणि अशा गोष्टी खरेच घडल्याचे आश्चर्य वाटले.

मी स्वामिगळ/संन्यासी झाल्यानंतर अनेक वर्षांनी त्या कुटुंबातील (ज्या कुटुंबात सर्पबाळ जन्मले) लोक मला भेटण्यास आले. ते भूतकाळातील सर्पबाळासंबंधी नाही. त्या कुटुंबात अक्षरे कोरलेली एक तांब्याची थाळी होती. माझ्या जुन्या कोरीव लेखांची आवड

त्यांनी ऐकली आणि ती थाळी प्राप्त्यास ते मला घेऊन आले.


त्यावरील कोरीव काम विजयनगरच्या साम्राज्यावर १५३० ते १५४२च्या काळात राज्य करणाऱ्या अच्युतराय यांच्या काळातील होते. जो १५०९ ते १५३० या काळातील विजयनगरचा महान सम्राट कृष्णदेवरायानंतर राज्यावर आला. त्यानुसार एका ब्राह्मणाने बरोबरीच्या १०८ ब्राह्मणांना जमिनी दिल्या, त्याने ते राजाच्या वतीने केले. मी सांगतो का, ते. ब्राह्मणांचा वेळ वेद म्हणण्यात आणि विधी करण्यात जातो. त्याच्याकडून पगार मिळविणे किंवा वेदधर्माचे पालन करण्यापेक्षा वेगळे काम करणे अपेक्षित नाही. (अर्थात आजकाल ब्राह्मण कचेऱ्यांमध्ये किंवा संस्थांमध्ये काम करतात.) परंतु त्याला त्याच्या कुटुंबाची देखभाल करायची असते. म्हणून शास्त्र त्याला दान घेण्याची अनुमती देते, आणि भूतकाळात राजे आणि श्रीमंत नागरिक दान देऊन ब्राह्मणांचा सन्मान करीत असत. पण, आज केल्या जाणाऱ्या आरोपांच्या उलट, ब्राह्मण अशी दाने स्वीकारत नसत, पण त्यांचा उदरनिर्वाह होईल इतके कमीतकमी घेऊन आपला आत्मसम्मान जपत असत. ते फक्त उच्च वंशातील क्षत्रियांकडून जमिनीची दाने स्वीकारत असत.

काही राजे दुःखी असत कारण ब्राह्मण त्यांच्याकडून दाने घेत नसत आणि अशाप्रकारे पुण्य प्राप्त करण्याची संधी डावलली जात असे. एक मार्ग त्यांना (आणि जे श्रीमंत नागरिक त्यांच्यासारख्या बिकट स्थितीत होते.) दाखविला गेला. ते एखाद्या गांजलेल्या ब्राह्मणाचे मन एखादे गाव किंवा तशी मोठी दाने स्वीकारण्यासाठी वळवित असत. पण ते संपूर्ण दान केवळ त्याच्या एकट्यासाठी नसे. त्याने स्वतःसाठी जमिनीचा एक लहान तुकडा ठेवणे आणि बाकी इतर ब्राह्मणांमध्ये वाटणे अपेक्षित असे. आपल्या समान ब्राह्मणाकडून दान स्वीकारण्यात त्या ब्राह्मणांना 'प्रतिग्रह-दोष' लागत नसे. अशाप्रकारे तो श्रीमंत दाता पुण्य मिळविण्याची व्यवस्था करीत असे.

जो ब्राह्मण प्रथम दान स्वीकारतो त्याला हा प्रकार पाप देत नाही का? वैदिक पंडिताला दान देऊन त्याचा सन्मान करणे हे श्रीमंत माणसाचे काही चूक नाही. पण जे ब्राह्मण ते स्वीकारतात त्यांचे काय? कायदेशीररित्या संपत्ती त्याची झाली आणि जेव्हा जो स्वतःला जमिनीचा एक लहानसा भाग ठेवतो आणि बाकी इतरांना देऊन टाकतो, यात त्याला थोडेसुद्धा पाप चिकटत नाही.

तरीपण राजाकडून असा दानधर्म स्वीकारणे वाईट आहे. त्यागराजाने (प्र.१ भाग ६ पहा) सरभोजीसारख्या राज्यकर्त्यांनी दाने झिडकारली. त्यागराजाने रागाने गायन केले : ''निधी चाल सुखमा...?'' (सुख आणतो तो पैसा असतो काय?)

नाट्डक्कोट्टै चेट्टिस (नगरत्तर) याने अनेक चट्टिरमस्/धर्मशाळा बांधल्या. पण ब्राह्मण त्यात भोजन करण्यास तयार नव्हते. म्हणून चेट्टिसने एका ब्राह्मणाला त्या धर्मशाळेची मालकी

देऊन टाकली आणि त्यायोगे तो इतर ब्राह्मणांना भोजन देतो असे दिसले.

मी अगोदर उल्लेख केलेल्या तांब्याच्या थाळीवरील लेखनानुसार अच्युतरायाकडून मिळालेल्या जमिनीचे वाटप एका ब्राह्मणाने १०८ ब्राह्मणांना केले. त्या सर्वांची नावे आणि गोत्रे, ते ज्यात प्रवीण आहेत त्या विषयांसह त्यात उल्लेखिलेली आहेत. त्यात जे लोक मला भेटायला आले, ज्यांच्या घरात सर्पबाळ जन्मले होते त्यांच्या पूर्वजाचे नाव ठळकपणे दिसत होते. ती तांब्याची थाळी कुटुंबाचा वारसा म्हणून अनेक पिढ्यांतून आली. त्या लेखातून एक मजेदार गोष्ट बाहेर आली की तांब्याच्या थाळीवर कोरलेले नाव नागेश्वर (सर्पांचा राजा) होते. मला या अतिथींकडून कळाले की त्यांच्या प्रत्येक पिढीत एकाचे नाव नागेश्वर होते.

मला लगेच कल्पना आली की ते नाव त्या सर्पबाळाशी जोडले गेले होते. त्या कथेबाबत आलेल्या शंकांना ते उत्तर होते. जेव्हा गेल्यावर्षी मी एका स्त्रीने सापाला जन्म दिल्याची बातमी ऐकली तेव्हा माझा अगोदरच्या सर्पबाळाच्या गोष्टीवर विश्वास बसला.

तुमचा पुराणांवर विश्वास नाही म्हणून मी तुम्हाला दोष देतो हे माझे चुकते. मला स्वतःला सर्पबाळाच्या कथेबाबत शंका होत्या - त्या कथेला दंतकथेचे स्वरूप होते. मी तेव्हा तशाच सर्पजन्माविषयी बातमी वृत्तपत्रात वाचली तेव्हा ती गोष्ट अस्सल असल्याची माझी खात्री पटली.

आजकाल वृत्तपत्रात छापलेल्या कोणत्याही विलक्षण गोष्टींवर विश्वास ठेवण्याची आपली तयारी असते. पण आपण पुराणकथा मात्र दंतकथा मानतो. ''ज्यांनी पुराणे रचली त्यांना दुसरा काही चांगला उद्योग नव्हता. त्यांच्याकडे लेखण्या आणि भूर्जपत्रे होती आणि ते कथांमागून कथा लिहीत गेले. काही कथा पुरेशा कल्पक तर काही कथा मूर्खपणाच्या वाटतात'' असा आपला विचार करण्याचा मार्ग असतो.

-----

## प्रकरण - ४

# काल्पनिक तरीही अर्थपूर्ण

कदाचित, पुराणांमध्ये कल्पनेचा एक घटक असावा. त्यात प्रक्षिप्त भाग असेल हे शक्य आहे. पण कोणते भाग काल्पनिक आहेत आणि कोणत्या वेच्यांमध्ये प्रक्षिप्त भाग आहे हे कोण ठरविणार? कोण असली हे नकली पासून वेगळे करणार? जर प्रत्येकाने स्वतःला प्रक्षिप्त वाटणारा भाग काढून टाकला तर शेवटी कथेत काहीच राहणार नाही. म्हणून पुराणे जशी आपल्याकडे आली तशीच ठळक चुकांसह आणि विपर्यासासह जतन करणे बरे होईल.

पुराणातील कथा दंतकथाप्रमाणे वाटत असतील तर वाटू दे. त्या आपल्याला मानसिक शांती देत नाहीत का आणि ईश्वराच्याजवळ नेत नाहीत का? आपण खरेदीला जातो आणि चांगली खरेदी करतो. त्या दुकानाबाबत किंवा दुकानदाराबाबत काहीतरी चुकीचे होते म्हणून आपण सुखी किंवा दुःखी होतो का? पृथ्वी आणि स्वर्ग याबाबतच्या पौराणिक तपशिलांत काही चुका असू शकतील. शेवटी आपल्याला अशा बाबतीत अचूक ज्ञान आपल्या भूगोल आणि खगोलशास्त्र यांवरील पुस्तकांवरून मिळू शकते. लक्षात ठेवण्याचा मुद्दा म्हणजे जे भूगोल, खगोलशास्त्र आणि इतिहासात नाही ते पुराणात असते आणि ते म्हणजे अंतिम सत्य. शिवाय, पुराणे समर्पण आणि धर्म यांविषयी सांगतात.

असा वाद केला जातो की राम काही हजारो वर्षांपूर्वी नसावा. म्हणजे त्रेता युगात, त्या दूरच्या भूतकाळात रामयणात वर्णन केलेली संस्कृती चालू होती हे संभवनीय नाही. अशाच प्रकारची टीका पुराणांमधील आणि महाकाव्यांमधील कथांवर होते. मी ती स्वीकारत नाही. पण वादापुरते, राम त्रेतायुगात नव्हता असे मानू द्या. पुराणांनुसार त्या कथा कृत युगात घडल्या असे आपण मानतो, त्या खरेच त्या युगातील नसाव्यात. त्या तुलनेने त्या अलीकडील काळाच्या म्हणजे ७००० किंवा ८००० वर्षांपूर्वीच्या आहेत असे मानू या. पण त्या कारणास्तव रामाची आणि इतर कथा कमी मौल्यवान ठरतील? आणि अशा वर्णानावरून आपण जे पाठ घेतो ते कमी अर्थपूर्ण असतील का?

त्यात ज्या कथा सांगितल्या गेल्या त्या काळाचा पुराणे उल्लेख करतात. टीकाकारांच्या मते हे कालखंडच नव्हे तर पुराणातील परंपरागत तारखाही चुकीच्याच आहेत.

शास्त्रानुसार व्यासांनी ५००० वर्षांपूर्वी, कलियुगाच्याप्रारंभी पुराणे रचली. पण ती त्यांच्यापूर्वीही अस्तित्वात असली पाहिजेत. छांदोग्य उपनिषदात नारद स्वतः शिकलेल्या विषयाबद्दल बोलतात आणि त्यात पुराणांचा समावेश आहे. त्यावरून आपण अनुमान करू शकतो की ती वेद आणि उपनिषदांच्या काळातही अस्तित्वात असली पाहिजेत. नंतरच्या काळातील लोकांची क्षमता कमी झाल्याने त्यांच्या लाभासाठी व्यासांनी वेदांचे अनेक

शाखांमध्ये विभाजन केले, त्यांनी त्याच उद्देशाने सर्व तपशील असलेली पुराणे रचली.

पाश्चात्यविद्याशिक्षित लोकांना असे वाटते की पुराणे फार प्राचीन नाहीत. नसू द्या. भक्त कंदस्वामी (स्कंदस्वामी, हा सुब्रह्मण्य)च्या मंदिरात गर्दी करतात. त्यांना तेथे देवतेची उपस्थिती जाणवते. जर त्यांना वाटत असेल की या पवित्र स्थानी पूजा करून त्यांच्या संकटांचा शेवट होतो, तर मंदिरांकडून अन्य काय अपेक्षा करायची? मंदिराच्या उगमाचा शोध घेण्यात काही हेतू आहे, की अरुणागिरिनाथरच्या काळात ते अस्तित्वात होते का आणि त्याने त्यात त्याचे तिरुप्पुगझ गायलेले होते का; पुराणांचे असे संशोधन करणे तसे निष्फळच आहे. जर आपण मनात असा हेतू लक्षात ठेवला की त्यांचा हेतू आपले मन स्वच्छ करणे आहे तर त्यांच्याबाबतच्या शंकांना वाव राहणार नाही.

(इतिहाससंबधी) संशोधनांचे निष्कर्ष हे परमसत्य मानणे या विश्वासापेक्षा अधिक मोठी अंधश्रद्धा नाही. आजकालचे बरेच संशोधन पोकळ आणि दोषपूर्ण आहे. जरी आधुनिक संशोधकांचा दृष्टिकोन, पुराणे काल्पनिक आहेत असा असला तरी ती ज्यासाठी आहेत तो हेतू दाखविण्याचे काम होते : जो चांगले काम करतो त्याची भरभराट होते, जो वाईट करतो त्याला त्रास होतो - किंवा दयाळू ईश्वर त्याला वर उचलतो.

जे लोक स्वतःचा दृष्टिकोन आधुनिक असल्याचे मानतात तेच नव्हे तर जे शास्त्रात प्रवीण आहेत अशांनीसुद्धा पुराणांना दुय्यम महत्त्व दिले आहे. तसेच पुराणिकांना (जे पुराणांचा संपूर्ण अभ्यास करतात आणि त्यावर व्याख्यान देतात), जे इतर अध्ययनाच्या विषयांवर बोलतात त्यांच्यापेक्षा गौण लेखले जाते. तरी यज्ञस्वामी शास्त्री आणि काबे रामचंद्राचार यांसारख्या पंडितांनी, ज्यांनी 'महामहोपाध्याय' ही पदवी मिळविली, पुराणांवर प्रवचने दिली. हल्ली श्रीवत्स सोमदेव शर्मा हे सर्व पुराणे संक्षिप्त स्वरूपात तमीळमध्ये छापण्यास स्वतःला वाहून घेत आहेत. (सोमदेवशर्मांना १९७३ मध्ये देवाज्ञा झाली.)

-----

प्रकरण - ५

# व्यासांची आपणास अनमोल देणगी

लोकांना अध्ययनास सुलभ व्हावे म्हणून व्यासांनी वेदांचे विभाजन केले. त्याच हेतूने मानवाला मदत करण्यासाठी त्यांनी 'अष्टादश पुराणे' (अठरा पुराणे) रचली.

मी व्यासांना पहिला पत्रकार मानतो, आजकालच्या सर्व पत्रकारांसाठी आदर्श. त्यांनी पुराणे रचली आणि मानवाला मोठ्या खजिन्याची देणगी दिली. त्यांचा (पुराणांचा) आपल्याला कसा उपयोग झाला? ती पुराणे कथा, इतिहास, भूगोल, तत्त्वज्ञान, धर्म, कला यांनी वेढलेली आहेत. व्यासांच्या निवेदनात बुद्धिमंतांनाच नव्हे तर सामान्य लोकांना, अगदी निरक्षरांनाही गोडी वाटते. सामान्य लोकांची आवड टिकवून ठेवणे हा पत्रकारांचा उद्देश नसतो काय? पण बहुतेकजण लोकांची आवड उद्दीपित करून किंवा त्यांच्या वाईट बुद्धीला प्रोत्साहन देऊन थांबतात. पण व्यासांचे उच्च ध्येय होते : वाचक (किंवा श्रोता) तल्लीन होत धर्म आणि परमात्मा या हेतूप्रत पोहोचेल अशी पुराणे त्यांनी रचली. कसे का होईना लोकांना रुचेल याच प्रमुख हेतूने वृत्तपत्रे धर्माच्या आदर्शांविरुद्ध असलेले विषय किंवा दृष्टिकोन यांचा प्रसार करणे संभवनीय असते. जर पत्रकारांनी व्यासांना त्यांचे पूर्वदूत आणि आदर्श मानले तर त्यांचे लेखन उच्च गुण धारण करेल आणि जगाच्या भल्यात योगदान देईल.

व्यासांनी ४००,००० 'ग्रंथां'मध्ये पुराणे रचली. ग्रंथ म्हणजे ३२ मात्रा असलेले कडवे. त्यापैकी स्कंद पुराणात १००,००० आहेत. हे कदाचित जगातील सर्वात मोठे साहित्यिक कार्य असावे. उरलेल्या १७ पुराणांमध्ये ३००,००० ग्रंथ आहेत. त्याशिवाय व्यासांनी सुमारे १००,००० ग्रंथांचे महाभारत रचले.

प्रत्येक पुराण हे एका देवतेला वाहिलेले/समर्पित असते. शैव, वैष्णव आणि शाक्त पुराणे आहेत. अठरा पुराणे अशी : ब्रह्मापुराण (ब्राह्म), पद्मपुराण (पाद्म), नारदपुराण (नारदीय), मार्कंडेयपुराण, विष्णुपुराण(वैष्णव), शिव पुराण(शैव), भागवत पुराण, अग्नी पुराण (आग्नेय), भविष्य पुराण, ब्रह्म-विवर्त पुराण, लिंग पुराण, वराह पुराण (वाराह), स्कंद महापुराण, वामन पुराण, कूर्म पुराण (कौर्म), मत्स्य पुराण (मात्स्य), गरुड पुराण (गारुड) आणि ब्रह्मांड पुराण.

आपल्या आचार्यांनी विष्णु-सहस्रनामावर आपल्या भाष्यात विष्णुपुराणातील अनेक उतारे दिलेले आहेत. व्यासांचे पिता पराशर यांनी रचलेले हे पुराण रामानुजांच्या विशिष्टाद्वैताचे उगमस्थान आहे.

विशिष्टाद्वैताच्या प्रवक्त्यांमध्ये एक आळवंदार होते. रामानुजांना या आळवंदारांना

भेटायचे होते. पण जेव्हा रामानुजन त्यांच्या घरी गेले तेव्हा ते मृतावस्थेत होते. त्यांना रामानुजांवर तीन महत्त्वाची कामे सोपवायची होती. जेव्हा ते मरण पावले तेव्हा त्यांच्या उजव्या हाताची तीन बोटे वाकडी झालेली दिसत होती. रामानुजांना त्या घटनेचा अर्थ समजला की त्यांना तीन कामे करायची होती. जेव्हा त्यांनी त्या कामांचा उच्चार केला तेव्हा त्यांची बोटे सरळ झाली. ब्रह्मसूत्रावर विशिष्टाद्वैताच्या दृष्टिकोनातून भाष्य लिहिणे हे पहिले काम होते. तिरुवायमेझिवर भाष्य करणे हे दुसरे काम होते आणि तिसरे काम पराशर आणि व्यासांच्या आठवणी चिरस्थायी करणे होते. विष्णु पुराणाचे कर्ते म्हणून पराशरांनी उच्च स्थान प्राप्त केले आहे; हे मनात ठेवून रामानुजार्यांनी त्यांच्या प्रमुख शिष्याच्या दोन मुलांची नावे कूरट्टाझ्वार, पराशरभट्ट अशी ठेवली. त्यातील पहिला हा वैष्णव पंथाचा महत्त्वाचा अध्यापक झाला.

जरी पराशर विष्णु पुराणाचे मूळ कर्ते असले तरी व्यासांनी ते सध्याच्या रूपात लिहिले. ज्या ऋषींनी वेदांचे विभाजन केले त्यांनी आता पुराणे लिहिली, त्याचा हेतू असा की वेदांशी निगडित सत्ये सामान्य लोकांच्या मनावर खोलवर परिणाम करतील. आणखी एक कारण होते, सर्व लोकांना वेदांचे अध्ययन करण्याचा अधिकार नसतो. अशा लोकांना आपल्या पवित्र ग्रंथातील ज्ञान देण्यासाठी (वेदांना अशी मोकळीक नसल्याने) व्यासांनी पुराणे रचली असे मानले जाते.

व्यासांचे पिता हे विष्णु पुराणाचे कर्ता आहेत तर त्यांचा पुत्र शुकदेव याने भागवतातील परीक्षित राजाला उपदेश केला. भागवताबाबत मतभेद आहेत की तो शब्द म्हणजे भागवत विष्णु 'भागवत' की देवी भागवताचा संदर्भ देतो. पहिले हे विष्णुला, विशेषतः कृष्णाला वाहिलेले आहे, नंतरचे अंबेच्या लीलांचे वर्णन करते. आपल्याला दोन्हींची आवश्यकता आहे आणि दोन्ही महान कृती आहेत. चैतन्य (१३वे शतक), निंबार्क (१३वे शतक) आणि वल्लभाचार्य (१४७९ ते १५३१) यांनी प्रसार केलेल्या संप्रदायांमध्ये विष्णु भागवताला वेदांपेक्षा कमी महत्त्वाचे स्थान नाही. (चैतन्यः कृपया भाग १३ प्रकरण ८ पहा. निंबार्क आणि वल्लभाचार्य हे तेलुगू ब्राह्मण होते. निंबार्क मथुरेत राहिले, वल्लभाचार्यांचा जन्म वाराणसीचा.) त्याचवेळेस त्यांच्या विरोधी असलेले अद्वैतवादीसुद्धा भागवताला आदरपूर्वक मान देतात.

जरी शिवपुराण स्वतंत्र असले तरी तीन चतुर्थांश स्कंद पुराण शिवाला वाहिलेले आहे. त्यात स्कंद किंवा (तमीळ लोक स्कंद किंवा सुब्रह्मण्य याला मुरुग किंवा कंद म्हणतात.) मुरुगाच्या कथेचा समावेश आहे. कांचीपुरमचे कच्चियप्प शिवाचरियार याने तमीळमध्ये (नावच स्पष्ट करते) कंद पुराणम् लिहिले आहे : ते मुख्यतः सुब्रह्मण्य किंवा स्कंदाला वाहिलेले आहे. दुर्गा-सप्तशती हा मार्कंडेय पुराणाचा भाग आहे. चण्डी-होम हा या स्तोत्रातील ७०० कडव्यांचे पठण करीत देवी चण्डीला आहुती दिली जाते : प्रत्येक कडव्याला मंत्र मानले जाते.

भविष्य म्हणजे भविष्यकाळ. भविष्य पुराणात कलियुगातील दुष्कृत्यांचा अंतर्भाव असलेल्या अनेक बाबींचा समावेश आहे. मौर्य आणि इतर राज्यकर्त्यांच्या कथेशिवाय पुराणांमध्ये गोऱ्या माणसाच्या आगमनाचा संदर्भ आहे. ती पुराणे कलियुगाच्या प्रारंभी व्यासांकडून लिहिली गेली नसावीत असे मानून टीकाकार या अशा तपशिलांवर विश्वास ठेवत नाहीत. ''कोणीतरी ती अलीकडेच लिहिली असावीत.'' असा वाद ते करतात, ''आणि त्यांना व्यासाचे नाव दिले असावे.'' पुराणांमध्ये इथे तिथे प्रक्षिप्त भाग आहे असे मान्य करू या, पण सर्व पुराणे अलीकडेच लिहिली गेली आहेत असे मानणे योग्य नाही. योगशक्ती प्राप्त झालेली माणसे भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ पाहू शकतात. एका ठिकाणी बसून ते जगभर चाललेल्या घटना पाहू शकतात. पुराणांसारख्या साहित्यकृती रचणे आणि प्राचीन कालखंडातील थोर माणसांना त्यांचे कर्तृत्व देणे लोकांना सहजसाध्य नाही.

गरुड पुराणात पितरांचे जग आणि त्यासंबंधित बाबींचे वर्णन आहे. श्राद्धविधी करताना ते म्हणण्याची रूढ पद्धत आहे.

''ललितोपाख्यान'' ही ललितांबिकेची कथा ब्रह्मांड पुराणात तसेच ''ललिता-सहस्रनामात'' (ललितेची एक हजार नावे) येते. अठरा पुराणांच्या वाचनानंतर या पुराणाने समारोप करायचा असतो; त्यात राजराजेश्वरीच्या राज्याभिषेकाचे वर्णन आहे. देवीच्या भक्तांना या वस्तुस्थितीचा विशेष अभिमान वाटतो.

पुराणांमध्ये, विविध देवतांचा १०८ किंवा १००० नावांचा समावेश असलेल्या स्तोत्रांचा समावेश असतो. पण विष्णु सहस्रनाम (विष्णुची एक हजार नावे) आणि शिव सहस्रनाम (शिवाची एक हजार नावे) हे महाभारताचा भाग आहेत. ''प्रदोष-स्तोत्र'' हे स्कंद पुराणात आहे.

-----

## प्रकरण - ६

# उप-पुराणे आणि इतर पुराणे

अठरा मुख्य पुराणांशिवाय तितकीच उप-पुराणे आहेत. त्यात विनायक पुराण आणि कल्कि पुराण आहेत. तसेच अनेक गौण पुराणे आहेत. तुला पुराण, माघ पुराण आणि वैशाख पुराण यांच्यासारखी निरनिराळ्या महिन्यांचे वैभव सांगणारी पुराणे ही १८ पुराणे किंवा उप-पुराणे यांचा भाग आहेत. स्थल पुराणे म्हटली जाणारी पुराणेही असतात. त्यांच्यापैकी काही पुराणांचे भाग आहेत तर काही स्वतंत्रपणे अस्तित्वात आहेत. कावेरी आणि गंगेची महती सांगणारी पुराणे स्वतंत्रपणे तशीच पुराणे आणि उप-पुराणे म्हणूनही अस्तित्वात आहेत. उदाहरणार्थ, तुला पुराणात कावेरीचे महत्त्व हा विषय आहे. त्यात तुला महिन्यात (ऑक्टोबर-नोव्हेंबर) कावेरीत स्नान करणे किती शुभ आहे याचा उल्लेख आहे.

देवतांची जशी पुराणे आहेत तशी भक्तांची आहेत. तमीळ पेरियपुराणम् हे नायन्मार म्हटल्या जाणाऱ्या ६३ शैव संतांची कथा सांगते. तेच संस्कृतमध्ये 'उपमन्यु भक्तविलास' नावाने उपलब्ध आहे. भक्तविलास हे पंढरपूरच्या पांडुरंग या देवतेचे भक्त असलेले संत कवी तुकाराम आणि नामदेव यांच्यासंबंधी आहे.

-----

प्रकरण - ७

# इतिहास आणि पुराणे

शतकानुशतके आपल्या देशातील साक्षर तसेच निरक्षर लोकांना धर्माचा मार्ग दाखविणारे महाभारत आणि रामायण हे दोन डोळे आहेत. या दोन काव्यांचा समावेश पुराणांमध्ये होत नाही आणि त्यांना इतिहासासारखे विशिष्ट असे स्थान आहे.

''पुरा'' म्हणजे ''भूतकाळात.'' भूतकाळात जे काही घडले त्याचे वर्णन जे करते ते ''पुराण'', जरी त्यात भविष्यकाळाचे संकेत असले तरी. जे भूतकाळात रचले गेले ते, असाही त्या शब्दाचा दुसरा अर्थ आहे. काव्य आणि नाटक यांचे वर्चस्व असलेल्या साहित्यात फार उशिरा गद्यात लिहिला जाणारा 'नॉव्हेल' हा प्रकार आला. जेव्हा 'नॉव्हेल' या प्रकाराचा भारतात परिचय झाला तेव्हा त्याला 'नवीनम्' म्हणण्यात आले, हिंदीत त्याला 'उपन्यास' म्हटले जाते.

एखाद्या पुराणात विशिष्ट गुणधर्म असावे लागतात - (लक्षणे). पहिले आहे 'सर्ग' (विश्वाची निर्मिती), दुसरे आहे 'प्रति-सर्ग' (युगानुयुगातून त्याचा कसा विस्तार झाला), तिसरे आहे 'वंश' (ब्रह्माच्या पुत्रांपासून आरंभ झालेली जिवंत प्राण्यांची वंशावळ), चौथे आहे 'मन्वंतर' (१४ मनुच्या युगांशी संबंधित, मानवाचे १००० चतुर्युगातील पूर्वज), आणि पाचवे आहे 'वंशानुचरित' (सूर्यवंश आणि चंद्रवंशासह राष्ट्रातील राज्यकर्त्यांची वंशावळ). शिवाय त्यात पृथ्वीची, स्वर्गाची आणि अन्य जगांची वर्णने असतात.

''इतिहास''= ''इति-हा-असं'' (ते असे घडले). मधला 'ह' म्हणजे 'शंकेविना', 'खरेच'. म्हणून इतिहास म्हणजे एक खरी कथा, आणि त्याकाळातील तपशीलवार वर्णन. वाल्मीकीने रामाच्या हयातीतच रामायण रचले. महाभारताचा कर्ता, व्यास हे पाच पांडवांच्या काळात हयात होते आणि ते त्यांनी त्यांच्या महाकाव्यात वर्णन केलेल्या घटनेचे साक्षीदार होते.

व्यासांनी पुराण या शब्दाला अनुसरून भूतकाळातील घटना आणि कथा पुराणात सांगितल्या. पण कशा? व्यास जसे भूतकाळात पाहू शकत होते, तसे भविष्यकाळातही पाहू शकत होते. म्हणून त्यांनी जे भूतकाळाबद्दल लिहिले ते वर्णनाचे प्रत्यक्षदर्शी साक्षी होते. तथापि, त्यांच्या समकालीन लोकांना त्यांच्याबाबत माहीत नसावे. महाभारत आणि रामायण हे भिन्न आहेत. जेव्हा हे ग्रंथ जगाला प्रथम माहीत झाले तेव्हा बहुतेक लोक त्यात वर्णन केलेली पात्रे आणि घटना यांच्याशी परिचित होते. अशा प्रकारे त्यांच्या अस्सलपणाविषयी शंका घेण्याचे काही कारण नाही. इतिहासमधील 'हा' हे निश्चित करतो.

'इतिहास' या शब्दाचा अर्थही ''असे ते बोलले'' असा होऊ शकतो. (म्हणजे थोर माणसे म्हणतात की ते तसे असलेच पाहिजे.)

''ऐतिह्य'' हा जे वर्णनाचे थेट साक्षी नाहीत : हा श्रद्धेचा भाग म्हणून स्वीकारायला हवे. तो शब्दही 'इति' पासून आलेला आहे. (असे थोर माणसे बोलली). आपण जे प्रत्यक्ष निरीक्षण करतो ते 'हे'; जे इतरांनी सांगितले आहे ते 'असे'.

-----

प्रकरण ८

# महाकाव्ये आणि त्यांची थोरवी

जर पुराणांचे वर्णन वेदांचे उपांग म्हणून केले असले तर इतिहास (महाकाव्ये) वेदांच्या पातळीवर जागा असलेले असा विचार केला जातो. महाभारताला खरोखरच पाचवा वेद म्हटले जाते (पंचमो वेदः). रामायणाबाबत असे म्हटले जाते : वेदांनी ज्याची स्तुती केली अशा परमात्म्याने दशरथाचा मुलगा म्हणून जन्म घेतला, वेदांनी स्वतः वाल्मीकीचे मूल म्हणून जन्म घेतला. (रामायणाच्या रूपात)

वेदवेद्ये परे पुंसि जाते दशरथात्मजे
वेदः प्राचेतसादासित् साक्षाद्रामायणात्मना

(प्रचेतसाचा पुत्र म्हणून वाल्मीकीला प्राचेतस म्हटले जाते.)

रामायण आणि महाभारताच्या कथा आपल्या लोकांच्या रक्तातच भिनलेल्या आहेत. आजकाल ही महाकाव्ये फारसे लोक वाचत नाहीत, पण चाळीस किंवा पन्नास वर्षांपूर्वीचे परमगुरूंचे निरीक्षण आहे. आपले लोक जगात इतरत्र त्यांच्या सत्यवचनासाठी आणि नैतिक चारित्र्याबद्दल माहीत होते, याचे महत्त्वाचे कारण म्हणजे त्यांच्यात रामायण आणि महाभारत भिनलेले होते. पूर्वीच्या काळी तमीळ राजे मंदिरांमध्ये वर्षभर महाभारतावर प्रवचने देण्यासाठी विद्वान माणसांना जमिनीच्या देणग्या देत असत. तीस किंवा चाळीस वर्षांपर्यंत उडुक्कुच्या साथीने गीताद्वारे महाभारतातील कथा सांगणाऱ्या पूशारिचे श्रवण करण्यासाठी शेकडोंच्या संख्येने लोक जमत असत. सामान्य लोकांसाठी पूशारिंचे सादरीकरण म्हणजे दोन्ही 'चित्रपट' आणि 'नाटक' असे. चित्रपटांचे आणि नाटकांचे - त्यांचे असे वाईट परिणाम असतात पण तसे पूशारिंच्या कलेचे नव्हते. महाभारतातील कथा सतत ऐकून लोक निष्पाप, सत्यवादी आणि नैतिकता अशा गुणांना मान देणारे असे राहिले. तमीळ देशात महाभारत सादर होते ही प्रशंसेची गोष्ट असल्याचे, ग्रामदेवतेच्या मंदिराला ''द्रौपदै अम्मन् कोयिल'' म्हणजे देवीचे मंदिर म्हटले गेले यावरून समजते.

अधिक मोठ्या पुराणांमध्ये अनेक स्वतंत्र कथा असतात; प्रत्येक कथा विशिष्ट धर्मावर प्रकाश टाकते. इतिहास किंवा महाकाव्य यात आरंभापासून अंतापर्यंत एक कथा असते. मध्ये उपकथानके असतात. पण ती मुख्य कथा किंवा विषय याभोवती फिरतात. वर उल्लेखिल्याप्रमाणे पुराणात प्रत्येक कथा एका विशिष्ट धर्माबद्दल सांगते, मात्र इतिहास मुख्य किंवा मध्यवर्ती कथा सर्व धर्मांची स्पष्टीकरण करणारी उदाहरणे देण्याचा प्रयत्न करतो. उदाहरणार्थ, ''हरिश्चंद्र उपाख्यान'' केवळ सत्यधर्माचे उदाहरण देते; श्रावणाची कथा पुत्रप्रेम सांगते; नलायनीची कथा तिच्या शुद्धतेबद्दल आणि पतीबद्दलची तडजोड न करणारी निष्ठा

सांगते; रतिदेवाची कथा आत्मबलिदान आणि पूर्ण दयावृत्ती सांगते. पण राम आणि पांडवांच्या जीवनावर आधारित अनुक्रमे रामायण आणि महाभारत यात सर्व धर्मांची विवेचने त्यात रंगवलेल्या पात्रांच्या उदाहरणांद्वारे आहेत.

-----

प्रकरण - ९

# देवांमध्ये भेद का?

एकंदरीत प्रत्येक पुराण हे एका विशिष्ट देवतेला समर्पित असते. शिव पुराणात असे म्हटलेले आहे : "शिव हा परमात्मा आहे. तोच निर्मिती, पोषण आणि लयाचा सर्वोच्च अधिकारी आहे. त्याच्या आज्ञेत आणि त्याच्या अधिकाराखाली विष्णू संरक्षक म्हणून काम करतो. विष्णू हा केवळ भोगी आहे, मायेत सापडलेला आहे. शिव हा एक योगी आणि मूर्तिमंत ज्ञान आहे. विष्णूने शिवाला मान दिलाच पाहिजे आणि त्याचे पूजन केले पाहिजे. एकदा जेव्हा त्याने शिवाला विरोध केला तेव्हा त्याची शिवाकडून मानखंडना झाली." अशा प्रकारच्या विधानांची उदाहरणे देण्यासाठी कथा असतात.

वैष्णव पुराणात याउलट दिसते. त्यात विष्णू हा शिवापेक्षा श्रेष्ठ आहे या दृष्टिकोनाच्या समर्थनार्थ कथांचा समावेश असतो. "जो स्मशानभूमीत आत्मे आणि कुरूप भूतांबरोबर राहतो असा शिव देव आहे का?" असेही पुराणे विचारतात.

प्रत्येक पुराणात इतरांपेक्षा एका विशिष्ट देवतेचे अधिक स्तवन केलेले असते. तो सुब्रह्मण्यम्, गणपती किंवा सूर्य असो. प्रत्येक देवतेला परमात्मा म्हटलेले असते आणि इतर त्याचे पूजन करतात असे म्हटलेले असते. गर्वामुळे जर त्यांनी पूजन करणे नाकारले तर त्यांना नमविले जाते.

अशा परस्परविरोधी वर्णनांच्याबाबत आपल्या मनात शंका येतात. यांपैकी कोणती कथा खरी आहे? आपल्याला विचारावेसे वाटते, "आणि खोटी पुराणे कोणती?" ती सर्वच खरी असू शकणार नाहीत. जर शिव विष्णूचे पूजन करतो तर त्याने शिवाची भक्ती केली पाहिजे हे कसे योग्य होईल? जर अंबा ही त्रिमूर्तीपेक्षा (ब्रह्मा, विष्णू आणि महेश्वर) श्रेष्ठ आहे तर परमेश्वराची श्रद्धाळू पत्नी म्हणून ती परमेश्वराचे वर्चस्व मानणारी विनयशील आहे हे असे म्हणणे कसे योग्य होईल? पुराणे सर्वच काही खरी असू शकणार नाहीत, किंवा ती सर्व खोटीच आहेत का?

तर्कशुद्ध विचार हे सार दर्शवितो की सर्व पुराणकथा खऱ्या असू शकणार नाहीत. पण खरे पाहता त्या तर्कशुद्ध आहेत. जी एक देवता दुसऱ्या देवतेकडून पराभूत होते, ती दुसऱ्या प्रसंगी विजयी होते. आणि जो देव दुसऱ्या देवतेचे पूजन करतो तो इतरवेळी स्वतःच पूजनीय होतो. हे असे कसे आणि का?

परमात्मा एक आणि एकच आहे. तोच निर्माण करतो, पोषण करतो आणि नाश करतो. तोच अनेक देवता स्वतःतून निर्माण करतो. तो असे का करतो? तो लोकांना त्याच

साच्यातून काढत नाही. जगाचा व्यवहार मजेशीर बनविण्यासाठी निरनिराळ्या दृष्टिकोनांसह विविधता देऊन त्याने लोकांना वेगवेगळे बनविले. परमात्मा स्वतःच विविध प्रकारच्या स्वभावाच्या लोकांना साजेशी रूपे धारण करतो की त्यायोगे प्रत्येकजण आपल्याला आवडेल त्या रूपात आराधना करून सौख्य प्राप्त करून घेऊ शकेल. याच कारणास्तव तो एक आणि एकच असलेला परमात्मा स्वतःला अनेक भिन्न देवता म्हणून प्रकट करतो.

एखाद्याचा त्याने निवडलेल्या देवतेवर ठाम विश्वास आणि भक्ती हवी. त्याची देवता म्हणजेच परमात्मा आणि त्यापेक्षा अधिक श्रेष्ठ शक्ती नाही असा विश्वास ठेवायला शिकले पाहिजे. याच कारणांमुळे प्रत्येक प्रकटीकरण किंवा परमेश्वराचे रूप, इतर रूपे किंवा प्रकटीकरणापेक्षा अधिक उच्च म्हणून व्यक्त होते. अशा रीतीने इतर रूपे या देवतेचे पूजन करताना दाखविले जाते किंवा याच्याकडून त्यांचा पराभव झाल्याचे दाखविले जाते. एकंदरीत, याचा अर्थ असा की प्रत्येक देवता इतर देवतांचे पूजन करते आणि तिचे त्यांच्याकडून पूजन केले जाते. तसेच प्रत्येक देव इतरांकडून पराभूत होतो आणि तसेच तोही इतरांचा पराभव करतो.

शिव पुराणात शिवाचे श्रेष्ठत्व सांगणारे सर्व दृष्टिकोन एकत्र आणलेले आहेत. तसेच विष्णूसंबंधी असलेल्या वैष्णव पुराणात आहे. अंबा, सुब्रह्मण्यम् आणि इतर देवतांच्या पुराणांमध्ये तो किंवा ती सर्व देवतांमध्ये श्रेष्ठ दाखविलेली असते.

विशिष्ट देवतेची खूप स्तुती करणे म्हणजे दुसऱ्या देवतेला कमी लेखणे नव्हे. त्यातील सुप्त कल्पना अशी आहे की निवडलेल्या देवतेचे पूजन करणाऱ्याच्या ठायी त्या देवतेविषयी ठाम श्रद्धा असते आणि तो पूर्णपणे समर्पित होतो. अशा विशेष भक्तीला 'अनन्यभक्ती' म्हणतात. तरी त्यात इतर देवतांना स्वतः निवडलेल्या देवतेपेक्षा गौण लेखायचे नाही अशी कल्पना आहे - जी 'नहि निंदा न्याय' चे उदाहरण आहे.

जे सर्व देवतांकडे एक आणि एकमेव परमात्म्याची रूपे म्हणून पाहण्यास समर्थ असतात, त्यांना कोण्या एका देवतेची विशेष भक्ती ठेवण्याचे कारण नाही. जेव्हा आपण विचार करतो की एक देवता दुसऱ्यापासून भिन्न किंवा परकी आहे तेव्हा दुसऱ्या देवतेला पहिल्यासाठी सोडून देण्याचा प्रश्न उद्‌भवतो. जर आपण समजून घेतले की अंतिम सत्याची ही भिन्नभिन्न रूपे आहेत तर आपल्याला समजेल की पुराणांमध्ये त्यांच्यातील भेदांसह साकारलेल्या देवता, या दुसरे तिसरे काही नसून त्या परमात्म्याच्या क्रीडा किंवा लीला आहेत. तो एकच अनेक वस्तूंमध्ये विभागलेला दिसतो. हे सर्व निरनिराळ्या दृष्टिकोनांच्या आणि स्वभावांच्या माणसांसाठी असते. जर हे सत्य जाणले गेले तर आपण पुराणातील कथा - परस्परविरोधी वाटणाऱ्या - सत्याच्या प्रकाशात पाहण्यास समर्थ होऊ.

बाणासुराच्या कथेत आपल्याला कृष्णाकडून शिवाचा पराभव झालेला दिसतो. पण

तिरूवन्नामलैच्या कथेत शिवाचे चरण शोधण्यात विष्णूला अपयश येते. दोन्ही कथा सत्य मानल्या पाहिजेत. पहिल्या कथेत कृष्णाच्या भक्तांनी त्यांचा परमात्मा म्हणून पूजन करावे आणि दुसऱ्या कथेत शिवाच्या भक्तांनी तशाच प्रकारे शिवाला पूज्य मानावे. जरी आपल्याला वाटले की एक विजेता आहे आणि दुसरा पराभूत आहे किंवा एक दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ आहे किंवा गौण आहे तरी त्या दोघांना ते एकच आहेत याचे ज्ञान असते. एकाचा स्वतःवर विजय होतो का - किंवा स्वतःचा पराभव करतो का? म्हणून ही सर्व लीला आहे. परमात्मा विविध रूपे धारण करण्याच्या क्रीडेमध्ये आनंद घेतो.

लोकांना योग्य मार्ग दाखविण्याचा पुराणांचा हेतू असतो. पातिव्रत्य हा गुण अतिशय महत्त्वाचा आहे. अंबेने त्याचे उदाहरण घालून दिले आहे. पराशक्ती, परमशक्ती असलेली ती तिच्या पतीला मान देणारीच राहते. जगात विश्वास आणि श्रद्धा यांची वाढ झाली पाहिजे आणि त्यासाठी देवानेच मार्ग दाखविला पाहिजे. म्हणून काही मंदिरांमध्ये विष्णू शिवाचा भक्त, पूजक दाखविला आहे आणि इतर पवित्र स्थानी शिव हा विष्णूचा भक्त म्हणून दिसून येतो. तसेच इतर देवतांविषयी आहे. मी शिव आणि विष्णूविषयी जास्त बोललो. कारण शैवपंथ आणि वैष्णवपंथ हे दोन मोठे विभाग आहेत.

सारांश, पुराणात जर एखाद्या देवतेचा गौरव केला असला आणि त्याला पुष्टी देणाऱ्या कथा सांगितल्या गेल्या असल्या तरी त्या परमात्म्याबद्दल भक्ती निर्माण करण्यासाठी असतात. आणि जरी एखाद्या देवाला दुसऱ्यापेक्षा गौण रंगविले गेले असले तरी त्याचा खरा हेतू त्याची अपकीर्ती करणे नसून त्या दुसऱ्याबाबत ठाम श्रद्धा वाढविणे हाच असतो.

-----

## प्रकरण - १०

## .... एकच अनेकांसारखा

पूर्वीच ठामपणे सांगितल्याप्रमाणे एक आणि एकच परमात्मा अनेक भिन्न देवतांमध्ये व्यक्त झाला आहे. एखाद्या व्यक्तीला एखादी देवता आवडते तर दुसरा दुसरीच देवता निवडतो. एखाद्याला ज्या देवाचे पूजन करायला आवडते, त्याच्या त्या रूपाशी त्याला ठाम भक्त करण्यासाठी, परमात्मा काही प्रसंगी त्याच्या इतर रूपांतून नाहीसा होतो.

तिरुकंडियूर हे तमिळनाडूमधील तंजावूर जिल्ह्यात आहे. येथील मंदिरामध्ये शिव विष्णूपेक्षा गौण दाखविला आहे. एकदा त्याने ब्रह्मदेवाचे एक मस्तक तोडले, तो शापाचा बळी ठरला आणि त्यातून विष्णुच्या कृपेमुळे मुक्त झाला. त्याच जिल्ह्यात तिरुवीझिमलै आहे; तेथे विष्णू हा शिवापेक्षा गौण दिसून येतो. शिव-सहस्रनामात (शिवाची एक हजार नावे) विष्णू शिवाच्या पायाशी कमळपुष्पे वाहतो. जेव्हा पूजा संपण्याच्या बेतात असते तेव्हा त्याला एक कमळपुष्प कमी असल्याचे लक्षात येते. आता त्याने काय करावे? कमलनयन असलेला विष्णू स्वतःच्या डोळ्यांपैकी एक काढून तो शिवाच्या चरणाशी वाहतो. शिव त्याच्यावर संतुष्ट होतो आणि त्याला चक्र देतो. येथे शिवाला ''नेत्रार्पणेश्वर'' (ज्याला नेत्र अर्पण केला गेला असा शिव) म्हटले जाते. तिरुकंडियूर येथे विष्णू हा ''हर-शाप-विमोचन'' (ज्याने शिवाला शापमुक्त केले असा) असतो. जेव्हा आपण तिरुकंडियूरची कथा ऐकतो तेव्हा विष्णू हा दयावान देव आहे, जो त्याच्या भक्तांना भयंकर शापातून मुक्त करतो. त्याचप्रमाणे तिरुवीझिमलै कथेमधून आपल्याला कळते की भक्ताला कोणताही त्याग फार मोठा नसतो - विष्णू ज्या देवाची उपासना करतो, त्याला म्हणजे शिवाला स्वतःचा एक डोळा अर्पण करतो. येथे विष्णू की शिव यांच्यात अधिक मोठा कोण हा प्रश्न नाही.

पूर्वीच्या काळी आपल्याकडे घरात कंदील असत. चार किंवा तीन बाजूंना काच असलेले कंदील असत. आपण दुसऱ्या प्रकारचा कंदील घेऊ. काचेच्या आतील बाजूस वात पेटविली जाते. काच असलेल्या तीन बाजू तीन भिन्न रंगांनी रंगविलेल्या आहेत. (किंवा दोन बाजू रंगविल्या आहेत.) आत जळणारा दिवा प्रत्येक बाजूने वेगवेगळ्या रंगाचा दिसेल. या तीन बाजू आपण निर्मिती, संरक्षण आणि लय ही तीन परमात्म्याकडून केली गेलेली कार्ये यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या मानू शकतो. तीन बाजू असलेल्या दिव्याच्या वातीप्रमाणे एकच प्रकाश तिघांना जबाबदार असतो. असे समजू की दिव्याची एक बाजू लाल रंगविली आहे. तो रंग निर्मितीचा प्रतीक आहे. प्रकाशाच्या वर्णपट्टीतून लाल रंग काढला तर इतर सहा रंगही वेगळे होतील. एकाचे अनेक होणे याचा अर्थ हा आहे. ब्रह्म, निर्माता हा लाल रंगाचा असल्याचे म्हटले जाते. दिव्याची दुसरी बाजू निळ्या रंगाने रंगविली. वर्णपटाचा पहिला आणि शेवटचा रंग जांभळा आणि लाल असे आहेत. आरंभ लाल (किंवा infrared) आणि शेवट जांभळा (किंवा

ultraviolet) आहे. सर्व निर्मितीचे जतन करण्याच्या काळात महाविष्णू ज्ञानाद्वारे दाखवून देतो की हे जग स्वयंपूर्ण सत्य नाही पण परमात्म्याचे वेषांतर आहे; त्याची लीला आहे. ज्ञानाग्नीमध्ये विश्व जळून खाक होते. या स्थितीत एखादी वस्तू पूर्णपणे विखंडित न होता, तिचा आकार तोच राहतो पण रंग बदलतो. हे एखाद्या कोळश्याप्रमाणे असते. जग हे अशा वस्तूसारखे आहे, पण तिचा गुण, माया जळून जाते आणि ते विष्णूने व्यापले जाते - ''सर्वं विष्णुमयं जगत्''. तमीळमध्ये विष्णूला ''करियान, नीलमेनियान'' (जो कोळश्याप्रमाणे आहे, ज्याचे शरीर निळे आहे.) निळा, काळा आणि जांभळा हे जवळपास सारखे रंग आहेत. दिव्याच्या निळ्या बाजूकडून येणारा प्रकाश हा विष्णू असतो.

दिव्याची तिसरी बाजू रंगविलेली नसते. आपण पाहिले की जेव्हा ज्ञानात सर्व जळून जाते तेव्हा शेष हे कोळशाचे ढेकूळ असते. पण तो कोळसा जर पुढे जाळला तर अंतिम निर्मिती ही राख असते. तिला आकार नसतो आणि ती फक्त चूर्ण किंवा धूळ असते. आता तिचा रंगही काळ्याचा पांढरा होतो. पांढरा हा शुद्ध प्रकाशाच्या जवळचा असतो. सर्व रंग त्या प्रकाशातून आलेले असतात, म्हणजे परमात्म्यापासून उद्भवलेली सर्व वैश्विक कार्ये आणि कर्मे लुप्त होतात, जळून जातात. आता केवळ परमात्म्याचे अस्तित्व राहते. म्हणजे प्रत्येक गोष्ट जळून गेल्यावर ती राख शिल्लक राहते - तेच शेवटी राहते. ज्याला महाभस्म, संहार, नाश असेही म्हटले जाते. त्याचे हे कर्म क्रूर दिसून येईल. जरी क्रूर वाटत असले तरी शिव जे काही करतो ती दयापूर्ण कृती असते. कारण तो आपल्याला सत्याशी जोडण्यासाठी विध्वंसाच्या पलीकडे जातो. जेव्हा विष्णू लीलया आपल्याला ज्ञान देतो तेव्हा हे जग कोळश्याच्या ढेकळाप्रमाणे दिसून येते. ''सर्वं विष्णुमयं जगत्'' असे आपण म्हणतो. पण आता सर्व लीला संपलेली आहे आणि आपण आता श्रेष्ठ ज्ञानाच्या स्थितीत आलेलो आहोत. तेथे 'सर्व' नाही आणि 'जगत्'ही नाही. ते आता सर्व 'शिवमय'. तो एकच दिवा ब्रह्माचा प्रकाश असतो. जेव्हा तो दिव्याच्या लाल रंगाच्या बाजूतून पाहिला जातो तेव्हा तो ब्रह्म होतो; निळ्या बाजूतून तो विष्णु; आणि न रंगविलेल्या बाजूतून शिव होतो.

आपल्या महान माणसांनी तीन रूपांत प्रकट होणाऱ्या त्या 'एकाचे' स्तवन केले आहे. (ओरुवरे मूवुरुवै). ज्यांना एखाद्या तत्त्वज्ञानाचा किंवा विचारप्रणालीचा प्रसार करण्यात रस नव्हता असे महान कवी आपल्या देशात होते - ती माणसे विशाल दृष्टिकोनाची आणि मोकळ्या मनाची होती; त्यांनी त्यांची मते, दृष्टिकोन मुक्तपणे व्यक्त केले. या कवींनी म्हटले की, ती एकच वस्तू त्रिमूर्ती म्हणून (ब्रह्मा, विष्णू आणि महेश्वर) आणि तसेच ३३ कोटी देवतांच्या रूपांत प्रकट होते. बाण म्हणतो की तोच पदार्थ तीन कार्ये करण्यासाठी होतो, ''सर्ग-स्थिती-नाश-हेतवे''. कालिदास स्पष्टपणे म्हणतो, ''एकैव मूर्तिबिभिदे त्रिधा सा'' (परमात्मा एकच आहे; हा एकच स्वतःला तीन कार्यांसाठी तीन ठिकाणी विभागतो.)

एकैव मूर्तिबिभिदे त्रिधा सा सामान्यमेशां प्रथमावरत्वं
विष्णोर्हरस्तस्य हरिः कदाचिद् वेधास्तयोस्तवपि धातुराज्ञौ ............कुमारसंभव ७.४४

शिवपुराण हेच फक्त पुराणांमध्ये ग्राह्य आणि दुसरे म्हणू लागले की विष्णुपुराणावर श्रद्धा ठेवली पाहिजे; असे जर आपण आपले दोन पंथांत विभाजन केले तर आपण स्पष्ट आणि निःपक्षपाती भूमिका न घेता भांडत राहू. ''सत्य एकच आहे. सुज्ञ माणसे त्याचा वेगवेगळ्या नावांनी उल्लेख करतात.'' वेदांच्या निवेदनाशिवाय आपल्याकडे अन्य अधिक मोठी प्रमाणभूत शक्ती नाही. म्हणून आपण सर्वांनी शैव आणि वैष्णव प्रणालींमध्ये भेदभाव न करता सर्वच देवतांच्या कथा ऐकल्या पाहिजेत आणि ऐहिक अस्तित्वापासून मुक्ती मिळविली पाहिजे.

तिरुविशनल्लूर अय्यावाल हे थोर मानव होते. त्यांचे खरे नाव श्रीधर वेंकटेश्वर होते. पण आदरापोटी लोक त्यांना 'तिरुविशनल्लूर अय्यावाल' म्हणत. ते सुमारे ३०० वर्षांपूर्वी होते आणि भगवन्नाम बोधेंद्र यांचे ज्येष्ठ समकालीन होते. बोधेंद्रांनी राम आणि गोविंदाच्या भक्तीचा प्रचार केला, त्यांनी ईश्वराच्या नावांचे गायन करायला शिकविले. त्याच काळात अय्यावाल यांनी शिवाच्या नामांच्या गायनाचा प्रसार केला. दोघांपैकी कोणीही शिव आणि विष्णू यांच्यात भेद मानला नाही. म्हणून त्यांनी संयुक्तरित्या ''नामसिध्दान्त'' तिरुविशनल्लूरमध्ये प्रसारित केला. त्यांना एकमेकांविषयी प्रेम आणि आदर होता आणि कलियुगात देवाच्या नामाचा जप (नाम जप) हाच सर्व कुकर्मांवर सर्वश्रेष्ठ उपाय असल्याचा सिद्धान्त प्रस्थापित केला. भजनाच्या कार्यक्रमात देवतांच्या भजनापूर्वी या दोघांना वंदन (प्रथम बोधेंद्र आणि नंतर अय्यावाल) केले जाते. श्राद्धाच्या वेळेस अय्यावाल यांनी अस्पृश्यांना भोजन दिले. गावाच्या प्रमुखाने निर्णय दिला की त्यांनी प्रायश्चित्त म्हणून गंगेत स्नान करावे. अय्यावाल यांनी त्यांच्या घराच्या मागे असलेल्या विहिरीत ती पवित्र नदी आणली. ही कथा प्रसिद्ध आहे. ही घटना कार्तिगे महिन्यात (नोव्हेंबर-डिसेंबर) प्रतिपदेला घडली. आजही विहिरीत पवित्र गंगेत डुबकी घेण्यासारखे आहे अशा श्रद्धेने भक्त मोठ्या संख्येने या विहिरीच्या पाण्याने स्नान करतात.

अय्यावाल श्रीरामाने शिवाच्या धनुष्याचा कसा भंग केला याचे वर्णन करतात. ''स्वकर प्रतिपादित स्वचापः'' असे ते म्हणतात. म्हणजे रामाने स्वतःचे धनुष्य स्वतःच्याच हाताने तोडले. शिवाच्या धनुष्याला नारायणाकडून तडा गेला आणि नंतर रामाच्या रूपाने आलेल्या नारायणाने ते पूर्णपणे तोडले अशी कथा नेहमी सांगितली जाते. अय्यावाल यांना शिव हा रामापेक्षा गौण दाखविणे आवडत नाही. ते शिव आणि विष्णूमध्ये भेद करीत नाहीत आणि त्यांची श्रद्धा आहे की शिव हा विष्णू आहे आणि विष्णू हा शिव आहे. (म्हणून शिव आणि विष्णू हे एकच आहेत.) त्यांच्या तर्कानुसार शिवाचे धनुष्य हे रामाचे धनुष्य आहे. म्हणून ते म्हणतात रामाने त्याचे स्वतःचे धनुष्य स्वतःच्या हाताने तोडले. या सर्व कृती त्याच्या लीला आहेत असे ते सांगतात.

-----

प्रकरण - ११

# एकच ध्येय - अनेक मार्ग

आझवार विष्णूची आणि नायंमार शिवाची कीर्ती गातात. वेदांमध्ये सर्व देवतांची अशी स्तोत्रे आहेत. उपनिषदे अशा देवतांचा विचार मांडत नाहीत, त्यांचा आत्म्याच्या सत्यतेशी संबंध असतो. तिरुवल्लुवर देवाविषयी आणि तत्त्वज्ञानाच्या बाबींवर विचार मांडतो. त्याचे दृष्टिकोन वैदिक परंपरा डोळ्यापुढे ठेवून आहेत. पण त्याच्या साहित्यात नीतिशास्त्र आणि नैतिक आचार यांच्यावर भर दिलेला आहे. तिरुमूलर ईश्वर, भक्ती इ. बाबत चर्चा करीत नाही. कारण ते प्राणायाम, ध्यान-धारणा आणि समाधी अशांबाबत चर्चा करतात. प्रत्येक महान मनुष्य महान ग्रंथाप्रमाणे विशिष्ट संप्रदाय, विशिष्ट मार्ग सांगतो. 'ह्यांच्यापैकी कोणता अनुसरावा?' असा प्रश्न लोकांच्या मनात उद्भवतो. तुम्ही जो संप्रदाय किंवा मार्ग अनुसराल तो श्रद्धेने अनुसरा. मध्येच सोडू नका. शेवटी तोच तुम्हाला परमात्म्याकडे नेईल. प्रारंभी मार्ग भिन्न दिसतील. पण ते सर्व तुम्हाला एकाच ध्येयाकडे नेतात.

देवर कुरुळुं तिरुनांमरै मुडिवुं
मूवर तमिझुम मुनिमोझियुं - कोवै
तिरुवाचकमुं तिरुमूलर शोल्लुं
ओरुवाचकं एन (रु) उनार

तिरुक्कुरल, चार वेद, तेवारम, अगस्त्य आणि तिरुकोवैयार तिरुवाचकं आणि तिरुमंतिरं हे सर्व एकाच सत्याचे ज्ञान देतात.

हीच कल्पना "शिवमहिम्न स्तोत्रात" व्यक्त झालेली आहे. हे शिवाचे गौरव करणारे पुष्पदंताचे स्तोत्र आहे. तो गंधर्व होता. त्याला ईश्वराच्या शापामुळे पृथ्वीवर राहावे लागले. त्याच्या स्तोत्रातील एक कडवे म्हणतेः "त्रयी (तीन वेद), सांख्य (तात्त्विक जिज्ञासा), योग, पाशुपत पंथ, वैष्णव पंथ - लोक त्यांच्या प्रवृत्तीनुसार त्यांच्यापैकी एक अनुसरतात. महासागरात विलीन होणाऱ्या नद्यांप्रमाणे सर्व मार्गांचे एकाच ठिकाणी, परमात्म्याच्या ठिकाणी त्यांचे मिलन होते.

कॅथालिकवादात इंग्रज माणसे उद्गारतात, "जेहोवा, जोव्ह किंवा ईश्वर!" जेहोवा हा बायबलचे जन्मस्थान असलेल्या इस्रायलच्या प्रांतातील सेमिटिक ईश्वर आहे. जोव्ह हे ज्युपिटरचे दुसरे नाव आहे. लॉर्ड हा शब्द कोणत्या धर्मातील देवाला लागू पडतो, तो सर्व धर्मांमध्ये सामाईक आहे. पश्चिमेकडील ज्ञानी माणसे म्हणतात की तो एकमेव हा एकच आहे. त्याला तुम्हाला आवडेल त्या नावाने हाक मारा. अलेक्झांडर पोपच्या विश्वप्रार्थनेत एक भाग असा आहे - 'प्रत्येक युगातील सर्वांचा पिता सर्व प्रदेशांत संतांकडून, नरपशू आणि साधूंकडून

जेहोवा, जोव्ह किंवा ईश्वर म्हणून पूजिला गेला.'

जर आपण आदराने, नम्रतेने आणि आपल्याला लाभ होईल अशा प्रामाणिक हेतूने पुराणे वाचली तर कोणत्याही प्रकारच्या गोंधळाचे कारण असणार नाही. आपल्या अंतिम कल्याणासाठी ते आहेत असे आपल्याला शहाणपण प्राप्त होईल.

-----

## प्रकरण - १२

# पुराणे कोणी शिकविली?

पुराणांमध्येच उल्लेख आहे की पुराणे शिवाने पार्वतीला किंवा विष्णूला कथन केली. असेही सांगण्यात आले की विष्णूने ती नारदाला किंवा इतर कोणा ऋषीला सांगितली. अशा रीतीने या देवांनी सांगितलेल्या कथा एका ऋषीकडून दुसऱ्याकडे किंवा राजाकडे गेल्या. शेवटी व्यासांकडून त्यांचा एक शिष्य-सुत याला आणि सुताकडून गोमतीच्या किनाऱ्यावर शौनक आणि इतर ऋर्षीचे आश्रम असलेल्या नैमिषारण्यातील ऋर्षीना सांगितल्या गेल्या.

नैमिष्यारण्यातील ऋर्षीकडून दिल्या गेलेल्या उच्चासनामुळे सुताने पुराणे शिकविली. ही मान्यता, असलेल्या पुराणांवरून आपणास कळून येते. शिवाय जन्मापेक्षा ज्ञानाला अधिक मान दिला जात असे. जेव्हा उच्च विषयांच्या अध्यापनाचा भाग येई तेव्हा जातीचा विचार होत नसे हे आपल्या लक्षात येते. जात कोणतीही असो, विद्वान माणसाचे आदराने ऐकले जात असे.

-----

## प्रकरण - १३
## पुराणे मित्रासारखे बोलतात

तीन मार्गांनी एखादे चांगले कृत्य सिद्धीस जाते. एक म्हणजे शासकीय अधिकाऱ्याचा आधार असलेली आज्ञा देऊन, त्याला 'प्रभुसंमित म्हणतात. एखादा श्रीमंत किंवा सामर्थ्यवान मनुष्य त्याच्या नोकराला काही काम करण्याची आज्ञा देतो. त्याला भीतीपोटी त्या आज्ञेचे पालन करणे भाग असते. अधिकाराचे स्थान नसता एखादा मित्र आपल्याला एखादे काम करण्यास सांगतो आणि आपण ते करतो - भीतीपोटी नव्हे तर प्रेमापोटी. जो मित्र आपले मन वळवितो तो 'सुहृद'. सहकारी, सखा म्हणून त्याने दिलेली आज्ञा ''सुहृद-संमित'' असते. जर तुम्ही यापेक्षा अधिक स्वेच्छेने काम करणार असाल तर ते तुमच्या प्रेमळ पत्नीच्या प्रेमळ शब्दांनी. तुमच्या मालकाने सांगितलेले काम तुम्हाला ओझे वाटते; तेच काम मित्राने सांगितले तर अधिक हलके केले जाते. पण जर ते तुमच्या पत्नीने सांगितले तर ते अजून हलके होईल. हे म्हणजे ''कांतासंमित'' होय.

वेदांच्या आज्ञा या 'प्रभुसंमत' आहेत; पुराणाची शिकवण ही 'सुहृद-संमित' आहे आणि कवीचे साहित्य हे 'कांतासंमित' आहे.

यद्वेदात प्रभुसंमिताद्धिगतम् शब्दप्रमाणाच्चिरं<br>
यच्चार्थप्रवणात्-पुराणवचनादिष्टं सुहृदसंमिताद्<br>
कांतासंमितया यया सरसतामापाद्य काव्याश्रिया<br>
कर्तव्ये कुटुकिबुधो विरचितस् तस्यै स्पृहां कुर्महे<br>
प्रतापरुद्रियं - कडवे ८

वेद तुम्हाला 'असे करा' किंवा 'तसे करा' म्हणतात. का ते सांगत नाहीत. त्यांना प्रश्न विचारणे हे त्यांचा अवमान करणे असे मानले जाते. पुराणे तुम्हाला मैत्रीपूर्ण पद्धतीने सांगतात. ''जर तुम्ही असे केले तर तुम्हाला असा लाभ होईल. जर तुम्ही अन्य पद्धतीने केले तर तुम्हाला दुःख होईल...'' असे पाठ कथांद्वारे घरात लोकांपर्यंत पोहोचविले जातात. होय, पुराणे ते कार्य तुम्ही का करायचे ते सांगतात. त्याचे कारण आकर्षक गोष्टींद्वारे सांगतात. ''हरिश्चंद्र असा का वागला, नळाने तसे केले म्हणून जरी त्यांना प्रारंभी त्रास झाला तरी शेवटी ते सुखी झाले. शिवाय, त्यांना त्यांच्या सद्गुणी जीवनामुळे, उदात्त चारित्र्यामुळे कीर्ती मिळाली, ते सदैव स्मरणात राहतील. हिरण्यकशिपू, रावण, दुर्योधन आणि इतर, त्यांच्या कथांमधून उलटे सार निघते. ते उच्चस्थानी होते, वैभवात लोळत होते. पण त्यांचा शेवटी नाश झाला. आणि आज ते त्यांच्या दुष्कृत्यांमुळे, दुष्टपणामुळे स्मरणात राहिले आहेत. अशा कथा या प्रेरणा तसेच आपल्याला इशारा देऊन सावध करीत असतात. त्या आपल्याला चांगले काम करण्यास प्रोत्साहन देतात आणि कुकर्मापासून मागे ओढतात. पुराणे आपल्याला सत्य कथा

सांगतात. एखादा मुत्सद्दी, प्रामाणिक मित्र आपल्याला खोट्या गोष्टी सांगणार नाही. तो आपल्याला फक्त सत्य सांगेल आणि गोडीगुलाबीने आपल्यासाठी काय चांगले आहे ते सांगेल.

काव्याचे काय? कवी काय करतो? तो वस्तुस्थिती आणि कल्पना यांचे मिश्रण करून आणि कल्पनेने कथा तयार करतो, एखाद्या गोष्टीची अतिशयोक्ती करतो, दुसरी समानतेने सांगतो, तिसरीची पुनरावृत्ती करतो. त्याला हे सर्व करायची परवानगी असते. त्याचे कथन ऐकण्यास भाग पाडण्यासाठी कल्पनेशी वास्तवता गुंफणे हे त्याचे कार्य असते. मित्र पत्नीसारखा नसतो. तुमचे कर्तव्य तुमच्यावर बिंबविण्यासाठी तो तुमचे मन वळवितो. पण वास्तव सांगण्यापलीकडे जात नाही. पत्नीचे वर्तन वेगळे असते. ती पतीचे भले करण्यात आणि त्याला योग्य मार्गावर नेण्यास उत्सुक असते. ती एखादी गोष्ट फुगवून सांगते, दुसरी समानतेने सांगते, ती भर घालते आणि कमी करते. पतीशी चांगले वागून त्याला कसे का होईना योग्य मार्गावर नेते. दंतकथा अशी असते. काव्य पत्नीच्या स्थानी, वेद वरच्या अधिकाऱ्याच्या स्थानी आणि पुराणे मित्राच्या स्थानी असे तिघेही आपल्याला वेगवेगळ्याप्रकारे धर्माचे शिक्षण देतात.

-----

## प्रकरण - १४

# पुराण कथाकथन आणि चित्रपट

पूर्वी आई पक्षीकूजनाबरोबर जागी होत असे आणि घरातील आपली कामे करू लागत असे. घरात शेणाने सावरताना आणि घराभोवती शेणसडा करीत असताना, अंगणात तांदळाच्या पीठाने कोलम नावाची नक्षी, रांगोळी काढत असताना आणि दही घुसळत असताना ती पुराणातील कथा म्हणत असे. मुलांना त्यांची आई किंवा आजी यांच्याकडून अशा कथा माहीत होत. धार्मिक पाठ असलेल्या अशा कथांचा तरुण मनावर खोल ठसा उमटला जातो. अशा रीतीने सांगितलेल्या कथांमधील पात्रे जिवंत होतात. जेव्हा मुले आणि मुली मोठी होतात तेव्हा ती वाचून किंवा पुराणिकांचे ऐकून आपल्या ज्ञानात भर घालतात.

आजकाल अशा गोष्टींचे आचरण विसरले गेले आहे. लहानपणापासूनच लोकांना सिनेमातील गीते, राजकारण, काल्पनिक साहित्य, वर्तमानपत्रे यांची सवय लागते. हे खरे आहे की पुराणातील विषय रंगमंचावर सादर केले जातात किंवा पडद्यावर रंगविले जातात आणि काही लोकांना त्याचा थोडा लाभ होत असेल. परंतु त्यांना त्यांच्यापासून लाभ होत असेल की नाही याची शंकाच आहे. बऱ्याच वेळा पौराणिक चित्रपटांचा परिणाम चांगला नसतो. कारण नैतिक उपदेशापेक्षा चित्रपट लोकप्रिय व्हावा म्हणून करमणूक होण्याच्या दृष्टीने, मसालेदार करण्यासाठी किंवा शक्यतो आकर्षक करण्यासाठी निर्माते अनावश्यक गुणवैशिष्ट्यांची भर घालण्याचा प्रयत्न करतात. चित्रपट हा 'कांतासंमित' या गटात येत नाही. कारण निर्माते किंवा दिग्दर्शक त्यांना मिळालेल्या परवान्याचा ते दुरुपयोग करतात आणि मूळ कथा आक्षेप घेण्याइतक्या बदलल्या जातात.

जे नेहमी चित्रपटाला किंवा नाटकाला जातात त्यांना कथेतील पात्रांऐवजी नट आणि नट्या यांच्या गुणांमध्ये रस असतो.

ज्यांच्या स्वतःतच, ते सांगत असलेल्या कथांमधील उच्चकोटीच्या पात्रांचे गुण भिनलेले आहेत अशा सदाचारी थोर माणसांची पुराणे तुम्ही ऐकलीच पाहिजेत. तरच तुम्ही त्या पात्रांकडून व्यक्त झालेल्या गुणांकडे आणि त्यांनी आचरलेल्या धर्माकडे आकर्षित व्हाल. जे पुराणिक पैसा आणि प्रसिद्धीच्या मागे आहेत, त्यांनीच प्रतिष्ठा दिलेल्या धर्माचे आचरण करीत नाहीत अशांचे पुराण ऐकणे म्हणजे नाटक किंवा चित्रपट पाहणेच होय. नाटकाचे (किंवा चित्रपटाचे) प्रयोग जर धार्मिक ग्रंथांनी सांगितलेल्या तत्त्वांवर आधारलेले असतील तर कल्याणकारी असू शकतील. उदाहरणार्थ, फक्त प्रत्यक्ष जीवनात विवाह झालेले जोडपे नाटकात नायकाच्या किंवा नायिकेच्या भूमिका करू शकतात. उत्तेजक दृश्यांबाबतच्या कायद्याच्या संबंधाने शास्त्रातसुद्धा बंधने आहेत.

हल्ली शहरांमध्ये रोजच पुराणे आणि इतर धार्मिक प्रवचने ठेवली जातात. वर्तमानपत्रांच्या स्तंभांमध्ये त्यांची यादी पाहून मलाच आश्चर्य वाटते. मला परिचित नसलेल्या धार्मिक विषयांवर, कथांवर, पुराणांवर व्याख्याने दिली जातात. अगदी ज्यांना आधुनिक म्हटले जाते असे सुशिक्षित लोक त्यांच्याकडे गोळा होतात. असे वाटते जणू काही धार्मिक जागृती होत आहे.

विचार करण्याचा मुद्दा असा आहे की पुराणिकांनी दिलेली प्रवचने किती चांगली असतात? मुख्य विषयाला स्वतःच्या काही गोष्टी जोडून श्रोत्यांचा रस वाढविणे ठीक आहे. त्याचप्रमाणे थोडासा विनोद आणि राजकारणाचे संदर्भ फार अयोग्य वाटत नाहीत. परंतु ते मुख्य कथानकापासून, विषयापासून दूर जाता कामा नयेत आणि श्रोत्यांकडे पूर्वग्रहदूषित न होता सत्य पोहोचले पाहिजे. अन्यथा सर्व प्रयत्न वाईट ठरेल (रसाभास). (भाग १ प्र. ३). जी गोष्ट ईश्वराला आपल्या मनाकडे बोलावते तो रस, खरा स्वाद होय. पुराणकथा मूळ मजकुरापासून दूर भटकता कामा नयेत आणि श्रोत्यांवर चांगला प्रभाव पाडला गेला पाहिजे. वक्त्याची ईश्वरावर श्रद्धा असली पाहिजे, त्याने परंपरांना चिकटून राहिले पाहिजे, धर्मावर आणि तो जी तत्त्वे भाषणामध्ये विशद करतो त्यावर त्याचा ठाम विश्वास असला पाहिजे. त्याला जर त्याच्या भाषणाच्या विषयाचे सखोल ज्ञान असेल तर तो मुख्य विषयापासून दूर जाऊन असंबद्ध कथा सांगणे किंवा चालू राजकारणातील घडामोडी यांचे संदर्भ सांगणे यांचा मोह ठेवणार नाही. प्रवचने, चित्रपट आणि काल्पनिक साहित्य यांच्यासारखे वेळ घालविण्याचे साधन मानली तर हेतू साध्य होणार नाही. शहरांमध्ये आणि मोठ्या नगरांमध्ये जितकी प्रवचने आणि भजने होतात तितकी खेड्यांमध्ये किंवा लहान शहरात होत नाहीत. जेथे अधिकाधिक लोकांनी आधुनिक जीवनपद्धती स्वीकारलेली आहे तेथे आपला धर्म आणि सांस्कृतिक परंपरा या विषयातील रस वाढताना दिसत आहे. (न्यूटनच्या नियमाप्रमाणे ही कदाचित प्रतिक्रिया असावी.) धार्मिक किंवा पौराणिक व्याख्याने तसेच भजने प्रत्येक खेड्यात कमीतकमी एकादशीच्या दिवशी तरी ठेवली पाहिजेत.

-----

## प्रकरण - १५

# स्थल पुराणे

जे पुराणांबद्दल आदर बाळगतात तेसुद्धा एखाद्या ठिकाणाविषयी असलेली लहान पुराणे, स्थल पुराणे अस्सल म्हणून स्वीकारत नाहीत. ज्या सुशिक्षित माणसांना पुराणे दुसरे-तिसरे काही नसून खोट्या गोष्टी आहेत असे वाटते ते या स्थल पुराणांना कचऱ्यासारखी फेकून देण्यासारखी मानतात. "इंद्र त्याला मिळालेल्या शापापासून येथे मुक्त झाला." "येथे अगस्त्य ऋषी शिव-पार्वतीच्या विवाहाला उपस्थित होते." अशी विधाने स्थलपुराणांविषयी संशय निर्माण करतात. ही पुराणे मुद्दाम तयार केली गेली असावीत. काही लोकांच्याकडून त्यांच्या गावाला महत्त्व देण्याच्या इच्छेने निर्माण झाली असावीत.

आपल्या परंपरांवर श्रद्धा असणारे लोक तुम्हाला सांगतील, 'कल्पामागून कल्पे त्याच कथा थोड्याशा फरकाने सांगितल्या गेल्या आहेत.' एखाद्या ठिकाणची कथा दुसऱ्या कल्पामध्ये दुसऱ्याच ठिकाणी घडलेली आढळते. आपले जन्मस्थान पुराणातील महान माणसांशी निगडित असल्याचा अभिमान त्यांना वाटतो हे साहजिकच आहे. ही वस्तुस्थिती आपण सर्वांनी ओळखली पाहिजे. सामान्य अशिक्षित लोकांचा, कधीकाळी रामाने किंवा कृष्णाने किंवा मोठ्या थोर संतांनी आपल्या खेड्याला भेट दिली होती आणि लोकांना भयंकर पापांपासून मुक्त केले यावर विश्वास असतो. या श्रद्धेमुळे ते मंदिरात मोठ्या उत्साहाने कार्यक्रम करतात. त्यांना या श्रध्देचा, भक्तीचा लाभ होतो. त्यांच्या दृष्टिकोनाकडे आपण समजूतदारपणे आणि सहानुभूतीने पाहिले पाहिजे. आपण स्वतःला बुद्धिमान समजतो, आपण या निष्पाप लोकांच्या श्रद्धेस का धक्का पोहचवावा आणि त्यांना समाधानापासून वंचित का करावे ? गीतेमध्ये स्वतः भगवान सांगतात की अशा बाबतीत तुम्ही सामान्य लोकांना वास्तव म्हणून कोणतेही ज्ञान देऊन त्यांच्या मनात गोंधळ निर्माण करू नये.

"न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्।" (भगवद्गीता : ३.२६)

यावरून, ही स्थल पुराणे खरी नाहीत असे मत असणाऱ्या टीकाकारांबरोबर मी आहे असे तुम्ही गृहीत धरू नका. मी ती स्वीकारतो असेही समजू नका. ते लोकांचे काहीतरी भले करतात. माझा विश्वास आहे की ती थोड्याफार प्रमाणात खरी आहेत. त्यात सांगितलेल्या काही कथा तशा असू शकणार नाहीत. पण त्या कारणास्तव सर्वच स्थल पुराणे खोटी आहेत असे मी म्हणणार नाही.

-----

# स्थल पुराणांची सत्यता

आपली वेदांवर, शैव आणि वैष्णवांचे तमीळ वेद - तेवारम् आणि दिव्यप्रबंध यांच्यावर पूर्ण श्रद्धा असली पाहिजे. नायंमारचे तेवारम आणि आझवारचे पासुराम यांमध्ये स्थानमाहात्म्य गायलेले आहे. ही गीते स्थल पुराणात त्या स्थानांविषयी जे सांगितलेले आहे ते ध्वनित करतात. १५०० वर्षांपूर्वीच्या भक्तिवाङ्मयात असलेले संदर्भ हे या पुराणांची प्राचीनता दाखविणारा पुरावा आहे.

उदाहरणार्थ, श्रीरंगमच्या मंदिरातील (तमिळनाडू) पेरुमाल घ्या. ती मूर्ती अद्वितीय आहे. कारण ती दक्षिणमुखी आहे. त्या मंदिराशी संबंधित असलेल्या स्थल पुराणात याचे स्पष्टीकरण दिलेले आहे. जेव्हा बिभिषण श्रीरामचंद्राच्या राज्याभिषेकाला उपस्थित राहून लंकेला परत जात होता तेव्हा रामाने त्याला स्वतःच पूजन करीत असलेल्या रंगनाथाची मूर्ती दिली. त्याच्या मार्गात कावेरीच्या दोन प्रवाहांच्या काठावर असलेल्या बेटावर मूर्तीची स्थापना केली गेली. बिभिषण दुःखी झाला. कारण तो ती त्याच्याबरोबर लंकापुरीच्या राजधानीत नेऊ शकला नाही. म्हणून त्याची दया येऊन श्रीरंगनाथ दक्षिणेकडे तोंड करून उभा राहिला. ही घटना श्रीरंगच्या स्थल पुराणात तपशीलवार वर्णन केली आहे. आझवारच्या गीतांमध्ये तिचा उल्लेख आहे.

जर श्रीरंगममधील विष्णूचे दक्षिणेकडे मुख असण्याचे कारण आझवारच्या काळी माहीत होते तर त्या स्थानाच्या स्थल पुराणाने या वैष्णव संत कवीचे साहित्य घेतले असावे.

कांचिपुरम येथील एकाम्रनाथाच्या मंदिराच्या लिंगाला स्वतः अंबेकडून आकार दिला गेला. ती त्याची पूजा करीत असता ईश्वराने पूर निर्माण केला. पण ती तशीच लिंगाला मिठी मारून राहिली आणि ते लिंग पुरात वाहून गेले नाही. नंतर त्या लिंगातून ईश्वर दिसू लागला. ही स्थल पुराणातील कथा तेवारममध्येही सांगितलेली आहे. सुंदरमूर्तीस्वामींच्या कविता येथे पूजा करणाऱ्या अंबेचे स्तवन करतात.

श्रीरंगमजवळील जंबुकेश्वरमध्ये जंबु नावाच्या महान संताचे रूपांतर जंबुवृक्षामध्ये झाले. शिव स्वतः त्याखाली लिंगरूपात स्थापित झाला. एका कोळ्याने लिंगावर जाळ्याचे छत विणले आणि ईश्वराची पूजा केली. एका हत्तीने ते छत नष्ट केले आणि लिंगावर अभिषेक केला. साहजिकच कोळी चिडला आणि हत्तीच्या सोंडेत घुसला, वर चढला आणि त्याच्या मस्तकात छिद्र पाडले. त्या हत्तीने जंबुवृक्षाला धडक मारली आणि कोळ्यासह तो मरण पावला. तो कोळी कोच्चेंकोट चोल म्हणून जन्माला आला. त्याने जंबुकेश्वराचे मंदिर बांधले. ही कथा स्थल पुराणात येते - आणि तिचा संदर्भ तेवारममध्ये येतो. देवळाच्या गाभाऱ्यात कावेरी नित्य

भरून वाहते. या आश्चर्यकारक घटनेचा उल्लेख अप्परच्या तेवारममध्ये आणि पत्तुपट्टमध्ये आहे.

तमीळनाडूच्या चेंगलपट्ट जिल्ह्यातील तिरुक्कझुकुन्रम या पवित्र टेकडीवर दुपारी दोन गरुड उतरतात आणि मंदिरातील पुजाऱ्याकडून अर्पण केलेला गोड भात स्वीकारतात. भात खाल्ल्यावर ते पक्षी उडून जातात. काही लोकांना या प्राचीन घटनेच्या बाबतीत शंका आहेत. तेवारमच्या काळापासून हे ठिकाण (तिरु)क्कझुकुन्रम नावाने ओळखले जाते. आणखी कोणत्या चांगल्या पुराव्याची गरज आहे?

क्षेत्र-माहात्म्यानुसार तिरुविदैमरुदूर (तंजावूर जिल्ह्यातील) येथे सुब्रह्मण्यम् आणि शिवाच्या सन्मानार्थ जानेवारी-फेब्रुवारी महिन्यात साजऱ्या होणाऱ्या तैप्पुशमप्रसंगी स्नान करणे विशेष पवित्र मानले जाते. १५०० वर्षांपूर्वीच्या त्यांच्या गीतांमध्ये अप्पर आणि संबंधर यांनी या सणाविषयी सांगितलेले आहे.

तमीळनाडूमधील श्रीरंगम्, जंबुकेश्वर, कांचीपुरम्, तिरुक्कझुकुन्रम आणि तिरुविडैमरुदूर ही महान पवित्र ठिकाणे आहेत. असा वाद केला जाऊ शकतो की जुन्या तमीळ ग्रंथांमध्ये त्यांचा उल्लेख असणे यात काही विशेष नाही. परंतु हे उल्लेखनीय आहे की अगदी लहान ठिकाणांच्यासंबंधी असलेल्या पुराणकथांचासुद्धा जुन्या तमीळ ग्रंथांमध्ये संदर्भ आहे.

फार प्रसिद्ध नसलेल्या काही ठिकाणांच्या स्थल पुराणांमध्ये, ऋषी आणि देव, तेथील देवतांची पूजा करण्यासाठी मधमाशांच्या रूपात अवतरले अशा कथा आहेत. आजसुद्धा त्या गाभाऱ्यापुढे प्रचंड मोठी मधमाशांची पोळी दिसतात. नन्निलम् हे असेच एक ठिकाण आहे. त्याला मधुवनम् असेही म्हटले जाते. तिरुत्तुरैप्पूण्डीजवळील शित्तांबूरला तेवारममध्ये तिरुच्चिर्रेमम् म्हटले जाते. येथेही गाभाऱ्यापुढे एक पोळे आहे. सिद्ध लोक मधमाशीच्या रूपात देवाची पूजा करायला रोज येतात अशी कथा आहे. रोज त्या मधमाशीच्या पोळ्याचीही पूजा केली जाते. तसेच तिरुक्कण्णमन्गैच्या वैष्णव मंदिरात एक मधमाशांचे पोळे आहे. तेवारम आणि दिव्यप्रबंधम् या दोन्हीमध्ये अशा स्थानांचे संदर्भ आहेत.

स्थल पुराणांची प्राचीनता आणि अस्सलपणा यांस तेवारम्, तिरुवाचकम् आणि नालायिर-दिव्यप्रबंधम्मध्ये आलेल्या कथांनी पुष्टी मिळते.

-----

# प्रकरण - १७

## आपापसात जोडलेल्या कथा

एका स्थल पुराणात वर्णन केलेल्या घटना दुसऱ्यात उल्लेखलेल्यांशी जोडलेल्या असतात. अशा रीतीने एकाच कथेचा पदर अनेक पुराणांमध्ये घेतला जातो. आपल्याला संपूर्ण कथा समजण्यासाठी त्या एकत्र वाचाव्या लागतात. जेथे दुसरे पुराण संपते तेथे पहिले सुरू होते हा त्यांच्या अस्सलपणाचा एक पुरावा आहे. ही स्थल पुराणे, १८ मुख्य आणि उप पुराणांमधील पोकळी भरून काढतात हा दुसरा पुरावा पुढे करण्याजोगा आहे.

एकदा शिव आणि अंबा (पार्वती) द्यूत खेळत होते. ''मी डाव जिंकला आहे.'' अंबा म्हणाली. ''नाही, मी विजेता आहे.'' शिव म्हणाला. मानवाला धर्माचे पाठ देण्यासाठी ते दोघे खेळले. त्यांच्या खेळाचा शेवट भांडणात झाला. कारण त्या दैवी जोडप्याला जुगार खेळणे ही वाईट गोष्ट आहे, ते वाद आणि दुराचरणाकडे नेते हे जगाला शिकवायचे होते.

पुन्हा त्या गोष्टीकडे यायचे. रागाने शिवाने अंबेला असा शाप दिला, ''तू गाय म्हणून जन्मशील आणि पृथ्वीवर भटकत राहशील.'' शिव हा पशूंचा देव, पशुपती आहे. होय, तोच उन्मादी इंद्रियावर नियंत्रण ठेवणारा देव आहे. गर्विष्ठ लोकांना तो वरदान देत नाही असे ही कथा दर्शविते, त्याने पराशक्तीलाही (परमशक्ती) शाप दिला. ती जरी स्वतः महाशक्ती असली तरी तिला स्वतःची चूक लक्षात आली आणि महापतिव्रता असलेली ती पतीशी नम्रभावाने राहिली. ती सामान्य गायीप्रमाणे पृथ्वीवर भटकत राहिली.

तिच्या एक हजार नावांत (सहस्रनाम) अंबेची ''गोमाता, गुहजन्मभू'' म्हणून खूप स्तुती केली आहे. ती पृथ्वीवर गोमाता म्हणून आली.

विष्णू हा अंबेचा भाऊ, नाही का? त्याचे तिच्यावर फार प्रेम होते. आणि त्याला जेव्हा हे समजले की त्याच्या मेहुण्याने तिला घालवून दिले आहे, तेव्हा त्याने विचार केला, ''जरी तो पशूंचा देव असला तरी तिचे संरक्षण न करू दे, मी माझ्या बहिणीचे संरक्षण करीन.'' म्हणून गुराख्याचा वेश घेऊन त्याने त्या दिव्य गायीला सोबत केली. अशा प्रकारे पृथ्वीवर भटकण्याच्या शापाचा तो बळी नव्हता. तो मर्त्य लोकांच्या जगात आला. कारण त्याला निष्ठापूर्ण प्रेम जगाला दाखवायचे होते. (त्याला आता गुराख्याचे काम आवडू लागले होते. त्याने कृष्णाच्या रूपात गायी चारण्याचा आनंद घेतला. आता त्याला गोपाल म्हणण्यात येऊ लागले, त्या नावाचा अर्थही पशुपती आहे. जर तुम्ही शिव आणि विष्णू या दोन नावांचा विचार केला तर तुम्ही त्या दोघांत भेद करणे थांबवाल.)

बहीण आणि भाऊ, गाय आणि गुराख्याच्या रूपात आले ते ठिकाण म्हणजे तिरु-

अझुंदूर. ते "तेरझुंदूरसारखेच आहे. ते कंबरचे जन्मस्थान होते आणि तेथे कंबरमेडु नावाची वसाहत आहे. तिरुमन्नै आझवार याने येथील एका मंदिरात 'मंगळा-शासनम्' केले. गाभाऱ्यात विष्णू हा गायीसह गोपाल आहे. तो त्या गायीचा सोबती म्हणून आला म्हणून त्याला 'गोसखा' म्हटले जाते. तेरझुंदूरचे दुसरे नाव गोसखाक्षेत्र आहे. गोसखा हा तमीळमध्ये 'आमरुवियप्पन, पहिला 'आ' म्हणजे गाय.' येथे शिवाचेही मंदिर आहे. आपल्या प्राचीन नगर-रचना पद्धतीनुसार खेडे किंवा शहराच्या एका टोकाला शिवाचे आणि दुसऱ्या टोकाला विष्णूचे मंदिर असले पाहिजे. जर तेरझुंदूर येथील विष्णूचे मंदिर हे आझवारच्या गीतांशी निगडित असेल तर शिवमंदिर हे ज्ञानसंबंधरच्या तेवारम स्तोत्राशी निगडित असेल. आझवारने स्तुती गायलेल्या ठिकाणांना मंगला शासनम् असल्याचे म्हटले जाते. तेवारमशी निगडित असलेल्या स्थानाला (महती गायले गेलेले) पाटाल पेर्रा स्थलम् म्हटले जाते. दक्षिणेकडील स्थानांची दोन प्रकारची वैशिष्ट्ये आहेत. तेरझुंदूर हे त्यातील एक आहे. त्याच्याशेजारी पिल्लूर नावाचे खेडे आहे. जेथे गुराख्याच्या रूपातील विष्णू गायीच्या रूपातील अंबेला चारत असे. (पिल्लूर म्हणजे जेथे गवत वाढते ती जागा, पिल म्हणजे गवत. तंजावूर प्रांतात पुल हे पिल नावाने ओळखले जाते.) मेक्किरिमंगलम् हेही एक आणि आन-अंगूर हे दुसरे ठिकाण आहे जेथे विष्णूने गाय चारली. (आन=गाय)

भाऊ आणि बहिणीला शिवाची पूजा करण्यासाठी विष्णूने वेद्पुरीश्वराची (शिवाची) गोसखाक्षेत्रात स्थापना केली. (वेद्पुरीश्वर आणि आमरुवियप्पन ही दोन्ही मंदिरे एकाच व्यवस्थापनाखाली येतात.)

वैदिक धर्माच्या आचरणासाठी ब्राह्मणाप्रमाणेच गायीची आवश्यकता असते. यज्ञांसाठी दूध आणि तूप आवश्यक असतात, ब्राह्मणाशिवाय आहुती दिली जाऊ शकत नाही. ह्या वस्तुस्थितीवर प्रार्थनेत भर दिलेला असतो, "गोब्राह्मणेभ्यो शुभमस्तु नित्यम्." (गाय आणि ब्राह्मणाची नित्य उन्नती होवो.)

ज्याने (शिवाने) अंबेला शाप दिलेला होता, तो वेदपुरीश्वर म्हणून ज्या ठिकाणी अंबा आलेली होती त्याच ठिकाणी आला. अलीकडील काळापर्यंत तेथे वेद आणि शास्त्रसंपन्न ब्राह्मण होते. संबंधर नेहमी त्याचा 'अझुदै मरैयोर' म्हणून संदर्भ देतो. (अझुंदूरचे वैदिक पंडित). आझवार विष्णूला या नावांनी संबोधतात : छंदोगा, पौझिया, तैत्तिरीया, सामवेदियने.

एके दिवशी ती गाय (म्हणजे अंबा) चरत असता तिच्या खुराने जमीन उकरली आणि एक दगड उघडा पडला. ते शिवलिंग होते. आपण शिवाचा गुन्हा केला असे मानून ती सैरावैरा पळू लागली. विष्णूने तिला शांत केले आणि परत आणले. ज्या ठिकाणी ही घटना घडली ती पवित्र खुरांचे स्थान 'तिरुक्कुलंबियम्' होय. आपल्या बहिणीने हसतखेळत का होईना अहंकार दाखविला आणि याचे दुर्दैवी परिणाम झाले, याचे विष्णूला दुःख झाले आणि पश्चात्ताप झाला.

विष्णूने मीनाक्षीचा (पार्वती) सुंदरेश्वराशी (शिव) विवाह करून दिला. त्या देवता मदुराईच्या प्रसिद्ध मंदिरात आहेत. त्या दोघांना एकत्र आणण्याच्या इच्छेने त्याने शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठी पूजा केली. शिव संतुष्ट झाला आणि विष्णूला म्हणाला, ''कावेरी नदीपाशी ती येईपर्यंत चारत रहा. तिला नदीत स्नान घाल आणि ती तिच्या मूळ रूपात येईल. मी तिच्याशी केव्हा विवाह करीन हे तुला नंतर सांगेन.''

शिवाने आज्ञा दिल्याप्रमाणे विष्णूने गायीला कावेरीत स्नान घातले. नदीत स्नान झाल्यावर जेथे गाय दिसली तेथे ते ठिकाण म्हणजे 'तिरुवाडुतुरै'. (येथे तिरुमूलरने त्याच्या 'तिरुमंतिरम्‌ची रचना केली. म्हणूनही हे स्थान महत्त्वाचे आहे.)

अंबा तिच्या मूळ रूपात आली आणि शिव स्वतः त्याठिकाणी आला. पण त्याला पुन्हा एकदा एक डाव खेळायचा होता. कुर्शलम्‌ नावाचे एक ठिकाण आहे. (धबधब्याबद्दल प्रसिद्ध असलेले तिरुनवेली जिल्ह्यातील कुर्शलम्‌ नव्हे. हे तंजावूर जिल्ह्यात मयिलडूतुरै म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मायूरम्‌जवळ आहे. त्याला पूर्वी तिरुत्तुरुत्ति म्हटले जात असे. अप्पर, संबंधर आणि सुंदरमूर्ती यांनी गायलेल्या ४४ स्थानांपैकी हे एक आहे.) एका ऋषीने स्वतःची मुलगी म्हणून अंबेने जन्म घ्यावा यासाठी तप केले. शिवाने विचार केला की याची इच्छा पूर्ण करण्याची हीच योग्य वेळ आहे. तो अंबेला म्हणाला, ''जा आणि तिरुत्तुरुत्ति येथील ऋषीची मुलगी म्हणून जन्म घे. मी येईन आणि योग्य वेळेस तुझ्याशी विवाह करीन.''

वचन दिल्याप्रमाणे शिव अवतरला. ज्याने त्याचा शब्द गोसखाक्षेत्रात दिला तो तेथे अवतरला, येथेही त्या देवतेला वेदेश्वर म्हटले जाते, यात त्याचा पुरावा आहे. तो ऋषी आणि विष्णू - विष्णू, त्याच्या बहिणीचा शिवाशी पुन्हा विवाह कधी होईल त्या दिवसाची वाट पाहत होता - त्यांनी शिवाचे स्वागत केले आणि विवाहस्थानाकडे नेले. ज्या ठिकाणी शिवाचे स्वागत केले गेले त्याला 'एतिरकोळपाडि' म्हणू लागले. ज्या जवळच्या ठिकाणी शिवाकडून व्रत केले गेले त्या ठिकाणाला वेळविक्कुडि म्हणू लागले. जेथे त्याने अंबेला वधू म्हणून पाहिले आणि पालिका विधी केला त्या ठिकाणाला 'कुरुमुळैप्पालि' (जेथे पालिका धान्याला मोड आणले) म्हटले जाते. त्या विवाहाचा मंडप दोन किंवा तीन खेड्यांइतका पसरलेला होता. मध्यावर असलेल्या 'तिरुमणंजेरी' (जेथे शिव-पार्वतीचा विवाह झाला) येथेच विष्णूने पार्वतीचा शिवाशी विवाह करून दिला आणि तो प्रसंग त्याच्यासाठी मोठ्या आनंदाचा होता.

स्थल पुराणे अर्थहीन आहेत असे समजून सोडून देणे किती चुकीचे आहे हे या वर्णनावरून समजून येईल. या गोष्टीत अहंकाराच्या आणि जुगाराच्या वाईट परिणामांबद्दल इशारा दिलेला आहे. एखादी पत्नी तिच्या पतीशी किती कर्तव्यदक्ष असली पाहिजे आणि एखादा भाऊ त्याच्या बहिणीशी किती प्रेमळ असावा आणि तिची किती काळजी घ्यावी हे ही कथा सांगते. वस्तुतः हा विचार मनात ठेवून मी ही कथा सांगितलेली नाही. अनेक स्थल पुराणे

एकमेकांत कशी जुळतात आणि निरनिराळ्या स्थल पुराणांमध्ये सांगितलेल्या कथा कशा एकमेकांत गुंफलेल्या आहेत; हे मला दाखवून द्यायचे होते - मला म्हणायचे आहे की त्या तेरझुंदूर, पिल्लूर, आनंगूर, तिरुक्कुलंबियम्, तिरुवादुतुरै, कुर्राळम्, एटिर्कोळपाडि, वेळ्विक्कुडि, कुरुमुळैप्पालि आणि तिरुमणंजेरि; हे अंतर्गत कथन हेच दर्शविते की ती कथा अस्सल असलीच पाहिजे.

तंजावूरचे लोक विशेषतः ज्या कथेशी परिचित आहेत तिचा संबंध जवळपासच्या ठिकाणांसह कुंभकोणम्शी आहे.

महाप्रलयाच्या काळात ब्रह्मा स्वतः पुढच्या निर्मितीसाठी तयार झाला. त्याने सर्व बिया अमृतात ठेवल्या आणि त्या एकत्र वैदिक मंत्र म्हणत एका मातीच्या घटात ठेवल्या. योग्य समारंभपूर्वक त्याने त्यावर आंब्याच्या पानांसह एक नारळ ठेवला आणि त्याला पवित्र धाग्याने वेढले. आता त्याने तो घट मेरू पर्वताच्या शिखरावर ठेवला. जेव्हा तो प्रलयाच्या पाण्यात तरंगत आला तेव्हा परमेश्वराला पुन्हा निर्मिती करण्याची इच्छा झाली. नंतर घटावरील नारळ वादळात हलला आणि पाण्यात पडला. ताबडतोब जमीन उघडी करीत पाणी मागे गेले. हे स्थान कुंभकोणम्च्या वायव्येला चार मैलांवर आहे. येथील देवतेला आजही 'नारिकेलेश्वर' म्हटले जाते. (नारिकेल म्हणजे नारळ). नंतर आंब्याची पाने पडली. तेथेही जमीन उघडी करीत पाणी मागे गेले. हे 'तिरुप्पुरंबुयम्' कुंभकोणम्च्या वायव्येला चार मैलांवर आहे. 'पयम्' (किंवा बयम्) म्हणजे 'पयस्' म्हणजे पाणी. पण या संदर्भात प्रलय 'पुरम्' म्हणजे कशाच्यातरी बाहेर किंवा पलीकडे, त्या ठिकाणचे नाव (तिरुप्पुरंबयम्) म्हणजे 'प्रलयाच्या पाण्याच्या बाहेर'. आता तो पवित्र धागा (सूत्र) सुद्धा घटापासून सैल झाला आणि पडला. जेथे सूत्र पडले तेथील देवता 'सूत्रनाथ' आहे, सूत्र म्हणजे पवित्र धागा.

कुंभाला (घटाला) तोंडाशिवाय एक नाक (तोटी) होते - ते गिंडी किंवा कमंडलूसारखे होते. माझ्या भांड्यालाही तोंडाशिवाय एक नाक आहे. भांड्यात तोंडातून पाणी भरले जाते आणि नाकातून (तोटीतून) बाहेर ओतले जाते. अमृताचे भांडे तसेच होते. परमेश्वराने ते दृश्य पाहिले. अमृत व बिया असलेले ते भांडे उलटले नाही म्हणून त्याने ते त्यातील वस्तू त्याच्या बाणाने फोडून बाहेर काढायचे ठरविले. जेथे त्याने बाण सोडला त्याला 'बाणापुरी' म्हटले जाते - आता ते बाणत्तुरै नावाने ओळखले जाते. येथील देवता 'बाणपुरीश्वर' आहे आणि जेथे नाक (तोटी) तुकडे होऊन पडले ते 'कुडवायिल' (कुडवशाल) होय. परमेश्वराला अमृत भांड्याच्या नाकातून शास्त्रीय पद्धतीने सोडायचे होते. ज्याठिकाणी नाक तुटले आणि अमृत बाहेर सांडले ते इतर ठिकाणांपेक्षा अधिक पवित्र आहे. त्याला 'कुंभकोणम्' म्हटले जाते, कोण (कोणम्) म्हणजे नाक (तोटी). तेवारममध्ये त्या ठिकाणाचा 'कुडमूक्कु' असा उल्लेख आहे. येथे तो मातीचा घट स्वतःच लिंग बनला आणि आजही तो

तसाच आहे. संरक्षक कवचासह लिंगाला समारंभपूर्वक स्नान घातले जाते. 'कुंभेश्वर' हे त्या देवतेचे नाव आहे. ज्याठिकाणी प्रथम अमृत पडले तो महामघम तलाव आहे.

येथे अमृत पडले. या घटनेमुळे पवित्र झाल्यामुळे येथील देवता 'शारंगपाणी'ला 'आर-अमुदन' असे आझवारांकडून म्हटले जाते. वैष्णवांसाठी कुंभकोणम् हेच 'कुडन्दै' आहे.

अशा रीतीने तीर्थक्षेत्रे जोडली गेली आहेत. ही गोष्ट स्थल पुराणे अस्सल आहेत हे निश्चित करते. तिरूवझुन्दुर, कुंभकोणम् इत्यादी ठिकाणे चार मैलांच्या त्रिज्येत वसलेली आहेत. स्थल पुराणांमध्ये उल्लेखलेली आणि खूप दूरची ठिकाणे जोडलेली आहेत हे जर आपण पाहिले तर पुढे त्या पुराणांची सत्यता निश्चित होईल. रामेश्वरम्, वेदारण्यम् आणि पट्टीश्वरम् ही ठिकाणे एकमेकांच्या जवळ नाहीत. रामेश्वरम् हे रामनाथपुरम् जिल्ह्यात समुद्रकाठी आहे. वेदारण्यम् हे तंजावूर जिल्ह्याच्या एका कोपऱ्यात, तिरुत्तुरैपुण्डी तालुक्यात आणि तेही समुद्रकिनाऱ्यावर आहे. त्याच जिल्ह्यात पण जवळ नसलेले, कुंभकोणम्‌जवळ पट्टीश्वरम् आहे. दूर असलेली ही ठिकाणे एकाच कथेच्या एकाच धाग्याने जोडलेली आहेत. अशा कथेला तुम्ही निराधार म्हणाल काय?

या तीनही ठिकाणी मोठी शिव मंदिरे आहेत आणि प्रत्येकातील देवता रामाच्या नावाशी जोडलेले असे 'रामलिंग' आहे. त्याने या ठिकाणी लिंगांची स्थापना केली. ही गोष्ट शैव-वैष्णव ऐक्याच्या संकल्पनेला पुष्टी देते. या स्थानांची काही ठळक वैशिष्ट्ये आहेत. चार धाम असलेल्या महत्त्वाच्या धार्मिक क्षेत्रांमध्ये फक्त रामेश्वर दक्षिणेकडे आहे. ब्रदीनाथ उत्तरेकडे, सोमनाथ पश्चिमेकडे, (पुरी) जगन्नाथ पूर्वेला आणि अर्थात रामेश्वर दक्षिणेकडे आहे.

स्वातंत्र्यचळवळीतील मिठाच्या सत्याग्रहाशी वेदारण्यम् निगडित आहे. तेवारममध्ये त्या ठिकाणाचा उल्लेख तिरुमरैक्का म्हणून आहे. (तमीळमध्ये वेदारण्यम्‌साठी) येथे वेदांनी शिवाची पूजा केल्यानंतर मंदिराचे दार बंद केले गेले. अप्परने त्याचे पतिमग येथे गायले आणि दार पटकन उघडले गेले. तिरुज्ञानसंबंधरने जेव्हा देवतेसमोर गायन केले तेव्हा दार पुन्हा बंद झाले.

पट्टीश्वरम् हे कामधेनूच्या चार मुलींपैकी एक असलेल्या पट्टीकडून शिवाची पूजा केली गेलेले ठिकाण आहे. पूर्वी उल्लेख केलेल्या तिरुवाडुतुरैसारख्या अनेक ठिकाणी त्या गायीने पूजा केलेली आहे. तिरु-आमत्तूर हे पनरुत्तिजवळ आहे. ते अप्परशी निगडित आहे. येथेही त्या गायीने पूजा केलेली आहे. पट्टिश्वरम् हेही तसेच ठिकाण आहे. जेव्हा ज्ञानसंबंधर लहान होता तेव्हा त्याने शिवाचे स्तवन केले आणि तो भर उन्हात त्याच्यासमोर नृत्य करीत राहिला. देवाला त्याची करुणा आली आणि त्याने त्याच्या सेवकांना, आपल्या शिष्याला उन्हापासून वाचविण्यासाठी मंडप बांधण्याची आज्ञा दिली. ज्ञानसंबंधर हा सुब्रह्मण्याचा अवतार होता.

तंजावूरच्या नायक राजांचा गोविंद दीक्षित हा एक मंत्री होता. तो पट्टीश्वरम्‌कडे आकर्षिला गेला आणि त्याने तेथील मंदिराचा विस्तार केला. अंबेच्या गाभाऱ्यापुढे दीक्षित आणि त्यांची पत्नी यांच्या प्रतिमा दिसतात.

शिव आणि पार्वतीच्या विवाहाला अगस्त्य कोठे साक्षीदार होते? तीन ठिकाणांचा उल्लेख केला जातो, म्हणजे त्याच घटनेचा तीन ठिकाणांशी संबंध येतो. अगोदर उल्लेखल्याप्रमाणे रामलिंगाची स्थापना तीन ठिकाणी पण वेगवेगळ्या कारणास्तव केली गेली.

रामाने रावणाची हत्या करून तिहेरी पाप केले. विश्रवस ऋषीचा मुलगा रावण हा ब्राह्मण होता. त्याला ठार मारून रामाने 'ब्रह्महत्येचे' पाप ओढवून घेतले. ते पुसून टाकण्यासाठी त्याने रामेश्वर येथे लिंगाची स्थापना केली.

काही लोक आजकाल राम आणि रावणं यांचे युद्ध हे आर्य आणि द्रविड यांच्यातील भांडण होते असे मानतात. हा दृष्टिकोन पूर्णपणे निराधार आहे आणि त्यास रावण हा ब्राह्मण होता ही वस्तुस्थितीच उत्तम पुरावा होय. जर रामायण खोटे असेल तर राम आणि रावणातील युद्धही तसेच असले पाहिजे. जर रामायणाचा सत्य म्हणून स्वीकार केला तर त्यात असलेले रावणाचे वर्णनसुद्धा सत्य म्हणून स्वीकारायला हवे. त्या महाकाव्यात पुनःपुन्हा म्हटले आहे की रावण हा ऋषिपुत्र होता, तो वेदांमध्ये पारंगत होता, सामवेदाचे गायन करून त्याने शिवाला प्रसन्न करून घेतले म्हणून तो कैलासाच्या खाली चिरडून जाण्यापासून वाचला. तुम्हाला रामायणातील योग्य वाटणारा भाग स्वीकारायचा आणि बाकीचा नाकारायचा हे तर्कात बसत नाही. रामायण आणि ते रावणाविषयी काय म्हणते ते बाजूला ठेवा, आपल्याला पाहण्यासाठी रामेश्वराचे मंदिर आहे. तेथे जगातील सर्वात मोठा जोडमार्ग आहे. (प्राकार, पायी जाण्याचा मार्ग) सर्व भारत रामनाथस्वामींची, लिंगरूपात जे रामाने ब्राह्मण रावणाला ठार मारून झालेले पाप पुसून टाकण्यासाठी स्थापन केलेले होते त्याची पूजा करतो. शतकानुशतके तमीळनाडूतील आमच्या पूर्वजांनी, रावण हा ब्राह्मणाशिवाय इतर जातीचा होता असा कधीही विचार केला नाही.

ब्राह्मण असूनही रावण महान योद्धा होता. त्याच्यापुढे सर्व विश्वे थरथर कापत असत. कार्तवीर्यार्जुन आणि वाली सोडून त्याकाळातील सर्व शक्तिमान राजांशी तो यशस्वीरित्या लढला. अशा योद्ध्याला ठार मारून रामाने वीरहत्येचे पाप केलेले होते. त्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून त्याने वेदारण्यम् येथे लिंगाची (रामलिंग) स्थापना केली.

अगोदर उल्लेखिलेल्या वैशिष्ट्यांशिवाय रावणाकडे आणखी एक वैशिष्ट्य होते; तो शिवाचा निस्सीम भक्त होता आणि गायनाशिवाय वीणावादनात प्रवीण होता. अशी श्रेष्ठता 'छाये'खाली येते. त्याचा अर्थ प्रकाश आणि सावली दोन्ही, असा आहे. मीनाक्षीला 'मरकत-छाया' असे संबोधले जाते. (चमकणारा/तेजस्वी पाचू). रावणाला ठार मारून ज्याने तेज प्राप्त

केले अशा रामाने या हत्येच्या पापक्षालनार्थ पट्टीश्वरम् येथे लिंग स्थापिले.

शास्त्रीय दृष्टिकोनातून रावणाची हत्या करून रामाने स्वतःवर ब्रह्महत्या, वीरहत्या आणि तेजहत्या असे तिहेरी पाप ओढवले. वस्तुतः राम हा पापी माणसाला मुक्त करणारा, पतिताचा उद्धार करणारा असा पतित-पावन आहे. त्याला कोणत्याही पापाचा कलंक लागू शकत नाही. त्याचे नाव उच्चारून एखादा माणूस भयंकर अशा पापातून मुक्त होऊ शकतो. म्हणून रामाला कोणतेही प्रायश्चित्त करण्याची गरज नाही. (त्याला कोणताही प्रायश्चित्त विधी करावा लागत नाही) - तो 'तारक राम' आहे, मुक्तिदाता आहे, भक्ताला संसाराच्या पलीकडे नेतो. पण तो सर्व मानवजातीसाठी आदर्श दाखविण्यासाठी या जगात आला म्हणून ज्या बाबी क्षुल्लक मानल्या जाऊ शकतील अशा गोष्टीतही त्याने कठोरपणे नियमांप्रमाणे वर्तन केले. धर्मशास्त्रानुसार धर्मपालन करण्यात त्याच्यापुढे कोणीही गेला नाही. संपूर्ण रामायणात आपल्याला त्याच्या व्यक्तिमत्त्वातील हा उल्लेखनीय गुण दिसून येतो. त्याने स्वतःला सामान्य व्यक्ती मानले, शास्त्रातील सर्व नियमांचे पालन केले, अशा रीतीने शास्त्रानुसार त्याने प्रायश्चित्त केले, याचा वाल्मीकीच्या रामायणात उल्लेख नाही; पण ही उणीव रामेश्वरम्, वेदारण्यम् आणि पट्टीश्वरम् येथील स्थलपुराणे भरून काढतात.

रामायणात या घटनांचा समावेश नाही, त्या वृद्ध बायकांच्या कथा असाव्यात, असा विचार करणे बरोबर नाही. स्थलपुराणांमध्ये वर्णन केलेल्या घटना रामाच्या व्यक्तिमत्त्वाशी मिळत्याजुळत्या आहेत. त्याने तीन प्रकारचे विधी केले असले पाहिजेत. जे वाल्मीकीच्या रामायणात यायचे राहून गेलेले आहे; त्याचा उल्लेख स्थल पुराणांत आहे.

रावणाने सर्व मानवजातीला दुःख दिले होते आणि त्याने दुष्ट हेतूने विश्वमाता असलेल्या सीतेचे अपहरण केले होते. रामाने अशा दुष्ट व्यक्तीला ठार मारले आणि जगाला सुखी केले. जेव्हा त्याच्या विजयाचा वैश्विक आनंद साजरा केला जात होता, तेव्हा राम तीन प्रकारे प्रसिद्ध असलेल्या त्याच्या शत्रूला ठार मारल्याबद्दल स्वतःला पापी समजत होता. त्याच्या व्यक्तिमत्त्वाची भव्यता अशा वागण्यामुळे वाढलेली आहे. त्याने तीन मुख्य ठिकाणी हरी आणि हर (विष्णू आणि शिव) यांचे ऐक्य दर्शविण्यासाठी लिंगांची स्थापना केली.

ही स्थलपुराणे एकमेकांच्या विरुद्ध नाहीत किंवा एकमेकांना झाकून टाकणारी नाहीत. रामेश्वरम्, वेदारण्यम् आणि पट्टीश्वरम् येथील स्थलपुराणे अनुक्रमे ब्रह्महत्या, वीरहत्या आणि छायाहत्या या पापापासून, प्रत्येक ठिकाणी लिंगस्थापना करून राम कसा मुक्त झाला याचे वर्णन करतात. राम समुद्रकिनाऱ्याने उत्तरेकडे गेला असला पाहिजे. वेदारण्याहून तो आतील भागातील पट्टीश्वरम् येथे गेला असला पाहिजे. हा एकाच कथेचा पदर आहे. तो तीनही स्थलपुराणांमधून जातो. ही तीनही ठिकाणे एकमेकांपासून १०० किंवा १५० मैलांवर आहेत. जेव्हा दळणवळणाची वेगवान साधने नव्हती तेव्हा ती आजच्या १००० किंवा १५००

मैलांसारखी होती. या कथा एकमेकांत मिळत्याजुळत्या होतात आणि त्यांची स्थलपुराणे सत्य असलीच पाहिजेत असे दर्शवितात.

आधुनिक संशोधकांना तसेच पारंपरिक विद्वानांना विचित्र वाटेल असा एक दृष्टिकोन मला व्यक्त करायचा आहे. असे सामान्यतः मानले जाते की रामायणाइतकी स्थलपुराणे ही प्रमाण मानण्याजोगी असू शकत नाहीत. पण मला वाटते अशी पुराणे रामायण, महाभारत, विष्णुपुराण आणि भागवत इत्यादी इतकीच अस्सल किंवा अधिकच प्रमाण आहेत. वर उल्लेखलेल्या उदाहरणांवरून मी अशा निर्णयाप्रत आलेलो आहे.

आता मी देशातील विविध भागांमधील स्थाने जोडणाऱ्या स्थलपुराणांविषयी बोलणार आहे.

कावेरी पुराणाच्या दोन आवृत्त्या आहेत. एक कावेरीच्या काठावरील श्रीरंगम्‌मधील अम्मा मंडपाला महत्त्व देते. कावेरी नदीत तुला महिन्यात (ऑक्टोबर-नोव्हेंबर) स्नान करणे विशेष पुण्यदायी असल्याचे ते सांगते. या पुराणातील प्रमुख पात्र चोल राजा धर्मवर्धन आहे. त्याने निचुलापुरीहून राज्य केले. निचुला, निचोला चोली या संस्कृत शब्दांचा अर्थ अभ्राप्रमाणे (तमिळमध्ये उरै) शरीर (किंवा एखादा भाग) झाकून टाकणारे वस्त्र असा आहे. उरैयूर हे ठिकाण संस्कृतमध्ये निचुलापुरी म्हणून ओळखले जाते. निचुलापुरी राजधानीसह या राज्याला चोलदेश (चोझदेश) म्हणण्यात येऊ लागले. धान्याच्या कणसाचे वैशिष्ट्य काय? देठाच्या वरच्या टोकाला असलेले धान्यकण ओंबीने झाकले जातात. त्याचा अर्थ असा की चोलम् किंवा मका म्हटले जाणारे तांदूळ, गहू असे धान्यकण चोली/अभ्रा परिधान करतात.

कावेरी पुराणाच्या दुसऱ्या आवृत्तीत मायावरम् येथील तुला - घट्टम् म्हटल्या जाणाऱ्या स्नानाच्या घाटाला महत्त्व दिले गेलेले आहे. ते 'लगडम्' नावाने प्रसिद्ध आहे. हा शब्द तुला-घट्टम् या शब्दाचा विपर्यास असावा. जे यात्रेकरू तुला महिन्यात कावेरीत स्नान करतात त्यांच्या सोयीसाठी हा घाट बांधला गेला आहे. एकाच आराखड्यानुसार बांधले गेलेले असे सहा किंवा सात घाट कावेरीवर आहेत. कावेरी पुराणाच्या पहिल्या आवृत्तीत श्रीरंगम् आणि धर्मवर्मन महत्त्वाचे म्हणून प्रसिद्ध आहेत, दुसऱ्यात मायवरम्‌च्याशिवाय एका ब्राह्मण जोडप्याला महत्त्वाचे स्थान आहे. त्या जोडप्याला या घाटावर स्नान करून मुक्ती मिळाली.

त्या ब्राह्मणाचे नाव नाथशर्मन् आणि त्याच्या पत्नीचे अनवद्या होते. तुला महिन्यात रोज कावेरीत विधिवत् स्नान करून ते या संसारातून मुक्त झाले.

त्यांच्या यात्रेच्या काळात ते ब्राह्मण जोडपे केदार आणि काशीला गेले. (ही कथा फक्त मायावरम् मध्ये आहे.) येथून काशी एक हजार मैलांवर आहे. तेथील एका घाटाला केदारघाट म्हटले जाते. केदारघाटाच्या स्थलपुराणात नाथशर्मन् आणि त्याची पत्नी अनवद्या

या ब्राह्मण जोडप्याने तेथे स्नान केल्याचा उल्लेख आहे.

आपल्या भागातील लोकांना नाथशर्मनची कथा फारशी परिचित नाही. राम, कृष्ण, हरिश्चंद्र, नल आणि अशांसारखा तो सर्व देशात ज्ञात नाही. अशा माणसाची कथा आणि एक हजार मैलांवरील काशीच्या मायवरम् या ठिकाणच्या स्थल पुराणात असलेली कथा मिळतीजुळती आहे. स्थलपुराणांच्या अस्सलपणावर शंका घेणे किती चुकीचे आहे हेही ही कथा दर्शविते.

कांचीपुरम्पासून एक हजार मैलांवर असलेली काशी, अन्नपूर्णा देवतेबद्दल प्रसिद्ध आहे. कांची येथेही जेव्हा विश्वमातेने ३२ धर्मांचे पालन केले तेव्हा लोकांना अन्नदान केले. कांची येथील कामाक्षी मंदिराच्या गाभाऱ्याच्या द्वारासमोर, अन्नपूर्णेश्वरीचा गाभारा आहे. त्याला दक्षिणेतील कोणत्याही मंदिरापेक्षा भिन्न असे विमान किंवा मनोरा आहे. त्याला सहा शिखरे आहेत. काशीमधील अन्नपूर्णेश्वरीच्या मंदिराच्या शिखराशी त्याचे साम्य आहे. हे त्याचे भिन्न असण्याचे स्पष्टीकरण आहे. कांची आणि काशी अशा एकमेकांपासून दूर असलेल्या ठिकाणांमध्येही अशा लहान बाबतीतही एकवाक्यता आहे. मग स्थलपुराणे काही महत्त्वाची नाहीत असे मानून सोडून द्यायची का?

-----

## प्रकरण - १८

# स्थल पुराणांचे महत्त्व

माझ्या मतानुसार स्थल पुराणे फक्त आपली इतिहासाची दृष्टी समर्थ बनवितात असे नसून स्थानिक संस्कृतीचे आणि स्थानिक रूढींचे आपले ज्ञान समृद्ध करतात. मला असे वाटते की जर ती (स्थल पुराणे) एकत्र वाचली तर १८ महत्त्वाची पुराणे आणि उपपुराणांपेक्षा अधिक प्रकाश आपल्या इतिहासावर टाकतील. वस्तुतः ती मुख्य पुराणांमधील रिकाम्या जागा भरतात.

स्थानिक दंतकथा, इतिहास योग्य प्रकारे समजण्यात मदत करतात. उदा. आजकाल सुशिक्षित लोक, शंकराचार्य भगवत्पाद यांनी यापैकी एका मंदिराला भेट दिली किंवा तेथील पूजेला एक व्यवस्था लावली यावर विश्वास ठेवत नाहीत. ते वाद करतात की, "ते महान अद्वैती होते आणि ज्ञानमार्गाचे पुरस्कर्ते होते, भक्ती, मंदिरातील पूजा, आगम आणि वेद इ.बाबत त्यांना चिंता नव्हती." त्यांनी एकमेकांपासून हजार मैल दूर असलेल्या काही विशिष्ट मंदिरांचे पुनरुज्जीवन केले, असे सांगणाऱ्या कथा तपासून पाहू. अशा कथा आणि दंतकथांवरून त्यांचा आचार्यांशी असलेला संबंध निश्चित होतो. हिमालयातील बद्रिनाथ मंदिरात पूजा करणारा पुजारी हा केरळचा नंपुरिति ब्राह्मण असतो - त्याला 'रावल' म्हटले जाते. येथे मद्रासमध्येही तिरुवोर्रियूरच्या त्रिपुरसुंदरी मंदिरातील पूजाही नंपुतिरि करतो. आचार्य हे नंपुतिरि होते; त्यांनी पुनरुज्जीवित केलेल्या मंदिरात त्यांचे सहकारी असलेल्या नंपुतिरिंची, पूजा करण्यासाठी नेमणूक केली. हे तोंडी सांगितले जाते त्याचा पुरावा आहे.

आपल्याला धर्माचे धडे देण्यात स्थल पुराणे प्रमुख पुराणांपेक्षा कमी नाहीत. वस्तुतः शेकड्यांत असलेली स्थल पुराणे धर्माच्या आकर्षक मुद्यांवर प्रकाश टाकतात. दुर्दैवाने आजच्या सुशिक्षित वर्गातील धार्मिक वृत्तीची माणसेही असमाधानकारकरित्या त्यांचा विचार करतात. परंतु, अलीकडच्या काळापर्यंत तमिळनाडूतील विद्वान माणसांकडून या पुराणांना मान दिला गेला आहे. श्रेष्ठ तमीळ विद्वानांनी महान संतांच्या नावावरील अस्तित्वात असलेली पुराणे आणि अनेक स्थल पुराणे लिहिली. तमीळमध्ये स्थाने आणि मंदिरे यांचे महत्त्व आणि अर्थ वर्णन करणारे साहित्य आहे - ते साहित्य स्थल पुराणे, मान्मियम, कलंबगम्, उल इ. नावांनी ज्ञात आहे. (महिमा म्हणजे थोरवी; मान्मियम हे त्याचे तमीळ रूप आहे.)

तमीळ साहित्य हे संगम, तेवारम-दिव्यप्रबंधम् आणि कंबर-ओट्टकूत्तर अशा कालखंडात विभागलेले आहे. सोळाव्या शतकाचे, स्थल पुराणांचा काळ असे विद्वान वर्णन करतात. अशा साहित्याचे प्रमुख कर्ते, कमलै, ज्ञानप्रकाशर आणि शैव एल्लप्पनावलर हे आहेत. स्थल पुराणांच्या कर्त्यांवरून आपल्याला त्यांची योग्यता समजते. त्या कर्त्यांमधील काही असे

आहेत - कच्चियप्प शिवाचारियार (त्यांनी कंद पुराण रचले), परंज्योती मुनी (तिरुविलयादल पुराणाचे कर्ते), उमापती शिवाचारियार (शैववादाचे श्रेष्ठ अध्यापक), शिवप्रकाश स्वामी, इरट्टै पुलवर, अन्तक्कवीवीरराघव मुदलिआर, कोट्टैयूरशिवक्कोझुंदु देशिगर, त्रिकुट राशप्पक्कविरायर. अलीकडच्या काळात महाविद्वान मीनाक्षीसुंदरम् पिलै होते. ते यु. व्ही. स्वामिनाथअय्यरचे गुरू होते. त्यांनी अनेक स्थल पुराणे लिहिली आहेत. यावरून आपल्या लक्षात येते की तमीळ धार्मिक परंपरा आणि साहित्यात स्थल पुराणांना आदराचे स्थान आहे.

श्रेष्ठ संस्कृत पंडित आणि शास्त्राचे अधिकारी करुंगळम् कृष्ण शास्त्रींनी 'वेदारण्य माहात्म्य' नावाचा तमीळ ग्रंथ लिहिला आहे.

तमीळ राज्यकर्त्यांनी स्थल पुराणांना आणि त्यांच्या प्रचाराला पाठिंबा दिला. साडेचारशे वर्षांपूर्वी पंचनद - क्षेत्र (तिरुवैयारु, तंजावूर). संबंधीच्या पुराणांचे तमीळमध्ये भाषांतर झाले. तंजावूरच्या नायक राज्याच्या स्थापनेला जबाबदार असलेल्या गोविंद दीक्षित यांच्या इच्छेनुसार मी हे कार्य हाती घेतले असा अनुवादक उल्लेख करतो.

-----

## प्रकरण - १९

# पुराणांचे जतन करणे

हजारो वर्षे प्रतिकारक शक्तींच्या विरुद्ध जाऊन आपल्या मंदिरांनी आणि त्यांच्याशी निगडित उत्सवांनी आपल्या धार्मिक परंपरांचे पोषण केलेले आहे. प्रत्येक मंदिराची सांगण्याजोगी एक कथा असते, प्रत्येक मंदिराच्या उत्सवामागे एक दंतकथा असते. या पुराणांमध्ये त्या जतन केलेल्या आहेत. हा महान वारसा, महान खजिना टाळणे वा त्याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे हे आपल्या लोकांच्या धार्मिक भावनांना गंभीर हाती पोहोचवणे.

पूर्वी, जेव्हा छापखाने नव्हते तेव्हा भूर्जपत्रावरील हस्तलिखितांचे पिढ्यानुपिढ्या दक्षतेने जतन केले गेले. आजकाल छापखान्यातून मोठ्या प्रमाणात पुस्तके निर्माण होत असताना, त्यातील बहुसंख्य आपल्या आत्मविकासाला मारक असताना, त्यांच्याकडे (हस्तलिखिते) दुर्लक्ष करणे योग्य आहे का? भावी पिढ्यांसाठी पुराणे जतन करणे हे आपले कर्तव्य आहे. तसे न करणे हे प्रेरणास्थान हिरावण्यासारखे आहे.

-----

## प्रकरण - २०

# भूर्जपत्र-हस्तलिखिते, वाचनालये

पूर्वीच्या काळी प्रत्येक घरात भूर्जपत्रांची हस्तलिखिते जपून ठेवलेली असत. त्यात महाकाव्ये, पुराणे, स्थल पुराणे इ.चा समावेश होता. जेव्हा भूर्जपत्रे खराब होण्याचा धोका असे तेव्हा त्यातील मजकुराची नव्या पानांवर नकल केली जाई. खराब झालेली पाने कावेरी नदीत किंवा अन्य नदीत किंवा पतिनेट्टामप्रसंगी एखाद्या तलावात सोडून दिली जात असत.

तमीळ महिना आदि (जुलै-ऑगस्ट)च्या १८व्या दिवसाला कावेरीबाबत एक विशेष अर्थ आहे. नदीला पूर येतो. या दिवशी पूर आलेल्या पाण्याला पतिनेट्टाम पेरुक्कु किंवा पतिनेट्टाम पेर म्हटले जाते.

आपले पूर्वज भूर्जपत्रावर त्यांच्या लेखणीने हात दुखेपर्यंत लिहीत असत. त्यांनी भावी पिढ्यांसाठी जुन्या ग्रंथांची नकल करून ठेवली. ही परंपरा कदाचित आपल्या वाडवडिलांपर्यंत टिकली. आपल्या पिढ्यांनी त्यांच्या नकला न करता ही मौल्यवान हस्तलिखिते नदीत फेकली. त्यामुळे आता अनेक पुराण ग्रंथ कधीकाळी आपल्याला उपलब्ध होतील का याची शंकाच आहे. फक्त पुराणेच नव्हे तर अनेक शास्त्रेही. तरीपण काही विद्वानांनी ठिकठिकाणी जाऊन, हस्तलिखिते जमा करून, ग्रंथालयामध्ये जतन करण्यासाठी खूप कष्ट घेतले आहेत. तंजावूरचा सरस्वती महाल ग्रंथालय आणि मद्रासचे अड्यार ग्रंथालय येथे हस्तलिखितांचा चांगला संग्रह आहे. अड्यारच्या तंजावूरच्या थिऑसॉफिकल सोसायटी ग्रंथालयाने याबाबत स्तुत्य काम केले आहे. सरभोजी/सरफोजी आणि तंजावूरच्या इतर राज्यकर्त्यांनी, सरस्वती महालासाठी हस्तलिखिते गोळा करण्यात खूप कष्ट घेतले. भूर्जपत्राला तमिळमध्ये 'एडु' म्हणतात. त्याला मध्यावर एक शीर असलेल्या दोन बाजू असतात. मधली शीर काढल्यावर राहिलेल्या दोनपैकी एकीला 'एडु' म्हणतात. केळीच्या पानालाही शीर असते. जेव्हा ते शिरेवर दुभंगते तेव्हा प्रत्येक भागाला 'एडु' म्हणतात. बराच काळ भूर्जपत्र हा आपला कागद होता. निसर्गाचा कागद, जो सहजासहजी खराब होत नसे. त्यावर लेखणीने अक्षरे लिहिली जात.

ज्ञानसंबंधरचा ग्रंथ असलेले, तेवारमच्या रचना असलेली भूर्जपत्रे 'वैगै' नदीच्या प्रवाहात विरुद्ध वाहत गेली आणि काठावर थांबली. जेथे हस्तलिखित थांबले त्याला 'तिरुवेडकम्' (तिरु+एडु+अकम्) म्हणतात. येथे शिवाला 'पत्रिका परमेश्वर' म्हटले जाते. हल्ली पेपर म्हटले म्हणजे वृत्तपत्र, मासिक, नियतकालिक समजले जाते. आजकाल पत्रिका म्हणजे नियतकालिक. ज्या ठिकाणी भूर्जपत्रे, निसर्गाचा कागद पडून राहिले त्या ठिकाणचा देव 'पत्रिका परमेश्वर' आहे, जो पत्रकारांचा देव समजता येईल. 'पत्र' आणि 'पत्रिका' याचा अर्थ एकच, एक पान. पूर्वी भूर्जपत्रावर पत्रे लिहिली जात. म्हणून अशा लेखी संदेशालाही पत्र

म्हणण्यात येऊ लागले.

सरस्वती महालाबाबत एक मजेशीर गोष्ट आहे. पूर्वीच्या काळी एखादा आक्रमक एखाद्या देशाची खूप हानी करण्यासाठी तेथील ग्रंथालये जाळण्याचा विचार करीत असे. एखाद्या देशाच्या अर्थशास्त्राला जसा पैशाचा खजिना तसे त्याच्या संस्कृतीला ग्रंथालय असे. ग्रंथालय त्या देशाच्या सांस्कृतिक खजिन्याचे प्रतीक असे. त्या काळात छापखाने नसल्याने ग्रंथांच्या अनेक नकला नसत (भूर्जपत्राच्या) आणि काही ग्रंथांची एकच प्रत असे. एखाद्या राष्ट्राचे दुर्मिळ साहित्य असलेले ग्रंथालय नष्ट करणे, हे खजिना लुटणे किंवा स्त्रियांची विटंबना करण्यापेक्षा अधिक मोठे निंद्य कृत्य असे. आपल्याला अभिमान वाटला पाहिजे की आपली शास्त्रे, शत्रूच्या देशातील ज्ञानाचा खजिना आणि पूजास्थाने नष्ट करण्याला मनाई करतात, तेथील स्त्रियांची विटंबना करण्यास अनुमती देत नाहीत.

जेव्हा अमरसिंहासारखे जैन, हिंदू धार्मिक गुरूंपुढे वादात हरले तेव्हा त्यांना त्यांची पुस्तके जाळावयाची होती, पण आपल्या आचार्यांसारख्या महान माणसांनी त्यांना तसे करण्यापासून थांबविले, आपल्या विरोधकांचे हात धरून त्यांनी त्यांना त्यांची पुस्तके न जाळण्याची विनंती केली. त्यांचा दृष्टिकोन असा होता की कोणतेही तत्त्वज्ञान किंवा धार्मिक संप्रदाय त्या साहित्याने उचलून धरलेला असो ते साहित्य नष्ट होता कामा नये.

इतर देशांतील विजेते, जिंकलेल्या भूमीत सांस्कृतिक विकास झालेला असेल तर तेथील ग्रंथालयांना आगी लावण्यात विशेष आनंद घेत असत. ते असे निंद्य कृत्य करण्यापूर्वी क्षणभरही विचार करीत नसत की वस्तुतः ज्ञान जरी शत्रूकडे असले तरी ते सर्वांना समान असते. त्यांच्यापेक्षा बौद्धिक दृष्ट्या श्रेष्ठ असलेल्या लोकांना ते अपरिमित दुःख देऊ शकत. १५व्या-१६व्या शतकात मुस्लिम आक्रमकांनी इजिप्तमधील अलेक्झांड्रिया ग्रंथालयात (अलेक्झांडरच्या काळापासून गोळा केलेले ग्रंथ त्यात होते) आणि कॉन्स्टॅन्टिनोपल (इस्तंबूल) येथील ग्रंथालयाला (जे शतकांपूर्वी ग्रीक आणि रोमन लोकांनी बांधलेले होते.) आगी लावल्या. एकदा समुद्राला उधाण आले असता असे पुराणसंबंधित साहित्य वाहून गेले - ते निसर्गाचे कृत्य होते. पण सांस्कृतिक मागासलेपणामुळे परकीय शक्तींनी, त्यांनी आक्रमण केलेल्या देशातील ग्रंथालये नष्ट केली.

जेव्हा मुस्लिम शक्ती दक्षिणेकडे सर्वत्र पसरली आणि कर्नाटकच्या नवाबाचा वरचष्मा होता तेव्हा एकदा तंजावूरचा सरस्वती महाल दहशतीखाली होता. मुस्लिम आक्रमकांच्या दृष्टीने सरस्वती महाल जाळणे हे, तंजावूरचे महान मंदिर-तमीळमध्ये पेरिया कोयिल म्हटले जाणारे बृहदीश्वराचे मंदिर नष्ट करण्याइतकेच होते. त्यावेळेस मराठा राजाचा डबीर शास्त्री नावाचा एक महाराष्ट्रीय ब्राह्मण मंत्री होता. त्याला ग्रंथालय वाचविण्याची एक युक्ती सुचली. ते त्या विध्वंसकांना म्हणाले, ''या ग्रंथालयात अर्थात हिंदू पुस्तके आहेत. पण त्यात कुराणाच्या

अनेक प्रती आहेत.'' ''काय? कुराणसुद्धा?'', आक्रमक ओरडून म्हणाले, ''तर मग आपण ग्रंथालयाला आग लावणार नाही.'' असे म्हणून ते निघून गेले.

नंतर भारतात इंग्रज, फ्रेंच आणि इतर परकीय आले. त्यांना ज्ञानप्राप्तीची आणि संशोधनाची तहान होती आणि ते परकी स्रोतातून ज्ञान मिळविण्यास उत्सुक होते. जर्मन सुद्धा आले आणि त्यांनी त्यांच्याबरोबर त्यांच्या देशात नेण्यासाठी भूर्जपत्रांच्या हस्तलिखितांचा शोध घेतला. ज्यांच्या प्रयत्नांमुळे आपण आपली अनेक शास्त्रे पुन्हा शोधून काढू शकलो. त्या परकीयांचे आपण कृतज्ञ राहिले पाहिजे. उदा. मॅकेन्झी हा भारताचा सर्व्हेअर जनरल होता. तो भूर्जपत्रांची हस्तलिखिते गोळा करण्यासाठी ठिकठिकाणी गेला. त्यावेळेस त्यासाठी वेगळा विभाग नव्हता. पण मॅकेन्झीने ती तज्ज्ञांकडून वाचून घेतली आणि जतन करण्यासाठी पावले उचलली. मॅकेन्झीची माणसे आपल्या कुंभकोणमच्या मठातही माहिती घेण्यासाठी आली होती.

सरस्वती महालातून आपली शास्त्रावरची हस्तलिखिते, विशेषतः युद्धकलेवरची हस्तलिखिते इंग्रजांनी स्वतःबरोबर नेली असे मानले जाते. हिटलरने या ग्रंथांमधील ज्ञानावर आधारित काही प्रकारची शस्त्रे आणि विमाने बनविली असाही पुढे दावा केला जातो.

भोजराजाच्या समरांगण सूत्रासारखी ताड-पत्रावरील हस्तलिखिते अजूनही आहेत. यावरून आपल्याला असे समजते की फार पूर्वी आपल्याकडे समंत्र सोडावयाची अस्त्रेच नव्हे तर विज्ञाननिर्मित शस्त्रेही होती. वराहमिहिराच्या बृहत्संहितेसारखे सारांश अहवाल आपल्या भूमीतील विविध ज्ञानशाखा एकत्र आणतात.आपल्या काही ताड-पत्रावरील हस्तलिखितांमध्ये फक्त आपल्या धार्मिक संप्रदायाचा नव्हे तर विविध कला आणि शास्त्रांचा तसेच पुराणांमध्येही समावेश आहे. पण आपण आपली अनेक स्थल पुराणे गमावली आहेत. जे काही आहे ते जतन करण्याच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. शिवाय अधिक हस्तलिखितांचा शोध घेणे चालू ठेवले पाहिजे.

वेदांनी निवेदन केलेले परमात्म्याचे सत्य, धर्म यावरील गुंगवून टाकणाऱ्या कथा आणि त्यांनी घालून दिलेले आचरणाचे नीतिनियम असलेली पुराणे आपल्याला सूचना देतात. त्यांनी आपल्याला केलेला बोध आपल्या हृदयाला स्पर्श करतो. पुराणातील पाठ, त्यातील थोर पुरुष आणि स्त्रियांच्या कथा यांनी आपल्या जीवनाला आकार दिला आहे. अतिपुरातन काळापासून पुराणांनी आपल्या लोकांचा प्रेरणास्रोत म्हणून काम केलेले आहे. आपण त्यांच्याबाबतीत उदासीन असता कामा नये आणि ती जतन करण्यासाठी निश्चित प्रयत्न केले पाहिजेत. आपण पुराण वाङ्मयाचा तुलनात्मक अभ्यास केला पाहिजे आणि त्याच्याशी सुसंबद्ध दृष्टिकोन स्वीकारला पाहिजे. ते आपल्या तसेच मानवजातीच्या कल्याणासाठी लाभदायक ठरेल.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

भाग - १५

## धर्मशास्त्र

## प्रकरण - १

# पुराणांचे आदर्श जाणणे

पुराणातील प्रसिद्ध असलेली उदात्त व्यक्तिमत्त्वे आपल्यासाठी आदर्श असतात. जेव्हा आपण त्यांच्या कथा वाचतो तेव्हा त्यांच्या उदाहरणांवरून आपल्याला प्रेरणा मिळते आणि आपण आपल्यालाच विचारतो की आपण त्यांच्यासारखे का होऊ नये, आपण त्यांचे गुण का घेऊ नये? पण आपण जरी त्यांच्या जीवनाशी बरोबरी करायची झाले तर त्यांनी अंगीकारलेल्या उच्च तत्त्वांपासून कधीही दूर न जाता आपण त्यांच्यासारखे जीवन जगू शकू का?

मनुष्य जात्याच अस्थिर असतो; तो क्षणभरही त्याचे मन शांत ठेवू शकत नाही. भगवान गीतेत म्हणतात :

''न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।। ३.५

मनुष्य एक क्षणही काहीही न करता शांत राहू शकत नाही. म्हणून प्रत्येकाला कर्माचा योग्य मार्ग ज्ञात असलाच पाहिजे. माणसाने त्याचे मन शुद्ध केले पाहिजे, उच्च गुण प्राप्त केले पाहिजेत आणि शेवटी त्याच गुणांच्या पलीकडे जाऊन ब्रह्म जाणले पाहिजे.

आपण आपल्या धर्माच्या सिद्धांतानुसार कसे जगू शकतो? आपण आपली पापे नष्ट करून आत्मशुद्धी कशी करू शकतो? आणि चिरंतन सौख्य प्राप्त करण्यासाठी आपण काय केले पाहिजे? आपला वर्तमान जन्म हा आपल्या पूर्वजन्मातील केलेल्या पापाचा परिणाम नाही का? आपण त्यांच्यापासून मुक्त व्हायला हवे आणि नवीन पापे न करण्याविषयी दक्ष असले पाहिजे. आपण आपल्याला, आपल्या मनाला आणि शीलाला, वरच्या पातळीवर नेले पाहिजे ज्यायोगे आपण पुन्हा पापात ओढले जाणार नाही. आपल्याला उदात्त करणे आणि पापापासून दूर नेणे हा धर्माचा हेतू असतो. पण कसे? आपल्या धर्माच्या उपदेशाप्रमाणे कसे जगू शकू? आपल्याला कसे ते माहीत नाही.

सद्यस्थितीत आपल्याला काय माहीत आहे असे वाटते? कदाचित, थोडे रामायण, थोडे भागवत आणि इतर पुराणे. या वाङ्मयात रंगविलेल्या व्यक्तिरेखा कशा जीवन जगल्या हे आपण माहीत करून घेतो. पण पुराणे किंवा महाकाव्यात संग्रहरूपात धार्मिक विधी देत नाहीत किंवा त्यांच्या आचरणाविषयी दिग्दर्शन करीत नाहीत. पुराणे आणि महाकाव्ये भक्तीला महत्त्वाचे स्थान देतात. सदैव भक्तीत मग्न राहणे किंवा रात्रंदिवस भजन करणे हे शक्य आहे का? किंवा त्यासाठी तसेच पूजेत व्यग्र राहणे किंवा सतत चिंतन करणे? नाही. आपल्याला काळजी घेण्यासाठी कुटुंब असते. आपल्याला स्नान करायचे असते आणि भोजन

करायचे असते आणि इतर पुष्कळ कामे करायची असतात - या सर्वांना वेळ लागतो. उरलेला वेळ पूजेसाठी बाजूला काढून ठेवता येत नाही. हे सर्व थकवा आणणारे असते आणि शिवाय आपल्याला इतर चांगली कामे करायची असतात. अशी माहिती आपल्याला कोठून मिळते ?

हे ज्ञान आपल्याला धर्मशास्त्रातून मिळते. चौदा विद्यांमध्ये (चतुर्दश विद्या) धर्मशास्त्र शेवटी येते. आपला आदर्श असलेल्या पुराणातील पात्रे आपल्याला आपले ध्येय दाखवितात. ते ध्येय गाठण्यासाठी असलेला मार्ग कर्म करण्यापासून सुरू होतो. धर्मशास्त्रात आपली कर्तव्ये, आपल्याकडून केले जाणारे विधी याबाबत व्यावहारिक सूचना असतात. वेदांमध्ये या कर्तव्यांविषयी इथे-तिथे उल्लेख केलेला आहे. धर्मशास्त्र हे एक उपांग आहे ज्यात त्यांविषयी तपशिलाने आणि संग्रहरूपात येते.

अगदी स्नान करणे आणि भोजन करणे अशा वैयक्तिक आणि कौटुंबिक बाबतीतदेखील योग्य मार्ग आहे. वेदाज्ञा जीवनाच्या सर्व पैलूंना प्रकाशित करतात आणि त्यांचे पालन करणे आपणास उदात्त करते. जे काही आपण करू ते योग्य पद्धतीने केले पाहिजे - आपण कसे पहुडतो, कसे कपडे घालतो, आपण आपले घर कसे बांधतो. कल्पना अशी आहे की हे सर्व आपल्या आत्म्याला मदत करते. जीवन हे निधार्मिक, भौतिक आणि धार्मिक असे विभागता येणार नाही. वैदिक धर्म असा आहे की धार्मिक वृत्तीने ऐहिक गोष्टींना प्रेरणा मिळते. जे कर्म केले जाते ते समंत्र केले जाते आणि आत्म्याच्या विकासाचे साधन बनते. ऐहिक जीवन आणि धार्मिक जीवन हे सुसंगत ठेवले जाते आणि तसेच वैयक्तिक मोक्ष आणि सामान्य कल्याण हेही एकत्र ठेवले जाते.

पुराणांमधून आपण जी भक्ती शिकतो ती वेदांचा भाग आहे. ती सत्कर्माशी निगडित असते. जेव्हा भक्ती पूजेसारख्या विधीचे रूप घेते तेव्हा काही ठरावीक नियम पाळावयाचे असतात. पूजेशिवाय यज्ञ, श्राद्ध यांसारखे विधी आणि तर्पण हेही वैदिक धर्माचे महत्त्वाचे भाग आहेत. पण ते वेदात संग्रहित केलेले नाहीत किंवा त्या प्रत्येकाची पद्धत सांगितलेली नाही.

''वेदोऽखिलो धर्ममूलं'', वेद हे सर्व धर्माचे मूळ आहे असे मनू म्हणतो. आपल्या आत्म्याच्या कल्याणासाठी वेदांनी जी कर्मे सांगितली आहेत ती जगाच्या कल्याणाचा हेतूही साध्य करतात. ज्याला धर्म म्हटले जाते तो व्यक्ती आणि समाज असे दोन्हींच्या कल्याणास मदत करतो. वेद हे या धर्माचे मूळ आहे, उगमस्थान आहे. पण वेदात विधी आणि कर्तव्ये हे क्रमाने येत नाहीत, किंवा दिलेल्या कर्तव्यांची तपशीलवार पद्धत दिलेली नाही. अनंत असलेल्या वेदांचा आपण फक्त एक लहान भाग प्राप्त केलेला आहे आणि या लहान भागाच्या अनेक वेच्यांचा संपूर्ण अर्थही आपणास समजू शकत नाही.

आपण पाहिले की सहावे वेदांग, कल्प यात वेदांवर आधारलेल्या विधींशी संबंधित धर्मसूत्रे, गृह्यसूत्रे आणि श्रौतसूत्रे यांचा समावेश आहे. पण सूत्रे थोडक्यात असतात आणि

तपशिलाने मार्गदर्शक होत नाहीत. धर्मशास्त्रे काहीही शंका न राहू देता ती सूत्रे काळजीपूर्वक स्पष्ट करतात.


धर्मसूत्रे (आपस्तंब, गौतम आणि इतरांची) संक्षिप्त, मुद्देसूद विधाने आहेत आणि सूत्राच्या व्याख्येप्रमाणे आहेत. धर्मशास्त्रांना (मनू, पराशर आणि इतरांची) स्मृती म्हटली जाते आणि ती श्लोकस्वरूपात असतात आणि आचरणाबाबत तपशिलाने असतात. तथापि त्यांचा पाया वेदांनी तयार केलेला असतो. वेदातील नियम आणि आज्ञा यांची काहीएक मर्यादेपर्यंत व्यवस्था ज्यांनी लावली अशा कल्प सूत्रांचे पृथक्करण करणे आणि स्पष्ट करणे हे धर्मसूत्रांचे कार्य होय. जर कल्प यज्ञकुंड आणि घरे इ. बांधण्याविषयी सूचना देत असतील तर धर्मशास्त्र संपूर्ण मानवी कृत्यांना अंतर्भूत करणारे नीतिनियम सांगते.

आपल्याला एखादा विधी करायचा आहे, पण तो कसा करायचा? आपल्याला त्याच्या आचाराचे नियम, त्यांचे औचित्य यांचा वेदांमध्ये कोठे उल्लेख आहे हे माहीत नसते. त्याच्या सूचना कोठे असतात ते आपल्याला माहीत नसते. मग आपण काय करायचे? ज्याने सर्व वेदांवर प्रभुत्व मिळविले आहे असा कोणी आपल्याला माहीत नसतो. आपल्याला करावयाच्या विधीची माहिती वेदांतून काढणे अशक्य आहे. कारण मोठ्या सागरासारखा त्यांचा विस्तार आहे. जर वेदांनी आपल्याला सांगितले की, ''असे करा.'' तर आपण तसे करतो. पण जर आपल्याला त्यांचे नियम / आज्ञा पुरेशा माहीत नसतील तर आपण काय करायचे? या प्रश्नांना मनूने उत्तरे दिली आहेत : ज्या ऋषींनी वेदांवर प्रभुत्व मिळविले त्यांनी स्मृतींची रचना केली. त्यांना काय म्हणायचे आहे ते स्मृतीत शोधा. ज्यांना आपण स्मृती म्हणतो त्यांनी धर्मशास्त्र बनते.

''वेदोऽखिलो धर्ममूलं / स्मृतिशिले च तद्‌विदाम्''

जे लक्षात ठेवले ते स्मृती. विस्मृती म्हणजे असमजूतदारपणा. मनू म्हणतो, ''स्मृती म्हणजे टिपणांच्या रूपातील वेद. ज्या ऋषींना वेदांचे सखोल ज्ञान होते त्यांनी वेदातील कर्तव्ये आणि विधी टिपणांच्या रूपात एकत्र आणली आणि तीच स्मृती बनतात. आपल्याला सहज समजेल अशा भाषेत ती आहेत. ती वाचा. ती आपल्याला तपशिलाने आपली कर्तव्ये सांगतात. काय करा आणि करू नका, आणि विधी कसे करायचे हे ते सांगतात.''

आपण पाहिले की सहावे वेदांग कल्प यात वैदिक विधींबाबत सूचनांचा समावेश आहे. कल्पाची गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे आणि श्रौतसूत्रे आहुती आणि इतर विधींची चर्चा करतात. स्मृती त्यांचे स्पष्टीकरण करतात आणि त्यांच्यात एखाद्याला संपूर्ण आयुष्यभर करायच्या विधींबाबत तपशीलवार सूचना देतात. वस्तुतः गर्भधारणेपासून मृत्यूपर्यंत करायवयाचे विधी त्यात आहेत. स्मृतींनी आपण करावयाची दैनिक नित्यकर्मे घालून दिलेली आहेत.

-----

## प्रकरण - २

# स्मृती आणि आनुषंगिक वाङ्मय

मनू, पराशर, याज्ञवल्क्य, गौतम, हारित, यम, विष्णू, शंख, लिखित, बृहस्पती, दक्ष, अंगीरस, प्रचेतस, संवर्त, अचनस्, अत्रि, आपस्तंब आणि शातातप या अठरा ऋषींनी वेदांवर त्यांच्या अलौकिक शक्तिद्वारे प्रभुत्व मिळविले आणि त्यातून स्मृती निर्माण केल्या. त्यांचे वाङ्मय त्यांच्यामागे मनुस्मृती, याज्ञवल्क्य-स्मृती इ. नावांनी ओळखले जाते आणि धर्मनिष्ठ राहात संपूर्ण जीवनात आपले आचरण कसे असावे याविषयी सर्व संबंधित माहिती त्यात आहे.

या अठरा स्मृतींच्याशिवाय उपस्मृती म्हटल्या जाणाऱ्या अठरा गौण स्मृती आहेत. त्यांचे कर्ते असे आहेत : जाबालि, नाचिकेतस्, स्कंद, लौगाक्षि, काश्यप, व्यास, सनत्कुमार, शंतनु, जनक, व्याघ्र, कात्यायन, जातूकर्ण्य, कपिंजल, बौधायन, कणाद, विश्वामित्र, पैठीनस, गोभिला. भगवद्गीतेचा समावेश स्मृतींमध्ये करण्याची प्रथा आहे.

एका स्मृतीत दिली गेलेली माहिती दुसऱ्या स्मृतीत आपणास आढळणार नाही. दोन स्मृतींत मतभेद असण्याची देखील शक्यता आहे. यामुळे निर्माण झालेल्या शंका ज्या ग्रंथात दूर केल्या गेल्या आहेत त्याला 'धर्मसूत्र निबंधन' म्हणतात.

सर्व विधींसंबंधी सूचना नसलेल्या काही स्मृती आहे. उदाहरणार्थ, काही स्मृती संध्यावंदनेचा उल्लेख करीत नाहीत. त्याचे कारण असे असावे की हा सर्वसामान्य विधी प्रत्येकालाच माहिती असावा. काही श्राद्ध विधी वगळतात आणि काही विविध प्रकारच्या 'दूषित'स्थितीसंबंधात गप्प बसतात. (उदा. सोयर-सुतक : कुटुंबात बालकाच्या जन्मामुळे किंवा एखाद्या नातलगाच्या मृत्यूमुळे) काही बाबी गृहीत धरलेल्या असतात. शेवटी आपल्याला श्वसन कसे करायचे, खायचे कसे हे सांगावे लागत नाही.

प्रत्येक धर्म आपली स्वतःची अशी काही बंधने पाळतो. उत्तरेकडे ती काशिनाथ उपाध्याय यांची आहेत. महाराष्ट्रात मिताक्षर आहे : त्याला कायद्याइतके बळ आहे आणि न्यायालयांनी ती स्वीकारली आहेत. कमलाकर भट्टाच्या 'निर्णयसिंधु'लाही अधिकारी म्हणून मान्यता आहे. दक्षिणेकडे वैद्यनाथ दीक्षितांचा वैद्यनाथ-दीक्षितयम् वापरले जाते. गृहस्थाश्रमींना ही महत्त्वाची आहेत. संन्यासी विश्वेश्वर-संहिता अनुसरतात. तमीळनाडूत धर्मशास्त्र म्हणजे वैद्यनाथ-दीक्षितयम्. या निबंधनाचे तमीळमध्ये भाषांतर झालेले आहे.

धर्मसूत्रे वेदांइतकी समजण्यास कठीण नाहीत आणि संस्कृतच्या थोड्याशा ज्ञानाने ती सहज समजू शकतात.

-----

## प्रकरण - ३

# वैद्यनाथ - दीक्षितयम्

वैद्यनाथ दीक्षितांच्या स्वतःच्या साहित्यकृतीचे नाव स्मृती-मुक्ताफल-निबंधन-ग्रंथ आहे. या अतिशय उपयुक्त असलेल्या पुस्तकाच्या लेखकाविषयी आपल्याला फार थोडे माहीत आहे. दीक्षित सुमारे दोनशे वर्षांपूर्वी होऊन गेले; ते नाच्चियार्कोयिल (तंजावूर जिल्हा) जवळील कण्डिरमाणिक्कम्‌चे होते. त्यांनी निबंधनात चर्चा केलेल्या धर्माचे स्वतः आचरण केले आणि मोठे यज्ञ केले असे मानले जाते.

'वैद्यनाथ-दीक्षितम्' हा ग्रंथ मेधातिथी, विज्ञेश्वर, हेमाद्री आणि अन्य ग्रंथकारांच्या ग्रंथांपेक्षा सरस मानला जातो. परिपूर्ण असलेल्या या ग्रंथात निरनिराळ्या जाती आणि आश्रम (जीवनाच्या चार अवस्था) यांची कर्तव्ये आणि संस्कार, विधीतील शुद्धता, श्राद्ध, प्रायश्चित्त, स्त्रीधर्म, दायभाग द्रव्य-शुद्धी याबाबतचे विषय आहेत. तो ग्रंथ पैतृक संपत्तीच्या विभागणीबाबत दिग्दर्शन करतो. जेव्हा स्वतंत्र भारतात हिंदु कोड बिल सादर केले गेले तेव्हा काहींनी असा दृष्टिकोन मांडला की संपत्तीचे विभाजन शास्त्रावर आधारलेले असले पाहिजे. अशा विभाजनाला 'दायभाग' म्हणतात. केरळमध्ये काका-पुतण्याच्या बाजूने होते, त्याला 'मरुमक्कतायम्' म्हणतात. (ही मातृसत्ताक पद्धती आता केरळात नाही. 'मरुमक्कतायम्'नुसार एखादा मरण पावला तर त्याची संपत्ती त्याच्या बहिणीच्या मुलांकडे येत असे.) दायादि हा शब्द दाय पासून आला आहे.

निबंधनापैकी दीक्षितयम् हे शेवटचे निबंधन होय. या ग्रंथाच्या तयारीत वैद्यनाथ दीक्षित यांना धर्मशास्त्रावरील पूर्व साहित्याच्या अभ्यासाचा फायदा झाला. त्यांच्यापूर्वी दक्षिणेत काही मर्यादित तोझाप्परचे निबंधन अनुसरले जायचे. वैष्णव आणि स्मार्त दोघेही दीक्षितम्‌च प्रमाण म्हणून स्वीकारतात.

निबंधने ही वेद (श्रुती), कल्प-सूत्रे आणि स्मृती यांसारखी नाहीत. ती उशिरा आल्याने सर्वांकडून स्वीकारली जात नाहीत. दीक्षितांच्या साहित्यात थोडाही पूर्वग्रहदूषितभाव दिसत नाही आणि त्यांनी वेदांतील मजकुराचा अर्थ लावण्यासाठी मीमांसेचे अनुकरण केले. त्यांनी सर्व शास्त्रे एकत्र आणली आणि त्यांच्यातील विरोध संपवून ते निर्णयाप्रत आले. म्हणूनच त्यांचे कार्य दक्षिणेत प्रमाणभूत म्हणून मानले जाते. जेव्हा स्मृती काही बाबतीत मान्यता देत नाहीत तेव्हा ते विशाल दृष्टिकोन घेतात आणि सुचवितात, ''प्रत्येकाला त्याच्या आचारधर्माच्या आणि वाडवडिलांच्या परंपरा पाळू द्या.''

-----

प्रकरण - ४

# स्वातंत्र्य आणि अनुशासन

माणसाच्या जीवनात लक्षावधी पैलूंचा विचार करावयाचा असतो. त्यातील प्रत्येकासाठी नियम घालून दिले जाऊ शकत नाहीत. ते कायदेशीर नियम करण्याजोगे होईल. एखाद्या प्रणालीच्या बंधनात ठेवण्यासाठी कायदे खरोखरच आवश्यक असतात. आपल्या शास्त्रात 'करा' आणि 'करू नका' अशा अनेक वर्तननियमांचा समावेश आहे.

आजकाल स्वातंत्र्य आणि लोकशाहीबद्दल बरेच बोलले जाते. आपण व्यवहारात काय पाहतो? स्वतःला आवडेल तसा वागण्याचा परवाना, स्वतःच्या लहरीचे लाड करणे, हा स्वातंत्र्याचा अर्थ होऊ लागला आहे. बलवान आणि उद्धट हे दुर्बळ आणि सद्गुणी लोकांचे उत्पीडन करतात, त्रास देतात. यासाठी निश्चित कायदे आणि नियम यांनी लोकांना बांधून ठेवण्याची गरज जाणवते. तरीपण बंधने फार असता कामा नयेत. बंधनांवरही बंधन हवे. व्यक्ती आणि समाज कितपत बंधनात राहू शकतील याची मर्यादा ठरवावी लागते. एखाद्या माणसाला अनेक नियम आणि कायदे यांनी गुदमरवून टाकणे म्हणजे त्याच्यातले चैतन्य हरपवणे होय. तो ती बंधने तोडेल आणि त्यापासून दूर पळून जाईल.

म्हणून आपल्या शास्त्रांनी प्रत्येक विषयात न लिहिता सर्वसामान्य नियम केले. अनेक बाबतींत लोकांनी ज्येष्ठांना वा थोरांना अनुसरणे सुचविले. मला मोठेपणाचा मान देत तुम्ही स्वतःही नाही का मी करतो तसे करता म्हणजे भस्म लावता, पूजापाठ करता, उपवास पाळता वगैरे. काही बाबतींत लोकांना परंपरा पाळण्याचे किंवा एखाद्या व्यक्तीच्या उदाहरणानुसार वा स्थानिक / कौटुंबिक प्रथेनुसार वागण्याचे स्वातंत्र्य असते. केवळ अशाच प्रकारे अन्य बाबतींत लोकांची नियमांवर आदराने आस्था, श्रद्धा राहते.

इतरांना त्यांची कर्तव्ये किंवा धर्माचरण करायला लावण्याचा सर्वोत्कृष्ट मार्ग म्हणजे स्वतःच्या जीवनाद्वारे त्यांना उदाहरण घालून देणे. त्यानंतरचा सर्वोत्कृष्ट मार्ग म्हणजे ते करण्यासाठी त्यांचे मन वळविणे. तिसरे, अर्थात लिखित नियमांच्या रूपातील सक्ती. हल्ली प्रत्येक गोष्टीसाठी लिखित कायदे आहेत. कोणीही लेखणी आणि कागद घेऊन मनात येते ते लिहितो आणि छापून आणतो.

असंख्य नियमांनी आणि कायद्यांनी माणसाच्या जीवनात आज्ञा देत त्याला मनाप्रमाणे वागू न देण्यामुळे, हिंदू धर्मशास्त्रावर हल्ले होतात. पण वस्तुतः ही शास्त्रे त्याच्या स्वातंत्र्याचा मान राखतात आणि त्याला अनेक क्षेत्रांत स्वतःच्या मनाप्रमाणे वागू देतात. जर त्याला अनियंत्रित स्वातंत्र्य दिले तर तो त्याचा स्वतःचा नाश करून घेईल आणि समाजाचासुद्धा नाश करेल. आपल्या शास्त्रांनी आचरणाचे नियम घालण्याचा हेतू, त्याला ठरावीक बंधनात ठेवणे हा

होता. पण हा नियम सर्व कार्ये व्यापून टाकत नाही. कारण आपल्या शास्त्रवेत्त्यांना वाटते की लोकांना धार्मिक बंधनाच्या साखळ्यांनी जेरबंद करू नये.

तुम्हाला वाटेल की जीवनाच्या काही पद्धतींबाबत शास्त्रात सक्तीचा एक भाग आहे. पण जेव्हा तुम्ही परंपरांचे, स्थानिक आणि कौटुंबिक रूढींचे किंवा थोरांच्या उदाहरणांचे पालन करता तेव्हा तुम्हाला ती (सक्ती) जाणवणार नाही. तुम्हाला ते कार्य करण्यात अभिमान वाटेल. हे वास्तव वैद्यनाथ-दीक्षितयम्च्या कर्त्याने मोठ्या मनाने स्वीकारले आहे. पूर्वीच्या ग्रंथांचाही हाच दृष्टिकोन होता. आपस्तंब सूत्रे सर्वत्र पाळली जातात. त्याच्या समारोपात महान ऋषी आपस्तंब म्हणतात, ''मी सर्व कर्तव्यांची चर्चा केलेली नाही. अजून अनेक धर्मांचे ज्ञान घ्यायचे आहे. ती (कर्तव्ये) तुम्ही स्त्रिया आणि चतुर्थवर्णाकडून माहीत करून घ्या.'' यावरून हे स्पष्ट होते की पुरुषांनी स्त्रियांना दडपून टाकले किंवा ब्राह्मणांनी ब्राह्मणेतरांना दडपले, हे खरे नाही. आपस्तंबसारख्या प्रसिद्ध आणि सर्वमान्य धर्मशास्त्रज्ञाने स्त्रियांना आणि शूद्रांना, धर्माच्या काही पैलूंबाबत ज्ञानी असल्याचे अधिकाराने सांगितले आहे.

स्त्रियांच्या शब्दाला विवाहातील आरती आणि 'पच्ची' (तमीळ लोकांत विवाहाचेवेळी तेलात कुंकू भिजवून केलेले मिश्रण नवरीच्या अंगाला लावतात. त्यास 'पच्ची' म्हणतात.) लागू करण्याबाबत मान दिला पाहिजे, असे आश्वलायन आणि सूत्रांचे मूळ कर्ते म्हणतात. विवाहाच्या मंडपाचे आधार देणारे खांब समंत्र बसवावे; तरीपण जर एखाद्या नोकराला किंवा कामगाराला त्याबाबतची एखादी गोष्ट किंवा परंपरा सांगायची असेल तर तुम्ही तिच्याकडे दुर्लक्ष करता कामा नये. अशाप्रकारे शास्त्रांमध्ये प्रत्येकाला मान दिलेला आहे आणि ज्याला लोकशाही स्वातंत्र्य म्हणतात ते दिलेले आहे. परमगुरू त्याला ''जननायक स्वातंत्र्यम्'' ही संज्ञा वापरतात.

धर्मशास्त्रांमध्ये संस्कार आणि चतुर्थवर्णाने करावयाच्या विधींचा समावेश आहे. जातीकडे दुर्लक्ष केलेले नाही आणि तिची कर्तव्ये; विधी यांचा उल्लेख दीक्षितयम्मध्ये वर्णाश्रम, आन्हिक आणि श्रद्धा यांच्यावरील प्रकरणात आहे.

धर्मशास्त्रात नेहमीच आचार आणि व्यवहार यांवर प्रकरणे असतात. पहिला सामान्य शिस्त म्हणून असलेल्या रूढी आणि परंपरा दर्शवितो. दुसरा म्हणजे त्याचे बाह्य वर्तनात रूपांतर दाखवितो.

-----

## प्रकरण - ५

# चिन्हे आणि प्रतीके

आपण जर स्वतःस हिंदू म्हणवत असू तर आपण ठरावीक बाह्य खुणा किंवा बाह्य प्रतीके धारण करावयास हवी. बालवीरांचा त्यांचा असा गणवेश असतो. लष्कर आणि नाविक दलातील माणसांमधील फरक त्यांच्या बाह्य चिन्हांमुळे लक्षात येतो. पोलीस दलात अनेक विभाग आहेत. त्यांनी एकमेकांचे गणवेश किंवा बिल्ले बदलले तरी कार्यात फरक पडणार नाही. पण त्यांच्या वेश आणि चिन्हांविषयी कडक नियम आहेत. पोलिसाची टोपी खलाश्याने परिधान करता कामा नये. या सर्व दलांमध्ये एक शिस्त आणि सुसूत्रता असते.

ही शिस्त आणि ही नियमव्यवस्था धर्मातही आवश्यक असते. म्हणूनच वेगवेगळ्या जाती आणि आश्रमांना भिन्न भिन्न कार्ये आणि चिन्हे असतात. धर्मशास्त्रानुसार आपण धोतर किंवा साडी अशा विशिष्ट पद्धतीने नेसली पाहिजे किंवा कपाळावर विशिष्ट पद्धतीने टिळा लावला पाहिजे, हे सर्व केवळ सामाजिक शिस्तीसाठी नाही. यामागे एक उच्च हेतू आहे, तो म्हणजे आपल्या आंतरिक जीवनाचे शुद्धीकरण.

न्यायालयातील चपराशाला बिल्ला लावलेला पट्टा असतो. अधिकाऱ्याला तो नसतो. त्याला का नाही असे विचारणे शहाणपणाचे आहे का? पण असाच दृष्टिकोन आपण लोकांच्या व्यवसायावरून आणि कुळपरंपरेवरून दिल्या गेलेल्या चिन्हांबाबत ठेवत नाही. आपण समतेच्या नावाखाली आवाज उठवीत असतो. आपण जरी व्यवसायाने विभागलेले असू तरी - जो खरोखरच संपूर्ण समाजाच्या कल्याणासाठी असतो - आपण एकाच हृदयाचे आहोत. निरनिराळ्या जातींच्या नैसर्गिक गुणानुसार आणि उपजीविकेच्या साधनांवरून समाजव्यवस्थेत दिल्या गेलेल्या वेगवेगळ्या विधींमागे आणि बाह्य चिन्हांमागे एक आदर्श आहे. यात उच्च आणि नीच असे काही नाही. पण तसा भेद आहे असे मानून आपण आपापसात भांडणे करीत असतो.

आता आपण अशा स्थितीला येऊन पोहोचलो आहोत की आपल्या धर्माचे कोणतेही बाह्य चिन्ह कोणीही धारण करीत नाही. त्याचवेळेस आपल्याला इतर प्रकारचे वेष आणि प्रतीके धारण करण्यात खंत वाटत नाही. जी चिन्हे आत्म्याचे उन्नयन करतात ती वापरण्याची आपल्याला लाज वाटते. आपण सर्व धार्मिक चिन्हे आणि प्रतीके यांचा अंधश्रद्धा म्हणून त्याग करतो. पण जे स्वतःला सुधारणावादी म्हणून जाहीर करतात ते विशिष्ट प्रकारची टोपी किंवा उत्तरीय परिधान करतात आणि या बाह्य स्वरूपाच्या, अधिकार दर्शविणाऱ्या वस्त्रांना दिव्य रूपाच्या प्रतीकांपेक्षा अधिक महत्त्व दिले जाते.

-----

## प्रकरण - ६

# स्मृती - स्वतंत्र रचना नव्हे.

धर्मशास्त्राला जे मान देतात त्यांच्यासह सर्वांमध्ये धर्मशास्त्राबद्दल एक चुकीची धारणा झालेली आहे. त्यांना वाटते की स्मृतींचे नियम आणि कर्तव्ये ही त्यांच्या कर्त्याकडून स्वतःच्या मनाप्रमाणे बनविली गेली आहेत. ते या कर्त्यांना स्मृतिकार म्हणतात, त्यांच्या मते त्यांनी स्वतःचे दृष्टिकोन व्यक्त करणारे कायदे घालून दिले. पुढे त्यांना असेही वाटते की आपल्या घटनेप्रमाणे धर्मशास्त्रे बनविली गेली. असा दृष्टिकोन दुसरी एक कल्पना निर्माण करतो. जेव्हा एखाद्या उपाययोजनेच्या मार्गात घटना येते तेव्हा आपण तीत दुरुस्ती करीत राहतो. त्याच तर्कावर असे विचारले जाते की सध्याच्या काळानुसार श्रद्धा आणि कल्पना यांच्यानुसार धर्मशास्त्रानेसुद्धा का बदलू नये ?

लोक मला विचारतात, "काळाला योग्य होईल असे शास्त्रांनी का बदलू नये ? शासन त्याचे कायदे बदलते, नाही का ?" ते माझी स्तुती करतात आणि मला सांगतात, "तुम्ही स्मृतिकार ऋषींसारखे आहात. तुम्ही जर ठरविले तर आपल्या काळास योग्य अशाप्रकारे स्मृती बदलू शकाल." वस्तुतः ते सन्मानाने मला हे सुचवितात, "कृपया, आम्हाला आवडेल अशी शास्त्रे बदला."

जर स्मृती खरोखरच त्यांच्या कर्त्यांचे दृष्टिकोन व्यक्त करीत असतील तर, लोक त्यासंबंधी जो विचार करतात आणि त्यांना त्यांच्यासंबंधी मी काय करावे असे वाटते यात काही चूक नाही. ज्यांना धर्मशास्त्र बदलायला हवे त्यांना हे माहीत नसते की त्या (स्मृती) ज्यांनी रचल्या त्यांचे दृष्टिकोन व्यक्त करीत नाहीत. स्मृतिकारांनी काय केले, तर त्यांनी फक्त वेदात जे अगोदरच होते ते आपल्यापुढे व्यवस्थितपणे सादर केले. वैदिक शब्द केव्हाही आणि कोणत्याही कारणास्तव बदलला जाऊ शकत नाही किंवा बदलता कामा नये.

मी, शास्त्राप्रमाणे जीवन जगण्यासाठी तुमचे मन वळविण्यास असमर्थ किंवा पुरेसा पात्र नसेन. पण ते बदलणे हे माझे कार्य नाही. लोकांना त्यांची कर्तव्ये आणि विधी करायला लावण्यासाठी माझी येथे (मठात) नेमणूक झाली आहे. ती आचार्यांच्या आज्ञेनुसार आहे. सद्यस्थितीला किंवा नवीन श्रद्धानुसार जे सोयीस्कर वाटते त्यानुसार शास्त्रात सुधारणा करण्याचा मला अधिकार नाही.

ऋषींनी स्वतःचे दृष्टिकोन दर्शविण्यासाठी स्वतः स्मृतींची रचना केली असती तर त्या स्वीकारण्याची सक्ती करण्याची गरज नाही. स्मृतींची गरज नसेल तर आपण त्या सरळ नाकारू शकतो. जर त्या वेदांवर आधारलेल्या नसतील आणि त्यात कर्त्यांचे दृष्टिकोन व्यक्त होणारे नियम आणि मार्गदर्शन असेल तर आपण त्यांच्याविना भागवू शकू. अशा प्रकारे अनेक

लोकांनी अनेक विषयांवर लिहिलेले आहे. आपणही आपल्या मनात येईल ते लिहू शकतो. स्मृतीकडे आपण आजचे आणि उद्याचे आणि सदैव अधिकारी म्हणून पाहिले पाहिजे. कारण त्या वेदांवर आधारलेल्या आहेत. पण या दाव्याला पुरावा काय?

-----

## प्रकरण - ७

# स्मृतींचा मूलस्रोत वेद आहेत.

स्मृती वेदांवर आधारलेल्या आहेत या दाव्याला सर्वोत्कृष्ट पुरावा महाकवीच्या शब्दांनी दिलेला आहे. शंकराचार्य, रामानुजाचार्य आणि मध्वाचार्य हे धार्मिक-तत्त्वज्ञानाच्या प्रणालींचे संस्थापक म्हणतात की आपले धर्मशास्त्र वेदानुसार आहे. पण त्यांना प्रत्येकाला एक तत्त्वज्ञान स्थापन करायचे होते. शिवाय त्यांच्यापुढे परंपरा जतन करण्याचे ध्येय होते आणि साहजिकच ते त्याविरुद्ध जाऊ शकणार नव्हते. कवीच्या बाबतीत वेगळे आहे. त्याला कोणत्याही तत्त्वज्ञानाची स्थापना करायची नसते, कोणत्याही श्रद्धेला उत्तेजन द्यायचे नसते. त्याला जे सत्य वाटते ते तो बोलतो. कारण त्याला कोणत्याही एका संकल्पनेचे किंवा प्रणालीचे समर्थन करायचे नसते.

महा कवींमधील सर्वश्रेष्ठ कवी कालिदास त्याच्या रघुवंशामध्ये स्मृतीचा संदर्भ देतो.

तुम्हाला सर्वांना माहीत आहे की दशरथ हा रामाचा पिता होता. दशरथाचा पिता अज आणि अजाचा पिता रघु होता. रामाचे रघुराम हे नाव त्याच्या पणजोबावरून ठेवले गेले. रामाच्या नावांमध्ये आपल्याला दाशरथी हे नाव नेहमी आढळत नाही. नेहमी एखाद्याचे नाव त्याच्या आजोबावरून ठेवले जाते. पण रामाला त्याच्या आजोबाचे नाव मिळाले नाही आणि तो पणजोबावरून ओळखला जातो. रघुला अशी कीर्ती आणि वैभव होते. राघव याचा अर्थही रघुच्या कुटुंबातील एक.

दिलीप रघुचा पिता होता. त्याला बऱ्याच काळापर्यंत मुलगा नव्हता. दिलीपच्या कुटुंबाचे गुरू वसिष्ठ होते. दिलीप त्यांना भेटला आणि म्हणाला, ''स्वामी, मला मूलबाळ नाही. माझे कुटुंब चालू राहील आणि त्याची भरभराट होईल असा आशीर्वाद द्या.'' वसिष्ठाकडे कामधेनूची मुलगी, नंदिनी नावाची गाय होती. ऋषीने राजाला त्या गायीची काळजी घ्यायला आणि श्रद्धेने तिची पूजा करायला सांगितले. त्याने दिलीपला आशीर्वाद दिला : ''तुला एक मुलगा होईल.'' याचा विचार करा, एका राजाला एका गायीची काळजी घ्यायला सांगितले गेले - तो किती नम्र असला पाहिजे.

दिलीपने त्या गायीचा ताबा घेतला. गुराख्याप्रमाणे त्याने नंदिनीला जंगलात नेले, तिला चारले, तिला स्नान घातले आणि तिची श्रद्धेने काळजी घेतली. तिचे वन्य पशूंपासून संरक्षण करण्यासाठी केवळ एकाच बाणानिशी धनुष्य बरोबर बाळगीत असे. तो तिला गोंजारत असे आणि ती थांबली की तोही मार्गात थांबत असे, ती पहुडली तर तोही पहुडत असे, ती चालू लागली की तोही चालू लागे. जर आपण खाली बसलो तर आपली सावली खाली बसल्यासारखी वाटते, जर उभे राहिलो तर आपली सावली उभी राहिल्यासारखी वाटते, जर

आपण पळालो तर आपली सावलीसुद्धा पळाल्यासारखी वाटते. ''छायेव तां भूपतिरन्वगच्छत्'' कालिदास म्हणतो. दिलीप गायीच्यामागे सावलीसारखा गेला.

रोज दिलीप गायीला चरायला घेऊन जाई. त्यावेळेस त्याची पत्नी सुदक्षिणा त्याच्यामागे काही अंतर जात असे आणि परत घरी येत असे. अगदी धार्मिकतेने ती तिच्या पतीला नंदिनीबरोबर बाहेर पाठवत असे आणि संध्याकाळी ते रानातून परत येईपर्यंत वाट पाहत असे. सुदक्षिणा दिलीपची काळजी घेत असे आणि ज्याप्रमाणे दिलीप नंदिनीच्यामागे सावलीसारखा जात असे त्याप्रमाणे ती सुद्धा त्याच्यामागे सावलीसारखी जात असे.

जनकाने त्याच्या कन्येच्या- सीतेच्या रामाशी झालेल्या विवाहप्रसंगी पतिव्रता धर्माचे वर्णन केले आहे. तो रामाला म्हणतो, ''माझी कन्या सीता तुझ्यामागून सावलीसारखी येईल. (छायेवानुगता)

'पतिव्रता महाभाग छायेवानुगता सदा, इत्युक्त्वा प्राक्षिपद्राजा मंत्रपूर्वं जलं तदा' - असा वाल्मीकी रामायणात उल्लेख आहे. वाल्मीकीने सांगितलेली कथा कालिदासाने पुन्हा सांगितली. तो रामानंतर आलेल्या लव आणि कुश, तसेच त्यांच्या पूर्वजांबद्दल सांगतो. आणि त्याच्या महान काव्याला, रामाचे अद्वितीय कीर्ती प्राप्त केलेले पणजोबा रघु यांचे नाव देत सांगतोः या कुटुंबाविषयी बोलणे म्हणजे स्वतःची वाणी पवित्र करणे होय.

सुदक्षिणा दिलीपच्यामागून तो गायीला चरायला नेत असता कशी जात होती याचे वर्णन करणाऱ्या परिच्छेदात कवी स्मृती रचणाऱ्या ऋषींचा संदर्भ देतो. तो कोणत्याही तत्त्वज्ञानाचा पाठपुरावा करीत नाही किंवा कोणत्याही विचाराच्या मागे जात नाही. तो सहजपणे, उत्स्फूर्तपणे स्मृतींबद्दल बोलतो. सुदक्षिणा काही अंतर गायीच्या मागे जाते याचे कवी वर्णन करतो. नंदिनी पुढे आहे आणि सुदक्षिणा तिच्या मागून चालते. गायीच्या खुरांमुळे थोडी धूळ उडते आणि ती राणी त्या पवित्र धुळीकडे पाहत काही अंतर जाते. कालिदास सर्व कवींना उपमेच्याबाबतीत मागे टाकतो. प्रत्येक कवीचे एखादे तरी वैशिष्ट्य असते. एक म्हण आहे : ''उपमा कालिदासस्य'' (उपमेसाठी कालिदास- कालिदास उपमेत इतरांना मागे टाकतो.) सुदक्षिणा नंदिनीच्या मागे जाते. या संदर्भात कवी, स्मृती वेदांच्या मागे गेल्या तसे राणी गायीच्या मागे गेली अशी उपमा वापरतो.

तस्याः खुरन्यासपवित्रपाम्सुं अपाम्सुलानां धुरि कीर्तनिया
मार्गं मनुस्येश्वरधर्मपत्नि श्रुतेरिवार्थं स्मृतिरन्वगच्छत् -रघुवंश २.२

पाम्सु म्हणजे धूळ. नंदिनी चरायला जात असता धूळ उडते. ''खुर'' म्हणजे नख्या. खुरंन्यास म्हणजे खुर ठेवणे आणि पवित्र पाम्सुं म्हणजे पवित्र धूळ.

गायीच्या खुरामुळे उडालेली धूळ पवित्र असते. ती कोणतेही स्थान पवित्र करते. हे

फक्त कामधेनूची कन्या नंदिनीबाबतच आहे असे नव्हे तर सामान्य गायीने उडविलेल्या धुळीबाबतही आहे. सुदक्षिणा ही निष्कलंक चारित्र्याची स्त्री आहे - तिच्यावर धुलिकणाएवढा लहानसा डागही नाही - आणि अशा स्त्रीवर आता गायीची धूळ आहे. अपाम्सुं म्हणजे धुळीपासून मुक्त आणि त्याचा संदर्भ निष्कलंक चारित्र्याच्या सुदक्षिणेशी आहे. ती गायीच्या खुरांनी उडविलेल्या धुळीने पवित्र झालेल्या मार्गावर एकेक पाऊल टाकत जाते. कशी? ऋषींनी रचलेल्या स्मृती जशा वेदांच्या मागे जातात - ''श्रुतेरिवार्थ स्मृतिरन्वगच्छत्.''

''अन्वगच्छत''= (ती) मागे गेली. येथे गायीसाठी उपमान (ज्याच्याबरोबर तुलना केली ते) श्रुती किंवा वेद. गायीचे खुर हे वेदांचा अर्थ म्हणून घेण्यात आलेले आहेत.

स्मृती वेदांच्यामागे गेल्या तशी सुदक्षिणा नंदिनीच्या खुरांमागे गेली. शिवाय जशा स्मृती वेदांबरोबर संपूर्ण मार्गात नसतात तशी सुदक्षिणासुद्धा गायीबरोबर सर्व अंतर गेली नाही. स्मृती वेदांनी सांगितलेले सर्व पुन्हा सांगत नाहीत. त्या म्हणजे वेदांच्या स्मृतीतून आलेली टिपणे आहेत पण त्या वेदांच्या अर्थाचे अनुसरण करतात. अर्थातच स्मृती ग्रंथातील हजारो मंत्र पुनश्च सादर करीत नाहीत. मात्र एकूणच त्या वेदानुसार आचरण कसे असावे ते सांगतात.

''सुदक्षिणा तिच्या शुद्ध अंतःकरणाने तिच्या पतीच्या मागे गेली आणि तेही नंदिनीच्या खुरांनी उडालेल्या धुळीच्या मार्गाने थोडीही विचलित न होता चालत राहिली.'' एवढे म्हणूनही कालिदासाला वाटले की गायीच्या धुळीच्या मागे जाणाऱ्या सुदक्षिणेसाठी चांगली उपमा योजावी आणि त्याला ती क्षणात स्फुरली : ''स्मृती वेदांच्या अर्थाला अनुसरतात तशी.''

उपमान हे उपमेयापेक्षा श्रेष्ठ असते. म्हणजे ज्याची तुलना करायची ते ज्याच्याबरोबर तुलना करायची त्यापेक्षा गौण असते. जर मुखाची तुलना कमळाबरोबर किंवा चंद्राबरोबर तुलना केली तर ते मुखापेक्षा अधिक सुंदर असले पाहिजेत. येथे अतुल शुद्ध चारित्र्याच्या सुदक्षिणेचे आपल्या पतीमागे जाणे हे स्मृतींच्या वेदांमागून जाण्यासारखे आहे. स्मृती वेदांशी मिळत्याजुळत्या आहेत या दृष्टिकोनाला पुष्टी देणारा यापेक्षा अधिक चांगला आधार नाही.

-----

## प्रकरण - ८

# श्रुती - स्मृती, श्रौत - स्मार्त

श्रुती आणि स्मृती यांच्यात भेद करणे योग्य नाही. श्रुती, स्मृती आणि पुराणे एकाच परंपरेतील आहेत. संस्कार हा तिन्हींचे निवासस्थान आहे. (श्रुति-स्मृति-पुराणनां आलयं). जर त्या एकमेकांत वितुष्ट असेल तर ते एकाच व्यक्तीत एकत्रितपणे सुसंगतपणे कसे राहू शकतील?

जे आचार्यांची परंपरा पाळतात त्यांना स्मार्त म्हटले जाते. स्मार्तचा शब्दशः अर्थ स्मृतींना चिकटून राहतो तो. आचार्य पृथ्वीवर वेदांना समर्थन करण्यासाठी भूतलावर अवतीर्ण झाले आणि जे त्यांचा मार्ग अनुसरतात ते स्मार्त असतात. हे ध्वनित करते की वेद आणि स्मृती एकच आहेत.

वेदांमध्ये स्पष्टपणे न उल्लेखलेले विधी स्मृतींमध्ये असतात. त्यांना स्मार्त कर्मे म्हणतात आणि ज्यांचा उल्लेख असतो ती श्रौत कर्मे होत. याचा अर्थ असा नाही की स्मार्त विधी हे श्रौत विधींपेक्षा गौण आहेत. गृहस्थाश्रमी स्मार्त कर्मांमध्ये, औपासनासारखे विधी असतात; ती श्राद्ध आणि सात पाकयज्ञांसारख्या गृह्यकृत्यांइतकीच महत्त्वाची असतात. या सर्वांमध्ये वैदिक मंत्र म्हटले जातात. ज्यांनी स्मृतींची रचना केली आणि अशा विधींचे पालन आखून दिले त्यांना वेदांचे पूर्ण ज्ञान होते. वेदांपेक्षा स्मृती गौण आहेत किंवा पुराणे स्मृतींपेक्षा गौण आहेत असे मानणे योग्य नाही. आपण त्या सर्वांच्याबाबतीत एकत्रित दृष्टिकोन ठेवला पाहिजे.

पुराणांमध्ये वेदांमधील सत्ये गोष्टीरूपाने स्पष्ट केलेली असतात. नेहमी म्हटले जाते तसे वेद ऋषींनी रचले नाहीत - त्यांना ते दिसले. त्यात त्यांच्या बौद्धिक प्रयत्नांचा भाग नव्हता. ''श्रुतिं पश्यन्ति मुनयः'' (ऋषींना वेद दिसले). त्यांनी जे दिसले त्याचे परीक्षण करण्यासाठी बुद्धी वापरली आणि ते सर्व आठवून विविध जातींसाठी कर्तव्ये आणि कर्मे त्यापासून प्राप्त केली.

त्यांनी ती आपल्याला स्मृती म्हटल्या जाणाऱ्या रचनेत संग्रहित रूपात दिली. मी पूर्वी म्हणालो की स्मृती म्हणजे स्मरण. ऋषींना वेद हे अनुभव झाले, ते त्यांना सहजपणे घडले. त्यांच्या स्मरणातून स्मृती आणि धर्मशास्त्रे आली. ''संस्कार- जन्यं ज्ञानं स्मृतिः'' न्यायशास्त्र स्मृतींची अशी व्याख्या करते. म्हणजे स्मृती हे संस्कारातून काढलेले ज्ञान आहे. येथे संस्कार म्हणजे अतींद्रिय. पण त्याचा नेमका अर्थ काय?

आपण काशीला जातो आणि विश्वनाथाच्या मंदिरात पूजा करतो. घरी परतल्यानंतर बऱ्याच दिवसांनी आपण स्थानिक मंदिरात विश्वनाथाच्या गाभाऱ्यात जातो. आपल्याला

ताबडतोब काशीच्या मंदिरातील विश्वनाथाच्या मूर्तीचे दर्शन घेण्याचा अनुभव आठवतो. आपली काशीची भेट आणि स्थानिक मंदिराची भेट या दरम्यानच्या बऱ्याच दिवसांत त्या मूर्तीची आपल्याला आठवण नव्हती. आपल्याला रोज बरेच लोक भेटतात. पण आपण त्यांचा विचार करीत नाही. पण आपण त्यांना कालांतराने पाहिले तर स्वतःशीच म्हणतो, ''अरे, आपण यांना कोठेतरी पाहिलेले आहे.'' त्या दरम्यान त्या लोकांचे स्मरण नव्हते. या मधल्या स्थितीला संस्कार किंवा अतिंद्रिय म्हटले जाते. त्या स्थितीत आपल्या आत त्या अनुभवाचा ठसा असतो. हा ठसा जेव्हा बोलण्यात व्यक्त होतो, तेव्हा आपल्याला स्मृती किंवा स्मरण होते. स्मृती हा अनुभवाचा परिणाम असतो आणि संस्कार हा आपल्या आतील अनुभवाचा ठसा असतो.

वेदांनी बनलेला आणि स्मरणाने व्यक्त झालेला अनुभव म्हणजे स्मृती किंवा धर्मशास्त्र. वेदांच्या आधाराविना स्मृती या स्मृती होत नाहीत. अनुभवास आलेले वेद हे स्मृतींचे मूलस्रोत नाहीत का? अशा स्रोतांशिवाय स्मरणातील निदर्शने हे नाव अर्थहीन होईल. नवीन आणि पूर्वी स्थापित झालेली नाही अशा एखाद्या गोष्टीचे स्मरणातील निदर्शने असे वर्णन आपण कसे करू शकतो?

'श्रौत'(वेदात प्रत्यक्ष उल्लेखलेले) असे ज्याला म्हटले जाते ते पूर्णतः प्रामाण्य असलेले आहे याबाबत दुमत नाही. मात्र ज्याचा उल्लेख श्रुतींमध्ये नाही पण स्मृतींमध्ये आहे - म्हणजे स्मार्त - हे कमी प्रामाण्य असलेले आहे असे नाही. स्मार्त श्रौतांच्या विरोधी नाही. काही बाबतींत स्मृती श्रुतींच्या पलीकडे जातात पण त्याही श्रुतींच्या अंतर्गत चैतन्याचा आधार असल्याने पूर्ण प्रमाण आहेत. जसे प्रमुख पुराणांमधील रिकाम्या जागा स्थल पुराणे भरून काढतात, तसेच स्मृती वेदांनी सोडून दिलेल्या जागांचे विवेचन करतात. आपण श्रुतिप्रमाण आणि स्मृतिप्रमाण (वेदप्रमाण आणि स्मृतिप्रमाण) हे शब्द वापरतो. पण असा फरक करणे म्हणजे श्रुती आणि स्मृती भिन्न आहेत असे मानणे नव्हे किंवा एक-दुसऱ्यापेक्षा गौण आहेत असे नव्हे.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - १६
## चाळीस संस्कार

# संस्कार

मी संस्कार हा शब्द वर (प्रकरण-१५, भाग ८) वापरला. मी तर्कशास्त्रानुसार (तर्क विज्ञान) त्याचा अर्थ स्मरणावर पडलेला ठसा असा स्पष्ट केला. पण सामान्यतः हा शब्द असा समजला जात नाही. सम=ठीक; कर=बनवणे. संस्कार म्हणजे काहीतरी चांगले करणे, ते शुद्ध करणे.

माणसाला शुद्ध करून परमात्म्याशी एकरूप होण्यास योग्य बनविणाऱ्या संस्कारांची चर्चा धर्मशास्त्रे करतात. कल्पसूत्रावर आधारलेल्या आणि मनुष्याने आयुष्यभर करावयाच्या चाळीस संस्कारांचे तपशीलवार विवेचन आपल्याला धर्मशास्त्राद्वारे प्राप्त होते.

-----

## प्रकरण - २

# स्वर्ग किंवा आत्मज्ञानाचा मार्ग?

आपले भौतिक अस्तित्व हे सुख-दुःखाचे मिश्रण असते. काहींना जास्त सुख मिळते आणि काहींना जास्त दुःख मिळते. एखादी दुर्मिळ व्यक्ती कुठेतरी असू शकते, जी दुःखातही तिच्या मनावर नियंत्रण ठेवते आणि हसत राहते. याउलट, आपल्याला बरेच लोक असे दिसतात की सुखी राहण्यासाठी त्यांच्याजवळ खूप काही असूनही त्यांचे चेहरे दुःखी असतात. जर एखाद्याकडे काही अभाव असेल तर त्याचा अर्थ तो दुःखी आहे.

सर्व प्राणी चिरंतन सौख्याची इच्छा बाळगतात. चिरंतन सौख्याची दोन ठिकाणे आहेत. एक देवलोक, देवांचे जग किंवा स्वर्ग आणि दुसरे म्हणजे आत्मस्वरूपाची जाणीव असलेली स्थिती. आत्मा हा आनंदस्वरूप; ब्रह्म असतो. हे सत्य जाणणे म्हणजे चिरंतन कृपा प्राप्त करणे होय. पण ही स्थिती, हा सर्वोच्च आनंद मनाने किंवा इंद्रियांनी अनुभवता येत नाही. ही सर्वोच्च, उदात्त स्थिती असते आणि ती इंद्रिये आणि मनाच्या पलीकडची असते, या स्थितीत माणसाला जाणीव असते की ''मी म्हणजे शरीर नव्हे, मी म्हणजे बुद्धी नव्हे, मी म्हणजे जाणीव नव्हे.''

स्वर्गात सतत इंद्रियांनी आणि मनाने सौख्य अनुभवले जाते. संगीत आणि नृत्य - गंधर्वांचे संगीत, रंभा आणि मेनकेचे नृत्य, कल्पतरू म्हणजे कल्पक, सर्व इच्छा पूर्ण करतो, कामधेनू, ही गाय सर्व इच्छा पूर्ण करते, नंदनवन नावाची बाग हे सर्व म्हणजे देवलोक. तो एक क्रीडास्थान असून तेथे निरंतर आनंद असतो. परंतु स्वर्गातील आनंद आणि आत्मज्ञान झालेल्याचा आनंद यात अंतर आहे. स्वर्गात चिरंतन सौख्य असते हे खरे आहे. पण जो तेथे जातो तो त्याच्यासाठी नव्हे. कारण तो तेथील कायमचा रहिवासी नसतो. जर त्याने बरेच पुण्य मिळविले असेल तर त्याचा पुनर्जन्म होईपर्यंत तो तेथे राहू शकेल. जेव्हा तो त्याच्या पुण्यदायी कृत्यांच्या फळांचा उपभोग पूर्ण घेईल तेव्हा ईश्वर त्याला पुन्हा पृथ्वीवर पाठवेल. हे खरे आहे की पुराणात, जे बरेच पुण्य मिळवितात आणि स्वर्गातच राहण्यासाठी देवच बनतात अशा मर्त्यांची वर्णने आहेत. पण तीच पुराणे आपल्याला असेही सांगतात की देवही स्वर्गातील कायमचे रहिवासी नसतात. या ग्रंथांमध्ये देवांना स्वर्गातून हाकलून देणाऱ्या शूरपद्म आणि महिषासुरासारखे राक्षस आणि देवांचा राजा इंद्र याला दुःख सहन करण्यासाठी पृथ्वीवर पाठविल्या गेल्याच्या कथा आहेत.

गृहीतकांच्या आधारावर, स्वर्गातील सौख्य आपले असू शकेल. पण तेथे प्रत्यक्षात कोणी राहिल्याचे उदाहरण नाही किंवा तसे कोणाला शक्य आहे असे वाटत नाही.

इंद्रियांद्वारे मिळालेले सौख्य हे बाह्य वस्तूंपासून प्राप्त केले जाते. बाह्यवस्तू ह्या सदैव

आपल्याच असू शकत नाहीत. इंद्राला कामधेनू, कल्पक वृक्ष, स्वर्गातील हत्ती-ऐरावत आणि पत्नी इंद्राणी अशा सर्व गोष्टी गेल्यावर एकट्यालाच दुःख सहन करावे लागले असेही काही प्रसंग आहेत. म्हणून बाह्य वस्तूंवर अवलंबून असलेले असे स्वर्गातील सुख कायमस्वरूपी असू शकणार नाही. ''सदानंद'' किंवा शाश्वत कृपा अशासाठी असते की जिला अवलंबून राहण्याजोगे बाह्य किंवा अंतर्गत काही नसते आणि जो ईश्वराने गीतेत सांगितल्याप्रमाणे,



प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् । आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते । (अ-२, श्लोक ५५)

जो स्थितप्रज्ञासारखा स्वतःच्या आत्म्यात राहतो, जो आत्म्यात स्थिर राहतो. इंद्राकडून उपभोगला जाणारा आनंद हा या आत्मिक वरदानाच्या विशाल सागरातील एका थेंबासारखा आहे, असे आचार्य त्यांच्या मानिष-पञ्चकम् मध्ये म्हणतात, ''यद् सौख्यांबुदिलेशलेशत इमे शक्रादयो निवृताः''

उपनिषदांनुसार तुम्ही कणसातून देठ काढून टाकल्याप्रमाणे सर्व इंद्रिये आणि मन वजा केले आणि आत्मा म्हणूनच राहिलात (प्र.३३ भाग ५) तर तुम्ही चिरंतन सौख्य प्राप्त करू शकाल. ''मी शरीर नाही. त्याची सुखदुःखे माझी नाहीत.'' हे जाणून आपले शरीर आणि इंद्रिये यांचा त्याग करणे याला मोठे धैर्य लागते. हे धैर्य अंतरंगातील शुद्धतेशिवाय प्राप्त होत नाही. धार्मिक विधी हे चित्तशुद्धीसाठीच असतात. वैदिक मंत्राने माणसाला शुद्ध करणे आणि ते मंत्र असलेल्या विधींमध्ये सहभागाला प्रेरित करणे यासाठी चाळीस संस्कार आहेत.आत्म्याचे परमात्म्याशी अभेद होण्याच्या दिशेचे या पहिल्या पायऱ्या होत - हीच अद्वैत मुक्ती, अद्वैत मोक्ष होय.

आपण कर्मे करून आतून शुद्ध होण्याचा प्रयत्न करायला हवा. नंतर आतील इंद्रिये (अंतःकरण) शुद्ध झाल्यावर आत्म्याचे चिंतन केले पाहिजे आणि त्याच्याशी एकरूप व्हायला हवे; ही शंकराचार्यांची संकल्पना आहे. माणसापुढे असे ध्येय असेल आणि तो जर धार्मिक विधी करीत राहिला तर संन्यासी न होताही तो मृत्यूनंतर ब्रह्मलोकाला जाईल. महाप्रलयाच्यावेळी ब्रह्मा जेव्हा ब्रह्मन्शी तादात्म्य पावेल तेव्हा त्यालाही अद्वैत मोक्ष मिळतो, असे शंकराचार्य म्हणतात. पण एखाद्या माणसाने धार्मिक कर्मे काहीही ध्येय न ठेवता, केवळ कर्मासाठी कर्मे करायची म्हणून केली तर त्याला स्वर्ग मिळेल. पण शाश्वत असलेला स्वर्ग नव्हे. जरी तेथील निवास अल्पकालीन असला तरी तो पृथ्वीपेक्षा अधिक मोठे सौख्य मिळवेल. संस्कारच माणसाला स्वर्गप्राप्ती करून देतात.

-----

## प्रकरण - ३
# तीन प्रकारचे 'लोक'

आपण तीन जगांचा उल्लेख करतोः देवलोक (देवांचे जग), मनुष्यलोक (हे आपले जग) आणि नरक. पहिल्यात दुसरे-तिसरे काही नसून केवळ सौख्य असते; दुसऱ्यात सुख आणि दुःखाचे मिश्रण असते; आणि तिसऱ्यात दुसरे-तिसरे काही नसून फक्त यातना आणि दुःख असते. आपल्या शास्त्रानुसार ज्या माणसाने खूप भयंकर पापे केली असतील त्याला पुन्हा या जगात साधा जन्म घेईपर्यंत नरकातील क्लेशकारक अनुभवातून जावे लागते.

आपली शास्त्रेही असेच सांगतात की हे आपले जग इतर जगांपेक्षा अधिक चांगले आहे. कसे? येथून आपण कोणत्याही जगात जाऊ शकतो. जर एखाद्याला नरकाची शिक्षा झाली असेल तर तो त्यापासून सुटू शकत नाही आणि पापाबद्दलचे परिणाम भोगून संपेपर्यंत त्याला तेथेच राहणे भाग पाडले जाते. आपण स्वर्गात गेलो आणि आपल्याला कितीही इच्छा असली तरी आपण तेथील आपला मुक्काम वाढवू शकत नाही. जेव्हा आपल्या पुण्यकर्माची फळे संपतात तेव्हा आपल्याला पृथ्वीवर परत येऊन पडावे लागते. केवळ या लोकातच आपल्याला स्वातंत्र्य आहे आणि आपण आपल्या कर्मांनी पुण्य किंवा पाप मिळवू शकतो. आपण आपले हात पूजा करण्यासाठी वापरू शकतो - किंवा लोकांबद्दल वाईट बोलू शकतो. या जगात आपल्याला चांगले किंवा वाईट करण्याची शक्ती आहे. आपल्या प्रत्येक कर्मेंद्रियाला देवाने असे दुहेरी सामर्थ्य दिले आहे.

अशा प्रकारचे स्वातंत्र्य इतर जगांमध्ये नाही. एखादी गाय पुण्य मिळविण्यास समर्थ असते काय? देव गायीसारखे असतात. गायीचा विचार करता तिच्या जीवनात पुण्यही नाही आणि पापही नाही. या पृथ्वीवर (भूलोकात) आपल्यासारखे मानवच फक्त मोक्ष मिळवू शकतात - आपण हे आपल्या सत्कर्माद्वारे करू शकतो. इतर विश्वे ही उपाहारगृहासारखी आहेत, जेथील रहिवासी आपण येथे जे पिकवितो ते तेथे खातात. तुम्ही येथे मिळविलेल्या पुण्याच्या प्रमाणात केलेली किंवा एकत्र केलेल्या पापाच्या प्रमाणात केलेली कर्मांची फळे तुम्ही तेथे - स्वर्गात उपभोगता. फक्त आपली भूमीच 'कर्मभूमी' आहे आणि याच जगात फक्त मानवच विचार करण्यास आणि स्वतः एकटा कर्मे करणारा आहे. इतर सर्व प्राणी सहजप्रवृत्तीने जगतात. जे इतर जगात राहतात त्यांना कर्माचा अधिकार नाही. (कर्म करण्याचा आणि त्याची फळे मिळविण्याचा.)

आपली कृती, कार्ये यांच्यासह स्वतःचे चारित्र्य हे माणसाचा इतर विश्वाकडे जाण्याचा मार्ग निश्चित करतात. केवळ याच भूमीत, पुण्यदायी कर्मे करून आपण आपले गुण पूर्णत्वास नेऊ शकतो आणि अन्य जगात जाण्यास पात्र होऊ शकतो.

धार्मिक कृत्ये करण्यास योग्य स्थल आणि वेळ असते. तुम्हाला वाटते का की श्राद्ध मध्यरात्री करता येईल? त्यासाठी योग्य वेळ आणि योग्य स्थान असते. विशेषतः भारतात, म्हणजे भारतवर्षात वैदिक कर्मे केली पाहिजेतच, पण या भूमीतही विशिष्ट काळात तो विधी करण्याची परवानगी नाही. ते विधी पवित्र काळी आणि पवित्र स्थानीच करायला हवेत.

-----

## प्रकरण - ४

# संस्काराचा अर्थ

कर्म म्हणजे काय? कर्म म्हणजे कार्य/काम. समजा तुम्हाला वेष्टी (धोतर) बनवायची आहे. त्यासाठी अनेक प्रक्रिया असतात, अनेक कामे असतात. शेतातून कापूस गोळा करावा लागतो, तो स्वच्छ करावा लागतो आणि सूत कातावे लागते; नंतर सुताचे कापड विणावे लागते आणि रंगवावे लागते. त्याचप्रकारे माणसाला धार्मिक विधींच्या मालिकेद्वारे आत्मज्ञानी करावे लागते. कर्म असे करावे लागते की त्यायोगे तो अंतर्बाह्य शुद्ध होईल. अशा कर्माला संस्कार म्हणतात.

जे वस्तूतील अशुद्ध पदार्थ घालविते, सर्व वाईट आणि दुष्ट घटक घालविते आणि वस्तूला चांगले गुण देते ते म्हणजे संस्कार. उदाहरणार्थ, आपण केश-संस्काराविषयी बघू. त्याचा अर्थ वपन करणे किंवा उवा काढून केसांना तेल लावणे. संस्कार हे केसांचा भांग पाडून तेल लावण्यासारखे आहे. ठरावीक प्रकारचे संस्कार भूमीवर केले जातात. प्रथम भूमी उन्हात वाळू द्यावी लागते, नंतर ती नांगरावी लागते आणि तिला पाणीपुरवठा करावा लागतो. असे म्हणू की भाताचे बियाणे पेरले जाते आणि ते उगवल्यानंतर रोपे दुसरीकडे लावली जातात. तण काढले जाते, पुन्हा शेताला पाणी दिले जाते आणि अतिरिक्त पाणी काढून टाकले जाते. जेव्हा पीक तयार असते, पिकाची कापणी होते, मळणी होते आणि उफणले जाते. भात पक्व केला जातो आणि वापरण्यापूर्वी कुटला जातो.

कापसाचे वेष्टी बनविण्यात कितीतरी टप्पे आहेत. धाग्याचा गुंता होऊ नये म्हणून विणकराला खूप काळजी घ्यावी लागते. आपला आत्मा इंद्रियांनी केलेल्या गुंत्यात असतो. तो गुंता सोडवायला हवा आणि त्याला चिरंतन सौख्य प्राप्त करून द्यायला हवे. ते पूर्ण करण्यात अनेक अडथळे असतात. आपण वारंवार आपल्या सर्व सुखदुःखांमध्ये थोडेसे सुख अनुभवतो. ते सौख्य कायम टिकवायला हवे. त्यासाठी आपल्याला ब्रह्मलोकाकडे जायला हवे. ईश्वराच्या उपस्थितीत दुःख असणार नाही. महाप्रलयानंतर आपण त्याच्याशी एकरूप होऊ. त्या अंतिम स्थितीकडे जाण्यासाठी आपण स्वतःला तयार केले पाहिजे.

या हेतूसाठी ऋषींनी चाळीस संस्कार आणि आठ आत्मगुण योजलेले आहेत.

जेव्हा आपण आत्मगुण हा शब्द वापरतो किंवा आत्मा शुद्ध करण्याची भाषा करतो तेव्हा त्यात एक सूचना असते की जीवात्मा हा परमात्म्यापासून भिन्न असल्याचे मानणारे आपण द्वैती असतो. खरे पाहता फक्त एकच आत्मा आहे आणि जीवात्मा आणि परमात्मा यात फरक नाही. आत्मा सदैव शुद्ध असतो. म्हणून तो संस्कारांनी शुद्ध करावा लागतो यावर विश्वास ठेवणे चूक आहे. तो निर्गुण, शुद्ध आणि गुणातीत असतो. म्हणून ज्यांना आत्मगुण

म्हणतात त्यांच्याविषयी बोलणे चूक आहे. कारण आत्म्याला गुण किंवा गुणधर्म नसतात.

तथापि व्यवहारात मायेमुळे आपण निर्गुण आत्मा आहोत हे जाणत नाही. आपल्या द्वैत जीवनात आपण संस्काराविषयी बोलतो तेव्हा जो आत्मा असतो तो दोषांनी पूर्ण असतो आणि त्याचे दोष संस्कारांनी काढून टाकायचे असतात. आठ गुणांनी त्याचे दुर्गुणही काढून टाकायचे असतात. एकदा आपण यात यशस्वी झालो की संस्कारही नाही आणि गुणही नाही. आपण सर्व गुणांच्या, त्यातील सर्वोत्कृष्ट असलेल्या सत्त्वगुणाच्या पलीकडे जाऊ. शेवटी कर्म, गुण आणि जीवात्मा-परमात्मा भेदांशिवाय असलेला केवळ आत्मा असेल. पण या स्थितीत येण्यासाठी आपल्याला संस्काराच्या प्रक्रियेतून जावे लागते आणि आठ आत्मगुणांचा विकास करावा लागतो.

आपल्याला पुराणातील महान व्यक्तींच्या उदाहरणांची बरोबरी करायची तर आपल्याला आपला जिव्हाळा, आपल्या वासना, आपल्या द्वेष आणि भयाच्या भावना यांच्या अडथळ्यांविरुद्ध लढावे लागेल. आपल्या कर्मात शिस्त ठेवावी लागेल आणि आपण आपले दैनंदिन जीवन, आपण कसे बसावे, उभे राहावे, कसा वेष करावा याबाबत आपल्याला नियम पाळावे लागतील. अशा रीतीने आपण आपल्या मनाला लगाम घालू आणि आपल्या वासना, अहंकार, क्रोधाची भावना, द्वेष, भय, दुःख हे सर्व नष्ट होतील. ते आपल्याला पुराणातील ज्यांच्या गोष्टी ऐकतो किंवा वाचतो अशा व्यक्तिमत्त्वांचे गुण प्राप्त करण्यास मदत करतील.

-----

## प्रकरण - ५

# आठ गुण

आठ गुण असे आहेत : दया, क्षांती, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य, अस्पृह.

''दया'' हा गुण सर्व प्राण्यांवरील प्रेम आणि जीवनाची परिपूर्ती असलेले प्रेम दर्शवितो. इतरांवर प्रेम करून मिळविलेल्या सौख्याइतके मोठे सौख्य नाही. दया हा गुण सर्व गुणांचा कणा आहे.

क्षांती म्हणजे सहनशीलता. रोग, गरिबी, दुर्दैव आणि इतर शांतपणे सहन करणे ही एक प्रकारची क्षांती. दुसरी क्षांती म्हणजे क्षमाशीलता आणि ती जरी एखाद्याने आपल्याला यातना आणि त्रास दिला तरी त्यावर प्रेम करणे हे दर्शविते.

अनसूया हे अत्री ऋषींच्या पत्नीचे नाव आहे हे तुम्हाला माहीत आहे. ती पूर्णपणे द्वेषापासून मुक्त होती, म्हणून तिला अन्-असूया असा अर्थ असलेले नाव मिळाले. दुसऱ्याची भरभराट आणि स्थिती यामुळे जळफळाट होत असेल तर तो द्वेष होय. आपल्यापाशी सर्वांप्रती दया आणि अनुकंपा असली पाहिजे, सहनशीलता असली पाहिजे आणि जे आपला अपराध करतात त्यांच्याविषयीही क्षमाशीलता असली पाहिजे. आपल्यापेक्षा कमी पात्रता असलेले जरी उच्चपदावर असले तरी त्यांचा हेवा करता कामा नये. त्याचवेळेस, त्यांनी पूर्वजन्मात सत्कर्म करून ते पद चांगले पारितोषिक म्हणून मिळविले असे मानण्याइतकी प्रगल्भता आपल्याकडे असली पाहिजे.

शुची या शब्दापासून शौच हा शब्द आला आहे. स्नान, वेष, अन्न अशा सर्व बाबतींत शुद्धता ठेवली गेली पाहिजे. अगदी निरक्षराकडून सांगितली जाणारी एक म्हण आहे : 'स्वच्छता तुम्हाला सुखी करते आणि ती भूक शांत करते.' एखाद्या शुचिर्भूत माणसाला पाहणे म्हणजे स्वतःला शुचिर्भूत झाल्यासारखे वाटणे होय.

सर्व लोकांना लागू होणाऱ्या मनूच्या धर्मांच्या यादीत अहिंसा प्रथम येते, त्यामागे सत्य, अस्तेय (निरिच्छपणा, चोरी न करणे हा सरळ अर्थ), शौच (स्वच्छता) आणि इंद्रिय-निग्रह (इंद्रिये जिंकून घेणे किंवा त्यांची खूणही न राहू देणे).

पाचवा आत्मगुण अनायास होय. प्रयत्न, परिश्रम इ. दर्शविणाऱ्या आयास या शब्दाच्या विरुद्ध अनायास. आयास म्हणजे हलकेफुलकेपणाची भावना, गोष्टी सहजपणे घेणे. माणसाने दुःखी चेहरा करून, आठ्या घालून किंवा स्वतःच्या कष्टाबाबत शोक करणे चालू ठेवू नये. जर तुम्ही तुमचा शांतपणा गमावला तर तुम्ही स्वतःलाच नव्हे तर इतरांनाही ओझे व्हाल.

अनायास हा मोठा गुण आहे. आपल्या अनेक विधींमध्ये पुष्कळ शारीरिक श्रम आहेत. जेव्हा आपण श्राद्ध करतो तेव्हा आपल्याला दुपारच्या २ किंवा ३ वाजेपर्यंत उपाशी राहावे लागते. यज्ञ करण्यात तर आपल्याला कराव्या लागणाऱ्या श्रमांना शेवटच नाही. एखाद्या कामात किंवा साहसी कृत्यात अपरिहार्यपणे येणाऱ्या अडथळ्यांनी तुमच्यावर मानसिक ताण येता कामा नये. तुम्हाला तुमचे कर्तव्य एखादे ओझे वाटू नये आणि प्रत्येक गोष्ट ईश्वराच्या इच्छेनुसार घडते असा दृष्टिकोन तुम्ही जोपासला पाहिजे. काल जेव्हा आपण ऐकलेल्या संगीतकाराच्या बाबतीत त्याने कसा तार-स्थायीला/वरच्या स्वरांना स्पर्श केला असा शेरा मारतो तेव्हा त्याचा अर्थ काय? त्याने कठीण संगीत कृती सहजतेने सादर केली असा त्याचा अर्थ नाही का? तसेच आपल्याला आपल्या जीवनातील कष्ट हलके करायला शिकले पाहिजे.

सहावा गुण मंगल म्हणजे काय? ठीक, मंगल म्हणजे मंगल. हे म्हणणे 'गुलाब म्हणजे गुलाब' असे म्हणण्यासारखे आहे. भव्यता आणि शुद्धता असलेल्या सौख्याभोवती मंगल किंवा पवित्र वातावरण असते. माणसाने सदैव आनंदी असले पाहिजे आणि क्षुल्लक कारणास्तव लोकांवर गुरगुरायला नको. हे वर्तन आपण जेथे जाऊ तेथे सौख्य पसरविण्यास आणि पवित्रता बाहेर पसरवण्यास स्वतःच उपयुक्त असते. हे सढळपणे दिलेल्या देणग्या किंवा पैसे उधळण्यापेक्षा अधिक चांगले असते.

एखादे काम हसतखेळत करणे म्हणजे अनायास. स्वतः हसतमुख असणे आणि जेथे जाऊ तेथे आनंद निर्माण करणे म्हणजे मंगल. आपण प्रकाश पसरविणाऱ्या दिव्यासारखे असले पाहिजे आणि लोकांना असे म्हणायला वाव देऊ नये की, 'अरे! हा आला प्रत्येक गोष्टीत दोष शोधायला.' जेथेजेथे आपण जाऊ तेथे आपण आनंदाची भावना निर्माण केली पाहिजे. आपण पावित्र्याने राहिले पाहिजे आणि सर्वत्र सौख्य काठोकाठ भरलेले आहे अशी खात्री केली पाहिजे.

अकार्पण्य हा पुढचा गुण आहे. कंजुषपणा हा कृपणाचा गुण असतो. अकार्पण्य हे कृपणतेविरुद्ध आहे. आपण उदारपणे आणि मोठ्या अंतःकरणाने दान केले पाहिजे. कुरुक्षेत्रावर अर्जुनाला खिन्नता वाटू लागली आणि त्याने त्याच्या नातलगांबरोबर लढायला नकार दिला. गीतेनुसार अर्जुनाचे तसे करणे हा कार्पण्यदोष होता. त्यासंदर्भात गोंधळून तो दीनवाण्या स्थितीत गेला, तो कृपण झाला. अकार्पण्य हा गुण धैर्यवानाचा आणि उत्साही व्यक्तीचा असतो जो समस्यांना ठामपणे तोंड देतो.

अस्पृह हा आठ गुणांमधील शेवटचा गुण. स्पृह म्हणजे इच्छा, लोभीवृत्ती. अस्पृह हा त्याच्याविरुद्ध. वासनारहित असणे. सर्व त्रास, सर्व वाईट गोष्टी यांच्या मूळाशी वासना असते, ती युगानुयुगे दुर्दैवाचे कारण होत राहिली आहे. पण माणसाच्या मनातून तिचे पूर्ण उच्चाटन करणे हे जवळजवळ अशक्य कार्य आहे. वारंवार धार्मिक विधी करून आणि आत्मिक गुण

मिळविण्यासाठी सतत प्रयत्न करून एखादा शेवटी वासनाहीन होऊ शकेल. भौतिक वासनांचा त्याग करण्यासाठी वासनामुक्त असलेल्या ईश्वराला शरण जा. वल्लुवर म्हणतात :

पर्रुग पर्रर्रान पर्रिणै अप्पूरै, पर्रुग पर्रु विड्र्कु

तिरुमूलर याच्याही पुढे एक पायरी जातो. तो म्हणतो, ''इतर बंधनातून मुक्त होऊन मुक्त असलेल्या ईश्वराशी बद्ध होणे वासनारहित होण्यासाठी पुरेसे नाही. तुम्ही स्वतःला ईश्वराशी असलेल्या बद्धतेपासूनही तोडायला हवे.''

आसै अरुमिंगल, आसै अरुमिंगल, ईशनोदायिनुम आसै अरुमिंगल.

बुद्ध वासनेला तृष्णा म्हणतो. एखाद्या गोष्टीची तीव्र लालसा म्हणजे तृष्णा. (बुद्ध तिला प्राकृतमध्ये 'तन्ह' म्हणतो.) वासनेवर विजय हा त्याचा मुख्य उपदेश आहे.

वासनाहीनता हा आठ गुणांपैकी शेवटचा गुण आहे. पहिला दया, हा गुण ख्रिस्ती धर्माचा प्राणवायू आहे. जरी बुद्ध, जीझस, ख्रिस्त, प्रेषित महंमद, गुरू नानक, झोरोस्टर, कन्फ्युशिअस आणि इतर धर्मांच्या संस्थापकांनी त्यांच्या उपदेशामध्ये सर्व गुणांचा उल्लेख केला असला तरी प्रत्येक धर्म एका विशिष्ट गुणावर भर देतो. जरी त्यांच्या उपदेशामध्ये सर्व गुणांचा उल्लेख नसला तरी लोकांमध्ये इतर गुण नसावेत असे त्यांचे मत नव्हते हे निश्चित आहे.

-----

## प्रकरण - ६

# व्यावहारिक जीवनात गुण

सर्व धर्म लोकांना प्रेमळ, सत्यवादी आणि द्वेष, वासना, लोभ यांपासून मुक्त राहण्याचा उपदेश करतात. पण आमचा धर्म याच्यापुढे जाऊन हे गुण आपल्या व्यावहारिक जीवनात आणण्यासाठी विविध संस्कार करण्याचे बंधन आम्हाला लागू करतो. लोकांना फक्त उपदेश करण्यात, 'हे करा, हे करू नका' असे सांगण्याचा काहीही उपयोग नाही. लोकांच्या ठिकाणी आवश्यक असलेले उदात्त गुण प्राप्त करण्यासाठी उपयुक्त ठरतील अशी कृत्ये असलेल्या व्यवस्थेशी माणूस बांधला गेला पाहिजे. फक्त आपला धर्मच हे करतो.

इतर धर्म प्रेम आणि इच्छाशून्यता शिकवितात असा दावा केला जातो. पण हिंदू धर्म अशा गुणांना काहीही महत्त्व देत नाही, शिवाय तो धर्मकांड आधारित आहे असा आरोप केला जातो. हा दृष्टिकोन पूर्णपणे चुकीचा आहे. वस्तुतः आमचा धर्म इतरांपेक्षा जास्त करतो; जेव्हा तो आठ गुणांवर भर देत असतो तेव्हा लोकांना त्याही गुणांच्या पलीकडे जाण्याचे तो पाठ देतो. (गुणातीत). काहीही असो आपल्याला माहीत असते की आपण सद्गुणी, सत्यवादी, प्रेमळ इत्यादी असायला हवे, नाही का? तरी या आदर्शानुसार जगणे अवघड वाटते. जर आपल्या धर्मग्रंथांनी आपल्याला पुन्हापुन्हा फक्त आवाहनच केले तर कोणता हेतू साध्य होणार आहे? म्हणूनच अन्य धर्मांप्रमाणे केवळ नैतिक सूचना न देता आपला धर्म नीतिशास्त्र आणि नैतिकता एका ठरावीक गरजेपर्यंत शिकवितो. परंतु इतक्यावरच सर्व झाले का? केवळ या उपदेशांवर न थांबता तो आपल्याला व्यवहारात ते गुण कसे रुजवायचे आणि प्राप्त करायचे ते सांगतो. तो आपल्याला प्रथम पुराणांमधील ज्या सद्गुणी लोकांनी कीर्ती मिळविली आणि ज्या दुष्टांची अपकीर्ती झाली त्यांच्या गोष्टी सांगून करतो. परंतु तो हे जाणतो की अशी केवळ उदाहरणे आवश्यक ती प्रेरणा देण्यास पुरेशी नाहीत, म्हणून तो आंतरिक शुद्धता मिळविण्यासाठी अनेक संस्कार सांगतो. केवळ आपलाच धर्म असा आहे जो लोकांना सद्गुणी बनण्याचे व्यावहारिक प्रशिक्षण देतो आणि नीतिमत्ता मिळवून देतो; याचा अभिमान वाटण्याऐवजी आपल्या धर्मात काही उणिवा आहेत असे वाटणे उचित आहे का?

आठ गुणांपैकी पहिला असलेला प्रेम हा गुण जिझसच्या मुख्य उपदेशात आहे आणि शेवटचा वासनाहीनता हा गुण बुद्धाच्या मुख्य उपदेशात आहे.

या गुणांविषयी तोंडी सूचना देणे पुरेसे आहे का? अन्य शब्दांत सांगायचे तर त्यांचा फक्त उपदेश करणे पुरेसे आहे का? कोणते न कोणते काम करीत राहणे हा माणसाचा स्वभाव असतो. तुम्हाला काही साध्य करायचे असेल तर तुम्हाला त्यासाठी काम करावे लागेल. गांधीजींनी आयुष्यभर सत्य आणि अहिंसा हे गुण शिकविले, त्यांविषयी ते बोलत राहिले.

गांधीजी सतत 'आत्मशक्ती'विषयी बोलत असत. त्यांच्या आश्रमात ते सदैव काही ना काही काम करीत असत, ते इतरांनाही तसे करण्याचे आवाहन करीत. त्यांचे अनुयायी त्यांना कठोर शासक म्हणत. त्यांनी लोकांना 'चरखा चालवा' असे सांगितले आणि संडास ज्याचे त्यानीच स्वच्छ करावेत अशी अपेक्षा बाळगली.

धर्मशास्त्रांनी आपल्याला आंतरिक शुद्धीसाठी आणि या आठ गुणांच्या प्राप्तीसाठी विधी दिलेले आहेत. यासंदर्भात आपस्तंब आणि गौतम यांच्या सूत्रांना प्रमुख स्थान आहे. स्मृतींमध्ये मनू सर्वात महत्त्वाचा आहे.

आपस्तंब आणि गौतम सर्व लोकांना असलेल्या समान धर्माच्याविषयी सांगतात. आपस्तंब विविध जातींसाठी स्वतंत्रपणे कर्मे आणि संस्कार सांगतो. गौतम चाळीस संस्कार आणि आठ आत्मगुणांची चर्चा करतो. हे अठ्ठेचाळीस गुण माणसाला मृत्यूनंतर ब्रह्मलोकात नेण्याचे साधन आहेत. एखाद्या महान ज्ञानी माणसाकडे जाण्यासारखे तो ईश्वरापुढे जातो. तो त्याला लाभलेल्या वरदानात (शाश्वत सुखात) निश्चल राहतो. जेव्हा ईश्वर हे जग चालवितो तेव्हा तो निराकार असतो. तो सुद्धा (जो मनुष्य ब्रह्मलोकात जातो) त्याच्यात/ईश्वरात विलीन होतो. जोपर्यंत तो ईश्वराच्या जगात (सलोक) राहतो आणि नंतर तो सायुज्य स्थिती प्राप्त करतो, म्हणजे परमेश्वराशी एकरूप होतो. ''यस्यैते चत्वारिंशत संस्कारः अष्टावात्मगुणाःस ब्रह्मणः सायुज्यं सलोकतां जयति'' असे म्हटले जाते.

चाळीस संस्कार करताना शरीराचा विविध प्रकारे सहभाग होतो. कचेरीमध्ये तुम्ही काम करता तेव्हा तुम्ही तुमचे हात, पाय, तोंड वापरता की नाही? संस्काराबाबत तसेच आहे. जो हे संस्कार करतो आणि आठ गुण जोपासतो तो जेथे दुःखही नाही आणि सुखही नाही अशा ब्रह्मलोकात थेट जातो. तुम्ही सुख-दुःखाविना केव्हा असता? जेव्हा तुम्ही ज्याने तुम्हाला निर्माण केले त्याच्याशी एकरूप असता तेव्हा. आत्मिक गुणांचे 'आत्मशक्ती' असे वर्णन केले जाते. हा शब्द अलीकडेच वर्तमानपत्रातील भाषेमध्ये वापरात येऊ लागला आहे. जुन्या संस्कृत आणि तमीळ ग्रंथांमध्ये आत्मशक्ती हा शब्द वापरलेला दिसत नाही, फक्त 'आत्मगुण' हा शब्दच दिसतो.

-----

## प्रकरण - ७

# अग्नीचे महत्त्व

संस्कार व्यक्तीचे संपूर्ण जीवन व्यापून टाकतात - ''निषेकादि स्मशानान्तकम्'' - तो त्याच्या मातेच्या गर्भात निर्माण होतो तेव्हापासून त्याचे शरीर अग्नीला अर्पण करेपर्यंत. 'निषेक' (सिंचन, फलन) हा विधी पवित्र अग्नीच्या साक्षीने होतो; आणि शेवटी येणारे अन्त्येष्टी अग्नीत होते.

अग्नी, पवित्र अग्नी ब्राह्मणाच्या जीवनात जीवनभर प्रज्वलित ठेवला पाहिजे. ब्रह्मचाऱ्याने रोज समिधा दान केले पाहिजे. जेव्हा त्याचा विवाह होतो तेव्हा तो अग्नीच्या साक्षीने गृहस्थ होतो. आता त्याने अग्नीत औपासन केले पाहिजे. वानप्रस्थाश्रमात (वनातील विरक्ती) कक्षाग्नी नावाचा पवित्र अग्नी असतो. संन्याशाला पवित्र अग्नीत अंत्यसंस्कार नसतात : त्याच्यातच ज्ञानाग्नी असतो. त्याच्या शरीराचे दहन होत नाही - त्यासाठी अग्निसंस्कार नाही - पण सन्मानाची बाब म्हणून पुरले जाते. स्पष्ट सांगायचे तर त्याचे चार तुकडे केले पाहिजेत आणि वनाच्या चार भागात टाकले पाहिजेत. तेथे ते पशू आणि पक्ष्यांचे अन्न बनेल. वस्ती असलेल्या ठिकाणी त्याचे वेगळे केलेले भाग लोकांच्या गैरसोयीचे होतील. म्हणून ते जंगलात फेकले जात. ते तेथील रहिवाश्यांना अन्न असते; जर पुरले तर ते वनस्पतींना खत म्हणून होते. हल्ली संन्याशाच्या शरीराचे दफन होते. तेथे वृंदावन तयार केले जाते. हेही आदरापोटी केले जाते. अशा ठिकाणी काय करायचे तर तेथे वेलाचा किंवा पिंपळाचा वृक्ष लावायचा.

सर्व जातींना अग्नीने करायचे विधी आहेत. सर्व वर्णाच्या लोकांनी विवाहाच्यावेळेस औपासन केले पाहिजे आणि ज्या अग्नीत विधी केलेला आहे तो जतन केला पाहिजे. हल्ली फक्त पारशी (झोरोआस्ट्रीअन) अशी अग्नी जतन करण्याची परंपरा पाळताना दिसतात. (पारशी या शब्दाचा मूळ अर्थ 'शिडकाव' असा आहे.) त्यांच्या पवित्र ग्रंथाला झेंद-अवेस्ता म्हटले जाते. त्याचे नाव वैदिक ''छंदो-वस्त''पासून आलेला असावा. त्यांचे गुरू झोरोस्टर (झरथुष्ट्र): त्याचे नाव सौराष्ट्रपासून आले असावे. त्यांचे मूलस्थान इराण (आर्यपासून) आहे. जर त्यांनी जतन केलेला अग्नी विझला तर प्रायश्चित्त विधीसाठी ते पुष्कळ पैसा खर्च करतात. शतक बदलल्यानंतर अग्नीने करावयाच्या विधींचा ऱ्हास होत आहे. आपल्या लोकांची जीवनपद्धती बदलली आहे. जर विश्वास असेल तर हा महान ठेवा (अग्नीत करायचे विधी) जतन केला जाऊ शकेल. सध्याची शिक्षणपद्धती हे श्रद्धा नष्ट होण्याचे महत्त्वाचे कारण आहे.

आपले शरीर देवतांना आहुती म्हणून अग्नीला अर्पण करायचे असते. ते अग्नीला अर्पण करण्यापूर्वी ते द्रव्य (हविष्य - होमासाठीची सामुग्री) समजून त्याला/शरीराला तूप लावायचे असते. त्या समारंभाला 'दहन-संस्कार' म्हटले जाते.

-----

## प्रकरण - ८

# संस्कारांची नावे

आत्म्याच्या शुद्धीसाठी असलेले चाळीस संस्कार असे : गर्भाधान, पुंसवन, सीमान्त, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चौल, उपनयन, गुरुकुलात असताना करावयाचे प्राज्यापत्य (वेदव्रत) सारखे चार विधी, गुरुकुलवास संपल्यानंतरचे संमारंभपूर्वक स्नान, विवाह, गृहस्थाने रोज करायचे पाच महायज्ञ. आपण येथपर्यंत १९ची यादी केली. नंतर त्यात ७ पाकयज्ञ, ७ हविर्यज्ञ, ७ सोमयज्ञ गृहस्थाने करायचे आहेत. असे एकूण १९+२१=४० संस्कार आहेत. या सर्वांबद्दल यानंतरच्या प्रकरणात खुलासेवार लिहिले आहे.

सात पाकयज्ञ असे आहेत : अष्टक (अन्वष्टक), स्थालीपाक, पार्वण, श्रावणी, आग्रहायनी, चैत्री, आश्वयुजी. सात हविर्यज्ञ असे : अग्नियाधान, अग्निहोत्र, दर्शपूर्ण-मास, आग्रायण, चातुर्मास्य, निरुद्धपाशुबंध, सौत्रायणी. सात सोमयज्ञ असे : अग्निष्टोम, अत्याग्निष्टोम, उक्त्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र, आप्तोर्याम.

चाळीस संस्कारांपैकी काही रोज करायचे आहेत, काही ठरावीक काळात आणि काही जीवनात एकदा तरी. पहिल्या गटातील पाच हे महायज्ञ आहेत.

मंत्रांसह केलेले विधी हे मंत्राविना केलेल्या विधींपेक्षा अधिक लाभदायक असतात - समंत्र केलेला अन्त्यविधी हा संस्कार. गृहस्थ करीत असलेल्या समाजसेवेचा समावेश त्याच्या रोजच्या पंचमहायज्ञात होतो. पंचमहायज्ञ असे : ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ आणि भूतयज्ञ. वेदपठणाचा समावेश ब्रह्मयज्ञात होतो. आहुती आणि पूजा हे देवयज्ञ होत. तर्पण हा पितृयज्ञ होय. अतिथींना भोजन देणे हा मनुष्ययज्ञ होय आणि विविध सजीवांना बळी (घास/अन्न) देणे हा भूतयज्ञ होय.

औपासन आणि अग्निहोत्र रोजच्या धार्मिक जीवनाचे भाग आहेत. जरी पाकयज्ञ, औपासन यांचा सात पाकयज्ञाच्या समूहात उल्लेख केलेला नसला तरी अग्निहोत्र हे सात हविर्यज्ञापैकी एक आहे. दर्शपूर्ण-मास हा हविर्यज्ञ १५ दिवसांतून एकदा करायचा असतो. इतर पाच हविर्यज्ञ आणि सात सोमयज्ञ हे वर्षातून एकदा किंवा जीवनात कमीतकमी एकदा तरी करायचे असतात. जणू काही आपल्याबद्दलच्या सहानुभूतीने स्मृतींनी आपल्याला ही सवलत दिलेली आहे; कठीण असलेले सोमयज्ञ आयुष्यात एकदा तरी करावेत.

पर्वणी श्राद्ध महिन्यातून एकदा आणि स्थालीपाक प्रत्येक प्रथमा तिथीला (चांद्र मासाच्या पंधरवड्यातील पहिला दिवस); इतर पाकयज्ञ वर्षातून एकदा करायचे आहेत.

वेगळ्या पद्धतीने सांगायचे तर : अग्निहोत्र आणि औपासन यांच्यासह पाच महायज्ञ

(ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ) हे रोज करायचे आहेत; दर्शपूर्ण-मास आणि स्थालीपाक पंधरवड्यातून एकदा; पर्वणीयज्ञ महिन्यातून एकदा, इतर यज्ञ वर्षातून एकदा किंवा कमीतकमी जीवनात एकदा करायचे आहेत.

जमिनीच्या एका तुकड्यावर एक पीक, वर्षातून एकदाच पीक काढले जाते, दुसऱ्या तुकड्यावर तीन पिके. तेच पीक चार महिन्यांतून एकदा असे काढले जाते. काही पिकांना रोज पाणी द्यावे लागते, काहींना एका आड एका दिवशी. अशी कामे म्हणजे संस्कार. पण निरनिराळ्या पिकांसाठी निरनिराळे संस्कार असतात. अगदी तसेच मानवाच्या संस्काराबाबत आहे.

-----

## प्रकरण - ९

# पालकांनी करावयाचे संस्कार

संस्कार गर्भाधानापासून सुरू होतात, म्हणजे गर्भधारणेच्या क्षणापासून. शरीर-पिंड (गर्भाशयातील गोळा) हा समंत्र तयार व्हायला हवा. मुलगा व्हावा म्हणून पुंसवन (पुत्रजन्मासाठी केला जाणारा संस्कार) आणि सीमंत (सीमंत किंवा सीमंतोन्नयन याचा अक्षरशः अर्थ गर्भवती मातेचे केस काढणे असा होय.) हे विधी त्या मातेसाठी आहेत असा चुकीचा समज लोकांमध्ये आहे. वस्तुतः ते गर्भात आकार घेणाऱ्या जीवनासाठी आणि ते शुद्ध करण्यासाठी आहेत. वडीलधाऱ्या माणसांची याबाबत जबाबदारी आहे. एखादा स्वतःसाठी विधी न करू देत पण दुसऱ्यासाठी असलेल्या विधींकडे दुर्लक्ष करणे हे पाप आहे. हल्ली लोक गर्भाधान, सीमंत इ. विधी करणे वगळतात. कारण त्यांना वाटते की असे विधी अद्ययावत नाहीत.

जेथे पुरुष-स्त्री नात्यात काही नाजूकपणा हवा तेथे लोक पाश्चात्त्य पद्धतीनुसार लाज सोडून वागतात. पण जेव्हा नवीन जीव निर्माण होत असतो तेव्हा विधी करायची वेळ येते तेव्हा त्यांना अवघडपणा वाटतो. हा दृष्टिकोन चुकीचा आहे.

गर्भाधान, पुंसवन आणि सीमंत हे विधी मूल जन्माला येण्यापूर्वी केले जातात. पुरुष-स्त्री यांचे शारीरिक मिलन हे मंत्राने पवित्र व्हायला हवे. पशुवासनेची कृती असण्याऐवजी, आकारास येणाऱ्या जीवाच्या कल्याणाच्या हेतूने मंत्रांसह असलेल्या संस्कारांनी त्या कृतीला उच्च स्थानावर नेले आहे. प्रेरणादायी उच्च तत्त्वे न ओळखता आणि हा असंस्कृतपणा आहे असे मानून ते सोडून देणे वेडेपणा आहे. जर तुमच्या गर्भाधान संस्काराबाबत (ऋतुशांती) नाजूक भावना असतील तर तुम्ही गर्दी गोळा करू नका. पण तो विधीच मुळात घराच्या चार भिंतींत व्हायला हवा. चार दिवसांचा विवाह, रोज औपासन करणाऱ्या जोडप्याचा विवाह हल्ली रूढ नाही. विवाहानंतरच्या दिवशी शेषहोम विधी केला जात नाही. समारंभाशिवाय आणि मंत्रपठणशिवाय झालेल्या विवाहाच्या दिवशीच जोडपे समागम करते. ही वाईट चाल आणि पापमूलक आहे. समागम प्राण्यासारखा घडून येतो म्हणून मुले तशीच होतील. पुंसवन गर्भारपणाच्या तिसऱ्या महिन्यात आणि सीमंत सहाव्या किंवा आठव्या महिन्यात केला पाहिजे. हल्ली दोन्ही कसेतरी एकत्र होतात.

बाळाच्या जन्मानंतर त्याचे जातकर्म केले पाहिजे. भेटवस्तू दिल्या पाहिजेत. अकराव्या दिवशी नामकरण केले पाहिजे. शास्त्रानुसार या नामकरण विधीचाही शुद्धीकरण हा हेतू आहे. ज्या नक्षत्रावर जन्म झाला त्यानुसार बाळासाठी नाव निवडण्याचे नियम आहेत. ते नाव देवाच्या अनेक नावांपैकी असावे आणि त्याला अशा नावाने हाक मारणे हाही एक संस्कार

आहे. कारण त्यात शुद्धीकरणाचा परिणाम असतो. आपल्याकडे आपल्या मुलांची 'लाँगफेलो' किंवा 'स्टोन' असे नामकरण करण्याची प्रथा नाही. पण हल्ली या भूमीतही अशी नावे मुलांना दिली जातात. शिवाय जेव्हा अशी देवांची नावे बाळाला दिले जातात तेव्हा ते भ्रष्ट किंवा विचित्र केले जाते. जेव्हा वैदिक मंत्रांनी नाव दिले जाते तेव्हा त्याचा मान राखला जायला पाहिजे.

जेव्हा मूल सहा महिन्याचे होते, तो काळ अन्नप्राशनाचा असतो. गर्भाधानापासून नामकरणापर्यंतचे विधी माता-पित्याने त्याच्यावतीने करायचे असतात. अन्नप्राशनातही पिता मंत्र म्हणतो, अर्थातच मूलच अन्न ग्रहण करीत असते.

माता औषध घेते, पण मुलाचे पोषण होते, नाही का? त्याचप्रकारे मातापित्याचे विचार आणि भावनांचा परिणाम गर्भावर होतो आणि त्याचे व्यक्तिमत्त्व त्याप्रमाणे घडेल. जेव्हा तुमचे मन शांत असते तेव्हा तुम्ही जे लिहिता आणि तुमचे मन जेव्हा क्रोधात असते तेव्हा तुम्ही जे लिहिता यात फरक असतो. पहिले वाचण्यास चांगले असते आणि दुसरे इतके आनंददायी नसते. शरीरावरही चांगले किंवा वाईट परिणाम होतात. जेव्हा पती-पत्नीची मने चांगल्या विचाराने भरलेली असतात तेव्हा समागम घडून यायला हवाः त्याचा परिणाम उच्च चारित्र्य विकास पावेल अशी सुप्त शक्ती असलेला गर्भ तयार होईल. विवाह मंत्रघोषात व्हावा याचे हेच कारण आहे.

काही लोक असे आहेत की त्यांनी अजून असे विधी सोडून दिलेले नाहीत, पण ते दोन किंवा तीन विधी एकत्र करतात. प्रत्येक संस्काराची योग्य अशी वेळ असते आणि त्यांना योग्य असे मंत्र तसेच द्रव्य (सामुग्री) असते.

चुडाकर्म म्हणूनही ओळखला जाणारा चौल हा विधी अन्नप्राशनानंतर येतो. त्यात मुलाचे केस प्रथमच कापले जातात. पण एक बट ठेवली जाते. तिला चुडा म्हटले जाते. सर्व चांगल्या विधींसाठी आवश्यक असलेली शिखा. संन्याशाला शिखा नसते आणि त्याचे मस्तक वपन केलेले असते; वस्तुतः संन्यासाची दीक्षा घेताना शिखा समंत्र काढून टाकावी लागते. चौल समारंभात शिखा समंत्र आणि ईश्वराची शपथ घेऊन (संकल्पाचा एक भाग म्हणून) धारण करावी लागते. म्हणून या शपथेचा भंग करून ती आपल्याला आवडेल तशी काढून टाकणे योग्य नाही. मूठभर पालेभाजी टाकून देण्यासारखे ही केसांची बट काढून टाकणे योग्य आहे का? लोक शिवलिंग किंवा शाळिग्राम (गंडकी नदीत सापडणारा आणि विष्णूचे प्रतीक मानला जाणारा दगड) यांची पूजा करण्यासाठी स्थापना करतात. मनात आले तेव्हा दिले सोडून हे बरोबर आहे का? जर ते चोरीला गेले किंवा अचानक हरवले तर गोष्ट वेगळी. तसेच समारंभाने शिखा ठेवणे आणि जेव्हा आवडेल तेव्हा काढून टाकणे आणि डोक्यावर केस ठेवणे हे योग्य नाही.

गृहस्थाने वेद म्हणणे, वैदिक विधी करणे आणि पत्नीसह धर्माचे आचरण करण्याने

शरीर आणि मनाला बळकटी प्राप्त होते. (मंत्रपठणाने निर्माण झालेल्या कंपनांमुळे मन) मस्तकात असणाऱ्या छिद्रावर म्हणजे ब्रह्मरंध्रावर (ब्रह्मरंध्र हे मस्तकातील वरचे छिद्र आहे, जेथे सुषुम्ना नाडी संपते. ही नाडी मेरुदण्डातील इडा व पिंगळा या नाड्यांमध्ये असते) असलेली शिखा हे संरक्षण असते आणि अशी शक्ती मिळविण्याचे साधन असते. ती (शिखा) घराच्या छतावरील कौलांप्रमाणे असते. फक्त जेव्हा तुम्ही वैदिक विधी करण्याचे थांबविता, म्हणजे तुम्ही गृहस्थ नसता आणि तपस्वी बनता तेव्हा तिची गरज नसते. हल्ली ब्रह्मचारी विद्यार्थी किंवा गृहस्थांनी वेदपठण आणि वैदिक विधी करणे थांबविले आहे. म्हणून साहजिकच आपण शिखाही ठेवत नाही.

चौलनंतर उपनयन येते. मुलाने स्वतः मंत्र म्हणत करायचा हा पहिला संस्कार आहे. या संस्काराआधीचे त्याच्या माता-पित्याने केलेल्या पापांमुळे उद्‌भवलेल्या वाईट प्रभावापासून संरक्षण करण्यासाठी निर्माण केलेले; हे गर्भिक किंवा बैजिक असतात. (गर्भाशयाचे किंवा बीजाचे). हानिकारक प्रभाव बाळापासून घालविण्यासाठी माता-पित्यांनी करावयाचे हे संस्कार असतात.

कोणताही संस्कार योग्य वेळी केला पाहिजे आणि तसे करण्याने आपण आपल्या पापांपासून मुक्त होऊ. भूतकाळात आपल्याकडून झालेली पापे धुण्यासाठी आपण आपले शरीर, मन आणि वाणी यांचा उपयोग करतो.

आपण मनाने वाईटाचा विचार करतो, तोंडाने खोटे बोलतो आणि शरीराने पाप करतो. खरेच, आपण सर्व प्रकारची लबाडी करतो. मनाने, वाचेने आणि शरीराने केलेले पाप मनाचा, वाणीचा आणि शरीराचा वापर करून सद्‌हेतूसाठी धुतले पाहिजे. मनाने परमेश्वराचे चिंतन केले पाहिजे, वाणीने मंत्र म्हटले पाहिजेत; आणि शरीराने उदात्त कर्मे केली पाहिजेत. मन, वाणी आणि शरीर एकत्र आणणारे संस्कार करण्यासाठी पुरेशी प्रगल्भता उपनयनानंतर येते.

मी दुसऱ्या एका बाबतीत बोलले पाहिजे. मुलांसाठी असलेले संस्कार (गर्भाधानापासून चौलपर्यंत इतर विधींसह) सोडून पिता जे इतर संस्कार करतो त्याचाही मुलांना लाभ होतो. हे एका म्हणीप्रमाणे आहे, ''माता-पित्याने केलेली चांगली गोष्ट मुलांचे संरक्षण करते.'' अलीकडच्या काळापर्यंत वाडवडिलांनी केलेल्या संस्कारांमुळे वैदिक धर्म पाळणाऱ्या ब्राह्मणांची मुले विशेष तल्लख असत. संहितेप्रमाणे सर्वच ब्राह्मणांनी हा धर्म पाळावा. आपल्या पूर्वजांनी केलेल्या चांगल्या कामाने दोन-तीन पिढ्यांपर्यंत आपल्या नैतिक आणि बौद्धिक उन्नतीचा पाया घातला. नंतर जन्मलेल्या मुलांना त्यांची अधोगती होईल इतके ऐहिक गोष्टीत ओढले गेले.

आपल्या पित्याने कोणतेही संस्कार केले नाहीत. आपल्याला जे लाभ झाले असते

त्यापासून आपण वंचित राहिलो म्हणून आपल्याला वाईट वाटेल. आपण आपल्या मुलांना अशी तक्रार करण्यास जागा ठेवायला नको. आपण आपल्यासाठी आणि त्यांच्यासाठी संस्कार करू या.



-----

## प्रकरण - १०

# सर्व संस्कार सर्वांसाठी का नाहीत?

जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन आणि चौळ हे संस्कार सर्व जातींना समान आहेत. फक्त ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्यामध्ये उपनयन असते. यात भेद नाही किंवा त्यावर वाद करायची गरज नाही. चौथ्या वर्णाचे लोक जगाची सेवा करण्यासाठी शारीरिक कामे करतात आणि त्या ओघाने अंतःकरणाची शुद्धता प्राप्त करतात. ते त्यांच्या वडील किंवा आजोबा यांच्याकडून शिक्षण घेऊन, त्यांच्याकडे वारशाने आलेल्या व्यवसायात कौशल्य मिळवू शकतात. त्यांना बारा वर्षे गुरुकुलवासाची (ब्राह्मणांच्याबाबतीत असते तसे) गरज नसते किंवा त्यांना वेदांचे अध्ययन करावे लागत नाही. जर त्यांनी तसे केले तर त्यांच्या कामावर परिणाम होईल.

गुरुकुलाच्या मार्गातील उपनयन ही पहिली पायरी आहे. जेव्हा मुलगा वेद शिकतो तेव्हा त्याला त्यात अहंकाराची भावना नको. घरी त्याला पुष्कळ स्वातंत्र्य असते. त्याचे वडील त्याला प्रेमापोटी शिस्त लावू शकत नाहीत. म्हणून मुलाला गुरूंच्या निगराणीत आणले जाते. वेदांच्यामागे जाण्यापेक्षा शारीरिक प्रयत्नांची गरज असणारे व्यवसाय भिन्न असतात. त्याच्यात बौद्धिक उर्मटपणा आणि अहंकार जोपासण्यास जागाच नसते. म्हणून अशी कामे घरी वडील किंवा वडीलधाऱ्या व्यक्तींकडून शिकविली जाऊ शकतात.

शारीरिक कामे करून जे सेवा करतात त्यांना उपनयन किंवा गुरुकुलवास यातून जावे लागत नाही. काही विशेष कौशल्ये किंवा कलेचे पैलू किंवा हस्तव्यवसाय असे जे घरी शिकविले जाऊ शकत नाही ते एखाद्या ब्राह्मण गुरूकडून शिकवले जाऊ शकतात. ब्राह्मण सर्व कला, सर्व विषयात प्रवीण असणे अपेक्षित आहे. पण ते सर्व त्याच्या चरितार्थाचा स्रोत असता कामा नये. त्याचा व्यवसाय अध्यापन आणि वेदपठण आणि वैदिक विधी करणे होय.

माणसासाठी दिलेले संस्कार आणि त्याचा व्यवसाय आणि मानसिक दृष्टिकोन यांच्यात एक संबंध आहे. ज्या जातींना ठरावीक संस्कार करायचे नसतात त्यांना हीन मानणे हे गैर आहे. तुम्हाला विचित्र वाटेल पण माझा असा दृष्टिकोन आहे की ज्यांना इतरांपेक्षा जास्त संस्कार करावे लागतात त्यांचा हीन म्हणून विचार व्हावा. असे की या लोकांना शुद्धीकरणासाठी अधिक विधी करावे लागतात. इतरांना आतून शुद्ध होण्यासाठी इतक्यांची गरज नसते. रोगी जेवढी मोठी औषधाची मात्रा घेतो तितका त्याचा क्लेशही जास्तच असणार.

निःपक्षपातीपणात ऋषींच्या पुढे कोणीही जाऊ शकणार नाही. समानतेबाबत ते वाचाळपणे बडबडत नाहीत. पण ते खरे समानतावादी आहेत. कारण ते सर्वांकडे ईश्वराशी एकरूप झालेले मानतात. विश्वातील व्यवहार चालविण्याची पद्धती अशी असते की त्यासाठी

निरनिराळे व्यवसाय करणारे, निरनिराळी कामे करणारे आणि निरनिराळ्या मनोवृत्ती असलेले लोक लागतात. या भेदानिशी, असमानतेसह ऋषींनी भिन्न लोकांना भिन्नभिन्न संस्कार सोपविले. त्यांच्यात उच्च आणि नीच असा प्रश्नच नाही.

तेच तत्त्व पाळण्यासाठीच शास्त्राने पहिल्या तीन वर्णांसाठी (ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य) उपनयनाचा विधी घालून दिला आणि त्याच्याशी सुसंगत ठरावीक संस्कार दिले.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - १७

## ब्रह्मचर्याश्रम

## प्रकरण - १

# उपनयन

जेव्हा मुलगा काही गोष्टी कळण्याजोगा आणि मंत्र म्हणण्याइतका मोठा होतो तेव्हा त्याचे उपनयन केले जाते. या समारंभात त्याला भिक्षा मागायला पाठविले जाते. ''भिक्षचर्यम् चर'', त्याला सांगितले जाते. ''बाधम्'' तो उत्तर देतो. (मी तसे करीन.) म्हणून उपनयनापूर्वी त्या मुलाला ''भिक्षचर्यम् चर'' म्हणजे काय हे कळण्याइतके संस्कृतचे ज्ञान हवे. तो सातव्या वर्षी शिकायला आरंभ करतो तेव्हा त्याला तो आठव्या वयाचा होईपर्यंत संस्कृतचे प्राथमिक ज्ञान होते, ते वय उपनयन संस्कारासाठी निश्चित केले आहे.

जर आठ वर्षांची मुले यज्ञोपवीत धारण करतील व त्यांना संस्कृतचे पुरेसे ज्ञान आहे आणि गायत्री मंत्र म्हणता येईल तर जगाला लाभ होईल. आज काळ इतका बदलला आहेः त्यांच्या नाजूक मनात नास्तिकता घुसवली जात आहे.

उप म्हणजे जवळ; नयन म्हणजे नेणे (मुलाला). कोणाच्या जवळ किंवा काय (मुलाला) न्यायचे? मुलाला गुरूच्या जवळ न्यायचे म्हणजे उपनयन. कोण गुरू असतो? ज्याने वेदांवर प्रभुत्व मिळविले आहे तो गुरू. एक गुरू ब्रह्मचर्याश्रमात (विद्यार्थी-ब्रह्मचर्य) असतो आणि दुसरा शेवटच्या संन्यासाश्रमात असतो. पहिला गुरू वेदांमध्ये आणि वेदांगादीत पारंगत असतो तर दुसऱ्याने वेदांसह सर्वाचा त्याग केलेला असतो. पहिल्या आश्रमात तुम्ही विद्या मिळविता; शेवटच्या आश्रमात तुम्ही ज्ञान समजून घेता. (याविषयी यापूर्वीच गुरुपरंपरेवर याची सविस्तर चर्चा केली गेली आहे.)

उपनयन ही ब्रह्मचर्याश्रमाची दीक्षा आहे तर समावर्तन हा जीवनातील या स्थितीचे पूर्णत्व आहे. समावर्तन म्हणजे परतणे. पुन्हा सांगायचे म्हणजे उपनयनापासून समावर्तनापर्यंतचा काळ हा ब्रह्मचर्याश्रमाचा असतो. अशा प्रकारे गुरुकुलातील वैदिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास पूर्ण केल्यानंतर एखाद्याचे घरी परतणे म्हणजे समावर्तन.

उपनयन ब्रह्मचर्याश्रमाचे पूर्वांग होय. कोणत्याही अंगाकडे काहीतरी देण्यासारखा विशेष गुण असलाच पाहिजे. याला अंगी म्हणतात. अशा प्रकारे उपनयन नामक अंगाची अंगी म्हणजे ब्रह्मचर्य. ब्रह्म या शब्दाला सहा वेगवेगळे अर्थ आहेत. ब्रह्मचर्य या शब्दात त्याचा अर्थ वेद असा आहे. .जीवनातील एक संपूर्ण आश्रम किंवा काल हा वेदांच्या अभ्यासासाठी बाजूला ठेवलेला असतोः हे ब्रह्मचर्य होय. ब्रह्मचर्याश्रमाचा कमीत कमी कालखंड बारा वर्षे असतो, तो वेदांवर प्रभुत्व मिळविण्यास लागतो.

ब्रह्म म्हणजे विष्णू तसेच शिव सुद्धा. शिवाय ब्रह्म हा शब्द ब्राह्मण, तपस्वी आणि

परमात्म्याचा निर्देश करण्यासाठी वापरला जातो. जेव्हा तुम्ही ब्रह्मा असा आकारान्त दीर्घ उच्चार करता तेव्हा त्याचा अर्थ निर्माता असा होतो.

भोजनाच्यावेळेस आपण परिषेचन करतो म्हणजे आपण आपल्या अन्नावर, भातावर म्हणा, पाणी शिंपडतो. हे भोजनाचे अंग असते. भाताचा असा ईश्वराचा प्रसाद केल्यावरच तो खाल्ला पाहिजे. हा परिषेचनाचा हेतू आहे. ईश्वराचा प्रसाद केल्यावर अन्न नाकारणे हे मूर्खपणाचे नाही का? एखाद्याने उपनयनानंतर वेदाध्ययन न करणे हे त्याचे परिषेचनानंतर समोर ठेवलेले अन्न न खाण्यासारखेच आहे. या अर्थाने उपनयन झालेल्या बहुसंख्य लोकांना मूर्खच म्हटले पाहिजे.

उपनयन म्हटले जाणारे पूर्वांग आणि समावर्तन म्हटले जाणारे उत्तरांग या दरम्यान चार व्रते आहेत. ती अशीः प्राजापत्य, सौम्य, आग्नेय आणि वैश्वदेव.

एखाद्या मंत्रावर प्रभुत्व मिळविण्यासाठी ठरावीक नियम पाळायचे असतात. वेद हे मंत्रांनी पूर्ण भरलेले आहेत. ते तुम्हाला अध्यात्मात पुढे जाण्यास आणि भौतिक जीवनात सुटका मिळविण्यास मदत करतात. वेदांवर प्रभुत्व मिळविण्यासाठी आवश्यक असलेली पूर्ण शिस्त म्हणजे ब्रह्मचर्य असेही वर्णन केले जाऊ शकते. या ग्रंथांच्या एका भागाच्या अभ्यासासाठी नियम आहेत. प्रत्येक वेदाला चार काण्डे असतात. प्रत्येक काण्ड एका ऋषीशी संबंधित असते. त्यांच्या सन्मानार्थ ब्रह्मयज्ञ केला जातो. प्रत्येक काण्डासाठी एक स्वतंत्र व्रतही असते. ब्रह्मचर्याश्रमात जेव्हा एखाद्या काण्डाचा अभ्यास केला जातो तेव्हा त्याचे व्रतही पाळावयाचे असते. काण्डे अशी आहेत - प्राजापत्य, सौम्य, आग्नेय आणि वैश्वदेव. चार काण्डे संपल्यावर विद्यार्थ्याला गुरूच्या अनुमतीने समावर्तन करावे लागते.

वर उल्लेखलेली चार काण्डे ही कृष्ण-यजुर्वेदाच्या विद्यार्थ्यांसाठी आहेत. ऋग्वेदाच्या विद्यार्थ्यांसाठी महानान्मी, महा उपनिषद आणि गोदान व्रते आहेत. मी कृष्ण-यजुर्वेदाची व्रते प्रथम सांगितली. कारण तो व्यापक प्रमाणात (दक्षिणेकडे) अनुसरला जातो.

समावर्तनाला 'स्नान' असेही म्हटले जाते आणि जो हे करतो तो 'स्नातक' होय. प्रत्येकाने त्याचा स्वतःचा वेद (त्याच्याकडे जन्माने आलेला) आणि इतर विषयांचा अभ्यास केलाच पाहिजे. जेव्हा आपण उपाकर्म करतो तेव्हा आपण वेदांचा नवीन भाग शिकण्यास आरंभ केला पाहिजे. नंतर उत्सर्जनाच्याकाळी तो थांबविला पाहिजे आणि वेदांगांचा अभ्यास हाती घ्यायला पाहिजे. पुनरावृत्ती करायची तर, श्रावण ते तैष्य महिन्यांमध्ये, दक्षिणायनाच्या सहा महिन्याच्या काळात वेदांचा अभ्यास केला पाहिजे. नंतरचे सहा महिने वेदांगांसाठी दिले पाहिजेत. (दक्षिणायन म्हणजे सूर्य जेव्हा कर्कवृत्ताकडून वळतो त्या दिवसापासूनचा सहा महिन्यांचा काळ.)

मंत्रांवर प्रभुत्व मिळविण्यासाठी आणि वेदाच्या विशिष्ट भागाचे अध्ययन करताना विद्यार्थ्याने ब्रह्मचर्याशी संबंधित नियमांचे कठोर पालन केले पाहिजे. हल्ली आपण काही पाळत नाही, आपण वेद किंवा त्याचा एखादा भागही अभ्यासत नाही. विवाहापूर्वी आपण व्रत नावाचा विधी करतोः एका तासात आपण काय करतो आणि ते का करतो हे न समजता अनेक संस्कार करतो. कदाचित मला स्वतःला हे व्याख्यान देताना वाटते, कारण वैदिक परंपरा निदान टिकून राहावी म्हणून.

उपनयनाचे महत्त्व यात आहे : ते व्यक्तीला वेदातील सूचना प्राप्त करण्यास योग्य बनविते आणि जगभर दिव्य शक्ती पसरविते. पालकांनी ही वस्तुस्थिती जाणून घ्यावी आणि त्यांच्या मुलांचे योग्य वेळी उपनयन करावे.

''द्वि-ज (तमिळमध्ये इरुपिरप्पाळन)'' हे नाव ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्याला दिले जाते. जेव्हा ते वेदाध्ययनाला पात्र होतात तेव्हाच त्यांचा दुसरा जन्म होतो. पूर्वी उल्लेखल्याप्रमाणे असा जन्म जगभर दिव्य शक्ती पसरविण्यासाठी असतो आणि उपनयनाद्वारे ते त्यासाठी पात्र होतात. योग्य वेळेस हा समारंभ करणे ही पालकांची जबाबदारी आहे. हल्ली अशा बाबतीत धर्मशास्त्रातील नियमांना अजिबात किंमत दिली जात नाही. उलट पूर्वी लोकांचा ग्रंथांवर विश्वास असे आणि त्यातील आज्ञांनुसार ते कृती करत असत.

-----

## प्रकरण - २

# शास्त्रे आणि लोकप्रिय रूढी

धर्मशास्त्रातील नियम आणि सूचना सोईस्कररित्या डावलून त्याचवेळेस जणू काही शास्त्रीय वैधता असल्यासारख्या देशाच्या कोणत्या ना कोणत्या भागात प्रचलित असलेल्या लोकप्रिय रूढी पाळल्या जात आहेत. ही खेदाची बाब आहे. उदाहरणार्थ, जर एखाद्या मुलाच्या थोरल्या बहिणीचे लग्न व्हायचे असेल तर त्याचे उपनयन करता कामा नये या मताला आधार मिळालेला आहे. दुसरे एक मत असे आहे की एका कुटुंबात एकाच वेळेस तीन ब्रह्मचाऱ्यांनी राहू नये. या सबबींमुळे मुलांचे उपनयन संस्कार उशिरा होत आहेत. अशा लोकप्रिय रूढींना प्राधान्य देऊन धर्मशास्त्राच्या विरुद्ध जाणे आणि त्यांनी ठरविलेल्या वयाची वरची मर्यादा दुर्लक्षित करणे योग्य नाही. वर उल्लेखलेल्या रूढी या सोयीची बाब किंवा काही भावनिक कारणांमुळे अस्तित्वात आल्या असल्या पाहिजेत. लोकप्रिय प्रघात, जोपर्यंत धर्मशास्त्रातील आज्ञांच्या प्रतिकूल नाहीत तोपर्यंत ते पाळले जावेत.

आपल्या धर्मशास्त्राचा समारोप करताना आपस्तंब काय म्हणतो ते पाहू या, ''आतापावेतो मी ज्याचे विवेचन केले त्यात सर्व नियम आले आहेत असे नव्हे. अजूनही अनेक नियम आहेत. ते कुटुंबातील रूढी किंवा संबंधित प्रांत यांच्यानुसार विकास पावले असावेत आणि ते स्त्रिया आणि चतुर्थवर्णाच्या लोकांकडून माहीत करून घ्यावेत.'' तथापि, आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की आपण धर्मशास्त्राच्या विरुद्ध जाऊ नये अशी आपस्तंबाची इच्छा आहे.

कोणत्याही सबबीखातर उपनयन संस्कार पुढे ढकलला जाऊ नये. काही वेळेस मुलीच्या लग्नाला उशीर होतो. कारण तिच्या माता-पित्यांकडे लग्नाचा खर्च भागविण्याइतका पुरेसा पैसा नसतो. हेही समर्थनीय नाही आणि धर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे. विवाहसंस्काराविषयी विवेचन करताना मी त्यावर नंतर बोलेन. आपल्या विवाहांमध्ये खूप प्रदर्शन असते आणि हे अटळ असल्याचे मान्य होऊ लागले आहे. जरी आपल्याला लग्नात उधळेपणाने केलेले प्रदर्शन आवडत नसले तरी वराकडच्या लोकांच्या इच्छेपुढे आपण नमते घेतो. मोठ्या थाटात समारंभ करण्यासाठी लागणारा पैसा उभा करेपर्यंत मुलीच्या लग्नाला उशीर होतो. त्याला विलंब होतो कारण योग्य वर सापडत नाही. नंतर वराच्या लोकांच्या या सोयरिकीला पसंती देण्याचा प्रश्न असतो. उपनयनाला उशीर होण्याला असे कोणतेही कारण किंवा तो विधी खर्चिक करण्याची सक्ती नाही. लग्नात वराकडच्या लोकांचे दृष्टिकोन आणि इच्छा जशा विचारात घेतात तसे येथे नसते. म्हणून योग्य वेळेत मुलाचे उपनयन करण्याचे राहून जाणे याला कोणतीही योग्य सबब असू शकणार नाही. हा विलंब कुठल्याही हिशोबाने अक्षम्य आहे.

-----

## प्रकरण - ३

# वैदिक परंपरेचा पाया

मूल आजारी पडते तेव्हा माता-पिता त्याची विशेष काळजी घेतात. आजारी मुलाकडे दुर्लक्ष करणे किती चुकीचे असते? यापेक्षा अधिक वाईट काय असेल तर ते म्हणजे योग्य वयात मुलाचे उपनयन न करणे आणि त्याला गायत्री मंत्र न देणे. हा विधी त्याच्या आत्मिक उन्नतीसाठी आणि जगाच्या भल्यासाठी असतो. हल्ली उपनयन हे एखाद्या लहान प्रमाणातील विवाहाप्रमाणे केले जाते, ही निरर्थक उधळपट्टी आहे. थाटामाटात साजरे करण्यासाठी पुरेसा पैसा पालकांना मिळेपर्यंत विधी, व्रतबंध पुढे ढकलला जातो त्याचे हे एक कारण आहे. अशा कारणांमुळे हा संस्कार पुढे ढकलणे, याचा तीव्र शब्दांमध्ये धिक्कार केला पाहिजे.

मठामध्ये आम्ही काहीही करायला तयार आहोत. (योग्य वयात मुलांच्या उपनयनासाठी पालकांना मदत करण्यास). आम्ही सामूहिक उपनयन विधी आयोजित करतो. अनेक इतर धार्मिक संघटनांकडे अशीच व्यवस्था असते. गायत्री सर्वांना समान आहे. स्मार्त, वैष्णव, माध्व इ. अशा भिन्न शाखांच्या मुलांसाठी सामूहिक उपनयन समारंभ आयोजित केला जातो आणि समाधानकारक रीतीने पार पाडला जातो. हा प्रघात सहभागी होणाऱ्यांच्या अधिकाधिक संख्येने वाढला पाहिजे.

सुस्थितीतील पालकांना वाटते की असे सामूहिक समारंभ ऐपत नसणाऱ्यांसाठी आहेत. पण त्याचवेळेस ते मात्र त्यांच्या मुलांचे उपनयन स्वतः योग्य वेळेत करीत नाहीत. या संस्कारात त्याचे महत्त्व वाढवून सांगणे अनावश्यक आहे, काहीजणांना इतरांपेक्षा अधिक खर्च करणे शक्य आहे किंवा ते खर्च करण्यास समर्थ आहेत, याचा प्रश्न नाही. पैसा किंवा संपत्तीचा याच्याशी काही संबंध नाही. उपनयन विधीत विसंगत विचार आणले जाऊन वैदिक परंपरेचा गाभा असलेल्या संस्कारातील अर्थ काढून टाकणें हे दुःखद आहे.

मुलांना यज्ञोपवीत दिल्यानंतर ती मुले रोज न विसरता गायत्री मंत्राचे पठण करतात की नाही हे पाहणे पालकांचे कर्तव्य आहे. काही मुले मौंजीबंधनानंतर दुसऱ्याच दिवसापासून या मंत्राचे पठण करणे सोडून देतात. मुलांनी असे करू नये हे पालकांनी पाहिले पाहिजे. क्रिकेटचे सामने, चित्रपट, मेजवान्या इ. गोष्टींनी विचलित न होता ते संध्यावंदना करतात की नाही याची खात्री केली पाहिजे. हल्ली जेव्हा पालकांनाच आत्म्याशी संबंधित बाबींचा विचार करण्याऐवजी क्लब, चित्रपट, सभा आणि शर्यती यांच्यात गोडी वाटते आहे, त्यामुळे माझ्या या आवाहनाचा काही उपयोग होईल असे मला वाटत नाही. जर त्यांना स्वतःलाच अशी जाणीव होईल की आपण जीवन व्यर्थ जगलो आहोत तर कदाचित त्यांना त्यांच्या मुलांनी अधिक चांगले वागावे असे वाटेल. पण मुले त्यांचे ऐकतील का? ते उलट त्यांच्या पालकांकडे वळून म्हणण्याचा संभव

आहे : "तुम्ही आम्हाला संध्यावंदना करायला आणि गायत्रीपठण करायला का सांगता? तुमच्याबाबत काय?"

अशा दुर्दैवी स्थितीत, मी तुमचा वेळ अशा बाबतीत वाया घालवीत असेन तर त्याचे कारण असे की तुमच्या मुलांच्या आत्मिक प्रगतीसाठी तुम्हाला तुमची जबाबदारी आठवून देणे हे माझे कर्तव्य आहे.

मी तुम्हाला जे सांगितले ते तुम्ही कराल की नाही हे मला माहीत नाही किंवा तुम्ही काय कराल हेही मला माहीत नाही. माझ्यावर मठाकडून सोपविली गेलेली कर्तव्ये मला पार पाडायची आहेत. मुलांचे उपनयन योग्य वयात होते ना आणि वेदांचा अभ्यास करण्यास पात्र असलेल्या सर्वांचे उपनयन होते की नाही हे पाहण्याची मला मठाने आज्ञा दिलेली आहे. मठ मला असेही सांगतो की मुलांना यज्ञोपवीत दिल्यानंतर न विसरता ते संध्यावंदना करतात की नाही आणि किमान रोज एक तास तरी वेदपठण शिकतात की नाही हे पहा.

-----

## प्रकरण - ४

# ब्रह्मचाऱ्याचे गुण

ब्रह्मचारी विद्यार्थ्याने रोज संध्यावंदना केली पाहिजे, आपल्या भोजनासाठी भिक्षा मागितली पाहिजे आणि मीठ खाता कामा नये. तो ब्राह्मण असेल तर त्याने पळसाचा दण्ड बाळगला पाहिजे. तो क्षत्रिय असेल तर त्याने अश्वत्थाचा आणि वैश्याने औदुंबराचा दण्ड बाळगला पाहिजे. दण्ड त्या विद्यार्थ्याला अध्ययनात गुंतवून ठेवतो. तो विद्युतवाहकासारखा किंवा एरिअलसारखा असतो आणि हे शास्त्रीयदृष्ट्या रास्त आहे. सर्व वैदिक मंत्र विद्यार्थ्याच्या स्मरणात राहण्याची गरज असते. दण्डामध्ये ही स्तोत्रे पक्के करण्याची क्षमता असते. म्हणून तो बाळगला पाहिजे - विद्यार्थ्याने प्राप्त केलेल्या वेदांच्या भांडाराच्या सुरक्षिततेसाठी ब्रह्मचाऱ्याने कृष्णमृगाजिन परिधान केले पाहिजे आणि उत्तरीय वापरू नये. विजेचे काम करणाऱ्याने स्वतःच्या सुरक्षिततेसाठी काही नियम पाळले पाहिजेतः त्याने लाकडी फळीवर उभे राहिले पाहिजे किंवा काम करताना रबरी हातमोजे वापरले पाहिजेत. तसेच आत्मिक विद्युत आणि आत्मिक उर्जेचे संरक्षण करण्यासाठी भूतकाळातील आपल्या थोर माणसांनी हे नियम सुचविले आहेत.

हल्ली आपण वेदांचा अभ्यास चालू न ठेवता एका दिवसात उपाकर्म विधी करतो. आपण उत्सर्जन अजिबात करीत नाही. ते करण्यातील अपयशाबद्दल प्रायश्चित्त म्हणून आपण कमोकार्षित नावाचा एक मंत्र म्हणतो; तो म्हणतो, ''मी पाप केले नाही. कामाने (वासना) ते केले. क्रोधाने ते केले...'' जर आपण उत्सर्जन केले तर हा मंत्र पुन्हा पुन्हा म्हणण्याची गरज नाही.

ब्रह्मचर्य अन्नग्रहण, विधी करणे आणि व्रत पालन ह्यांच्या बाबतच्या अनेक नियमांना चिकटून राहणे दर्शविते. जर ब्रह्मचाऱ्याने वेदपठणात काही चूक केली, उच्चारात चूक केली तर त्यासाठी त्या उपाक्रमाच्यादिवशी प्रायश्चित्त घेतले पाहिजे. त्याप्रसंगी तो फक्त थोडे तिळाचे दाणे खातो; नाहीतर संपूर्ण दिवस उपवास करतो आणि पुढील दिवशी गायत्री म्हणत होमात पळसाच्या १००८ समिधा अर्पण करतो. हे त्याने दरवर्षी केले पाहिजे. हल्ली ब्रह्मचारी हा विधी उपनयनानंतर फक्त पहिल्या उपाक्रमाच्या दिवशी करतात. प्रत्यक्षात आजकाल गृहस्थाश्रमी फक्त गायत्री जप करताना दिसतात. तरी सर्व ब्राह्मणांनी तो करणे अपेक्षित आहे. जेव्हा तुम्ही फक्त मंत्र म्हणता तेव्हा तुम्हाला झोप आल्यासारखी वाटते आणि तुम्ही जपात चूक करू शकता. पण गायत्री म्हणत तुम्ही होम केला तर असे घडत नाही. होमात अर्पण करायच्या समिधा पळसाच्या हव्यात, जर नसतील तर अश्वत्थ; जर दोन्ही उपलब्ध नसतील तर दर्भ वापरला जाऊ शकतो.

भोजनाच्यावेळेस विद्यार्थी पोटभर जेवू शकतो. एकच निर्बंध आहे की त्याने आपल्या भुकेला मुक्त सोडता कामा नये. त्याने त्याच्या भोजनासाठी भिक्षा मागितली पाहिजे. कारण तशी कृतीही त्याला नम्र बनविते. त्याने उपवास करावा असे शास्त्रांना वाटत नाही. विद्यार्थ्यांच्या वाढत्या वयात त्याचे योग्य पोषण व्हायलाच हवे. परंतु त्याचवेळेस त्याने सात्त्विक गुणांचा विकास करायला शिकले पाहिजे आणि त्याच्याबाबतीत काही क्रौर्य किंवा उर्मटपणा नको. त्याच्या गुरुसेवेमुळे त्याच्यात हे गुण जोपासले जातात.

गुरुकुलातील बारा वर्षांत त्याने त्याच्या वेदशाखेचा आणि चौदा विद्यांचा अभ्यास केला पाहिजे. त्याचा गुरुकुलातील निवास संपल्यावर तो समावर्तन करतो, घरी परततो आणि विवाह करतो.

-----

# नैष्ठिक ब्रह्मचर्य आणि कौटुंबिक जीवन

पूर्वी काही विद्यार्थी समावर्तन न करता गुरूंच्या समवेत राहणे चालू ठेवत असत. त्यांची परीक्षा झाल्यावरही ते ब्रह्मचारीच राहात आणि आयुष्यभर तेच करीत.

आपला धर्म मानवाच्या नैसर्गिक इच्छा विचारात घेतो. सामान्य नियम असा आहे की गुरुकुलातून परतल्यावर विद्यार्थ्याने विवाह केलाच पाहिजे आणि जीवनात स्थिर व्हायला पाहिजे. नैसर्गिक इच्छांच्या विरुद्ध जाणे अवघड असते. परंतु निसर्गाच्या बरोबर जाणे म्हणजे निसर्गाच्या प्रवाहात वाहत जाणे नव्हे. शेवटी आपल्या या सर्व प्रयत्नांचे ध्येय दुसऱ्या किनाऱ्याला पोहोचणे - म्हणजे भौतिक जीवनातून मुक्त होणे हेच आहे. गृहस्थाने आपल्या पत्नीसह धार्मिक जीवन जगले पाहिजे. परंतु नंतर सर्व गोष्टींचा त्याग करून संन्यासी बनले पाहिजे. नैसर्गिक प्रवृत्तींचा बळजबरीने त्याग करणे घातक आहे या.वास्तवावर संन्यासी जीवनाकडे टप्प्याने जाणारा मार्ग आधारलेला आहे. जी व्यक्ती तारुण्यातच नैष्ठिक ब्रह्मचारी राहण्याचे ठरविते ती नैसर्गिक इच्छांच्या अधीन जाऊ शकते. हा आश्रमाच्या आचारसंहितेच्या विरुद्ध गुन्हा असू शकतो आणि म्हणून पापमय असू शकतो. गृहस्थ म्हणून तो धर्माच्या बंधनात राहून नैसर्गिक इच्छांच्या आहारी गेला तरी तो कोणत्याही अपराधांचा गुन्हेगार नसतो.

कोणत्याही नियमाला अपवाद असतात. ज्यांनी पूर्वजन्मामध्ये केलेल्या संस्काराद्वारे गुणांची शक्ती प्राप्त केलेली असते आणि ज्यांना मनाचा ठामपणा आणि प्रगल्भता असते तेच आयुष्यभर ब्रह्मचारी राहू शकतात. आपल्याकडे तीनशे वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या समर्थ रामदासांचे उदाहरण देतात. त्यांनीच शिवाजीला इस्लामच्या भीषण हल्ल्यात धर्म जपण्याची प्रेरणा दिली. रामदास हे हनुमानाच्या नैष्ठिक ब्रह्मचारी या गुणाचे उत्कृष्ट उदाहरण होते.

श्री शंकर भगवत्पाद परमेश्वराचे अवतार होते आणि त्यांचे कार्य वैदिक धर्माची पुनर्स्थापना करणे हे होते. ते ब्रह्मचर्याश्रमापासून थेट संन्यासाश्रमात गेले. सुरेश्वराचार्य सोडून त्यांच्या सर्व शिष्यांनी तसेच केले. शंकराचार्यांनी पद्मपाद, हस्तामलक आणि तोटक यांना संन्यासाची दीक्षा दिली. शंकरमठामध्येही ब्रह्मचारींना संन्यास दिला जातो. कारण फक्त असेच संन्यासी पीठावर स्थानापन्न होऊ शकतात. हे सर्व दर्शविते की प्रत्येकजणाने संन्याशाची वस्त्रे धारण करण्यापूर्वी गृहस्थाश्रमी झाले पाहिजे असे नव्हे. पण हेही मान्य केले पाहिजे की अगदी थोड्यांकडे दोन आश्रम (गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम) टाळून संन्यास घेण्याइतके शहाणपण आणि परिपक्वता असेल. नैष्ठिक ब्रह्मचर्याला पुढील संस्कार करावे लागत नाहीतः विवाह, पाच महायज्ञ, सात पाकयज्ञ, सात हविर्यज्ञ आणि सात सोमयाग. हे विधी न करताही त्यांचे अंतःकरण पुरेसे शुद्ध असले पाहिजे. म्हणून ते अपावादात्मक असतात.

शास्त्रानुसार दहनक्रिया हा शेवटचा संस्कार आहे. याच आधारावर असा युक्तिवाद केला जातो की शास्त्रे अगदी वृद्धांनाही संन्यास घेण्याची आज्ञा लागू करीत नाहीत. जर प्रत्येकाला (म्हणजेच ब्रह्मचर्य विद्यार्थी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थी आणि संन्यासी) या चार आश्रमांतून जायचे असेल तर, खरेच कोणालाच दहन क्रिया नसणार. संन्याशांना सिद्धी प्राप्त झाल्यावर, अग्नीला अर्पण करण्याऐवजी पुरले जाते ना? जर आपण असे मानले की संन्यास, फक्त जे परिपक्व आहेत त्यांच्यासाठीच आहे, अन्य कोणासाठीही, अगदी वृद्धांसाठीही, नाही, तर वरील विधान चूक आहे असे म्हणता येणार नाही.

जे संन्यास घेण्याच्या वयाच्या आत मरण पावतात, फक्त त्यांनाच दहनक्रियेचा विधी लागू होतो. या दृष्टिकोनाला आधार नाही. संन्यासी नसता जे वृद्धही मरण पावतात त्यांचीही दहनक्रिया केली पाहिजे. म्हणून असे अनुमान निघते की शास्त्रे वृद्धांचे संन्यास न घेणे मान्य करतात.

ज्याच्याकडे ज्ञानाचा प्रकाश आहे आणि जो वासनेपासून मुक्त आहे, त्याने कौटुंबिक जबाबदाऱ्या सोडून आणि वैदिक विधी करीत वनात राहिले पाहिजे. त्याने मुले आणि संपत्ती मागे सोडून दिली पाहिजे आणि फक्त पत्नीला वनात नेले पाहिजे. पत्नी वैषयिक सुखासाठी नसून होम, औपासन इ. विधी करण्यात जोडीदार म्हणून असते. हा वानप्रस्थाचा अर्थ आहे. जेव्हा एखादा माणूस घरदार, मुले आणि नातलग यांचा त्याग करण्याइतका प्रगल्भ असतो तो जीवनातील या स्थितीला प्राप्त होतो. नंतर तो वैदिक कर्मही सोडून देतो आणि विशेषकरून आपले मन आत्म्याच्या शोधाकडे वळवितो. संन्यासाश्रमात प्रवेश करण्याची हीच वेळ असते.

अशा रीतीने जो मनुष्य त्याच्या पत्नीपासून दूर झालेला आहे आणि ज्याने वैदिक कर्माचा त्याग केलेला आहे त्याचा संन्यास गुरूद्वारा सुरू होतो. त्याने सातत्याने परमात्म्याचे चिंतन केले पाहिजे आणि आंतरिक सत्य म्हणून सत्याचा अनुभव घेतला पाहिजे. तसेच त्याने "ते सत्य मीच आहे, अन्य खोटे नाटकच आहे." हे जाणले पाहिजे. नंतर तो अंतिम सत्य म्हणून त्याच्या देहाच्या आणि मनाच्या पलीकडे जातो. हा मोक्ष असतो, मुक्ती असते. असा मनुष्य त्याच्या भूतकर्माची फळे संपेपर्यंत त्याच्या देहात राहतो. ज्याला आत्मज्ञान झाले आहे त्याच्यावर अशा कर्मांचा परिणाम संन्यासी असल्याने होणार नाही. बाह्य जगताच्या दृष्टीने तो त्याच्या देहात राहात असेलही, तरीही तो या स्थितीत मुक्त झालेला असतो. आता तो 'जीवनमुक्त' असतो. जेव्हा त्याचे शरीर नष्ट होते तेव्हा तो 'विदेहमुक्त' (शरीराविना मुक्त) होतो आणि आता तो स्वतः अंतिम सत्य असतो.

गृहस्थ म्हणून जीवन न जगलेला संन्यासी आणि ज्याने सर्व चाळीस संस्कार करीत आणि आठ आत्मिक गुणांची जोपासना करीत गृहस्थाश्रम पार पाडला असे दोघेही अंतिम सत्यरूपच होतात.

जो मनुष्य संन्यासी होत नाही पण मृत्यूपर्यंत सर्व संस्कार करीत राहतो आणि आठ गुणांची जोपासना करीत राहतो त्याचे भवितव्य काय? त्याचे मृत्यूनंतर दहन केले जाते, नाही का? एकूण बहुसंख्य लोक याच श्रेणीत असतात. त्यांचे मृत्यूनंतर काय होते?

शंकराचार्य म्हणत नाहीत की असे लोक अंतिम सत्यात विलय पावतील. त्यांना प्रत्येक गोष्टीचा त्याग करून ब्रह्मप्राप्तीची तीव्र आस नसते, ज्वलंत इच्छा नसते. जर त्यांना सर्वसमावेशक सत्याची आस असेल तर त्यांच्या या शोधापासून कोणतीही शक्ती त्यांना रोखू शकणार नाही. त्यांच्याकडे अशी इच्छा नसल्याने त्यांना असा अद्वैती मोक्ष प्राप्त होत नाही. तथापि त्यांची शास्त्रावर श्रद्धा असेल आणि त्यानुसार ते कर्म करीत राहिले आणि मानव कल्याणात योगदान देत राहिले तर त्यांच्या अंतःकरणाची शुद्धता होईल. म्हणून ते जरी परमात्म्याशी, जो सगुण ब्रह्म असतो आणि जो या विश्वाच्या व्यवस्थेचा भाग असतो, एकसख्य झाले नाही तरी ते ईश्वर अस्तित्वाच्या अनुभूतीपर्यंत पोहोचतात.

या अवस्थेला हिरण्यगर्भ-स्थान म्हटले जाते आणि ते ब्रह्मलोकांसारखेच असते. यात परमात्म्यात विलय पावणे नसते. पण जो मनुष्य ते स्थान प्राप्त करतो तो ईश्वराचा अनुभव घेत राहण्याचे वरदान मिळवितो. याच स्थितीचे मोक्ष असेही वर्णन केले जाते. आणखी काय हवे? जे संन्यासी न होता सर्व संस्काराचे पालन करतात ते या स्थितीला पोहोचतात.

परंतु एक दिवस सगुण ब्रह्म सर्व विश्वाची कर्मे थांबवेल आणि त्यांना महाप्रलयात विलीन करेल. आता तो निर्गुण ब्रह्म होईल. यावेळेस त्याच्या बाजूला असलेले परमात्म्याशी परमात्मा म्हणून जोडले जातील. तीच अद्वैत मुक्ती होय.

महाप्रलयात सर्व प्राणी - अगदी ज्यांनी कोणतेही विधी केले नसतील, जंतूंसारखे प्राणी, सरपटणारे प्राणी इ. परमात्म्यात विलीन होतील तर मग सर्व संस्कार पूर्ण केल्यावर परमात्म्याशी जोडला जाण्याबाबत विशेष काय? जेव्हा सगुण ब्रह्म पुन्हा विश्वे निर्माण करेल तेव्हा ज्यांनी संस्कार केले नाहीत ते त्यांच्या पूर्वजन्मानुसार जन्म घेतील. फक्त जे संस्कारातून योग्य रीतीने गेले आणि ज्यांनी शुद्धता प्राप्त केली ते ब्रह्माशी जोडले जातील.

मी उपनयनाच्या विषयापासून दूर आलो आहे. मी पुढील प्रश्नांना उत्तर शोधले आहे : ''एखादी व्यक्ती त्याच्या आयुष्यभर ब्रह्मचारी राहू शकते का? गृहस्थाश्रमाच्या स्थितीतून न जाता एखादा ब्रह्मचारी संन्यासी होऊ शकतो का?''

-----

## प्रकरण - ६

# उपनयन : केव्हा करायचे?

ब्राह्मणपुत्राचे उपनयन तो गर्भधारणेपासून आठ वर्षाचा असताना म्हणजे त्याच्या जन्मापासून सात वर्षे आणि दोन महिन्याचा असताना वयात केले पाहिजे. क्षत्रियाच्या मुलाचा त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षी करायला हवे. यदू कुळाचा, यादव असलेल्या कृष्ण परमात्म्याला त्या वयात यज्ञोपवीत दिले गेले. तसेच वैश्य पुत्राचे वय सोळा असावे.

शास्त्रानुसार ब्राह्मणपुत्राची खालची वयोमर्यादा आठ वर्षांची आणि वरची मर्यादा सोळा आहे म्हणजे सवलतीची आठ वर्षे आहेत. ही वरची मर्यादा ओलांडण्यापूर्वी ब्राह्मणपुत्राचे उपनयन न करणे हे अतिशय पापमूलक आहे.

उपनयनासाठी उत्तरायण हा योग्य काळ आहे - तमीळ महिने तै ते आनि (जानेवारी मध्य ते जुलै मध्य). जेव्हा सूर्य उत्तरेकडे प्रवास करतो. हा काळ विवाहासाठीसुद्धा योग्य आहे, वसंतऋतूचा काळ (चित्रै आणि वैकाशि - एप्रिल मध्ये ते जून मध्य). उपनयनासाठी माशि (फेब्रुवारी मध्य ते मार्च मध्य) हा विशेष पसंतीचा आहे. दक्षिणानयनामध्ये तमीळ महिने आडि ते मार्गझि अखेर (जुलै मध्ये ते जानेवारी मध्य) उपनयन आणि विवाहास परवानगी नाही.

हल्ली अनेक कारणास्तव उपनयन आणि विवाह समारंभ शक्यतो लांबणीवर टाकले जातात आणि मार्गझि महिना सोडून कोणत्याही महिन्यात केले जातात. त्याचा परिणाम तुमच्यासमोर आहे. पण एखाद्याला आनंद वाटला पाहिजे की विवाह म्हटला जाणारा कार्यक्रम अजूनही कसा का होईना केला जातो. जोपर्यंत लोक करीत आहेत तोवर त्यांना केव्हाही करू द्यात. हाच दृष्टिकोन स्वीकारला तर विवाहांना कोणत्याही काळात एक निरुपायाचे पाऊल म्हणून अनुमती दिली जाते. पण उपनयन हा वेगळा भाग आहे. तो कधीही दक्षिणायनात करण्यास अनुमती दिली जात नाही. जर काही कारणास्तव या काळात केला तर उत्तरायणात पुन्हा करण्यास मी सांगतो. उपनयन किंवा विवाह करण्यात पैसा ही मुख्य समस्या असते. पालक उपनयन पुढे ढकलतात. कारण खर्च कमी करण्यासाठी, त्यांना त्यांच्या मुलीच्या विवाहाच्या वेळी मुलाचे उपनयन करायचे असते.

काही वेळेस जेव्हा मुलगा पाच वर्षांचा असतो तेव्हा उपनयन केले जाते. त्याला काम्योपनयन म्हटले जाते. काम्य म्हणजे इच्छापूर्ती करणे. जर तुम्हाला तुमच्या मुलाचा लहान असताना आत्मिक विकास व्हावा असे वाटत असेल तर असे लवकरचे उपनयन योग्य आहे. पण यज्ञोपवीत देण्यास सात हे वय योग्य आहे. कारण तोपर्यंत तो मंत्र स्पष्ट म्हणण्याइतके पुरेसे संस्कृत शिकलेला असेल. हल्ली विवाहाबरोबर मौंजीबंधन केले जाते तेव्हा 'मुलगा' ३० किंवा ३५ वयाचा असतो! म्हणून जेव्हा 'मुलगा' सात वर्षांचा असतो तेव्हा उपनयन करावे, पाचव्या

वर्षी नाही - हा विनोद असो वा नसो. जर तुम्हाला वैदिक धर्माबद्दल काही वाटत असेल तर त्याने (उपनयन करण्यातील विलंब) तुम्हाला आतून अस्वस्थ केले पाहिजे.



आदि शंकराचार्यांचे उपनयन, असे मानले जाते की ते जेव्हा पाच वर्षांचे होते तेव्हा केले गेले. जर तुमचा मुलगा विशेष बुद्धिमान असेल तर आणि तो शब्दोच्चार योग्य करीत असेल तर त्याचे उपनयन पाचव्या वर्षी केले जावे.

-----

## प्रकरण - ७

# अनुकरणीय आदर्श

मला नेहमी असे वाटते की दोन दिव्य मुले उपनयन संस्काराद्वारे पृथ्वीवर अवतरणाचा हेतू प्रदर्शित करतात. त्या दोघांपैकी एक शंकराचार्य होत, ज्यांनी वैदिक धर्माला पुनरुज्जीवन दिले आणि दुसरे ज्ञानसंबंधर. तमीळ पेरियपुराण सांगते की, ज्ञानसंबंधराचे उपनयन, ते जेव्हा लहान होते तेव्हा केले गेले. यावरून ते स्वतःला 'नानमरै (चार वेद) ज्ञानसंबंधर' म्हणत असत, आपल्याला माहीत आहे की ते चारही वेदांमध्ये प्रवीण होते. दोघेही, शंकराचार्य आणि ज्ञानसंबंधर यांना पाठ अवगत करण्यास एकदाच श्रवण पुरेसे असे : म्हणून त्यांना ''एकसंथाग्राहिन्'' म्हटले जात असे, म्हणून ते एक किंवा दोन वर्षात वेद शिकू शकले. वस्तुतः त्यांना वेद शिकविण्याची गरज नव्हती. कारण ते स्वतःच प्रत्येक गोष्ट शिकण्यास समर्थ होते. शंकराचार्य हे शिवाचे अवतार होते आणि ज्ञानसंबंधर हे सुब्रह्मण्याचे अवतार होते. जरी त्यांनी उपनयनानंतर आणि गायत्री मंत्र मिळाल्यावर त्यांचे कार्य पूर्ण केले असले तरी ते आपल्यासारख्या सामान्य लोकांना त्या संस्काराचे महत्त्व दाखवून देण्यासाठी होते.

रामभद्र दीक्षित नावाचा एक कवी होता. तो स्वतःविषयी असे म्हणत असे : ''मला गायत्री अवगत होण्यापूर्वी अगोदरच माझ्याकडे सरस्वती होती.'' गायत्री देण्याच्या सामान्य वयाच्या म्हणजे आठ वर्षे वयाच्या पूर्वीच त्याने कविता रचायला आरंभ केला होता. ज्ञानसंबंधरानेही 'तोडुडय चेवियन' (कानात कुंडल घालणारा शिव) रचून गायले तेव्हा ते अवघे तीन वर्षांचे होते आणि त्यापूर्वीच त्यांनी चमत्कार दाखविण्यास आरंभ केला होता. परंतु तरीही त्यांचे उपनयन केले गेले होते आणि गायत्री दीक्षा दिली गेली. केवळ वैदिक धर्म उचलून धरून त्यांचे महान कार्य ते पूर्ण करू शकले हे दाखविण्यासाठी त्यांनी तसे केले. उपनयन संस्कार आणि गायत्री मंत्र यांच्या महत्त्वाबाबत आपले डोळे उघडावेत हा त्यांचा हेतू.

-----

## प्रकरण - ८

# उपनयन लवकर का?

एखाद्या बालकाला गायत्री येण्यापूर्वी सरस्वतीची प्रेरणा मिळाली तर? हा प्रश्न बाजूला ठेवू या. मुख्य मुद्दा असा आहे की कामाने त्या मुलाचा ताबा घेण्यापूर्वी त्याला गायत्रीची प्रेरणा मिळाली पाहिजे. म्हणून उपनयनाचे वय आठ निश्चित झाले आहे. जेव्हा काम एखाद्याचा ताबा घेतो तेव्हा तो त्याच्या आदर्शापासून म्हणजे मंत्राची शक्ती प्राप्त करणे यापासून दूर खेचला जातो. एवढेच नव्हे तर त्याने प्राप्त केलेले सामर्थ्यही नष्ट होते. म्हणून गायत्री मंत्राचा सातत्याने जप करून पूर्णत्व प्राप्त करण्याच्या हेतूने उपनयन लवकर केले जाते. सोळाव्या वर्षानंतर तो तसे करू शकणार नाही. तो एका आध्यात्मिक पातळीवर गेला तरी तो लगेच खालच्या पातळीवर एक हात खाली येईल. म्हणून उपनयन संस्कार लवकर केला जातो.

हल्ली आपण असे संस्कार गांभीर्याने घेत नाही. हेतूविना आपण गोष्टी करतो आणि त्याचवेळेस अशा विधींचा त्याग करण्याचे साहस आपल्याजवळ नसते. म्हणून खोट्या समाधानासाठी आपण ते कसेबसे करतो. त्यापेक्षा नास्तिकांचे धैर्य असणे अधिक चांगले असे मला वाटते. नास्तिकाला निदान काही ठाम मते असतात. जर लहानपणीच गायत्री मंत्र शिकला तर नाजूक वृक्षात खिळा ठोकल्यासारखा घट्ट बसून राहतो. गायत्री मोठ्या प्रमाणात मानसिक शक्ती, तेज आणि आरोग्य देतो. तो मुलाची एकाग्रतेची शक्ती वाढवितो, त्याच्या बुद्धीला धार आणतो, शारीरिकदृष्ट्या बलवान करतो. नंतरच्या जीवनात जेव्हा त्याला कामभावना जाणवते तेव्हा गायत्री मंत्र त्याच्या अधःपतनाला प्रतिबंध करते आणि त्याचे शरीर व बुद्धी यांसाठी संरक्षक ढाल होते. जेव्हा कोणी लहानपणी गायत्री चिंतन करतो आणि जेव्हा तो मोठा होतो, त्याची त्याला बीज व्यर्थ न घालविण्यात, ब्रह्मतेज आणि अभ्यासूवृत्ती, नम्रता, ईश्वर भक्ती असे गुण प्राप्त करण्यात आणि आत्म्याबाबत रस घेण्यात खूप मदत होते.

हल्ली पालक अकारण अशा महान लाभाची संधी नाकारतात.गायत्री-जप, वेदांचे आणि वेदांगाचे अध्ययन, त्याचे अन्नासाठी भिक्षा मागणे, गुरूची सेवा करणे, धार्मिक प्रतिज्ञांचे पालन करणे यात एखादा विद्यार्थी गुरुकुलवासात वर्षे घालवितो. अशाप्रकारे तो जेव्हा अध्ययन पूर्ण करतो तेव्हा समावर्तनासाठी तयार असलेला तो तरुण मनुष्य होतो. नंतर त्याने काशीला जायला हवे आणि घरी परतल्यावर विवाह केला पाहिजे. त्याचे समावर्तन आणि त्याचे काशीहून परतणे याकाळात त्याला 'स्नातक' म्हटले जाते. समावर्तन हे आजकालच्या पदवीदान समारंभासारखे असते. हल्लीच्या विवाहात काशीयात्रा म्हटला जाणारा हा हास्यास्पद प्रकार असतो. (परमसद्गुरु पुन्हा येथे, दक्षिणेतील मुख्यत्वेकरून तमिळनाडूमधील विवाहांचा उल्लेख करीत आहेत.) विवाह हा चाळीस संस्कारांपैकी एक आहे.

-----

## प्रकरण - ९

# गृहस्थी जीवन आणि वैषयिक वासना

भूतकाळात वैषयिक वासनांनी केलेल्या दुष्परिणामाविषयी थोर माणसांनी सांगितलेले आहे. आपल्या वैदिक धर्माने संस्काराच्या साहाय्याने या वासनेला उचित घटक ठरवून त्या वासनेचे आत्म्याच्या शुद्धतेच्या साधनात फार मोठ्या प्रमाणात पुरेसे रूपांतर केले आहे. सामान्य माणसाला वनात जाणे आणि तपस्वी म्हणून तेथे राहणे किंवा संन्यासी होणे सोपे नसते. शुद्ध होण्यासाठी त्याला खडतर आणि गोंधळाच्या जीवनातून जावे लागते, त्याच्या भौतिक अस्तित्वातील सुख-दुःखांचा अनुभव घ्यावा लागतो. बालपणात त्याने कडू चव घेतली पाहिजे, कुमार वयात किंवा ब्रह्मचर्यात त्याने अपक्व फळाची तुरट चव घेतली पाहिजे, तारुण्यात आंबट चव घेतली पाहिजे आणि वृद्धपणात मधुर फळाची चव घेतली पाहिजे. सामान्य माणसाने या सर्व अवस्थांतून जाऊन, पक्व होऊन मधुर झाले पाहिजे. एखादा मनुष्य अपरिपक्वतेकडून शहाणपण आणि प्रकाशमानता या स्थितीकडे जातो. जे निसर्गतः पक्व झाले नाही किंवा ते स्वतःच पक्व झाले नाही ते बळेच पिकवू शकले जात नाही. या संदर्भात रामलिंगस्वामीगल यांच्या शब्दाचे स्मरण होते. तो म्हणतो, 'लवकर पिकलेले आणि वाळलेले फळ पडते.' संतांना माहीत होते की जर एखाद्या मनुष्याला निसर्गाविरुद्ध जाऊन बळेच प्रौढ बनविले तर असा परिणाम होतो. विवाहातील कर्तव्ये आणि गृहस्थाश्रमातील जीवन मनुष्याला नैसर्गिक पद्धतीने शुद्ध करण्यासाठी असते. शिवाय भूतकाळातील कर्मांचा परिणाम म्हणून अनेक जीव पुन्हा जन्म घेतात की नाही? विवाहसंस्काराअभावी त्यांचा पुनर्जन्म कसा होतो?

गृहस्थाश्रमीला तो ब्रह्मचारी असताना शिकलेले वेदांचे पठण सातत्याने करावे लागते. त्या या ग्रंथांचे अध्यापन करावे लागते, अनेक होम आणि औपासन आणि संध्यावंदन विधी करावे लागतात. हल्ली होम करणे दुर्मिळ झाले आहे आणि फार जण वेद शिकत नाहीत. पण संध्यावंदनाची, गायत्री-जपाची परंपरा, लहान प्रमाणात का होईना अजूनही पाळली जात आहे. मी आता गायत्री मंत्राविषयी बोलेन.

-----

## प्रकरण - १०

# गायत्री

''जी गायिली असता संरक्षण होते'' ती गायत्री. ''गायंतम् त्रायते यस्मात् गायत्री'त्यभिधीयते.''

गातो हा शब्द गीत गाणे या अर्थाने वापरलेला नाही. त्याचा अर्थ विशिष्ट स्वरात म्हणणे किंवा पठण करणे. जे लोक या पद्धतीने गायत्री प्रेमाने आणि भक्तीने म्हणतात त्यांचे संरक्षण होते. या मंत्राचे वर्णन करताना वेद हे शब्द वापरतातः ''गायत्रीं छंदसाम् माता.'' छंदस् म्हणजे वेद. म्हणून गायत्री सर्व वेदांची माता (वेद स्वतःच तसे म्हणतात). त्याला चोवीस अक्षरे (अक्षरे किंवा शब्दावयव) आणि तीन पाद असतात, प्रत्येक पाद आठ अक्षरांचा. म्हणून या मंत्राला 'त्रिपाद गायत्री' म्हटले जाते. प्रत्येक पाद हा एका वेदाचा सार असतो. अशाप्रकारे गायत्री ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेदाचे सार आहे. अथर्ववेदाला त्याचा स्वतःचा गायत्री मंत्र आहे. त्यातील उपदेश घेण्यासाठी तुम्हाला दुसऱ्यांदा उपनयन करावे लागते.

मनुस्मृती म्हणतेः ''त्रिभ्य एव तु वेदेभ्यः पादम् पादमदूदुहम्''. म्हणजे गायत्रीचा प्रत्येक पाद तीन वेदांपैकी एका वेदाकडून घेतला आहे. वैदिक सोडून आपण सर्वांचा त्याग केलेला आहे. आपण जर गायत्री मंत्राचा त्याग केला तर आपले भवितव्य काय राहील?

शास्त्रानुसार केल्या जाणाऱ्या सर्व धार्मिक विधींमध्ये गायत्री-जप आवश्यक आहे. (प्रकरण १२ सुद्धा पाहा.)

-----

## प्रकरण - ११

# ब्राह्मणाने स्वतःचे शरीर शुद्ध ठेवले पाहिजे

ब्राह्मणाने आपले शरीर शुद्ध ठेवले पाहिजे म्हणजे कोणत्याही अशुद्ध गोष्टी तो म्हणत असलेल्या मंत्रांची शक्ती कमी करणार नाहीत. "देहो देवतालयः प्रोक्तो जीवः प्रोक्तो सनातनः". (शरीर हे देवतांचे मंदिर आहे. त्यात जतन केलेले जीवन हा परम पुरुष आहे.) तुम्ही अस्वच्छ असाल तर मंदिराच्या आवारात प्रवेश करू शकत नाही. कोणतीही अशुद्ध गोष्ट आत नेता कामा नये. मंदिरात मांस, तंबाखू इ. नेणे म्हणजे त्याचे पावित्र्य नष्ट करणे होय. वेदशास्त्रानुसार जर तुम्ही शारीरिकदृष्ट्या आणि धार्मिक संस्काराविना असाल तर मंदिरात जाता कामा नये.

शरीर म्हणविले जाणारे मंदिर - जे मंत्रांची शक्ती टिकवून ठेवते - हे कोणत्याही अशुद्धतेने भ्रष्ट होता कामा नये. घर आणि मंदिर यात फरक आहे. मंदिराप्रमाणे घरात स्वच्छतेचे नियम पाळणे आवश्यक नसते. घरातील एखादा कोपरा किंवा एखादे ठिकाण शरीरशुद्धीसाठी, तोंड धुण्यासाठी, मासिकपाळीच्यावेळी स्त्रियांना वेगळे बसण्यासाठी असते. (सदनिकेमध्ये शास्त्राप्रमाणे जगणे शक्य नसते.) मंदिरामध्ये घराप्रमाणे अशी व्यवस्था नसते.

जेथे आपण राहतो तेथे आपल्याला मंदिराप्रमाणेच घरांची गरज असते. त्याचप्रमाणे आपल्या शरीराचा घर तसेच आत्मिक कर्मासाठी मंदिर म्हणून हेतू साध्य झाला पाहिजे. ब्राह्मणाच्या शरीराची मंदिराप्रमाणे निगा राखली गेली पाहिजे. कारण ते वैदिक मंत्र जतन करण्यासाठी असते आणि कोणत्याही अशुद्ध गोष्टीचा आत शिरकाव होता कामा नये. वैश्विक कल्याण साधणाऱ्या मंत्रांचे संरक्षण करणे हे ब्राह्मणाचे कर्तव्य आहे. म्हणून इतरांच्या जीवनापेक्षा ब्राह्मणाच्या जीवनात अधिक प्रतिबंध आहेत. अशुद्ध करणारी कर्मे आणि आचरणापासून ब्राह्मणाने परावृत्त व्हायला पाहिजे. इतर शारीरिक सौख्य उपभोगतात, त्या गोष्टींचा मोह होता कामा नये.

ब्राह्मणाचे शरीर इंद्रियविषयक आनंद उपभोगण्यासाठी नसून मानवाच्या कल्याणासाठी वेद जतन करण्यासाठी आहे. या हेतूने त्याला उपनयनासारखे विधी करावे लागतात. त्याला त्याच्या देहाची काळजी, वेदमंत्रांचे जतन करणे, त्याद्वारे जीवमात्रांचे संरक्षण यासाठी घ्यायची असते. इतरांना भरपूर पैसा मिळवून देणारे व्यवसाय करू द्या पण ते कारण ब्राह्मणाला मोह पाडणारे कारण असू नये. त्याने आपली कर्तव्ये पार पाडल्यावरच स्वतःच्या चरितार्थाचा विचार करावा. भूतकाळात ब्राह्मण जेव्हा स्वतःच्या ब्राह्मणधर्माशी एकनिष्ठ असे तेव्हा राज्यकर्ता त्याचप्रमाणे समाजही त्याला उपजीविकेसाठी जमीन आणि पैसा देत असे. आता परिस्थिती बदलली आहे आणि आजकाल पैसा कमाविण्यासाठी काही प्रयत्न करावे

लागतात. पण त्याने कोणत्याही परिस्थितीत संपत्ती गोळा करण्याचा प्रयत्न करता कामा नये आणि पैसा मिळविण्यासाठी अधार्मिक साधनांचा वापर करता कामा नये. खरोखरच त्याने दारिद्र्यात राहिले पाहिजे. तो जेव्हा सुख शोधत बसणार नाही आणि स्वार्थत्याग आचरेल तेव्हाच आत्मज्ञानाचा प्रकाश त्याच्याठिकाणी तळपेल. हा प्रकाश जगाला जिवंत करेल. त्याच्याकडे वारशाने आलेल्या परंपरा आणि रीतिरिवाज सोडून दैवाच्या शोधात त्याने परदेशी जाऊ नये. वैदिक मंत्रांचे जतन करणे आणि स्वधर्म पाळणे ही त्याची मूलभूत कर्तव्ये आहेत. पैसा कमाविणे त्याच्याबाबतीत गौण आहे.

जर ब्राह्मणाने मंत्राग्नी स्वतःमध्ये तेवत ठेवला तर विश्वाचे कल्याण साधेल. त्याच्या मंत्रबलाने त्याने लोकांना संकटात मदत केली पाहिजे आणि जर त्याने त्याला मदत मागणाऱ्या एखाद्या माणसाला '' तू जे करतोस तेच मी करतो. तुझ्याइतकीच शक्ती माझ्याकडे आहे.'' अशी सबब सांगत दूर लोटले तर त्याचे जीवन व्यर्थ समजावे.

आजकाल मंत्रबलाचा अग्नी विझवला गेला आहे (किंवा तो कदाचित् विझत चाललेल्या निखाऱ्याप्रमाणे आहे.) ब्राह्मणाच्या शरीरात अनपेक्षित बदल झाले आहेत आणि अशुद्ध गोष्टींना स्थान मिळाले आहे. परंतु जुन्या अग्नीची ठिणगी, अंधूक प्रकाश राहो, तो प्रखरपणे जळणारा करायला हवा. एक दिवस तो झगझगीत होईल. ही ठिणगी म्हणजे गायत्री आहे. ती आपल्याकडे युगायुगातून आलेली आहे.

-----

## प्रकरण - १२

# गायत्री आणि संध्यावंदन

एखाद्या ब्राह्मण कुटुंबात तीन पिढ्या गायत्री मंत्र म्हटला नाही तर त्याचे सभासद जात गमावतात. (त्यांचे ब्राह्मण असणे समाप्त होते.) त्या कुटुंबातील सदस्य, त्यांची जात गमावतात. (त्यांचे ब्राह्मण असणे थांबते.) जेथे असे ब्राह्मण राहतात त्याला अग्रहार म्हणता येत नाही. कदाचित् ब्राह्मणांच्या तीन पिढ्यांनी गायत्रीचा त्याग केला नाही म्हणून त्यांना अजूनही ब्राह्मण म्हणता येते.

त्याचप्रमाणे एखाद्या ब्राह्मण कुटुंबाने तीन पिढ्या यज्ञ केला नाही तर त्याच्या सदस्यांना दुर्ब्राह्मण, अधम ब्राह्मण असे म्हटले जाते. जरी अधम असले तरी ब्राह्मण हे लेबल (चिठ्ठी) तसेच राहते. असे भ्रष्ट ब्राह्मण प्रायश्चित्ताने खरे ब्राह्मण होऊ शकतील. पण एखाद्या ब्राह्मणाच्या कुटुंबात तीन पिढ्या गायत्री पठण होत नाही असे वाटत नाही. अशा कुटुंबातील एखाद्या सदस्याचे ब्राह्मणत्व संपते आणि पुन्हा येत नाही. तो केवळ ब्राह्मण बंधू, ब्राह्मणांचा नातलग किंवा मित्र असू शकतो. हाच नियम क्षत्रियांना आणि वैश्यांना लागू आहे, ते क्षत्रियबंधू आणि वैश्यबंधू होतात.

मी पूर्वी उल्लेखलेल्या स्फुल्लिंगाचा अग्नी व्हायला पाहिजे. केवळ स्फुल्लिंग कोणताही हेतू साध्य करीत नाही. परंतु त्यात प्रखर ज्योत किंवा चमकदार अग्नीत रूपांतर होण्याची सुप्त शक्ती असते.

जे यज्ञोपवीत धारण करतात अशा सर्वांनी कमीतकमी रविवारी गायत्री-जप सहस्रवेळा केला पाहिजे. त्यांनी अशुद्ध अन्न खाऊ नये, अस्वच्छ ठिकाणी जाऊ नये आणि धर्माचरणातील आणि विधीतील शुद्धता ठेवण्यातील चुकांचे परिमार्जन केले पाहिजे. म्हणून त्यांनी त्यांचे शरीर पवित्र ठेवण्यासाठी आणि मंत्रशक्ती ग्रहण करण्यास पात्र होण्याची काळजी घेतली पाहिजे.

दुर्दैवाच्या काळातही पहाटे, मध्यान्ही आणि सायंकाळी दहा वेळा गायत्री म्हटली पाहिजे. या वेळा शांततेच्या असतात. पहाटेच्या वेळेस मानवासह सर्व प्राणी जागे होतात आणि त्यावेळेस मन प्रसन्न असते. सायंकाळी दिवसभराच्या कष्टानंतर सर्वांनी विश्रांती घेतली पाहिजे, ही वेळही शांत असते. दुपारी सूर्य सर्वात वर असतो आणि लोक घरी असतात, आरामात असतात आणि त्यांची मने शांत असतात. याकाळात आपण गायत्री, सावित्री आणि सरस्वती यांचे चिंतन केले पाहिजे. सकाळी विष्णूची, दुपारी ब्रह्माची आणि सायंकाळी शिवाची प्रामुख्याने उपस्थिती असते. म्हणून आपण सकाळी मूर्तिमंत विष्णू म्हणून, दुपारी मूर्तिमंत ब्रह्मा म्हणून आणि सायंकाळी मूर्तिमंत शिव मानून गायत्री चिंतन केले पाहिजे.

गायत्रीमध्ये सर्व वैदिक मंत्रांचे चैतन्य आणि ऊर्जा असते. वस्तुतः तीच इतर मंत्रांना बळ देते. गायत्री जपाविना इतर सर्व मंत्रांचे पठण व्यर्थ होय. आपल्याला संमोहनविद्या अनेक प्रकारे उपयुक्त असल्याचे आढळते आणि आपण त्या संमोहक शक्तीविषयी बोलत असतो. आपल्याला या ऐहिक अस्तित्वातून मुक्त करण्यासाठी, आपल्या वासना नियंत्रित करण्याचे आणि आपल्या जन्माचे ध्येय जाणण्याचे गायत्री हे संमोहक माध्यम आहे. आपण गायत्री हा स्फुल्लिंग फुलवीत राहिले पाहिजे आणि गायत्री जपाचे व्रत स्वीकारले पाहिजे. जर आपण अशास्त्रीय जीवनमार्ग स्वीकारला नाही आणि आपण आपले शरीर अशुद्ध केले नाही तर हा स्फुल्लिंग विझणार नाही.

गायत्री जप आणि अर्घ्य हे संध्यावंदनाचे महत्त्वाचे विधी आहेत. या विधीचे अंग हे इतर विधी आहेत. अशक्त किंवा आजारी व्यक्तीने कमीतकमी अर्घ्य दिलेच पाहिजे आणि दहा वेळा गायत्री मंत्र म्हटला पाहिजे. ''फक्त दोनच महत्त्वाचे आहेत, नाही का? ठीक आहे, आम्ही हे करू, अर्घ्य देऊ आणि गायत्री दहावेळा म्हणू.'' जर आपला हा दृष्टिकोन असेल तर, काळाच्या ओघात आपण संध्यावंदनाला आवश्यक असलेल्या ह्या दोन्हीचाही त्याग करू. अशक्त आणि दुर्दैवी लोकांसाठी असलेल्या नियमाच्या आधारे - अर्घ्य देणे आणि दहा वेळा गायत्री म्हणणे करणाऱ्यांची एका सुशिक्षिताचे चेष्टा केलेली आहे : ''ते नेहमीच अशक्त राहतील आणि एखाद्या आपत्तीचे बळी राहतील.'' संध्यावंदना योग्यप्रकारे योग्यवेळेस केली पाहिजे. महाभारताच्या युद्धाच्यावेळेस जेव्हा पाणी उपलब्ध नव्हते, तेव्हा योद्ध्यांनी पर्याय म्हणून योग्यवेळेत मातीचे अर्घ्य दिले.

अर्घ्य सूर्योदयापूर्वी, दुपारी आणि सूर्यास्ताच्यावेळेस दिले पाहिजे. एकदा एक इडैकाट्ड सिद्ध नावाचा माणूस होता. तो गुरे राखत असे. तो म्हणाला, ''काणामर कोणामर कण्डु कोडु आड्डुगान पोहुतु पार'' काणामल/र म्हणजे तुम्ही सूर्योदयापूर्वी आणि कोणामल/र म्हणजे सूर्य माथ्यावर आला असता आणि कण्डु म्हणजे सूर्यास्तापूर्वी. या तीन वेळा तुम्ही अर्घ्य दिलेच पाहिजे. ''आड्डु म्हणजे नीराड्डु'' गंगेत स्नान. ''काण म्हणजे सेतूला जाणे किंवा सेतूचे दर्शन घेणे'' ''पोहुतु पार'' म्हणजे गंगेत स्नान करून आणि सेतूला जाण्याने तुमची पापे धुऊन निघतील. येथे काशीला जाणे; तेथे गंगाजल घेणे आणि रामेश्वराला (सेतू) तेथील रामनाथस्वामीला अभिषेक करणे अशा परंपरेचा उल्लेख आहे.

गायत्रीच्या घोर जपाने आपल्याला वैदिक मंत्रावरचे प्रभुत्व प्राप्त होईल. गायत्री जप आणि अर्घ्य हे रोज न विसरता केले पाहिजे. आयुष्यात एकदा तरी गंगेत स्नान केले पाहिजे आणि रामेश्वराची/सेतूची यात्रा केली पाहिजे.

जर एखाद्या माणसाला ताप आला असेल तर त्याची काळजी घेणाऱ्या माणसांनी त्याच्या तोंडात संध्यावंदनाचे जल ओतले पाहिजे. हल्ली आपण सर्व, सदासर्वदा उच्च तापाने

व्यथित आहेत. जेव्हा तुम्हाला खूप ताप असतो तेव्हा तुम्हाला औषध घ्यावे लागते; तसेच गायत्री आत्म्यासाठी आवश्यक आहे आणि तिचा जप कधीही सोडून देता कामा नये. तुमच्या शरीराला औषधाची जितकी गरज असते त्यापेक्षा जास्त गरज आत्म्याला गायत्री जपाची असते. रोज न विसरता संध्यावंदना केली पाहिजे. आपणा सर्वांकडून विनासायास आणि काहीही पैसे खर्च न करता गायत्री जप केला जाऊ शकतो. तुम्हाला फक्त पाण्याची आवश्यकता असते. संध्यावंदना तुमच्या कल्याणाची हमी देणारे साधन आहे. जोपर्यंत तुमच्या जीवात जीव आहे तोपर्यंत तुम्ही ती केली पाहिजे.

गायत्री पूजा एक माता म्हणून केली पाहिजे. देव अनेक रूपांत त्याच्या भक्तावर कृपा आणि प्रेम देण्यासाठी अवतरतो. आई आपल्यावर इतर कोणापेक्षाही जास्त प्रेम करते. तिची आपल्याला भीती वाटत नाही आणि आपण तिच्याशी मोकळेपणाने बोलू शकतो. भगवान स्वतःला जितक्या रूपांत प्रकट करतो त्या सर्वात आपल्या सर्वांना मातेच्या रूपात प्रकट झालेला आवडतो. वेद गायत्रीला अशी माता म्हणतात.

हा मंत्र केवळ पुरुषांनी केला पाहिजे. पुरुषांनी केलेल्या जपाचा लाभ स्त्रियांना होतो. तसेच जेव्हा तीनही वर्ण गायत्री जप करतात तेव्हा इतर जातींना त्यापासून लाभ होतो. जर एखाद्या विधीचे फळ आपल्याला मिळाले तर तो आपण थांबवू. पण इतरांना त्यात लाभ होत असता तसे करू शकत नाही. ज्यांना गायत्री मंत्राचा अधिकार आहे त्यांनी स्त्रिया आणि ज्यांना अधिकार नाही अशा चतुर्थ वर्णाच्या वतीने जप करावा लागतो, अशांनी स्वतःला विश्वस्त मानायला हवे. जर ते त्यांच्या विश्वस्ताच्या कर्तव्यात चुकले तर त्याचा अर्थ असा की ते घोर अपराध करीत आहेत.

मंत्र असंख्य आहेत. त्यापैकी कोणताही मंत्र पठण करण्यापूर्वी आपण तसे का करीत आहोत, त्याचे फळ तो काय देईल याचा उल्लेख करतो. गायत्री मंत्राचा लाभ चित्तशुद्धी हा आहे. इतर मंत्रांचा हाच अंतिम हेतू असतो, पण चित्तशुद्धी हा गायत्री जपाचा थेट परिणाम आहे.

हल्लीसुद्धा पहाटे आणि सूर्यास्तानंतर संध्यावंदना करणे कठीण नाही. कार्यालयातील कर्मचारी आणि इतर कामगार हे माध्यान्ही घरी नसतील; त्यांनी माध्यान्हिका (दुपारचे वंदन) सूर्योदयानंतर दोन तास चोवीस मिनिटांनी करावी - याला ''संगव-काल'' म्हणतात. जर दिनमानाचे पाच भाग केले तर हा काळ त्याचा दुसरा भाग होय.

अगदी अशक्य वाटत असल्याशिवाय रोजची संध्यावंदना आपण कधीही चुकवू नये. जेव्हा आपण आजारी पडतो, आपल्या असहायतेत इतरांकडे पाणी किंवा कांजी मागतो तसेच आपण आपल्या एखाद्या आप्ताला किंवा मित्राला आपल्यावतीने संध्यावंदना करायला सांगू शकतो.

**आपण सर्वजण देवाची प्रार्थना करू या की आपल्यावर त्याने कृपा करावी; ज्यायोगे आपल्यातील मंत्राचा अग्नी विझणार नाही आणि तो अधिक प्रखरपणे प्रज्वलित राहो.**

-----

## प्रकरण - १३
# संध्यावंदनेचे इतर पैलू

अस्त्र आणि शस्त्र हे दोन शब्द शस्त्रास्त्रांचे दोन प्रकार दाखविण्यासाठी धनुर्वेदात वापरले आहेत. सुरा, बाण, भाला, सोटा इ. - खरी शस्त्रास्त्रे - ही 'शस्त्र' या नावाखाली येतात. अस्त्र म्हणजे मंत्राने शक्ती दिले गेलेले शस्त्र. जर तुम्ही दर्भ किंवा गवताचे पाते, योग्य मंत्र म्हणून सोडले तर त्याचे रूपांतर शस्त्रात होईल. तसेच शस्त्रेही मंत्र म्हणून सोडता येतात. योग्य मंत्र म्हणून जर तुम्ही एखाद्या वस्तूकडे किंवा व्यक्तीकडे काही फेकले तर त्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा ते आपटल्यावर नाश होईल.

असुर किंवा मानवाला वेढणाऱ्या दुष्ट शक्तींचा नाश करण्यासाठी अस्त्र सोडण्याचे द्विजांचे (ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांचे) कर्तव्य आहे. अस्त्र म्हणजे जे फेकले जाते, टाकले जाते ते, नव्हे का? (द्विजाकडून) फेकले जाणारे अस्त्र म्हणजे काय? लोकांच्या मनाचा ताबा घेतलेल्या दुष्ट शक्ती किंवा राक्षसांना घालवून देण्यासाठी किंवा त्यांचा नाश करण्यासाठी आपण पाणी फेकतो. हे पाणी अस्त्र हे संध्यावंदनेत अर्पण केलेल्या नैवेद्य/तीर्थाप्रमाणेच आहे. आपण अर्घ्य देताना मनात हा हेतू ठेवला पाहिजे की ''पापमयता आणि असत्याचा नाश होवो. ज्ञानाचा सूर्य प्रखरपणे तळपत राहो.'' तुम्ही काहीही करत असा किंवा करीत नसा, तुम्ही तीन वेळा अर्घ्य दिलेच पाहिजेत. तुम्ही ते श्वास रोखून/एकाग्रतेने, कसे का होईना केले पाहिजे.

जेव्हा एखादा माणूस एखादे काम तळमळीने आणि मनापासून करतो तेव्हा आपण म्हणतो की तो ते काम श्वास रोखून करतो/एकाग्रतेने करतो. वस्तुतः संध्यावंदना एकाग्रतेने करायची असते. जर आपण ती तशी केली तर सर्व दुष्ट शक्तींचा नाश होईल. हल्ली आपण चार बोटांनी आपले नाक पकडतो, एवढेच करतो. शास्त्र ''नासिकां आयम्य'' असे नाही सांगत तर ''प्राणान् आयम्य'' असे सांगते. त्याचा अर्थ केवळ नाक पकडण्याऐवजी तुमचा श्वास रोखा, प्राण रोखा किंवा जैवशक्ती रोखा.

सर्व कामे एकाग्रतेने केली पाहिजेत. अशी मनाची एकाग्रता हवी की पाण्याचे अस्त्रामध्ये रूपांतर व्हावे. या हेतूनेच श्वासावर नियंत्रण हवे. तुम्ही विचाराल, ''श्वास रोखून तुम्ही मनाला कसे रोखू शकता?'' आपण पाहतो की जेव्हा आपले मन स्थिर असते तेव्हा आपले श्वसन थांबते. जेव्हा आपले कुतूहल जागृत होते, जेव्हा आपण दुःखी असतो किंवा अतिशय आनंदी असतो तेव्हा आपले मन एकाग्र होते. आपण उद्गारतो, ''आ!'' आणि एक क्षणभर आपले श्वसन थांबते. पण लगेच आपण जोराने श्वसन करू लागतो. आपण आपल्या प्रयत्नाने आपले श्वसन थांबवीत नाही - ते थांबणे अनैच्छिक असते. जेव्हा आपले मन आच्छादलेले असते किंवा कशात तरी मग्न असते तेव्हा ते थांबते. नंतर आपण निश्वास टाकतो

- दीर्घ श्वास घेतो - क्षणभर श्वसन थांबविती. यावरून आपल्या असे लक्षात येते की जेव्हा क्षणभर श्वसन थांबते तेव्हा मन एकाग्र होते. अर्घ्य देताना श्वास रोखण्याचे हे एक कारण आहे.

जर आपण प्राणायामाचा सराव केला तर आपण आपल्या मनाला एकाग्रतेची सवय लावू. हे योगासाठी महत्त्वाचे आहे. दीर्घकाळ प्राणायाम करण्याचा सराव करणे कठीण आहे आणि तो गुरूच्या मार्गदर्शनाखाली केला पाहिजे. संध्येत तो आपण दहा वेळा करतो. काही विधींच्यावेळेस पहिली पायरी म्हणून तो तीन वेळा केला जातो. जर उपनयनानंतर आपण प्राणायाम नियमितपणे केला तर आतापावेतो योगीश्वर - योग्यांचा राजा - झालो असतो. जे आपण करतो ते योग्य रीतीने केले पाहिजे. जेव्हा आपण संध्येचा एक भाग म्हणून प्राणायाम करतो तेव्हा आपण ३० सेकंद किंवा तितका वेळ श्वास रोखला पाहिजे. अधिक वेळ नको. जेव्हा श्वास रोखला जातो तेव्हा मन शांत होते. यास्थितीत जर अर्घ्य अर्पण केले तर खरंच दुष्ट शक्तींना घालवून दिले जाईल. जेव्हा आपले मन स्थिर असते तेव्हा जे पाणी आपण टाकतो त्याचे रूपांतर दुष्ट शक्तींचा नाश करणाऱ्या शस्त्रात होते.

दुष्ट शक्तींच्या विरुद्ध अर्घ्य वापरल्यानंतर आपण गायत्री जप केला पाहिजे. आपण आपल्या कुवतीप्रमाणे थोडा वेळ श्वास रोखून व नंतर सोडून प्राणायाम केला पाहिजे. ही प्रक्रिया पुन्हा केली पाहिजे. दीर्घकाळ श्वास नियंत्रित न करता. संध्येतील सर्व पायऱ्या - संकल्प, मार्जन, अर्घ्यप्रदान, जप, स्तोत्र, अभिवादन - यामागे परमेश्वरी कृपेचा हेतू आहे. हे आपण प्रारंभी करीत असलेल्या संकल्पात नमूद केलेले असते. आरंभापासून शेवटपर्यंत संध्या परमेश्वराला समर्पित असते आणि प्राणायाम हा त्यातील एक महत्त्वाचा भाग असतो.

शास्त्रानुसार आजारी माणसानेसुद्धा दिवसातून तीन वेळा प्राणायाम केला पाहिजे. म्हणजे श्वास नियंत्रणाने कोणताही त्रास होत नाही. तो आजार बरे करण्याचे माध्यम होऊ शकतो आणि तो दीर्घायुष्याची औषधयोजना असतो.

ऋषयो दीर्घ-संध्यात्वाद दीर्घमायुरवाप्नुयुः प्रज्ञां यशश्च कीर्तिं च ब्रह्मवर्चसमेव च ।
(मनुस्मृतीः ४.९४)

अभिवादनामध्ये आपण ज्या ऋषीपासून आलेलो असतो त्याचा उल्लेख करतो. आपण त्या ऋषींचे गोत्राचे आहोत म्हणून का होईना वैदिक विधींचे पालन करणे हे आपले कर्तव्य आहे. त्याच्यानंतर परंपरेत अनेक ऋषी असतात. आपण असे शब्द वापरतो ''त्रयाऋषेयं'', ''पंचाऋषेयं'', ''एकाऋषेयं'' म्हणजे संबंधित गोत्रांमध्ये तीन ऋषी, पाच ऋषी आणि एक ऋषी होते. ते बराच काळ जगलेले असावेत आणि त्यांनी संध्यावंदना करून ज्ञान, कीर्ती, ब्रह्मतेज आणि आध्यात्मिक लौकिक प्राप्त केला. हा मनुस्मृतीच्या कडव्याचा अर्थ आहे.

आपण दुर्लक्ष करून आपल्याकडे अखंड चालत आलेला हा धागा, परंपरा तोडता कामा नये. आपण परमेश्वराला नैवेद्य म्हणून संध्या केली पाहिजे आणि ती अर्थ समजून, श्रद्धेने व भक्तीने केली पाहिजे. त्यात एकाग्रता असलीच पाहिजे आणि कोणताही मंत्र सोडून देता कामा नये.

आपण आपल्या मनाने, वाणीने आणि शरीराने पाप करतो. मी पूर्वी सांगितले की धार्मिक विधीही त्याच मनाने, वाणीने आणि शरीराने करून पापे धुऊन टाकली पाहिजेत. संध्येत आपण तोंडाने मंत्र म्हणतो आणि जसा गायत्रीचा जप करतो त्यावर मनाने चिंतन करतो आणि अशा विधींमध्ये मार्जन करतो तेव्हा आपण शरीरशुद्धी करतो. संध्या हा कर्मयोग, भक्तियोग आणि ज्ञानयोग असा एकत्रित योग आहे. (तो कर्ममार्ग, भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग यांचे एकत्रीकरण आहे.)

-----

## प्रकरण - १४

# स्त्रियांबाबत काय?

मी म्हणालो की द्विजांनी स्त्रिया आणि इतर जातींचे कल्याण मनात ठेवून संध्यावंदना केली पाहिजे. मी हेही स्पष्ट केले की चतुर्थवर्णासाठी सर्व संस्कार का नाहीत. आता आपण स्त्रियांच्या प्रश्नावर आणि त्यांच्यासाठी असे विधी आणि संस्कार का नाहीत याचा विचार केला पाहिजे.

जरी आपण नवजात मुलीचे पुण्याहवाचन - हा दिवस शुभ असल्याचे समारंभाच्या पुरोहिताने सांगणे आणि नामकरण करतो, त्यांचा पहिला वाढदिवस साजरा करतो, तरी त्यांचे चौल आणि उपनयन किंवा इतर संस्कार किंवा ब्रह्मचाऱ्याची प्रतिज्ञा/नेम हे करीत नाही. अर्थात त्यांना विवाहसंस्कार असतो. परंतु इतर यज्ञांमध्ये जरी ती पतीच्या बाजूला असली तरी मुख्य भाग पतीचा असतो. औपासनामध्ये फक्त होमाग्नीमध्ये आहुती देताना स्त्रीचा सहभाग असतो. असे का? मुलाच्या जन्मापूर्वी केले जाणारे विधी मुलाच्या जन्माच्या हेतूने (मुलगा व्हावा म्हणून) असतात. (निषेक, पुंसवन, सीमंत). हल्लीचे सुधारक आणि स्त्रीमुक्ती करणारे म्हणतात त्यानुसार हिंदू स्त्रियांना खालच्या स्थानावर आणि अंधारात ठेवले जाते असा अर्थ आहे का?

चतुर्थवर्णाला कोणतेही संस्कार करायचे नाहीत, त्याच्या कारणाचा मी काय उल्लेख केला? की त्यांचा व्यवसाय विचारात घेता, संस्कारातून मिळणारे शारीरिक आणि मानसिक लाभ न घेता ते जगाच्या कल्याणासाठी काम करू शकतात; अशा विचाराने त्यांना संस्कार आवश्यक नाहीत. जर ते त्यांचा वेळ वेदाध्ययन आणि यज्ञांमध्ये घालवीत राहिले तर त्यांच्या कर्तव्याचे काय होईल? म्हणून बहुतेक संस्कारांची त्यांना गरज नसते. त्यांची कर्तव्ये पार पाडून या विधींच्याविना ते त्यांच्या ध्येयाप्रत पोहोचू शकतात. ''स्वकर्मणा तामभ्यर्च सिद्धिं विन्दति मानवः'' भगवद्गीता (१८.४६) म्हणते. मी पूर्वी यासंबंधी तुमच्याशी बोललेलो आहे.

ज्याप्रमाणे समाज व्यवसायाप्रमाणे विभागलेला असतो आणि त्यानुसार संस्कारही भिन्न असतात, त्याचप्रमाणे घरगुती जीवनात पुरुष आणि स्त्रिया यांच्यात भेद असतात. घर चालविणे म्हणजे विविध प्रकारची कामे, स्वयंपाक, घरस्वच्छता, मुलांचे संगोपन इ. ही घरगुती कामे स्त्रिया निसर्गतः पुरुषांपेक्षा अधिक चांगली करू शकतात. जर विधींमध्ये स्त्रियांनी सहभाग घेतला तर काय होईल? पतीची सेवा करून आणि घरात लक्ष देऊन ती आतून शुद्ध होत असते.

वस्तुतः पुरुष आणि स्त्रियांमध्ये भेद नाही. किंवा हल्लीचे सुधारक जो आरोप करतात त्याप्रमाणे फरक केला जात नाही. घरच नव्हे तर संपूर्ण राष्ट्राची योग्य निगा राखण्यासाठी

आणि कोणत्याही कार्याची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून कामाचे विभाजन झालेले असते. या श्रमविभागणीत कोणालाही कमी लेखण्याचा हेतू नाही.

काही लोकांच्या बाबतीत त्यांचे शरीर हे मंत्रांचे जतन करण्यासाठी असते आणि त्या कार्यासाठी पात्र बनविण्याच्या हेतूने संस्कार असतात. ज्या लोकांना अशी कामे नसतात त्यांच्यासाठी तेच विधी का ठेवायला हवेत? रेल्वे पार्सलने पाठविलेल्या काचेच्या वस्तूची विशेष काळजी घेतली जाते. कारण ती ठिसूळ असते. रॉकेल किंवा पेट्रोल पाठविण्यासाठी अधिक काळजी घेतली जाते. इतर वस्तूंचे दळणवळण करण्यात अशी काळजी घेतली जात नाही, तर त्याचा अर्थ असा आहे का की त्या वस्तू गौण समजल्या जातात? अवकाशयात्रींना अवकाशात पाठविण्यापूर्वी आणि ते परत आल्यानंतर त्यांना एकांतात ठेवले जाते. अवकाशात आढळलेल्या किरणोत्सारापेक्षाही मंत्रांचा किरणोत्सार अधिक बलशाली आहे. जर तुम्हाला ही वस्तुस्थिती आकलन झाली तर तुम्हाला इतरांपासून ब्राह्मणांना वेगळे का केले जाते आणि त्यांच्यासाठी विशेष संस्कार का आहेत ते कळेल.

ब्राह्मणाचे शरीर (पुरुष) मंत्रांचे पोषण करण्यासाठी असते. म्हणून गर्भधारणेपासूनच पुंसवन, सीमंत इ. संस्काराद्वारे ते शुद्ध करायचे असते. याच हेतूने मुलाच्या जन्मानंतरही करायचे संस्कार असतात.

मानवाच्या कल्याणासाठी व्यवसायांचे योग्य रीतीने विभाजन व्हायला पाहिजे याकडे प्रत्येकाने लक्ष दिले तर हक्कांविषयी बोलण्याऐवजी समजेल की स्त्रिया आणि इतर जातींच्याबाबत शास्त्रांनी भेद केलेला नाही.

-----

प्रकरण - १५

# आमच्या स्त्रियांचे सामाजिक उच्च स्थान

स्त्रियांना स्वतःच्या इच्छेने विधी करण्याचा अधिकार नसल्याचे जे तक्रार करतात त्यांनी पत्नीविना ते करण्याचा पुरुषांनाही अधिकार नाही हे लक्षात ठेवावे. त्यांना हे सत्य समजले तर हिंदू शास्त्रे स्त्रियांना गौण लेखतात असा आरोप कोणी करणार नाहीत. तो ते विधी मानवाच्या कल्याणासाठी आणि अंतर्शुद्धीसाठी करतो. या हेतूने ब्रह्मचर्याश्रम पूर्ण झाल्यावर समावर्तनानंतर त्याला विवाह नावाच्या संस्कारातून जावे लागते.

विवाह हा ''सह-धर्म-चारिणी-संप्रयोग'' म्हणून ओळखला जातो. जो धर्माचरण करतो त्याचे पत्नीशी मीलन असा साधारणपणे याचा अर्थ आहे. त्याचा स्पष्ट अर्थ असा आहे की वैषयिक सुख हा त्याचा हेतू नसून धर्माचा पाठपुरावा करणे आहे. शास्त्र माणसाला स्वतःच एकट्याने धर्माचा पाठपुरावा करायला सांगत नाही. पण त्यासाठी मदतनीस घ्यायला सांगतो. बायकोला 'धर्मपत्नी', 'सहधर्मचारिणी' म्हणून तिचा काम किंवा इंद्रियसुखाशी नसून धर्माशी संबंध जोडला जातो. शास्त्रे स्त्रियांना वरचे स्थान देतात याचा हा पुरावा आहे.

ब्रह्मचारी आणि तपस्वी दोघेही कोणाच्याही सोबतीविना त्यांच्या त्यांच्या आश्रमात धर्माचे पालन करतात. गृहस्थाला तसा शास्त्राने घालून दिलेल्या नियमानुसार त्याच्या पत्नीसह कर्मे तसेच गृहस्थधर्म पार पाडावा लागतो. गृहस्थधर्म ही त्यांची सामाईक मालमत्ता असते. फक्त गृहस्थच आपल्या पत्नीसह यज्ञ करू शकतो, ब्रह्मचारी किंवा तपस्वी नव्हे. जर पत्नी फक्त वैषयिक समाधानासाठी असती तर तिच्या मृत्यूनंतर मनुष्य यज्ञ करू शकत नाही यावर शास्त्रांनी जोर दिला असता का? स्त्रियांची मुक्ती साधणारे म्हणतात की ती स्वतः विधी करू शकत नाही. त्यांनी हे जाणले पाहिजे की पतीही तिच्याविना तो हक्क गमावतो आणि हे वेदांनुसार आहे. (पत्नीवतस्य अग्निहोत्रं भवति). एका थोर मनुष्याने त्याच्या पत्नीच्या मृत्युच्यावेळेस असा शोक केला की ''तू माझे सर्व यज्ञ आणि इतर विधी घेऊन गेलीस.''

अशा प्रकारे आपल्या शास्त्रांनी कर्तव्ये आणि कार्य याबाबत स्त्रियांना उच्च स्थान दिलेले आहे.

-----

जीवनाचा

वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - १८

## विवाह

प्रकरण - १

# धर्माचे आचरण

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ जीवनाची चार उद्दिष्टे आहेत. त्यातील पहिला, धर्म हा जीवनभराचे उद्दिष्ट आहे. अर्थ (भौतिक कल्याण) आणि काम (इच्छा, प्रेम) माणसाच्या जीवनात एका ठरावीक स्थितीत त्यागले पाहिजेत. परंतु जोपर्यंत अशाप्रकारचा आपला पाठपुरावा चालू राहतो तोपर्यंत तो पाठपुरावा धर्मावर आधारलेला असला पाहिजे. जेव्हा एखादा मनुष्य ऐहिक जीवनाचा त्याग करून तपस्वी बनतो तेव्हा तो धर्माच्या पलीकडे जातो. परंतु तो धर्माच्या विरुद्ध जात नाही किंवा विरुद्ध बोलत नाही. वस्तुतः त्याच्या जीवनावर संन्यासी धर्माचे नियंत्रण असते.

मी पूर्वी पूर्वमीमांसा (कर्मकांड) आणि उत्तरमीमांसा (ज्ञानकांड) यांवर बोललेलो आहे. पूर्वमीमांसासूत्राचा आरंभ ''अथातो धर्मजिज्ञासा'' म्हणजे ''धर्म जाणण्यास आरंभ'' यापासून होतो. ''उत्तरमीमांसा'' (ब्रह्मसूत्र) प्रारंभ ''ब्रह्मजिज्ञासेपासून'' म्हणजे ब्रह्म जाणण्यापासून होतो.

जेव्हा तुम्ही ब्रह्म जाणून घेता आणि त्यावर चिंतन करता तेव्हा तुम्हाला धर्माचे भान नसते. धर्म हा कर्माच्या द्वैत विश्वासाठी असतो. अद्वैत ज्ञानामध्ये इंद्रियगोचर विश्व अस्तित्वात नसल्याने त्यात धर्माचा विचार नाही. परंतु त्याचा अर्थ असा नाही की ते (अद्वैत ज्ञान) धर्माच्या विरुद्ध आहे आणि ते सर्व धर्माच्या पलीकडे आहे. गीतेमध्ये भगवान उद्घोष करतात की ''सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहम् त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः।। भगवद् गीताः १८-६६. (सर्व धर्मांचा त्याग कर आणि मला शरण ये.) आपण असा अर्थ घ्यायचा का की अधर्म करणाऱ्या आपणास त्याचा आश्रय घ्यायचा आहे. देवाच्या शब्दांचा खरा अर्थ असा आहे की ''धर्म आणि अधर्माची जिज्ञासा सोडून द्या.'' त्यांच्याही पलीकडे जा. दोन्हीचेही उगमस्थान असलेल्या उद्दिष्टांकडे जा. जे काही शोधले जाते तो अंतरंगातील अनुभव असतो. ज्ञानी लोकांच्याकडून केली गेलेली कर्मे ही स्वाभाविकपणे धर्मसंगतच असतात. इतकेच नव्हे ती केवळ धार्मिकच असतात.

सर्वांनीच सांगितले आहे की धर्म हा माणसाच्या जीवनाचा नेहमीच एक भाग आहे. माणूस जेव्हा उच्च आध्यात्मिक स्थितीला पोहोचतो तेव्हा त्याला त्याचे धर्माचे भान नसते. पण धर्म त्याच्या ठिकाणी वसत असतो आणि तो जे काही करतो त्यात तो दिव्यासारखा प्रकाशमान होतो.

जीवनाच्या चार उद्दिष्टांपैकी दुसऱ्याचा म्हणजे अर्थाचा पाठपुरावा धर्मावर आधारलेला असला पाहिजे. हाच नियम तिसऱ्या उद्दिष्टाला म्हणजेच कामाला लागू पडतो. राजा दिलीपाची

स्तुती करताना रघुवंशामध्ये कालिदास याने हाच विचार व्यक्त केला आहे. 'अभ्यर्थाकामौ तस्यास्तां धर्म इव मनीषिनः।' (सुज्ञ अशा दिलीपाबाबत अर्थ आणि काम हेही धर्माच्याच प्रकृतीचे होते.) गृहस्थाश्रमाचा आरंभ विवाहापासून होतो. त्यात भौतिक कल्याण आणि वासना यांचा उगम धर्मात होतो. ब्रह्मचारी आणि तपस्वी यांना धनप्राप्ती आणि वैषयिक सुख यांची पर्वा नसते, गृहस्थाश्रम हा त्या दोन्हीतील सेतू आहे आणि त्यात दोन्हींना अनुमती आहे. (धर्माच्या सीमेत).

माणसाला जगात जगण्यासाठी पैसा आणि भौतिक वस्तूंची गरज असते. संतती त्यांच्या भूतकर्मानुसार जन्मावी यासाठी काम आणि वैषयिक वासना यांच्यासाठी त्यांची गरज असते. आपण आपली कर्मे भोगून संपवेपर्यंत आपल्याला या जगात जगावे लागेल. याप्रकारे जर इतरांना संधी द्यायची असेल तर आपल्याला धनप्राप्ती करावी लागेल आणि कामाचा अनुभव घ्यावा लागेल म्हणजे ते (अन्य) पुन्हा जन्म घेतील. कर्मत्याग केलेल्या संन्याशांना अन्न देण्यासाठी आपल्याला गृहस्थांची गरज असणार. या जगात सर्वांनीच तपस्वी होणे हे व्यवहार्य होणार नाही. समाजाचा कणा असे म्हणून शास्त्रांनी गृहस्थांची खूप स्तुती केलेली आहे. कारण तसे त्यांचे जगणे आहे; किंवा जीवनात त्यांनी धर्मानुसार आचरण करीत ब्रह्मचारी व तपस्वी यांच्या गरजा पूर्ण करणे अपेक्षित आहे.

ब्रह्मचर्याश्रम संपवून आणि ज्ञान आणि सद्गुण प्राप्त केल्यावर माणसाने धार्मिक विधी करण्यासाठी विवाह केला पाहिजे आणि धर्मानुसार जीवन जगले पाहिजे. विवाहाचा चाळीस संस्कारांत समावेश आहे, हे असे दर्शविते की जीवन शुद्ध करणारा तो पवित्र विधी आहे. ब्रह्मचारी जीवनात उपनयन हे प्राथमिक (पूर्वांग) आहे तसे गृहस्थाला विवाह आहे. त्याचा हेतू इंद्रियांना शिस्त लावणे आणि विविध कर्तव्ये पार पाडण्यासाठी पाया तयार करणे होय.

जगाच्या कल्याणासाठी असलेली कर्तव्ये पार पाडताना ऐंद्रिय सुखाचा उपभोग घ्यायचा एवढाच गृहस्थाच्या जीवनाचा अर्थ नाही. वास्तव असे आहे की काम या पुरुषार्थधर्माने युक्त होण्यासाठी या अवस्थेची रचना केलेली आहे. धर्म म्हणजे प्रत्येक गोष्ट ठरावीक मर्यादेत आणायची, ठरावीक शिस्त आणि सभ्य वर्तनात आपल्या कामाला धर्माकडून प्रेरणा दिली जाते म्हणजे प्रत्येकाने वैवाहिक जीवनात वासनेला लगाम घातला पाहिजे, म्हणजे हळूहळू वैषयिक भावनांची तीव्रता कमी होईल आणि शेवटी तो संन्यासप्राप्तीसाठी लागणारी परिपक्वता मिळवू शकेल. तरी ती स्थिती शेवटी येते. परंतु गृहस्थाश्रमात वासना थोड्या-थोड्या कमी केल्या पाहिजेत; बळजबरीने नव्हे. गुरुकुलात ब्रह्मचारी कडक शिस्तीत असतो. ती शिस्त त्याला पशुवासनेत वाहून जाण्यापासून वाचविते.

जरी आपण पशुवासनेबद्दल बोलतो तरी हे नमूद केले पाहिजे की प्राणी विशिष्ट ऋतूत प्रजननासाठी एकत्र येतात. जेव्हा त्या जातीची मादी गर्भधारणेसाठी तयार असते तेव्हाच त्यांना

लैंगिक तृष्णा असते. मानव अशाबाबतीत नीच आहे. ब्रह्मचर्य अशा वैषयिक वासना प्रथम नियंत्रित करते. नंतर काम हा धर्माला पूरक असल्याने गृहस्थाश्रमात वासना नियंत्रणात ठेवल्या जातात.

विषयवासना नियंत्रित ठेवण्याची शास्त्रीय पद्धत कोणती? स्त्रीच्या पाळीपासून पुढे चार दिवस समागम नको. नंतर पुढे बारा दिवस परवानगी आहे. पुन्हा स्त्रीला पुढची पाळी येईपर्यंत समागम नको. त्या बारा दिवसातही प्रतिपदा, काही तिथीवृद्धी अशावेळेस नको. जर असे नियम पाळले तर ते जोडपे मानसिक त्याचप्रमाणे शारीरिकदृष्ट्या आरोग्यपूर्ण राहील.

-----

# प्रकरण - २

# मुलींसाठी उपनयन

ब्रह्मचर्य मुलांना धर्माप्रमाणे आचरण करण्यास तयार करते, मग मुलींचे काय? मुलीसाठी उपनयन नसते आणि ब्रह्मचर्याश्रमही नसतो. एखाद्या पुरुषाप्रमाणे स्त्रीच्याही मनाला शिस्त लागायला नको का? जर तुम्ही सुधारकांची अशी टीका ऐकली की उपनयन आणि ब्रह्मचर्याश्रम नाकारून स्त्रियांवर अन्याय केला गेला आहे, तर माझे उत्तर 'नाही' असे आहे.

पुरुष त्यांच्या ब्रह्मचर्याश्रम आणि उपनयनानंतर विवाह करतात. स्त्रियांना विवाह हाच उपनयन संस्कार होय. मुलगा जसा त्याच्या गुरूला स्वतःला अर्पण करतो तसे मुलीने तिच्या लहानपणापासून तिचे वैवाहिक जीवन आणि त्याहीपुढे पतीला अर्पण केले पाहिजे. मनुस्मृती म्हणतेः "स्त्रीणां उपनयन-स्थाने विवाहं मनुरब्रवीत्" (मनु म्हणाला की स्त्रियांसाठी विवाह हा उपनयनाच्या जागी आहे.) याचे बाह्य लक्षण म्हणजे पुरुष परिधान करीत असलेले पवित्र सूत्र आणि स्त्रिया धारण करीत असलेले मंगळसूत्र.

मी म्हणालो की उपनयन म्हणजे "जवळ घेऊन जाणे", मुलाला ब्रह्मचर्याश्रमासाठी गुरूकडे घेऊन जाणे. स्त्रीचा गुरू तिचा पती असतो. त्याच्याशी विवाहात जोडले जाणे म्हणजे तिचे उपनयन.

शास्त्रानुसार मुलाचे उपनयन तो सात वर्षांचा असतो तेव्हा केले पाहिजे. मुलीचाही त्याच वयात विवाह केला पाहिजे. जसा मुलाच्या ब्रह्मचर्याचा आरंभ त्याचे मन कामाने व्यस्त होण्यापूर्वी व्हावा तसा मुलीला कामभावना जाणवण्याच्या आत तिचा विवाह व्हावा. तिने तिचा पती यास गुरू आणि ईश्वर म्हणून पाहिले पाहिजे आणि मनापासून त्याला स्वतःला अर्पण केले पाहिजे. जर तिचा विवाह लहान असताना झाला तरच ती असा दृष्टिकोन स्वीकारू शकेल. नंतर ती अनेक बाबतीत वाद घालेल, प्रश्न विचारेल आणि अहंकाराच्या भावना वाढीस लागतील.

गुरूच्या किंवा ईश्वराच्या पायाशी लोळण घेणे - थोडक्यात शरण जाणे - हे स्वतःच्या मुक्तीचे उत्कृष्ट साधन आहे. ही समर्पणाची कल्पना गीतेच्या श्लोकात सांगितलेली आहे, ईश्वर गुरू किंवा पती यास शरण जाणेः जेव्हा तुम्ही एखाद्या व्यक्तीला किंवा देवतेला शरण जाता तेव्हा तुमच्यापाशी काहीही राहत नाही. ज्याला तुम्ही शरण जाता त्याच्याद्वारे ईश्वर तुम्हाला कृपेचे वरदान देईल.

ऋषींनी तयार केलेल्या पद्धतीनुसार उपनयनाच्या वेळेस मुलाला त्याच्या गुरूला शरण जावे लागते तसे मुलीला तिच्या विवाहाच्या वेळेस तिच्या पतीला शरण जावे लागते.

मुलीला पुरुषाच्या, तिच्या पतीला शरण जाण्यास सांगून गौण मानले आहे असे नव्हे. मुलालाही त्याच्या गुरूला शरण जाण्यास सांगितले आहे. शास्त्राचा असा दृष्टिकोन आहे की ज्या वयात मुलगा गुरूला शरण जातो त्याच वयात मुलगी विवाह होऊन पतीला शरण जाते.

पती-पत्नीविषयी बोलताना एक दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ आहे का असा प्रश्न निरर्थक होय. हक्क आणि प्रतिष्ठा हा प्रश्नही तितकाचा बिनमहत्त्वाचा आहे. जर हे समजून घेतले तर समर्पण हे अतिमहत्त्वाचे असल्याचे दिसेल. हा दृष्टिकोन ध्यानात ठेवून, मुलाच्या बाबतीत उपनयन आणि मुलीच्या बाबतीत विवाह या कल्पना आकारास आलेल्या आहेत; त्यांचे मोल जाणले पाहिजे.

-----

## प्रकरण - ३

# विवाहाचे वय आणि कायदा

आपण पाहिले की मुलगा जेव्हा सात वर्षाचा असतो तेव्हा उपनयन करणे हे सर्वात चांगले. म्हणजे गर्भधारणेपासून सुमारे आठ वर्षे. मुलीचा विवाहही त्याच वर्षाच्या सुमारास केला पाहिजे म्हणजे तिचाही समर्पणाचा दृष्टिकोन वाढेल. पण तुम्ही विचाराल की हल्लीच्या दिवसात हे शक्य आहे का? ते कायद्याच्या विरुद्ध असणार नाही का?

कायद्याचे उल्लंघन करा असे मी सांगणे योग्य होणार नाही. जे आज राज्य करतात त्यांनीच एकेकाळी सविनय कायदेभंगाचा अवलंब केला होता. जेव्हा परमगुरूंनी हे सांगितले तेव्हा काँग्रेस केंद्रात आणि बहुतेक राज्यांमध्ये सत्तेत होती आणि स्वातंत्र्यचळवळीत गांधीजींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने सविनय कायदेभंगाचे शस्त्र घेतले होते. त्यांनी त्यांच्या कृतीचे असे समर्थन केले की "काही लोकांनी कायदे म्हणतात ते केले. पण आम्ही ते आमच्या स्वातंत्र्याच्या मार्गात येऊ देणार नाही." आपल्या वधूचे वय ठरविणाऱ्या कायद्याचा विरोध करण्याचे मी तुम्हाला का सांगत नाही? विवाहसंस्काराला आत्मिक पातळीवरून ऐहिक पातळीवर आणणाऱ्या कायद्याच्या विरोधात जाणे किंवा त्यासाठी कारावासात जाण्याची लोकांची तयारी नाही म्हणून नव्हे. मी तुम्हाला कायद्याचे अनुल्लंघन न करण्याचे सांगत आहे कारण ही विरोधवृत्ती इतर बाबतीत आली तर त्यामुळे समाजाचीच शिस्त आणि नियम धोक्यात येईल. मुलीचा विवाह एका ठरावीक वयात व्हावा हा शास्त्रीय दृष्टिकोन शासनाच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत राहिले पाहिजे.

परंतु केवळ शासनच शास्त्राच्या विरुद्ध गेले आहे असे नाही. आपले ९० टक्के लोक शास्त्रीय दृष्टिकोनाचा मान ठेवत नाहीत. जे ह्या धर्मशास्त्रात प्रवीण आहेत त्यांनी इतरांचे याबद्दलचे अज्ञान दूर केले पाहिजे. कायद्याच्या विरुद्ध न जाता ह्या प्रथेचे पुनरुज्जीवन करण्यासाठी शांतता मार्गाने त्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. मग त्याचा परिणाम होण्यासाठी शंभर किंवा त्यापेक्षा अधिक वर्षे लागोत. जरी त्याला हजारो वर्षे लागली आणि आपण त्याची फळे पाहण्यास हयात नसलो तरी आपण आताच बी पेरले पाहिजे. प्रयत्नाशिवाय काहीही घडणार नाही. जर बीज लावले नाही तर झाड उगवणार नाही.

मन वळविण्याच्या दृष्टीने, धर्मशास्त्र हे कायद्याचा संग्रह आहे हे शासन आणि लोक यांच्यावर आपण सतत ठसविले पाहिजे.

-----

## प्रकरण - ४

# विवाहाचे वयाविषयीचा विरोधाभास

शतक उलटताना हिंदूतील प्रभावशाली लोकांनी बालविवाह बंद करण्याची मागणी केली आणि मुलींच्या वयात आल्यावर विवाह करण्याची शिफारस केली. त्यांनी सभा घेतल्या आणि बालविवाहाविरुद्ध ठराव संमत केले. त्यांच्याकडे वेदांवरच्या श्रद्धेचा अभाव होता म्हणून नव्हे तर बहुतेकजण त्यांच्या दृष्टिकोनाला वेदात पुरावा असल्याचे म्हणत. त्यांच्यामध्ये एम. रंगचार्यार, शिवस्वामी अय्यर, सुंदरमय्यर आणि कृष्णस्वामी अय्यर अशा प्रसिद्ध व्यक्ती होत्या. तसेच त्यांच्यात निवृत्त माननीय श्रीनिवास शास्त्री होते जे त्यांच्या बालविवाहविरुद्धच्या टीकेत प्रबळ होते. हे सर्व मद्रासचे वकील होते. गोपालकृष्ण गोखल्यांनंतर सर्वंटस् ऑफ सोसायटीचे प्रमुख असलेले श्रीनिवास शास्त्री हे शिक्षणतज्ज्ञ, उदारमतवादी राजकारणी आणि इंग्रजीतील फर्डे वक्ते होते.

शास्त्र शिकलेले वैष्णव आणि स्मार्त यांनी कांचीपुरम आणि तिरुवायुर येथे सभा घेतल्या आणि वेदानुसार भूतकाळात मुली वयात आल्यावर विवाह केला जात असे असा दृष्टिकोन मांडला. बालविवाहाच्या प्रथेच्या उगमाचे कारण त्यांना सापडले. त्यांचा दृष्टिकोन असा होताः भारतावरील इस्लामच्या आक्रमणानंतर असंख्य मुलींना पळवून नेले जात असे आणि त्यांचा विनयभंग केला जात असे. ज्या मुलींचा अगोदरच विवाह झालेला असे त्या त्यातून सुटत असत, असा त्यांचा दावा असे. म्हणून बालविवाहाची नवीन प्रथा आचरणात आली. सुधारकांना त्यांच्या मतानुसार असलेल्या मूल वैदिक प्रथेकडे जावे असे वाटते आणि वयात येण्यापूर्वी विवाह होत असलेल्या रानटी प्रथेचा शेवट करावा.

त्यांच्या दृष्टिकोनाच्या पुष्टीसाठी त्यांनी शास्त्रातील पुरावे दिले. पुराव्याची एक बाब त्यांनी खुद्द वेदातून घेतली. म्हणजे विवाहात म्हटले जाणारे मंत्र. दुसरा सर्व शास्त्रात अग्रेसर असलेल्या मनुस्मृतीतून घेतला. विवाहमंत्र काय म्हणतात ?

" सोमः प्रथमो विविदे गंधर्वो विविद उत्तरः तृतीयो अग्निष्टेपतिः तुरीयस्तेमनुष्यजः
सोम ददद गंधर्वाय गंधर्वो दददग्नये रयिंचपुत्रांश्चादाद अग्निमह्ममथो इमां"

ऋग्वेदः १०-६५, ४०-४१

या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी मला एक दुसरी गोष्ट सांगायची आहे. आपल्या शरीराच्या प्रत्येक भागाशी संबंधित एक देवता असते. (अधिदेवता किंवा पालक देवता). सूर्य डोळ्यांशी, इंद्र हाताशी आणि इ. - अशा दिव्य शक्ती अंतस्थपणे आपल्याशी संबंधित असतात. याशिवाय आपल्या जीवनाच्या भिन्न अवस्थांमध्ये विविध देवता आपल्यावर वर्चस्व गाजवितात. एखादी मुलगी तिच्या जन्मापासून ती स्वतःचे कपडे परिधान करण्याइतक्या वयापर्यंत

तिच्यावर सोमाचा प्रभाव असतो (चंद्र देवता). (धोती किंवा वेष्टी जी पुरुष वापरतात तिला सोमन म्हटले जाते.) नंतर ती गंधर्वाच्या अमलाखाली असते. त्यानंतर तीन वर्षे ती अग्नीच्या प्रभावाखाली असते. जेव्हा ती चंद्राच्या अमलाखाली असते तेव्हा ती चंद्रप्रकाशाप्रमाणे शीतल असते. गंधर्व हे खेळकर आणि सुंदर असतात म्हणून मुलगी जेव्हा गंधर्वाच्या प्रभावाखाली असते तेव्हा ती विशेष आकर्षक असते. अग्नीच्या अमलाखाली असता तिच्याकडे काम प्रज्वलित करणारा अग्नी असतो. एखाद्या मुलीवर ठरावीक देवतांचा कसा अंमल असतो त्याचे हे ऐहिक स्पष्टीकरण होय. पण ते असू द्या.

सुधारकांनी त्यांच्या दृष्टिकोनाच्या पुष्टीसाठी कथन केलेल्या वैदिक मंत्रांचा अर्थ काय? वराकडून वधूला उद्देशून मंत्र म्हटले जातात : प्रथम तुझ्यावर सोमाचा अंमल होता; नंतर गंधर्व तुझा पालक बनला; तिसरे वेळेस अग्नी तुझा धनी झाला. मी एक मानव म्हणून चौथा, तुझ्यावर वर्चस्व गाजवायला आलो आहे. सोमाने तुला गंधर्वाकडे दिले आणि गंधर्वाने अग्नीकडे दिले. अग्नीने आता तुला माझ्याकडे दिले आहे.

अग्नीच्या प्रभावाखालील तीन वर्षांनंतर ती वयात आलेली असता विवाहप्रसंगी म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांचा आपण अर्थ लावीत नाहीत का? सुधारक म्हणतात की त्यांचे बालविवाहाविरुद्धचे विधान शास्त्राच्या विरुद्ध नाही. त्यांच्या म्हणण्यानुसार विवाहप्रथा मुस्लीम आक्रमणानंतर बदलली आणि त्यांना मूळची प्रथा हवी आहे. ते म्हणतात की कोणीही सनातनी वेदांपेक्षा अधिक चांगले सांगू शकणार नाही.

ते त्यांच्या विधानाच्या पुष्टीसाठी मनुस्मृतीतील एक कडवे देतात :

त्रीणि वर्षान्युदीक्षेत कुमारी ऋतुमति सति।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विंदेत सदृशं पतिम्।।

या श्लोकाचा अर्थ असाः "जी मुलगी वयात आलेली आहे तिने तिचा हात शोधत वर येईपर्यंत तीन वर्षे वाट पाहिली पाहिजे. जर असा कोणी वर आला नाही तर ती स्वतःच अशा वराच्या शोधासाठी जाऊ शकेल." येथेही वयात आल्यानंतरच्या विवाहाचा निर्देश आहे. तेवढेच नाही. मनुची आचारसंहिता ही आधुनिक असल्याचे म्हटले जाते. कारण तिच्यात वधूस तिच्या वडीलधाऱ्या नातलगांच्याशिवाय वरसंशोधनाची अनुमती आहे. सुधारक म्हणतात की मनुनंतर सनातनी वैदिक पंडितांनी प्रत्येक गोष्ट बदलली आणि विवाहप्रथा क्रूर बनवली.

"या वैदिक मंत्रांच्या प्रकाशात आणि धर्मशास्त्र सांगते त्याप्रमाणे सुधारकांचे योग्य नाही का? तुमचे काय उत्तर आहे स्वामीजी?" मी माझे उत्तर देईन.

-----

## प्रकरण - ५

# विवाहाचे आठ प्रकार

मनुस्मृतीसह धर्मशास्त्रे विवाहाच्या आठ प्रकारांचा उल्लेख करतात.

ब्राह्मो-दैवस्तथैवार्षः प्राजापत्य-स्तथा'सुरः गांधर्वो राक्षसश्चैव पैशचाष्टमः स्मृतः (मनुस्मृती-३.२१)

आठ प्रकार असे : ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, असुर, गंधर्व, राक्षस आणि पैशाच.

ब्रह्मचाऱ्याने गुरुकुलवास संपविल्यानंतर त्याचे पालक चांगल्या कुटुंबातील मुलीच्या माता-पित्यांकडे जातात आणि त्यांच्या मुलीचा हात आपल्या मुलाच्या हातात देण्याचे सांगतात - त्यांच्या मुलीचे ह्यांच्या मुलाला दान (कन्यादान) करावे असे सांगतात. अशा प्रकारे ठरविलेला विवाह हा ब्राह्मविवाह. यात मुलीचे कुटुंब मुलाच्या कुटुंबाला काहीही हुंडा किंवा दागिने देत नाही. त्यात काहीही व्यावहारिक देवाण-घेवाण नसते. ब्राह्मविवाहाचा उद्देश दोन्ही कुटुंबाच्या धार्मिक प्रगतीचा, उन्नतीचा असतो. आठ प्रकारांपैकी याला धर्मशास्त्रे सर्वोच्च मानतात.

होमामध्ये ऋत्विकाला (पुरोहित) कन्या देण्याला दैव म्हटले जाते. 'यज्ञस्य ऋत्विजे दैवः' असे याज्ञवल्क्य स्मृती-१.५९ म्हणते. या प्रकारात पालक एखादा तरुण त्यांच्याकडे येण्याची वाट पाहून झाल्यावर, वर शोधण्यासाठी जेथे यज्ञ चाललेला आहे तिकडे जातात. हा प्रकार ब्राह्म विवाहापेक्षा गौण मानला जातो. शास्त्रात स्त्रीत्वाला मोठेपणा दिलेला आहे. ते असे की मुलाच्या पालकांना मुलगी शोधत जावे लागते.

तिसरा प्रकार, आर्ष सुचवितो की तो ऋषी, साधू यांच्याबाबत आहे. सुकन्येचा महर्षी च्यवनांशी झालेला विवाह या प्रकारचा होता. धर्मशास्त्रावरून आपल्याला समजते की आर्ष विवाहात वराकडून वधूला दोन गायी मोबदला म्हणून दिल्या जात असत. 'आदर्यार्षस्तु गोद्वयं' (याज्ञवल्क्य स्मृती- १.५९). जर या शब्दाचा अर्थ, मुलगी ऋषीला विवाहात देणे असा घेतला तर, त्याचा अर्थ असा की पालक मुलीचा विवाह ब्राह्म प्रकाराने योग्यवेळी करू शकत नसल्याने त्या मुलीचा विवाह वृद्ध ऋषीशी होत असे. वस्तुतः वधूबद्दल दोन गायी घेणे असे दर्शविते की वराकडे विशेष गुण नाही. उदात्त स्वरूपाच्या विवाहात पैसा किंवा तशा व्यापारी देवाणघेवाणीचा वास सुद्धा नसे.

प्राजापत्यामध्ये ब्राह्मप्रमाणेच कन्यादान असून त्यात व्यापार नसतो. प्राजापत्य नावावरूनच अंदाज करता येतो की वधूचे वयात येणे जवळ आलेले असते आणि विवाहानंतर लवकरच मूलप्राप्ती होईल. यासाठी वधूपिता ब्राह्म प्रकाराशी भिन्न असा वराचा शोध घेतो.

प्राजापत्यापेक्षा ब्राह्म अधिक चांगला कारण त्यात वराचे लोक वधूचा, जी त्यांच्या घरची लक्ष्मी असते तिचा शोध घेतात.

असुर पद्धतीत वर हा वधूला साजेसा नसतो. पण तिचे वडील किंवा नातलग यांना जो वर त्यांना तिला देण्यास सांगतो, त्याच्याकडून चांगलेच पैसे मिळणार असतात. 'आसुरो द्रविणादानत' - याज्ञवल्क्य स्मृती- १.६१

आर्षमध्ये मोबदल्यात गायी दिल्या जातात. हे सक्तीचे नसते. वरही असुर पद्धतीतील वराइतका श्रीमंत नसतो. असुर पद्धतीनुसार अनेक श्रीमंत माणसांनी दुसरी पत्नी केलेली असावी.

पुढचा गांधर्व विवाह. त्याचा उल्लेखच आपल्याला शकुंतला आणि दुष्यंत यांच्या विवाहाची आठवण करून देतो. विश्वविख्यात महाकवी कालिदासाचे 'अभिज्ञान शाकुंतल' यावर आधारलेले आहे. हा प्रेमविवाहाचा प्रकार आहे की ज्याला हल्ली जोरदार पाठिंबा मिळतो.

राक्षस विवाहात वर वधूच्या कुटुंबीयांशी लढतो, त्यांच्यावर मात करतो आणि तिचे हरण करतो. याच पद्धतीने कृष्ण परमात्म्याने रुक्मिणीशी विवाह केला.

आठवा आणि शेवटचा पैशाच. असुर पद्धतीत जरी मुलीच्या मान्यतेचा विचार नसला तरी तिच्या लोकांना कमीतकमी पैसे तरी दिले जात. राक्षस पद्धतीत जरी तिच्या कुटुंबाची हिंसा होती तरी विवाह तिच्या मनाविरुद्ध नसे. रुक्मिणीचे कृष्णावर प्रेम होते, नाही का? पैशाचमध्ये मुलीच्या इच्छेचा विचार नाही. पैसे किंवा अन्य गोष्टी वधूच्या कुटुंबाला दिल्या जात नाहीत. तिला तिच्या मनाविरुद्ध वेढलेले असते आणि तिच्या पालकांशी शत्रुत्व केले जाते.

एका टोकाला ब्राह्म आणि दुसऱ्या टोकाला पैशाच आहे. प्रत्येकासाठी एकच प्रथा आणि व्यवस्था असणार नाही. आपल्या शास्त्रांनी समाजातील विविध भागांतील लोकांच्या मनोवृत्ती आणि दृष्टिकोनातील भेद विचारात घेतले आणि ते डोळ्यांपुढे ठेवूनच त्यांना विविध धर्मकर्मे, व्यवसाय इ. सोपविलेले आहेत. ही वस्तुस्थिती जाणण्यात एकाच पद्धतीचा आग्रह धरणाऱ्यांच्या अपयशातून सध्याची दुःखे उद्‌भवली आहेत.

जंगलात राहणारे लोक भयंकर दिसतात आणि त्यांची जीवनपद्धती कठोर असते. परंतु ते नागरी लोकांपेक्षा अधिक सुसंस्कृत असू शकतील आणि ते अनेक प्रकारे समाजाच्या उपयोगी पडत असतात. त्यांच्यात वारंवार कौटुंबिक भांडणे होतात. त्यांच्याबाबतीत राक्षस आणि पैशाच विवाहाला संमती असू शकते. विवाहानंतर ते भांडणे विसरणे संभवनीय असते आणि ते एकमेकांबरोबर शांततेत राहतात. शारीरिकदृष्ट्या बलवान असलेले आणि भौतिक सुखाची सवय असलेल्या क्षत्रियांना गांधर्व विवाहाची अनुमती दिलेली आहे आणि त्यांच्या

मुलींना स्वयंवरात पती निवडण्याचा हक्क आहे.


या कारणांनी वेदांवर आधारलेले धर्मशास्त्र, जे हिंदू कायदा बनलेले आहे, ते आठ विवाह पद्धतींना परवानगी देते. या सर्व आठ पद्धतीत वधुवरांना समंत्र विवाहबद्ध होण्याचा अधिकार आहे. पण ब्राह्म प्रकार हा सर्वात श्रेष्ठ आहे. यात वधू वयात आलेली नसावी. ''प्रदानं प्राकृतोः'' हे वचन धर्मशास्त्रातच आहे. एखाद्या मुलाला उपनयन तसे मुलीला विवाह अर्थपूर्ण आहे, तो ती सात वर्षाची असता केला पाहिजे. (किंवा गर्भधारणेपासून आठ वर्षे).

दुर्दैवाने, काही मुलींकडे योग्यवेळेत ब्राह्म विवाह करण्यासाठी वर येत नाही. दरम्यान ते मोठे होतात आणि त्यांचा विवाह आर्ष, दैव किंवा प्राजापत्य पद्धतीने केला जातो. फक्त हेच प्रकार ब्राह्मणांसाठी दिलेले आहेत. इतरांसाठी बाकीचे प्रकारही दिलेले आहेत. ते वयात आलेल्या मुलीचा विवाह गांधर्व किंवा स्वयंवरात करू शकतात.

सर्व आठ विवाहप्रकारांसाठी मंत्र असतात. म्हणजे ते वयात आलेल्या मुलीच्या विवाह समारंभात म्हटले जातात. पूर्वी सांगितलेले मंत्र सर्व आठ प्रकारांच्या विवाहात म्हटले जातात. ते मंत्र जी सोम, गंधर्व आणि अग्नी यांचे प्रभुत्वाखाली क्रमाने असलेल्या आणि आता वयात आल्यावर वराकडे येते, तिला उद्देशून वर म्हणतो. मंत्रपठण केवळ ब्राह्मच नव्हे तर सर्व प्रकारांमध्ये केले जाते. तेच वराकडून बालवधूसाठीही म्हटले जातात. जरी त्याचा विवाह गांभीर्याने बालवधूशी झालेला असला तरी तो ती वयात आल्यावर, मोठी स्त्री झाल्यावर तिच्याबरोबर राहू लागतो. सोम, गंधर्व आणि अग्नी यांचे प्रभुत्वाखाली राहिल्यानंतरच तो आपल्याबरोबर राहण्यास तिला आपल्या घरी आणतो. म्हणून तो अगोदरच मंत्र म्हणतो.

हल्ली आपण अनेक संस्कार शास्त्रानुसार जेव्हा करायचे त्यापेक्षा फार उशिरा आणि एकत्रच करतो. उदाहरणार्थ, आपण मुलाचे जातकर्म तसेच नामकरण आणि चौल तो २० किंवा २२ वर्षाचा असतो तेव्हा उपनयनाच्या वेळेस आणि विवाहाच्या फार पूर्वी न करता करतो. तशाप्रकारे ब्राह्म विवाहातील विधी पुढे ढकललेले असूनही मंत्र अगोदरच म्हटले जातात.

यासंदर्भात मी एक उदाहरण देतो. जेव्हा ब्रह्मचारी समिधादान करतो तेव्हा ते अग्नीकडे त्याला चांगली मुले देण्याची प्रार्थना करतो. या प्रार्थनेच्या आधारे सुधारक म्हणतात की जो अजून ब्रह्मचारी आहे आणि पुढे संसारी होणार आहे, त्याला मुले व्हावीत हे त्यांचे म्हणणे मूर्खपणाचे आहे. मुद्दा असा आहे की तो अगोदरच चांगल्या संततीसाठी प्रार्थना करतो. या प्रकाशात सुधारकांनी उद्धृत केलेले मंत्र पाहिले पाहिजेत.

सुधारकांनी उद्धृत केलेले मंत्र जी मुलगी वयात आलेली आहे तिच्यासाठीसुद्धा योग्य आहेत.

निवृत्त माननीय श्रीनिवास शास्त्री हे प्रतिनिधित्व करीत असलेल्या मतप्रणालीला

आमचे हे उत्तर आहे. चर्चेत असलेले मंत्र वयात आलेल्या मुलीच्या विवाहप्रसंगी म्हटले जातात. याचा अर्थ असा नाही की सर्व विवाह मुलगी वयात आल्यावरच केले जातात. ब्राह्म प्रकारानुसार मुलगी वयात आलेली नसावी. विवाहविधीच्या शेवटी म्हटला जाणारा वेदातील एक मंत्र हा त्याचा निर्विवाद पुरावा आहे.

(उदिश्रवातो विश्वावसो नमसेडामहे त्वा, अन्यामिच्छः प्रफरवयम् संजायाम् पत्यासृज, उदिश्रवा तो पतिवति ह्येशा विस्वा वसुन्नमसा गिरभिर्डे, अन्यामिच्छ पित्रशदम् व्यक्ताम्, सा ते भागो जनुशा तस्य विधि.)

मी तुम्हाला सांगितले की मुलगी स्वतःचे कपडे स्वतःला घालता यायला लागल्यापासून तिच्या वयात येण्यापर्यंत ती गंधर्वाच्या वर्चस्वाखाली असते. मी संदर्भ दिलेला मंत्र वराकडून या देवतेला उद्देशून असतो. ''हे विश्वावसु'', तो मंत्र असा, ''मी तुला अभिवादन करतो. या मुलीला सोड आणि जा. जी अविवाहित आणि आपल्या वडिलांकडे राहते अशा दुसऱ्या मुलीकडे जा.'' विवाहात वर गंधर्वाची पूजा करतो आणि त्याला त्या मुलीला त्याच्या अमलातून मुक्त करण्याची प्रार्थना करतो. हा पुरावा आहे की वधू अजून अग्नीच्या प्रभावाखाली नाही आणि वयात आलेली नाही.

आता सुधारकांनी उद्धृत केलेल्या मनुस्मृतीतील श्लोकांच्याविषयी पाहू. त्यानुसार एखादी मुलगी वयात आल्यावर तीन वर्षे वाट पाहू शकते आणि स्वतःच वराचा शोध घेते.

याचे उत्तर असे आहे. धर्मशास्त्राचा एक सामान्य नियम असा आहे की मुलीचा विवाह ती वयात येण्यापूर्वी व्हायला हवाः ''प्रदानं प्राकृतोः''. जर हा नियम पाळला नाही तर काय घडते? जर कोणी वर तिचा शोध घेत आला नाही तर तिच्या वडिलांनी किंवा भावाने वराचा शोध घेऊन तिचा विवाह केला पाहिजे. पण जर ते बेजबाबदार असले किंवा वरसंशोधनात अयशस्वी झाले तर? किंवा जर मुलीला पालक नसतील किंवा तिची काळजी घेणारे कोणी नसतील तर? तर सुधारकांनी उद्धृत केलेल्या मनुस्मृतीतील ओळी अशा मुलीला लागू पडतात. जर तिचे नातलग, शेजारी किंवा हितेच्छू, ती वयात आल्यानंतरही तिच्यासाठी वर शोधत नसतील तर ती स्वतः पती शोधू शकते.

जरी सुधारक वेदातील आणि धर्मशास्त्रातील दाखले देत असले तरी ते उतारे ज्या संदर्भात येतात त्यांचा विचार करण्यात ते अयशस्वी झाले आहेत. ते (सुधारक) हे उतारे वेगवेगळेपणाने पाहतात. म्हणून ते वाद करतात की आपल्या परंपरेत खोलात जाणाऱ्या लोकांकडून पाळल्या जाणाऱ्या प्रथा या शास्त्राच्या विरुद्ध आहेत.

छांदोग्य उपनिषदात ज्याची पत्नी वयात आली नव्हती अशा चाक्रायण उषस्ति ऋषीचा उल्लेख आहे.

मटचीहतेषु कुरुषु आटिक्या सह जायया उषस्तिर् ह चाक्रायणः इभ्यग्रामे प्रद्राणक उवास। (छांदोग्य उप. १.१०). सुधारक आपल्या प्राचीन ग्रंथातील असे संदर्भ शांत डोक्याने पाहत नाहीत, उलट ते त्यांच्या भावनेत वाहून जातात.

पूर्वी सुधारकांना कसे तोंड द्यायचे हे सामान्य लोकांना समजत नसे. तरी ते थोरांच्या, मोठ्या लोकांच्या प्रथांचे अनुकरण करणे असे समजून त्यांनी सुधारकांचे चांगले दृष्टिकोन स्वीकारले नाहीत. म्हणून नि. माननीय श्रीनिवास शास्त्री यांनी दोन वेळा विवाह कायदा दुरुस्त (विवाह वयाच्या संदर्भात) करण्यासाठी कायदे मंडळापुढे आणले तरी पुरेसा पाठिंबा मिळाला नाही. नंतर हरविलास सारडा यांनी हा ठराव सादर केला, त्याला सारडा कायदा म्हटले जाऊ लागले. बऱ्याच लोकांना (दक्षिणेतील) वाटते की सारडा ही स्त्री आहे आणि त्यांच्यानंतर त्याला सारडा ॲक्ट म्हटले गेले. मध्यवर्ती कायदे मंडळ विभागले गेले - ५० टक्के बाजूने आणि ५० टक्के विरुद्ध होते. नंतर ब्रिटिशांनी नेमलेल्या सदस्याला ठरावाच्या बाजूने मत द्यायला सांगितले; आणि अशा प्रकारे कायद्याने मुलीचे विवाहाचे वय वाढविले गेले. ठराव लोकमताच्या जोरावर मंजूर झाला नाही तर शासनाच्या हस्तक्षेपामुळे मंजूर झाला. आपल्या ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनात असे होते की, "काँग्रेस स्वराज्याची मागणी करीत होते पण आपण ते मंजूर करणे नाकारले. (हिंदू) धर्मावर थोडा आघात करण्यात मदत करून थोडे समाधान देऊ या."

आता परिस्थिती बदलली आहे. जुन्या परंपरा आणि रूढींबद्दल आदर राहिला नाही. जेव्हा ब्रिटिश इंडियात सारडा ॲक्ट अमलात आला तेव्हा शासनाने दिलेली महामहोपाध्याय ही पदवी काही संस्कृत विद्वानांनी परत केली. त्यात बंगालचे पञ्चानन तारकारत्न भट्टाचार्य आणि लक्ष्मण शास्त्री द्रवीड हे होते. शास्त्री काशीला स्थायिक झाले आणि ते तमीळांच्या प्रांतातले हे माहीत व्हावे म्हणून त्यांच्या नावाला द्रवीड जोडले गेले. आपल्या शासनाने आपल्या शास्त्रीय विधींमध्ये बदल केले म्हणून आज किती लोकांना विरोध करण्यास उभे राहण्याची प्रेरणा मिळाली.

आमच्या मुलांना शास्त्राचे सार आणि अर्थ व्यापकपणे शिकविला गेला पाहिजे. एकदा एक अर्थ आणि नंतर दुसरा असे सांगितल्यास ते गोंधळून जाण्याचा धोका आहे. वेदांच्या कच्च्या संशोधनाने धार्मिक ग्रंथ प्रेमविवाहाच्या बाजूने होते असे मत उदयाला आले आहे. धार्मिक कायद्यांचे अवलोकन समग्र दृष्टीने व्हायला पाहिजे. जेव्हा एखाद्या विषयाचे परीक्षण होते तेव्हा अर्थाचे आणि हेतूचे आकलन व्हायला हवे. शिवाय ते इतरत्र आढळणाऱ्या सुसंगत उताऱ्यांच्या प्रकाशात तपासून पाहिले पाहिजेत. सर्व मुद्यांच्या सखोल तपासणीनंतर निर्णयाप्रत यायला पाहिजे.

ब्राह्म विवाह सर्वांसाठी आहे. इतर प्रकार तसेच वयात आल्यानंतरचा विवाह

अब्राह्मणांसाठीदेखील अनुमती असलेले आहेत. जर वैषयिक सुखाला महत्त्व द्यायचे तर इतर पद्धतींना अनुमती आहे. पण जर आत्म्याची प्रगती हा विवाह संस्काराचा हेतू मानला तर ब्राह्म विवाह हा सर्वश्रेष्ठ आहे.

-----

## प्रकरण - ६

# बालविवाह का?

विवाह म्हटल्या जाणाऱ्या संस्काराला अनेक हेतू आहेत. त्याचे मुख्य ध्येय स्त्रियांना त्यांच्या पतींशी जोडण्याने आतून पवित्र करण्याचा असतो. अशा जोडण्याने आणि समर्पणानेच केवळ त्या त्यांचा परमेश्वराकडचा मार्ग तयार करतील. शिष्याच्या गुरूबाबतच्या समर्पणाने त्याचे मन पवित्र होते. याच हेतूसाठी पत्नीने पतीला समर्पण करावे.

आपल्या मनाच्या अविरत कार्यामुळे आपण कर्म आणि जन्ममृत्यूचा फेरा यांकडे जातो. मनाच्या लाडामुळे आपण पाप करतो आणि पुन्हापुन्हा जन्म घेतो. जेव्हा मन स्थिर होते तेव्हा कर्मही नसते आणि जन्मही नसतो - ही मुक्तीची स्थिती असते. मनाला स्थिर करणे हे अतिशय कठीण असते. आठ महान सिद्धी प्राप्त करणे शक्य असते, पण मन स्थिर करणे, एकटे राहणे अशक्य असते असे तमीळ संत कवी तायुमानवर म्हणतो.

आपण स्वतःच आपले मन नियंत्रित करणे किंवा स्थिर करू शकत नसलो तर आपले मन आपल्या आवडी-निवडीनुसार भरकटू न देता आपण दुसऱ्या व्यक्तीला समर्पण करू शकतो. तेव्हा आपण केलेल्या कर्माच्या परिणामांना जबाबदार नसतो म्हणजे आपण पाप किंवा पुनर्जन्म यांना जबाबदार नसतो. जर आपण आपले मन अन्य व्यक्तीच्या पायाशी वाहिले तर आपण कर्ता म्हणून असलेल्या जबाबदारीतून मुक्त होऊ. आपल्याला कर्मामुळे भोगाव्या लागणारे पाप, पुण्य किंवा पुनर्जन्म असे परिणाम भोगावे लागणार नाहीत. आपण स्वतः काही करीत नाही असे मानून ईश्वराला शरण जाण्याच्या दृष्टिकोनातून समर्पण करण्याचे शिकविले गेले आहे. परंतु लाखात एक असे ठरवितो. तथापि, पतीला परमेश्वर समजून पत्नी मुक्त होऊ शकते हे दर्शविणारी स्त्रियांची, धार्मिक इतिहासात अनेक उदाहरणे आहेत. पती हा देहाचा आकार धारण केलेल्या रूपातील ईश्वर आहेः जरी तो दगड असला तरी पतीच आहे. त्याच्याशी पूर्ण निष्ठा आणि सवाष्ण म्हणून मरण्याची इच्छा यांनी आपल्या स्त्रियांच्या धर्माला अतिप्राचीन काळापासून प्रेरणा दिलेली आहे.

हे खरे आहे की सर्व देशांमध्ये महान स्त्रिया निर्माण झाल्या आहेत. सर्व धर्मांमध्ये आदर्श पुरुष आणि स्त्रिया निर्माण झाल्या आहेत. परंतु वर उल्लेखले गेलेले गुण आपल्या धर्मात आणि आपल्या संस्कृतीत जितके स्वतःचे असे जीवनवैशिष्ट्य होऊन राहिले आहेत तसे इतर देशांतल्यांबाबत म्हणता येणार नाही. संस्कृती किंवा आधुनिकता यांच्या नावाखाली हे सर्व बदलण्याचा विचार म्हणजे आपल्या महान सांस्कृतिक आणि धार्मिक वारशाची मुळे तोडण्यासारखे होईल.

एखाद्या मुलीचे मन प्रेम आणि वासना यांनी व्याप्त होण्यापूर्वी आणि तिला तिच्या

शरीराचे आकर्षण निर्माण होण्यापूर्वी तिच्या पतीशी ती जोडली जावी. (तिचा विवाह झाला असला पाहिजे.) आता ती निष्पाप मूल असल्याने तो तिचा एकमेव गुरू आहे आणि तोच तिचा ईश्वर आहे या विचाराने तिच्या पतीशी नम्रतेने शरण जाण्याचा त्यात दृष्टिकोन असेल.

आजही आंध्र प्रदेश आणि महाराष्ट्र येथील स्त्रिया अनेक व्रते करतात. या भागातील अविवाहित मुली शिवाला त्यांचा पती समजून त्याची पूजा करतात. जेव्हा त्यांचा विवाह होतो तेव्हा त्या पतीला शिव समजून ती त्याची पूजा करते. प्रथम एखादी मुलगी पती मानून शिवाची पूजा करते आणि नंतर जो कोणी तिचा पती म्हणून तिच्या जीवनात येतो त्याकडे ती शिवाप्रमाणे आदराने पाहते.

बालपणात मुलगी प्रश्न विचारत नाही. आता ती तिच्या साध्यासुध्या श्रद्धेने तिच्या पतीकडे परमेश्वरासारखी पाहील. हा तिच्या निष्पापपणातून आलेला विश्वास, ती मोठी झाल्यावर आणि तिला अनेक गोष्टी समजायला लागल्यानंतरच्या जीवनात तिच्या मनात घट्ट मुळांचे रूप घेईल. हा आपल्या युगायुगाच्या स्त्रीधर्माचा प्रभाव आहे. आता त्या स्त्रीचे पतीशी समर्पण स्थायी स्वरूपाचे असेल आणि ती पतीकडे ईश्वराप्रमाणे पाहील. जेव्हा पत्नी पतीला समर्पित होते आणि तिच्याशी संबंधित मान किंवा अपमान अशा भावना जोपासत नाही तेव्हा तिचा अहंकार नष्ट होतो. आणि तो म्हणजे ऐहिक जीवनाला विराम. दुसऱ्या शब्दात मुक्ती. समर्पण, ज्ञान, तपश्चर्या, पूजन, होम, याग - या सर्वांचा हेतू अहंकाराचे निर्मूलन हा असतो. हे सर्व स्त्रीला सहजपणे आणि तिने पतीला समर्पण केल्याने सहज प्राप्त होते.

ज्या स्त्रियांनी पूर्णपणे पतीला वाहून घेतले अशा स्त्रियांची अशी उदाहरणे आपल्या देशात आहेत. आपल्या देशाच्या संस्कृतीचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांना देवांच्याही वरचे स्थान दिलेले आहे. त्यात नलायनि, अनसूया, स्वतःच महालक्ष्मी असलेली अशी सीतादेवी, दक्षाची मुलगी पराशक्तीच असलेली सती (सर्वश्रेष्ठ देवता), सावित्री, कण्णगी, वासुकी (तिरुवल्लुवरची पत्नी) आहेत. त्यांचा विचारच अभिमानाने परमानंद देतो. त्यांच्या प्रत्येक नावाबरोबर आपण त्यांच्यापुढे मान झुकवितो. हे असे का हे आपण सांगू शकत नाही.

टीकाकार आपल्या परंपरेवर टीका करताना आपण ऐकतो की ''पती हा पत्नीला देव? नुसती वटवट आहे. ही सर्व अंधश्रद्धा आहे. ही स्त्रियांची मुस्कटदाबी आहे. अपमानास्पद आहे.'' टीका काहीही असो, ही आपली परंपरा आहे. भारत नावाच्या या आपल्या देशात आपला हिमालय आणि गंगा आहे. ते येथे का असावेत, याला काही उत्तर आहे का? तसेच पावित्र्याच्या या सम्राज्ञींच्याविषयी आहे. आपण कैलासाचा जसा विचार करतो तसे पाश्चात्त्य लोक आल्पस्चा विचार करतात का? अमेरिकी लोक जसा मिसिसिपीचा विचार करतात तसा आपण गंगेचा करतो का? आपण आपल्या हृदयात आपल्या पर्वत आणि नद्यांच्या पावित्र्याचा अनुभव घेत नाही का? इतर देशांमध्ये विवाह ही कुटुंबाची सोय आहे. आत्म्याच्या शुद्धतेचे

साधन म्हणून स्त्रीचे समर्पण यादृष्टीने आपल्या शास्त्रांनी वैवाहिक जीवनाला प्रेरणा दिली आहे. जर बालविवाहाला विरोध केला आणि स्त्रियांच्या सामाजिक प्रगतीच्या नावाखाली त्यात बदल केला तर तो बदल केवळ त्यांच्या आध्यात्मिक उन्नतीस हानिकारक होईल. आपल्या परंपरेचे वारस म्हणून आध्यात्मिक फळाच्या मोबदल्यात एक लहानशी सोय पाहिल्यासारखे आहे.

बालविवाह हा स्त्रीशरीराला हानिकारक आहे असे म्हणणे निरर्थक आहे. जरी मुलीचा विवाह बालिका म्हणून झाला असला तरी ती वैवाहिक जीवनासाठी प्रौढ झाल्यावरच तयार होईल. शिवाय पौर्णिमा आणि प्रतिपदेसारख्या दिवशी ते जोडपे ब्रह्मचर्य पालन करील. आता अशी बंधने पाळली जात नाहीत. सामान्य लोकांमध्ये शारीरिक दुर्बलता आलेली आहे आणि त्यांच्या खर्चाने मज्जातंतूच्या डॉक्टरांची भरभराट झालेली आहे.

बालविवाहामुळे बालविधवा होतात हा हिंदू धर्मावर मोठा ठपका येतो. बालविधवांची संख्या वाढवून दिलेली आहे, आणि त्यांचे पती वयाच्या १५ ते २५ वयात मरण पावले असले पाहिजेत. मी जे ऐकले त्यावरून त्या वयातील मृत्यू फारच थोडे होते. म्हणून बालविधवा फार नसाव्यात. त्यांचे एकूण अस्तित्व मी नाकारत नाही. एक मुलगी विधवा पाहणेही दुःखदायक आहे. पण बालविवाहाचे महान लाभ विचारात घेऊन बालविधवांचा विचार व्हावा.

आजसुद्धा जर तिचे दुर्दैव असेल तर, तिचा २० किंवा तशा वयात विवाह होऊनही जेव्हा ती तरुण असते तेव्हा विधवा होणार नाही याची खात्री काय? दोन-तीन महिन्यांपूर्वी विवाह झालेली जोडपी रेल्वे किंवा विमान अपघातात मरण पावल्याच्या बातम्या आपण वाचतो. अशा शोकांतिका दुःख निर्माण करतात. बालविवाहाला बंदी घालण्याचे कारण बालविधवा असेल तर अधिक वयात विवाह करणाऱ्या मुली विधवा होणार नाहीत याची हमी काय?

आपल्या देशातील रूढीनुसार ऐहिक जीवनातून मुक्त होण्यासाठी पतीला परमेश्वर मानतात तर त्यासाठी ते शास्त्राचे पालन करून होईल. "आपल्या स्त्रिया उच्च शिक्षण प्राप्त करतात, नोकऱ्या करतात, जसे आवडेल तसा विवाह करतात. या सर्वांचा अर्थ प्रगती." आपण नेहमी असे बोललेले ऐकतो. परंतु त्यांना अशा स्थितीत वावरणे भाग पडले जेथे कोणीही त्यांच्याकडे वाईट नजरेने पाहू शकतो, त्या मानसिक आणि भावनिकदृष्ट्या अस्वस्थ होतात आणि बिकट परिस्थितीत सापडतात, हे मला नेहमी काळजी करायला लावते, अगदी भयही घालते.

सुधारक बालविवाहाचा निषेध करतात आणि रागाने आरडाओरडा करतात : "स्त्रियांवर दडपशाही केली जाते आणि त्या बालविवाहाला बळी पडतात. त्यांना त्यांचे हक्क नाकारले जातात." पण मला अधिक राग येतो तो याचा की सुधारणेच्या नावाखाली जी परिस्थिती निर्माण केली गेली तिने स्त्रियांचे मोठे कौटुंबिक सुख म्हणजे त्यांना लाभलेले

पावित्र्य संकटात आले. मला अश्रू ढाळावेसे वाटते. मलाही अर्जुनाप्रमाणे दुःखाने म्हणावेसे वाटते की "जेव्हा स्त्रिया बिघडतात तेव्हा कुटुंब, वंश यांचा ऱ्हास होतो. नाही, संपूर्ण जगाचा नाश होईल आणि सर्वजण नरकात जातील."

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः।।
संङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः।।
भगवद्गीताः १.४१, ४२

स्त्रिया असे असुरक्षिततेत उघड्या पडण्यास मान्यता देतात, त्यांचे पालक संमती देतात याचे मला अपरिमित दुःख होते.

प्रगती आणि सुधारणा बाजूला ठेवू. आपल्या मुलींचे चारित्र्य धोक्यात पडेल असे, आपण असुरक्षितपणे उघड व्हावे याची मला सतत काळजी वाटते. स्त्रिया शाळा, महाविद्यालयात जातात किंवा कचेऱ्यात नोकरी करू लागल्या तरी काहीही क्लेशकारक स्थिती निर्माण होणार नाही अशी हमी देऊन लोक माझे सांत्वन करतात. मीही आपल्या स्त्रियांवरील विश्वास गमावलेला नाही. पण त्या पाहिजे तेथे जातात आणि त्यांना भरकटतील असे अनेक प्रसंग येतील असे मला दिसते. चित्रपट, ललित साहित्य, वृत्तपत्रे - या विविध मनाला करमणूक देणाऱ्या गोष्टी त्यांना दुःखी करणाऱ्या असतात. या सर्वांची मला भीती वाटते.

मधून-मधून मी स्त्रियांचा समावेश असलेल्या क्लेशकारक घटनांच्या बातम्या ऐकतो. आपण चुकीच्या गोष्टी बरोबर कशा करू शकतो, सर्वांची हानी झाल्यावर आपण काय करू शकतो? स्त्रीत्वावर कलंक लावणारी एक घटना घडू देऊ शकतो का? आपल्या समाजात स्त्रियांच्या बाबतीत जे घडते त्याने माझे रक्त उसळते. पालकांना वाटणाऱ्या त्यांच्या मुलींबद्दलच्या काळजीने आणि भयाने मला वेदना होतात. मला असे वाटत नाही की सर्व स्त्रिया भरकटतील आणि भ्रष्ट होतील. सुधारणावादी म्हणतात की एकही बालविधवा असणे हा आपल्या समाजावर कलंक आहे. मला वाटते की एक स्त्री भरकटली किंवा भ्रष्ट झाली तर तो आपल्या समाजाला कलंक आहे आणि तो अधिक वाईट आहे.

वेदां ओदिय वेदियर्क्कोरु मझै। नीति मन्नर नेरियिनुक्कोर मझै।।
मादर करपुडै मण्गयर्क्कोर मझै। मादं मून्रू मझैयेनप्पेयुमे ।।

राजा किंवा शासन न्याय्य कारभार करतात की नाही याची खात्री करणे (नीति मन्नन नेरि) हे माझ्या अधिकारक्षेत्रात येत नाही. पण ब्राह्मण वेदपठण करतात का हे पाहणे ही माझी जबाबदारी आहे. (वेदां ओदिय वेदियर्क्कोरू) स्त्रियांना सद्गुणाच्या आणि पावित्र्याच्या मार्गावरून भरकटण्याची स्थिती दिली जाऊ नये आणि एखाद्या मुलीला कामाची ओढ

लागण्यापूर्वी तिने पतीला ईश्वर मानण्यास शिकावे. होय, स्त्रिया पातिव्रत्यापासून थोड्याही दूर जात नाहीत ना हे पाहणे माझी जबाबदारी आहे. यासाठी शक्यतो सर्व करावे असे मला वाटते आणि मी त्यासाठी विविध योजना आखत असतो. ध्येय लांबचे आहे आणि मी त्याकडे पोहोचण्याचा जेवढ्या वेगाने प्रयत्न करतो त्यापेक्षा अधिक वेगाने ते ध्येय मागे जात आहे. पण मी ही शर्यत सोडणार नाही. आणि सुधारणेच्या नावाखाली जे काही घडतेय त्याला मान डोलावणार नाही. जग चाललेय आणि निराशेने ''जे गेले ते गेले. कलीची लाट थोपवणे आणि स्थिती बदलणे अशक्य आहे.'' असा आक्रोश करण्यासाठी मला या पीठावर स्थापन केलेले नाही.

खूप पूर्वीच्या भूतकाळापासून या भूमीत वैदिक परंपरा तसेच स्त्रीधर्म विकास पावला आहे. दोन हजार वर्षे हा मठ यांची जोपासना करीत आलेला आहे. मला 'जगद्‌गुरू' ही उपाधी आहे आणि मी शंकर भगवत्पाद हे नाव धारण करतो. म्हणून आपला हा वारसा नष्ट होत असताना मी माझे तोंड बंद ठेवू शकत नाही. त्यापेक्षा मोठा गुन्हा असणार नाही. भगवान गीतेत सांगतात त्याप्रमाणे यश त्याच्या हातात आहे असे मानून मी माझे काम केले पाहिजे. मी माझी पावले मागे घेणार नाही आणि ध्येय गाठण्यासाठी शक्ती खर्च करीत राहीन. त्याचा निर्णय माझ्या तळमळीवर, माझ्या अंतःकरणातील शुद्धतेवर आणि माझ्या तपश्चर्येच्या तीव्रतेवर अवलंबून राहील. जर आतापावेतो स्पृहणीय निकाल नसतील तर त्याचा अर्थ असा की मी माझ्या हेतूच्या प्रामाणिकपणात, मानसिक शुद्धतेत आणि उग्र तपश्चर्येत कमी पडलो. जगाकडून वाहवा झाली तरी मला तसे वाटते.

जर आपण सर्वच गमावले असते तर मी या विषयावर बोललोच नसतो. जर सर्वच गमावले तर एखादा प्रयत्न करण्याची गरज काय? मठ स्वतःच बंद होईल. पण सर्वच नष्ट झालेले नाही. अजूनही स्फुल्लिंग आहे. तुम्ही सर्व माझे ऐकण्यासाठी वाट पाहत आहात, तुमची उपस्थिती हाच पुरावा आहे. मी तुम्हाला जे सांगतो आहे ते तुम्ही कराल की नाही यामुळे काही फरक पडत नाही. तुम्ही माझे शांतपणे ऐकत आहात ही वस्तुस्थिती आहे. म्हणूनच मी म्हणतो की अजूनही स्फुल्लिंग राहिलेला आहे. तो फुंकून त्याची प्रखर ज्योत होते का ते मी शोधण्याचा प्रयत्न करीत आहे. मी जर लोक जात असलेल्या मार्गाने गेलो तर - हा नवीन मार्ग आहे - तर मी शंकर भगवद्‌पादांशी कृतघ्न असेन.

त्याने भले होते - नाही का? - मी माझ्या मनातले बोलून दाखवतो आणि माझ्या मनावरचे ओझे उतरवतो. तुम्ही माझी भक्ती कराल आणि मी तुम्हाला माझे आशीर्वाद देत राहीन : हे आपल्यातले नाते चालू राहील. मठ ज्यासाठी आहे त्या मार्गावर तुम्हाला आणण्यात मी अयशस्वी झालो तर, मी पिळवणूक केल्याचा गुन्हेगार ठरेन. म्हणून मी स्पष्ट, पूर्वग्रहरहित अशा माझ्या भावनांचे प्रकटीकरण केले.

परम देवतेच्या कृपेने आपल्या वैदिक वारशाचे जतन करण्यासाठी आखलेल्या योजना राबविण्यात आपल्याला थोडे यश मिळाले आहे. प्रत्येक घरात धार्मिक ग्रंथांचे पठण होणे या ध्येयापासून आम्ही दूर आहोत हे खरे आहे. पुढील पिढीकडून वैदिक शिक्षण लुप्त होईल आणि ते अस्तित्वातच राहणार नाही ही माझी पूर्वीची भीती आता नाही. हल्ली देशभर अनेक विद्यार्थी वेद पठण करीत आहेत तसेच त्यांचा अर्थ समजून घेत आहेत.

बालविवाहाच्या कायद्याने माझे हात बांधले आहेत. धर्मशास्त्रानुसार मुलीला कामभावना निर्माण होण्यापूर्वी एखाद्या पुरुषाच्या हातात म्हणजे तिच्या पतीच्या हातात सोपविले पाहिजे. म्हणजे पती तिचा ईश्वर आहे ही भावना तिच्या ठिकाणी पूर्ण ठसेल आणि जेव्हा तिला कामभावना होईल तेव्हा ती तिच्या पतीला आपले शरीर अर्पण करेल. हा धर्मशास्त्राचा कायदा आहे. पण देशाचा कायदा धर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे. तरीसुद्धा मी तुम्हाला त्याचे उल्लंघन करण्यास सांगणार नाही. तथापि आपण न थकता धर्मशास्त्रातील कायद्याविषयी बोलत राहिले पाहिजे आणि वाट पाहिली पाहिजे आणि शासनाचे मन बदलते का हे पाहिले पाहिजे.

-----

## प्रकरण - ७

# आपले सांप्रतचे कर्तव्य

अधिकाऱ्यांनी त्यांचे मन बदलण्यास वेळ घेऊ द्यात. आपले लगेचचे कर्तव्य काय? जर मुलीच्या विवाहाचे वय १४, १६, १८ किंवा तसे कायद्याने निश्चित झाले तर तिचे वय झाल्यावर आपण तो साजरा करू. आपण त्या दिवसासाठी अगोदरच तयारी करून ठेवू, तिच्यासाठी वर ठरवू आणि विवाहाची सर्व तयारी करून ठेवू. मुलीला शारीरिक कामना जाणवायला लागल्यावर आणि नित्य भावनिक अस्वस्थता वाटू लागल्यावर जास्त काळ घालविणे हे दोषार्ह आहे. आपल्या आवाक्याबाहेरच्या परिस्थितीमुळे विवाह पुढे ढकलणे ही एक गोष्ट आहे, दुसरी आपण आपल्याला तो वेळेवर करण्यासाठी पुरेसे कष्ट न घेणे ही आहे.

-----

## प्रकरण - ८

# विवाह साधेपणाने करा

आजकाल मुलींचे विवाह कायद्याच्या मर्यादेच्या फार पुढे वयाच्या २५ किंवा ३०व्या वर्षी केले जातात. विवाहासाठी लागणारे पैसे उभे करण्यातील असमर्थता हे एक त्याचे कारण आहे. विवाहातील डामडौल/प्रदर्शन, हुंडा आणि वराच्या लोकांना दिलेल्या इतर भेटी यांना शास्त्रात मान्यता नाही. वरासाठी सुट किंवा बुटाची जोडी, महाग घड्याळ किंवा इतर महाग वस्तू यांची मागणी करणे दुसरे-तिसरे काही नसून लुबाडणूक आहे. हे वधूच्या पक्षाला पिळून काढणे होय. ही लूट शास्त्राने मान्य केलेली नाही. तसेच विवाहाच्या संध्याकाळी 'जानवासम्' म्हटली जाणारी झगमगाटातील मिरवणूक जणू समारंभाचा एक आवश्यक भाग झाला आहे.

भूतकाळात जेव्हा वर आणि वधू अगदी लहान असत तेव्हा त्यांना होमाच्यापुढे अस्वस्थ वाटत असेल म्हणून त्या जोडप्याला उत्साहित करण्यासाठी विवाहात कार्यक्रमांचा समावेश केला गेला. नलंगुसारखे खेळ आणि मिरवणूक अशा काही गोष्टी असत.

''कन्यां कनकसंपन्नं'' (सोन्याने अलंकृत वधू) : विवाह विधींच्या संबंधाने शास्त्रात असे शब्द येतात. सोने लक्ष्मीची कृपा दर्शविते. पण त्याचा एक भाग म्हणून सोन्याचा एक मणी असलेले मंगळसूत्र पुरे. अन्य महाग दागिने, हिऱ्याची बटणे इ. यांची गरज नाही. रेशमाची गरज नाही. सुती साडी ही कुरपुडवैचा हेतू साध्य करते. सर्वात महत्त्वाचे म्हणजे हुंडापद्धती नाहीशी केली पाहिजे. सर्व परिचितांसाठी असलेले खर्चिक भोजन हे न्याय्य नाही, पटण्यासारखे नाही. संगीत किंवा नृत्याच्या कार्यक्रमाची गरज नाही. मोठा मंडपही आवश्यक नसतो.

-----

## प्रकरण - ९

# मातृत्वाचे कर्तव्य

आपल्या स्त्रियांनी हिरे आणि रेशीम यांची आवड सोडून दिली पाहिजे. त्याची आपल्या कुटुंबाला आणि सामाजिक जीवनाला मोठी मदत होईल. खरेच स्त्रीत्व स्वतःच लाभदायक होईल आणि स्त्रीधर्म जोपासला जाईल. जी रेशमी साडी स्त्रिया स्वतः परिधान करतात, त्यासाठी लाखो रेशमाचे किडे मारले जातात याचा विचार त्यांनी करावा. त्या म्हणतात की आम्ही शाकाहारी आहोत. त्यांच्या रेशमी साडीच्या आवडीपोटी त्या असंख्य रेशमाच्या किड्यांच्या नाशाला अप्रत्यक्षपणे त्या कारणीभूत होतात याचा त्यांनी पश्चात्ताप केला पाहिजे. जर सुस्थितीतील स्त्रियांनी हे जाणले आणि रेशमी साड्या वापरणे थांबविले तर त्या त्यांच्यापेक्षा कमी नशीबवान स्त्रियांसाठी वाईट उदाहरण घालून देणार नाहीत. श्रीमंतांच्या उदाहरणामुळे गरीबही रेशीम आणि हिरे यांची इच्छा बाळगतात. मग वराकडचे लोक वधूच्या पालकांवर रेशीम आणि हिऱ्याच्या खड्यांसाठी दबाव आणतात. मुलींच्या विवाहाला उशीर होण्याचे हेही एक कारण आहे.

विवाहसंस्काराचे रूपांतर आर्थिक प्रश्नात व्हावे हा अपराध आहे. शेवटी आपल्यालाही मुली आहेत. तसे असल्यानेच आपण वराच्या कुटुंबातील आहोत असा उर्मट दृष्टिकोन ठेवू शकत नाही आणि वधूच्या कुटुंबाकडे हे द्या, ते द्या अशा मागण्यांचे हुकूम करू शकत नाही. आपण शायलॉकसारख्या अटी लादून मुलीच्या पालकांना असे सांगू शकत नाही : "मोठा हुंडा द्या, आम्हाला किमती भांडी आणा, आमच्यासाठी हिरे आणि रेशीम आणा." असे वर्तन अक्षम्य आहे : हे एक मुली अविवाहित राहण्याचे आणि घरी झुरत बसण्याचे कारण आहे. जर तुम्ही वराचे पालक असाल तर तुम्ही मुलीचे चारित्र्य, तिचे कुटुंब इ. यावर समाधानी असले पाहिजे. "ही मुलगी आपल्या घराची लक्ष्मी आहे आणि ती लक्ष्मी तेजस्वी करेल" : अशा विचाराने विवाहासाठी काहीही अटी न घालता, तुम्ही पैसे, दागिने आणि इतर स्वरूपात भेटी दिल्या पाहिजेत असा आग्रह न धरता तुम्ही वधूचा स्वीकार केला पाहिजे.

याबाबतीत स्त्रियांवर विशेष जबाबदारी आहे. बरोबरीच्या स्त्रियांबद्दल त्यांना साहजिकच आदर आणि सहानुभूती असली पाहिजे. जेव्हा त्या स्वतःच्या मुलाचा विवाह साजरा करतात तेव्हा त्यांनी मी अगोदर सुचविल्याप्रमाणे वर्तन केले पाहिजे. इतर पालकांनी त्यांच्या जावयांना दिलेल्या भेटवस्तू हे त्यांच्या मागण्यासाठीचे उदाहरण असता कामा नये. उलट, होतकरू वराच्या पालकांसाठी असे सांगून उदाहरण ठेवले पाहिजे की : "इतरांनी केलेल्या चुकांप्रमाणेच आपण करून का दोषी व्हावे?" आपण बदल करण्याचा प्रयत्न करू या आणि इतरांसाठी उदाहरण घालून देऊ या." अशी मातृत्वाला प्रेरणा मिळाली पाहिजे.

"आम्ही आमच्या मुलीचे लग्न झाले तेव्हा वराच्या लोकांना हुंडा दिला." किंवा " माझ्या वडिलांनी माझ्या लग्नात त्यांच्या जावयाला हुंडा दिला म्हणून आता मी स्वीकारण्यात काहीही गैर नाही." असा दृष्टिकोन तुम्हाला न ठेवण्याचा इशारा देत आहे. आपल्या धर्माला क्षीण करणाऱ्या या दुष्ट प्रथेला गाडून टाकले पाहिजे. कोणीतरी त्यागाच्या भावनेने पहिले पाऊल टाकले पाहिजे. लोक या ना त्या कारणासाठी त्याग करतात. जर त्यांच्या गावाचा समावेश शेजारील जिल्ह्यात झाला तर हजारो किंवा लाखो विरोधात उभे राहतील आणि अटकेची मागणी करतील. काही चळवळे स्वतःला पेटवून घेतात. आपल्या स्त्रीत्वाच्या आदर्शाच्या जतनासाठी आपण थोडा त्याग करू शकत नाही का?

स्त्रिया मला भेटण्यासाठी येतात आणि माझे आशीर्वाद घेतात आणि असे म्हणतात की, "आम्ही 'सौंदर्यलहरी', 'अभिरामि अंतादि' पठण करतो." जे त्या करतात ते स्तुत्य आहे. जर त्यांनी माझा विवाहाच्याबाबतचा सल्ला मानला तर त्या अंबेच्या कृपेला पात्र होतील. त्यांनी हुंडा, दागिने, भेटवस्तू इ.ची अट घालता कामा नये आणि मनापासून विवाह मिलनाला कबूल व्हायला हवे. त्यांच्यासारख्या मुली किंवा स्त्रिया असतात, वर्षे जातात पण त्या अविवाहित राहतात. त्या भाविनकदृष्ट्या अस्वस्थ असतात, बिकट परिस्थितीमुळे त्यांचा आत्मसन्मान दुखावलेला असतो, पण नंतर त्या भावनाहीन होऊन कठोर होऊ शकतात. अशा स्त्रियांच्या दुर्दैवाला कारण असलेली ही रूढी बदलली पाहिजे. जर तुमचे मन त्यांच्यासाठी द्रवले तर अंबाही तुमच्याकडे कृपेने पाहील. हुंडा आणि इतर भेटवस्तू स्वीकारण्याला मुलीच्या पालकांनी स्वखुशीने दिले असे म्हणून तुम्ही समर्थन देऊ शकत नाही. हे विचार इतरांकडे जातात आणि एक वाईट शृंखला निर्माण होते. जर मुलीच्या पालकांनी स्वतःच हुंडा दिला तर ते त्यांच्या मुलाच्या लग्नात वधूच्या पालकांकडून स्वीकारतील. स्वच्छेने दिला तरी तुम्ही हुंडा नाकारला पाहिजे. जरी मुलीचे लोक श्रीमंत असतील तरी तुम्ही सांगू शकताः "आम्हाला पैसे देऊ नका. जर तुमची इच्छा असेल तर तुम्ही ते तुमच्या मुलीला स्त्रीधन म्हणून देऊ शकता."

वराचे पालक कपडे, प्रवास इ. यावर खर्च करतात आणि तो मुलीच्या पालकांकडून मिळावा अशी अपेक्षा करतात. हे समर्थनीय नाही. त्यांनी स्वतःच म्हटले पाहिजे : " आमच्या मुलाचा विवाह होत आहे. आम्ही स्वतःच त्यावर खर्च का करू नये? आमच्या स्वतःच्या गरजा पूर्ण करण्यासाठी अन्य कोणाकडून पैसे घेणे हे लज्जास्पद आहे. याचा अर्थ असा नाही का की आम्ही तो खर्च करू शकत नाही?" दुर्दैवाने, वराचे पालक म्हणून आपल्याला काही हक्क आहेत असे लोकांना वाटते आणि ते वधूच्या लोकांना धाकदपटशाने किंवा दबाव आणून लुबाडत असतात. हुंडा स्वेच्छेने दिलेला असो वा सक्तीने, ती पैशाची चोरीच आहे. हे दुष्टचक्र आहे, ते समाजाला हानी पोहोचवते. ही हुंडापद्धती नष्ट होईल हे आपण कसे का होईना पाहिलेच पाहिजे.

-----

## प्रकरण - १०

## वराचे कर्तव्य

जे तरुण विवाहाचा गांभीर्याने विचार करतात त्यांची याबाबत मदत होईल. सामान्यतः मुलाने त्याच्या आई-वडिलांच्या इच्छेविरुद्ध जाऊ नये. तरुणांनी त्यांच्या पालकांना विरोध करावा असे मी सांगणे रास्त होणार नाही. हल्ली पूर्वीप्रमाणे ते पालकांची आज्ञा पाळत नाहीत. म्हणून मी त्यांना पालकांच्या इच्छेविरुद्ध जाण्याला प्रोत्साहन देत नाही. मी त्याबाबत अनभिज्ञ नाही. तथापि, विवाहात पैशाचा प्रश्न आपल्या प्राचीन स्त्रीधर्मात आणून प्रचंड नुकसान होत असल्याचे मला आढळते.

यासंदर्भात मी तरुण माणसांना त्यांचा मदतीचा हात देण्यास सांगतो. त्यांनी स्पष्टपणे पालकांना सांगितले पाहिजे की ते वधूच्या पालकांकडून हुंडा आणि इतर भेटवस्तू घेणार नाहीत या अटीवर विवाहाला तयार होतील. त्यांनी हुंडापद्धती विरुद्ध सत्याग्रह करावा असेही मी त्यांना सांगितले पाहिजे, त्यांनी पालक त्यांचे ऐकत नाहीत अशा सबबींवर विवाह करता कामा नये. सत्याग्रहात त्यागाचा भाग आहे. जे करतील त्यांनी ठामपणे पालकांना सांगितले पाहिजे : ''तुम्ही म्हणा की हुंडा न घेता तुम्ही माझा विवाह करणार नाही. ठीक आहे, मी विवाह करणार नाही आणि अविवाहित राहीन तर तुम्ही तुमचे मन बदलले नाही तर.'' जर तरुण माणसे अशी निग्रही झाली तर कोणत्याही माता-पित्याच्या मनात बदल होईल. हुंडा स्वीकारण्यास नकार ही सर्वात मोठी सुधारणा घडविण्यात तरुणांचा उपयोग होऊ शकतो. आंतरजातीय विवाह किंवा प्रेमविवाह यात अभिमान बाळगायचा हे योग्य नव्हे. कारण ते आपल्या शास्त्राच्या विरुद्ध आहे. प्रयत्न करून हुंडापद्धतीचा शेवट करण्याचे मुलांचे कर्तव्य आहे. यापेक्षा मोठी सुधारणा असू शकणार नाही.

माता-पिता आणि गुरू यांना वेद ईश्वरासमान मानतात. मी पुन्हा सांगतो की कोणत्याही मुलाने आपल्या पालकांच्या इच्छेविरुद्ध वागता कामा नये. पण गुरू (मला गुरू हा शिक्का आहे, नाही का?) म्हणून मला हुंड्याबाबत अपवाद करण्यास त्यांना सांगावे लागते. म्हणून माझ्या, तुमच्या गुरूच्या सल्ल्यानुसार - हुंडा घेणे - शास्त्राच्या विरुद्ध असल्याने हुंडा घेता कामा नये असे त्यांच्या पालकांना सांगितले पाहिजे. त्यांचा निग्रह आणि हेतूचा प्रांजलपणा पटवून देण्यासाठी त्यांनी सत्याग्रह केला पाहिजे.

ही हुंडा म्हणविली जाणारी जुलमाची रूढी आपल्या समाजाला लागलेला कर्कट रोग आहे. तो काढून टाकून तरुण माणसे समाजाची मोठी सेवा करतील आणि त्याचवेळेस ते इतरांना प्रेरणा देतील. ही दुष्ट गोष्ट काढून टाकण्यासाठी फक्त आपल्या धर्मावर विश्वासच नव्हे तर आपल्या बांधवांबाबतचे कर्तव्य म्हणून हे काम केले पाहिजे.

विवाह ही प्राचीन संस्था आहे, मानवाच्या भविष्याची हमी आणि समाजाला धार्मिक संरक्षण आहे. तसे असल्याने तरुणांनी पालकांनी निवडलेल्या मुलींशी विवाह केला पाहिजे. पण हुंडा पद्धती समाजाचा पायाच खणून काढत आहे आणि तरुणांना याबाबत काही करायचे नाही. त्यांचे पालकांच्याबाबतीत कर्तव्य असेल तसे समाजाच्याबाबतीतही आहे, नाही का? म्हणून पालक हुंडा घेण्याबाबत आग्रही असतील तर विवाह करण्यास ठाम नकार देणे हे त्यांचे कर्तव्य आहे. असा नकार ही फक्त कुटुंब आणि समाजाची सेवा नसेल तर स्त्रीत्व आणि धर्माचीही सेवा असेल. मी सुचविलेल्या रीतीने वागण्याची तरुणांनी शपथ घेतली पाहिजे आणि हुंडा या घातक रूढीचा शेवट केला पाहिजे.

-----

## प्रकरण - ११

# मठाने केलेली व्यवस्था

सातव्या किंवा आठव्या वर्षी नसला तरी किमान कायद्याने अनुमती दिलेल्या वयात मुलींचा विवाह व्हायला हवा. या हेतूने आम्ही कन्यकादान ट्रस्ट सुरू केलेला आहे. केवळ पैसे नाहीत म्हणून वयात आल्यावरही गरीब पालकांच्या मुली अविवाहित राहू नयेत. त्यांचा विवाह करण्यासाठी मर्यादित प्रमाणात ट्रस्ट मदत करते. अशा विवाहांना योगदान, मदत करून मोठे पुण्य मिळविले जाईल.

आपल्या ब्राह्मणांइतका इतर जातींचा ऱ्हास झालेला नाही. ब्राह्मणेतरांमध्ये हुंडापद्धती जुलमाची नाही. त्यांच्या स्त्रिया ब्राह्मण भगिनींइतक्या मोठ्या प्रमाणात महाविद्यालयात जात नाहीत, वाटेल तशा मुक्तपणे इकडे-तिकडे फिरत नाहीत.

गरीब कुटुंबातील मुलींना मदत करण्यासाठी हा ट्रस्ट निर्माण झाला आहे. माझ्या मतानुसार फक्त ब्राह्मणांकडूनच कन्याकदान ट्रस्ट आणि वेद रक्षण निधीसाठी देणग्या स्वीकारल्या पाहिजेत. कारण ब्राह्मणांनी केलेल्या गुन्ह्याबद्दल इतर जातींना दंड देण्यास भाग पाडू नये. वेदाध्ययन सोडण्याचा मोठा गुन्हा ब्राह्मणांनी केलेला आहे. अनुमती असलेल्या वयात आपल्या मुलीचा विवाह न करणे हा तितकाच गंभीर गुन्हा ब्राह्मण करतो. म्हणून त्याने केलेल्या गुन्ह्यावर उपाय करण्याची व्यवस्था करणे ही त्याची जबाबदारी आहे. त्यासाठी इतर जमातींना भरपाई करायला लावू नये. तसे करणे म्हणजे पापात भर घालण्यासारखे होईल. शेवटी तो कोणताही व्यवसाय स्वीकारतो, पैसा मिळेपर्यंत तो कोणतेही काम करतो. तो उधळेपणाने क्लब, करमणूक आणि इ. वर खर्च करतो. म्हणून त्या या दोन्ही ट्रस्टसाठी योगदान द्यावे हे तर्कशुद्ध नव्हे का?

कन्यकादान ट्रस्ट तिरु-मांगल्यम् (मंगलसूत्र), साडी, वरासाठी धोती यांचा खर्च करतो. तो ट्रस्ट साधासुधा, कमी खर्चिक विवाह करण्यास मदत करतो.

वेद रक्षण निधी ट्रस्ट इतके समाधानकारक परिणाम कन्यकादान ट्रस्टच्या व्यवस्थेचे मिळाले नाहीत. ती संस्था सुरू केल्यावर प्रश्न सोडविण्यासाठी फारसे काही केले गेले नाही. मी हे पश्चात्तापाने सांगत आहे. आम्ही हे जे ब्राह्मण समाजासाठी थोडे केले ते, ज्याने पहार गिळली आहे, त्याला सुंठीचा काढा देण्यासारखे आहे. अधर्माच्या फुगलेल्या प्रवाहाला बांध घालण्याबद्दल पालकांना मुळीच चिंता नाही. म्हणून फारसे लोक या ट्रस्टचा उपयोग करण्यास पुढे येत नाहीत. योग्य वेळेवर त्यांच्या मुलींचा विवाह होण्याबाबत ते फारसे चिंतातुर नाहीत. ज्यांच्या मुली नोकरी करतात आणि पैसे कमावत असतात ते हे सहजपणे घेतात. आम्ही ट्रस्टचे काय करायचे? पालक, वरांचे संशोधन करण्याऐवजी त्यांच्या मुलीसाठी नोकरीची शिफारस

करणाऱ्या माणसाचे संशोधन करतात. आपल्या भूमीवर या गोष्टी अधिक वाईट होत चालल्या आहेत - हे सर्व दुर्दैवी आहे. आम्ही पन्नास विवाह लावू शकतो. प्रत्येक वर्षी ५००० स्त्रिया नोकरी करतात, ही तमीळ ब्राह्मण स्त्रियांची संख्या आहे. पण एकूण ब्राह्मण स्त्रिया जास्त असतील. याच्या दहापट संख्या नोकरीचा शोध घेत फिरतात. केवळ पन्नास मुली कायद्याप्रमाणेच्या वयात आमच्याकडे मदतीसाठी येतात. ट्रस्टकडून साध्य झालेला हेतू मला एवढेच समाधान देतो की मी माझ्या कर्तव्यात चुकलो नाही.

मी मोकळेपणाने बोललो आहे ते या आशेने की पालक आत्मसन्मानाने, तातडीने त्यांच्या मुलींच्या विवाहासाठी एक क्षणही न गमावता त्या कायद्याप्रमाणे पुरेशा मोठ्या झाल्यावर त्यांच्या विवाहासाठी योग्य पावले उचलतील.

-----

## प्रकरण - १२

# खरी सुधारणा

कायद्याने विवाहासाठी किमान वयाची अट घातली आहे. कायद्याने लोकांच्या दृष्टिकोनाकडे पाहून कमाल वयाची अट घालावी अशी माझी इच्छा आहे. वयाच्या २५ किंवा ३० वर्षांपर्यंत मुली अविवाहित राहतात याबद्दल कायद्याला दोष देणे न्याय्य नाही. त्याचे कारण आपली तटस्थता आहे. उपनयनाचा संस्कार घ्या. तो काही सारडा ॲक्टखाली येत नाही. मग जेव्हा तो - मुलगा ३० किंवा तशाच वयाचा होतो तेव्हा त्याच्या विवाहात त्याचे उपनयन का केले जाते? हे सर्व आपल्या शास्त्राच्या आणि धर्माबद्दलच्या उदासीनतेमुळे होत आहे. ही सर्वसाधारण उदासीनता सोडून अनेक पालकांना उपनयन आणि विवाह इतर सणसमारंभासारखे डामडौलाने खर्चिक पद्धतीने करण्याची इच्छा असते. पैसा उभा करायचा असल्याने दोन्ही उशिरा होतात. इतके की आयुष्यभराची कमाई मुलीच्या विवाहासाठी पुरेशी पडत नाही. हे विपरीत आहे. त्याचा परिणाम असा होतो की शास्त्रानुसार योग्य वेळेवर संस्कार होत नाहीत.

आपल्या पवित्र धर्मग्रंथानुसार या संस्कारांचा पैशाशी काही संबंध नाही. हल्ली तसा संबंध आला आहे ही शोकांतिका आहे. आणि ती आपणच निर्माण केलेली आहे. असुर पद्धतीतसुद्धा वराला वधूच्या बदल्यात पैसे द्यावे लागतात. जर असा व्यवहार राक्षसी मानला तर वराचे पालक वधूच्या पालकांना : तुमची मुलगी विवाहात द्या आणि पैसेही द्या, असे म्हणतात. या सध्याच्या हुंडापद्धतीबाबत, शास्त्रकर्त्या ऋषींनी काय विचार केला असता. ते कल्पनाही करू शकले नसते की अशी रूढी निर्माण होईल. 'कन्या-शुल्क' म्हणजेच वधूला पैसे देणे किंवा वधूची किंमत देणे. या रूढीला धार्मिक कायद्यात काहीसा आधार आहे, परंतु हुंडा पद्धतीच्या समर्थनाचा लवलेशही आपल्या धर्मग्रंथात नाही.

या रूढीचा, या दुष्ट गोष्टींचा शेवट करणे यासाठी विवाह सुधारणा ही गोष्ट देशाची खरी गरज आहे. अशा सुधारणा करण्याऐवजी, आम्ही काय केले - सुधारणेच्या नावाखाली - मुलींच्या विवाहाची किमान वयाची अट घातली. आणि त्याने आमच्या कुटुंबात आणि समाजजीवनात गोंधळ घातला. मी नोकरी करणाऱ्या मुलींच्या सध्याच्या वास्तविकतेचा उल्लेख करीत आहे. जेव्हा हुंड्यासाठी व वराच्या लोकांना भेटवस्तू देण्यासाठी आणि डामडौलात विवाह करण्यासाठी पैसा जमविणे कठीण जाते तेव्हा सारडा ॲक्ट, समारंभाची घाई न करण्यासाठी उपयोगी पडतो. स्वतंत्र भारतातील शासन या कायद्याच्या पुढे गेले. हुंडा अवैध ठरविला तरी ही दुष्ट रूढी पूर्वीपेक्षा आणखी दुष्ट झाली. भूतकाळाप्रमाणेच हुंडा, विवाहावरील खर्चिक उधळपट्टी ही चालूच आहे.

-----

## प्रकरण - १३

# नोकरी करणाऱ्या स्त्रिया

जेव्हा मुलींच्या विवाहाला उशीर होतो आणि त्यांना घरीच राहावे लागते, तेव्हा पालकांना वाटते त्यांच्या मुलींनी अभ्यास का करू नये, नोकरी करून पैसे मिळविण्यास सुरुवात का करू नये? जेव्हा मुलींचे विवाह होतात तेव्हा तो पैसा उपयोगी पडतो. अशा रीतीने स्त्रिया नोकरी करू लागल्या. प्रथम तिच्या विवाहातील खर्चासाठी तिच्याच स्वतःच्या उत्पन्नावर अवलंबून राहणे यात आपण काही अयोग्य करतो आहोत असे वाटून पालक अस्वस्थ झाले. मुलींना विविध धोक्यांना आणि मोहांना सामोरे जावे लागेल याची पालकांना काळजी आणि भीती वाटे. पण काळाच्या ओघात ही भीती आणि काळजी नाहीशी झाल्याशिवाय पालकांनाही, त्यांच्या मुली नोकरीला जातात हे अवघड वाटेनासे झाले.

पुराणानुसार जनकासारख्या राजयोगीसही त्याच्या मुली अविवाहित राहून घरातच राहतात याची काळजी वाटे. अग्नी बरोबर बाळगल्यासारखे ते अस्वस्थ असत. प्रथम स्त्रिया नोकरी करतात हे आपल्याला लज्जास्पद वाटे. पण हळूहळू आपण ते स्वीकारायला सुरुवात केली. आता आपण ती गोष्ट आपली प्रगती समजतो, आपल्या संस्कृतीने पुढे टाकलेले पाऊल समजतो. पालकांनी आपली जबाबदारी वाऱ्यावर सोडून दिली आणि आपल्या मुली नोकरी करतात याची थोडीशीही चिंता त्यांना वाटत नाही आणि त्याचा त्यांना अभिमान वाटतो. आपला धर्म असा खोल गाळात रुतला आहे. नोकरी करणाऱ्या मुली त्यांच्या नोकरीतील पदोन्नतीसाठी माझे आशीर्वाद घ्यायला येतात. प्रत्येक गोष्टीकडे डोळेझाक करून - पाहून न पाहून केल्यासारखा - मी एक चांगला स्वामियार, स्वामी असल्याचे नाव कमावले आहे.

"स्त्रिया उच्च शिक्षण घेतात आणि नोकरी करीत आहेत हे एक पुढचे पाऊल आहे." सुधारणावादी म्हणतात, "हे पूर्वी केलेल्या घोर अन्यायाचे परिमार्जन आहे." ते पुढे म्हणतात. माझा असा दृष्टिकोन आहे की पूर्वी स्त्रियांवर अन्याय केला गेलेला नाही आणि मी इतकेही म्हणतो की जर काही अन्याय झाला असेल तर तो पुरुषांवर, तुमची या शेऱ्याने करमणूक होईल. मला स्पष्ट करू द्या. त्याकाळी पुरुषाला ब्रह्मचर्याश्रमानंतर गृहस्थ व्हावे लागे. आता त्याला अनेक कर्तव्ये, औपासनासारखे विधी, ऐहिक जीवनापासून मुक्त होण्याचे अंतिम ध्येय ठेवून अनेक संस्कार करावे लागत. एखादी स्त्री तेच ध्येय पतीला समर्पण करून गाठत असे आणि तसे करणे हे पुरुषाने केलेल्या संस्कारांच्या फार पुढे जाणे आहे. जरी सुधारणावादी हे स्त्रियांवर अन्याय करण्यासारखे आहे असे म्हणत असले तरी मला वाटते शास्त्राने पुरुषांपेक्षा स्त्रियांवर अधिक कृपा केली आहे. का ते मी तुम्हाला सांगतो. पुरुष स्वतःला कसा मुक्त करतो? त्याला अनेक धर्मविधी करावे लागतात; त्याला सत्य जाणावे लागते आणि निदिध्यासाद्वारे ते आत जाणवावे लागते. केवळ याच मार्गाने तो चित्तशुद्धी करतो.

पतिव्रतेला अशी कठीण साधना, असे कळकळीचे आणि घोर आचरण, ते ध्येय गाठण्यासाठी करण्याची गरज नाही आणि तिला फक्त तिच्या पतीला समर्पण करावे लागते. पतीच्या इच्छांचा आदर करून पत्नी आपल्या इच्छा पुसून टाकते. तसेच सन्मानाच्या आणि अपमानाच्या भावना आणि सर्व अहंकाराच्या भावना नाहीशी करते. अशा प्रकारे ती मनाच्या स्थैर्याजवळ येते. जेव्हा मन शरणागतीच्या दृष्टिकोनाने पूर्णपणे दुसऱ्याला समर्पित केले जाते तेव्हा ते लोप पावल्यासारखेच; नाही का? स्त्रीसाठी यापेक्षा अधिक उच्च 'उन्नती' आहे का?

चित्तशुद्धी झालेली स्त्री ही एखाद्या कचेरीत बढती मिळालेल्या स्त्रीपेक्षा खूप उच्च स्थानावर असते. अशाच प्रकारे या देशाच्या इतिहासात अनेक स्त्रियांनी ऋषींनी प्राप्त केलेल्या सामर्थ्यापेक्षा अधिक सामर्थ्य मिळविलेले आहे. तिरुवल्लुवरच्या अनुसार जर एखादी स्त्री म्हणते, "पाऊस पडू दे", पाऊस पडेल, पाऊस पडलाच पाहिजे. जर ती सूर्याला म्हणाली की "उगवू नकोस," तर तो उगवणार नाही. अशी स्त्री यमाकडून आपला पती परत मिळवू शकते. आपली शास्त्रे, आपल्या परंपरा या स्त्रियांना ऋषी किंवा देवतेपेक्षा उच्च स्थान देतात. पुराणातून आपल्याला कळते की भव्य चारित्र्यामुळे एखादी स्त्री पाणी शिंपडून देवांचे लहान मुलांमध्ये रूपांतर करू शकते. एखादी स्त्री खऱ्या वैभवाच्या उंचीवर जाते आणि तिची मंदिरात स्थापना होऊन पूजा केली जाते याबाबत आपले धार्मिक ग्रंथ सांगतात. ते तिला गौण स्थितीकडे ढकलत नाहीत. अशा वैभवाच्या उंचीवर जाण्यापासून सुधारणावादी तिला रोखतात असे मला वाटते.

एखाद्या पुरुषाला अनेक संस्कारांपैकी एक असलेला विवाह शुद्ध करतो; तर स्त्रीला विवाह हा एकच संस्कार सर्व संस्कारांचे फळ देतो. आता या संस्काराचे सार टाकले जाते आणि केरकचरा ठेवला जातो. विवाह आणि गृहस्थाश्रम हे केवळ वैषयिक आनंदासाठी नाहीत. ते मुक्तीचा मार्ग तयार करतात. जर हे सत्य समजले तर स्त्रियांना शास्त्रांनी दिलेली भूमिका न्याय्य आणि योग्य असल्याचे लोकांना समजून येईल.

स्त्रिया नोकरी करतात. त्याचे आर्थिक तोटे फारच थोड्याजणांना कळले आहेत. मी बेकारीच्या प्रश्नाचा संदर्भ देत आहे. अगदी काही वर्षांपूर्वी पालक त्यांच्या मुली नोकरी करतात यासाठी ही सबब सांगत असत की, "विवाह होईपर्यंत तिला नोकरी करू दे. नाही तरी तिला घरात कुढत बसावे लागेल आणि स्वतःबद्दल वाईट वाटत राहील. नोकरी करणे हे एक वेळ घालविण्याचा चांगला मार्ग असेल. शिवाय तिचे उत्पन्न तिच्या विवाहाच्या हुंड्यासाठी आणि इतर खर्चासाठी उपयोगी पडेल." तिला विवाहापर्यंत नोकरी करू देणे आणि नंतर राजीनामा देणे अशी नंतर कल्पना होती. वर आणि त्याचे लोक विवाहानंतर वधूने नोकरी करणे हे प्रतिष्ठा कमी करणारे मानत असत.

लवकरच हा दृष्टिकोन बदलला. कसा? गेल्या शतकात किंवा त्या सुमारास ब्राह्मण

समाजाची पैशाची भूक वाढली. या लोभामुळे काही वर्षांत विवाहानंतरही नोकरी करणे विस्तृत प्रमाणात सर्रास स्वीकारले गेले. त्याचा परिणाम असा झाला की मुलांच्या संगोपनाच्या मातृत्वाच्या जबाबदारीकडे दुर्लक्ष केले गेले. हे पाश्चात्त्य देशांप्रमाणेच झाले आणि पालक आणि मुले आणि इतर कुटुंबीय यांच्यातील नात्यात तळमळ आणि प्रामाणिकपणा राहिला नाही.

आर्थिक आघाडीवरही, नोकरी करणाऱ्या स्त्रियांच्या पद्धतीने अनपेक्षित परिणाम घडविले आहेत. आजकाल लाखो तरुण पुरुष बेकार आहेत. त्याचवेळेस काही कुटुंबात दोघेही पती आणि पत्नी काम करतात आणि पैसे कमावतात. जर पतीने फक्त नोकरी केली तर बेकार तरुणाला नोकरी मिळेल. दुर्दैवाने पती केवळ स्वतःच्या पैशावर पत्नी आणि कुटुंबीय यांच्या संगोपनात अभिमान बाळगत नाही, त्यांना पत्नीही नोकरी करणारी हवी. प्रथम पालकांनी नाइलाजाने आपल्या मुलींना नोकरीवर पाठविले. नंतर पतीने पुरेशी इच्छा नसतानाही तसेच केले. आता पत्नीने नोकरी करण्यात अभिमान वाटू लागला. वस्तुतः तिला बाहेर काम करण्याची सवय होऊ लागली आणि तिला घरात अडकून पडणे आवडेनासे झाले. जेव्हा ती स्वतः पैसे कमावू लागली तेव्हा ती पतीला न विचारता आवडेल तसे पैसे खर्च करू लागली.

घरात राहणे म्हणजे कोंडून राहणे नव्हे. संस्कृतमध्ये आणि इतर भाषेत शास्त्रे आणि पुराणे यांची कमी नाही. जर स्त्रियांनी त्यात आपली आवड जोपासली तर त्या आयुष्यभर वाचत राहतील आणि त्यांना सुख मिळेल. त्या सत्संग समूह निर्माण करतील आणि घरी आळीपाळीने तशी पुस्तके वाचतील. मंडळ किंवा संस्था, महामंडळ स्थापन करण्याची गरज नाही. अध्यक्ष, सचिव, समिती सभासद इ. असे कार्यालयीन अधिकारी न नेमता घरात सत्संग भरविता येईल. पदासाठी स्पर्धा आणि शत्रुत्व टाळण्यासाठी मी हे सुचवत आहे. स्त्रिया स्वतःला हळदीपासून कुंकू बनविणे आणि मठाच्या, मंदिराच्या आणि इतर धार्मिक संस्थांसाठी अक्षता गोळा करण्यात स्वतःला कामात ठेवू शकतील. घरी राहणे म्हणजे असे काम करीत कोंडून राहणे नव्हे. शिवाय स्त्रिया त्यांची मौल्यवान संपत्ती, त्यांचे स्त्रीत्व गमावणार नाहीत. वर उल्लेखलेली कामे हे त्यांच्या आत्म्याच्या मुक्ततेसाठी आनंदाचे साधन ठरेल.

आत्मिक उन्नतीसारख्या श्रेष्ठ लाभाचा विचार न करता स्त्रियांसाठी लोभापोटी नोकरीस जाण्यापेक्षा आणि आपले स्त्रीत्व गमावण्यापेक्षा हे निश्चितच अधिक चांगले आहे. हे स्त्रीच्या स्वभावाशी सुसंगत आहे. स्त्री चार भिंतींच्या आत घरात जखडली जाते या सबबीखाली नोकरीस जाणे हे अनेक समस्या आणि वाईट गोष्टींचे कारण आहे. जरी स्त्रीच्या स्वातंत्र्याविषयी बोलले जात असले तरी आपल्याला प्रत्यक्ष काय दिसते? त्यांना अनेक लोकांच्या हाताखाली काम करावे लागते आणि त्यापैकी अनेकांना त्यांना जबाबदार असावे लागते. अशा जीवनात शांती असते काय? ज्या स्वातंत्र्याविषयी एवढे बोलले जाते त्यात

घरगुती जीवनाचे वरदान आहे का? नोकरी करणाऱ्या स्त्रिया आरामात स्वयंपाक करू शकतात का? शांततेत जेवू शकतात का? आणि मुलांची ऊब आणि जिव्हाळा अनुभवू शकतात का?



अशा बोलण्याने कोणता हेतू साध्य होतो? प्रत्येक मनुष्य स्वतःच्या स्वार्थाचा विचार करतो आणि इतरांची फार थोडी चिंता करतो. लोक त्यांच्यामुळे इतरांना त्रास होतो हे पाहत नाहीत. इतरांसाठी भावना नसतात, न्यायाची जाणीव नसते. जेव्हा काही कुटुंबात एकालाही नोकरी नसते त्यामुळे आवक नसते. तेव्हा काही कुटुंबांत दोघेही, पती आणि पत्नी नोकरी करीत असल्याने दुहेरी उत्पन्न असते. ही दुःखद स्थिती आहे. जर स्त्रियांनी विवाहानंतर नोकरी न करण्याचे ठरविले तर अशा रिकाम्या झालेल्या जागा इतर बेकारांना मिळतील. ज्या कुटुंबाला उत्पन्नाचे साधन नाही त्यांना लाभ होईल. नोकरी करणाऱ्या स्त्रियांनी याचा विचार केला पाहिजे आणि जे पुरुष आणि स्त्रिया यांच्यात समानता आणण्याचा प्रयत्न करतात त्यांनी माझ्या निरीक्षणाच्यामागील तर्क विचारात घेतला पाहिजे.

हल्ली लोकांना समानतेचे तत्त्व कोठे लागू करायचे आणि कोठे नाही हे कळत नाही. प्रत्येक बाब किंवा जीवनाचा दृष्टिकोन यास स्वतःचे अस्तित्व असते. स्वतःचे असे गुणवैशिष्ट्य असते. विश्वातील जीवन असे विधिलिखित आहे. प्रत्येक गोष्टीत समानतेचा आग्रह, सर्व गोष्टी समान असल्या पाहिजेत असा आग्रह धरणे हे चुकीचे आहे. प्रत्येकजण त्याचे समाधान शोधतो आणि दुसऱ्याशी आपल्या स्वभावानुसार संबंध ठेवून, सामाजिक जीवनाला हातभार लावून सौख्य शोधतो. असे करण्याऐवजी मनाला वाटेल तशा समानतेचा पाठपुरावा करणे म्हणजे व्यक्तिगत पातळीवर सौख्य नाकारणेच नव्हे तर कौटुंबिक आणि सामाजिक जीवन धोक्यात टाकण्यासारखे आहे.

बालकांचे संगोपन करण्याचे काम निसर्गनेच स्त्रीवर सोपवलेले आहे. आपण कितीही समानतेसाठी लढा दिला तरी आपण हे जीवनाचे वास्तव बदलू शकत नाही. मुलांचे संगोपन करणे आणि गृहलक्ष्मी बनणे हा स्त्रियांचा नैसर्गिक धर्म आहे. तसे करण्यात त्या काही गमावत नाहीत, तसे न करण्याने त्या सरस ठरत नाहीत. अशा बाबतीत समानतेला काही अर्थ नाही.

-----

## प्रकरण - १४

# बोलण्यात काही अर्थ आहे?

विवाहासारखे संस्कार हे तिखट पदार्थात तूप घालून ते सौम्य करण्यासारखे आहे. नैसर्गिक वासना सौम्य करण्याचा हेतू ते साध्य करतात. मिरचीमुळे आपल्या आतड्यांची आग होऊ नये म्हणून आपण त्या पदार्थात तूप घालतो. गृहस्थाच्या जीवनाचा वैषयिक सुख आणि ऐहिक आनंद हे एक भाग आहेत. पण त्याच्यावर त्यांनी मात करू नये म्हणून त्यांना ठरावीक मर्यादेत ठेवले जाते. स्त्रीसाठी तिचे पवित्र जीवन आणि तिची पतीशी निष्ठा, तिचे घराचे संगोपन हे सर्व एक संस्कार होतो; जो तिच्या पतीवर सोपविलेल्या सर्व संस्कारांच्या समान आहे. आपण सर्वांनी ही वस्तुस्थिती जाणली पाहिजे.

आत्मिक कल्याण हे या राष्ट्राचे ध्येय आहे. आपण या ध्येयाशी प्रामाणिक राहावे म्हणून ईश्वराची प्रार्थना केली पाहिजे. आपण प्रार्थना करतो तसा आपला त्याच्या कृपेवर विश्वास असला पाहिजे. जर आपण विवाहाच्या आदर्शाबद्दल आणि स्त्रीत्वाबद्दल बोलत राहिलो तर एक दिवस आपल्याला प्रकाश दिसेल. आजची स्थिती पाहून असे वाटते की आपल्या लोकांना दुर्बल म्हणून बाजूला ढकलले जाईल. एक वेळ अशी येईल की त्यावेळेस त्यांनीच कसे संकट ओढवून घेतले हे लोकांना समजेल. जेव्हा त्यांना जागृती येईल तेव्हा त्यांना या त्यांच्या चमत्कारिक अवस्थेतून बाहेर येण्याचा मार्ग शोधण्याची गरज भासेल. म्हणून मी शास्त्राने दाखविलेल्या मार्गाविषयी बोलत राहतो.

''वर्णाश्रम, बालविवाह इ. विषयांवर बोलून आज कोणता हेतू साध्य होतो?'' हा प्रश्न सहज येतो. ''त्यातील तीन चतुर्थांश भाग गेलेला आहे. शासनाच्या नियमांनी आपल्या जीवनाचे अनेक दृष्टिकोन व्यापले गेले आहेत आणि हे शास्त्राच्या आज्ञांविरुद्ध आहेत.'' हे खरे आहे. आपले हात बांधले जातील असेच कायदे आहेत.

आपले 'धर्मनिरपेक्ष राष्ट्र' म्हटले जाते. म्हणजे आपल्याला असे सांगितले जाते की शासनाचा धार्मिक बाबींशी संबंध नाही. त्याचा पुढे अर्थ असा की शासन फक्त सामाजिक बाबींमध्ये दखल घेते, धार्मिक बाबतीत नव्हे. पण आपल्या धर्मात जीवनाचे सर्व वैयक्तिक आणि सामाजिक दृष्टिकोन एकत्र गुंफलेले आहेत. म्हणून शासनाने तयार केलेल्या सामाजिक जीवनावर नियंत्रण ठेवणाऱ्या कायद्यांचा प्रभाव आपल्या धर्मावरही पडतो. आपले राज्यकर्ते हे वास्तव जाणत नाहीत किंवा स्वीकारत नाही. काही बाबतीत ते धर्माच्या दृष्टिकोनांना मर्यादा घालतात आणि इतर सर्व बाबी सामाजिक असल्याचे त्यांना वाटते आणि त्या शासनाशी संबंधित आहेत.

सर्व धर्मांमध्ये त्यांच्या अनुयायांच्या सामाजिक जीवनाशी संबंध असलेली

गुणवैशिष्ट्ये असतात. शासन जसा हस्तक्षेप हिंदुत्वाच्या सामाजिक आधाराबाबत करते तसा सामाजिक जीवनाशी करते का? नाही. याचेच आम्हाला दुःख होते. जरी आमच्या राज्यकर्त्यांनी निधार्मिकतेची शपथ घेतली असली तरी ते तोच मापदंड सर्व धर्मांना लावत नाहीत. शासनाकडून त्यांच्या धर्मावर परिणाम करणारा ठराव आणला तर अल्पसंख्यांक त्याचा निषेध करण्यासाठी उभे ठाकतात. ''हे कुराणाच्या विरुद्ध आहे.'' असा त्यांचा आरडाओरडा वाढतो. किंवा परिणाम झालेले लोक ख्रिश्चन असतील तर : ''हे ख्रिश्चन तत्त्वांशी सुसंगत नाही.'' असे ते म्हणतात. अशा दबावाला शरण जाऊन अल्पसंख्याकांना मापदंडातून सूट देतात, अपवाद करतात.

निधार्मिकतेचा दावा करूनही शासन जे काही हिंदू परंपरेशी निगडित आहे ते हस्तक्षेप करण्यास योग्य समजते. हस्तक्षेप असलेल्या कलमांच्या निषेधासाठी अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी पुढे येतात. पण हिंदूंचे काय? जर एक-दोन हिंदू बोलले तर त्यांना प्रतिगामी किंवा सुधारणाविरोधी संबोधले जाते आणि शासन त्याच्या मापदंडासह पुढे जाते. कायदे त्यांना बाजूला सारतात. आपले राज्यकर्ते नेहमी सांगतात की, ''निधर्मी राज्य म्हणजे जे कोणत्याही धर्माशी संबंधित नाही, त्याचा अर्थ असा नाही की ते अशा धर्मांच्या विरुद्ध आहे आणि सर्व धर्मांचा विकास शासनाला मान्य आहे.'' पण प्रत्यक्षात आपल्याला काय दिसते? शासनाच्या कृती हिंदू धर्म सोडून कोणत्याही धर्माच्या विरुद्ध नाहीत. हिंदू धर्म ही कोणी वाली नसलेली जागा झालेली आहे.

देशात जे घडते आहे त्याची मला जाणीव असूनही मी पुन्हा पुन्हा शास्त्राच्याबाबत बोलतो याचे तुम्हाला आश्चर्य वाटत असेल. माझे उत्तर असे आहे की जी काही सद्यस्थिती असेल ती असो, भविष्यात काय घडेल ते आपण पाहू शकत नाही. अगोदरच्या पिढीत आपल्याला वाटले, डॉलर्स अमेरिकी भूमीत उगवतात आणि तेथील लोकांना कशाचीही ददात नसते. पण आजची तेथील स्थिती कशी आहे? आता आपल्याला माहीत झाले आहे की अमेरिकी लोकांना जाणवते तशी पोकळी, तशी उणीव अन्य कुणा लोकांना त्यांच्या जीवनात जाणवत नाही. भौतिक जीवनातील उंचीवर पोहोचल्यावर सौख्याच्या पाठपुराव्याने त्यांच्या जीवनात पोकळी, आत्म्याचे रिकामपण आल्याचे त्यांना भान आले. ते जाणतात की डॉलरच्या समुद्रात तरंगत असता ते मद्यपान, लुटालूट, खून आणि वेश्याव्यवसाय अशा वाईट गोष्टींकडे ओढले गेले. आता त्यांना मानसिक शांतता नसल्याने, आपला योग, आपले तत्त्वज्ञान आणि आपले दिव्य संगीत यांत शांती शोधत ते मोठ्या प्रमाणावर आपल्या देशात येतात.

यावरून आपल्या लक्षात येते की दोन-तीन पिढ्यांपूर्वी जे चांगले वाटत होते ते आता वाईट दिसते. जेव्हा लोक हे जाणतात तेव्हा ते मुक्तीच्या शोधात जातात. चांगला हेतू असू द्या, शासनाने, चांगले आहेत असे मानून शास्त्राच्या विरुद्ध मापदंड मंजूर केले. पण भविष्यकाळात

एखादे दिवशी ते जाचक असल्याचे लोकांना जाणवेल. आजही काही ठिकाणी लोकांना तशी जाणीव झाली असल्याचे लक्षणे दिसतात. अशी एक म्हण आहे : ''प्रथम दिसला साधाभोळा, नंतर कळल्या खऱ्या कळा'' शासनाने शास्त्राच्या विरुद्ध केलेल्या काही सुधारणांच्याबाबतही असेच म्हणता येऊ शकेल. आता त्या चांगल्या वाटतात पण पुढे आपणास कळून येईल की त्या समाजाला निराशाजनक स्थितीकडे नेताहेत. गीतेत भगवान दोन प्रकारच्या सौख्याचा उल्लेख करतात.

''यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्। तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्।।
विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम्। परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्।।''
-भगवद्गीता अ.१८, श्लो. ३७, ३८

येथे पहिल्या प्रकाराचे वर्णन आले आहे. हा प्रकार प्रथम विष नंतर शेवटी अमृतासारखा आहे. हा सात्त्विक, समुद्रमंथनातील हलाहल या भयंकर विषासारखा प्रथम येतो आणि नंतर अमृत येते. शास्त्रे प्रथम विषासारखे कडू लागतील कारण ते व्यक्तींवर, कुटुंबावर आणि समाजावर शिस्त लादतात पण कालांतराने ते गोड वाटेल. आता सर्व बंधने, शृंखला तुटतील. अतुलनीय आत्म्याचे वरदान अनुभवास येईल. यात विष तात्कालिक चाखले जाते पण अमृत चिरकाल टिकणारे असेल.

''यद् तद् अग्रेऽमृतोपमम् परिणामे विषमिव'' यात दुसऱ्या प्रकारच्या सौख्याचा उल्लेख आहे. याप्रकारचे सौख्य प्रारंभी अमृतासारखे गोड लागले तरी कालांतराने ते विषासारखे कडवट होईल. अमेरिकेत प्रथम डॉलर अमृतासारखा गोड वाटला पण नंतर तो विषासारखा कडवट झाला. भारतातसुद्धा शास्त्राच्या विरुद्ध असलेल्या सुधारणा आता गोड वाटतात पण त्या भविष्यात विष ठरतील, व्यक्ती आणि समाज दोन्हींना समाधान आणि शिस्त यांच्या अभावी यातना सहन कराव्या लागतील. नंतर लोक अमृताचा शोध घेतील. त्यांना माहीत नको का की ते कोठे मिळू शकेल? पण तोपर्यंत विष त्यांच्या मस्तकात पोहोचले असेल आणि ते संकटात असतील. म्हणून त्यांना अमृत कोठे मिळेल हे सांगणे आमचे कर्तव्य आहे. त्यांच्यासाठी, भविष्यातील पिढ्यांसाठी आपण शास्त्रे जमिनीत खोल पुरून टाकण्याऐवजी सतत बोलत राहिले पाहिजे.

जरी आपण आज शास्त्राचे अमृत ग्रहण केले नाही तरी ते जपून ठेवणे आवश्यक आहे; पुढील पिढ्या डोक्यात विष गेल्याने आध्यात्मिकदृष्ट्या दुर्बल होतील-त्यांना हे अमृत साह्यकारक होईल. या शास्त्राच्या दीपाने कमीतकमी भविष्यकाळात योग्य मार्ग दाखविला पाहिजे. आता काही करता येणार नाही. कारण माझे हात बांधले गेले आहेत. पण मी तुमच्याशी अविरत बोलत राहिले पाहिजे. कारण अजून माझी मुस्कटदाबी झालेली नाही.

-----

## प्रकरण - १५

# विवाहातील खर्च आणि शास्त्रे

वधूच्या वयाच्या दृष्टीने जरी आपल्याला शास्त्रानुसार तिचा विवाह साजरा करता आला नाही तरी खर्चाबाबतच्या तत्त्वाशी आपण प्रामाणिक राहू शकणार नाही का? मी वारंवार स्पष्ट केले आहे की विवाहाचा कोणत्याही अर्थाने पैशाच्या प्रश्नाशी संबंध नाही. तरी आपल्याला सर्व बाबतीत शास्त्राप्रमाणे वागण्याची इच्छा नाही, तसेच धैर्यही नाही, आपण कमीतकमी विवाह हे आर्थिक प्रश्न होऊ नयेत असे पाहू या. अन्य शब्दात सांगायचे तर कमीतकमी, विवाह काटकसरीने करण्याबाबत तरी धार्मिक ग्रंथ अनुसरले पाहिजेत.

विवाह समारंभ हा संध्यावंदनासारखाच खर्च नसलेला विधी असतो. त्यावर किती खर्च करायचा? नवीन जोडप्याला नवीन कपडे (सुती चालतील), आणि त्यासोबत सोन्याच्या एका तुकड्याचे एक तिरुमांगल्यम् (मंगल सूत्र) भेट द्यायचे. फक्त थोड्या जवळच्या नातलगांना जेवण द्यायची गरज असते. मुहूर्ताच्यावेळेस मंगल वाद्ये वाजवली पाहिजेत. यासाठी फार थोडी रक्कम लागेल. इतर खर्च म्हणजे पुरोहिताला दक्षिणा देणे. हे सर्व शास्त्रानुसार आहे. अगदी कमी पगार असलेला कारकूनही आपल्या मुलीचा विवाह अशा पद्धतीने साधेपणाने करू शकतो.

जर श्रीमंत लोक विवाहांना उधळपट्टीचे किंवा दिखाऊ स्वरूप देतील तर जे श्रीमंत नाहीत अशा इतर लोकांपुढे चुकीचा आदर्श ठेवला जाईल. संगीत किंवा नृत्य किंवा विवाहाला चमकदारपणा आणणाऱ्या गोष्टींवरील खर्च होणारा पैसा गरिबांच्या विवाहावर खर्च केला पाहिजे. त्याचा अर्थ असा की त्या पैशाचे रूपांतर धार्मिक चलनात केले पाहिजे. प्रत्येक श्रीमंत माणसाला स्वतःच्या मुलीचा विवाह काटकसरीने करून, पैसे वाचवून, त्या पैशाने एका मुलीचा विवाह करून तिला सुखी करणे शक्य आहे. सामूहिक उपनयनासारखे सामूहिक विवाह आयोजित करता येऊ शकतील.

मंडपाचा किंवा हॉलचा खर्च विवाहाच्या एकूण खर्चाच्या निम्मा असतो. तुम्ही अगदी कमी खर्चात का होईना फ्लॅटमध्ये विवाह समारंभ करू शकत नाही. परोपकारी लोकांनी निरनिराळ्या भागांत, कमी ऐपत असलेल्या लोकांच्या मुलींच्या विवाहासाठी लहान मंडप बांधण्यासाठी एकत्र यावे.

एके काळी विवाह हा शब्द उच्चारताच मुली लाजत असत. नंतर असा काळ आला की विवाहाची वाट पाहणाऱ्या स्त्रिया त्यांचा विवाह होईल की नाही या शंकेने घरात जखडल्या गेल्या, दुःखी राहिल्या. आता गोष्टी अशा टप्प्यावर आल्या आहेत की स्त्रिया स्वतंत्र झाल्या आहेत, विवाहित नसतात, पुरुषांप्रमाणे उद्योगात किंवा कचेरीत काम करतात. आपल्या

संस्कृतीचा प्राणवायू असलेला स्त्रीधर्म दाबून टाकला जात आहे. घडू नयेत अशा घटना कुठे ना कुठे घडल्याच्या बातम्या आपण वाचतो.

सर्वात वाईट काय आहे तर या दुःखद घटनांसाठी कोणीही उपाय शोधण्याची चिंता करीत नाही. आणखी वाईट म्हणजे या घटनांचे मानसशास्त्राच्या दृष्टिकोनातून कसे तरी समर्थन करायचे. अनैच्छिक घटनांवर गोष्टी लिहिल्या जातात, त्यांच्यावर चित्रपट निर्माण होतात आणि भलत्या मार्गांना प्रोत्साहन दिले जाते. जर आपण असे प्रोत्साहन देणाऱ्या लोकांना विचारले तर ते उलटून, कल्पनेचे स्वातंत्र्य, कलेचे स्वातंत्र्य आणि असेच काहीतरी बोलतात. या प्रजासत्ताक युगात शास्त्राचा पाठपुरावा सोडून प्रत्येक गोष्टीला स्वातंत्र्य आहे.

धर्मग्रंथांनुसार विवाहात पैशाला स्थान नाही असे सांगण्यापासून मी आरंभ केला. विवाहखर्चाबाबत बोलताना विवाह चार दिवस चालतो (तो तसा साजरा करावा लागतो) आणि खर्च वाढतो, या तक्रारीचा मी विचार केला पाहिजे.

तुम्हाला भिकेला लावतील असे विधी करण्यास शास्त्र सांगत नाही. मुख्य विवाह यथाविधी करणे ही एक दिवसाची बाब आहे. वराने पुढील तीन दिवस स्वतःच्या घरात ब्रह्मचर्य पाळून घालविले पाहिजेत. या तीन दिवसांत कोणतेही संगीत, नलंगु अथवा कोणत्याही कार्यक्रमाची गरज नाही. ज्यांना विवाहात सुधारणा करावयाच्या आहेत त्यांनी या पद्धतीने बदल करण्याचा विचार अवश्य करावा.

वराच्या लोकांनी वधूच्या पालकांना सांगितलेच पाहिजे की, ''विवाहाचा मुख्य विधी तुमच्या घरात होईल. उरलेल्या तीन दिवसाचे कार्यक्रम आमच्या घरात तुम्हाला काही एक खर्च करावा न लागता होतील.'' विवाहाच्या दुसऱ्या दिवशी गृहस्थाने (नुकतेच विवाह झालेला) 'औपासनाग्नी' (ज्यात औपासन केले जाते तो पवित्र अग्नी) त्याच्या घरी आणलाच पाहिजे. हा अग्नी आणला जाताना, तो गाडीवर ठेवला जात असता, गाडीला बैल जोडताना मंत्र म्हणावयाचे असतात. हल्ली तुम्ही मोटार किंवा आगगाडीने जात असला तरी ते मंत्र म्हणू शकता. पूर्वी विवाह शेजारच्या, जवळच्या खेड्यातील कुटुंबात होत. म्हणून वधूच्या घरून वराच्या घरी पवित्र अग्नी आणणे सोपे होते.

चार दिवसांचा कार्यक्रम वेगळ्या पद्धतीनेसुद्धा करता येईल. ज्याठिकाणी विवाह होतो ते वराचे घर समजायचे. किंवा तीन दिवसांचे कार्यक्रम एखाद्या नातलगाच्या घरी करायचे. भोजनासाठी कोणालाही बोलावयाची गरज नाही, अगदी मुलीच्या कुटुंबालाही. (शास्त्रे विवाहविधी एक दिवसात पूर्ण होण्याला मान्यता देत नाहीत.) पुरोहिताला दक्षिणा द्यावी लागते हाच तो एक खर्च असतो.

शास्त्रानुसार, वराने विवाहाच्या दिवसापासून एक वर्षाची ''संवत्सर दीक्षा''चे पालन

केले पाहिजे; या महिन्यांमध्ये त्याने ब्रह्मचर्याचा सराव केला पाहिजे. त्यानंतरच विवाहाची पूर्णतः सांगता होते. आता असे व्यवहार बदलले आहेत. निकटच्या भूतकाळात वर जरी वर्षभर नव्हे तरी चार दिवस दीक्षा पालन करीत असे. आता प्रत्येक गोष्ट एक दिवसात होते. यावरून एका म्हणीची आठवण होईल : ''गाढव बारीक होऊन ते मुंगी झाले आणि मुंगी स्वतःच शेवटी हवेत नाहीशी झाली.''

आंध्रमधील लोक विवाहात हळदीच्या पाण्यात बुडविलेले सुती कपडे घालतात. कितीही सुस्थितीत असले तरी ते ही साधी प्रथा पाळतात. उत्तरेकडे स्त्रिया विवाहात साधे कपडे घालतात. आपण त्यांच्या प्रथा पाळायला हव्यात.

विवाहातील एक विधी ''(गृह) प्रवेश होम'' हा आहे; तो वर जेव्हा आपल्या घरी परततो तेव्हा केला जातो. त्याला विवाहातील औपासनाचा पवित्र अग्नी स्वतःबरोबर आणावा लागतो आणि त्याच्या घरी औपासन करावे लागते. सोयीसाठी आणि शास्त्राच्या संमतीने - तो विधी विवाहासाठी वराचे लोक जेथे उतरले असतील तेथे करायला परवानगी आहे. मंदिरात एका दिवसात विवाह पूर्ण करणे योग्य नाही. शास्त्राबद्दलच्या उदासीनतेमुळे जे श्रीमंत लोक क्लब, मंडळे आणि शर्यतीवर भरमसाठ खर्च करतात तेही याच प्रथेचे अनुकरण करतात. दुर्दैवाने गरीब त्यांचे उदाहरण पाळू लागण्याची शक्यता आहे. चार दिवसाच्या शास्त्रीय पद्धतीने विवाह करण्यात कोणत्याही जास्त खर्चाचा समावेश नसतो.

आजकाल विवाह कसे साजरे होतात? अगोदरच वधू वयात आलेली असते आणि विवाह एका दिवसात होतो. पुढील दिवशी वधूला तिच्या सासरी नेण्यात येते. आणखी एक अशास्त्रीय गोष्ट म्हणजे विवाहाच्या दिवशीच विवाहाचे सूप वाजवून विवाह संपविण्याची प्रथा होय.

वराने विवाहानंतर कमीतकमी तीन रात्री ब्रह्मचर्य पाळणे अपेक्षित आहे. ब्रह्मचर्याचे आठ प्रकार आहेत. जरी मनुष्य सर्वकाळ ब्रह्मचारी राहू शकला नाही तरी काही ठरावीक दिवशी त्याने वैषयिक बाबतीत पावित्र्य पाळले पाहिजे. विवाहानंतर किमान तीन रात्री त्याने ब्रह्मचर्य पाळले पाहिजे. हा नियमही पाळला जात नाही. अधिक वाईट गोष्ट म्हणजे ज्या दिवशी विवाह होतो त्याच दिवशी त्याची सांगता होते.

खर्च कमी करण्याच्या चिंतेने विवाहसंस्काराच्या संबंधित अनिष्ट प्रथा हल्ली जोडल्या गेल्या आहेत. जर एकाच दिवशी सर्व विधी केले गेले- पाहुण्यांना देण्याचे भोजन, संगीत इ. बाबतीतील खर्चात बचत होईल. अशा खर्चातील बचत सोडून आपल्या विवाहात मोठ्या प्रमाणात डामडौल असतो. अशा प्रकारे अंगावर ओढवून घेतलेल्या खर्चाची अडचण दूर करण्यासाठी पालक त्यांच्या मुलीच्या विवाहातच त्यांच्या मुलाचे उपनयन करतात.

वैदिक संस्कार करताना येणारे खर्च कमी करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. मित्र आणि नातलगांची यात चांगली मदत होईल. जरी त्यांना निमंत्रण दिले तरी त्यांनी विवाह किंवा उपनयनाला उपस्थित राहू नये. त्याऐवजी ते जे पैसे प्रवासावर खर्च होणारे पैसे वधूच्या (ब्रह्मचाऱ्याच्या) पित्याला भेट देऊ शकतील. जितके निमंत्रित कमी तितका त्यांच्या जेवणावरील खर्च कमी होईल.

-----

## प्रकरण - १६
# काटकसरीचे तीन मार्ग

मला वाटते विवाहखर्च तीन प्रकारे कमी करता येऊ शकेल. प्रथम, पुरुष आणि स्त्रियांनी रेशमी व इतर महाग वस्त्रांचा त्याग केला पाहिजे आणि साधी वस्त्रे वापरली पाहिजेत. दुसरे म्हणजे कॉफी सोडून दिली पाहिजे, त्याऐवजी कांजी किंवा ताक घेतले जावे. मी असे म्हणतो, कारण कॉफी ही सवय झाली आहे आणि ज्यांना कठीण वाटते त्यांनी काही पर्याय शोधला पाहिजे. वैद्यकीय शास्त्रानुसार ताक हे अमृतासारखे चांगले असते. खर्च ६० टक्के असा कमी होईल. जर तुम्ही भात आणि दूध आणि कॉफी यांवरचा खर्च पाहिला तर तुम्हाला आढळेल की तुम्ही भातापेक्षा इतर दोन वस्तूंवर जास्त पैसे खर्च करता. तिसरे म्हणजे तुम्ही हुंडा नाकारला पाहिजे. जर माझा सल्ला घ्याल तर डामडौल आणि निरर्थक गोष्टींना जागा राहणार नाही. त्याचवेळेस शारीरिक आरोग्याशिवाय, अंतर्गत प्रगती असेल. सर्वात महत्त्वाचे म्हणजे शास्त्रीय जीवन आणि परंपरांचे पुनरुज्जीवन होईल.

-----

## प्रकरण - १७

# विवाहाचे आदर्श

ब्रह्मचर्याश्रमाच्या काळात वेद-अध्ययन केले जात असे. नंतर ते शिकविलेले 'सिद्धान्त' आचरणात आणायचे म्हणजेच दुसऱ्या शब्दांत, वेदात सांगितलेले विधी केले पाहिजेत. म्हणून ब्रह्मचर्याश्रमानंतर त्याला सहधर्मिणी घ्यावी लागते. ही सहधर्मिणी कधीही न दुरावणारी संपत्ती असते. ती केवळ त्याच्यासाठी स्वयंपाक करण्यासाठी नव्हे, केवळ ऐंद्रिय सुख देण्यासाठी नव्हे तर तिला 'धर्म-पत्नी' आणि 'यज्ञ-पत्नी' म्हटले जाते. धर्माचरणात तिला पतीबरोबर राहावे लागते आणि ती या धर्माचरणांत त्याचा प्रेरणास्रोत असते. धर्म-पत्नी या नात्याने तिला होमाच्या वेळेस पतीच्या शेजारी बसावे लागते, तिला, मानवाला उपकारक दिव्य शक्ती निर्माण करण्याचा हेतू असलेल्या सर्व विधींमध्ये साहाय्यक भूमिका घ्यावी लागते.

पत्नी पतीसाठी स्वयंपाक करते किंवा ती पतीसाठी वैषयिक सुखाचे स्थान असूनही ती विश्वाचे कल्याण साधते याची नोंद घेतली पाहिजे. कसे ते मी तुम्हाला सांगतो. ती फक्त पतीसाठी स्वयंपाक करते असे नाही. तिला रोज अतिथीला, आजाऱ्यांना, पक्षी आणि पशू यांना आणि इतर प्राण्यांना अन्न द्यावे लागते. अशा प्रकारे ती अतिथी धर्म आणि वैश्वदेव पाळते. मनुष्ययज्ञ आणि भूतयज्ञ म्हणजे तिच्या पोटी जन्मलेली मुले, तिने पतीला दिलेल्या वैषयिक सुखाचे फळ नव्हे तर वैदिक धर्म चिरस्थायी होण्यासाठी ती मुलांना जन्म देते. होय, मुलांचे संगोपन हाही भविष्यकाळातील धार्मिक जीवनाचा हेतू असतो. कोणत्याही इतर धर्मापुढे विवाहसंस्काराचे अशा प्रकारचे ध्येय नसते.

आपल्या धर्मात स्त्री-पुरुष नाते केवळ ऐहिक नसते. ते आत्मकल्याण तसेच मानवाचे कल्याण साधते. इतर धर्मांतही विवाह होतात, चर्चमध्ये परमेश्वराच्या साक्षीने होतात. पण त्यांचे विवाहाचे उद्दिष्ट आपल्यासारखे भव्य नाही. आपल्या धर्माचा विवाहाचा हेतू पतीचे अधिक शुद्धीकरण करणे व पत्नीला आपली समर्पणशील आणि आत्मसमर्पित सहचारिणी म्हणून पूर्णत्व प्रदान करणे हा आहे. असा उच्च हेतू इतर धर्मांमध्ये नसतो. अन्य देशांमध्ये स्त्री-पुरुष नाते हे कुटुंबसदृश किंवा सामाजिक कराराचे असते. आमच्या येथे मात्र ते आत्मिक संबंधाचे असते. आमच्या धर्मातले विवाहाने जोडले जाणे हे ऐहिक अस्तित्वाची बंधने तोडण्यासाठी व आत्मिक मुक्तीसाठी असते. त्यात घटस्फोटाला जागा नाही. त्याचा विचार करणे हेही पापमूलक आहे.

अशा उदात्त संस्कार असलेल्या विवाहाच्या तीन हेतूंबाबत, समारोप करताना अधिक स्पष्टतेसाठी असे म्हणता येईल की वेदाभ्यासानंतर पुरुषाचे स्त्रीचे मीलन हा पहिला हेतू. केवळ घरातील कामे करण्यासाठी नव्हे तर पतीला वैदिक आचरणात सहभाग देण्याची

सहधर्मचारिणीकडून अपेक्षा असते. दुसरे म्हणजे या जगात, उदात्त दृष्टिकोन आणि चारित्र्य असलेले, थोर वैदिक परंपरेचे वारस, सर्वांना सौख्यकारक होतील असे भावी नागरिक-अशी मुले जन्माला घालणे हे होय. तिसरे म्हणजे, ऐहिक जगातून मुक्त होण्यासाठी स्त्रीसाठी साधन निर्माण करणे. जो पुरुष आतून शुद्ध झालेला नाही त्याला त्याच्या कर्मात मदत करणे. असे करून स्त्री पतीशी समर्पण करून त्याच्यापेक्षाही मोठ्या प्रमाणात प्रगल्भता प्राप्त करते. चौथे म्हणजे, इतर तीन हेतूंपुढे इंद्रिय सुखाला गौणत्व देणे.

आपण पहिले तीन हेतू विसरलो आहोत. चौथा, वैषयिक सुख हा काय तो उरला आहे. शास्त्राने शिकविलेल्या विवाहाच्या आदर्शाबाबत लोक माझा सल्ला घेतील तर त्यांच्या आंतरिक प्रगतीसाठी एक मार्ग खुला होईल. चंद्रमौलिश्वर त्यांना आशीर्वाद देवो.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

**भाग - १९**

**गृहस्थाश्रम**

प्रकरण - १

# गृहस्थ, गृहिणी

तरुण पुरुषाने गुरुकुलवास संपविल्यानंतर आणि समावर्तन केल्यावर त्याला दोन जानवी वापरावी लागतात. प्रत्येक जानव्याला तीन पदर असतात. त्याने ब्रह्मचाऱ्याची लक्षणे असलेला दंड, मृगाजीन, पंचा यांचा त्याग केला पाहिजे - आणि पञ्चकच्छ आणि उत्तरीय परिधान केले पाहिजे. ब्रह्मचारी म्हणून त्याला पादत्राण वापरण्याची परवानगी नव्हती; चंदनाची उटी, कानातील बाळी आणि फुले यांनी तो स्वतःला नटवू शकत नसे. आता तो डोळ्यात काजळ घालू शकतो. स्वतःला नटवून आणि छत्री घेऊन आता त्याने राजाला किंवा राजप्रतिनिधीला भेटले पाहिजे. राजा याच्या ज्ञानाने आणि ब्रह्मचर्याच्या गुणवत्तेने प्रभावित झाला पाहिजे. आता त्याने (राजाला किंवा राज प्रतिनिधीकडून) त्याच्या विवाहासाठी पैसे आणि वस्तू मिळविल्या पाहिजेत, असे शास्त्र सांगते.

यातून एक मुद्दा उपस्थित होतो की विवाहाचा खर्च हा वर किंवा त्याच्या पालकांकडून केला गेला पाहिजे. दुसरा मुद्दा असा की ज्याने समावर्तन केले त्याने, जरी तो अविवाहित असला तरी दोन जानवी आणि पञ्चकच्छ धारण केले पाहिजे. एखाद्याची शक्ती किंवा सुप्त शक्तीचे जतन त्याच्या टोके शिवलेल्या किंवा घडी घातलेल्या किंवा खोचलेल्या वस्त्रांमुळे होते. मुस्लिम त्यांच्या वस्त्रांची टोके एकत्र शिवतात. द्विज नसलेले लोक - तमीळनाडू आणि केरळ यांच्याशिवाय - धोती किंवा वेष्टी खोचतात, पञ्चकच्छाचे तसे नाही. (हल्ली मला भेटायला लोक येतात तेव्हा ते विजारीत येतात. असे असल्याने दोन प्रकारच्या वस्त्रांच्या भेदाबद्दल बोलणे उपहासात्मक आणि अर्थहीन आहे.)

हल्ली गुरुकुलवास नसतो किंवा समावर्तन नसते किंवा गंगायात्रा नसते. पण विवाहात एक जादा 'परदेशी-क-कोलम' नावाची वधूच्या कुटुंबाकडून पैसे किंवा भेटवस्तू उकळण्याची एक बाब असते. वराला छत्री, पादत्राणे आणि चालतानाची काठी भेट दिली जाते. ज्या समारंभाला काशियात्रा म्हटले जाते, त्यात वर डोळ्यांत काजळ घालतो आणि सोन्याची साखळी परिधान करतो.

जे विवाह करीत नाहीत आणि नैष्ठिक (जन्मभर) ब्रह्मचारी राहतात ते, कोणत्याही आश्रमाशिवाय कोणीही क्षणभरही राहू शकत नाही, या नियमाला अपवाद असतात. म्हणजेच ब्रह्मचर्याश्रमानंतर सर्वांना गृहस्थ होण्याची तयारी करावी लागते.

ब्राह्मण तीन ऋणे घेऊन जन्मतो : तो ऋषींचा, देवांचा आणि पितरांचा ऋणी असतो. तो पहिले ऋण ब्रह्मचारी राहून वेदांचा अभ्यास करून फेडतो; दुसरे पत्नी स्वीकारून आणि होम करून आणि तिसरे एखादा पुत्र प्राप्त करून. म्हणून विवाहाशिवाय तो दुसरे आणि तिसरे

ऋण फेडू शकत नाही.

पितरांचे ऋण फेडणे हा प्रमुख हेतू मुले प्राप्त करण्याचा असतो. श्राद्ध करणे पुरेसे नाही. पितरांच्या तीन पिढ्यांना गती मिळावयाची असते. म्हणून जरी एखादा मनुष्य मरण पावला तरी दोन पिढ्या त्याला नैवेद्य दाखविला जातो. म्हणून मुलाचा जन्म महत्त्वाचा मानला जातो. (नैष्ठिक ब्रह्मचारी आणि संन्यासी यांच्याबाबतीत भिन्नता आहे. अंतरंगातील शुद्धता आणि तेज यामुळे श्राद्ध न करता, दोन पिढ्याच नव्हे तर एकवीस पिढ्यांचा उद्धार होतो.)

पाणिग्रहण (वर वधूचा हात स्वतःच्या हातात घेतो), मांगल्य-धारण, सप्तपदी (विवाहातील जोडी पवित्र अग्नीभोवती सात फेरे घेणे) हे विवाहसमारंभातील महत्त्वाचे विधी आहेत. मांगल्य-धारण हा वैदिक विधी आहे का याबाबत दुमत आहे. मांगल्य-धारण ही हजारो वर्षांची परंपरा आहे आणि ती विवाह संस्कारातील आवश्यक भाग आहे.

मी पूर्वी म्हटल्याप्रमाणे ब्रह्मचर्याश्रमानंतर तरुणाने धर्मपालन करण्यासाठी पत्नीचा स्वीकार केला पाहिजे. आतून शुद्ध होण्यासाठी तिने त्याला समर्पण केले पाहिजे. जीवनातील सुसंगती आणि सद्‌गुणी संततीची निर्मिती हे विवाहाचे हेतू असतात.

गृहस्थाश्रमाला इल्लरं असे तमीळमध्ये म्हणतात आणि त्याची तमीळ देशातील सुज्ञांकडून स्तुती केली जाते. 'गृह' म्हणजे 'घर'. जो तरुण गुरूच्या घरून परत येतो आणि धर्माचरण करतो तो 'गृहस्थ' होय. जो घरात-गृहात राहतो तो 'गृहस्थ'. तमीळपत्नी आपल्या पतीला 'अहमुडयान', 'अहत्तुकारन', 'वीट्टडक्कारन' म्हणते : या शब्दांचा घराशी संबंध असतो. फक्त पत्नीच तिच्या पतीचा असा उल्लेख करू शकते, इतर नाही. तिला स्वतःला गृहिणी म्हटले जाते, गृहस्थ नव्हे. गृहस्थ याचा, जो घरात राहतो यापेक्षा वेगळा अर्थ नाही. पण गृहिणी म्हणजे घर तिचे आहे, ती घराची व्यवस्था पाहते. पती तमीळमध्ये इल्लरत्तान असतो आणि त्याचा अर्थ जो धार्मिक कृत्ये करतो तो, 'इल्-अरत्तान'. इल् म्हणजे घर आणि अरट्टन्पासून आलेला अरम् या शब्दाचा अर्थ धर्म आहे. पत्नी ही 'इल्लाळ' असते म्हणजे जी घराची मालकीण असते.

पतीला 'इल्लान' म्हटले जात नाही. (इल्लानचा अर्थ ज्याच्याजवळ काही नाही किंवा जो दरिद्री आहे.) पत्नीला इल्लतरशी (घराची राणी) म्हटले जाते, 'मनैवि' (घराची मालकीण) किंवा 'मनैयाल' म्हटले जाते; पण पतीला 'इल्लत्तरशन्' (घराचा राजा), मनैवन किंवा मनैयान (घराचा मालक) अशी नावे, संज्ञा नाहीत. तेलुगूत पत्नीला 'इल्लु' म्हटले जाते. (तमीळमधील इल्लाळ याच्याशी संबंधित.)

-----

## प्रकरण - २

# औपासन

पाणिग्रहण, मांगल्य-धारण, सप्तपदी आणि इतर विधी विवाहाच्यादिवशी केले जातात. विवाहाबरोबरच औपासन सुरू होते आणि एखादा संन्यासी होईपर्यंत किंवा त्याच्या मृत्यूपर्यंत ते केले जाते. विवाहाचा साक्षीदार असलेला अग्नी कायम जतन केला जातो आणि त्यात रोज औपासन केले जाते.

वैदिक धर्मात पवित्र अग्नी, होम याला महत्त्वाचे स्थान आहे. ब्रह्मचारी रोज दोनदा होमात समिधा अर्पण करून समिदाधान (पळसाच्या काड्या) करतो. हा विधी विवाहानंतर चालू ठेवला जात नाही. जेव्हा व्यक्ती गृहस्थ बनतो तेव्हा त्याला अनेक विधी होमात करावे लागतात. आता त्याला समिदाधानऐवजी औपासन असते. औपासन हा शब्द 'उपासना'पासून आलेला आहे. हा शब्द पूजा, मंत्र, पठण, चिंतन इ. अर्थाने वापरला जातो. पण वेदांनुसार होमात करायचा औपासन हा विधी सर्व हिंदूंकडून केला जातो.

जरी चौथ्या वर्णाचे सदस्य यज्ञोपवीत धारण करीत नसले तरी त्यांच्यासाठी विवाहसंस्कार आणि त्यासोबत औपासन आहे. शुद्रांनाही जातकर्म आणि नामकरण समारंभ करावा लागतो. याचे वैद्यनाथ-दीक्षितीयम्‌सारखी धर्मशास्त्रे वर्णन करतात. चतुर्थ वर्णाने पूजा कशी करावी, श्राद्ध आणि अपर-कर्म (उत्तरक्रिया) कशा कराव्या यासंबंधी हा ग्रंथ आहे. सुधारणावादी याकडे दुर्लक्ष करतात आणि चौथ्या वर्णाला काहीही धार्मिक विधी करायला नाहीत असा आरोप करतात. उलट त्यांनी या वर्णाच्या लोकांवर सोपविलेले विधी करण्याचा आग्रह धरला पाहिजे. औपासन हा एक या वर्णाचा विधी आहे आणि तो ठरावीक मंत्र-पठण करीत रोज करायचा असतो.

-----

## प्रकरण - ३

# नवीन ब्राह्मण जात निर्माण करता येईल का?

औपासन सर्व जातींनी करायचे ही स्थिती एक नवीन प्रश्न निर्माण करते : फक्त औपासन का? सर्व जाती वेदाध्ययन, गायत्री जप आणि होम का करू शकत नाहीत? एका बाजूला नास्तिक आहेत ज्यांना वेद जाळून टाकायचे आहेत आणि गणेशाच्या मूर्ती फोडून टाकायच्या आहेत आणि उलट स्वतःला सुधारणावादी म्हणविणारी माणसे आहेत, ज्यांना सर्वांपर्यंत वैदिक विधी न्यायचे आहेत.

ऱ्हास झाल्याबद्दल मी ब्राह्मणांना खडसावले नाही का? यातून सूचना घेऊन सुधारणावादी वाद करतात की : "शेवटी ब्राह्मणच हीन झाला आणि त्याने इतरांनाही हीन केले. आता वैदिक धर्मात नवीन चैतन्य आले आहे, तर जे ब्राह्मण त्यांच्या कर्तव्यात चुकले त्या फक्त ब्राह्मणांनाच ते करण्याचा का अधिकार द्यावा? ज्या जातींची, वेदांवर श्रद्धा आहे आणि मानवकल्याणासाठी वेदविधी आवश्यक आहेत असे ज्यांना वाटते त्यांना वेदाध्ययन आणि वैदिक विधी करू द्यावेत. त्या सर्वांना जानवे घालण्याचा आणि पवित्र ग्रंथांचा अभ्यास करण्याचा अधिकार आहे."

आर्य समाजासारख्या संघटनांनी वेदाध्ययन करण्याचा आणि यज्ञ करण्याचा हक्क मान्य केला आहे. इतरत्र एखादा सुब्रह्मण्य भारती किंवा तसा कोणी पञ्चमला ब्रह्मोपदेश देतो. सुधारणावादी वेद सर्वांना सामायिक का करीत नाही.

हे थोडेही स्वीकारार्ह नाही. मी शास्त्राचा प्रतिनिधी आणि प्रवक्ता आहे. माझे हे सांगण्याचे कर्तव्य आहे की ज्या ऋषींनी ही शास्त्रे तयार केली त्यांची अनुमती यासाठी (वेद सर्व जातींसाठी करणे) नाही आणि त्यांनी प्रत्येक जातीला विशेष कर्तव्य दिलेले आहे. ते ऋषी त्यांच्या त्यागाबद्दल आणि निष्पक्षपातीपणाबद्दल प्रसिद्ध होते आणि त्यांना मानवी कल्याणाखेरीज कशातही रस नव्हता.

माणूस दोन प्रकारे पाप करतो. तो त्याची वारशाने आलेली कर्मे सोडून देतो, हे तो एक प्रकारचे पाप करतो - अशा माणसाला कर्मभ्रष्ट म्हटले जाते. पण जर त्याने स्वतःचे कर्म सोडले आणि दुसऱ्याचे (म्हणजे दुसऱ्याच्या धर्माच्या रूढी आणि कर्तव्ये करू लागला) घेतले तर तो 'कर्मांतर-प्रविष्ट' होय. शास्त्रानुसार तो कर्म-भ्रष्टापेक्षा अधिक मोठा गुन्हेगार आहे.

का? दोन कारणे आहेत.

जो त्याच्या कर्माचा त्याग करतो आणि वर्णधर्म अर्थहीन आहे असे ज्याला वाटते त्याच्याबद्दल तो विश्वासाने वागतो, सदसद्‌विवेकबुद्धीची आज्ञा पाळतो असे म्हणता येईल.

त्याच्या कृतीत काही समर्थन आढळेल. पण शास्त्राबाबत सदसद्‌विवेकबुद्धीचा प्रश्न नाही. प्रश्न असा आहे की : जो दुसऱ्याच्या प्रथा आणि विधी स्वीकारतो त्याचे काय? तो तसे करतो. कारण त्याला वाटते की तो ज्या प्रथा आणि विधी असलेल्यात जन्मला त्या दुसऱ्याच्या इतक्या चांगल्या नाहीत. एक व्यवसाय किंवा एक प्रकारचे काम हे दुसऱ्यापेक्षा गौण आहे, सरस आहे हे समाजवादाच्या आधुनिक विचारांशी श्रमप्रतिष्ठेच्या तत्त्वाशी सुसंगत नाही. त्यावेळेस, हे प्राचीन शास्त्रानुसार नाही. वर्णधर्माचा त्याग करणाऱ्या कर्मभ्रष्टाचा असा विश्वास असतो की ऋषींनी काळानुरूप पद्धती निर्माण केली नाही. तरी त्याला ऋषी काही जातींबाबत पक्षपाती होते असे वाटत नाही. पण कर्म प्रविष्टाचे तसे नाही. त्याला ऋषी पक्षपाती होते असे वाटते. आत्मिक उन्नतीसाठी स्वतःच्या वारशाने आलेल्या व्यवसाय आणि धर्मापेक्षा दुसऱ्याचा धर्म अधिक चांगला असल्याचे मानून तो, तो धर्म निवडतो. त्याची कृती असे दर्शविते की ऋषींनी वर्णभेद निर्माण करून लबाडीचे आचरण केले. म्हणून त्याचा अपराध अधिक मोठा आहे.

हे खरे आहे की ब्राह्मण भरकटले आहेत. ब्राह्मणांचा नवीन वर्ग निर्माण करण्याचा अर्थ काय? त्याचा एकूण अर्थ असा, ''त्याने (ब्राह्मणाने) त्याचा धर्म त्यागला आहे. आता मी तो ताब्यात घेईन.'' दुसऱ्याचा स्वीकारणे हा गंभीर अपराध आहे, स्वतःच्या धर्माचा त्याग करण्यापेक्षाही अधिक वाईट आहे. मी पुन्हापुन्हा सांगितले आहे की स्वतःचा अहंकार नष्ट करणे हा एकच सर्व कर्माचा हेतू असतो. वर्णधर्माचा पाया कोणता? वारशाने आलेल्या व्यवसायाचे व धर्माचे, स्वतःच्या आवडीनिवडीचा विचार न करता स्वेच्छेने पालन करणे.

ईश्वराच्या इच्छेनुसार हा व्यवसाय व धर्म आपल्याला लाभला आहे या जाणिवेवर ही स्वेच्छा अवलंबून असते. ते वेदात आणि शास्त्रात प्रकट झालेले आहेत आणि त्यांचे आचरण करणे म्हणजे अहंकाराचा नाश करणे होय.

एक नवीन जात निर्माण करणे - नवीन ब्राह्मण निर्माण करणे म्हणजे काय? यामागे कितीही चांगला हेतू असो - वैदिक विधी केलेच पाहिजेत आणि वातावरणात वेदांचे स्वर असावेत अशी इच्छा असेल तर अहंकार त्यात, काजू फळाच्या पुढे कवच येते तसा अहंकार येईल.

याशिवाय तुम्ही किती समानता आणि बुद्धिवादावर बोललात तरी नवीन तयार झालेल्या ब्राह्मणांमध्ये गौणत्वाची भावना असेल. ते जन्माने ब्राह्मण असलेल्या लोकांसारखे या नवीन धर्माचे आचरण करू शकतील का अशा शंकांनी त्यांचा ऱ्हास होईल.

आर्य समाज आणि इतर सुधारणावादी यांनी त्यांच्या बाजूने जात नष्ट केली आणि प्रत्येकाला वेदाध्ययनाचा अधिकार दिला आहे. मग अब्राह्मणांनी मोठ्या प्रमाणावर या संघटनांमध्ये का भाग घेतला नाही किंवा वेदाध्ययन सुरू केले नाही? एक कारण म्हणजे कोणतीही नवीन गोष्ट स्वीकारण्यातील अनिश्चितता. दुसरी तितकीच महत्त्वाची आहे की

लोकांना वाटते नास्तिक होणे ही एक गोष्ट आहे. पण जुन्या वैदिक परंपरा बदलणे ही दुसरी गोष्ट आहे.

म्हणून जरी एक-दोन सुधारणावाद्यांनी वेदाध्ययन प्रत्येकासाठी मुक्त केले तरी, फक्त चार किंवा पाच टक्के लोक त्यात सहभागी होतील. उरलेले ९५ टक्के किंवा तितकेच हिंदू व्यवस्थेत राहतील. जे थोडे नवीन जातीत जातील त्यांच्या मनात भयाची जाणीव आणि गौणत्वाची भावना असेल. त्यांच्या कर्मामुळे योग्य परिणाम घडतील का, अशा शंका त्यांना येत राहतील. जर तसे असेल तर त्यांची मने कशी शुद्ध असतील? फक्त अहंकारच नव्हे तर भयही, गौणत्वाची भावना आणि शंकाही मन अशुद्ध करते. अशा मनाच्या स्थितीत केले गेलेले विधी जगात सौख्य निर्माण करू शकणार नाहीत. शिवाय, जन्माने ब्राह्मण असलेले करू शकत नसलेली कर्मे आपण करतो या विचाराने त्यांच्यात गर्व निर्माण होईल - त्यांच्या कृतीत आव्हान असेल. इतर जे करीत होते (किंवा अपेक्षित होते) ते आपण करतो या विचाराने त्यांच्यात त्याचे प्रदर्शन करण्याची इच्छा निर्माण होईल. मग त्यांच्या कृतीत तळमळ राहणार नाही. एकूण, त्यांना स्वतःला किंवा जगाला त्यांच्या कर्माचा लाभ होणार नाही.

आपण वास्तव जाणले पाहिजे आणि भावनेच्या आहारी जाता कामा नये. मी तुम्हाला वेदांच्या ध्वनी सामर्थ्याविषयी सांगितले नाही का? हा ध्वनी प्रत्येकाकडून योग्य पद्धतीने काढला जात नाही. मी जे म्हणतो ते केवळ वेदध्वनीला आणि वैदिक भाषेला लागू पडत नाही तर अन्य भाषा आणि त्यांच्या ध्वनींनाही लागू पडते. जर्मन किंवा उर्दूचे उदाहरण घ्या. या भाषांमधील काही शब्द जीभ वळविणारे आहेत. तेलुगू आपल्या शेजारी (आंध्रप्रदेश) बोलली जाते, पण तीमधील काही शब्द उच्चारणे आम्हांला अवघड जाते. समजा, एखादे जर्मन किंवा मुस्लीम किंवा तेलुगू मूल तमीळनाडूत जन्मले, त्यांना असे शब्द उच्चारणे सोपे जाईल - म्हणजे जर्मन, उर्दू किंवा तेलुगू जसे असेल तसे - कारण त्यांना ते सहजपणे येईल.

तुम्ही कितीही आवेशाने वारसा या घटकाचे अस्तित्व नाकारा, तुम्हाला सर्व क्षेत्रांत ते आढळेल. जे वेदांचे इतकी शतके रक्षणकर्ते होते, त्यांना-त्यांच्या परंपरेत दोन किंवा तीन पिढ्यांचा खंड पडला असला तरी, वेदांचे अध्ययन आणि पठण करणे सोपे जाईल. इतर जमातींबद्दल असे सांगता येणार नाही. जर चुकीचा उच्चार केला तर मंत्रांचा हेतू साध्य होणार नाही. वेदांचे अध्ययन करणाऱ्या लोकांचा हा नवीन वर्ग कितीही चांगल्या हेतूचा असो, त्यांचे प्रयत्न फलदायी होणार नाहीत.

आणखी एक मुद्दा. एका धर्मात जन्मलेला आणि वारशाने हजारो वर्षे त्याचे पालन करणारा आणि त्यायोगे ठरावीक गुण प्राप्त करणारा एक लोकांचा वर्ग आहे. जर त्या लोकांनी तो धर्म सोडला तर, जे नवीन आहेत त्यांच्याकडून जुन्यांची जागा घेणे, विशेषतः नवीन परिस्थितीत घेणे हे कसे अपेक्षिता?

देशात सध्या दोन दुर्दैवी प्रकारच्या स्थिती दिसतात. एक म्हणजे ब्राह्मण वेदाध्ययन आणि वैदिक विधी सोडून देत आहेत आणि दुसरे म्हणजे इतर जमातींना वैदिक धर्म आचरायचा आहे. यांच्यापैकी कोणती गोष्ट अधिक वाईट आहे हे सांगणे कठीण आहे. आपल्याला जन्मानुसार असलेले कर्तव्य पार न पाडणे हा अपराध आहे. पण, गीतेत भगवान सांगतात त्याप्रमाणे दुसऱ्याचे कर्तव्य स्वीकारणे हा अधिक मोठा गुन्हा आहे.

''स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः'' दुसऱ्याचे कर्तव्य घेण्यापेक्षा आपल्या कर्तव्याच्या सीमेत मरण पत्करणे अधिक श्रेयस्कर आहे. दुसऱ्यांचे धर्म संकटमय आणि भयावह असतील. मृत्यू निश्चितच आहे, जर आपण आपलाच असलेला धर्म योग्य रीतीने पाळला तर आपल्याला पुनर्जन्म नसेल. दुसऱ्याचा धर्म भयावह आहे असे सांगण्याचा अर्थ काय? जर माणसाने दुसऱ्याच्या धर्माचे पालन केले तर त्याला नरकात टाकले जाईल. समजा, एखाद्या माणसाचा नरक या स्थानावर विश्वास नाही तर आपण असे समजू शकतो की त्याला या किंवा पुढील जन्मात नरकमय यातना सहन कराव्या लागतील. तो नास्तिक नसल्याने, दुसऱ्याच्या धर्माचे आपण पालन करतो आहोत हे पाप करीत आहोत या भीतीने तो ग्रासला जाईल. तो अश्रद्ध असेल तर त्याचा वेद आणि शास्त्र यांवर विश्वास नसेल तर तो प्रथम ब्राह्मणाचा व्यवसाय पत्करणारच नाही. म्हणजे ज्याची वेदांवर श्रद्धा आहे तो चिंतेने अपमानास्पद होईल : ''शास्त्रे सांगतात की वेदध्वनी जगाचे कल्याण करतील. तीच शास्त्रे असे सांगत नाहीत का की, दुसऱ्याचा धर्म हा भयावह असतो.''

मी सुधारणावाद्यांवर रागावलेलो नाही, त्यांच्या हेतूंविषयी मला शंका नाही. ते चुकतात. कारण त्यांचे अज्ञान किंवा त्यांचा अविचारीपणा. दुसऱ्या बाजूला जाण्यासाठी ते कुंपणच तोडतील तर त्यांनी जे याच बाजूला राहून चालतील अशा शक्यतेचा विचार केला पाहिजे.

जर लोकांना खरेच असे वाटले की त्यांचा सध्याचा व्यवसाय वैदिक धर्माच्या आचरणाप्रमाणे सन्माननीय आहे तर त्यांच्या स्वतःच्या व्यवसायापेक्षा अन्य स्वीकारणार नाहीत. ''ब्राह्मणांनी वेदांचा त्याग केला म्हणून जग कल्याणासाठी आवश्यक असलेल्या वेदध्वनींनी भरून गेले नाही. ही पोकळी भरून काढण्यासाठी नवीन ब्राह्मण वर्ग निर्माण केला पाहिजे.'' ज्यांना वैदिक धर्माचे पालन करण्याच्या परंपरेने बांधलेल्या ब्राह्मणांची जागा घ्यायची असेल त्यांना गर्वाची भावना असेल, आवाहनाची चेतना नसेल आणि गौणत्वाची जाणीव असेल. जर खरोखरच तुमचे वेदांच्या पुनरुज्जीवनासाठी काम करण्याचे ध्येय असेल तर जे परंपरेने त्या धर्माचे असल्याने वैदिक वारसा जतन करण्यात गर्क होते अशांना पुन्हा धर्माकडे वळविण्यासाठी तुम्ही प्रयत्नशील असले पाहिजेत.

धर्मापासून भरकटले म्हणून मी ब्राह्मणांवर टीका केली असली तरी ती त्यांच्यात

सुधारणा होणार नाही असे मला वाटते म्हणून नव्हे किंवा मी माझी जबाबदारी झटकून टाकतो म्हणून नव्हे. आजच्या या दोषाचे एकमेव कारण ब्राह्मण जात असे मला वाटते म्हणून नव्हे. जरी मी त्यांना, इस्लामिक आणि ब्रिटिश राजवटीत त्यांनी धर्म सोडून दिला आणि आजकाल आधुनिक संस्कृतीच्या भपक्याने त्यांना भुरळ पडली म्हणून तंबी देत असलो तरी त्यांना प्रत्येक गोष्टीसाठी संपूर्ण जबाबदार धरता येणार नाही. आजच्या स्थितीत ठेवले तर कोणत्याही जातीने किंवा वर्गाने असेच वर्तन केले असते. ज्यांना आता अपराधी वाटते त्यांना, ते जर त्यांच्या जागी असते तर ते अधिक चांगल्याप्रकारे स्वतःचे निर्दोषत्व सिद्ध करू शकतील. पण त्यांनाही परिस्थितीच्या रेट्याने त्याच चुका करायला भाग पाडले आहे. परंपरेने बौद्धिक चिकित्सेत गर्क असलेले लोक आत्मिक बाबींमध्ये त्यांची मने लावण्यात अयशस्वी होतात आणि त्याऐवजी ते ऐहिक बाबींमध्ये व्यस्त होतात, म्हणजे घसरगुंडीच.

मी अशा वर्तनाचे किंवा आध्यात्मिक उंचीवरून ऐहिक गोष्टीकडे उतरण्याचे समर्थन करीत नाही. हल्ली सुधारणावादी वेश्याव्यवसायाचेही मानसशास्त्राच्या आधारे समर्थन करतात. तसे ब्राह्मणांच्या ऱ्हासासही मानसशास्त्रीय समर्थन असल्याचे मी निदर्शनास आणतो. मी ब्राह्मणांवर टीका करतो त्याचा अर्थ असा नाही की फक्त ब्राह्मणच क्षुद्र आहेत असे मानून इतरांनी त्या हल्ल्यात सहभागी व्हावे. ब्राह्मणांना त्यांच्या जातीसाठी योग्य बनविण्याचे इतरांचे कर्तव्य आहे. शेवटी गेल्या चाळीस किंवा पन्नास वर्षांत ब्राह्मण सहज केल्या जाणाऱ्या हल्ले आणि हेटाळणीचे लक्ष्य झाले आहेत. किती शांतपणे त्यांनी हे सहन केले, तसेच निंदकांच्या हातून मानखंडना सहन केली. चार किंवा पाच पिढ्यांपूर्वी ब्राह्मण हे आपल्या आत्मिक संपदा आणि आपल्या सर्व कला यांचे राखणदार, पालक होते. याचा विचार करून, त्यांना त्यांच्या खऱ्या धर्माच्या आचरणाकडे वळविण्याचे इतरांचे काम नाही का? ते ज्या उच्च धर्माचे पूर्वी पालन करीत होते आणि ज्या त्यागासाठी ते प्रसिद्ध होते त्याचे स्मरण इतरांनी कौशल्याने त्यांना करून दिले पाहिजे.

भूतकाळात काही थोड्या अज्ञ ब्राह्मणांनी इतर जमातींना कठोरपणे वागविले असेल; हे संभवनीय आहे. आता त्यांच्या वारसदारांनी त्याची भरपाई करावी आणि त्यांची निंदा व्हावी आणि त्यांचा सूडाच्या भावनेने छळ व्हावा याला काही कारण नाही. हेही लक्षात ठेवले पाहिजे की "जुन्या अन्याय्य प्रथे"च्या विरुद्धच्या आणि समाजात इतर जातींना उच्च स्थान देण्याच्या लढाईत ब्राह्मणच पुढे होते. म्हणून द्वेषाची आग फैलावण्यात अर्थ नाही. किंवा असा द्वेष हा तमीळ संस्कृतीचा भाग आहे असे कोणीही म्हणू शकणार नाही.

दुर्दैवाने, ब्राह्मणांनी जे केले त्याचा परिणाम अशा भलत्याच समानतेत झाला, खालच्या स्तरातील लोकांना वर आणण्याऐवजी, वरच्या वर्गाला खाली आणण्यात झाला. समानता दोन प्रकारची असते : पहिलीत सर्व लोक समाजात उच्च स्थान व्यापतात, दुसरीत

सर्व खालचे स्थान व्यापतात. ओझे टेकडीवर नेणे अवघड असते पण खाली ढकलणे सोपे असते. समानता निर्माण करण्याच्या प्रयत्नात गुणवत्ता खालावली. प्रत्येकजण एकच काम करतो, अशी समानता अपेक्षित नाही. विविध व्यवसाय, विविध प्रकारची कामे, विविध समूहांत विभागलेली आहेत अशा समाजव्यवस्थेत समानता नसते असा विचार केला जाऊ नये. मी या विषयावर अगोदरच भरपूर बोललो आहे. विविधतेत एकता निर्माण करण्याचे आपले प्रयत्न असले पाहिजेत, एकसारखेपणा नव्हे.

हे लक्षात ठेवणे महत्त्वाचे आहे की ब्राह्मणांचा द्वेष आणि संस्कृतची नावड ही तमीळ संस्कृती आणि समाजरचना नाही. संस्कृत हा आत्म्याचे आणि धार्मिक शास्त्र, काव्य आणि कलाकृती यांचा साठा आहे. प्रत्येकाने ती 'आपली भाषा' म्हणून तिचा मान राखला पाहिजे. ब्राह्मण्य ही एक स्वतंत्र गोष्ट म्हणून तिच्या अस्तित्वाची दखल घेतली पाहिजे. वेदांच्या जतनासाठी आणि मानवाच्या कल्याणाचा हेतू असलेले यज्ञ करणे हे आवश्यक आहे. हल्ली वेद, उपनिषदे आणि इतर गोष्टी छापील स्वरूपात उपलब्ध आहेत. ते कोणीही वाचू शकतो आणि समजून घेऊ शकतो. पण प्रत्येकाने वेदपठण शिकण्याची गरज नाही; त्याला अनेक वर्षे लागतात. प्रत्येकाने यज्ञ करण्याची गरज नाही.

ज्यांना सुधारणा अमलात आणायच्या आहेत त्यांच्या ठिकाणी नम्रता असली पाहिजे आणि हेतू तळमळीचे असले पाहिजेत. मग शास्त्राच्या विरुद्ध जाण्याची गरज उद्‌भवणार नाही.

-----

## प्रकरण - ४

# औपासना आणि स्त्रिया

मी (मागील भाषणात) म्हणालो की सर्व जातींच्या लोकांनी औपासन केले पाहिजे. पती आणि पत्नीने एकत्र केले पाहिजे. जेव्हा पती बाहेर असतो तेव्हा पत्नीने पवित्र होमात अक्षता वाहून केले पाहिजे. वेदांनी स्वतःचा असा हक्क स्त्रियांना दिला आहे.

औपासन हा एकच वैदिक अधिकार स्त्रियांना करण्यासाठी आहे. अर्थात अनेक पौराणिक व्रते आणि पूजा आहेत की ती शास्त्रानुसार करू शकते, पण ते वेगळ्या गटातील आहेत. शिवाय तिच्या पतीच्या सर्व कर्मांत निसर्गतः तिचा सहभाग असतो. घरातील कामे सोडून तिला कोणताही विधी (औपासन सोडून) करावा लागत नाही. जरी तिने ते केले तरी त्याचे फळ मिळणार नाही. असा नियम वैदिक धर्मशास्त्रांनी घालून दिलेला आहे.

आपण लोक 'हक्का'विषयी बोलताना ऐकतो. स्त्रियांमध्ये त्यांच्या हक्काविषयी, औपासनाच्या हक्काविषयी जाणीव निर्माण करून द्यायची इच्छा आहे. स्त्रियांनी त्यांच्या हक्कासाठी लढले पाहिजे आणि पतीच्या मनावर औपासनाचे महत्त्व ठसविले पाहिजे. ''जरी तुम्ही ग्रंथात सांगितलेली कर्मे सोडली तरी, वैदिक धर्माशी तुमचे सूक्ष्म नाते टिकविण्यासाठी कमीतकमी गायत्री जप करा. जर हा जप केला नाही तर किंवा तो मंत्र विसरलात तर तुमच्या उपनयन संस्काराबद्दल विचार करता तुम्हाला पश्चात्ताप होईल.'' स्त्रिया त्यांच्या पतींना असे सांगू शकतील, ''माझे उपनयन झाले नाही, मला गायत्री म्हणण्याचा अधिकार नाही. आपल्या धर्माचेच नव्हे तर जगाचे उत्पत्तिस्थान असलेल्या, निर्मितीचे स्थान असलेल्या वेदांच्या अनुसार जो काही मला हक्क आहे तो औपासनाचा. जर तुम्ही ते करण्याचे नाकारले तर मला माझा वैदिक अधिकार नाकारला जाईल.'' अशा रीतीने स्त्रियांनी त्यांच्या पतींना औपासन करायला लावले पाहिजे. औपासन हे खरेच त्यांची मोठी वैदिक संपदा आहे.

स्त्रियांनी मनात औपासनाचे आणि अग्निहोत्राचे (औपासनासारखे अग्निहोत्र दिवसातून दोन वेळा केले पाहिजे.) महत्त्व ठेवले पाहिजे. 'घरात अनेक अग्नी असतात' त्यांनी स्वतःला सांगितले पाहिजे 'आपण अग्नीवर कॉफी करतो, अन्न शिजवितो किंवा स्नानासाठी पाणी तापवितो. औपासन न करून आपण आपल्या विवाहाचा साक्षीदार असलेल्या अग्नीला विझवून टाकल्यासारखे होईल.

पवित्र अग्नी, होम भाताचा भुसा वारंवार टाकत राहून प्रज्वलित ठेवला पाहिजे. घरात भात सडणे हे अनेकप्रकारे लाभदायक आहेत, भुशाशिवाय आपल्याला हाताने सडलेला पौष्टिक भात खाण्यास मिळेल. शिवाय भात सडणाऱ्या गरीब मजुरांना थोडीशी रोख रक्कम मिळेल किंवा त्याच्या किंवा तिच्या जगण्यासाठी ओंजळभर तांदूळ मिळतील. (होमात अखंड तांदूळ

टाकण्यासाठी गृहिणीने स्वतः भात सडला पाहिजे. हे काम मंत्राच्या साथीने करता येईल.)

औपासन करायला फार खर्च होत नाही किंवा फार वेळ लागत नाही. फक्त तुम्हाला ते करण्याची इच्छा हवी. हातसडीचा तांदूळ तुमच्या आरोग्यासाठी चांगला असतो. गिरणीतील चकाकी आणलेला तांदूळ चांगला नसतो. शिवाय हाताने सडण्यात गांधीतत्त्वाचा थोडा भाग आहे.

औपासनातील अग्नी वाईट गोष्टी, सर्व प्रकारचे क्लेश दूर ठेवेल. हल्ली अनेक ब्राह्मण कडूलिंबाच्या पानांनी इतरांकडून भूत, वाईट गोष्टी घालवून देण्याचे विधी करतात. ते मशिदीकडे साहाय्यासाठी जातात किंवा माझ्याकडे मदतीसाठी प्रार्थना करण्यास येतात. औपासन हा सर्व वाईट गोष्टींवरचा उपाय आहे आणि औपासनातील भस्म हे मोठे संरक्षण आहे.

-----

## प्रकरण - ५

# अग्नी आणि वैदिक धर्म

गृहस्थाला होमात करावयाचे अनेक विधी असतात. त्यातील औपासन हा पहिला विधी आहे. वैदिक धर्मात अग्नीला सर्वात जास्त महत्त्वाचे आहे. या देवतेला 'अग्नी-नारायण' म्हटले जाते. रुद्रामध्येही त्याचा अग्नी देवतेशी संबंध असल्याचे दर्शविले आहे. तिरुवण्णमलै (तमीळनाडूमधील) येथे ईश्वर हा अग्नीचा पर्वत या रूपात प्रकट झाला. केरळमध्ये अंबेचे (देवी माता) दिव्याच्या रूपात (दिव्याची ज्योत) पूजन करण्याची प्रथा आहे; मूर्ती किंवा यंत्र महत्त्वाचे नसते. देवीचा धावा दिव्यातच केला जातो. आपण शिवाच्या तिसऱ्या डोळ्यापासून मूर्तिमंत अग्नी म्हणून जन्मलेल्या सुब्रह्मण्याविषयी बोलतो. अशा प्रकारे अग्नी हा आपल्याला फार महत्त्वाचा आहे. संशोधकांच्या म्हणण्यानुसार आर्य या शब्दाचा अर्थ अग्नी-पूजक. वैदिक धर्माची शाखा असलेल्या झोरोस्ट्रिअन धर्माचे अग्नी-पूजन हे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

घरोघर पवित्र अग्नी तेवत राहिला पाहिजे आणि प्रकाशित राहिला पाहिजे. त्यात अर्पण केलेल्या तूप, दूध आणि इतर आहुती सुगंध निर्माण करतील की जो सर्वांना आरोग्य देईल आणि मानसिक उद्धार करेल.

मी अगोदरच सांगितले आहे की होमात कोणत्याही देवतेचा धावा करू द्या; आहुती पवित्र अग्नीतच द्यावी लागते.

-----

## प्रकरण - ६

# यज्ञ

वेदांमध्ये चारशे यज्ञांचा उल्लेख असल्याचे म्हटले जाते. यापैकी औपासन हा एकमेव सर्व वर्णांकडून केला जातो. जरी पहिल्या तीन वर्णांना सर्व यज्ञ करण्याचा अधिकार असला तरी, प्रत्यक्षात यज्ञ बहुतेक फक्त ब्राह्मण किंवा क्षत्रिय यांच्याकडूनच केले जातात. पण नंतर क्षत्रियांनीही ते करण्याकडे दुर्लक्ष केले. शारीरिक बल, युद्धात विजय आणि अशाच कारणांसाठी विशेषतः त्यांच्याकडून करायचे यज्ञ आहेत. राजसूय आणि अश्वमेध यांसारखे यज्ञ सम्राटाकडून केले जातात. शेतीचे चांगले उत्पादन, संपत्ती यासाठी वैश्यांना करायचे यज्ञ आहेत. पूर्वी उल्लेखल्याप्रमाणे यज्ञाचा यजमान एखादा क्षत्रिय असो वा एखादा वैश्य, परंतु चार पुरोहित ब्राह्मण असलेच पाहिजेत. (त्यापाठीमागे कल्पना अशी होती की जर या दोन जातींनी यज्ञात प्रत्यक्ष भाग घेतला तर, देशाचे संरक्षण आणि शेतीकडे लक्ष देण्याच्या कर्तव्याकडे त्यांचे दुर्लक्ष होईल.)

सर्वच यज्ञ ब्राह्मणांकडून करायची गरज नाही. त्यातील अनेक, एखादा हेतू साध्य करण्यासाठी आहेत. उदाहरणार्थ, तुम्ही पुत्र प्राप्तीसाठी करावयाच्या रामायणातील पुत्रकामेष्ठी यज्ञाविषयी ऐकले असेल.

इच्छापूर्तीसाठी असलेला कोणताही विधी 'काम्य-कर्म' असतो तो ऐच्छिक गटात येतो. तुमच्या स्वतःच्या आम्याच्या आणि विश्वाच्या कल्याणासाठी तुम्ही करायचे विधी सक्तीचे आहेत. ते 'नित्य-कर्म'मध्ये येतात. पण नित्यकर्म म्हणजे रोज करायचे नव्हेत.

नित्यकर्माच्या गटात २१ यज्ञ येतात. चारशे यज्ञांपैकी बाकीच्या यज्ञांबाबत सक्ती नाही. एकवीस मधील चाळीस संस्कार आयुष्यात कमीतकमी एकदा तरी करायचे आहेत. आपण पाहिले की - पाकयज्ञ, हविर्यज्ञ आणि सोमयज्ञ यात त्यांचे सातच्या गटांत विभाजन केलेले आहे.

अग्नीत आहुती देऊन विवाह केला जातो, नाही का? रोज करायच्या औपासन यज्ञाचा, या अग्नीतून आरंभ होतो आणि जीवनभर तो जतन केला जातो. सात पाकयज्ञ, उपनयन आणि श्राद्ध यांसारखे विधी औपासन होमात केले जातात. विवाहात पुत्र वडिलांच्या औपासन अग्नीपासून स्वतःचा अग्नी चेतवतो. वडिलांप्रमाणे पुत्राचाही अग्नी त्याच्या हयातभर जतन केला जातो. अशा प्रकारे कुटुंबात खंड न पडता, हा पवित्र अग्नी पिढ्यानुपिढ्या जतन केला जातो.

औपासन अग्नी वापरले जाणारे आणि जे व्यक्तिगत आणि कुटुंबाच्या संबंधित

असलेले सर्व विधी ते गृह्यकर्मात येतात. सात पाकयज्ञही याच गटात येतात. ते विशेषतः कुटुंबासाठी असतात आणि तपशिलात नसतात. तरी ते बाह्य जगाच्या भल्यासाठी उपयुक्त असतात. गृह्यसूत्रे अशा विधींचे वर्णन करतात. ते स्मृतीचे असतात आणि त्यांना 'स्मार्त-कर्मे' म्हटले जाते.

विशेषतः जगाच्या भल्यासाठी असलेल्या तपशीलवार असलेल्या कार्यांना 'श्रौत-कर्मे' म्हटले जाते. त्यांना तसे म्हटले जाते कारण त्यांची कृती थेट श्रुतींवर (वेदांवर) आधारलेली आहे. त्यांचे वर्णन करणारी शास्त्रे 'श्रौतसूत्रे' होत.

तुम्हाला आठवते का, मी तुम्हाला सांगितले, की स्मृतीपेक्षा श्रुती श्रेष्ठ किंवा श्रुतीपेक्षा स्मृती श्रेष्ठ असा प्रश्न नसतो. तसेच श्रौतसूत्रे किंवा गृह्यसूत्रे यांना समान महत्त्व आहे. हिंदुधर्म म्हटल्या जाणाऱ्या सनातन धर्मात आपल्या दोन डोळ्यांप्रमाणे या दोन्हींची जपणूक केली जाते.

औपासन अग्नीचे (विवाहात वराच्या पित्याच्या अग्नीपासून चेतविला गेलेला) 'अग्नियाधान' नावाच्या एका समारंभात दोनात विभाजन होते. एकाचे नाव 'गृह्याग्नी' किंवा 'स्मार्ताग्नी' : तो घरातील विधी करण्यासाठी असतो. दुसरा भाग श्रौताग्नी आणि तो श्रौत विधींसाठी असतो. हे दोन पवित्र अग्नी कायम जतन क़रायचे असतात.

गृह्याग्नीला औपासनाग्नी असेही म्हटले जाते. कारण दैनंदिन विधी त्यात केले जातात. हा एका कुंडात असतो म्हणून त्याला 'एकाग्नी' असेही म्हटले जाते. कुटुंबात करावयाच्या विधींचा समावेश आपस्तंब-सूत्राच्या 'एकाग्नीकांड' या प्रकरणात केलेला आहे. आतापावेतो मी उल्लेखलेले संस्कार आणि इतर विधी हे बहुतेक या ग्रंथानुसार आहेत. कारण, दक्षिणेतील बहुसंख्य ब्राह्मण हे आपस्तंब सूत्र अनुसरणारे कृष्ण-यजुर्वेदी आहेत. अल्पसंख्य असलेले ऋग्वेदी आणि सामवेदी अनुक्रमे आश्वलायन आणि गोभिला सूत्रे अनुसरतात. हे भेद घरी केल्या जाणाऱ्या विधींबाबत आहेत. भिन्नभिन्न वेदांनुसार श्रौत विधींमध्ये भेद नाहीत.

श्रौत विधींसाठी असलेला श्रौताग्नी तीन राशींवर तेवणाऱ्या तीन अग्नींच्या रूपात असतो. म्हणून त्याला त्रेताग्नी म्हटले जाते. आपस्तंब सूत्राच्या ज्या भागात विधी वर्णन केलेले आहेत त्याला 'त्रेताग्नी-काण्ड' म्हटले जाते. जो तीन अग्नींचे पूजन करतो त्याला त्रेताग्नी किंवा श्रौती म्हटले जाते आणि जर त्याने श्रौत आणि गृह्यअग्नींचे पूजन केले तर त्याला 'अहिताग्नी' म्हटले जाते. जो सोमयागासारखा तपशीलवार यज्ञ करतो त्याला 'यज्वा', 'दीक्षित' किंवा 'मखि' म्हटले जाते. जो वाजपेय यज्ञासारखा महान सोमयाग करतो त्याला 'वाजपेयी' म्हटले जाते. आहुतींना क्रतु, मख, इष्टि, स्तोम, संस्ता म्हटले जाते. त्यांच्यात थोडा भेद आहे. प्राचीन तमीळ ग्रंथांमध्ये 'मुट्टी' (त्रेताग्नी किंवा श्रौताग्नी) यांचे संदर्भ आहेत.

तीन पवित्र अग्नीपैकी एक त्रेताग्नी आहे. त्याला गार्हपत्य म्हटले जाते आणि तो कुटुंब

प्रमुखाचा असतो. तो वर्तुळाकार असलेल्या वेदीवर प्रज्वलित ठेवावा लागतो. त्यात सरळ, प्रत्यक्ष आहुती दिली जात नाही. त्यातून अग्नी घ्यायचा आणि पितरांच्या संबंधित आणि काही देवतांसाठी विधी करण्यासाठी दुसऱ्या वेदीवर न्यायचा. (हा नेहमीच्या श्राद्धापेक्षा वेगळा असतो आणि प्रत्येक प्रतिपदेला करायचा असतो.) ही वेदी दक्षिणेकडे असते आणि त्याला दक्षिणाग्नी म्हटले जाते; ती आकाराने अर्धवर्तुळाकार असते. देवतांना द्यायची आहुती सामान्यतः 'आहवनीय' नावाच्या तिसऱ्या अग्नीत केली जाते आणि तो अग्नीही गार्हपत्य अग्नीपासून चेतविला जातो. उत्तरेकडे कोणत्याही यागाला किंवा होमाला 'हवन' म्हटले जाते. तो शब्द आहवनीयपासून आलेला आहे. आहवनीय वेदी चौकोनी असते. सोमयज्ञ आणि इतर यज्ञांसारखे देवतांना प्रसन्न करण्यासाठी असलेले मोठे याग हे आहवनीय वेदीतून यागशाळा किंवा जेथे यज्ञ केला जातो अशा सभागृहात अग्नी नेला जातो.

जर औपासन गृह्यकर्म असेल तर अग्निहोत्र श्रौत विधी आहे आणि तो दिवसातून दोन वेळा करायचा असतो. पूर्वी उल्लेखलेला अग्नियाधान आणि अग्निहोत्र हे सात हविर्यज्ञापैकी पहिले दोन आहेत. जे अग्निहोत्र करतात त्यांना अग्निहोत्री म्हटले जाते. (हल्ली धूम्रपानाचा अग्निहोत्र आणि घोड्यांच्या शर्यतीला जाणे म्हणजे अश्वमेध असा उल्लेख होतो. अशा संदर्भांचा हेतू विनोदाचा असतो पण ते निंदा करण्यासारखे असते.)

जर अग्निहोत्राचा अग्नी काही कारणांमुळे शांत केला गेला असला तर तो पुन्हा आधान (म्हणजे ठेवणे), (अग्नियाधान) समारंभाने चेतवला गेला पाहिजे. तोच नियम औपासन अग्नीला लागू होतो. हल्ली बहुसंख्य घरांमध्ये औपासन किंवा अग्निहोत्रातील अग्नी प्रज्वलित होत नाही. मी येथे हे अग्नी पुन्हा कसे प्रज्वलित करता येतील याचा उल्लेख केला आहे. कारण तुमच्यापैकी बहुतेकांनी तुमच्या विवाहानंतर ते प्रज्वलित ठेवले नसले पाहिजेत.

औपासनात अखंड तांदूळ आणि अग्निहोत्रात दूध, तूप किंवा अखंड तांदूळ अर्पण केले जातात. (आता अग्निहोत्रात दूध अर्पण करणे ही रूढी बनली आहे.)

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे दक्षिणाग्नी आणि आवहनीयाग्नी हे गार्हपत्याग्नीतून केले जातात. पितरांसाठी केले जाणारे श्रौत विधी हे दक्षिणाग्नीत केले जातात आणि इतर आहवनीयाग्नीत केले जातात. या दोन अग्नींना श्रौताग्नी म्हणून स्तुती केली जात नाही आणि ते सामान्य अग्नीप्रमाणे असून शांत केले जातात. फक्त गार्हपत्य आणि औपासन अग्नी नित्य प्रज्वलित ठेवले जातात.

प्रत्येक प्रथमेला (चांद्र पक्षाचा पहिला दिवस), पाकयज्ञ आणि हविर्यज्ञ अनुक्रमे गृह्याग्नी आणि श्रौताग्नीमध्ये केले जातात. पहिल्याला स्थालिपाक म्हटले जाते. स्थाली म्हणजे ज्यात भात शिजविला जातो ते भांडे आणि ते औपासन अग्नीवर ठेवलेच पाहिजे आणि त्यात शिजविलेल्या चरू म्हटले जाणारे भात त्याच अग्नीत अर्पण करावा लागतो. अनेक विधींचा

पाया असलेल्या (आदर्श असलेला) विधीला प्रकृती म्हटले जाते. त्यानंतर केले जाणारे पण थोड्या बदलानिशी केले जाणाऱ्यांना विकृती समजले जाते. श्रावणी म्हटल्या जाणाऱ्या सर्पबळीला आणि आग्रहायणी म्हटल्या जाणाऱ्या पाकयज्ञाला स्थालिपाक ही प्रकृती होय.

प्रत्येक प्रथमेला केला जाणारा हविर्यज्ञ हा ''दर्श-पूर्ण-इष्टि'' होय; दर्श म्हणजे नवीन चंद्र आणि पूर्ण म्हणजे पूर्णचंद्र/पौर्णिमा. म्हणून नवीन चंद्र आणि पूर्ण चंद्राच्या दिवशी (दोन्ही प्रथमा) केल्या जाणाऱ्या इष्टि किंवा यज्ञांना दोन्ही मिळून एकच नाव, दर्श-पूर्ण-इष्टि दिले गेले आहे. दोन्ही विधींचा फक्त इष्टि म्हणून उल्लेख होतो. ही हविर्यज्ञांसाठी प्रकृती होय.

काही यज्ञांना अग्निष्टोम हा प्रकृती होय. स्तोम या शब्दाचा अर्थही यज्ञ आहे. 'अग्नि'च्या संयोगाने 'स्तो'चा ष्टो- 'अग्निष्टोम' होतो. 'स्थापित' चा इंग्रजीत एस्टॅब्लिश (establish) होतो; येथे पहिल्या शब्दातील स्त चा दुसऱ्यात ष्ट होतो. काही निरक्षर माणसे स्टार आणि स्टॅम्प यांचा उच्चार इस्टार आणि इष्टॅम्प असा करतात. असे उच्चारातील बदल वेदांमध्येही स्वीकारले जातात.

आता उरलेल्या पाक, हविर् आणि सोम यज्ञांविषयी थोडक्यात वर्णन करतो.

पाकयज्ञ हे कमी महत्त्वाचे यज्ञ असून ते घरात केले जातात. आधान, अग्निहोत्र, दर्श-पूर्ण-मास आणि आग्रयन यांसारखे पहिल्या चार हविर्यज्ञासारखे श्रौत विधीही घरात केले जातात. चातुर्मास, निरूधपशुबंध आणि श्रौतमणीसारखे शेवटचे तीन हविर्यज्ञ हे यागशालेत केले जातात.

यागशाळेला 'देवयजन' म्हणून समजले जाते. लहानसहान तपशिलांसह कल्पसूत्रांमध्ये त्याचे वर्णन आहे. चयन नावाच्या वेदी विटांनी बांधावयाच्या असतात. (हविर् आणि पाकयज्ञासाठी चयने नसतात.) मी पूर्वी सांगितले आहे की यात गणिताचा वापर असतो. अनेक प्रकारच्या पळ्या अग्नीत आहुती देताना वापरल्या जातात, तर्वि, स्रुक आणि स्रुव. त्यांची मापे आणि ती ज्याची बनविली जातात ते सर्व निश्चित केलेले असते. कोणताही तपशील वगळलेला नसतो. अणू आणि अवकाश संशोधनाच्या प्रयोगशाळेत महत्त्वाचे नसलेलेही काम काळजीपूर्वक केले जाते, तसेच जगात अमानवी शक्ती आणण्याचा उद्देश असलेल्या यज्ञाबाबत आहे.

पुनरावृत्ती करायची तर, पाकयज्ञ साधे असतात, पाक म्हणजे लहान मुलासारखे. शिजवलेले अन्न म्हणजेसुद्धा पाक; म्हणूनच अन्न शिजविण्याच्या कलेला 'पाकशास्त्र' म्हटले जाते, आणि जेथे अन्न शिजवले जाते त्या स्थानाला पाकशाळा म्हटले जाते. जसे स्थालिपाकमध्ये अग्नीत शिजवलेला भात अर्पण केला जातो तसे पाकयज्ञात शिजवलेली धान्ये अर्पण केली जातात. पाण्याचा भाग काढून टाकला जात नाही - या विधीला 'चरूहोम' म्हटले

जाते. पण औपासनात अखंड तांदूळ (न शिजवलेले) अर्पण केले जातात. अष्टक म्हटल्या जाणाऱ्या पाकयज्ञात दळलेल्या तांदळाच्या पिठापासून बनवलेला पुरोडाश अग्नीत अर्पण केला जातो. अष्टक पितरांसाठी केला जातो. शुक्ल पक्ष हा विशेषतः देवांसाठी असतो आणि कृष्ण पक्ष हा पितरांसाठी असतो. दुसऱ्याला अपर-पक्ष म्हटले जाते. कारण या पक्षात पितरांसाठीचे विधी केले जातात. कृष्णपक्षातील अष्टमी ही विशेषतः त्यांच्यासाठी महत्त्वाची असते. अष्टक श्राद्ध हे शिशिर आणि हेमंत ऋतूमध्ये (हिवाळ्याचा पहिला आणि दुसरा भाग) - तमीळ महिने मार्गाझी, तै, मासि आणि पंगुनि - त्या पक्षाच्या आठव्या दिवशी केले पाहिजे. मासि महिन्यात अष्टकाला विशेष पवित्र म्हटले जाते. अष्टकानंतरच्या दिवसाचा विधी अन्वष्टक असतो.

पाकयज्ञातील एक असलेला 'पर्वणी' हा श्राद्धांसाठी प्रकृती आहे. तो प्रत्येक महिन्यात केला जात असल्याने त्याला 'मासिश्राद्ध' म्हटले जाते. (आपस्तंब-सूत्रानुसार पर्वण हा शब्द प्रत्येक पर्वात करावयाच्या स्थालिपाकाचा निर्देश करतो.)

पाकयज्ञ असलेल्या 'श्रावणीला' सर्पबळी असेही म्हटले जाते. श्रावणाच्या पौर्णिमेला चरूचा भात आणि दूध अग्नीला अर्पण केले जाते आणि त्याचप्रमाणे पळसाची फुलेही दोन्ही हातांनी वाहिली जातात. वारुळावर किंवा इतरत्र तांदळाच्या पिठाने रांगोळ्या काढल्या जातात आणि मंत्रासह सर्पांना नैवेद्या दाखविला जातो. हा विधी प्रत्येक पौर्णिमेला मार्गझिपर्यंत केला पाहिजे. (डिसेंबर मध्यापासून ते जानेवारी मध्यापर्यंत).

मार्गझि पौर्णिमेला सर्पबळी पूर्ण करण्याव्यतिरिक्त आग्रहायणी नावाचा पाकयज्ञ केलाच पाहिजे. श्रावणीप्रमाणेच आग्रहायणी हे नाव त्याच नावाच्या महिन्यावरून आलेले आहे; आग्रहायणी हाच मार्गझि असतो. हयन म्हणजे वर्ष आणि वर्षाचा पहिला महिना आग्रहायण. प्राचीन काळी वर्षाचा आरंभ या महिन्यापासून होत असे. जानेवारीची पहिली तारीख (ग्रेगरियन दिनदर्शिकेची) मार्गझि महिन्याच्या मध्यावर येते. आपल्याकडूनच युरोपियनांनी त्यांच्या नवीन वर्षासाठी हे स्वीकारले. जरी नंतर आपण आपली दिनदर्शिका बदलली तरी ते त्यांच्या दिनदर्शिकेला चिकटून राहिले. चैत्री आणि आश्वयुजी नावाचे आणखी दोन पाकयज्ञ आहेत. ते त्यांची नावे सुचवितात त्याप्रमाणे चित्तिरै आणि ऐप्पशी महिन्यात येतात.

चैत्री हा यज्ञ जेथे चार रस्ते मिळतात तेथे केला जातो. तो ईशानासाठी केला जातो म्हणून त्याला ईशानबली म्हटले जाते. ईशान म्हणजे परमेश्वर (शिव). इतर पाकयज्ञांमध्ये करावयाच्या आराधना करावयाच्या देवता भिन्न असतात. परंतु त्यांच्याद्वारे परमेश्वर प्रसन्न होतो. हे उपजिल्हाधिकाऱ्याद्वारा राज्यकर्त्याला कर देण्यासारखे आहे. चैत्रीमध्ये ते जणू थेट राज्यकर्त्याला कर देण्यासारखे आहे.

ऐप्पशी, कुरुवा या महिन्यांमध्ये भात काढला जातो. (तमीळनाडूमध्ये) तो प्रथम आश्वयुजी या विधीद्वारे घरी नेण्यापूर्वी ईश्वराला अर्पण केला जातो. त्याचप्रमाणे मार्गझिमध्ये आग्रहायणी केल्यानंतरच तमिळनाडूत केली जाणारी (भाताची जात) संब भात खाल्ला जातो.

हविर्यज्ञ हे तपशीलवार आहेत. परंतु ते सोमयज्ञाइतके मोठे नाहीत. जे काही होमात अर्पण केले जाते त्याला हवि म्हटले जाते. तिरुक्कुरलसारख्या तमीळ ग्रंथांमध्ये त्याचा 'अवि' असा उल्लेख येतो. तथापि तुपाचा हवि म्हणून विशेष उल्लेख होतो. ज्या होमामध्ये सोमरस अर्पण केला जातो त्याला सोमयज्ञ म्हणतात आणि जे तपशीलवार नसतात त्यांना पाकयज्ञाच्या गटात टाकले जाते. आता चाळीस संस्कारातील इतर श्रौत होमांना हविर्यज्ञ म्हटले जाते.

मी पूर्वी यज्ञांविषयी बोललो, तेव्हा मी जे ते करतात त्यांचा उल्लेख केला. यज्ञ करणारा यजमान असतो आणि जे त्याच्यासाठी होम करतात ते ऋत्विक (पुरोहित) असतात, त्यांच्यात 'होता', 'अध्वर्यु', 'उद्गाता' आणि 'ब्रह्मा' यांचा समावेश असतो.

पाकयज्ञात ऋत्विक नसतात; यजमान त्याच्या पत्नीसमवेत विधी करतो. हविर्यज्ञात चार ऋत्विक असतात आणि यजमान असतात; पण उद्गाताची जागा अग्निधार घेतो. साम गायन करणारा जो असतो तो उद्गाता. फक्त सोमयज्ञामध्येच सामगान असते, हविर्यज्ञात नसते. चातुर्मास्य आणि पशुबंधात नेहमीपेक्षा जास्त पुरोहित संख्या असते. पण त्याचे वर्णन करण्याची ही जागा नाही. फार पूर्वीपासून आतापर्यंत करीत आलेल्या महत्त्वाच्या यज्ञांविषयी फक्त प्राथमिक ज्ञान मला तुम्हाला द्यायचे आहे.

आग्रहायण हा ऐप्पशीच्या पौर्णिमेला केला जातो. यात श्यामाक धान्ये अग्नीत अर्पण केली जातात. चातुर्मास्यात अनेक यज्ञ असतात. तुमच्यापैकी काहींना माहीत आहे की चातुर्मास्य हा शब्द पावसाळ्यात संन्यासी एकाच ठिकाणी राहतात त्याचा संदर्भ देतो. पण ते चार महिन्यांत एकदा गृहस्थाकडून केल्या जाणाऱ्या एका हविर्यज्ञाचे नाव आहे. - कर्त्तिगै, पंगुणी आदि. यानंतर यज्ञ यागशाळेत करायचे. (सार्वजनिक ठिकाणी बांधलेली).

निरूधपाशुबंध (पशुबंध) नावाचा हविर्यज्ञ हा पहिला यज्ञ आहे. ज्यात पशुबळी असतो - 'मृगबळी'. मी जरी बळी हा शब्द वापरला असला तरी, तंत्रदृष्ट्या बोलायचे तर - किंवा शास्त्रानुसार बोलायचे तर - तो बळी नसतो. बळी म्हणजे जे थेट अर्पण केले जाते ते - अग्नीत नाही. जे अग्नीत अर्पण केले जाते ती आहुति किंवा हवि. सापांसाठी वारुळात जे पीठ अर्पण केले जाते ते सर्पबळी. पंचमहायज्ञ म्हटल्या जाणाऱ्या यज्ञात वैश्वदेव म्हटला जाणारा विधी असतो. त्यात अग्नीत आहुती दिली जाते किंवा ते घरात किंवा घराबाहेर मंत्र म्हणत टाकले जाते. ते पृथ्वीवर विविध जीवांसाठी असतात आणि त्यांच्यासाठी बली हा शब्द आहे.

जेव्हा आपण एखाद्या देवतेला समंत्र आहुती देतो तेव्हा आपण 'स्वाहा' म्हटलेच

पाहिजे. जेव्हा आपण पितरांना देतो तेव्हा आपण 'स्वधा' म्हटलेच पाहिजे. विविध सजीवांना आहुत्या देताना 'हंता' हा शब्द आहे. येथे आपल्याकडे अधिकारानुसार श्रेण्या असतात : 'राजेसाहेब / Your majesty, आदरणीय / Your honour इ.



बळी द्यायच्या प्राण्याच्या शरीराचा कोणता भाग अग्नीत अर्पण करायचा हे ठरविणारे नियम आहेत. हा बळीसारखा नसतो. अग्नीत जे अर्पण करायचे ते होम. पशुबंधामध्ये फक्त एक प्राणी अर्पण केला जातो.

प्राणी असलेल्या यज्ञात यूप-स्तंभ किंवा बळी देण्यासाठी बांबू किंवा खदिराचा खांब असतो. त्याला त्या प्राण्याला साखळीने बांधलेले असते.

शेवटच्या 'सौत्रामणी' नावाच्या हविर्यज्ञात (विश्वकल्याणासाठी) काही गौण शक्ती किंवा देवतांना प्रसन्न करण्यासाठी मद्य अर्पण केले जाते. मद्यास कठोरपणे प्रतिबंध करणारे आपले शासन लाभाच्या विचाराने परकीयांचे आदरातिथ्य करण्यासाठी नियम शिथिल करते. याच आधारावर सौत्रामणीमध्ये मद्य अर्पण करणे समर्थनीय ठरविता येते. उच्च देवतांसाठीच्या यज्ञात ते कधीही अर्पण केले जात नाही. जे मद्य थोडे शिल्लक राहते - जे मंत्राने शुद्ध केलेले असते ते आहुती देणाराकडून ग्रहण केले जाते. ते पाव औंसापेक्षा कमी असते. यज्ञाच्या नावाखाली ब्राह्मण सोमरस किंवा मद्य मनसोक्त घेत असत हा आरोप अपमानकारक आहे. मी पूर्वी यज्ञात राहिलेल्या मांस ग्रहण करण्याबाबत पसरलेल्या खोट्या गोष्टींबद्दल बोललो आहे.

मी आता सोमयाग किंवा सोमसंस्ता यांचे थोडक्यात वर्णन करतो. संस्ता म्हणजे काय ? उद्गात्याकडून म्हटल्या जाणाऱ्या सामवेदी स्तोत्रांच्या समारोपाला संस्ता म्हटले जाते. देवतांच्या स्तुतीपर म्हटल्या जाणाऱ्या रचनांना सामान्यपणे स्तोत्रे म्हटले जाते. परंतु वैदिक परंपरेत ऋग्वेदातील स्तोत्रे शास्त्रे असतात. काही यज्ञांमध्ये सामवेदातील स्तोत्रे गाणे हे मुख्य वैशिष्ट्य असते. होम (अग्नीत आहुती देणे) हे पाकयज्ञ आणि हविर्यज्ञाचे आणि सोमयज्ञातस्तोत्रांचे गायन हे प्रमुख वैशिष्ट्य असते.

सोमयाग हे नाव, देवांना आवडणाऱ्या सोमवल्लीच्या अर्काची आहुती देण्यावरून आलेले आहे. याशिवाय प्राण्यांचाही बळी दिला जातो. साम गायनानेही स्वर्गीय भावना निर्माण होते. जेव्हा एखादा संगीतकार एखाद्या रागाचा विस्तार करतो आणि तार सप्तकातील पंचमाला स्पर्श करतो तेव्हा श्रोत्यांना आनंदाच्या उच्चस्तरावर नेले जाते. म्हणून सामवेदाच्या स्तोत्रांच्या गायनात संस्ताच्यावेळेस यज्ञासाठी जमलेल्या सर्वांना पृथ्वीवर स्वर्ग आल्यासारखे वाटते. सोमयज्ञ, सोमसंस्ता नावाने ओळखण्याचे हे एक कारण आहे.

अशा सोम यज्ञात पुरोहितांची पूर्ण संख्या असते - होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा. प्रत्येक पुरोहिताला आणखी तीन पुरोहित मदतीला असतात. असे एकूण सोमयज्ञात

सोळा पुरोहित असतात. सात सोमयज्ञांपैकी अग्निष्टोम हा पहिला असलेला प्रकृती आहे आणि इतर सहा विकृती आहेत. हे सहा; अत्यग्निष्टोम, षोडशी, वाजपेय, अतिरात्र आणि अप्तोर्याम.

वाजपेय हा विशेषतः महत्त्वाचा मानला जातो. जेव्हा यज्ञाच्या समारोपात यजमान अवभूथ स्नानाच्या विधीनंतर येतो, तेव्हा राजा स्वतः पांढरी छत्री त्यावर धरतो. 'वाज' म्हणजे भात (अन्न) आणि पेय म्हणजे पिण्यायोग्य. वाजपेय हे नावच सूचित करते की तो यज्ञ समृद्ध पिके आणि भरपूर पाणी आणतो. या यज्ञात सोम-रस होम, पशु-होम (२३ प्राणी) आणि अन्न किंवा वाज-होम यांचा समावेश आहे. बळी देणाऱ्याला शिल्लक राहिलेल्या तांदळाने स्नान घातले जाते. तांदूळ पाण्यासारखा ओतला जात असल्याने वाजपेय हा शब्द योग्यच आहे.

पूर्वीच्या काळी एखादा ब्राह्मण त्याची सर्व संपत्ती सोमयज्ञ करण्यात वापरत असे. बरीचशी संपत्ती पुरोहितांच्या दक्षिणेत खर्च होई आणि उरलेली यज्ञसामुग्रीसाठी खर्च होत असे. आता लोकांना फक्त त्यांच्या संपत्तीची काळजी वाटते आणि ज्याला काही खर्च पडत नाही अशी संध्यावंदनाही करीत नाहीत. चाळीस किंवा पन्नास वर्षांपूर्वी नंपुत्रिंमध्ये दहांपैकी किमान एक कुटुंब सोमयज्ञ करीत असे. कुटुंबातील सर्वात थोरला मुलगा जो नंपुत्रीमध्येच विवाह करीत असे तो यज्ञ करू शकत असल्याने त्याला संपत्तीचा अधिकार असे.

असाही एक काळ होता की अगदी गरीब ब्राह्मणही हा यज्ञ प्रत्येक वसंत ऋतूत (वसंते वसंते) भिक्षा मागून करीत असे. जो ब्राह्मण हा यज्ञ प्रत्येकवर्षी करीत असे त्याला 'प्रति-वसंत-सोमयाजी' म्हटले जात होते.

जरी किमान अग्निष्टोम किंवा ज्योतिष्टोम नावाचे सोमयज्ञ केले तरी या विश्वात वेदांचा उत्कर्ष होईल.

-----

प्रकरण - ७

# अन्य संस्कार

जरी चाळीस संस्कारांमध्ये समावेश केलेला नसला तरी काही ठरावीक विधी सर्व हिंदूंना समाईक आहेत. बाळाचे कान टोचायला हवेत (कर्णवेध). मुलाचा उजवा कान आणि मुलीचा डावा कान प्रथम टोचायचा. मुलाला अक्षरओळख करून देणे हा आणखी एक संस्कार आहे (अक्षराभ्यास). यालाच विद्यारंभ असेही म्हणतात.

चाळीस संस्कारांमध्ये दहन करणे याचा समावेश नाही. पण अगोदर दर्शविल्याप्रमाणे हाही यज्ञ आहे; शेवटचा, अन्त्येष्टी आणि तो त्याच्या मुलाने किंवा सर्वात जवळच्या नातलगाने समंत्र करायचा असतो.

अहिताग्नीचे दहन त्याने जतन केलेल्या पवित्र अग्नीने करायचे म्हणजे त्याच्या गृह्याग्नी आणि त्रेताग्नी यांना एकत्र आणून करायचे. ते चार अग्नी त्याचे शरीर संपवतील आणि त्याच्या आत्म्याला पवित्र जगात (स्वर्गात) नेतील. जर एखाद्या माणसाने त्रेताग्नी साधन केले नाही आणि फक्त औपासनाग्नी ठेवला तर त्याचे दहन त्याच अग्नीने करायचे.

अर्थात संन्याशासाठी दहन नाही.

दहन हा शेवटचा यज्ञ समजला जात असल्याने हा विधी, जो आतून प्रगल्भ आणि तेजस्वी झालेला, जो संन्यास घेतो तो सोडून, सर्वांसाठी आहे. जर संन्यास सर्वांना सक्तीचा असता तर शास्त्रात उल्लेखलेली दहनक्रिया, दहन असणार नाही.

-----

## प्रकरण - ८

# सहगमन

हल्ली जेव्हा लोक सती किंवा सहगमनाविषयी बोलतात तेव्हा त्यांना विधवेला बळजबरीने तिच्या पतीच्या चितेत फेकण्याची रूढी असे म्हणायचे असते. विधवेला बळजबरीने तिच्या पतीच्या चितेत ढकलण्याची कृती आपल्या देशाच्या एखाद्या भागात, भूतकाळात कधीतरी खरेच केली जात होती, हे आपल्याला ठाम माहिती नाही. काहीही असो, सतीची प्रथा व्यापक प्रमाणात कधीही पाळली जात नव्हती. फक्त आदर्श शुद्धता आणि भक्तिभाव असलेल्या; ज्यांना पतीच्या निधनानंतर जिवंत राहण्याची इच्छा नसे त्या सहगमन करीत. मी माझ्या लहानपणी अशा पतिव्रतांच्या कथा ऐकलेल्या आहेत. जेव्हा नातलग शोक करीत, ''तू तुला जिवंत जाळीत आहेस.'' तेव्हा ती विधवा उद्गारत असे, ''हा अग्नी मला जाळत नाही. मी माझ्या पतीच्या आलिंगनाच्या उबदारपणात मरत आहे.'' अशा उदात्त स्त्रिया त्यांच्या ओठावर स्मित ठेवून मरण स्वीकारीत.

जेव्हा हनुमानाने त्याच्या पेटलेल्या शेपटीने अशोकवनाला आग लावली, तेव्हा सीता तिच्या पातिव्रत्यामुळे दुखापत न होता राहिली. जेव्हा कुमारिल भट्ट भाताच्या भुशाच्या ढिगावर भाजून निघत होता, तेव्हा त्याला शंकराच्या सान्निध्यात थंड वाटत होते. बळी जाणाऱ्या स्त्रीला तिच्या श्रेष्ठ पतिभक्तीमुळे चिता ही चंदनाच्या उटीप्रमाणे शांत, थंड वाटत असे, असे दिसते की अशा स्त्रीची वस्त्रेही अग्नीत नष्ट होत नसत आणि ती भक्तिभावाने जपून ठेवण्यासाठी जळणाऱ्या शरीरापासून दूर केली जात.

आदर्श पतिव्रता तिच्या पतीच्या मृत्यूने मृत्यू पावते. कण्णगीच्या कथेत आपल्याला असे समर्पण आढळते. जेव्हा पांड्य राजा अपराधी भावनेने मरण पावत असे तेव्हा त्याची राणीही त्याच्याबरोबर मरण पत्करत असे. 'गीत गोविंद'चा कर्ता जयदेव याची पत्नी, पद्मावती हिच्याबाबतीत सांगितलेली कथा तशीच आहे. तिच्या पतीबाबतच्या समर्पणाची परीक्षा घेण्यासाठी राणी तिला तिचा पती प्रवासात होता तेव्हा मरण पावल्याचे सांगते. त्यावर पद्मावती मरण पावते. राणीला तिच्या स्वतःच्या अविचारीपणाचा पश्चात्ताप होतो. आणि असे म्हटले जाते की जयदेव कृष्णकृपेने तिला जिवंत करू शकतो.

फक्त पतीच्याबाबतीत खूप समर्पणवृत्ती असलेल्या स्त्रिया सहगमन करीत. तेव्हा त्यांना बळेच अग्नीत फेकले जात नसे आणि त्यांना असे अतिरेकी पाऊल उचलण्यापासून खरेच परावृत्त केले जात असे. जेव्हा पांडू मरण पावला तेव्हा त्याच्या दोन पत्नींपैकी एक, नकुल आणि सहदेवाची माता - माद्री, पतीच्या मृत्यूला आपण कारण असल्याने, प्रायश्चित्त घेण्यासाठी तिच्या पतीच्या चितेवर गेली. ज्या थोरांनी तिला या बलिदानाच्या कृतीला अनुमती

दिली, त्यांनीच दोन पत्नींपैकी दुसरी - कुंती हिला तसेच पाऊल उचलण्यास विरोध केला. ते तिला म्हणाले : ''थांब. अशी टोकाची कृती नको. माद्रीच्या मुलांना तुझ्या स्वतःच्या मुलांप्रमाणे वाढविणे तुझे कर्तव्य आहे.''

जेव्हा अप्परस्वामिगलचे पिता पुकझनार (तेव्हा त्याला त्या नावाने संबोधले जात नव्हते - तो त्यावेळेस मरुल निक्कियार होता.) मरण पावला तेव्हा त्याच्या पत्नीने, मादिनियारने तिच्या पतीच्या चितेवर बलिदान केले. ही कथा पेरियपुराणात सांगितलेली आहे. मादिनियारच्या मुलीचे पावित्र्य आणखी मोठे होते. तिचे नाव तिलकवती होते. ती तरुण आणि अविवाहित होती. तिच्या भावी पतीबाबतच्या समर्पणाने तिला अमर केले. तिचा पल्लव सैन्यात सेनापती असलेल्या कलिप्पकयारशी वाङ्निश्चय झाला होता. जेव्हा पुकझनार मरण पावला त्याचवेळेस युद्धात कलिप्पकयार मरण पावल्याचे कळाले. तरुण तिलकवतीने त्वरित आपल्या जीवनाचा शेवट करण्याचे ठरविले. ''जेव्हा वाङ्निश्चय झाला तेव्हाच मी त्याची पत्नी झाले. आता मी कोणाकडेही माझा पती म्हणून पाहणार नाही. तो आता गेल्याने मीही त्याच्या मागे मरण पत्करेन.'' नंतर अप्पर म्हणजे मरुल निक्कियार त्याच्या बहिणीला म्हणाला : ''मी माता-पिता आणि तुझ्याशिवाय काय करू? मी असा लहान मुलगा आहे. मीही तुझ्याबरोबर दुसऱ्या जगात येतो.'' तिलकवतीला तिचा विचार बदलणे आणि आपल्या धाकट्या भावाची काळजी घेणे याशिवाय आता दुसरा पर्याय नव्हता. (आपले नाव सार्थ ठरवीत ती स्त्रीत्वाचा अलंकार बनून राहिली.) नंतर तिच्या भावाने धर्मसेन या नवीन नावाने जैनधर्म स्वीकारला आणि तिने त्याला त्यापासून परावृत्त केले. ती खरेच त्याच्या संतकवी अप्परस्वामीगल म्हणून प्रसिद्ध होण्याला कारणीभूत झाली.

राजस्थानात, सहगमन करून इतिहासात स्थान मिळविलेल्या अनेक स्त्रिया होत्या.

मला ठामपणे सांगायचे आहे की एखाद्या विधवेला तिच्या पतीच्या चितेवर आरोहण करणे सक्तीचे नव्हते. ज्या स्त्रिया स्वेच्छेने सहगमन करीत त्यांना पूज्य मानले जाई आणि शास्त्राने त्यांच्या कृतीला पुष्टी दिली. जरी कायदा त्याला अनुमती देत नाही आणि तिचे नातलग असे पराकाष्ठेचे पाऊल टाकण्यापासून तिचे मन वळवत असले तरी आजही सती जाण्याच्या दुर्मिळ घटनेबाबत आपण ऐकतो. मला हे विशेषतः कौतुक करण्याजोगे वाटते. भूतकाळात पतीबरोबर अग्नीत प्रवेश करण्यासाठी परिस्थिती सोयीस्कर होती म्हणून इतरांनी भाग न पाडताही आणि उच्च जग, स्वर्ग प्राप्त करण्याच्या तीव्र इच्छा असल्याने एक-दोन विधवा स्वतः बलिदान करीत. परंतु आजकाल या कलियुगात आणि सुधारणेच्या युगात परिस्थिती अशा बलिदानाच्या कृत्याला सोयीस्कर, योग्य नाही. म्हणून असे असूनही एखाद्या स्त्रीने पतीबरोबर मरण पत्करायचे ठरविले तर ते निश्चितच तिचे त्याच्याबद्दल समर्पणापोटीच असले पाहिजे.

मी सातत्याने तुमच्यावर गुरुकुलवासाचे महत्त्व ठसविले आहे. सतीप्रमाणेच ही विस्मरणात गेलेली परंपरा आहे. आम्हाला हल्ली गुरुकुल चालविणे कठीण वाटते म्हणून जर एक-दोन मुले त्यांच्या गुरुगृही राहून अध्ययन करण्यास पुढे आले आणि भिक्षाचर्या पाळण्याची त्यांनी तयारी केली (त्याच्या अन्नासाठी भिक्षा मागणे) तर त्याचे उदाहरण, भूतकाळातील ब्रह्मचाऱ्यांपेक्षा अधिक स्तुत्य मानले पाहिजे.

संन्यासाप्रमाणेच सहगमन कधीही सक्तीचे नव्हते; ह्याचे एक महत्त्वाचे कारण मी तुम्हाला सांगतो. विधवेच्या आचरणाबाबत धर्मशास्त्रे विस्तृत वर्णन करतात. मी पूर्वी म्हणालो त्याप्रमाणे जर प्रत्येकाने संन्यासी व्हावे अशी अपेक्षा असती तर दहनविधी शास्त्रांच्या क्षेत्रात आणण्याची गरज नव्हती. त्याचप्रमाणे स्वतःच्या पतीच्या चितेत स्वतःला बलिदान करणे अपेक्षित असते तर विधवांच्यासाठी स्वतंत्र आचारसंहिता असण्याची गरज कोठे होती?

मृत्यूचा घाला केव्हा पडेल ते कोणीही सांगू शकत नाही. तो लहानपणी किंवा गृहस्थ असताना येऊ शकतो. म्हणून प्रत्येकजण संन्यासी व्हावे हे अपेक्षित नाही. जर शास्त्रांनी विधवेने मृत पतीबरोबर स्वतःचे दहन करून घ्यावे असा आग्रह धरला असता तर 'विधवा धर्माचा' निर्बंध घालण्याची गरज नव्हती.

## प्रकरण - ९

# संस्काराचे ध्येय

मी चाळीसपेक्षा अधिक संस्कारांचे वर्णन केले आहे. ब्राह्मणाकडून जीवनभर यज्ञ करण्याची अपेक्षा असते, त्यायोगे मानवाच्या कल्याणासाठी एक आहुती ठरणारे त्याचे जीवन असते. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या शरीराचे मंत्रासहित दहन केले जाते आणि हा विधीही जगाचे कल्याण करतो. जसे संस्कार माणसाला सुसंस्कृत करतात, शुद्ध करतात तसे त्यावेळेस म्हटले जाणारे मंत्र विश्वात सौम्य कंपने निर्माण करतात. जरी कर्त्याला त्याचे कर्म वैयक्तिक दिसत असले तरी ते संपूर्ण विश्वाचे कल्याण साधते. खरे पाहता, विश्वाचे कल्याण न करणारे कोणतेही कर्म असत नाही. सर्व विधी प्रार्थनेने सुरू होतात.

''जगत-हिताय कृष्णाय.'' जेव्हा आपण गायत्री म्हणतो, तेव्हा आपण असे म्हणत नाही, 'सूर्य माझी बुद्धी' वाढवो किंवा प्रेरणा देवो, तर 'आमची बुद्धी' म्हणतो. म्हणून गायत्री ही प्रार्थना सर्व सजीवांसाठी म्हटली जाते. (एकाच ब्राह्मणाने सर्वांच्या भल्यासाठी गायत्री जप केला तर पुरे होईल असे म्हणणे हे विकृत होईल - ''आमची'' या शब्दाचा असा अर्थ लावायचा नाही. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्यांनी त्यांच्या स्वतःसाठीच नव्हे तर सर्व जाती, पशु, पक्षी, कीटक, सर्व सजीवांसह सर्व प्राण्यांसाठी गायत्री म्हटली पाहिजे.)

तुम्ही पाहिले की संस्कारांचा मोठा भाग यज्ञांचा आहे. बृहदारण्यक उपनिषदात एक मंत्र आहे, जो यज्ञ केल्याचे लाभ वर्णन करतो.

मंत्र- 'स वा एष महानज आत्मा योऽयं विज्ञानमयः प्राणेषु य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः स न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयानेष सर्वेश्वर एष भूताधिपतिरेष भूतपाल एष सेतुर्विधरण एषां लोकानामसम्भेदाय तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेनैतमेव विदित्वा मुनिर्भवति । एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति । एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः । स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसङ्गो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्येतमु हैवेते न तरत इत्यतः पापमकरवमित्यतः कल्याणमकरवमित्युभे उ हैवैष एते तरात नैनं कृताकृते तपतः।' (बृहदारण्यक उपनिषद- ४.४.२२)

ब्राह्मण वेदाध्ययन करून, यज्ञ करून, दानधर्म करून, तपाचरणाने आणि उपवासाने आत्म्याला जाणण्याचा प्रयत्न करतात. पण जेव्हा हा हेतू पूर्ण होतो तेव्हा ते सर्वांचा त्याग

करतात (यज्ञासह) आणि संन्यासी होतात. त्यानंतर हे सर्व विधी थांबविण्याचा विधी येतो. यज्ञासारख्या विधींद्वारे मिळणाऱ्या लाभांमध्ये हा, सर्व विधी सोडून देण्याचा विधी श्रेष्ठ आहे. यज्ञासारखे मोठे कर्म, कर्मत्यागासाठी तयार करणे कसे तयार करते?

दोन प्रकारची कर्मे असतात. एक आपल्याला आवडते ते करून. ते मन शुद्धीकरण करण्याऐवजी मनात गोंधळ उडवून देते आणि कर्माचा भार अधिक वाढविते. दुसरे, कोणत्याही लाभाची अपेक्षा न ठेवता त्यागाच्या भावनेने ईश्वराला अर्पण करणे. दुसऱ्यात आपण आतून शुद्ध होतो आणि आपल्या कर्माचा भार अधिक हलका होतो आणि आपण अशा एका बिंदूवर पोहोचतो की त्यापुढे आपल्याला कोणताही विधी करण्याची गरज राहत नाही. जो अशा प्रकारे परमेश्वरी कृपेने सर्व कर्मांचा त्याग करतो, तो मानवजातीच्या भल्यासाठी कर्म करीत राहतो. पण जरी तो कर्ता असला तरी त्याला 'कर्तेपणाची' जाणीव नसते.

मनाची अशुद्धता कशी घालवायची? जर तुम्ही, कोणतीही इच्छा न ठेवता, कोणाबद्दल द्वेष न ठेवता, लाभ किंवा हानी आणि यशापयशाचा विचार न ठेवता एखादा मोठा यज्ञ केला तर तुमचे मन स्वच्छ होईल. मन, शरीर आणि वाणी यांचा त्यात पूर्ण लय व्हायला हवा आणि एकाच ध्येयावर केंद्रित व्हायला हवे. मग सर्व अशुद्धता जळून नष्ट होईल. हे भिंगातून सूर्यकिरणे जाऊन कागदावर केंद्रित होऊन तो जळण्यासारखे आहे. यज्ञात शेकडो गोष्टी कराव्या लागतात, अनेक मंत्र म्हणावे लागतात, अनेक प्रकारची सामुग्री गोळा करावी लागते. यजमानाचे मन एकाच ध्येयावर स्थिर झालेले असते.

जर राजाला अश्वमेध करायचा असेल तर त्याला अनेक विविध बाबींमध्ये लक्ष द्यावे लागते. यज्ञाच्यास्थानी अगदी वाघासह विविध प्रकारचे प्राणी आणावे लागतात. जर एखादा भक्त एका ध्येयाने अनेक वर्षे स्वतःला वाहून घेत असेल तर त्याचे मन शुद्ध होईल आणि त्याला पुढे एकही विधी करण्याची गरज राहणार नाही अशा स्थितीला तो येईल. गोपूर बांधणे, मोठा तलाव बांधणे किंवा कोणत्या तरी सामाजिक कामात व्यस्त असणे हे मन निष्कलंक करण्यासाठी आहे. माझ्या म्हणण्यानुसार वस्तुतः अशा पद्धतीने मिळविलेली शुद्धता ही कोणत्याही पारितोषिकापेक्षा मोठी आहे.

एखाद्या गृहस्थाने यज्ञ केल्यावरही संन्यास स्वीकारला नाही तरी तो स्वर्गात जातो. ईश्वराच्या कृपेने तो ईश्वराशी एकरूप होतो. आणि जेव्हा ईश्वरच परमात्मा म्हणून ब्रह्मात विलीन होतो, तेव्हा तोही त्याच्याशी एकरूप होतो. जेव्हा ईश्वर विश्वनिर्मिती करतो तेव्हा त्यात लिप्त होत नाही. किंवा जोडले जाण्याचा आणखी एक मार्ग आहे. कृष्ण परमात्मा, योगाचरण न करता आणि जे आत्म्याला न जाणता मरण पावतात अशा योगभ्रष्टाविषयी बोलतात. [प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः, शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते। (भगवद्गीता ६.४१)] पुढील जन्मात तो मागील जन्मात ज्या ठिकाणी

थांबला तेथून आरंभ करतो आणि उच्चस्थानी जातो. जे योगसाधना करतात त्याचे नियम ते यज्ञ करतात त्यांना लागू होतात. म्हणजे तो यज्ञ करतो पण संन्यासी होण्यापूर्वी मरण पावतो, तो विवेकाने आणि प्रगल्भ वृत्तीने सर्व कर्मांचा त्याग करून पुन्हा जन्म घेतो आणि संन्यासी होतो.

ज्यांना सर्व संस्कारांचा हक्क नाही ते त्यांची कर्मे व्यवस्थित पार पाडून, स्वतःला ईश्वरार्पण करून, त्याची भजने करून, औपासन विधी करून आणि त्यांच्या पितरांना आहुती देऊन उच्च स्थितीला पोहचतील.

-----

## प्रकरण - १०

# ब्राह्मणाच्या जीवनातील एक दिवस

"हल्लीच्या दिवसात एखादा ब्राह्मण इतके संस्कार कसा करू शकतो?" हा साहजिक प्रश्न आहे. "ज्या गोष्टी व्यवहार्य नाहीत त्यांच्याविषयी बोलण्यात काय अर्थ आहे?" समजा मी स्वतः तुम्हाला दोन याद्या दिल्या, एक या दिवसात करण्यास सुलभ असलेल्या संस्काराची आणि दुसरी तितके सोपे नसलेल्या संस्कारांची. मग काय होईल? तुम्ही पहिल्यातील बाबी दुसऱ्या यादीत टाकत राहाल, आणि शेवटी, मला वाटते, तुम्हाला करण्यासाठी काहीच राहणार नाही. म्हणून किमान तुमच्या निवृत्तीनंतर, ब्राह्मण म्हणून सोपविलेले धार्मिक विधी तुम्ही केलेच पाहिजेत. तुम्ही तुमच्या मालकाकडून सेवाकालवाढ मागता कामा नये किंवा नवीन नोकरी शोधता कामा नये.

आता, मला शास्त्रानुसार ब्राह्मणाच्या दैनंदिन धार्मिक जीवनाविषयी बोलू द्या. तो खरेच कठीण दिनक्रम आहे. ब्राह्मणाने सूर्योदयापूर्वी पाच नाडिका (एक नाडिका म्हणजे २४ मिनिटे) किंवा दोन तास उठायला हवे. "पञ्च-पञ्च-उषःकाले", असे म्हटले जाते कारण "पञ्च-पञ्च" म्हणजे पाच x पाच - "पञ्च-पञ्च-उषःकाले" हे २५ नाडिका सुचविते. सूर्यास्त ते सूर्योदय हा कालावधी ३० नाडिकांचा असतो. म्हणून ब्राह्मणाने २५व्या नाडिकेला उठले पाहिजे - यावेळेपासून सूर्योदयापर्यंतच्या काळाला "ब्राह्म मुहूर्त" म्हणतात.

उठल्यानंतर तो दात स्वच्छ करतो, थंड पाण्याने स्नान करतो आणि संध्यावंदना आणि जप करतो. नंतर तो औपासन आणि अग्निहोत्र करतो. हे देवयज्ञ, देवांना आहुती यात मोडतात. नंतर ब्रह्मयज्ञ असतो, दैनिक अभ्यास आणि वेद पठण होय. या विधीचा एक भाग म्हणून तर्पण किंवा आहुती दिली जाते. (ठरावीक सूत्र पालन करणाऱ्या लोकांबद्दल नंतर येईल) जर दिवसाचा कालावधी आठ भागांत विभागला तर एक भाग आता संपलेला असावा.

दिवसाच्या दुसऱ्या भागात ब्राह्मणाने त्याच्या शिष्यांना वेद शिकविलेच पाहिजेत - हे अध्यापन होय. त्यानंतर त्याने स्वतः पूजेसाठी फुले गोळा केली पाहिजेत. त्याने पैसे कमविणे अपेक्षित नसल्याने - आणि त्याला दान म्हणून जमीन मिळाली नसल्याने - त्याला अन्नासाठी आणि तो करीत असलेल्या यज्ञविधींच्या सामुग्रीसाठी भिक्षा मागावी लागते. ब्राह्मणाला भिक्षा मागण्याचा अधिकार आहे, पण हा मर्यादित अधिकार आहे. कारण त्याचा अर्थ असा की तो घर चालविण्यासाठी आणि विधी करण्यासाठी लागणारे किमान मागून घेऊ शकतो. त्याला मिळणाऱ्या दानातील योग्य भाग तो करीत असलेल्या यज्ञात कर्तव्य करणाऱ्या पुरोहितांना दक्षिणा म्हणून द्यायचा असतो.

ब्राह्मणाच्या सहा कामांपैकी एक 'प्रतिग्रह' किंवा भेटी स्वीकारणे आहे. दुसरा 'दान';

इतरांना दान देणे आहे. असे विचारले जाते की फक्त ब्राह्मणांनाच भेटी स्वीकारण्याचा अधिकार का आहे. त्याचे उत्तर असे आहे की त्यांनी इतरांना दान द्यावे अशा आज्ञा आहेत. खरेच, त्याला स्वतःला दान देता यावे म्हणून तो भेटी स्वीकारतो. याशिवाय नंतर करावयाच्या ''आतिथ्य'' आणि ''भूतयज्ञ'' या विधींमध्ये त्याला दान द्यावे लागते.

दिवसाच्या दुसऱ्या भागानंतर तिसरा भाग असा घालविला जातो, त्याला पुन्हा स्नान करावे लागते आणि माध्यान्हिके करावी लागतात. नंतर तो पितृतर्पण करतो, म्हणजे तो पितरांना आहुती देतो आणि त्यानंतर होम आणि पूजा असते. यानंतरच्या विधीमध्ये त्याने पंचेंद्रियांनी प्राप्त केलेले, ईश्वराने आपल्या इंद्रियांना सुख देईल असे जे निर्माण केले ते सर्व त्या देवतांना अर्पण करावे लागते. आता माध्यान्ह असतो आणि दिनमानातील चौथा भाग संपतो आणि ब्राह्मणाने देवता, वेद आणि पितर यांच्यासाठी असलेले विधी पूर्ण केलेले असतात.

पाच महायज्ञ किंवा पञ्च-महायज्ञांपैकी दोन राहिलेत - मनुष्य यज्ञ किंवा अतिथींचा सत्कार करणे आणि भोजन देणे, आणि भूतयज्ञ, ज्यात पृथ्वीवरील प्राण्यांना देण्याचा बळी आणि गरिबांना अन्नदान करणे (वैश्वदेव). होमात भाताची आहुती दिली जाते आणि बळी म्हणूनही दिला जातो (होमात न टाकता). बळीमध्ये मंत्र म्हणत अन्न घरच्या निरनिराळ्या भागांत ठेवले जाते - जातिबाह्य, भिकारी, कुत्रे, पक्षी इ. (सर्वांमध्ये ईश्वर आहे. ही दानाची उदात्त भावना असते, असे एक विद्वान म्हणतात). मनुष्ययज्ञात अतिथींचे स्वागत केले जाते आणि त्याला आतिथ्य म्हटले जाते. हे सर्व विधी पार पाडल्यावर त्याची भोजनाची वेळ येते. तोपर्यंत त्याने थोडे दूध किंवा ताकाशिवाय काहीही घेता कामा नये, पण कॉफी किंवा फराळ/अल्पोपाहार नव्हे. जर त्याला पाकयज्ञ, हविर्यज्ञ किंवा सोमयज्ञ करायचे असतील तर त्याची भोजनाची वेळ आणखी पुढे जाईल. त्याला जर श्राद्ध करायचे असेल तर नेहमीपेक्षा उशिरा जेवावे लागेल. श्राद्धविधी 'अपरान्हकाळी' सुरू करायचा असतो : मी नंतर त्याचा अर्थ सांगेन.

आपण पाहिले की दिवसाचे आठ भाग पाडलेत. पण त्याचे सहा नाडिकांचे पाच भाग पडू शकतात. जर सूर्य ६ वाजता उगवला तर ६ ते ८.२४ ही सकाळ किंवा 'प्रातःकाळ'; ८.२४ ते १०.४८ 'संगवकाल'; आणि १०.४८ ते १.१२ 'माध्यान्हिक'. १.१२ पासून ३.३६ पर्यंत 'अपरान्ह' आणि ३.३६ ते ६ (किंवा सूर्यास्तापर्यंत) हा सायंकाळ. (सूर्यास्ताच्या जवळचा काळ 'प्रदोष'. दोष म्हणजे रात्र, प्र या प्रत्ययाचा अर्थ पूर्वी अगोदर. इंग्रजी 'प्रि' हा 'प्र'पासून आलेला आहे. अशा प्रकारे प्रदोष म्हणजे रात्रीपूर्वीचा काल.)

मी म्हणालो की श्राद्धाची वेळ अपरान्ह असते. श्राद्धानंतर देवांसाठी असलेले विधी करायचे असतात. जेवणानंतर ब्राह्मणाने पुराणे वाचायला हवीत. नंतर त्याने इतर जातींना त्यांचे पारंपरिक व्यवसाय, कला, कारागिरी शिकवायची. त्याला एक क्षणही विश्रांती किंवा

आरामासाठी वेळ नसतो. लवकरच त्याची संध्याकाळच्या स्नानाची, संध्यावंदनेची, आहुती आणि जपाची वेळ होते. त्याने जेवण घेऊन झोपी जाण्यापूर्वी रात्रीही वैश्वदेव करायचा असतो. बऱ्याच रात्री तो फळे, दूध असे हलके अन्न घेतो. एकादशीच्या दिवशी त्याला दिवसभर उपाशी राहावे लागते.

कामाशिवाय एक क्षणही नसतो. हे स्पष्ट आहे की ब्राह्मणाने शास्त्रे निर्माण केली. ती त्याला आयुष्यभर आरामात जीवन जगायचे म्हणून नव्हे. उलट, शास्त्राने त्याच्यावर कष्टाचे आणि तपस्वी जीवन, पूर्णपणे शारीरिक आणि मानसिक शिस्तीचे जीवन लादलेले आहे.

आजही जे ब्राह्मण कचेऱ्यांमध्ये किंवा अन्य संस्थांमध्ये काम करतात त्यांनी शास्त्रानुसार जीवन जगले पाहिजे. त्यांनी पहाटे चार वाजता उठले पाहिजे (ब्राह्ममुहूर्त), पारंपरिक पद्धतीने औपासन, अग्निहोत्र, ब्रह्मयज्ञ इ. केले पाहिजेत. त्यांनी संगवकालात (सकाळी ८.२४ ते १०.४८) पूजा आणि माध्यन्हिक करावे. माध्यन्हिक हा शब्द दुपारचे विधी सुचवितो. पण हल्लीच्या जीवनात तेवढी सवलत आहे, तो संगवकालात करणे चालेल. संध्याकाळीही शास्त्रीय पद्धतीने विधी करायचे. इच्छा असेल तर मार्ग दिसेल असे म्हटले जाते. ब्राह्मणाला सुटीच्या दिवशी अपेक्षिल्याप्रमाणे सर्व विधी करता येतील.

ज्यांना सकाळची नोकरी असते आणि घाईने कामाच्या ठिकाणी जावे लागते त्यांनीही शक्यतो चांगल्या पद्धतीने विधी केले पाहिजेत. संध्याकाळी गायत्रीजपाचा कालावधी सकाळची भरपाई करण्यासाठी वाढविला पाहिजे. जर सकाळची पाळी असेल तर पुढील आठवड्यात दुपारची किंवा रात्रीची पाळी असणार नाही का? या वेळा सोयीस्कर व्हाव्यात म्हणून मेळ घालता येऊ शकेल.

कर्तव्य म्हणून असलेले विधी करण्यात जर ब्राह्मण अयशस्वी झाले तर त्यांना पश्चात्ताप व्हायला हवा. कामाला न जाण्याचे वाईट न वाटता त्यांनी त्यांच्या निवृत्तीची वर्षे धर्माचा पाठपुरावा करण्यात घालविली पाहिजेत. काही दुर्मिळ घटना आहेत-कदाचित लाखात एक- की ज्यांनी निवृत्तीनंतर वेदाभ्यास केला आणि शास्त्रानुसार जीवन व्यतीत केले.

आपल्या धर्मातील विधी, जेव्हा कोणताही धर्म अस्तित्वात नव्हता त्याकाळापासून आहेत. ते संस्कार करणे स्थगित होणार नाहीत याची काळजी आपण घेतली पाहिजे. ते केवळ आपल्यासाठी नाहीत (व्यक्तिगत) पण सर्व मानवजातीच्या कल्याणासाठी आहेत.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - २०

## विश्वकल्याणासाठी वर्णधर्म

## प्रकरण - १

# जाती - इतके भेद का?

चार वर्ण आहेत - ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. आपण वर्णांना जाती मानतो. वस्तुतः वर्ण आणि जाती समान नाहीत. वर्ण फक्त चार, वर उल्लेखल्याप्रमाणे - ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र आहेत. प्रत्येकात अनेक जाती आहेत. ब्राह्मणांमध्ये अय्यर, अय्यंगार, राव आणि असेच आहेत. चौथ्या वर्णात मुदलियार, पिल्लाई, रेड्डी, नायक्कर, नायुडु, गौण्डर, पडायाचि आहेत. या दक्षिणेकडील जाती आहेत.

सामान्य बोलीभाषेत वर्णासाठी जात हा शब्द वापरला जातो. मीही त्या दोन्ही एकमेकांसाठीचे शब्द म्हणून वापरीत आहे.

शास्त्राने चारही जातींसाठी (चार वर्णांसाठी) स्वतंत्र संस्कार सांगितले आहेत. याचा अर्थ असा की एकाच धर्मात, हिंदुत्वात असंख्य भेद आहेत. एका जातीने शिजविलेले अन्न दुसरा खात नाही. एका जातीतील वर दुसऱ्या जातीतील मुलीशी विवाह करीत नाही. एका जातीचा व्यवसाय दुसरी जात करीत नाही. खरेच भेद असंख्यच आहेत.

अगोदरच अस्तित्वात असलेल्या प्रत्येक वर्णातील असंख्य भेदांशिवाय, अधिकाधिक भेद (जाती) निर्माण होत आहेत. अशा प्रकारे हिंदुत्व एक विचित्र धर्म वाटू लागतो.

हल्ली हिंदूंना लाज वाटते की ज्याचा अभिमान बाळगावा अशा धर्मात (कारण तो एकेकाळी सर्व जगाचा धर्म होता.) इतके भेद असावेत. इतर धर्मांमध्येही योग्य आणि अयोग्य, करावे-करू नये अशा गोष्टी आहेत. दहा आज्ञा सर्व ख्रिश्चनांसाठी आहेत. तसेच सर्व मुस्लिमांसाठी कुराणातील आज्ञा आहेत. परंतु हिंदू धर्मात सर्वांसाठी एकाच प्रकारच्या योग्य आणि अयोग्य, करावे-करू नये गोष्टी नाहीत. एखाद्याने धर्म म्हणून केलेली गोष्ट दुसऱ्याने केली तर ती अधर्म असते. उदाहरणार्थ- धर्म म्हणून एखाद्याने यज्ञोपवीत धारण केले आणि वेदपठण केले तर तेच दुसऱ्यासाठी अधर्म असतो. स्नान न करता आणि पोट रिकामे न ठेवता जर एखाद्याने वेदपठण केले तर तो अधर्म ठरतो. तथापि इतराने स्नान करण्याची आणि उपाशी राहण्याची गरज नाही. मी जेव्हा पाहतो की एवढे भेद असूनही आपला धर्म अजूनही जिवंत आहे, तेव्हा मला एका थोर माणसाचे शब्द आठवतात : ''आपण सर्व एक दिवशी मृत्यू पावू हे आश्चर्य करण्यासारखे नाही. आपल्या शरीराला नऊ द्वारे आहेत, पण त्यापैकी कशातूनही आपली चेतना बाहेर पडत नाही.''

'नवद्वारे शरिरे'स्मिन् आयुः स्रवति सन्ततं, जीवतीत्यद्भूतम् तत्र गच्छतीति किं अद्भुतम्।'

त्याचप्रकारे, भेद असूनही आणि त्यासंबंधी लोक शंकित असूनही आपला धर्म जिवंत आहे या वस्तुस्थितीचे नवल वाटले पाहिजे. काहींसाठी वेद म्हणणे गुन्हा आहे तर काहींनी न म्हणणे गुन्हा आहे. आपल्या धर्मात इतके भेद का असावेत आणि इतका भेदभाव का दिसतो? भेदांविषयी बोलणेही काहींना लज्जास्पद वाटते आणि अनेक चांगल्या बाबी असूनही त्यांना तो आपल्या धर्मावरचा कलंक वाटतो. काहीजण याचे कसेबसे स्वतःचे समाधान करून घेतात; काहींना तो भेद नित्य अस्वस्थ करणारा वाटतो. भेदांचा राग येणारेही काही लोक आहेत आणि ते त्याची प्रतिक्रिया म्हणून नास्तिकतेकडे वळतात.

काहींना हिंदुत्वाचा अभिमान वाटतो. पण त्यांना वर्णव्यवस्था काढून टाकायची असते आणि इतर धर्मांप्रमाणे भेदाविना सर्व हिंदूंचा एकच वर्ण करावा असे वाटत असते. ''सर्वांना वेद मुक्त व्हावेत आणि सर्वांची एकच उपासनापद्धत असावी,'' ते म्हणतात, आपल्या पूर्वजांच्याकाळी आपल्या धर्मात ते प्राप्त करण्याची कल्पना होती. ''ज्यांनी आत्मा आणि परमात्म्याचे ऐक्य सांगितले अशा आपल्या धर्मांचे तत्त्वचिंतकांनी'', ते वाद करतात, ''व्यक्तिगत आत्म्यांमधील अशा भेदांवर विश्वास ठेवला नसता. कृष्ण परमात्मा गीतेत म्हणतो की लोकांना त्यांच्या स्वभावातील भेदानुसार व्यवसाय/वर्ण दिले आहेत, जन्मावरून नव्हे.'' म्हणून ते जात हा आपल्या धर्मावर डाग समजतात आणि वंशगत वर्ण मूळचा नसतो, तो नंतरचा शोध असतो.

आपण या दृष्टिकोनांचे तपशिलाने परीक्षण करू.

-----

# प्रकरण - २

## वेद आणि गीतेनुसार जात

वेदानुसार जात जन्मावर आधारलेली नाही याचा प्रथम विचार करू. (शेवटी वेद हेच आपल्या धर्माचे उगमस्थान आहे. म्हणून हा मुद्दा स्पष्ट व्हायला हवा.) अगोदर मी, वयात आल्यानंतरच्या विवाहाला वेदांमध्ये मान्यता असल्याचे खोडून काढले. आताचा संदर्भ सोडून उतारा वाचल्यामुळे जातीबाबत वेद काय म्हणतात हा मुद्दा तसाच आहे. जो नियमाला अपवाद म्हणून उल्लेखलेला आहे तोच नियम म्हणून सांगितला जात आहे. जात, जन्मावर आधारलेली असते, व्यक्तीच्या स्वभाव आणि गुणांवर नाही या दृष्टिकोनाला पुष्टी देणारा ठाम पुरावा मी देतो. विशिष्ट जातीत चौल हा संस्कार तिसऱ्या वर्षी, उपनयन पाचव्या किंवा सातव्या वर्षी केला जातो. हे संस्कार जन्मावर आधारलेले आहेत आणि लहानपणीच करायचे असतात. म्हणून एखाद्याचा वर्ण त्याच्या स्वभाव किंवा गुणावर आधारलेला असतो असे म्हणणे मूर्खपणाचे होईल. लहानपणीच एखाद्याचा स्वभाव किंवा गुण निश्चित करणे शक्य आहे का?

आता गीतेकडे वळू या. गीता 'समदर्शना'विषयी म्हणजे प्रत्येक गोष्टीकडे समानदृष्टीने पाहण्यास सांगते हे खरे आहे. 'विद्याविनयनसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनी। शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः।।' (गीता ५.१८) यावर गीता कोणताही जातिभेद जाणत नाही असा प्रतिवाद करणे हे विपरीत होईल. कृष्णानुसार आपण सर्वत्र समभाव केव्हा ठेवू? आपण संदर्भाचा विचार केला पाहिजे : भगवान जो आत्म्यात लय पावला आहे अशा ज्ञानी आणि ज्यासाठी आत्म्याशिवाय विश्व आणि त्याचा कर्ता याचे महत्त्व नसते अशा माणसाच्या समदर्शनाविषयी बोलत आहेत. भगवान म्हणतात की जो संन्यासी होण्यासाठी पूर्णपणे कर्मत्याग करतो आणि अंतिम ज्ञानावस्था प्राप्त करतो अशा माणसाला सर्व समान असतात. वेद आणि उपनिषदे हेच सांगतात. केवळ उच्चस्तरावर पोहोचलेले सर्व समान पाहू शकतात (एकमेव सत्य). या गोचर जगाची बहुविधता किंवा जे कर्मात लिप्त आहेत अशांसाठी हे समदर्शन नाही. भगवान गीतेत समदर्शन, समचित्त आणि समबुद्धी याबद्दल योग्याच्या दृष्टिकोनातून बोलत आहेत; पण कोणत्याही प्रकारे ते आपल्या जगातील अस्तित्वाला लागू पडणाऱ्या समकार्यत्वाचा उल्लेख करीत नाहीत.

भगवान जातिभेद नाकारत नाहीत हे काहीजण खरे मानतात; पण असा वाद करतात की भगवानानुसार जात जन्मावर अवलंबून नसून लोकांच्या गुणांवर असते. त्या पुष्ट्यर्थ ते गीतेतील ओळ सांगतात : "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः। तस्य कर्तारमपि मां विध्द्य कर्तारमव्यम्।।"

व्यक्तींमध्ये भेद करणारे गुण आपल्याला केव्हा माहीत होतात? तो वयाच्या कितव्या

वर्षी आपला स्वभाव प्रकट करतो? आपण हे केव्हा निश्चित कसे करतो आणि त्याला शिक्षण आणि त्याच्या गुणानुसार व्यवसाय प्रशिक्षण देतो? जेव्हा सात किंवा आठ वर्षाचा असतो तेव्हा ब्राह्मण गुरुकुलात प्रवेश कराव्या लागणाऱ्या ब्राह्मणाचा व्यवसाय उदाहरणादाखल घ्या. त्याचे शिक्षण बारा वर्षे होते, त्यानंतर तो या इतरही गोष्टी असलेल्या व्यवसायाला, अध्यापनाला पात्र ठरतो. जर माणसाचा व्यवसाय त्याचे चारित्र्य आणि गुण आकार घेतल्यानंतर निश्चित करायचा तर त्याची उत्साहाची वर्षे वाया घालविण्यासारखे होईल. जरी त्याला विलंबाने काम शिकायचे तर तो त्याचीच नव्हे तर समाजाची हानी आहे. भगवान सातत्याने सांगतात की आपण कर्मात व्यस्त असले पाहिजे, एक क्षणही आळसात राहायला नको. स्वभावानुसार व्यवसाय निश्चित करेपर्यंत व्यक्तीने कोणत्याही कामाशिवाय राहावे, ही व्यवस्था तो कशी मान्य करेल?

याचा अर्थ असा आहे का की भगवान, लोकांच्या विविध गुणांनुसार व्यवसायाच्या व्यवस्थेच्या सिद्धांताला आणि प्रत्यक्षात त्याला जन्मावर आधारलेले व्यवसाय हवेत, याला पाठिंबा देतो? पण तो, (हल्लीच्या) बोलतील एक आणि करतील दुसरेच अशा राजकारण्यांसारखा नाही. त्याचा उपदेश त्याच्या आचरणापेक्षा भिन्न नाही.

दिव्य अवतार म्हणून आपण कृष्णाच्या जीवनात काय पाहतो? मित्र आणि नातलगांचे रक्त सांडून साम्राज्याचा राज्यकर्ता होण्यापेक्षा तपस्वी होणे अधिक चांगले असे म्हणून युद्ध करण्यास अर्जुन नकार देतो तेव्हा भगवान त्याला काय सांगतात? ते त्याला लढण्याचे आवाहन करतात. ''तू क्षत्रिय म्हणून जन्मला आहेस आणि युद्ध करणे हे तुझे कर्तव्य आहे. तुझे धनुष्यबाण घे आणि लढ.''

येथेही असा प्रतिवाद केला जाईल : अर्जुन हा थोर योद्धा होता आणि महान वीर होता. मित्र आणि नातलगांच्या विरुद्ध शस्त्र घेण्याची नाखुशी ही तात्पुरती होती. त्याचे अंतरंगातील गुण आणि स्वभाव पराक्रमी माणसाचा होता. म्हणून भगवान त्याला लढण्यास प्रोत्साहन देतात. अर्जुनाचा स्वधर्म (स्वतःचे कर्तव्य) म्हणून ते जो उल्लेख करतात तो त्याच्या जाती-धर्मासारखाच (जातीचे कर्तव्य) असू शकत नाही. भगवान अर्जुनाच्या नैसर्गिक स्वभाव म्हणून त्याच्या स्वधर्माचा उल्लेख करीत असलेच पाहिजेत.

जर असे विधान बरोबर असेल तर धर्मपुत्राच्या (युधिष्ठिर) वृत्तीचे, स्वभावाचे काय? आरंभापासून तो युद्धाच्या विरुद्ध होता आणि कौरवांबरोबर शांतता स्थापित करण्यास उत्सुक होता. अर्ध्या राज्याचा आग्रह न धरता पाच घरांवर तो समाधानी असल्याचे म्हणणार नव्हता का? कृष्ण (शांती-) दूत म्हणून कौरवांकडे जातो पण तो स्वतःच युद्धात ओढला जातो. पूर्वी त्याने युधिष्ठिराला सम्राट होण्यासाठी सर्व शेजारी राज्यांना जिंकून घेण्यास आणि राजसूय यज्ञ करण्यास सांगितले होते. धर्मपुत्राला खरेच अशा वैभवाची गरज होती का? त्याची अंतर्प्रवृत्ती

आणि स्वभाव दाखवून देतात की त्याचा युद्धखोर स्वभाव नव्हता किंवा सम्राटपदाची आस होती असेही दर्शवित नाहीत. श्रीकृष्ण परमात्मा त्याला त्याचा क्षत्रिय धर्म आचरायला लावतात. हे सर्व दर्शविते की स्वधर्म म्हणजे स्वजातीचा धर्म असेच भगवानाला म्हणायचे आहे. द्रोणाचार्यासारखे लोक ब्राह्मण म्हणून जन्मले, पण त्यांनी क्षत्रियांचे कर्तव्य स्वीकारले. भगवान त्यांच्याविषयी नापसंती दर्शवत नाहीत पण ती महान माणसे होती, जेव्हा भीमाने द्रोणाचार्यांना जन्माने आलेला धर्म सोडल्याबद्दल टोमणा मारला तेव्हा कृष्ण नाराजी दाखवत नाही. अशा प्रकारे आपल्याला खात्री पटते की भगवानाला स्वधर्म म्हणजे जन्माधिष्ठित जाती-धर्म म्हणायचे आहे.

मग तो ''गुण-कर्म-विभागशः'' असे गीतेत का म्हणतो ?

-----

## प्रकरण - ३

# जन्माधिष्ठित स्वभाव आणि व्यवसाय

व्यक्तीचा जातिधर्म अंतरंगातील गुण (गुण किंवा स्वभाव) बनवतो. म्हणून श्रीकृष्णाची गीतेत आज्ञा आहे की गुणानुसार चातुर्वर्ण्यातील विभाग आणि जन्मावर आधारलेली जात हे एकच आहेत. त्या दोन्हीत संघर्ष नाही. श्रीकृष्णाच्या उपदेशात मतभेद आहेत, असा दोष तुम्ही काढू शकत नाही.

परशुराम आणि द्रोणाचार्य ब्राह्मण होते, पण ते स्वभावाने क्षत्रिय होते. उलट आक्रमक, तापट स्वभावाबद्दल प्रसिद्ध असलेला विश्वामित्र एक ऋषी झाला. अशा घटना अतिशय दुर्मिळ आहेत आणि जातिधर्माच्या नियमाला अपवाद आहेत. एकंदरीत आपल्याला असे दिसते की व्यक्तीचे बाह्यगुण कोणतेही असो, त्यांचा अंतर्गुण हा त्यांचा वंशपरंपरेने आलेला व्यवसाय टिकविणे हा असतो.

एखाद्याचा व्यवसाय ज्या गुणावर आधारलेला असतो तो त्याच्या जन्मावर आधारलेला कसा असतो ? एखाद्या व्यक्तीच्या स्वभावाचा विकास होण्यापूर्वी तो एका विशिष्ट वातावरणात वाढतो, ते वातावरण त्याच्या कुटुंबात पिढ्यानुपिढ्या तोच व्यवसाय केल्याने विकसित होते. तो हा व्यवसाय स्वीकारतो आणि त्याच्याच लोकांकडून त्याला त्यातील प्रशिक्षण मिळते. अशा रीतीने त्याच्या गुणाला आकार येतो आणि तो त्याच्या कामाशी संलग्न होतो. प्रत्येकाला खात्री असलीच पाहिजे की तो ज्या व्यवसायात जन्मला त्याने त्याला लाभ झाला. जेव्हा भूतकाळात लोकांचा हा दृष्टिकोन असतो तेव्हा ते लोभ आणि शत्रुत्वाच्या भावनेपासून मुक्त होतात. शिवाय जरी ते व्यवसायामुळे विभागले गेले असते तरी त्यांच्यात सुसंगती होती. अशा व्यवस्थेत जन्मलेल्या मुलांमध्ये कौटुंबिक व्यवसायाबद्दल आवड आणि कल वाढत असे. म्हणून ते जन्मानुसार आचरणात यायचे तेच गुणानुसार आचरल्यासारखे होते. हल्लीच्या सुधारकांचा काहीही दृष्टिकोन असो. पूर्वी एखादे काम करण्याची कुवत ही त्याच्या गुणाप्रमाणे असे आणि पूर्वी धर्माप्रमाणे एखादा मनुष्य त्याच्या गुणानुसार व्यवसाय करीत असे. आता हे उलटसुलट झाले आहे.

या प्रश्नांबाबत मानसशास्त्रज्ञांचे कोणते दृष्टिकोन आहेत? त्यांच्यानुसार मनुष्याच्या गुणांमध्ये सामर्थ्यात आणि दृष्टिकोनात वारसा आणि वातावरण यांची महत्त्वाची भूमिका असते. पूर्वी सर्व व्यवसाय आजोबांकडून पित्याकडे आणि पित्याकडून मुलाकडे येत. शिवाय विशिष्ट व्यवसाय किंवा धंदा करणाऱ्या लोकांचा समूह खेड्यात स्वतंत्र भागात राहत असे. उदाहरणार्थ ब्राह्मण अग्रहारात राहात. त्याचप्रमाणे प्रत्येक जातीला एक भाग असे. म्हणून वातावरणाचा परिणाम विशेष कौशल्य आणि स्वभाव यांचा विकास होई. हे दोन्ही घटक

म्हणजे वारसा आणि वातावरण, व्यक्तीचे गुण आणि व्यवसाय यांना आकार देण्यात साधनीभूत होत.

या विषयावर मीच बोलण्यापेक्षा मी ज्यांना सुधारणावाद्यांनी मान दिला अशा गांधीर्जींचे दृष्टिकोन, विचार देतो. गुण आणि कर्मानुसार वर्ण असे गीता म्हणते. पण गुण आणि कर्म यांचा जन्माने वारसा मिळतो. कृष्णाचे आचरण हे त्याच्या तत्त्वाविरुद्ध नाही हे गांधीर्जींकडूनही मान्य झाले. आधुनिकांनी, वेद आणि शास्त्रे यांचा अर्थ विपरीत, भलतीकडे नेणारा करू नये आणि कृष्णाचे विचार वादाचा मुद्दा करू नये.

कृष्ण सामान्यतः त्याच्या उच्चारणात, बोलण्यात आज्ञार्थी आहेत. ''मी सांगतो, तू ऐक''. अशी त्याची पद्धत आहे. पण जेव्हा लोक आणि त्यांची कर्तव्ये याबाबत बोलतो तेव्हा आपले ''मी असे म्हणतो'' असे लादत नाही. उलट शास्त्रात काय सांगितले आहे त्याचा निर्देश करतो. कृष्णाच्या काळात जाती जन्मानुसार विभागलेल्या होत्या. आपल्याला हे महाभारत, भागवत आणि विष्णुपुराण यांवरून कळते; यात शंका नाही. मी याचा उल्लेख करतो पण आताही संशोधक जन्माधिष्ठित जाती कृष्णानंतर आल्या असा दृष्टिकोन पुढे मांडणे संभवनीय आहे. वर उल्लेखलेली महाकाव्ये आणि पुराणे सांगतात की कृष्णाच्या काळातही वर्णाश्रमाची वर्णने करणारी शास्त्रे हीच धर्माचे आधार होती. त्याकाळात माणसाचा व्यवसाय जन्माने ठरत असे. आणि भगवान हे स्पष्ट शब्दात सांगत आहेत.

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्।।
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि।।
भगवद्गीता अध्याय १६- २३ व २४

जो शास्त्रांच्या आज्ञा सोडून देतो आणि स्वतःच्या इच्छेनुसार जगतो त्याला मुक्ती मिळत नाही, त्याला सुख प्राप्त होत नाही. (शास्त्रे तुमचे कर्म - काय योग्य आणि अयोग्य - ते ठरवितात. शास्त्राचा मार्ग तुम्ही जाणून घ्यावा आणि त्यानुसार तुमच्या कामाचा आणि व्यवसायाचा पाठपुरावा करावा.)

कृष्ण म्हणतो की व्यक्ती त्याला जन्माने मिळालेल्या जातीची ऋणी असते. यासंबंधी किंचितही शंका असता कामा नये.

-----

## प्रकरण - ४

# गुणानुसार व्यवसाय - प्रत्यक्ष व्यवहारात नाही

वर्णधर्माचे टीकाकार कदाचित असा वाद करतील : ''जातिधर्माच्या विषयावर वेद आणि कृष्णाची काहीही निवेदने असोत. आम्ही ती स्वीकारत नाही. कारण तो कर्मठ दृष्टिकोन आहे. आपण एका व्यवस्थेची रचना करायला हवी, ज्यात जातिनुसार नाही तर एखाद्याचे गुण आणि मानसिक कल यावर त्याचा व्यवसाय अवलंबून असेल.''

एका बाजूला माणसाचा व्यवसाय आणि दुसऱ्या बाजूला त्याचे गुण - त्याचा स्वभाव आणि नैसर्गिक कल यांच्यात काय संबंध आहे? जर तुम्ही थोडा विचार केला तर तुम्हाला असे आढळेल की हा संबंध हल्ली जरा अति केलेला, अतिशयोक्ती केलेला आहे. प्रत्येकजण आत्मगौरवाने पछाडलेला आहे आणि त्याला सर्व गोष्टींपासून स्वातंत्र्य मिळविण्याचे साधन हवे आहे. याच कारणास्तव लोकांना त्यांचे विचार आणि भावना यांचा सन्मान केला पाहिजे असे वाटते. ते विचार करीत नाहीत की त्यांच्या भावना समाजाला उपयुक्त आहेत का, त्या समाजासाठी चांगल्या की वाईट? आणि त्या जर वाईट असतील तर समाजासाठी त्यांच्यावर नियंत्रण घालायला नको का? असा विचार न करता प्रत्येक गोष्टीत स्वातंत्र्याची मागणी केली जाते.

एखाद्याला आवडणाऱ्या कामाचा त्याच्या स्वभाव आणि नैसर्गिक कला यांच्याशी काय संबंध आहे हे जर आपण पाहिले तर १०० पैकी ९० प्रसंगात त्यांच्यात काहीही संबंध नाही असे आढळेल. विरागी माणूस (जो मुक्त आहे आणि वासनाहीन आहे) एका कामाला चिकटून राहणार नाही. जो उत्साही आणि कार्यक्षमता असलेला आहे आणि जो आपले काम आखून करतो त्याला एकाच प्रकारच्या कामाचा तिटकारा येईल. काहीजण सैन्यात जाण्यासाठी उत्सुक, काही नौदलात आणि कार्हीना ते सक्तीचे केले तर ते त्याकडे तोंड फिरवतील. ज्यांना लेखनाची, संगीताची किंवा चित्रकलेची प्रतिभा आहे ते कंटाळवाण्या प्रकारच्या कामाला पाठिंबा देणार नाहीत.

पण ज्यांना ते एखाद्या कामासाठी योग्य आहेत आणि त्यांच्याकडे नैसर्गिक कल आहे असे वाटते त्यांच्यापैकी कितीजणांना ते काम मिळते? १० टक्केही नाही.

सर्व प्रकारचे लोक मला भेटण्यासाठी मठात येतात. ते दर्शन घेतात, मला मान देतात आणि त्यांना जीवनात काय करायचे आहे ते सांगतात. बहुतेकजण त्यांच्या आवडीनुसार किंवा कलेनुसार नसलेल्या कामात ते आहेत असे मला आढळते. एक पिता माझ्याकडे येतो आणि मला सांगतो : ''माझ्या मुलाने अभियांत्रिकी त्याचप्रमाणे वाणिज्य महाविद्यालयात प्रवेशासाठी अर्ज केला आहे. जर त्याला पहिल्याला प्रवेश मिळाला नाही तर त्याला दुसऱ्याला मिळेल. जर

त्याला अभियांत्रिकीला प्रवेश मिळाला तर त्याच्यासारखे दुसरे चांगले काही नाही. मला तुमचे आशीर्वाद द्या.'' अभियांत्रिकीचे काम आणि वाणिज्यचा पदवीधर यात काही संबंध आहे का? तरीसुद्धा तो मुलगा इंजिनिअरचे (मोजणीसारखे) किंवा वाणिज्य पदवीधर (हिशेब तपासणी) असे कोणतेही काम करायला तयार आहे. एक तरुण मला सांगतो : मी इंटरमिजिएट झालो (हल्लीच्या दहा अधिक दोनसारखे). मी वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घ्यावा की आय.ए.एस. साठी तयारी करावी याबद्दल मला खात्री नाही. पुन्हा डॉक्टर आणि जिल्हाधिकारी यात काय संबंध आहे? जर एखाद्याचा व्यवसाय त्याच्या गुणांवर अवलंबून असेल तर त्या तरुणाला डॉक्टर व्हायचे असूनही तो आय.ए.एस.च्या अभ्यासक्रमाचा विचार करतो.

एखादा वकील किंवा उद्योगपती राजकीय पक्षात जातो आणि शेवटी मंत्री होतो. याबाबत तुम्ही काय म्हणाल? हल्ली आपल्याला मंत्र्यांमध्ये केवळ वकील आणि उद्योगपतीच नव्हे तर निवृत्त अधिकारी, प्राध्यापक, डॉक्टर असे दिसतात. एखाद्या मंत्र्याला लागणारे गुण हे डॉक्टर, वकील किंवा प्राध्यापक यांना लागणाऱ्या गुणांसारखेच असतात का?

माणसाचे काम आणि त्याचे गुण आणि नैसर्गिक कल यांच्याशी सुसंगत नसते ही गोष्ट उच्चस्तराला मर्यादा घालू शकत नाही. काही वेळेस एखादा भक्त मला सांगत येतो : ''मी चित्रपटगृहात कारकून होतो. आणि आता मी सैन्यात दाखल झालो आहे. मला आशीर्वाद द्या.'' दुसरा म्हणतो : ''मी एका उपाहारगृहात वाढपी होतो. आता माझी स्वतःची टपरी आहे.'' चित्रपटगृहातील काम आणि सैनिक किंवा वाढपी आणि टपरीचा मालक यात काय संबंध आहे?

हल्ली शासन 'समाजवादी' असल्याचे प्रकटपणे सांगते. त्याचा दृष्टिकोन असा आहे की नेमणुका जातीच्या आधारावर न होता उमेदवाराचा स्वभाव आणि शैक्षणिक पात्रता यांवर करायच्या. पण जेव्हा ते मोठ्या पदांसाठी परीक्षा आयोजित करते तेव्हा एकाच समूहातील काहीजण 'आय.ए.एस.'साठी आणि काही 'आय.पी.एस.'साठी निवडले जातात. नैसर्गिक कल या दृष्टीने जिल्हाधिकारी आणि पोलिस अधीक्षक यांत काय संबंध आहे? तांत्रिक कामाचा समावेश नसेल तेथे एका विभागातील कर्मचाऱ्याची, जेथे पूर्णतः भिन्न काम असलेल्या विभागात बदली होते, अशा उदाहरणांमध्ये गुण आणि नैसर्गिक कल या सिद्धांताला पुष्टी देणारे काही नाही. बहुसंख लोक त्यांच्या जन्मजात गुणानुसार व्यवसाय निवडीत नाहीत. जो काही व्यवसाय असेल त्याच्याशी कशीबशी तडजोड करतात. एकंदरीत चांगला पगार देणाऱ्या नोकऱ्यांसाठी स्पर्धा असते. जन्मजात गुण, स्वभाव किंवा मानसिकता याविषयी बोलणे वायफळ आहे. जर 'स्वधर्म' कमाल पैसा आणि किमान काम असणारी नोकरी दर्शवीत असेल तर ते हास्यास्पद नाही का?

-----

## प्रकरण - ५

# एक चुकीची कल्पना

वर्णाश्रमपद्धतीत ब्राह्मणांना इतरांपेक्षा अधिक सुखसोयी असतात आणि इतरांपेक्षा कमी श्रम करीत असून त्याचे उत्पन्न अधिक असते अशी चुकीची कल्पना सध्या प्रचलित आहे.

आपल्या शास्त्राने केलेल्या व्यवस्थेत ब्राह्मणाला शेतकऱ्याइतकेच श्रम करावे लागतात. त्याला किती संस्कार करावे लागतात याचे हल्ली ज्ञान नसल्याने लोक चुकीने मानतात की तो इतरांना कामाला लावतो आणि स्वतः आरामात राहतो. ब्राह्मणाला पहाटे चारला उठावे लागते आणि पाऊस असो वा ऊन, उकाडा असो वा थंडी असो त्याला गार पाण्याने स्नान करावे लागते. नंतर खंड पडू न देता एकापाठोपाठ एक विधी करावे लागतात : संध्यावंदना, ब्रह्मयज्ञ, औपासन, पूजा, वैश्वदेव आणि २१ यज्ञांपैकी एक. तुम्ही चार दिवस यज्ञाग्नीपुढे बसलात तर तो धूर आणि उष्णता यामुळे ते किती कठीण आहे हे तुम्हाला कळेल. किती व्रते आणि उपवास ब्राह्मणाला करावे लागतात आणि किती स्नाने करावी लागतात.

इतर जातींना अशा कष्टातून जावे लागत नाही. शेतकऱ्यासारखा तो सकाळी गार भात खाऊ शकत नाही, त्याला तसा हक्क नाही. त्याच्या सोयीनुसार किंवा लाभासाठी, किंवा त्याला आरामशीर जीवनाची ग्वाही देण्यासाठी धर्मशास्त्रे निर्माण केलेली नाहीत. नाही तर त्याने स्वतःवर अशा अनेक विधी करण्याचे कार्य आणि कठोर शिस्तीचे जीवन लादून घेतले नसते. जेव्हा तो दुपारचे जेवण घेतो त्यावेळेस १ किंवा २ वाजलेले असतात (श्राद्धाच्यादिवशी ३ ते ४ वाजतात). यावेळेस शेतकरी जेथे तो काम करतो त्या शेतात जेवणानंतर झाडाखाली विश्रांती घेत असतो. आणि लक्षात घ्या, ब्राह्मणाचे जेवण शेतकऱ्याच्याइतकेच साधे असते. शेतकऱ्याचे आणि ब्राह्मणाचे साधेसुधे निवासस्थान यात फरक नसतो. दोघेही सुती वस्त्रे परिधान करतात. शेतकरी भविष्यासाठी पैशाची बचत करू शकतो पण ब्राह्मण नाही. त्याला उसने पैसे घेण्याचा किंवा थाटामाटात राहण्याचा अधिकार नाही.

महाभारतातील 'यक्ष-प्रश्नात' ब्राह्मणाच्या साध्या जीवनाचा संदर्भ आहे :

पञ्चमे'हनि षष्टे व शाकं पचति स्वेगृहे। अनृणी च अप्रवासी च स वारीचर मोदते।।

जर दिवसाच्या कालाचे आठ भाग पाडले तर ब्राह्मणाला ५व्या किंवा ६व्या भागात सर्व विधी झाल्यावर भोजन घेता येते. त्यापूर्वी तो न्याहरी किंवा अल्पोपाहार घेत नाही. आणि तो काय खातो? कोणते पौष्टिक अन्न नाही, बदामाच्या खिरीसारखे गोडधोड नाही. ''शाकं पचति''- ब्राह्मण नदीच्या काठावर उगवलेली पालेभाजी खातो असा प्रदेश कोणाच्याही मालकीचा नसतो. त्याला नदीच्याकाठी राहण्यास का सांगण्यात आलेले आहे? त्याला वारंवार

स्नान करायचे असते आणि तेथे मुक्त वाढणारी पालेभाजी आणि त्यासाठी त्याला भिक्षा मागावी लागत नाही. त्याने उसने पैसे घेता कामा नयेः हा 'अनृणी' शब्दाचा अर्थ आहे कारण त्याला उसने घेण्याची सवय लागली तर त्याला चैनीचे जीवन जगण्याची सवय लागेल. गरिबी आणि अपरिग्रह ही त्याची उद्दिष्टे असतात. ब्राह्मणाने गरजेपेक्षा जास्त गवताचे पातेही ठेवता कामा नये.

अगदी सरकार आणि मोठे उद्योगपतीही कर्जात असतात. कर्ज नसलेली आणि कोणापुढे न झुकणारी, धर्माचे पालन करणारी, आणि शास्त्राप्रमाणे जीवन जगणारी जी जमात असते तिला नरिकुरवस म्हटले जाते.

'अपप्रवासम्' (श्लोकात म्हटले आहे) म्हणजे ब्राह्मणाने आपली जन्मभूमी सोडून जाऊन अन्यत्र कोठे स्थायिक होऊ नये. मान मिळो वा ना मिळो, लाभ होवो अथवा नुकसान होवो, त्याने जन्मभूमीत धर्मपालन करीत राहिले पाहिजे. हल्ली पैशासाठी लोक मातृभूमी, त्यांची पारंपरिक जीवनपद्धती सोडून इंग्लंड किंवा अमेरिकेमध्ये राहतात - आणि त्यांना त्याचा अभिमान वाटतो. अशा आचरणाचा शास्त्राने जोरदार निषेध केला आहे.

जर सर्व जातींनी भरपूर कष्ट केले आणि साधे जीवन जगले तर लोकांमध्ये कुवासना राहणार नाही आणि जाती नष्ट कराव्यात अशी हाकाटी राहणार नाही. हल्ली एक जात सुखवस्तू आणि दुसरी गरीब, जिला कष्ट करीत राहावे लागते. साधेसुधेपणा आणि श्रम हे समाधान आणि अंतरंगातील शुद्धता देतात. अशा प्रकारचे साधे आणि सुखी जीवन आपल्या देशात हजारो-हजारे वर्षे होते.

मी म्हणालो की हल्ली माणसाच्या गुणानुसार आणि नैसर्गिक कलानुसार व्यवसाय निवडले जात नाहीत. फक्त पैसा आणि सुख यांचा विचार होतो. सर्व लोक सर्वप्रकारच्या नोकरीचा शोध घेतात आणि त्याचा परिणाम शत्रुत्व आणि मत्सर यात झाला आहे, बेकारीचे तर काही विचारूच नका.

प्रारंभी जेव्हा व्यवसाय जन्मावर ठरविला जात असे तेव्हा त्या माणसाला त्याच्यावर सोपविलेल्या कामात गोडी निर्माण होई. त्याची शिकण्याची कुवत वाढे. आता अशी परिस्थिती नाही. भूतकाळात व्यवसाय हा पैतृक वारसा होता आणि तो साहजिकच त्यात कुशल असे. आता वैश्विक अकार्यक्षमता आणि असमर्थता आहे.

-----

## प्रकरण - ६

# समान संधी

आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे हल्ली लोकांचे व्यवसाय त्यांच्या वैयक्तिक गुणांवर, त्यांचे कल आणि नैसर्गिक कल ठरवतात. हा मुद्दा आम्ही उचलून धरू शकत नाही. त्याचप्रमाणे सर्वांना समान संधी ही मागणीही असमर्थनीय आहे. उदाहरण म्हणून पहा : वैद्यकीय आणि अभियांत्रिकी महाविद्यालयात ठरावीक जागा असतात. उच्च वैशिष्ट्य असलेले आणि न्यूक्लिअर शास्त्रासारख्या विषयांसाठी फारच थोड्या जागा असतात. जेव्हा समान गुणवत्ता असलेले उमेदवार हे विषय शिकविल्या जाणाऱ्या महाविद्यालयात प्रवेशासाठी अर्ज करतात, तेव्हा फक्त एका ठरावीक संख्येने ते निवडले जातात. साहजिकच सर्वांना निवडणे अव्यवहार्य आहे. समान गुणवत्ता असलेले, ज्यांना अणू विज्ञानासारख्या नवीन विषयात संशोधन करायचे आहे अशांना संधी द्यायला हवी. यासाठी भांडणे योग्य होतील का? जे शासनातील उच्चपदांसाठी अर्ज करतात त्यांची जरी थोडीफार गुणवत्ता सारखी असली तरी त्यांची नेमणुकांसाठी निवड होत नाही. आपल्याला इतके डॉक्टर हवेत, इतके शास्त्रज्ञ हवेत, इतके विशेषज्ञ हवेत आणि इतके अधिकारी हवेत असे शासन ठरविते. त्या निवडण्यात साहजिकच अनेक उमेदवार नाकारले जातात. ही व्यवस्था सर्वत्र स्वीकारली जाते.

जसे एका ठरावीक प्रमाणातील उमेदवार पुरेसे आहेत असा विचार करून, महाविद्यालयातील जागांसाठी किंवा शासनातील नेमणुकांसाठी उमेदवार निवडले जातात, त्याचप्रकारे मानवजातीच्या कल्याणासाठी दैवी शक्ती जागृत करण्यासाठी विधी करण्याच्या हेतूने निवडले जातात - ते थोडेच वारशाच्या आधारे कार्य करतात. अशा कामाला फारसे लोक लागत नाहीत. कारण नाहीतर समाजासाठी लागणाऱ्या इतर कामांवर त्याचा परिणाम होईल. याच तत्त्वावर व्यवसायांचे विभाजन केले जाते. अगदी ऐहिक गोष्टीत फार थोडी जागा आहे हे न जाणता लोक धार्मिक बाबतीतील समान संधीच्या अंमलबजावणीसाठी आंदोलने करतात (फ्रेंच राज्यक्रांतीचे फळ).

-----

## प्रकरण - ७

# ऐक्याचे सामर्थ्य

इतक्या जाती आहेत, प्रत्येक जात इतरांपासून दूर राहते तर एकंदरीत समाज कसा एक राहील? पण वस्तुस्थिती अशी आहे की भूतकाळात ऐक्य होते. आपला समाज आता विभागलेला आहे तो विविध समूहातील शत्रुत्वामुळे. भूतकाळात बांधून ठेवणारा घटक आपली धर्मावरची आणि धार्मिक ग्रंथावरील श्रद्धा होती. जे संपूर्ण खेड्याचे किंवा शहराचे असे आणि मध्यवर्ती ठिकाण असे अशा मंदिरांनी ही श्रद्धेची आणि ऐक्याची भावना वाढविली. परमेश्वराची मुले म्हणून त्याच्या उपस्थितीत लोकांमध्ये एकीची भावना असे. सर्व जाती आपला विविध यशस्वी सहभाग सणांच्या प्रसंगी देत असत.

रथोत्सवात हरिजनांसह समाजाचे सर्व विभाग रथ एकत्र ओढत. घरी परतल्यावर जेवण करण्यापूर्वी स्नान करीत नसत. या प्रथेला शास्त्रात मान्यता आहे. (भूतकाळाबद्दल बोलायचे तर) समाज त्यांच्या व्यवसायांवर विभागलेला नव्हता तर सर्व एकदिलाचे होते. समाजात एकी नव्हती आणि तो अनेक जातींमध्ये विभागलेला होता अशा गोष्टी रचून सांगितल्या जातात. पण त्याकाळात लोकांचा शास्त्रांवर, मंदिरांवर विश्वास होता आणि हा विश्वास एकीचे बळ होता. उपहासाने म्हणायचे तर, हल्ली ऐक्याच्या नावाखाली विविध जातींमध्ये द्वेष आणि शत्रुत्व यांचा प्रसार केला जातो. म्हणूनच जातीविरुद्धची ओरड ही वैदिक धर्म आणि मंदिरांविरुद्ध ओरड होते.

वेदच जाहीर करतात की जेव्हा मनुष्य उच्चस्थान प्राप्त करतो तेव्हा त्याला वेद आणि मंदिरांची गरज भासत नाही. उपनिषदे म्हणतात की ज्ञानाच्या किंवा परमज्ञानाच्या अवस्थेत वेद हे वेद नसतात, ब्राह्मण हा ब्राह्मण नसतो, अस्पृश्य हा अस्पृश्य नसतो. यास्थितीला पोहोचण्यासाठी - ज्या स्थितीत वेद आणि समाजातील सर्व भेद थांबतात - तुम्हाला वेद, मंदिरे आणि जातिभेदाची गरज असते. हे ध्यानात घ्यावे की पूर्ण अभेदाची स्थिती याच साधनांद्वारे जाणली जाते.

जो ऐहिक अस्तित्वापासून मुक्त होण्याचा सतत प्रयत्न करतो त्याला प्रत्येक गोष्ट एकच आहे हे लक्षात येते असे वेद म्हणतात. कृष्ण परमात्मा हेच सत्य सांगतो, शेवटी अकर्म असते -

> ''यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।
> आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।।''
> भगवद्गीता ३.१७

या कर्मे आणि दैनंदिन कार्यासह असलेल्या इंद्रियगोचर विश्वात भेद नाही असा दावा

करण्यात काही अर्थ नाही. शास्त्रे आपल्याला असे शिकवितात की अशा जगात आपली हृदये सर्व जातींच्या, सर्व सजीवांच्या प्रेमाने भारलेली असली पाहिजेत आणि आपण एकापेक्षा दुसरा कनिष्ठ किंवा श्रेष्ठ असे न मानता सर्वांकडे समानतेने पाहिले पाहिजे. म्हणजे प्रेमात अभिन्नत्व, कर्मात नाही. ''आपल्याला आतून वाटले पाहिजे की आपण सर्व एकच आहोत आणि आपल्यात सर्वांबद्दलचे प्रेम भिनले पाहिजे. पण कर्म, कृती यात भेद असलाच पाहिजे.'' असा आपल्या शास्त्रांचा उपदेश आहे.

''भावाद्वैतं सदा कुर्यात, क्रियाद्वैतं न कारयेत्'' असे म्हटले जाते. एकता ही भावनेची असली पाहिजे, कर्माची नव्हे. बाह्यगोष्टींमध्ये भेद ठेवल्याशिवाय जगाचा कारभार शिस्तीने किंवा योग्य पद्धतीने चालणार नाही. तेव्हाच आत्मिक शोध मानसिक गोंधळाशिवाय आणि मानसिकदृष्ट्या अस्वस्थ न होता चालू राहील. सनातन धर्मात भौतिक जगाची अशी व्यवस्था लावली आहे की अंतिम हेतूसाठी जरी ते सत्य असले तरी ते असत्य आहे असे जाणून अनुभवले पाहिजे.

या ऐहिक जगात, चार वर्णांच्या अनेक शाखा झाल्या आणि अनेक जाती अस्तित्वात आल्या. सप्तस्वरांमधून ७२ मेळकर्ता राग निर्माण झाले. आणि त्यापासून असंख्य अन्य राग म्हटले जाणारे प्रकार आहे. त्याचप्रकारे चार वर्णांतून असंख्य जाती जन्माला आल्या. या जातींसाठी स्वतंत्र धर्म, स्वतंत्र परंपरा आणि संस्कार उदय पावले.

-----

## प्रकरण - ८

# हिंदुत्व आणि अन्य धर्म

आपल्या हिंदू समाजातील भेदांबद्दल वाईट वाटते, विशेषतः जेव्हा आपल्यासारखे इतर धर्मांतील अनुयायी विभागलेले नाहीत असे जेव्हा वाटते तेव्हा. ते त्याबाबतीत हिंदुत्वाचा तिरस्कार करतात आणि काही हिंदूंनाही वाटते की आपल्या समाजातील भेद अन्यायकारक आहेत. पण तुम्ही यावर थोडा विचार केला तर तुम्हाला जाणवेल की आपली संस्कृती इतिहापूर्वकाळापासून आजतागायत, जी आपल्या समाजातील भेदांमुळे, वर्णधर्माच्या भेदामुळे टिकली.

इतर धर्मांतही, जरी त्यांच्या ग्रंथांनुसार जाती नसल्या तरी जमाती विभागलेल्या आहेत. काही विभाग जवळ-जवळ जातीच आहेत आणि ते एकमेकांत विवाह करीत नाहीत. ख्रिश्चनांमध्ये कॅथॉलिक, प्रॉटिस्टंट आणि ऑर्थोडॉक्स चर्चचे (ग्रीक) अनुयायी आहेत. हिंदू कर्माच्या आधारावर विभागलेले आहेत पण अन्य स्तरावर एक आहेत. इतर धर्माचे अनुयायी जरी विभागलेले असले तरी आपल्याबद्दल वाईट बोलतात. तथापि त्यांच्या टीकेला आपण योग्य रीतीने उत्तर देत नाही.

-----

## प्रकरण - ९

# सनातन धर्म

इतर धर्मातील नैतिक नियम त्यांच्या सर्व अनुयायांना लागू पडतात. हिंदुधर्मातही सर्व वर्ण आणि सर्व जातींसाठी असलेली आचारसंहिता आहे. शिवाय विविध व्यवसायांतील जातींसाठी स्वतंत्र धर्म आहेत. हे व्यवसाय आणि त्यांचे धर्म हे एकमेकांत मिसळलेली नाहीत. ही बाब हिंदुधर्मात मध्यवर्ती आणि सनातन गुणवैशिष्ट्याची आहे.

या धर्माची दीर्घकाळ भरभराट झाली. त्याच्या विशेष अशा दीर्घ इतिहासाचे कारण काय? जर हिंदुधर्म इतका काळ टिकला तर त्यात काहीतरी अद्वितीय गुण असले पाहिजे आणि काहीतरी त्याला आधार देणारे आणि चालू ठेवील असे त्यात काहीतरी असले पाहिजे. मी जेव्हा आपल्या धर्माचा विचार करतो तेव्हा मला आपल्या मंदिरांची आठवण होते. ती चर्च आणि मशिदींसारखी स्वच्छ ठेवली जात नाहीत. मशिदींना नेहमी पांढरा रंग दिला जातो. गोपुरांवर अनेक रोपे उगवलेली दिसतात आणि आपली मंदिरे त्यांना आधार देतात. इतर धर्मांची पूजास्थाने दर दोन-तीन वर्षांनी दुरुस्त करावी लागतात. आपली तीर्थक्षेत्रे वेगळी आहेत आणि ती काळ्या पाषाणाने बांधलेली असतात. हजारो वर्षांपूर्वी पाया घातलेली ती मंदिरे अजूनही भक्कम आहेत. म्हणूनच आपली मंदिरे वारंवार दुरुस्ती करावी न लागता इतका काळ टिकली आहेतच. भारतात सर्वात प्राचीन मंदिरे आहेत हे सर्वांना मान्य आहे. त्यांचे फोटो घेण्यासाठी परदेशातून लोक येतात. आपले दुर्लक्ष आणि बेफिकीरी असूनही ती आपल्या संस्कृतीची स्मारके म्हणून उभी आहेत. ती भंग करणे सोपे नाही. कदाचित ती बांधण्यापेक्षा पाडणे अधिक कठीण असले पाहिजे.

पुन्हा सांगायचे तर आपला धर्म या मंदिराप्रमाणे आहे. आपल्याला माहीत नसलेल्या, जे इतर धर्मात नाही अशा काहीएक गोष्टीने आधार दिलेला आहे. या 'काहीतरी'मुळेच सर्व भेद असूनही तो अजून जिवंत आहे.

हे काहीतरी म्हणजे वर्णाश्रम धर्म होय. इतर धर्मांमध्ये सर्वांसाठी एक सामाईक धर्म असतो आणि आपल्याला वाटते की त्यांच्या महानतेचे तेच कारण आहे. एकेकाळी हे धर्म वैभवाच्या परम शिखरावर असलेले दिसतात पण नंतर ते अधोगतीला गेले. काही देशांमध्ये ख्रिश्चॅनिटीने बुद्ध धर्माची जागा घेतली. इस्लामने ख्रिश्चॅनिटीची जागा घेतली किंवा ख्रिश्चॅनिटीने इस्लामची जागा घेतली. ऐतिहासिक घटना म्हणून आपल्याला या घडामोडी माहीत आहेत. प्राचीन ग्रीस आणि चीनमध्ये उत्क्रांत झालेल्या संस्कृती आणि धर्म आज अस्तित्वात नाहीत. हिंदुधर्म इतर धर्मातील या सर्व घडामोडींचा साक्षी आहे आणि त्यावर आतून-बाहेरून हल्ले होत आहेत. तरी तो जिवंत आहे - तो नाश पावण्याचे नाकारतो.

वेलीने वेढलेले एक नारळाचे झाड होते. वेल भराभर वाढली आणि काही महिन्यांत तिने संपूर्ण झाडाला वेढले. ''या सर्व महिन्यांत हे नारळाचे झाड थोडेसेच वाढले,'' वेल हसून म्हणाली. नारळाच्या झाडाने टोमणा मारला : ''मी माझ्या आयुष्यात दहा हजार वेली पाहिल्यात. तुझ्यापूर्वी तू जे आता म्हणालीस तेच प्रत्येक वेलीने म्हटले. मला कळत नाही तुला काय म्हणावे ?'' आपला धर्म इतर धर्मांशी तुलना करता या झाडासारखा आहे.

जरी आपल्या धर्मातील भिन्न जातींकरता स्वतंत्र कर्तव्ये, कर्मे आणि धार्मिक संस्कार असले तरी संस्काराचे फळ सर्वांसाठी एकाच प्रकारचे असते.

-----

## प्रकरण - १०

# ब्राह्मण ही विशेष अधिकार असलेली जात नव्हे

ब्राह्मणांनी त्यांच्या लाभासाठी शास्त्रे निर्माण केली असा आरोप केला जातो. जेव्हा तुम्ही वस्तुस्थिती समजून घ्याल की शास्त्राने सर्वात कठोर जीवनाचे नियम त्यांच्यावर लादले आहेत तेव्हा तुम्हाला जाणवेल की हा आरोप निराधार आहे. धर्मशास्त्राच्या निःपक्षपातीपणाचा एक पुरावा म्हणजे सर्व कला आणि ज्ञानाच्या सर्व शाखांमध्ये कुशल असावा अशी अपेक्षा असलेला ब्राह्मण इतरांना शिक्षण देऊ शकतो, पण कितीही लाभदायक असो आणि वेदधर्मापेक्षा कितीही कमी मागणी असो तो त्याच्या चरितार्थासाठी (व्यवसाय) स्वीकारू शकत नाही.

आजकाल असा दावा केला जातो की सर्व क्षेत्रांत सर्व लोक समान आहेत, सर्व कायद्यापुढे समान आहेत. परंतु कायदे मंडळाचे सभासद, न्यायाधीश इ. काही ठरावीक हक्क प्राप्त करतात आणि त्यांना सामान्य माणसाच्या स्तरासारखी वर्तणूक मिळत नाही. हे हक्क खरेच अनेक झालेले आहेत. जर एखाद्याने न्यायाधीशावर टीका केली तर त्याच्यावर न्यायालयाच्या अवमानाचा आरोप ठेवला जाईल. अगदी माझ्यावरही माझ्या शेऱ्यांमुळे आरोप होईल. जे लोक स्वतःला लोकशाहीवादी आणि समाजवादी समजतात त्यांनी स्वतःला, जे सामान्य लोकांना अधिकार नाहीत अशा विशेष सवलती, विशेष रेल्वे पास इ. मिळण्याची व्यवस्था केली आहे. उलट ज्यांनी धर्मशास्त्रे जतन करून ठेवली त्या ब्राह्मणांनी स्वतः कठोर शिस्त आणि जणू काही धर्माचरणाच्या भट्टीत स्वतःला भाजून काढले आहे. जर ब्राह्मणांची शुद्धता, पावित्र्य कोणाकडून बिघडविले तर तो स्वतःला स्नान करून आणि उपवास करून शिक्षा करतो.

ब्राह्मण वेदाच्या चौदा शाखांमध्ये प्रवीण असला पाहिजे. तो गांधर्व-वेद किंवा संगीत यातही कुशल असला पाहिजे आणि त्याला शेतीशास्त्र, घरबांधणी इ.चा परिचय हवा. त्याचवेळेस त्या त्या विषयांचे ज्ञान त्या त्या जातीतील विद्यार्थ्यांना दिले पाहिजे. त्याचा स्वतःचा व्यवसाय वेदांचा अभ्यास हा आहे आणि त्याला उत्पन्नाचे स्वतःचे कोणतेही साधन असत नाही.

विश्वामित्र हा धनुर्वेदात कुशल होता. जेव्हा तो यज्ञ करीत असे तेव्हा सुबाहु आणि मारिच हे राक्षस व्यत्यय आणीत. जरी तो स्वतः थोर योद्धा होता तरी त्याने स्वतः त्यांना हाकलून लावण्याचा प्रयत्न केला नाही. त्याऐवजी त्याने राम आणि लक्ष्मण यांना आणले. विश्वामित्राने त्यानंतर त्या दोघांना अस्त्र आणि शस्त्र यांच्या वापराचे ज्ञान दिले.

जर एखाद्या ब्राह्मणाला विचारले, "तुम्हाला सुरा चालविता येतो का?" तर तो उत्तर

देऊ शकला पाहिजे, ''होय, मला माहीत आहे.'' जर त्याला विचारले, 'तुला चित्र काढता आणि रंगविता येते का?' पुन्हा त्याने म्हटले पाहिजे, ''होय.'' पण उपजीविकेसाठी तो सुरा चालवू शकत नाही किंवा चित्रकार बनू शकत नाही. तो या सर्व कला शिकवू शकतो आणि जातीनुसार इतरांना शिकवू शकतो. स्वतःचा चरितार्थ चालविण्यासाठी त्याला दक्षिणा स्वीकारण्याची अनुमती होती आणि कितीही थोडी रक्कम असो त्यात त्याने समाधान मानले पाहिजे. ब्राह्मणाचे वैशिष्ट्य, त्याचा खरा व्यवसाय म्हणजे वेदाध्ययन.

जर काही ठरावीक जातीचे सदस्य काही हक्क मिळविताना दिसतात तर त्यासाठी काहीतरी एक कारण असलेच पाहिजे. तिकिटे विकणाऱ्या माणसाला स्वतःसाठी एक खोली असते आणि जे ती विकत घेतात त्यांना बाहेर उभे लागते आणि समानतेच्या तत्त्वाविरुद्ध हा गुन्हा आहे असे म्हणत ते तक्रार करू शकत नाहीत. या समानतेच्या सबबीखाली प्रत्येकाला त्याची कर्तव्ये पार पाडण्यासाठी काही विशेष सोय असते. एकत्र कुटुंबातील एखादा सभासद आजारी पडला तर त्याला विशेष सुविधा दिल्या जातात - इतर सभासदांनी त्या मागणे हे न्याय्य नाही. आपल्या धर्मात सर्वांना समान आहेत अशी अनेक कर्तव्ये आणि विधी आहेत. परंतु विशेष कर्तव्ये पार पाडण्यासाठी ठरावीक सुविधांची गरज असते. वस्तुतः ज्याला सुविधा म्हटले जाते त्या प्रत्यक्षतः सुविधा किंवा हक्क नसतात आणि त्या समाजाच्या कल्याणाशी संबंधित असलेल्या जातीची कर्तव्ये पार पाडण्यासाठी आवश्यक असतात. हे सत्य स्वीकारणे महत्त्वाचे आहे. कोणत्याही जातीचा विशेष असा धर्म त्या जातीतील लोकांसाठी फक्त असतो असे नाही तर सर्व समाजासाठी असतो.

प्रेम हृदयातून आले पाहिजे. त्याचप्रमाणे ऐक्यही. सर्व जाती एक होऊन ऐक्य मिळणार नाही. जेथे एकमेकांतील विवाहांना बंदी नाही आणि सर्व लोक एकमेकांत मिसळतात अशा पाश्चात्त्य देशात आपल्याला काय दिसते? तेथील लोकांत खूप शत्रुत्व आणि द्वेष आहे. आपल्या शास्त्रानुसार भूतकाळात प्रत्येकजण स्वतःचे कर्तव्य करीत असे आणि अशा प्रकारे ते एकीने राहात. सून सासऱ्याशी आदरापोटी (मोकळेपणाने) बोलत नाही. अशा आदराला वाईट म्हणाल का? जर आपल्याजवळचे कोणी आपल्या जातीतील कोणाला सुतक असेल तर आपण त्याला शिवत नाही. त्याचा अर्थ असा आहे का की आपल्याला तो आवडत नाही. असे दिसते की आपण सर्व मनाने गोंधळलेलो आहोत आणि आपल्या भिन्नभिन्न धर्माची आपल्याला योग्य अशी समज नाही.

-----

## प्रकरण - ११

# विश्व कल्याण

धार्मिक ग्रंथांनुसार ब्राह्मणाने रोज घरासमोर वैश्वदेव केला पाहिजे - पंचमाला बळी हा त्या विधीचा एक भाग आहे. वैदिक विधींचे उद्दिष्ट मानवाचे सुख आहे, सर्व लोकांचे सुख (लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु) वेदध्वनी त्याचप्रमाणे वैदिक यज्ञ विश्व कल्याण करतात.

राज्यकर्ता म्हणून क्षत्रिय युद्ध करतो आणि सर्व नागरिकांच्या सुरक्षिततेसाठी पहारा देतो. वैश्यही समाजाची सेवा करतो - तो सर्व लाभ स्वतःच्या घरी नेतो असा विचार करणे अयोग्य आहे. भगवान गीतेत वैश्य धर्माविषयी म्हणतो, "कृषि-गौरक्ष-वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं -भगवद्गीता १८.४४" तिसऱ्या वर्णाला तीन कर्तव्ये आहेत - पिके काढणे, गोसंरक्षण आणि व्यापार - तो लोकांच्या भल्यासाठी पार पाडतो. वैश्य शेत नांगरतो आणि संपूर्ण समाजासाठी पिके काढतो. तसेच त्याच्या गायींनी दिलेले दूध सर्वांसाठी आणि यज्ञासाठी असते. वैश्याने वासरांना दूध मिळते की नाही हे पाहिले पाहिजे. व्यापारी म्हणून इतर ठिकाणांहून तो आपल्या गावी विकण्यासाठी वस्तू मिळवितो.

एखादा मनुष्य कितीही श्रीमंत असो तो त्याच्या पैशावर जगू शकत नाही. त्याला आवश्यक त्या वस्तूंसाठी व्यापाऱ्यांवर अवलंबून राहावे लागते. व्यापार हा वैश्यांचा धर्म आहे आणि तो न करणे हा त्याचा अपराध असतो. त्याचप्रमाणे जर ब्राह्मणाने वैदिक विधी सोडले आणि इतर कामे करून पैसा मिळविला तर तो अपराध करीत असतो. व्यापारी फक्त त्याच्यासाठीच व्यापार करतो असे मानणे चूक आहे. कल्पना करा, हरताळ आहे आणि सर्व दुकाने एक आठवडा बंद आहेत तर काय होईल? अर्थात् आवश्यक त्या वस्तू सहजपणे मिळाल्या नाहीत तर लोकांना किती त्रास होईल. आपला व्यवसाय हा ईश्वराने दिलेला आहे आणि तोही संपूर्ण समाजाच्या भल्यासाठी, या श्रद्धेने वैश्याने त्याचा व्यवसाय केला पाहिजे.

-----

## प्रकरण - १२

# चौथ्या वर्णाला त्याचे स्वतःचे लाभ आहेत

चौथ्या वर्णाच्या धर्मात, त्याच्या आचरणात शारीरिक कष्टाचा आणि प्रयत्नांचा समावेश असतो. बाह्यतः असे वाटते की इतरांसारखा सामाजिक दर्जा आणि सुखसुविधा त्याला मिळत नाहीत. आपण नोंद घेतली पाहिजे की ज्या शिस्त आणि विधींनी इतरांना बांधून ठेवले आहे अशा गोष्टींपासून ते तुलनेने मुक्त आहेत. भूतकाळात ईश्वराच्या जवळ राहिल्याने त्यांना इतर जातींपेक्षा अधिक समाधान होते. वैश्य स्वतः म्हणतो, '' कलिः साधुः, शूद्रः साधुः'' (इतर युगांच्या तुलनेने कलियुग गौण नाही, शुद्रही इतरांपेक्षा गौण नाहीत. कलीला खरेच उच्चपदी नेले आहे आणि शूद्रांची स्तुती केलेली आहे.) इतर युगात परमात्मा कसाबसा चिंतन, तप आणि पूजा यांनी प्राप्त होतो. पण कलियुगात तो केवळ नामसंकीर्तनाने प्राप्त करता येतो. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांना स्वाभिमान असू शकतो. त्यामुळे ते आत्मिक मुक्ती सहज प्राप्त करू शकत नाहीत. ब्राह्मण त्याचे बौद्धिक वर्चस्व, क्षत्रिय त्याच्या राज्य करण्याच्या सामर्थ्याने आणि वैश्य त्याच्या संपत्तीमुळे व्यर्थ ठरू शकतात. म्हणून हे तीन वर्ण धर्ममार्गापासून भलतीकडे जाऊ शकतात. उलट, चौथ्या वर्णाचा सदस्य नम्र असतो.

वळ्ळुवर म्हणाले नाहीत का, ''नम्रता एखाद्याला ईश्वराप्रत नेते.'' नम्र असल्यामुळे शूद्र ईश्वराच्याजवळ राहतात. एखादा त्याच्या अहंकाराचा विषय असू नये. अहंकार नष्ट करण्यासाठी आणि ईश्वरी कृपा संपादन करण्यासाठी पहिल्या तीन जातींना वेदाध्ययन आणि वैदिक विधी करावे लागतात. वैदिक विधी करताना त्यांना अन्न, सवयी अशाबाबतीत अनेक बंधने पाळावी लागतात. केवळ या शिस्तीच्या पथ्यामुळे वैदिक धर्म म्हटले जाणारे औषध गुणकारी ठरेल. वैयक्तिक आचरणातील आणि धार्मिक जीवनातील नियम पाळण्यातील चूक हा मोठा अपराध असेल आणि त्याची किंमत दुःख असेल, म्हणून पहिल्या तीन जातींना धार्मिक आचरणात काळजी घ्यावी लागते. चौथा वर्ण या निर्बंधनापासून मुक्त असतो. शूद्राने केलेले कष्ट त्याला आतून शुद्ध करतात : हे वैदिक आचरण आहे, तोच त्याचा देव आहे : त्याद्वारेच तो सहजपणे पूर्णत्व मिळवितो. म्हणून व्यास दोन्ही हात उंचावून म्हणतात, ''शूद्रः साधुः''

जर शूद्राला पोट भरण्यास पुरेसे अन्न नसेल, जर त्याला पुरेशी वस्त्रे नसतील आणि त्याला पाऊस आणि उन्हापासून निवारा घेण्यास डोक्यावर छप्पर नसेल तर संपूर्ण समाज आणि शासनाला जबाबदार धरले पाहिजे - आणि दोघांना अपराधी मानले पाहिजे.

मी पुन्हा सांगतो, ब्राह्मणाला शूद्रापेक्षा अधिक चांगले चरितार्थाचे साधन नव्हते. तो चौथ्या वर्णातील सदस्यांपेक्षा अधिक सोयीचे सुख घेत नव्हता.

-----

## प्रकरण - १३

# अहंकाराचे निर्मूलन

"सर्व चांगले आहे. पण आत्मसन्मानाचे काय?" परिवर्तनवादी म्हणविणारे विचारतात. त्यांनी असा प्रश्न उपस्थित करणे हे त्यांनी त्यांच्या आदर्शांशी प्रामाणिक न राहणे होय. श्रमप्रतिष्ठेविषयी ते खूप बोलतात, नाही का? ते म्हणतात, कोणतीही नोकरी, कोणतेही काम अप्रतिष्ठा करणारे नाही. गांधीजी स्वतः स्वतःचे शौचालय स्वच्छ करीत. जुलै १९३७ मध्ये ब्रिटिशांनी भारत सरकारला प्रांतीय स्वायत्तता दिली तेव्हा मद्रास प्रांताचे मुख्यमंत्री झालेले, १९४७ मध्ये भारत स्वतंत्र झाल्यावर गव्हर्नर जनरल झालेले राजगोपालीचारी स्वःतचे कपडे स्वतः धूत. श्रमप्रतिष्ठा दाखवून देण्यासाठी नगराध्यक्षासारख्या महत्त्वाच्या व्यक्ती वर्षातून एक दिवस रस्तेसफाई करतात. असे काम करणाऱ्या महत्त्वाच्या माणसांचे फोटो वृत्तपत्रात प्रसिद्ध होतात. जर परिवर्तनवाद्यांना हाताने करायचे श्रम अप्रतिष्ठा करणारे आहेत असे वाटत असेल तर ते त्यांनीच उचलून धरलेल्या त्यांच्या आदर्शांना विरोध करतात असा त्याचा अर्थ आहे.

तुम्ही जर मला विचाराल तर अहंकार हा सामाजिक प्रतिष्ठा, आत्मसम्मान अशा कल्पना व्यापून टाकतो. या प्रश्नाकडे तुम्ही एका दृष्टिकोनातून पाहिले तर शुद्राला ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्या संबंधाने आत्मगौरव नसतो. तर तुम्हाला व्यासांची घोषणा "शूद्रः साधुः" हे लक्षात येईल. सर्व प्रकारची कामे तितकीच उदात्त आहेत असे समानतावाद्यांइतकेच शास्त्रेही म्हणतात. जर समाजवादी असे भौतिक दृष्टिकोनातून म्हणत असतील तर शास्त्रे आध्यात्मिक दृष्टिकोनातून म्हणतात. स्पष्ट करायचे झाले तर मानवाचे कल्याण निरनिराळ्या कर्मांवर अवलंबून असल्याने एक कर्म दुसऱ्यापेक्षा गौण किंवा सरस असण्याचा प्रश्नच नाही. जर ईश्वरी प्रसाद समजून प्रत्येकाने आपल्या वाट्याला आलेले काम केले तर सर्वजणांना अंतःकरणशुद्धी लाभेल असे शास्त्रे म्हणतात. परमेश्वराला समर्पित होऊन जेव्हा एखादे काम केले जाते तेव्हा आपली जाणीव शुद्ध होते आणि ही शुद्धी म्हणजे आत्म्याची जाणीव होय.

तुम्ही आपल्या कामाकडे दोन दृष्टिकोनातून पाहू शकता. एक म्हणजे कोणतेही काम अप्रतिष्ठा करणारे नाही या तत्त्वाला अनुसरून असलेली श्रमप्रतिष्ठा. दुसरा म्हणजे कोणतेही कार्य असो ते ईश्वराला अर्पण करणे. या कोणत्याही बाबतीत आत्मसन्मानाला जागा नाही. जर एखाद्याच्या कर्तव्यात किंवा कामात अहंकार नसेल तर क्रोधाचे कारण असणार नाही. मानखंडना करणारे धार्मिक आचरण आमच्यावर सोपविले आहे असे वाटण्याचे कारण नाही. प्रत्येकाने आपल्या व्यवसायाप्रमाणे धार्मिक आज्ञा स्वीकारल्या पाहिजेत. हे नमूद करण्याजोगे आहे की जर ब्राह्मणाने क्षत्रिय आणि वैश्य यांच्यापद्धतीने शारीरिक सौख्य मिळविले तर त्याचे मंत्र गुणकारी ठरणार नाहीत. जर एखाद्या मजुराने ब्राह्मणासारखे उपवास केले तर तो त्याचे कर्तव्य पार पाडू शकणार नाही. म्हणजे तो त्याचे शारीरिक काम समाधानकारकरित्या करू

शकणार नाही.

एकदा एका विद्वानाने मला सांगितले ''शास्त्रानुसार ब्राह्मणाने शुभ्र, क्षत्रियाने लाल, वैश्याने पिवळे आणि शुद्राने निळे कपडे वापरले पाहिजेत. ''मला प्रथम वाटले की यात एक जात दुसरीपेक्षा गौण मानली आहे. विचार केल्यावर मला त्यामागे कारण असल्याचे आढळले. तोपर्यंत मीही त्यावर विचार केलेला नव्हता. म्हणून मी त्या पंडिताला, त्याने सांगितलेल्या या व्यवस्थेमागचे तत्त्व स्पष्ट करण्यास सांगितले. तो म्हणाला, ''पांढऱ्यावर किंचित डागही दिसतो. जेव्हा ब्राह्मण यज्ञ करतो तेव्हा त्याला काळजी घ्यावी लागते की तो काही सांडत नाही आणि वाया घालवत नाही. जर त्याने तसे केले तर त्याचे शुभ्र कपडे तसे दाखवतील. इतरांना पैसा विधी किंवा अन्य सामुग्रीसाठी द्यावा लागू नये म्हणून त्याला काटकसरीने राहावे लागे. क्षत्रिय, एक योद्धा म्हणून रक्त सांडतो, पण त्याच्या कपड्यावरील रक्ताचे डाग दिसू नयेत, त्यांनी इतरांना भय घालू नये - म्हणून त्याने लाल कपडे परिधान करावे. वैश्य बाजारात विविधप्रकारच्या वस्तू हाताळतो. पण सर्वात जास्त पिवळा रंग त्याच्या कपड्याला लागतो. पिवळे डाग सहजासहजी दिसू नयेत या हेतूने वैश्याने पिवळे कपडे वापरले पाहिजेत. जे लोक धुळीत आणि घाणीत काम करतात त्यांच्यासाठी निळा रंग सोयीस्कर आहे. आजच्या काळातही कामगारांचा वेश निळा असतो. म्हणून निळा हा शुद्रांना योग्य रंग आहे.'' प्रत्येकाच्या वेषामागील कारण आता तुम्हाला समजेल. शास्त्रे खरेच प्रत्येक जातीच्या सोयींकडे लक्ष देणारी आहे. जर हे तुम्ही समजून घेतले तर तुम्हाला एका म्हणीचा अर्थ समजेल, ''शास्त्राय च सुखाय च'' तुम्हाला अनेक धार्मिक नियमांचे आकलन होईल आणि जाणवेल की जो अर्थ तुम्हाला अजून समजलेला नाही असा खोल अर्थ नियमांचा असला पाहिजे.

आजकाल बुद्धिमान लोकांनादेखील निरनिराळ्या जातींच्या कर्माविषयी माहिती नाही. ''एका मनुष्याकडून केले गेलेले काम हे धर्माप्रमाणे पुण्यकारक आहे आणि तेच काम दुसऱ्याने केले तर ते धर्माविरुद्ध आणि पापकारक कसे आहे?'' असे ते मला विचारतात. जुन्याकाळी अशिक्षित लोकांना दुसऱ्या जातीचे काम आणि कर्तव्ये करणे हे पाप असल्याचे माहीत होते. कारण ते समाजाचे अहित करणारे असे. ते मंदिरातील उत्सवात आणि सार्वजनिक कर्तव्यात एकत्र काम करीत पण अन्न आणि इतर बाबींमध्ये ते एकमेकात मिसळत नसत. कारण असे मिसळणे परंपरागत व्यवसायाला हानिकारक असल्याचे त्यांना माहीत होते. त्यांना माहीत होते की जातिसंकर संपूर्ण समाजाच्या हितासाठी असलेल्या व्यवसायव्यवस्था ढासळून टाकेल. हजारो वर्षे सर्व जाती या व्यवस्थेप्रमाणे, त्यात सौख्य आणि समाधान मिळवित राहिल्या. त्यांना जर यात सुख आणि समाधान आढळले नसते तर त्यांनी नक्कीच या व्यवस्थेविरुद्ध बंड केले असते.

ब्रिटिश अमलाच्या आरंभाबरोबर ब्राह्मणांनी वतनाच्या जमिनी गमावल्या पण त्यांनी

शासनात नोकऱ्या मिळविल्या. यांत्रिकीकरण आणि नागरीकरणामुळे हस्तोद्योग नष्ट झाले आणि ग्रामीण जीवनाला हादरा बसला. जेव्हा इतर जमातींना नोकऱ्या मिळविणे कठीण गेले तेव्हा ब्राह्मण शरीरकष्ट न करता चरितार्थ चालवू शकले. यामुळे चार वर्णांच्या व्यवस्थेच्या पायाला धक्का दिला गेला आणि आता ब्रिटिशांनी सर्व मानव समान असल्याच्या सिद्धांताचा आणि वंशवादाचा परिचय करून देण्याची संधी घेतली. लोकांचा शास्त्रावरचा विश्वास उडाला आणि दृष्टिकोनात बदल झाला. जर ईश्वरदयेने जुनी व्यवस्था पुनर्जीवित झाली तर ब्राह्मणांपासून पञ्चमपर्यंत प्रत्येकाने केलेले काम सर्वांच्या अंतःकरणात शुद्धी आणेल. शिवाय एक जाणीव होईल की त्याच्या वारसागत व्यवसायाने मानवजातीच्या कल्याणात भर पडेल. या विषयावर थोडा विचार केला तर, आपल्याला वर्णधर्माचा, त्याची लाज वाटण्यापेक्षा अभिमान वाटेल - आणि आपणाला ज्यांनी ही व्यवस्था निर्माण केली त्यांच्याबद्दल आदर वाटेल.

-----

## प्रकरण - १४

# वर्णधर्माचा अंतिम हेतू

जेव्हा हस्तोद्योगांची आणि कुटीरोद्योगांची जागा कारखान्यांनी घेतली, लहान खेड्यांतील समाजाचे नागरीकरण झाले. लोकांच्या गरजा कैकपटीने वाढल्या, तसे व्यवसायांची संख्या वाढली. आजकाल जुने जीवनमार्ग नाहीसे झाले असता वारसागत व्यवसायांचे पुनरुज्जीवन करणे अशक्य झाले आहे. संरक्षणसेवेत फक्त क्षत्रियांची भरती, फक्त वैश्यच व्यापार आणि उद्योगधंदा करू शकतील, चौथ्या वर्णाचे लोक श्रमिक म्हणून राहतील असा आग्रह धरणे व्यवहार्य ठरणार नाही. जुनी व्यवस्था पुनरुज्जीवित करणे शक्य आहे का? मी हल्लीच्या राज्यकारभाराविषयी अनभिज्ञ नाही. जर तसे असते तर मी का वर्णधर्माची स्तुती करीत राहिलो असतो? याला दोन कारणे आहेत.

आज काहीही स्थिती असो - आणि जुन्या व्यवस्थेकडे आपण वळू किंवा नाही - हल्ली लोक म्हणतात की जुनी व्यवस्था ही पूर्णपणे अन्यायकारक होती, ती त्यांच्या भल्यासाठी आणि सोयीसाठी अंतर्गत स्वार्थासाठी बनवली गेली होती असे म्हणणे योग्य नाही. आपण टीकाकारांना पटवून देऊ शकलो पाहिजे की जुनी व्यवस्था अजिबात अन्यायकारक नव्हती आणि वर्णधर्मासारखी कोणतीही गोष्ट अंतरंगात शुद्धता आणण्यासाठी नाही. समाजाला शिस्तीने आणि विनाव्यत्यय कार्य करण्यास मदत करण्याशिवाय हा धर्म सर्वांचे भले करेल आणि संस्कृतीला प्रेरणा देईल हेही त्यांना समजून घ्यायला भाग पाडले पाहिजे.

अजून एक महत्त्वाचे कारण आहे. हल्ली क्षत्रिय, वैश्य आणि शुद्रांचे व्यवसाय बदलले आहेत आणि एकमेकांत मिसळले आहेत. तरी शासनाचे कार्य कसे का होईना चालले आहे. संरक्षण, विविध वस्तूंची निर्मिती, व्यापार, श्रम - हे सर्व कसेबसे चालू आहे. पण सर्व क्षेत्रांत भूतकाळात नसलेले शत्रुत्व आणि मत्सर आहे. वर्णधर्माचा विच्छेद होऊनही तीन जातींची कामे, कर्तव्ये चालू आहेत. या गोष्टींची दैनंदिन जीवनात आणि शासन चालण्यात व्यावहारिक गरज आहे. म्हणून ते प्रचलित नसलेल्या समाधानकारकपद्धतीने चालत आहेत.

तथापि, यापेक्षाही एक महत्त्वाचे कार्य आहे आणि ते म्हणजे ही सर्व कर्तव्ये अंतिम उद्दिष्टाकडे नेणे. आणि हे कार्य ब्राह्मणाच्या जीवनपद्धतीचे आहे आणि जे आता लुप्त झालेले आहे. सर्व कर्माचा पाया असलेले विचार आणि आचार यांनी धर्माचे ज्ञान देणे, मानवजातीच्या कल्याणासाठी असलेले मंत्रपठण करून दिव्य शक्ती जागृत करणे, स्वतःच्या खडतर जीवनाद्वारे उच्च आदर्श निर्माण करणे, समाजाची आत्मिक शक्ती जोपासणे, कलेला प्रोत्साहन देणे, संस्कृती संगोपन करणे - हे ब्राह्मणधर्मात येते आणि आता ते लुप्त होण्याच्या बेतात आहे.

ब्राह्मणधर्माची गरज त्याच्या सूक्ष्म आणि अनाकलनीय स्वरूपामुळे व्यापक प्रमाणात जाणली गेली नाही. तीन वर्णाइतकीच ती आवश्यक आहे ही वस्तुस्थिती समजली गेली नाही. हा धर्म जीवनाला अर्थ देतो आणि जीवनाच्या परिपूर्णतेचा मार्ग निर्माण करतो. आपण त्याकडे दुर्लक्ष करतो आणि तीन वर्णांच्या कार्यावर पूर्णपणे भर देतो. जर त्यात सुधारणा झाली तर आम्हाला समाधान लाभेल. पण आत्मिक आणि सांस्कृतिक विकासाविना भौतिक गोष्टींच्या भरभराटीचा काय उपयोग? भौतिक विकास हा खरा विकास नव्हे. अमेरिकनांनी हे सत्य ओळखले आहे - आपणही ते ओळखले पाहिजे. जरी मानसिक गोंधळात इतर जातींचे कार्य पार पडत असले तरी ब्राह्मणाने, साधे आणि त्यागमय जीवन जगून, मार्गदर्शक होऊन, वैदिक विधी करून आणि मानवाच्या कल्याणासाठी योग्य प्रकारे कार्य केले पाहिजे. अशा रीतीने भारताचा आत्मा जिवंत राहील.

जर ब्राह्मण जातीची योग्य प्रकारे पुनर्स्थापना केली तर इतर जातींच्या मानसिक गोंधळाच्या शेवटाचा आरंभ होईल. या भूमीत हीच जात अस्तित्वात राहिलेली आहे - धर्माच्या संरक्षणासाठी आणि सर्वांच्या आत्मिक उन्नतीसाठी युगानुयुगे अस्तित्वात राहिलेली आहे. जर ही जात लुप्त झाली तर सर्व प्रकारचा नाश होईल. मी जरी विस्तृतपणे बोललो असलो तरी माझा एक हेतू आहे आणि तो म्हणजे राष्ट्राच्या एकूण ऱ्हासाला प्रतिबंध होण्याच्या हेतूने या जातीची पुनर्स्थापना करायला हवी. ब्राह्मणजातीने चंगळवादी जीवन जगता कामा नये. उलट, समाजाच्या भल्यासाठी दिवसभर विधी केले पाहिजेत. ब्राह्मणांनी सर्वांसाठी हृदयात प्रेम ठेवून तपस्वी जीवन जगले पाहिजे. त्यांचे पुनर्जीवन झाले तर आपला समाज पूर्णपणे धर्माच्या मार्गावर आणला जाईल आणि वाचेल.

-----

## प्रकरण - १५

# वैश्विक उपाय

गतकाळात लोक जरी जातीच्या आधारावर विभागलेले होते तरी त्यांच्यात विद्वेष आणि वैमनस्याची भावना नव्हती. परंतु आता आपण सर्व देशभर सर्वत्र विद्वेष आणि वैमनस्याची भावना पाहतो. राज्याराज्यात कलह आहेत. एका राज्याचा दुसऱ्या राज्याशी नदीच्या पाणीवाटपावरून तंटा आहे, तर काही राज्यात सीमेवरून कलह आहे. भूतकाळात दक्षिणेतील चेट्टियारांनी काशीच्या यात्रेकरूंसाठी मोफत धर्मशाळा बांधल्या होत्या. तर काशी आणि बद्रीनाथच्या यात्रेकरूंसाठी शेटजींनी मोफत धर्मशाळा बांधल्या होत्या. अशा प्रकारे त्यावेळी लोक ईश्वरभक्त म्हणून एकमेकांशी जोडले गेले होते. परंतु आजकाल या सर्व गोष्टी राजकीय घडामोडी आणि पोकळ चर्चांनी नष्ट झाल्या आहेत. म्हणून आपल्या या वैमनस्याच्या आजारावर रामबाण उपाय म्हणून लोक अधिक प्रमाणात ईश्वरभक्त व्हावेत अशी प्रार्थना केली पाहिजे.

'जाती नष्ट करा' या सततच्या गदारोळामुळे जाती-जातीत द्वेषाची भावना वाढत गेली. जातिविरुद्धचा प्रसार जरी ३०-४० वर्षे चालू असला तरी निवडणुकीच्या काळात जातीचा मुद्दा सध्याही पुढे येतो. जातीय भावना इतक्या उच्चस्थितीला पोहोचतात की जाती-जातीत हिंसक झडपा वारंवार होतात. येथे ब्राह्मण आणि ब्राह्मणेतरात द्वेषभावना नाही. सुदैवाने हे दक्षिणेत पूर्णतः आणि महाराष्ट्रात काही प्रमाणात सत्य आहे की ब्राह्मणांनी स्वतःस राजकारणापासून दूर ठेवले आहे. त्यांनी स्वतः होऊन राजकारण सोडले नसले तर अन्य लोकांनी त्यांना राजकारणातून बाहेर केले आहे, ही थोडी फार समाधानाची गोष्ट आहे. आंध्रप्रदेशात खम्मम आणि रेड्डी हे आपापसात झगडत आहेत, तर कर्नाटकात लिंगायतांची अन्य जमातीबरोबर लढाई जुंपलेली आहे. उपहासाने असे म्हणता येईल की आजकाल जातीय समतेचा आवाज इतका जोरात आहे की आम्हाला अनेक जातीय झगडे पाहावे लागत आहेत. शास्त्रीय परंपरेला मात्र ही स्थिती तितकी परिचित नाही. येथे तामीळनाडूत निवडणुकीचे उमेदवार जातीच्या आधारावर निवडले जातात. एका जिल्ह्यात पडियाचिस, गौण्डर दुसऱ्यात, तेवर तिसऱ्यात तर मुक्कुलट्टार चौथ्यात याप्रमाणे निवडतात. निवडणुका आदर्शावर नव्हे तर जातीच्या आधारावर लढविल्या जातात.

-----

## प्रकरण - १६
# शंकराचार्य आणि सनातन धर्म

इंग्रजीत एक म्हण आहे : 'कुत्रा पिसाळला आहे म्हणा आणि त्याला ठार मारा.' कुत्रा विश्वासू प्राणी आहे आणि त्याच्या मालकाशी कृतज्ञ असतो. कुत्र्याला ठार मारणे फार थोड्यांना आवडेल. म्हणून जर एखाद्या कुत्र्याला ठार मारायचे असेल तर तो पिसाळला आहे असे म्हणा.

स्वतःला आधुनिक समजणारे परिवर्तनवादी धर्मशास्त्रांच्याबाबतीत नेमके हेच करतात. युगानुयुगे या शास्त्रांनी या राष्ट्राचे फक्त भलेच केलेले आहे. पण परिवर्तनवाद्यांना, धर्मशास्त्राने अनेक वाईट गोष्टी निर्माण केल्या या सबबीखाली गळफास लावायचा आहे. काहीजणांना वाटते की आपल्या प्राचीन आणि शाश्वत शास्त्रांच्या आधारावर समाजाच्या विभाजनाची गरज नाही. म्हणून ते धर्मशास्त्रातील सिद्धांताच्या अंमलबजावणीत बाह्यतः दिसणारी निंद्य कृत्ये शोधून काढतात. "आपल्या देशात कोणी काय करायचे याबाबत अटी आहेत", वर्णव्यवस्थेला विरोध करीत ते म्हणतात. "त्याचा परिणाम म्हणून लोक विभागले गेले आहेत. हिंदूंमध्ये एकी नाही. यामुळेच आपणास परदेशी शक्तींच्या टाचेखाली वारंवार यावे लागले आहे." या आरोपात सत्याचा लवलेशही नाही.

जेव्हा समान संकटाला आपल्याला तोंड द्यायचे होते तेव्हा राजे लोकांमध्ये एकी नव्हती हे त्याचे कारण असेल. जातींमुळे आलेले भेद, लोकांच्या या किंवा त्या विभागाने आक्रमकांना मदत केली या दृष्टिकोनाला आधार नाही. उपहासाने म्हणायचे तर जातिभेद नष्ट करण्याचा आरडाओरडा असूनही आजकाल समाजात बेकी आणि द्वेष आहे. उलट भूतकाळात जेव्हा जाती होत्या, तेव्हा समाजात सौख्य होते. जेव्हा दोन खेड्यांमध्ये जमिनीचा एखादा तुकडा, सीमा किंवा कालवा यांवर वाद होत तेव्हा ब्राह्मणापासून अस्पृश्यापर्यंत सर्वजण एक होत. जर हे खेड्याचे उदाहरण असेल तर तुम्ही संपूर्ण राष्ट्रात कशी एकी असेल याची कल्पना करू शकता.

लहान जमातीत विभागलेल्या लोकांना एकमेकांशी जोडलेल्या स्थितीत राहण्यास प्रोत्साहन दिले जाई आणि प्रत्येक जमातीतील सदस्यांना आपण त्या जमातीचे सदस्य असल्याचा अभिमान असे. त्यांना त्यांचा प्रमुखही असे. जर एखाद्याचा गुन्हा सिद्ध झाला तर त्याला जमातीतून बाहेर काढले जाई. जमातीचे सदस्य असल्याचा अभिमान असे, शिवाय लोक त्यांच्या जमातीशी जोडले जात म्हणून अशी शिक्षा मानहानिकारक समजली जाई. ही गोष्ट गुन्हा प्रतिबंधक म्हणून होई. मनाच्या पायावर आधारलेली लोकांना एकत्र ठेवणारी हल्ली एकही संस्था नाही. कदाचित लोक, नियंत्रण ठेवता येणार नाही अशा एका मोठ्या व्यवस्थेचा भाग

बनल्यामुळे त्यांना घट्ट बांधून ठेवता येणार नाही. परिणाम काय? गुन्ह्याच्या घटना वाढत आहेत आणि त्या अनुषंगाने पोलिसांची जबाबदारी वाढत जाते. जे शास्त्रांना विरोध करतात त्यांनी थोडा या परिस्थितीचा विचार केला पाहिजे.

कोणत्याही कल्पनेला, व्यवस्थेला विरोध होतोच होतो आणि त्याचे स्वागत केले पाहिजे. विरोधकांच्या दृष्टिकोनांचा मान ठेवून आपण आपल्या उणिवा शोधून आणि त्यावर उपाय काढून हे करू शकतो. पण कल्पनेने निर्माण केलेल्या उणिवा मानून व्यवस्थेला विरोध करणे ही वेगळी बाब आहे. कारण त्या विरोधाचा परिणाम म्हणून त्यातील चांगली वैशिष्ट्ये धोक्यात येतील.

मी टीकेचे एक उदाहरण देतो जी पूर्णपणे निराधार आणि काल्पनिक आहे. काही लोकांना कपाळावर पवित्र टिळा लावणे हे 'असंस्कृत' वाटते. 'जातीचा शिक्का' असे त्याला नाव ठेवले आहे. वस्तुतः ब्राह्मणापासून हरिजनांपर्यंत सर्व जाती भस्म धारण करतात. तसेच वैष्णव नामाचे (तिरुमन किंवा मातीचे बनविलेले) आहे : प्रत्येक गोष्ट मातीची बनलेली आहे आणि मातीत मिसळणार आहे, या सत्याचे ते प्रतीक आहे, ते सर्व म्हणजे विष्णू होय. रक्षा ही परमात्म्याची प्रतीक आहे. जेव्हा शरीराचे दहन होते तेव्हा फक्त रक्षा राहते जी सनातन ब्रह्माचे प्रतीक आहे. महान सत्यासाठी असलेल्या अशा प्रतीकांच्या वापरांचा धिक्कार करणे योग्य आहे का?

सर्व जुन्या धार्मिक परंपरांचे संरक्षण केले पाहिजे आणि जिवंत ठेवल्या पाहिजेत. श्री शंकर भगवत्पाद यांनी आपल्याला तशी आज्ञा दिलेली आहे. मी त्यांचे नाव धारण करतो. म्हणून त्यांच्या आज्ञेचे स्मरण तुम्हाला करून देणे हे माझे कर्तव्य आहे. तुम्ही लक्ष द्याल किंवा नाही, पण सर्व मानवजातीच्या भल्याची हमी देण्याच्या हेतूने असलेल्या शास्त्रीय रूढींचा मी तुमच्यावर प्रभाव पाडला पाहिजे.

-----

## प्रकरण - १७

# 'वाढवा' असा आवाज उठवा - 'नाश करा' असे म्हणू नका

एका बाजूला दिव्य प्रेम आणि दैवी कृपा असलेले तिरुवल्लुवर आणि इतरांचे स्मरण करणारी तमीळ संस्कृती आणि दुसऱ्या बाजूला द्वेष जाहीर करणारी भीत्तिपत्रके प्रसिद्ध करून एका ठरावीक समाजाविरुद्ध ओरड करणे, हे मला योग्य वाटत नाही. तमीळ भूमीच्या आत्म्याविरुद्ध हे आहे आणि मला ते यातना देते. जर तुम्ही 'नष्ट करा' असे म्हणण्याऐवजी 'मोठे व्हा' असे गरजलात तर सर्व द्वेष आणि कलह नाहीसा होईल. जातिव्यवस्था नष्ट करण्यासाठी आंदोलन करण्याऐवजी लोकांनी अधिकाधिक मंदिरे बांधणे, भक्तिभाव पसरविणे सुरू केले पाहिजे.

जर प्रत्येकजण या प्रयत्नात सहभागी झाला तर भूतकाळात ज्या भक्तीने आपणा सर्वांना एका कुटुंबासारखे एकत्र आणले ती भक्ती पुन्हा एकत्रित आणण्यासाठी आणि विश्वकल्याणाची जाणीव निर्माण करण्यासाठी एक जोरदार शक्ती तयार होईल. जर भक्ती असेल तर जातिद्वेष राहणार नाही. गेली काही शतके हेच होत होते. जुन्या काळी जात होती पण तिने जमातींमध्ये कडवटपणा निर्माण केला नाही. जात नव्हे तर त्यातून निर्माण झालेला द्वेष दोषी आहे. म्हणून ही संस्था (जाती-व्यवस्था) नष्ट करणे हे उंदीर मारण्यासाठी घर जाळून टाकण्यासारखे आहे. जातिव्यवस्था नष्ट करण्याच्या चळवळीने जुन्या श्रमविभागणीत व्यत्यय आणला आहे आणि त्याचबरोबर लोकांमध्ये असमाधान, अशांतता आणि द्वेष निर्माण केला आहे. भिन्न जमातींमधील द्वेष अनेक फांद्या असलेल्या झाडासारखा झाला आहे.

वाईट गोष्टींबाबत दक्ष राहण्याची वेळ आलेली आहे आणि विध्वंसाच्या हाकेच्या मोहिमेची जागा आता सर्व वर्ण एकत्र आणून ईश्वरभक्ती आणि मानवसेवा करण्याची चळवळ सुरू करण्याचे प्रयत्न करणे यांनी घेण्याची वेळ आली आहे. जातिद्वेषाकडे लक्ष न देणे हा एक मार्ग आहे. जातिद्वेषाच्या विरुद्ध जाणे हे त्यात तेल ओतण्यासारखे आहे. जर आपण त्याकडे दुर्लक्ष केले आणि इतर उदात्त गोष्टींकडे लक्ष वळवले तर जातिभेदाचा कडवटपणा आपोआप थांबेल. समजा, तुम्हाला औषध घेताना माकडाचा विचार न करण्याची ताकीद दिलेली आहे तर उलट कदाचित तुम्हाला माकडाचा विचार करण्याचा मोह होईल. त्याचप्रमाणे आपण जर सदैव जातिद्वेषाविरुद्ध बोलत राहिलो, जातिभेदाचे लोकांना स्मरण करून देत राहिलो आणि काही गटात हीनत्वाची भावना आणि इतरांमध्ये श्रेष्ठत्वाची भावना जागृत करीत राहिलो तर परिणाम उलटा होईल.

मंदिरे बांधणे किंवा सार्वजनिक हिताच्या योजना आखणे अशा चांगल्या कार्यात सर्वांनी सहभागी होणे महत्त्वाचे आहे. लोकांच्या हृदयात निश्चितच चांगल्या भावना

उद्भवतील, त्याचवेळेस एकूणात समाजासाठी चांगले काहीतरी केले जाईल. आजकाल लोकांचे मन विधायक कामात सहभागी होण्याऐवजी विध्वंसक कल्पना, वादप्रियता, अफवा आणि भांडणे यांकडे लागते. दुर्दैवाने काही लोकांना वाटते की जर त्यांनी जातींमध्ये द्वेष पेटविला किंवा भांडणासाठी चिथावणी दिली तर त्यांच्याभोवती स्तुती करणाऱ्या लोकांची गर्दी ते जमा करू शकतील. जर आपण सदैव विधायक कामात गर्क राहिलो तर त्रासदायक गोष्टींना संधी मिळणार नाही; लोकांना वाईट गोष्टी करायला वेळच मिळणार नाही.

लोक पाय दुखेपर्यंत, याच्या किंवा त्याच्याविरुद्ध आवाज उठवित मोर्चात चालत राहतात. जर हे मनुष्यबळ चांगल्या कार्याकडे वळवले आणि लोकांचा उत्साह विधायक कामाकडे वळवला तर सर्वांगीण विकास आणि भरभराट होणार नाही का? एकाच प्रकारचा विकास आहे जो इतरांपेक्षा उच्च आहे तो म्हणजे लोकांच्या हृदयात उद्भवलेले प्रेम. सर्वजण धार्मिक विधी करीत आहेत, मंदिरात पूजा करीत आहेत, धार्मिक प्रवचने ऐकत आहेत, दिव्य कार्यासाठी सर्व जाती एकत्र काम करीत आहेत किंवा समाजसेवा करण्यात मग्न आहेत यांसाठी आखीव वेळापत्रक असावे असे मला वाटते. अशा वेळापत्रकाला चिकटून राहणे म्हणजे वैश्विक सौख्य आणि भरभराट, उन्नती यासाठी कोणत्याही जाती विरुद्धच्या द्वेषाचा आवाज उंचावण्याची गरज दूर करणे होय.

प्रतिष्ठा म्हणून जातींमध्ये भेद नसतो. म्हणजे कोणतीही जात हीन किंवा श्रेष्ठ नसते. सर्व जातींमध्ये महान व्यक्ती निर्माण झाल्या आहेत - काही नावे सांगायची तर अप्पर, नम्माझवार, शेक्कीझार, नंदनार आणि कण्णप्पर. आचार्यांनी स्वतः कण्णप्परची त्यांच्या 'शिवानंदलहरी'मध्ये स्तुती केली आहे. एखाद्याने स्वतःला इतरांपेक्षा श्रेष्ठ मानणे हे शास्त्राने पाप ठरविले आहे. थोरांनी याबाबत आपल्याला मार्ग दाखविला आहे. ते स्वतः मानहानी पत्करून 'नायिनम् कडैयेन नायडियेन' - मी कुत्र्यापेक्षा हीन आहे असे म्हणत. स्वातंत्र्याच्या या काळात अशी मर्यादा कोणी स्वतःवर लादून घेणार नाही - आणि तेच आपल्या त्रासाचे कारण आहे. ही मर्यादेची आणि नम्रतेची जाणीव आपण पुन्हा प्राप्त केली पाहिजे. जर तसे झाले तर जातीला कार्यात अडकवले जाईल आणि भेदाच्या भावनेचे थोडेही कारण राहणार नाही. सर्व लोकांनी ही साध्या आणि गुणवान जीवनाची शैली आत्मसात केली तर द्वेषाचे कोणतेही कारण राहणार नाही.

आदर्शाच्या दिशेने कार्य करण्यासाठी त्यागाची भावना किंवा धैर्य असो वा नसो, जर आपण आदर्श जाणला तर आपल्याला मार्ग दिसेल. अंबेच्या कृपेने हे उद्दिष्ट प्राप्त करण्यात आपल्याला यश मिळो.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - २१
## कर्माकडून नैष्कर्म्याकडे

## प्रकरण - १

# बाह्यतः कर्म - अंतरंगात ध्यान

माझ्या प्रवचनाच्याकाळात मी मोठ्या प्रमाणात धार्मिक विधींबाबत बोललो आहे. असे वाटेल की परमेश्वराची पूजा आणि लोकांची सेवा या गोष्टी इतरांसाठी आहेत. पण वस्तुतः त्या आपल्यासाठी असतात. इतरांना मदत करून, त्यांची सेवा करून, देवाची पूजा करून आपल्यालाच पूर्णत्वाचा लाभ होतो. आपल्या मदतीचा इतरांना लाभ होवो वा न होवो. पण जेव्हा आपण त्यांची सेवा करतो तेव्हा आपल्याला आतून चित्तात शांतता आणि सौख्य अनुभवास येते - यात काही शंकाच नाही. ज्याला परोपकार, इतरांना मदत करणे म्हटले जाते तो खरोखरच स्वतःवरच केलेला उपकार, स्वतःला मदत करणे असतो.

इतरांची सेवा करण्यात आपल्याला कष्ट करावे लागतात, त्याग करावा लागतो आणि शारीरिक दृष्टीने स्वतःला थकवावे लागते. पण आपल्याला प्राप्त होणारे सौख्य आणि पूर्णत्वाची जाणीव ही आपण घेतलेल्या त्रासापेक्षा अधिक उच्च असते. आपण करीत असलेल्या पूजेपासून देवाला काही मिळवायचे नसते. त्याची पूजा करणे, पवित्र ग्रंथांचे वाचन, यात्रेला जाणे यात आपल्याला अंतर्यामी आनंद मिळतो. आपण पूजा का करतो आणि आपण इतरांना का मदत करतो ? हे आपल्या स्वतःच्या समाधानासाठी असते.

आपली पत्नी, मुले आणि इतर यांच्याबद्दल आपला असलेला जिव्हाळा हा वस्तुतः आपल्यासाठीच असतो. याज्ञवल्क्याच्या उपनिषदातील शिकवणुकीनुसार आपण इतरांवर प्रेम करतो ते आपल्याला आतून समाधान मिळावे म्हणूनच. आपण देवाची सहेतूक पूजा करतो कारण आपली त्यावर भक्ती असते आणि आपण समाजसेवा करतो कारण आपले मानवजातीवर प्रेम असते. आपण खरे पाहता कारण असे आहे की आपले आपल्यावर प्रेम असते आणि अशा कार्याने आपल्याला सुख मिळते. अशा सुखासाठी अडचणींना तोंड देणे आणि त्याग करणे आपण मनावर घेत नाही.

जर आपण आपल्या स्वतःवर पैसे खर्च केले किंवा इंद्रियसुख शोधले तर आपल्याला अंतर्यामी सुख मिळत नाही. आपल्या स्वतःसाठी केलेले कार्य अशांतता आणि दुःखाकडे नेते. आपण आपला चेहरा आरशात पाहतो आणि आपल्या लक्षात येते की आपल्या कपाळावर टिळा नाही. आपण आरशावर काळा टिळा लावला (आपल्या प्रतिबिंबावर) तर काय होईल ? तो आरसा काळा होईल. प्रतिबिंबावर टिळा लावायचा म्हणजे आरशासमोर जो आहे त्याला लावणे. आपल्या स्वतःसाठी काही करणे म्हणजे स्वतःची सेवा करणे. हे खरोखरच आपल्या मनाला काळा ठिपका लावण्यासारखे आहे - आपल्याला काळे लावण्यासारखे आहे. आपण मायेच्या आरशात प्रतिबिंबित झालेली परमेश्वराची प्रतिमा घेतो जी आपले मन असते. ती

प्रतिमा सजवणे वास्तवात परमात्म्याला सजवणे होय. मानवाची सेवा करण्याने आपल्याला समाधान मिळते याचे हे कारण आहे. कारण मानवता हे परमात्म्याचे प्रकटीकरण आहे. परमात्म्याची पूजा करणे हीच आहे. तेव्हाच आपण आपल्याला लावलेला काळा ठिपका एक दागिना होईल. आपण आपल्याला सजवण्यासाठी अंबेला सजवतो. जर आपण आपल्याला सजवले तर आपण आपला अहंकार मोठा करतो आणि आपल्या उर्मटपणाचे पोषण करतो. अंबेला नीटनेटके ठेवले तर प्रत्येकाला आनंद होईल. जेव्हा आपण धुवून इस्त्री केलेले उपरणे वापरतो आणि आपल्याला समाधान वाटते तेव्हा इतरांना काय वाटते? ते हेटाळणीने म्हणतील, ''पहा, हा काय पण इस्त्री केल्यासारखा दिसतोय.''

तुम्ही सर्वजण मला ढिगाने हार अर्पण करता. तुम्ही हे करता कारण तुम्हाला मी महान वाटतो आणि तुम्हाला तुमची भक्ती व्यक्त करायची असते. तुम्हाला वाटते की ते तुम्ही परिधान करण्याऐवजी ते माझ्यासाठी अलंकार होईल. जर मला थोर मानून मी स्वतःला त्यांनी सजवले तर त्याचा अर्थ असा होईल की मी माझा अहंकार जोपासतो आहे. पण तुम्ही भक्तीने हार आणता आणि ते मी झिडकारणे योग्य होईल का? म्हणून तुम्हाला जसा मी अलंकृत दिसायला हवा आहे तशी मला अंबा अलंकृत दिसायला हवी आणि मी तिला हार अर्पण करतो.

पैसा, कीर्ती आणि ऐंद्रिय सुखे हे चांगले आहे असे समजून त्यांच्यामागे जाणे म्हणजे आपली मने काळवंडून घेण्यासारखे होय. आपल्यासाठी चांगले काय? जे जगासाठी चांगले - आणि ते परमात्म्याचे रूप असते ते. हे सत्य आपल्या अंतरात्म्याला माहीत असते; आपण ते आपल्या खोल मनात, अंतरंगात जाणतो. म्हणून अडचणी विसरून, स्वतःसाठी सुखे शोधण्यापेक्षा आपल्याला दुसऱ्याचे भले करण्यात अधिक मोठे समाधान मिळते.

हे जग परमात्म्याचे प्रकटीकरण आहे त्याचप्रमाणे आपणही आहोत. मन नावाचा आरसा आपण नाहीसा केला आणि आपण दुसरे-तिसरे काही नसून परमात्माच आहोत हे सत्य अंतरंगात अनुभवले पाहिजे. याला ध्यानधारणा म्हटले जाते. आपण करीत असलेले सर्व कर्म निष्कर्माकडे, आत्म्याचे चिंतनाकडे नेते. मी सांगितलेल्या सर्व धार्मिक विधींचे हे ध्येय आहे.

आपली कर्मे आपल्याला अनेक प्रकारे सुखी करतात. पण त्या कोणत्याही कृतीत आपणांस निद्रेत मिळणारी शांती सापडणार नाही. एक रात्र जरी झोप मिळाली नाही तरी आपल्याला किती त्रास होतो. इतके झोपेत सुख आहे. (प्रत्यक्षात झोपेत आपल्याला सुखाची जाणीव नसते.) त्यातून तुम्हाला जाणवते का की परमसुख हे निष्कर्मात आहे. ध्यान ही परमात्म्यात विलीन होण्याची, काहीही न करण्याची स्थिती आहे.

झोपेत आपण सुखी असल्याची जाणीव नसते. आपण जेव्हा जागे होतो तेव्हा कळते, आपण झोपेत सुखात होतो. ध्यानाचे अंतिम उद्दिष्ट समाधी आहे. ज्यात आपण जाणतो की

आपण महान कृपेचा अनुभव घेत आहोत. आपण आतून निष्काम राहण्याची आपल्याला सवय लावून घेतली तर? जरी आपण बाह्यतः कार्य करीत राहिलो तरी अंतरंगात शांती अनुभवू. अंतरंगातील शांती कधीही भंग होणार नाही.

दक्षिणामूर्तीची शांती हीच ज्ञानाचे वरदान असते. झोपेत आपले मन स्थिर होते तसे नव्हे. झोपेत मनावर स्वयंनियंत्रण नसते, मन थकल्यामुळे स्थिर झालेले असते. अशी स्थिरता आपण स्वतःच टिकवू शकत नाही. झोपेत आपल्या नियंत्रणात नसलेले जे स्थिर होते ते जाग आल्यावर पुन्हा अनियंत्रित होते.

मृत्यूही एक प्रकारची झोप आहे. त्यातही मन स्थिर होते. पुनर्जन्मानंतर जेव्हा आत्मा आकार घेतो तेव्हा मन पुन्हा कृतिशील होते. जर आपण स्वेच्छेने मनावर संयम ठेवायला शिकलो तर ते त्या स्थितीत राहील. जरी दक्षिणामूर्ती काही न करता स्थिर राहिला तरी त्याला भान असते. कारण बाह्यदृष्टीने खूप काही करीत असला तरी तो आतून अकर्ता असतो. शांत राहणारा दक्षिणामूर्ती कृपा करणारे नृत्य करतो, तो त्रिपुर राक्षसाचा नाश करतो आणि तो भिक्षेकरी साधूसारखा भटकत राहतो. आपल्या भक्तांना वरदान दिल्यानंतर तो ठिकठिकाणी जातो. तो आतून शांत असतो पण बाहेरून उन्मत्त असतो. जर आपण आपल्याला स्थिर करण्यास शिकलो तर आपण बाह्य जगात खूप काही करू शकू.

आपण दक्षिणामूर्तीच्या उलट असतो. आपण शांतीत आहोत असा लोकांचा विश्वास बसावा म्हणून आपण अलिप्ततेचा वेष परिधान करतो पण अंतरंगात आपण अस्वस्थ असतो.

आतील शांतीसाठी बाह्य शांती ही पहिली पायरी आहे - आणि ही शांती हळूहळू येते आणि लगेच मिळेल असे नाही. म्हणून सुज्ञ म्हणतात : "तुमची ऐंद्रिय कर्मे कमी करा. गर्दीत सहभागी होऊ नका. जगाच्या भल्याच्या कामासह सर्व कर्मांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करा. पैशापासून दूर रहा आणि अरण्यात रहा." पण असा सल्ला आपण ऐकतो का? जेव्हा आपले मन स्वच्छ होईल तेव्हाच आपण तसे करू शकू.

आपल्या मनाच्या, जाणिवेच्या शुद्धीसाठी बरेच विधी सुचविले आहेत. त्याचा अर्थ असा की असे करा आणि तसे करू नका असे सांगण्याऐवजी हे आणि ते विधी करा हे आपल्याला सांगितले आहे. कोणत्या ना कोणत्या कामात राहणे हे नैसर्गिक आहे. म्हणून शास्त्रांनी सांगितलेले विधी आपल्या आवडीनिवडी बाजूला ठेवून करीत असतो. यातही आपल्या आवडीनिवडी घुसतील. पण ध्यानाप्रमाणेच आपण काही प्रमाणात यशस्वी होऊ, कमीत कमी विधी चालू असताना त्यावर संयम ठेवू. हळूहळू देवाच्या कृपेने आपण आपल्या आवडीनिवडी दुर्लक्षून आणि अडचणींचा विचार न करता आपण चांगली कामे करू शकू. वासना आणि द्वेष कमी होतील आणि मन शुद्ध होईल. जेव्हा मन शुद्ध होईल तेव्हा आपण एकाग्रतेने ध्यान करू शकू. याचवेळेस आपण सर्व कर्मांचा त्याग करण्याइतके प्रगल्भ होऊ

आणि वनवासी होऊन चिंतन करू शकू. जर आपण एकाग्रतेने ध्यान करू शकू तर प्रत्येक गोष्टीला परमात्म्याचे स्वरूप मिळेल. सर्व गोष्टींचा त्याग करून अरण्यात जाण्याचे कारण राहणार नाही. कोणत्याही धार्मिक पंथाविषयी बोलण्याची आणि हाताने नाक पकडून राहण्याची गरज नाही. अरण्य, खेडे, एकान्त आणि गर्दी - ते सर्व परमात्मा असते. कर्म आणि ध्यान या दोन्ही गोष्टी परमात्माच असतात. आपली आतील शांतता कशानेही ढळणार नाही. दक्षिणामूर्तीप्रमाणे आपण स्थिर आणि शांत राहू शकू आणि बाह्यतः गोंगाटात असू.

गीतेमध्ये भगवान अर्जुनाला स्वधर्म आचरण्यास बजावतात - अर्जुनाच्याबाबतीत तो स्वधर्म म्हणजे युद्ध करणे. भगवान ध्यानयोगाचा विचार मांडतात की ज्यात अकर्म असते. ते सदैव लोकांच्या कल्याणासाठी काम करणाऱ्या पण त्याचवेळेस ब्रह्मनिष्ठ म्हटल्या जाणाऱ्या अंतिम ध्यानात मग्न अशा जनकाच्या उदाहरणाचा संदर्भ देतात.

''कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि।।
भगवद्गीता ३.२०

''न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन। नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि।।
भगवद्गीता ३.२२

तो म्हणतो की तो स्वतः जनकाप्रमाणे आहे. वरवर पाहता यात परस्परविरोध आहे. पण प्रत्यक्षात नाही. एक दुसऱ्यातून निर्माण होते. आरंभी जेव्हा मन संयमित करणे आणि आत्म्यावर चिंतन करणे सोपे नसते तेव्हा धार्मिक विधी करा. नंतर त्यातून मानसिक शांती मिळाल्यावर कर्म सोडून द्या आणि ध्यान, योग इ. करा. एकदा चिंतनात आणि योगात पूर्णत्व मिळाले की आपल्यावर कशाचाही परिणाम होणार नाही. या सर्वात आतून सर्व स्थिर असते आणि तरी बाह्यतः अनेक कर्मे केली जात असतात.

थोडक्यात भगवत्पादांची संकल्पना आहे : शेवटी (सर्व भौतिक जगातील) प्रत्येक गोष्ट माया असल्याचे दिसून येईल. एकमात्र सत्य हेच ब्रह्म असते. आपण त्याच्याशी अद्वैताने एक व्हायला हवे, जसे ब्रह्माला काही करायचे नसते तसे काहीही करण्याचे न ठेवता. मी, श्री शंकराचार्यांचे नाव धारण करतो तो अनेक विधी, पूजा, जप, लोकांची सेवा यांविषयी बोलत राहतो. कारण या बिकट परिस्थितीत आपल्याला विधींपासून आरंभ करावा लागेल. याप्रकारे हळूहळू आपण अद्वैताकडे, मुक्तीकडे जाऊ. अंतिम मोक्षाची ही पद्धत आपल्याला श्रीकृष्ण परमात्म्याकडून आणि आपल्या भगवत्पादांकडून शिकविली गेली आहे. प्रथम कर्म नंतर उपासना किंवा भक्ती आणि शेवटी ज्ञान म्हटले जाणारी जागृती.

याप्रकारे आपण श्रद्धेने आणि भक्तीने हळूहळू प्रगती करीत राहिलो तर आपण ज्ञान

आणि आत्मिक चिंतनासाठी परिपक्वता आणि आतून संयम मिळवू शकू. नंतर मानवाच्या भल्यासाठी बाह्यतः कोणतेही काम करीत राहू शकतो.

आत्मिक चिंतनाचे सर्वोत्तम साधन कोणते? आपण शांतीने मूर्तिमंत पराशक्तीने भरून जायला हवे आणि रोज दक्षिणामूर्तीचे त्याच्या शांतस्वरूपात स्मरण केले पाहिजे. सर्व कर्मांचा त्याग आणि चिंतनात बुडून जाणे असू द्या. थोडा काळ आपण ज्याचे रूपांतर चिंतनाच्यास्थितीत होते असे आपले कर्म बाजूला ठेवू या. या अटी आहेत की नंतर आतल्या प्रवासाकडे जाऊ. पण आता - आरंभी - आपल्या कामातही शांतीत राहणे आणि थोडे चिंतन करण्यासाठी स्थिर राहणे यासाठी आपल्याला प्रशिक्षण द्यावे लागेल.

आरंभी कर्म, भक्ती आणि चिंतन यांचा एकत्रच सराव केला जावा. ते एकमेकांच्या विरोधी नसून पूरक आहेत. शेवटी एकेक बाजूला होईल आणि ध्यानाची समाधी फक्त राहील. जेव्हा आपण आपला अंतरंगातील प्रवास सुरू करतो तेव्हा समाधी हेच उद्दिष्ट समोर ठेवले पाहिजे. म्हणून रोज सर्व कामे बाजूला ठेवून आपण थोडावेळ चिंतनाचा सराव केला पाहिजे. तरीपण आपण अर्थहीन आणि अंधश्रद्धा समजून विधी टाळता कामा नये. आपण ते चालूच ठेवले पाहिजेत. जेव्हा आपण आपल्या आतील अशुद्धता धुवून टाकू तेव्हाच आपल्याला स्वयंप्रकाशी सत्य आपल्यातच जाणवेल.

-----

## प्रकरण - २

# चारित्र्य आणि सदाचरणाची जोपासना कशी करावी?

आपण चारित्र्य कसे संपादन करतो, आपण चांगले गुण कसे मिळवितो? वेदांचा आणि शास्त्रांचा उपदेश व आपल्या पूर्वजांनी पाळलेल्या चांगल्या रूढींचे अनुकरण करून आणि आपणापर्यंत चालत आलेले विधी करून. सदाचरण चांगल्या मनातून उत्पन्न होते म्हणून आपले मन वाईट गोष्टींपासून मुक्त असले पाहिजे.

प्रत्येकाचे मन स्वैर असते. तुमच्या मुलाकडे पहा. ते सदैव काही न काही खोड्या करीत असते. ते कात्रीने कागद कापते किंवा लहान रोपे आणि वनस्पती कापते. ते सतत खोडसाळपणा करते. जेव्हा त्याला शाळेत पाठविण्यात येते तेव्हा ते एका ठरावीक शिस्तीखाली येते. त्याला शाळेत जाण्याची आणि घरी परतण्याची, अभ्यास करण्याची इ. निश्चित वेळ असते. ते आता हट्टी वाटत नाही.

त्याप्रमाणे जर आपल्याला वाईट विचार आणि कृती यांना वाव दिला नाही तर आपल्यात शिस्त येईल. म्हणून शास्त्राने सांगितल्याप्रमाणे आपण चांगल्या कार्यात मग्न असावे म्हणून नियम घालून दिलेले आहेत. जेव्हा आपण धार्मिक कृत्ये करीत असतो तेव्हा आपल्यात अहंकाराची भावना नसावी. वैदिक मार्गाच्या उपदेशकांनी आपल्याला आपली कर्मे ईश्वराला अर्पण करण्याचा मार्ग दाखविला आहे. देवाने आपल्याला ते करण्याची शक्ती दिली तसेच बुद्धी आणि साधने दिली आहेत. थोडीसुद्धा अहंकाराची जाणीव घातक ठरते. कारण ती अनेक रूपे घेते आणि बेसावधक्षणी पकड घेते.

आपण धूळ लागलेल्या आरशात आपल्याला पाहू शकतो का? जर आपण तो झटकला आणि स्वच्छ केला तर आपण आपले प्रतिबिंब स्पष्टपणे पाहू शकू. जर तो हलत असेल तर स्वच्छ आरसाही आपले योग्य प्रतिबिंब निर्माण करणार नाही. आरसा स्वच्छ आणि स्थिर हवा तर प्रतिबिंब खरे आणि स्पष्ट असेल. मनाची जाणीव ही आरशाप्रमाणे आहे. परमपुरुष हा फक्त सत्य आहे. जेव्हा आपल्यात वाईट विचार नसतील तेव्हा मनाचा आरसाही स्वच्छ असेल. जर तो एका वस्तूवर स्थिर केला तर मन न हलणाऱ्या आरशाप्रमाणे स्थिर राहील. तेव्हाच फक्त परमात्मा आपल्यात प्रतिबिंबित होईल.

हे जग कोणी निर्माण केले? आपल्याला आपले अन्न, वस्त्र व सुखसोयी कोण देतो? कोण दयेचा सागर आहे? तो कोण आहे हे जाणून घ्यायचे असेल तर आपल्याला आपले मन स्थिर आणि अशुद्धतेपासून मुक्त ठेवले पाहिजे.

समजा, तांब्याचे एक भांडे विहिरीत दहा किंवा असेच काही वर्षे बुडून राहिले तर ते

स्वच्छ होण्यासाठी किती घासावे लागेल? आपण जसे घासू तसे ते अधिक स्वच्छ होईल आणि चमकेल. जर आपले मन बरीच वर्षे दुष्कृत्यांमुळे अशुद्ध झाले असेल तर ते केवळ अनेक सत्कृत्ये करून, चांगले काम करून शुद्ध केले जाऊ शकते.

फक्त आजच तांब्याचे भांडे स्वच्छ ठेवणे पुरेसे होईल? उद्या किंवा परवा त्याचे काय होईल? ते पुन्हा घासले नाही तर घाण होईल. तसेच आपण रोज सत्कृत्ये करून आपले मन नेहमी शुद्ध ठेवले पाहिजे. हळूहळू अशी वेळ येईल की चित्त, जाणीव नाहीशी होईल आणि आत्मा फक्त राहील/असेल. त्यानंतर साध्या कारणास्तव मन स्वच्छ करण्याची गरज राहणार नाही. तोपर्यंत आपल्याला सत्कृत्ये आणि चांगले वर्तन याद्वारे मन शुद्ध ठेवावे लागेल.

-----

## प्रकरण - ३

# संसारे किं सारम्?

आपले आचार्य त्यांच्या 'प्रश्नोत्तर-रत्नमालिकेत' विचारतात : 'संसारे किं सारम्?' (भौतिक अस्तित्वाचा अर्थ काय?) ते स्वतःच या प्रश्नाचे उत्तर देतात : ''तुम्ही असा प्रश्न विचारला. पुन्हा पुन्हा विचारीत रहा. संसाराचा तो अर्थ आहे.'' (बहुशः अभि विचिन्त्यमानं इदं एव) तुम्हाला अस्तित्वाच्या समस्येवर अशा पद्धतीने उत्तर मिळेल.

माझ्या जन्माचा हेतू काय? मी का जन्मलो? तुम्ही हा प्रश्न स्वतःला वारंवार विचारला पाहिजे. तुमच्या जीवनाच्या उद्दिष्टांपर्यंत तुम्ही पोहोचाल का याबाबत तुम्हाला थोडी चिंता वाटली पाहिजे. ''आपण का पाप करीत राहतो?'' हा प्रश्न आपल्याला सतावतो. ''आपल्याला राग का येतो? आपल्याला याची आणि त्याची का इच्छा होते? पापाविना, क्रोध आणि वासना याविना आपण सुखी राहू शकत नाही का?'' या प्रश्नांची उत्तरे आपल्याकडे आहेत असे दिसत नाही.

फुलापासून फळ येते, प्रथम अपक्व, नाजूक रूपात आणि शेवटी पक्व रूपात. फुलाचा नाकाला सुगंध येतो आणि पक्व फळाची चव टाळूला, रसनेंद्रियाला येते. पक्व फळ पूर्णपणे गोड असते. पिकण्यापूर्वी आणि गोड लागण्यापूर्वी फळाची चव कशी होती? फूल कडवट होते, कच्चे फळ तुरट होते, अपक्व फळ आंबट होते आणि पक्व फळ आता गोड आहे. शांती म्हणजे पक्वता. जेव्हा शांती असते तेव्हा सर्व बंधने स्वतःच तुटतात. जेव्हा हृदयात संपूर्णपणे माधुर्य असते तेव्हा सर्व बंधने नाहीशी होतात. जोपर्यंत आंबटपणा असतो तोपर्यंत बंधन असते. जेव्हा तुम्ही झाडावरून कच्चे फळ तोडता तेव्हा देठात तशीच फळात झाडाला धरून ठेवण्याची शक्ती असते. याचा अर्थ असा की ते झाडही फळाला दूर करू इच्छित नाही आणि उलट ते फळही सोडत नाही.

पण जेव्हा पूर्णपणे माधुर्य असते तेव्हा सर्व बंधने तटकन तुटतील आणि फळ स्वतः जमिनीवर पडेल. झाड फळाला सोडते किंवा फळ स्वतःला झाडापासून मुक्त करते. हा विरह अश्रूविना आणि आनंदी असतो (त्यात कष्ट नसतात) तसेच टप्प्याटप्प्याने माणसाने पक्व फळासारखे पूर्णपणे गोड व्हायला हवे आणि संसाराच्या झाडापासून, जन्ममृत्यूच्या चक्रापासून आनंदाने मुक्त व्हायला पाहिजे. वासना, क्रोध आणि इतर गोष्टी फळाच्या वाढीत कडवटपणा, तुरटपणा, आंबटपणा आणि माधुर्य इतकेच आवश्यक टप्पे आहेत.

जेव्हा आपण वासना आणि क्रोध यांसारख्या तीव्र भावनेच्या अधीन असतो तोपर्यंत आपण त्यांच्यापासून पूर्णपणे मुक्त होऊ शकणार नाही. पण आपण स्वतःला वारंवार विचारीत राहिले पाहिजे की आपण या तीव्र इच्छा आणि वासना यांच्या अधीन का जातो? त्या

काही हेतू साधतात का, याचा सतत विचार केला पाहिजे. जर आपण त्यांच्याबाबतीत दक्ष राहिलो नाही तर आपण त्यांच्या वंचनेचे बळी होऊ.

तुरटपणाच्याकाळात तुरटपणा, आंबटपणाच्याकाळात आंबटपणा असलाच पाहिजे. पण तुरटपणा किंवा आंबटपणा ही स्थिती कायम राहायला नको. जसे नाजूक, कच्चे फळ पिकते तसे आपणही पक्व आणि गोड व्हायला हवे. जर आपण तसे केले तर आपल्याला मुक्ती शोधण्याची गरज नाही. जीवनाच्या निरनिराळ्या स्थितीत जसे आपण असायला हवे तसेच असलो की मुक्ती ही ओघाने आलीच. उलट जर आपण अयोग्यवेळी प्रयत्न केला, स्वतःवर बळजबरी केली तर ते वेळेपूर्वीच फळ पिकविल्यासारखे होईल. असे फळ गोड लागणार नाही.

तथापि, आज आपण ज्या स्थितीत आहोत, प्रत्येक बाबतीत उदासीन आहोत त्याच स्थितीत नेहमी राहता कामा नये. जोपर्यंत आपल्या पापाची पिशवी अजूनही रिकामी व्हायची आहे तोपर्यंत आपल्याला परम ज्ञानाची आस लागणार नाही. त्याऐवजी आपण आपले कर्तव्य या आशेने करीत राहू की आता नसले तरी कधीतरी अनंत जन्मानंतर तरी आपल्याला परम ज्ञान होईल. तोपर्यंत वेदांनी सांगितलेल्या धर्माला चिकटून राहू या. जर आपण तसे केले तर हळूहळू, थोडेथोडे करीत आपण परम ज्ञानाकडे जाऊ. आता आपल्याला बाह्य गोष्टी आणि बाह्य वेष यांची जाणीव आहे. म्हणून आपण आपल्या धर्माचे बाह्य विधी, बाह्य लक्षणे आणि खुणा यांनी आरंभ करू या आणि नंतर हळूहळू निरनिराळ्या टप्प्यांद्वारे आतील वास्तवाकडे जाऊ - त्या कच्च्या फळाकडून पक्व आणि गोड फळाकडे.

-----

## प्रकरण - ४
# आंतरिक आणि बाह्य

मी पुन्हा पुन्हा सांगतोय की पूर्वजांकडून आलेले विधी लोकांनी केले पाहिजेत. जे परस्परांशी जोडलेले आहेत, त्याला चिकटून राहिले पाहिजे. त्यांनी त्याला साजेशी भस्म किंवा तिरुमन, रुद्राक्ष इ. प्रतीके धारण केली पाहिजेत. काही लोकांचा असा दृष्टिकोन असतो की सर्वात अधिक कशाची गरज असेल तर ती आचरण आणि चारित्र्य यांची, आचरण ही मनाची बाब असते, धार्मिक रूढी या बाह्य जीवनाचा एक भाग असतो.

तथापि, तुमच्या बाह्य कृती आणि तुम्ही धारण केलेली बाह्य प्रतीके यांचा आंतरिक जीवनावर परिणाम होत असतो. शारीरिक कर्मे आणि अंतर्भावना यांत एक नाते असते. या सत्याचे एक उदाहरण देतो. एक दिवस एका मनुष्याला अनपेक्षितपणे कळते की त्याला एक लाखाचे लॉटरीचे, सोडतीचे बक्षीस मिळालेले आहे. त्याचा आनंदाला पारावार राहात नाही. पण त्याचा परिणाम त्याच्या शरीरावर होतो. तो इतका उत्तेजित होतो की त्याचा श्वासोच्छ्वास क्षणभर थांबतो व तो बेशुद्ध होतो. विशिष्ट भावना श्वसनाच्या प्रक्रियेत बदल करते. या प्रत्यक्ष निरीक्षणावरून, योगाने उदात्त भावना आणि आरोग्यासाठी श्वसनाचे पाठ विकसित केले आहेत. आतील भावनांचे प्रतिबिंब बाह्य रूपावर पडते. जेव्हा तुम्ही रागावलेला असता तेव्हा तुमचे डोळे लाल होतात, ओठ थरथरू लागतात. जेव्हा तुम्ही दुःखी असता तेव्हा तुमच्या डोळ्यांपुढे धुके असते आणि तुम्ही अश्रू ढाळता. जर तुम्ही आनंदात असाल तर तुम्ही आश्चर्याने सर्व दात दाखवीत 'आ' करता. अशा प्रकारे विद्वानांनी शरीर आणि आतील भावना यांच्या वस्तुस्थितीवर आधारलेल्या स्थितींची रचना केलेली आहे. त्या रचना विशिष्ट आत्मिक गुणांचे पोषण करण्यासाठी असतात.

जर सैनिकांनी त्यांचा गणवेश घातला नाही तर ते कमी शूर असतील का? जगभरातील संरक्षणसेवेतील सदस्य गणवेश धारण करतात आणि ते गणवेश त्यांना लढण्यास तंदुरुस्त ठेवतात आणि त्यांच्यातील धैर्याला प्रेरणा देतात. असे म्हटले जाते

बाह्यतः धारण केलेली प्रतीके, बाह्यतः केलेले संस्कार हे आतून लाभदायक असतात. जर तुम्हाला वाटेल की हे सर्व वेशांतर आहे तर ते तसेच असेल. तुम्ही प्रामाणिकपणे प्रतीके धारण करण्याचे निश्चित केले पाहिजे. नंतरच ते तुमच्या अंतरंगात शुद्धता निर्माण करतील. बाह्यकर्मे तुम्हाला अंतरंगात उपयोगी पडतील.

कदाचित हे साहजिक आहे. भस्म, रुद्राक्ष इ. प्रतीके धारण करण्याची रूढी या संस्कारांवर मी भर दिला पाहिजे. शेवटी, मी एका मठाचा प्रमुख आहे आणि तुम्ही जर हे धारण केले तरच तुम्ही माझ्याकडे येऊ शकाल. तुम्ही मला मठ चालविण्यासाठी पैसे द्याल. मी धारण

करीत असलेली ही सर्व प्रतीके माझ्याबाबतीत एक हेतू साध्य करतात. पण तुमची बाब भिन्न आहे. तुम्हाला तुमची चरितार्थाची साधने आहेत आणि तुम्ही माझ्यापेक्षाही अधिक प्रामाणिकपणे संस्कार कराल आणि आपल्या धर्माची प्रतीके धारण करून स्वतःला अधिक पवित्र करू शकाल.

परमसत्याचे स्मरण करून देणारी चिन्हे आपण धारण करू या. आपल्याला वाईट गोष्टींपासून दूर ठेवणारे विधी आपण करू या. आपण सद्वर्तनाचे आणि चारित्र्याचे, नीतिमान, शुद्ध जाणिवेचे होऊ या. आपण अंतिम सत्याचे चिंतन करू, त्याचा आतून अनुभव घेऊ आणि त्याची कृपा जाणवून घेऊ या.

-----

## प्रकरण - ५

# धार्मिक संस्कारांची गरज आहे का?

आपल्याला विधींची गरज आहे का? धार्मिक कार्यक्रम, पूजा इ. हे केवळ विधी नाहीत का असे मला काहीजण विचारतात. आत्म्याची जाणीव हा आतील अनुभव असतो. विधी हे बाह्य कृती असतात. आत्म्याच्या जाणिवेसाठी विधी कसे उपयोगी पडतात हा प्रश्न आहे.

ज्याला आत्म्याची जाणीव झाली त्याला खरेच विधींची गरज नसते. परंतु आपण आपल्यालाच प्रश्न विचारला पाहिजे की आपण आतून शुद्ध झालो आहोत का? आपण जर प्रामाणिक असू तर आत्म्याच्या ज्ञानासाठी लागणाऱ्या प्रगल्भतेपासून आपण फार दूर आहोत असे आपण कबूल करू. अनेक जन्म घेऊन, अनेक कर्मे करून आणि पूर्वजन्मातील वासनांमुळे आत्म्याच्या ज्ञानाचे वरदान आपण झाकोळून टाकले आहे. सत्कर्मे करून आणि आपल्या उदात्त हेतूंशी जोडून, आपल्या पूर्व जन्मांपासून आपल्याला चिकटलेल्या दुष्ट व वाईट सवयी घालवाव्या लागतील. मग कर्माचा शेवट होईल आणि आत्मिक जिज्ञासेचा आरंभ होईल. तोपर्यंत ज्याला निव्वळ विधी म्हणतात ते करावे लागतील.

सामान्य लोकांसाठी शास्त्रात उल्लेखलेले सर्व विधी करणे योग्य होय. त्यांच्यापासून झालेले लाभ प्रत्यक्षात दिसतील. जेव्हा एखादी व्यक्ती धार्मिक ग्रंथांमध्ये सांगितलेल्या पद्धतीने कठोरपणे धार्मिक विधी करते तेव्हा त्याला मनाची एकाग्रता लाभेल. ती एकाग्रता त्याला नंतर आत्म्याचे चिंतन करण्यासाठी उपयोगी पडेल. जीवनाच्या सर्वदृष्टीने शास्त्रांचे अनुकरण करण्याची इच्छा असली म्हणजे तो एका विशिष्ट शिस्तीत येतो. जेव्हा आपण शास्त्रानुसार विधी करतो तेव्हा इच्छाशक्ती आणि निश्चयशक्ती बळकट होते. धार्मिक ग्रंथातील आज्ञा यांच्याशी तुलना करता आपले स्वतःचे दृष्टिकोन जर गौण मानले तर त्या आज्ञांमुळे आपली नम्रता आणि साधेपणा हे गुण जोपासले जातील.

आपण निव्वळ विधी करून काय मिळवितो? आपण मनाची एकाग्रता शिस्त, अलिप्तता, इच्छाशक्ती आणि नम्रता मिळवितो. एकंदरीत ते आपल्याला नैतिक जीवन जगण्यास मदत करतील. नैतिक आचरणाशिवाय आत्मजिज्ञासा आणि अनुभव असू शकणार नाहीत.

बुद्धाने कोणतेही वैदिक विधी सांगितलेले नाहीत. परंतु त्यानेही नैतिकता आणि शिस्तीवर जोर दिलेला आहे. नेहरू ज्याचा नेहमी उल्लेख करीत ते पंचशील हे बुद्धाला अतिशय महत्त्वाचे आहे. वैदिक विधी न करता नीतिमत्तेचे मोल बुद्ध दर्शवितो. पूर्वमीमांसकांचे काय? वैदिक विधी खूप महत्त्वाचे आहेत; यावर त्यांचा विश्वास आहे आणि परमेश्वराची चिंता

करण्याची गरज नाही. आपल्या सनातन धर्मामध्ये विधी, सद्वर्तन आणि त्यातून आलेली शिस्त, देवभक्ती आणि शेवटी आत्म्याचे ज्ञान यांची गुंफण आहे.

नीतिमत्ता स्वतःच येत नाही. जर तुम्हाला दूध हवे असेल तर तुम्ही गाय पाळली पाहिजे. जर तुम्ही गाय पाळली तर तुम्हाला दूधच नव्हे तर शेणही मिळेल. नंतर मग गवताचा भारा असेल. कर्म नावाची गाय तुम्ही पाळली तर तुम्हाला त्यापासून नीतिमत्ता आणि सद्वर्तनाचा लाभ होईलच. त्याबरोबरच तुम्हाला नको असे वाटणारे काहीतरी म्हणजे शेणही प्राप्त होईल. जेव्हा तुम्ही गाय पाळता तेव्हा ते ठिकाण (गोठा) शेणापासून मुक्त ठेवले पाहिजे. हा सामान्य जाणिवेचा किंवा शहाणपणाचा भाग आहे. या पद्धतीने तुम्ही धार्मिक विधींपासूनचे लाभ मिळविले पाहिजेत.

आत्मज्ञानासाठी जर विधी उपयुक्त नसते तर ईश्वर म्हटली जाणारी त्याची मूर्तीही त्यासाठी आवश्यक नाही. पण जेव्हा आपण ज्ञानाच्या उच्चस्तरावर पोहोचू तेव्हा धार्मिक विधी आणि ईश्वर यांच्याशिवाय भागवू शकू. प्रथम आतील प्रवासासाठी ईश्वराची अत्यंत आवश्यकता असते आणि त्याला अनेक कारणे आहेत. तुम्हाला मी एक सांगतो, जे चांगले आहे त्या सर्व दाखविणाऱ्या एका वस्तूची आपल्याला गरज आहे. आपण युगानुयुगे सर्व सद्गुणांचे प्रतिनिधित्व करणारा, सर्व पवित्र गुणधर्मांचा प्रतिनिधी असणारा असा म्हणून परमेश्वराचा विचार केलेला नाही का? जेव्हा आपण ईश्वर हा शब्द उच्चारतो तेव्हा आपण त्याचा दुर्गुणाशिवाय असलेला असाच विचार करतो. जे काही किंवा ज्या कोणामध्ये सौंदर्य, दया, शक्ती आणि प्रकाशमानता, तेज पूर्णपणे असते तो ईश्वरच असला पाहिजे. ज्याचा आपण विचार करतो तेच आपण होतो हे मानसशास्त्राचे तत्त्व आहे. ईश्वराच्या अनेक पवित्र गुणांवर चिंतन करून आपल्या नकोशा गुणांची जागा चांगल्या गुणांकडून घेतली जाईल. धार्मिक विधी, पूजा इ. कडून होणारे बरेच फायदे आहेत. एक म्हणजे ते आपल्याला चांगले बनवितात. ते आपल्याला निष्काम योग आणि अंतरंगात शोध घेण्याच्या मार्गात आपल्याला मौल्यवान ठरतात.

-----

## प्रकरण - ६

# कर्म हा योगाचा आरंभ बिंदू आहे

लोकांना सामान्यपणे वाटते की असे योग म्हणजे श्वासावर नियंत्रण ठेवून दगडाप्रमाणे स्थिर बसून राहणे यापेक्षा जास्त काही नाही. त्याचा शब्दशः अर्थ जोडणे, एकत्रीकरण असे आहे. आपल्या सर्व जीवनप्रवासात आपल्याला विविध वस्तूंशी जोडून घ्यावे लागते. पण असे जोडणे कायमस्वरूपाचे नसते. म्हणून मन अस्थिर राहते. जर आपण एखाद्या वस्तूशी, त्यापासून दूर होण्याची कमीतकमीही शक्यता नाही अशा रीतीने जोडले गेलो तर तो खऱ्या अर्थाने योग आहे. आपल्या सर्वांच्या मनाचे मूळ एक परमात्मा आहे. योगी लोक त्यांचे मन या मूळ वस्तूकडे वळविण्यासाठी त्यांचे श्वसन नियंत्रित करतात. विचारांचे कारण असलेले हे मूळ हे श्वसनाचे कारण असलेले मूळ असते. जर श्वसन मुळाशी स्थापित केले तर मनही त्यात विलीन होईल.

'योग'च्या विरुद्ध 'वियोग' आहे. जेव्हा मनुष्य मरण पावतो तेव्हा आपण म्हणतो की त्याने वियोग प्राप्त केला आहे. गीतेत भगवान म्हणतात की विशिष्ट प्रकारचा वियोग हा स्वतःच वियोग असतो. हे काय असते? जर तुम्ही दुःख दूर ठेवले तर म्हणजे जर दुःखाने तुम्हाला जखडले नाही तर तो तुमचा 'वियोगा'चा योग असतो.

तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा।।
भगवद्गीता ६.२३

आपण जे भौतिक अर्थाने सुख समजतो ते प्रत्यक्ष दुःख असते. परमात्म्यापासून दूर करणारे सर्व अनुभव हे दुःख असते. कारण आपण सुखदुःखातून जात असता मन अस्थिर असते. जेव्हा मन स्थिर असते तेव्हा ती सुखदुःखे नाहीशी होतात. मनाला शुद्ध करणे म्हणजे त्याला एकाच ठिकाणी केंद्रित होण्यास शिकविणे. योगाच्या परिपूर्ततेचे हे साधन आहे. आरंभी सर्वजण योग्यांप्रमाणे स्वतःच्या श्वासावर नियंत्रण ठेवू शकणार नाहीत. जर आपण एखाद्या श्रेष्ठ विषयात, एखाद्या चांगल्या कार्यात असू तर आपले मन एका विशिष्ट मर्यादेपर्यंत कलंकरहित राहील. आपले मन एकाच प्रयत्नात नियंत्रित करण्याचा प्रयत्न केला तर खरे सांगू गेल्यास ते मन स्वतःच मुक्त होईल आणि सर्व दिशांनी भटकू लागेल. जर आपण काही उदात्त कार्य करीत राहिलो किंवा उदात्त विषयात रस घेत राहिलो तर मन अस्थिर होण्याची कमीतकमी शक्यता असते.

पूर्वी 'अरिकण्डम्' असे म्हटले जाणारे एका लोखंडी कडे संयमित आणि शास्त्रानुसार जगण्यासाठी लोक गळ्यात घालीत. त्याचप्रमाणे आपण मन भटकू नये म्हणून 'अरिकण्डम्'

घातले पाहिजे. सत्कर्मात व्यस्त असणे हाही 'अरिकण्डम्'चाच एक प्रकार आहे.

यज्ञ करणे, उपवास करणे आणि व्रत करणे, भव्य मंदिरे, शिखरे बांधणे, तलाव खणणे इ. कार्यात एकाग्र होणे हा तसे करण्याचा मार्ग होता. अशा कर्मात एखाद्याला अडचणी, अपमान यांचा अनुभव येतो. पण त्याने टीका आणि अडथळे यांनी घाबरून जाऊ नये. ते मनाची शुद्धी करते. नंतर प्राणायाम, चिंतन इ. येते.

कझक्कोडी कोणतीही घाण गोळा न करता फिरत राहतो. जर तुम्ही थोडी रक्षा त्याला माखली तरी ती त्याला चिकटत नाही. कझक्कोडीप्रमाणे आपणही दुःख किंवा आनंदाने प्रभावित न होता परमात्म्याच्या दिशेने प्रवास करणे आणि त्याच्याशी एकरूप होणे चालूच ठेवले पाहिजे. अशा एकरूपतेला योग म्हणतात. ही आपली मूळची तशीच परम स्थिती असते. दरम्यान आपण त्या स्थितीपासून वेगळे होतो. म्हणून आता आपल्या परम आणि मूळ स्थितीचे आकलन होत नाही. त्या स्थितीला पोहोचण्यासाठी आपण धार्मिक विधी करून आरंभ केलाच पाहिजे.

-----

## प्रकरण - ७

# कर्मयोग

अर्जुन कृष्णाला विचारतो की युद्ध लादणे आणि मित्र व नातलगांचा युद्धात वध करणे हे पाप नाही का? हा आपल्याला अकृत्रिम आणि योग्य प्रश्न वाटतो. श्रीकृष्ण परमात्मा भगवद्गीतेत उत्तर देतो. बाह्यतः वाईट आणि दुष्ट वाटणारी कृती पापकारक असते असे नाही. स्पष्टपणे दुसऱ्याला वेदना देणाऱ्या कृती जगाच्या भल्यासाठी केलेल्या असू शकतील आणि त्यात पाप नाही. मग कोणती कृती पापकारक आहे आणि कोणती पुण्यकारक आहे? भगवान या प्रश्नाचेसुद्धा उत्तर देतात. फक्त वासनेने आणि द्वेषाने प्रेरित झालेल्या कृती पाप असू शकतील. वासना आणि द्वेषाने न प्रवृत्त झालेल्या पण जगाच्या भल्यासाठी केल्या जातात त्या कृती क्रूर वाटल्या तरी पुण्यमय असतात.

प्रश्न असा उद्भवतो की वासना किंवा द्वेषातून न उद्भवलेल्या कृती असतात का? मी एक उदाहरण देतो. गुन्हेगार ठरलेल्याला शिक्षा देताना न्यायाधीशावर वासना किंवा द्वेष यांचा पगडा असतो का? त्याने दिलेली शिक्षा क्रूर वाटेल पण ती खरेच अपराध्याच्या आत्मिक कल्याणासाठी असते. जर एखाद्याचा मुलगा वेडा झालेला असेल तर त्याला तो साखळीने बांधत नाही का? ते साखळीने बांधणे पापकारक असते का? ते त्या मुलाच्या तसेच त्याचा त्रास होणाऱ्या लोकांच्या भल्यासाठी चांगले असते.

अशा रीतीने शास्त्रांनी आपल्याला हे करा, हे नका करू अशा आज्ञा देत बांधून ठेवले आहे. आपण आपल्या आणि जगाच्या कल्याणासाठी शास्त्राच्या सिद्धांताप्रमाणे जगले पाहिजे असे कृष्ण म्हणतो. ''तस्माच्छात्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ।'' (तुम्ही काय केलेच पाहिजे आणि काय करू नकाच हे सांगणारी शास्त्रेच अधिकारी असतात). गीतेला आता व्यापक प्रमाणात मानले जाते. ज्यांना आपल्या धार्मिक रूढी आणि परंपरा यांबद्दल आदर नाही असे संशोधक, पाश्चात्त्य विद्वान इ. लोकही तिची स्तुती करतात. स्वधर्माच्या ज्ञानाबाबत त्यांनी वेगवेगळ्या प्रकारे अर्थ लावला आहे. गीता स्वधर्माविषयी जे सांगते त्याबाबत शंकेला जागा नाही : स्वधर्म हा शास्त्राने मनुष्यावर सोपविलेला असतो.

जोवर स्वार्थी वासना किंवा द्वेष नसतो तोवर कोणतेही कार्य, काहीही दुःखकारक नसते; तेव्हा आपल्यावर सोपविलेले कार्य करण्यात आपण सुखी असतो.

वासना आणि द्वेष यांस अहंकार कारणीभूत असतो. जेव्हा अहंकार नसतो तेव्हा उच्च आणि नीच, गौण आणि श्रेष्ठ अशा विचारातील अर्थहीनता लक्षात येते. आपण आपले कर्तव्य म्हणून काम करीत राहू आणि तसेच जगाच्या कल्याणात योगदान करीत राहू. आपले कर्म अहंकाराशिवाय करणे, ईश्वरार्पण भावनेने करणे असा गीतेने शिकविलेला कर्मयोग आहे.

वासनारहित अशा, आत्मा शुद्ध करणाऱ्या कृतीची परंपरा या भूमीत वैदिक काळापासून चालत आलेली आहे. श्रीकृष्ण परमात्म्याने एका सुटसुटीत मंजुषेत असलेली ही परंपरा आपल्याला वररूपाने दिलेली आहे.

आपण आपल्या जीवनात हा उपदेश उत्साहाने प्रत्येक कामात आणि कृतीत ठेवला पाहिजे. प्रत्येकवेळेस आपण काम करताना स्वतःलाच विचारले पाहिजे की या कामाचा आपल्याला काय लाभ होईल? ते आपल्याला कीर्ती देईल का? आपण वासना आणि द्वेष यांनी वाहवत जात आहोत का? ते करण्यात आपण पक्षपाती आहोत का? आपल्या कामाशी यापैकी काही जोडले गेलेले युक्त असेल तर ते, जरी ते बाह्य जगाला उदात्त वाटत असले तरी पापकारक समजले पाहिजे. जर आपण आपल्या मनाने केले, आपल्या वासनेने करायला भाग पाडले तर ते पूर्ण करण्यात खूप चुकीचे असेल. म्हणून श्रीकृष्ण म्हणतो, आपली सर्व कर्मे शास्त्रावर आधारलेली असली पाहिजेत. जर प्रत्येकजण सर्वांशी सारख्याच प्रेमाने आणि शुद्ध अंतःकरणाने वागेल तर समाजात शत्रुत्व आणि वादही राहणार नाहीत. मग जग आनंदाने भरून जाईल.

-----

जीवनाचा
वैश्विक मार्ग

# हिंदू धर्म

## भाग - २२

## धर्म सर्वांना समान

## प्रकरण - १

# मन कसे नियंत्रित करायचे?

एकाग्रतेने चिंतन करण्यात कोणता अडथळा असतो? अस्थिर मन असे याचे उत्तर आहे. सर्व समस्या मन, मनात उद्भवलेल्या वासनांमुळे निर्माण होतात. मनावर नियंत्रण ठेवणे आणि ते वासनांपासून परिणाकारकरित्या दूर ठेवणे सोपे नाही. जर आपण मनाला एखाद्या विषयाचा विचार करायला सांगितले तर ते क्षणभर आपली आज्ञा पाळते आहे असे वाटते, पण लवकरच ते स्वतःचा मार्ग आक्रमू लागते आणि दूरवर भटकते. जेव्हा मी चिंतन आणि शांती यांविषयी बोलतो, तेव्हा तुमचे मन काही वेळ स्थिर होईल आणि तुम्हाला आनंद वाटेल. पण क्षणात ते भटकेल आणि तुम्ही काही क्षण अनुभवलेल्या शांतीची जागा अशांती घेईल.

जर तुम्ही तोंड बंद ठेवले तर ते थोडा वेळ तुमचे ऐकेल. त्याचप्रमाणे जर तुम्ही तुमच्या डोळ्यांना काही न पाहण्याचे सांगून तुमचे डोळे बंद केले तर ते काही क्षण बाह्य जग बंद करतील. पण तुम्ही तुमच्या मनाला कशाचाही विचार न करण्याचे सांगण्याचा प्रयत्न करून पहा, ते तुमचे ऐकणार नाही.

मनावर संयम हवा. विचार करणे आणि विचार न करणे हे इच्छाशक्तीने नियंत्रित केले पाहिजे. तेव्हाच आपण ते आपल्या नियंत्रणात ठेवले आहे, आपण आपल्या जाणिवेचे मालक आहोत असे आपण म्हणू शकतो.

मनावर संयम नसलेले लोक असा वेड्यांचा उल्लेख होतो. वस्तुतः आपल्या कोणाचेच मनावर नियंत्रण नसते. वेडा बडबड करीत राहतो. पण आपले काय? आपण आतून मनाला बडबड करीत राहण्यास मुक्तता देतो.

मानसिक संयम म्हणजे काय हे तुम्हाला माहीत आहे काय? समजा, तुम्ही मोठे दुःख सहन करता आहात. जर तुम्ही मनाला ते न जाणवण्यास सांगितले तर तुमच्या आज्ञेने त्याला ते जाणवणार नाही (म्हणजे दुःख न जाणवणारे तुम्हीच). जरी तुमच्यासमोर वाघ आला आणि गुरगुरला तरी तुम्ही तुमच्या मनाला त्या प्राण्याची भीती वाटू देऊ नकोस असे बजावले तर तुम्हाला भीती वाटणार नाही. आपण निष्कारण रडत राहतो. मन जर ताब्यात असेल तर अतीव दुःखाच्या प्रसंगीही आपले हसू ढळणार नाही. अत्यंत गंभीर, अस्वस्थकारक स्थितीतही मन क्रोधाच्या अधीन होणार नाही आणि शांत राहील.

प्रथम आपण मनाला भटकू न देण्याचे प्रशिक्षण दिले पाहिजे. त्याला सत्कर्माकडे लावणे हा त्याचा एक मार्ग आहे. जेव्हा फवारा न उडता तेल शांत धारेने पडते तेव्हा त्याला 'तैलधारा' म्हणतात. मनाला असे गोळा केले पाहिजे आणि स्थिर केले पाहिजे. त्याला उदात्त

आणि ईश्वरासारख्या उच्च विषयांबाबत विचार करण्याची सवय लावली पाहिजे. शेवटी विचार करण्याची कृती थांबेल आणि आपण ईश्वराशी एकरूप होण्यासाठी ईश्वरातच विलीन होऊ.

या रीतीने मनावर नियंत्रण आणणे म्हणजेच योग.

पुढे जाण्यापूर्वी आपण मनावर संयम आणण्याचा मार्ग शोधला पाहिजे. नाहीतर आपणास पुनर्जन्म येईल आणि पुन्हा मनाच्या अशांतीचे आपणच कारण होऊ नये म्हणून या जन्मातच वासना आणि राग जागृत करणाऱ्या परिस्थितीतही मनाला जिंकण्याची संधी साधली पाहिजे. ज्याने आपल्या मनाला लगाम लावलेला आहे अशा माणसाला योगी लोकांकडून 'युक्त' म्हटले गेले आहे. तो सुखी असतो. तो खऱ्या अर्थाने ईश्वरीकृपा अनुभवतो, श्रीकृष्ण म्हणतो -

यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम्। ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्।।
प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम्। उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम्।।
युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः। सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते।।
सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि। ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः।।
(-भगवद्गीता ६-२६,२७,२८,२९)

योग हा साधूंसारख्या लोकांसाठी आहे असे समजून तुम्ही दूर जाता कामा नये. औषधाची कोणाला गरज असते? आजाऱ्याला. आपल्याला मनोव्याधी, मानसिक आजारपण असते. म्हणून आपल्याला बरे करणारे औषध घेतलेच पाहिजे.

मनावर वर्चस्व गाजविणारे दोन भिन्न मार्ग आहेत - पहिला बहिरंग आणि दुसरा अंतरंग. आपण दोघांचीही मदत घेतली पाहिजे. मठात एक गाडीवान आणि एक आचारी आहे. त्यांचे कार्य बाह्यस्वरूपाचे आहे. दिव्यांच्या वाती करणारे, पूजेसाठी फुले गोळा करणारे आहेत - ते आतील कर्मचारी आहेत. मठ चालविण्यासाठी दोन्ही प्रकारच्या लोकांची गरज असते. आतल्या आणि बाहेरच्या लोकांची नेमणूक करणे म्हणजे मन प्रथम एकाग्रतेने सत्कर्माला लावणे आणि शेवटी ते कोणत्याही गोष्टीचा विचार करणार नाही या स्थितीकडे नेणे.

बाह्य साधनांमध्ये संध्यावंदन, यज्ञ, दानधर्म इ. गोष्टींचा समावेश असतो. चिंतन हे अंतरंगातील सर्वोत्कृष्ट साधन आहे. चिंतनाला मदत करण्यासाठी अंतरंगातील पाच साधने आहेत. ते म्हणजे अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच आणि इंद्रियनिग्रह. मन सर्वांबद्दल प्रेमाने भारून टाकणे, इतरांना त्रास देण्याचा विचार न करणे म्हणजे अहिंसा आचरणे होय. अस्तेय म्हणजे इतरांच्या वस्तूंची अभिलाषा न बाळगणे. सत्य म्हणजे आत्मा, शरीर, मन, वाणी यांनी एकूण व्यक्तिमत्त्व बनविणे. शौच म्हणजे आरोग्य, स्नान करून स्वच्छता ठेवणे, धार्मिक पावित्र्य जपणे. इंद्रियनिग्रह हे इंद्रिय सुखांना मर्यादा घालते. ''डोळ्यांनी ठरावीक गोष्टी पाहू नये, कानांनी ठरावीक गोष्टी ऐकू नये, तोंडाने ठरावीक गोष्टी खाऊ नये'' - तुम्ही काय पाहू

शकता, काय ऐकू शकता, काय खाऊ शकता आणि तुमचे शरीर काय करू शकते यासंबंधातील बंधने. आपले शरीर हे आत्म्याच्या साधनेसाठी आहे. आपले शरीर जिवंत ठेवण्यासाठी आवश्यक अशा मर्यादेपर्यंत त्याचे पोषण केले पाहिजे. या पाच धर्मांचे, जातीचा, जमातीचा भेद न करता सर्व हिंदूंनी आचरण केले पाहिजे.

-----

## प्रकरण - २

# अहिंसा

मनुस्मृतीप्रमाणे सर्वांना लागू पडणाऱ्या धर्मामध्ये अहिंसा अग्रभागी आहे. मनाच्या नियंत्रणाच्या योगामध्ये तिचा समावेश आहे. दुसऱ्याला इजा न करणे यापेक्षाही अहिंसेचा अर्थ अधिक आहे, अगदी विचाराने किंवा शब्दानेही दुसऱ्यांना इजा न करणे असा तो अर्थ आहे.

निसर्गतः इतर लोकांना इजा करणे हे आपल्यापैकी कोणालाही नको असते. पण जर इतरांनी आपल्याला इजा केली तर रागाने आपल्याला बदला घ्यायचा असतो. समजा, आपल्या मुलांपैकी एखाद्याने अज्ञानाने घराला आग लावली. आपण त्याला शिक्षा करीत नाही. उलट आग विझविण्याचा प्रयत्न करतो आणि नंतर ते मूल आग आणि इतर धोकादायक वस्तूंपासून दूर राहते की नाही हे पाहतो. आपल्याला जे दुखावतात ते या मुलासारखे आहेत असा आपण विचार करायला शिकले पाहिजे. जर एखाद्याने आपल्याला दुखावण्याचा प्रयत्न केला तर त्याला तसे करण्यास प्रेमाने प्रतिबंध केला पाहिजे. आपण त्याच्याविरुद्ध वाईट भावना किंवा सूडाचा विचार करता कामा नये. ही खरी अहिंसा होय.

मनोनिग्रहाच्या योगामध्ये अहिंसेचे आचरण मोठे योगदान करते. मन हे एखाद्या राक्षसाप्रमाणे असते. विक्रमादित्याने त्याला नियंत्रणात आणल्यावर राक्षसाला-वेताळाला कशाचे आश्चर्य वाटते ते पहा. जर मन आपल्याला पूरक, साहाय्यक म्हणून ठेवले तर ते आपले खूप भले करेल. आंजनेयाने (हनुमान) खूप शक्ती प्राप्त केली आणि तो खूप महान सत्कर्मे करू शकला कारण त्याने मन जिंकले होते. मनाची शक्ती अपार आहे. संपूर्ण विश्व ही परम देवतेची कृती आहे. आणि या निर्मितीमध्ये अगदी लहान अशा मुंगीच्याही मनाने संपूर्ण विश्व व्यापलेले असते.

अनेक महान व्यक्तींनी आणि योग्यांनी सांगितले आहे की त्यांना, खऱ्या अहिंसेला चिकटून राहून मनावर नियंत्रण ठेवणे शक्य झाले. जेव्हा आपण अहिंसा आचरतो तेव्हा आपोआप राग नाहीसा होतो, मन स्वच्छ होते आणि ते सहजगत्या नियंत्रित होते.

जरी अहिंसेचे मुख्य ध्येय मनाचे नियंत्रण असले तरी आणखी अहिंसेत एक अनपेक्षित लाभ असतो. त्याला 'अवांतर प्रयोजन' म्हटले जाते. तुम्ही सर्वजण पूजा पाहण्यासाठी मठात आला. पण त्याचबरोबर तुम्ही नागेश्वरम् संगीत ऐकले आणि बराच काळ न भेटलेल्या लोकांना भेटलात - आणि आता तुम्ही माझे प्रवचन ऐकता आहात. हे सर्व अवांतर प्रयोजनाच्या गटात, श्रेणीत येते. अशाप्रकारे जर एखाद्याने शरीराने, मनाने आणि वाणीने खऱ्या अहिंसेचे आचरण केले तर त्याला अनपेक्षित लाभ होईल. त्याच्या उपस्थितीमध्ये सर्व प्राणी त्यांच्या कुवासना विसरतील आणि अन्य प्राण्यास दुखापत करणे थांबवतील.

अहिंसा - प्रतिष्ठायाम् तत्सन्निधौ वैरत्यागः -योगसूत्र, २.३५

पूर्णपणे अहिंसा पाळणाऱ्या माणसांच्या उपस्थितीत दुष्ट माणसांची मनेही बदलतीलः अन्य शब्दांत सांगायचे तर जेव्हा एखादा माणूस पूर्णपणे प्रेममय असतो तेव्हा तो इतरांना प्रेममय बनवू शकतो आणि हेच अवांतर प्रयोजन होय.

संन्याशाने पूर्ण अहिंसा पाळली पाहिजे. त्याने झाडाचे पानही तोडता कामा नये आणि वनस्पती शिजवून हिंसाही करता कामा नये. पूर्ण अहिंसेचा त्याच्यावर प्रभाव असल्याने त्याला होमातील विधी करता येत नाहीत. धार्मिक विधी करण्यासाठी अग्नी तयार करण्यात आपण नकळत काही कीटकांच्या नाशाला कारणीभूत होत असतो. संन्याशाला अग्नीचा विधी नसतो. म्हणून जेव्हा तो मरण पावतो तेव्हा त्याच्या शरीराचे दहन न करता ते पुरले जाते. जेव्हा तो संन्यासदीक्षा घेतो तेव्हा तो शपथ घेतो की तो केव्हाही कोणत्याही प्राण्याचे भीतीचे कारण होणार नाही.

'अहिंसा परमो धर्मः' (अहिंसा हा सर्वोच्च धर्म आहे.) बुद्ध आणि जैन धर्म त्यांच्या अनुयायांवर पूर्ण अहिंसा लागू करतात. आपला धर्म तपस्वी सोडून इतरांबाबत असे करीत नाही. हिंदू धर्मात, सामान्य धर्मात धर्मयुद्धाच्याबाबतीत अपवाद आहेत आणि ज्यात प्राण्यांची हत्या होते अशा काही यज्ञात, पृथ्वीवर दिव्य शक्ती आणण्यासाठी आणि त्या शक्तींना तृप्त करण्यासाठी पशुबळी दिला जात असे. आपली अशी श्रद्धा असते की अशा पद्धतीने बळी जाणाऱ्या प्राण्यांना उच्चस्थिती प्राप्त होते. अशी स्थिती त्यांना त्यांच्या स्वतःच्या प्रयत्नांनी मिळू शकत नाही. एकूणच ते प्राण्यांचे भले आणि विश्वाचे कल्याण यासाठी असते.

युद्धामध्ये सैन्याचे नायक स्वतःच्या राष्ट्रासाठी आपले बलिदान करतात, हे नुसते बसून चरबी वाढविण्यापेक्षा इतरांसाठी आपले जीवनदान देणे अधिक चांगले नाही का ?

अहिंसेच्या तत्त्वांवर तोंडी निष्ठा दाखविणे सोपे आहे. पण तेच आचरणात आणणे कठीण आहे. सामान्य जगामध्ये भांडणे आणि वाद अटळ असतात. त्यांचा विचार करता स्पष्टपणे हिंसक कृती केली जाऊ शकते. वस्तुतः अशी कृती हिंसक नसते. येथे कृती महत्त्वाची नसून त्यामागील हेतू महत्त्वाचा असतो. काही प्रकारच्या हिंसा शास्त्रानुसार समर्थनीय आहेत आणि त्या पापकारक मानल्या जात नाहीत. कारण अशी हिंसा व्यक्तिगत सुखासाठी नसून समाजाप्रती करायच्या कर्तव्यासाठी केलेली असते. उदा. यज्ञात पशुबळी देणे, खुन्याला फ़ाशी देणे, युद्धामध्ये शत्रूला ठार मारणे.

जर धर्माने अहिंसेचे आचरण सर्वांना लागू केले तर प्रश्न उद्‌भवतील. अर्थातच सर्वकाळ सर्वजण ते आचरू शकणार नाहीत म्हणून ज्यांना अहिंसेचे नियम पाळणे शक्य होत नाही ते पाप करतात असे मानणे संभव आहे. या प्रश्नाबाबत आपल्या धर्माने अधिक वास्तव

भूमिका घेतली आहे. आपण पाहिले की बुद्धधर्माने त्याच्या अनुयायांवर पूर्ण अहिंसा लागू केली आहे. पण व्यवहारात आपण काय पाहतो? जेथे बुद्ध धर्माचा प्रभाव आहे अशा सर्व देशांमध्ये युद्धात भाग घेणारी सैन्यदले आहेत. शिवाय निरपवादपणे प्रत्येकजण तेथे मांसाहारी आहे.

जर एखादा धर्म किंवा तत्त्व सर्वांना सामायिक केले तर शेवटी कोणीही प्रत्यक्षात अहिंसेला मान देणार नाही अशी स्थिती संभवनीय आहे. पुन्हा सांगायचे तर आपल्या धर्मात पूर्ण अहिंसा फक्त संन्याशासाठी आहे. त्यांच्या उदाहरणाचे अनुकरण करून ब्राह्मण, गुजराथसारख्या प्रांतातील वैष्णव आणि वेळ्ळाळस आणि कोमुट्टी अशांसारखे दक्षिणेतील शैव अहिंसा पाळतात. शास्त्राची कोणतीही आज्ञा नसताना ते स्वेच्छेने हे तत्त्व स्वीकारतात आणि पिढ्यानुपिढ्या पाळतात. तपस्वांच्या सत्त्वगुणाच्या उदाहरणाचा प्रभाव पडल्याने या जमाती स्वतः शाकाहारी बनलेल्या आहेत. आणि त्यांचे उदाहरण अनुसरून आणि त्यांच्यावर सक्ती केली जात नसूनही इतर जमातीसुद्धा प्रतिपदा, श्राद्ध आणि विविध देवतांच्या पवित्र दिनी मांसापासून दूर राहतात. जेव्हा एखादे तत्त्व व्यापक करणे अवघड असल्याने थोड्याजणांवर लादले जाते, ते ज्यांना लागू पडत नाही त्यांनाही ते आदर्श ठरते. ते शक्य तितके पाळतात. अहिंसा हा हिंदू धर्मातील सामान्य (सर्वांना लागू होणारा) धर्म आहे. जरी तो आदर्श असला तरी काही प्रसंगी त्याला चिकटून राहणे व्यवहार्य नाही.

वैदिक धर्मामध्ये सर्व कृतींमध्ये दुष्ट भावनेचा अभाव म्हणजे अहिंसा होय अशी व्याख्या आहे.

-----

## प्रकरण - ३

# सत्यवाद

सत्यवाद म्हणजे मन आणि वाणी यांची चांगली संयुक्तता, संलग्नता, एकत्रीकरण. सुज्ञ म्हणतात की मनाच्या विपरीत असलेली वाणी असत्य असते.

वाङ्मनस्योः ऐकरूप्यं सत्यम्।

देवाने मानवाला वाणीची देणगी दिलेली आहे जी त्याचे विचार आणि भावना व्यक्त करेल. जर आपण (आपल्या मनाने) विचार एक करत, बोलत दुसरेच असू तर देव आपल्या पुढील जन्मात आपली वाणीची शक्ती काढून घेईल - म्हणजे पशूंच्या राज्यात आपला जन्म होईल.

आपण पूर्वी पाहिले आहे की संपूर्ण अहिंसेच्या नियमाला, आपल्या शास्त्रात धर्मरक्षणासाठी युद्ध करणे, यज्ञात पशुबळी देणे असे अपवाद केलेले आहेत तसे अपवाद सत्यवादीत्वाला आहेत का? तुम्ही कदाचित् म्हणाल की 'नाही'. पण खरे पाहता, ते तसे 'आहेत'.

एखाद्या वसाहतीत अनेक अनिष्ट, वाईट व्यक्ती आहेत. समजा एखादा नागरिक अशा व्यक्तींनी पिडला गेला आहे आणि तो त्याच्या रागाला वाचा फोडतो की, ''एकाने हे संतापजनक कृत्य केले. दुसऱ्याने असा गुन्हा केला आहे.'' तो त्या दुष्टांची कृत्ये पुन्हापुन्हा (इतरांना) सांगत राहतो. असे करण्यात तो सत्यवचनी असतो म्हणजे, त्याच्या वाणी आणि मनात मतैक्य असते. पण त्याच्या अशा भावना व्यक्त करण्याने त्याच्या स्वतःच्या आणि समाजाच्याही हिताचा हेतू साध्य होत नाही. हे त्याच्या वाणी आणि मनाचे निष्फळ मतैक्य आहे - आणि त्याला सत्यवचनी म्हणता येणार नाही.

दुसऱ्या व्यक्तीचे उदाहरण घ्या. त्याचे खूप वाईट विचार आहेत आणि जर त्याने ते व्यक्त केले तर त्याला सत्यवचनी म्हणता येईल का? नाही.

म्हणून आपल्याला कळून येते की सत्यवचन म्हणजे केवळ मन आणि वाणी यांत मतैक्य नाही. तर ते म्हणजे चांगले विचार उच्चारणे : त्याला स्वतःला लाभदायक आणि लोकांना आवडणारे ''सत्यं भूतहितं प्रियं.''

विचार, शब्द आणि कृती यांद्वारे सत्कर्म करणे म्हणजे सत्यवचनीपणा. जे वाईट करते ते असत्यवचन. एखाद्याच्या हिताचे बोलणे हे पुरेसे नाही. तुम्ही प्रेमाने बोलले पाहिजे आणि तुम्ही ज्याबद्दल बोलता ते त्याला स्वीकारार्ह वाटले पाहिजे. जर तुम्ही कठोरपणे बोललात तर तुमचा हेतू चांगला असला तरी कोणीही ऐकणार नाही. अशा रीतीने जे शब्द हेतू साध्य करीत

नाहीत त्यांनी सत्य स्थापित होत नाही. तुमची वाणी लाभदायक असली पाहिजे आणि त्याचवेळेस ती ज्याला उद्देशून असते त्याला सौख्य देण्यास समर्थ असली पाहिजे. हा सत्यवचनीपणा आहे.

सुज्ञ म्हणतात : "त्याने सत्य बोलावे. त्याची वाणी सुखद असावी. त्याने असुखकारक बोलू नये. सुखद असत्य त्याने बोलू नये. सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमप्रियम्। प्रियं चं ननृतम ब्रूयाद् एषा धर्मः सनातनः।।
-(मनुस्मृति)"

वासना आणि क्रोध यांचा विषय असलेले मन प्रेम दर्शविणाऱ्या आणि कल्याणकारक शब्दांचे कारण होणार नाही. चांगले काही घडविणारे सत्यवचनीचे शब्द ही वासना आणि क्रोध यांपासून मुक्त असलेल्या मनाची निर्मिती असते.

मग सत्य म्हणजे काय? विचार आणि वाणी यांत मतैक्य हवे, मन प्रसन्न असले पाहिजे आणि बोललेले शब्द सुखकारक असले पाहिजेत; म्हणजे जे बोलले जाते त्याने बोलणाराचे तसेच श्रोत्याचे भले केले पाहिजे.

सत्यनिष्ठ असलेल्या मनुष्यासाठी एक अवांतर प्रयोजन आनुषंगिक लाभ असतो. असा मनुष्य सवयीने सत्य बोलत असतो म्हणून त्याचे शब्द खरे ठरतात. असा मनुष्य कधीही मुद्दाम खोटे उच्चारणार नाही. पण जर नकळत किंवा अज्ञानाने त्याने बोलण्यात चूक केली तर त्या चुकीचे सत्यात रूपांतर होईल. उदाहरणादाखल मी एक गोष्ट सांगतो.

तंजावर जिल्ह्यात, तिरूक्कडवूर येथे अभिरामिभट्ट नावाचा अंबेचा एक महान भक्त होता. तो नेहमी देवीच्या भक्तीत आनंदात असे. अशा वेळेस तो वेड्यासारखा बोलत असे. कोणीतरी राजा सरभोजीचे त्याच्याविरुद्ध कान भरले. "अभिरामिभट्ट हा मद्यपी आहे", त्याने राजाला सांगितले. "त्याची भक्ती निव्वळ ढोंग आहे." सरभोजीला सत्य शोधायचे होते. म्हणून तो तिरूक्कडवूरला गेला आणि त्याने त्याला विचारले : "आज कोणती तिथी आहे?" त्यावेळेस भट्ट भक्तीच्या आनंदात होता आणि अंबेचे तेजस्वी मुख चंद्राप्रमाणे आहे असे वाटून तो म्हणाला की ती पौर्णिमा आहे. प्रत्यक्षतः ती प्रतिपदा होती. राजाने निष्कर्ष काढला की त्याने भट्टाविषयी जे ऐकले ते खरे आहे आणि तुच्छतेने तो म्हणाला : "असे आहे का? आपण वर बघू आणि चंद्र उगवला का ते पाहू."

त्याक्षणी आकाशात पूर्ण चंद्र दिसू लागला. अभिरामिभट्टामध्ये सत्य भिनलेले होते. चुकीने तो खोटे बोलला होता. पण अंबेने तिच्या कानातील कुडी, दागिना आकाशात फेकून, पूर्ण चंद्राप्रमाणे चमकायला लावून त्याचे ते बोलणे सत्य केले.

महान माणसाचे वर तसेच शाप अंतरंगातील सवयीच्या सत्यवचनीपणाची शक्ती

यामुळे खरे ठरतात. हा सत्यवादीपणाचा 'आनुषंगिक लाभ'. ते त्याच्या अंतरंगातील सत्यवचनाच्या सवयीतून निर्माण होतात. सत्यवचनीने देखील जे बोलतो ते खरे होते, अशा निश्चित हेतूने सत्यवचनाचे आचरण करायला नको. अशी शक्ती निर्हेतूकपणे आणि नकळत प्राप्त होते.

जर एखाद्याने चाळीस संस्कार केले आणि अहिंसा, सत्यवचन, निर्लोभ, शुचिता यांसारख्या तत्त्वांना तो चिकटून राहिला आणि इंद्रिय संयम ठेवला तर मनुष्य स्वतःला शुद्ध करेल. मग खरे पाहता तो कोण आहे, ईश्वर कोणता आहे आणि परमसत्य काय आहे हे शोधून काढण्यासाठी लागणारी त्याची प्रगल्भता आणि सुज्ञता वाढेल.

-----

## प्रकरण - ४

# तीळ आणि पाणी कोठे जातात?

सर्व मानवांनी त्यांच्या पितरांशी आणि देवांशी कृतज्ञ असले पाहिजे. त्यांना त्यांच्या पितरांचे ऋण फेडायचे असते, देवासाठी विधी करायचे असतात. आपण आपल्या जातीतील प्राण्यांची आपल्या सर्वशक्तीनिशी सेवा केली पाहिजे आणि रोज एका अतिथीचे आतिथ्य केले पाहिजे. हे आतिथ्य किंवा तिरुवळ्ळुवर 'विरुंदु' म्हणतो त्याला मनुष्य यज्ञ म्हटले जाते. नंतर ब्रह्मयज्ञ करायचा असतो. येथे ब्रह्म हा शब्द वेदासाठी आलेला आहे. ब्रह्मयज्ञ म्हणजे वेदपठण करणे आणि दुसऱ्याला पठण करायला लावणे. हे कर्म सर्वांसाठी काही थोड्या लोकांकडून केले जाते. विधींपैकी एक सर्वांना सामायिक असलेला विधी, सर्व सजीवांवर प्रेम दर्शविणारा, त्यांना अन्न देणारा इ. असलेला भूतयज्ञ होय. पितृयज्ञ, देवयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ हे कोणत्या ना कोणत्या प्रकारे करणे हे सर्वांचे कर्तव्य आहे. जर प्रत्येकाने त्याचे काम वैदिक धर्मानुसार केले आणि ईश्वरार्पण भावनेने केले तर तो ब्रह्मयज्ञ करतोय असे म्हटले जाऊ शकते. तिरुवळ्ळुवर वेद जसे म्हणतात तसेच थोडेफार म्हणतोय,

तेंपुलत्तार, दैवं, विरुंदु, ओक्कल, तान एन्रु आन्गु ऐंबलत्तारू ओम्बल तलै.

तेंपुलत्तार हे पितर असतात. सर्वांना त्यांचे ऋण फेडायचे कर्तव्य असते. वेदमाता म्हणते : ''मातृ देवो भव, पितृ देवो भव'' (ज्याला माता देवता वाटते असे व्हा; ज्याला पिता देवता वाटतो असे व्हा.). ज्याने आपल्याला वेदांचे सार सांगितले असा अयुव्वै म्हणतोः ''अन्नयुं पितावुं मुन्नरि दैव'' (माता आणि पिता या प्रथम ज्ञात झालेल्या देवता आहेत).

आपण आपल्या मातापित्याला आदराने वागविले पाहिजे आणि त्यांना सुखात ठेवण्यासाठी सर्व काही केले पाहिजे. ते आपल्यासाठी जे सर्व त्याग करतात त्यांची आपण भरपाई करू शकत नाही. ते हे जग सोडून गेल्यावर आपण त्यांना न चुकता आहुती दिली पाहिजे आणि शास्त्रीय पद्धतीने श्राद्ध केले पाहिजे. सुधारणावादी श्राद्धाच्या कल्पनेची हेटाळणी करीत असले तरी आपण आपल्या मात्यापित्याची काळजी घेतली पाहिजे याच्याशी ते सहमत आहेत.

''तुम्ही अर्पण करीत असलेले तीळ, पाणी, भाताचे पिंड, केळी आणि इतर अन्नपदार्थ येथेच राहतात.'' असे सुधारणावादी निदर्शनास आणतात. ''किंवा ते आपल्या डोळ्यांसमोर कोणीतरी नेऊन खाताना दिसते. तुम्ही म्हणता की निधन पावलेले मातापिता या जगात पुन्हा जन्म घेतात. जर ते खरे असेल तर येथे दिले गेलेले त्यांना पोहोचेल असे म्हणणे वेडेपणाचे नाही का?'' तुमच्यापैकी काहीजणांच्या अशाच शंका असतील.

मी एक गोष्ट सांगतो.

एका माणसाने त्याच्या मुलाला दुसऱ्या एका शहरात महाविद्यालयात पाठविले. एक दिवस त्या मुलाला काही दिवसांतच परीक्षेचे शुल्क भरायचे आहे याची आठवण झाली. म्हणून त्याने वडिलांना पत्र लिहिले : "कृपया, अमूक एक रक्कम तार मनिऑर्डरने पाठवा." पिता गोंधळात पडला. तरीही तो तार कचेरीत गेला. कारकुनाकडे त्याने पैसे दिले, "कृपया, हे पैसे तार मनिऑर्डरने पाठवा", त्याने कारकुनाला सांगितले. त्याला वाटले की तो कारकून नोटांना छिद्र पाडून एका तारेत ओवेल आणि सर्व त्याच्या मुलाकडे पाठवेल. नंतर तो कारकून त्या माणसाला म्हणाला, "तुमच्या मुलाला पैसे मिळतील. ते पाठवले गेले आहेत." तो खेडूत पुन्हा कोड्यात पडला. नोटा एकमेकात गुंफल्याविना ते पैसे पैशाच्या पेटीत तसेच असल्याचे दिसले. तो कारकुनाला म्हणाला, "माझे पैसे तर येथेच आहेत. तुम्ही नोटांना अजून छिद्रे पाडली नाहीत." कारकुनाने त्याला हमी दिली की ते त्याच्या मुलाला मिळतील. आता तो त्याच्या संदेश पाठवायच्या कामाला लागला : 'कड कट् कड कट्' तो खेडूत तरीही संतुष्ट झाला नाही.

अर्थातच त्याच्या मुलाला पैसे पोहोचले.

एखाद्याच्या पितरांना आहुती देणेदेखील असेच आहे. हा विधी शास्त्राप्रमाणे केला तर या संबंधित असलेल्या देवता आहुती ज्यांच्यासाठी आहे त्यांना पोहोचवतील. जर पितर गायी म्हणून जन्मले तर दिली जाणारी आहुती गवताच्या रूपात असेल. ही कामे असलेल्या देवता परमात्म्याच्या आज्ञांची अंमलबजावणी करतात. म्हणून माता किंवा पिता यापैकी ज्यांचे श्राद्ध करायचे आहे त्याने आहुती स्वीकारण्यासाठी स्वतः येण्याची गरज नाही.

तारेने पाठविलेले पैसे ज्याच्या नावाचा पत्ता आहे त्याकडे पोहोचतात की नाही? जर तो परदेशात राहत असेल तर तेथे आपले चलन वैध असणार नाही. येथे जर रुपये दिले तर डॉलर, पौंड किंवा जे काही चलन असेल त्यात पैसे देण्याची व्यवस्था केली जाते. शास्त्रानुसार पितरांना अर्पण केलेल्या गोष्टी त्यांना सोयीस्कर असलेल्या रूपात पोहोचविल्या जातात.

आपल्या पितरांच्याबद्दल असणारी आपली कृतज्ञता आणि शास्त्रावरील विश्वास महत्त्वाचा आहे. मेजवान्यांमध्ये एखाद्यासाठी आयुरारोग्य चिंतले जाते आणि पाहुणे त्याच्या आरोग्याप्रीत्यर्थ पितात आणि खातात. आपल्या मानसिक शक्तीच्या गुणांमुळे ती व्यक्ती आरोग्यपूर्ण होईल अशा विश्वासाने ते तसे करतात. श्राद्ध म्हणजे श्रद्धेने केलेले काम. श्रद्धा सर्वात जास्त महत्त्वाची आहे. जर आपण काही करीत असू तर त्यासाठी घालून दिलेल्या नियमानुसार आपण ते केले पाहिजे. जेव्हा आपण पत्र लिहितो तेव्हा जे ज्याला पाठविले आहे, त्याला पोहोचते की नाही याची खात्री करतो. मला आवडेल तसा पत्ता लिहीन. तेथे असलेल्या पत्रपेटीत मी का पत्र टाकू? माझ्या घरी चांगली पेटी आहे, असे तुम्ही म्हणाल का?

निष्कर्म स्थिती, प्रेम, श्रद्धा, ज्ञान हे कोणत्याही नियमांना बांधलेले नाहीत. परंतु एखाद्या कृतीच्यामागे जेव्हा एखादा हेतू असतो तेव्हा त्यासंबंधित अशा नियमांना तुम्ही मान दिला पाहिजे.

-----

## प्रकरण - ५

# पूजा

प्रत्येक कुटुंबाने पूजा केलीच पाहिजे. ज्यांना ती करणे सोयीस्कर वाटते त्यांनी औपचारिक दीक्षेनंतर तपशीलवार पूजा केली पाहिजे. इतरांनी दहा मिनिटांपेक्षा जास्त काळ न चालणारी थोडक्यात पूजा करावी. नोकरदारांनी कमीतकमी, ही थोडक्यात पूजा करावी. पवित्र घंटा प्रत्येक घरात वाजली पाहिजे.

शिव, अंबा, विष्णू, विनायक आणि सूर्य यांच्या प्रतिमा स्थापन केल्या पाहिजेत. याला 'पंचायतन पूजा' म्हटले जाते. एका परंपरेनुसार कोरलेल्या प्रतिमा (अवयव असलेल्या) वापरल्या जात नाहीत. परंतु त्याऐवजी या पाच देवतांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या नैसर्गिक वस्तू वापरल्या जातात. शिवासाठी असलेले बाणलिंग हे नर्मदा नदीतील ओंकार कुंडातून मिळविले जाते. अंबिकेसाठी असलेला स्वर्णमुखी खडा (त्यावर एक सोनेरी रेष असते) हा आंध्र प्रदेशातील स्वर्णमुखी नदीच्या पात्रातून घेतला जातो. विष्णूचे प्रतीक असलेला शाळिग्राम हा नेपाळमधील गंडकी नदीतून घेतला जातो. सूर्यासाठी असलेला स्फटिक हा तंजावूरजवळील वळ्ळम येथून घेतला जातो. विनायकासाठी असलेला शोणभद्र हा गंगेची उपनदी असलेल्या शोण नदीतून मिळविला जातो. हे पाच दगड भारताच्या ऐक्याचे प्रतीक आहेत.

या पाच दगडांपैकी कशालाही डोळे, नाक, कान इ. नसतात. त्यांना नंतर अव्यवस्थित वाटणारे कोपरे नसल्याने त्यांना स्नान घालणे आणि कोरडे करणे सोपे असते. ते लहान असल्याने मोठी जागाही व्यापत नाहीत. मोठे देवघर किंवा खोलीची आवश्यकता नसते. एक छोटी पेटी पुरेशी असते.

शंकर भगवत्पादांपासून पंचायतन पूजेचे पुनरुज्जीवन झाले. षन्मत प्रथेचे (सहा देवतांची पूजा) निर्माते असल्याने त्यांनी त्या पाचात सुब्रह्मण्यम्‌ची भर घातली. म्हणून पाच खड्यांमध्ये आपण वेलायुधाचे (सुब्रह्मण्य) प्रतीक असलेला भाला-त्रिशुळाची भर घालू शकतो.

पूजेसाठी फार श्रम पडत नाहीत. तुम्हाला जर इच्छा असेल तर तुम्ही जेथे असाल तेथे ती होऊ शकते.

तुम्ही जेव्हा घरी पूजा करता तेव्हा महानैवेद्य म्हटला जाणारा शिजवलेला भात देवतांना अर्पण करावा लागतो. परमेश्वराने आपल्यासाठी या सर्व विश्वाची निर्मिती केलेली आहे. या निर्मितीतील जे आपल्याला लाभदायक आहे ते प्रथम आपण घेण्यापूर्वी (खाण्यापूर्वी) देवाला अर्पण केले पाहिजे. (प्रतीकात्मक). आपण ते त्याला खरेच देतो का? आपण केवळ ते त्याच्यासमोर ठेवतो आणि नंतर स्वतःच घेतो.

काहीजण तुच्छतेने विचारतात, परमेश्वर त्याला अर्पण केलेले स्वतः खातो का? 'निवेदन' म्हणजे परमेश्वराला जे दिलेले आहे ते त्याला खायला भाग पाडणे नाही. त्याला खावे लागत नाही. आपल्या स्वतःला आतून शुद्ध करण्यासाठी पूजा असते आणि त्यातून देवाला काही मिळवायचे नसते. निवेदन म्हणजे मी तुला हे सांगत आहे, मी तुला भरवत आहे असा त्याचा अर्थ नाही. तुम्ही देवाशी असे बोलले पाहिजे : "हे परमेश्वरा, तू तुझ्या कृपेने आम्हाला हे अन्न दिलेले आहेस." नंतर त्याला अर्पण केलेले अन्न त्याचे आहे असे समजून खाल्ले पाहिजे. त्याच्या कृपेशिवाय भात कसा पिकेल? तज्ज्ञ लोक संशोधन करून भातावर मोठे जाडजूड ग्रंथ लिहूद्यात. परंतु ते भाताचा एकतरी कण बनिवण्यास समर्थ आहेत का? ज्याला कृत्रिम भात म्हटले जाते तो देवाने निर्माण केलेल्या सामुग्रीपासून बनविला जातो. म्हणून माणसाने बनवले आहे असे जे वाटते ते सर्व शेवटी परमेश्वराच्या निर्मितीपर्यंत जाते. प्रथम त्याला अर्पण न करता त्याने दिलेल्याचा स्वतः आनंद उपभोगणे हे चोरीसमानच आहे.

जो सर्वत्र असतो तो आपल्याला जेथे हवा असतो तेथे असतो म्हणून तो आपल्याकडून आकलन होतो. दगड, माती, तांबे असे ज्यापासून त्याची प्रतिमा बनविली जाते, तो त्या सामुग्रीद्वारे आणि त्याच्या प्रतिमेद्वारे आपल्याकडे येईल. तो त्याच्या प्रेमापोटी असे करतो आणि त्याला तसे करण्याची शक्ती असते. नाहीतर आपल्याला त्याची गरज वाटली नसती.

प्रत्येक घरात देवाची पूजा केली गेलीच पाहिजे. त्याचा धावा केला पाहिजे आणि त्याने आपल्याला जे दिलेले आहे. ते आपण वापरत आहोत हे त्याला सांगायचे असते. जर आपण तसे करीत राहिलो तर काळाच्या ओघात त्याला अर्पण करण्यासाठी अयोग्य वस्तू न वापरण्याचे ज्ञान आपल्याला होईल. आपल्याच अंगी चांगले गुण येतील.

-----

## प्रकरण - ६

# मानवतावाद

(तीळ आणि पाणी : ते कोठे जातात? या प्रकरणात परमगुरू पितृऋण फेडणे, परमेश्वरपूजेचे आपले कर्तव्य आणि पृथ्वीवरील सजीवांना अन्न देणे यांविषयी बोलले. त्यांनी सांगितले की तिरुवळ्ळूरनेही त्याच्या स्वतःच्या कुरल मध्ये हाच धर्म सांगितला : तेन्पुलत्तार दैवम्, विरुंदु, ओक्कल तान एन्रु आन्गु ऐंबुलत्तारु ओंबल तलै).

वरील विधानात एक चांगला पुरावा आहे की तिरुवळ्ळूरने वेदांच्या अधिकाराचा आदर केला. काही म्हणतात की तो वैदिक धर्माचा नव्हता आणि तो बुद्ध किंवा जैन होता. आणि काही म्हणतात तो सर्व धर्मांच्या पलीकडे होता. असाही दावा केला जातो की ज्या यज्ञात पशूंचा बळी दिला जातो, त्यांचा त्याने उघड निषेध केला. त्यांच्या मुद्याच्या समर्थनार्थ ते कुरलमधील कडवे देतात.

(कुरलवरील परमगुरूंचे भाष्य प्रकरण २३ भाग ५ मध्ये आहे.)

ज्याने वैश्विक आवाहन असलेले कुरल रचले तो तिरुवळ्ळूर वैदिक धर्माला विरोध करणारा नास्तिक नव्हता. तो विरुंदु म्हणून ज्याचा उल्लेख करतो तो वैदिक मनुष्ययज्ञासारखाच आहे.

रोज सकाळी ओंजळभर तांदूळ (न शिजवलेले) गरिबांसाठी बाजूला ठेवले पाहिजेत. सर्व कुटुंबांनी रोज न चुकता हे केले पाहिजे. अशा रीतीने ठेवलेला तांदूळ घराघरातून आणि भागाभागातून गोळा केला पाहिजे, शिजवला पाहिजे, स्थानिक मंदिरातील देवतेला नैवेद्य दाखविला पाहिजे आणि त्याचे गरिबांमध्ये वाटप केले पाहिजे. गरिबांसाठी ठेवलेल्या ओंजळभर तांदळाबरोबर एक पैसाही ठेवत जा. प्रत्येक कुटुंबातून गोळा केलेला पैसा भात रुचकर बनविण्यासाठी मीठ, तिखट इ. विकत घेण्यासाठी पुरेसा होईल. त्याचा उपयोग इंधन विकत घेण्यास आणि भांड्यांचे भाडे देण्यास होईल. अशी योजना राबविणे म्हणजे गरिबांची मोठी सेवा करणे - आणि देवाची सेवा करणे होय. भक्तीविषयी न बोलता, असे औदार्य मंदिरात जाणारांना प्रोत्साहन देईल. प्रथम अन्न नैवेद्य म्हणून अर्पण केला जात असल्याने गरीब ते अन्न प्रसाद म्हणून घेतील, तो त्यांची अंतरंगाची शुद्धी करेल.

अन्नदान ही एक प्रकारची सेवा किंवा परोपकार आहे. आपण गरिबांची सेवा, समाजसेवा आणि इ. विषयी बोलतो. हल्ली हे सर्व गयावया करीत आणि जाहिरातबाजीसाठी केले जाते. पूर्वी गाजावाजा न करता सहजपणे गरजूंची सेवा केली जात असे. सेवा 'पूर्त धर्मात' येते आणि त्यात लोकांसाठी विहिरी आणि तलाव खणणे, लोकांच्या आध्यात्मिक

कल्याणासाठी मंदिरे बांधणे, बागा तयार करणे येते. प्रथम विहिरी आणि तलाव खोदणे येते. या कामाच्या महत्त्वाचे मोजमाप अशा सर्वसाधारण संवादातून होते : ''तो काय करतो? विहीर खणतो किंवा काहीतरी?'' जनावरांची तहान भागविण्यासाठी खेड्याबाहेर तलाव खणणे हे खूप पुण्यकारक आहे. अशा कामात गरीब-श्रीमंत असा भेद न करता खेड्यातील किंवा वसाहतीतील सर्व लोकांनी शारीरिक प्रयत्नांसह एकत्र यायला हवे. जाताजाता सामाजिक एकोपाही साधला जाईल.

शिक्षणाने आपण आपली बुद्धी शुद्ध करतो, चिंतनाने आपण आपली मने शुद्ध करतो, श्लोक किंवा काव्याने आपण आपली वाणी शुद्ध करतो. आपण आपले शरीर कसे शुद्ध करतो? इतरांच्या सेवेसाठी आपण स्वतः श्रम करून. याप्रकारे आपण जशी सेवा करीत राहू तशी आपल्याला आतून शुद्धी प्राप्त होईल. जेव्हा सर्वजण भेदाविना, कोणालाही दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ न मानता विहीर किंवा तलाव खणण्यात भाग घेतील तेव्हा आपला अहंकार उखडला जाईल. तलावात पाणी ओसंडून वाहण्यापेक्षा आपल्या हृदयातून प्रेम ओसंडून वाहणे हे अधिक महत्त्वाचे आहे. समाजसेवेत बाह्य देखाव्याची गरज नसते; आपण आपल्या कामाचे प्रदर्शन करता कामा नये. पदपथावर विखुरलेले काचेचे तुकडे गोळा करणे आणि ते सुरक्षित ठिकाणी ठेवणे : ही सुद्धा लोकांची सेवा आहे आणि आपल्या अंतरंगाची शुद्धता करण्याचे साधन आहे. आपण परमेश्वराने आपल्याला दिलेल्या शरीराने - इतरांची सेवा करून आणि सर्वांमध्ये त्याचे दर्शन घेऊन - त्याला संतुष्ट केले पाहिजे.

-----

## प्रकरण - ७

# इतरांची सेवा हीच ईश्वरकृपेची अनुभूती

एखादा मनुष्य अनेक प्रकारे भाग्यशाली असू शकेल. इतरांची सेवा करण्याच्या संधीपेक्षा त्याला अधिक सुदैवी करणारे काही नाही.

जेव्हा आपण आपल्या कुटुंबाची सेवा करतो तेव्हा आपण कशी मदत करतो याची जाणीव आपल्याला नसते. आपण आपले जे नातलग नाहीत म्हणजे इतर कुटुंब, आपले खेडे, आपले शहर, आपले राष्ट्र, सर्व मानवजात यांना मदत करण्यास शिकले पाहिजे. आपल्याला अनेक समस्या असतात, आपल्याला अनेक कष्ट असतात आणि आपल्याला अनेक चिंता, काळज्या असतात. या सर्वांतही आपण इतरांची सेवा करण्यास काही वाटून घेऊ नये. इतरांना मदत करण्याच्या कामात आपण मग्न असता आपण आपल्या समस्या विसरू. एक म्हण आहे : ''तुमच्या शेजाऱ्याच्या मुलाला दूध पाजा आणि तुमच्या मुलाचे पोषण होईल.'' आपण इतरांचे कल्याण करू तसा ईश्वर आपल्याला आपल्या समस्यांतून बाहेर काढेल. तथापि, लोकांना त्यांच्या अडचणीत मदत करणे हे अशा लाभाच्या हेतूने नको. इतरांना आपल्या कार्याचा कसा फायदा होतो त्याचा आपण विचार करू नये. उलट आपली सहज चित्तशुद्धी कशी होईल याचा विचार करावा. शिवाय सोबत्यांची सेवा करण्याने आपण अनुभवतो त्या सौख्याचा विचार करावा.

सेवा फक्त मानवापुरती नसावी. पण ती प्राणिजगतापर्यंत न्यावी. पूर्वी जनावरांसाठी मुद्दाम तलाव खोदले जात आणि त्यांना त्यांचे अंग घासण्यासाठी दगडी खांब उभारले जात. प्रत्येकाने रोज एका गाईला कमीतकमी एक मूठ गवत खाऊ घातले पाहिजे. त्याला 'गोग्रास' म्हटले जाते आणि या कृतीची शास्त्रात खूप स्तुती केली आहे. ग्रास म्हणजे तोंडभर आणि इंग्रजी शब्द 'grass' हा यापासून आलेला आहे.

यज्ञ करणे, आहुती देणे आणि श्राद्ध करणे हे, या जगात आपण जी सेवा करतो त्याचा इतर जगातील लोकांपर्यंत केलेला विस्तार समजावा. हे विधी मंत्रांच्या उच्चारणात केले पाहिजेत.

आपल्यासारखे सामाजिक कार्य करू इच्छिणारे अनेकजण, अनेक समूह असलेच पाहिजेत. समान विचारांच्या सदस्यांच्या एका मंडळात सर्वांचे प्रयत्न आणले तर ते आदर्श ठरेल. अशा संस्था भंगू नयेत याची काळजी घेतली पाहिजे आणि त्या शिस्तीची अंमलबजावणी करीत प्रामाणिकपणे चालविल्या पाहिजेत. मानवतावादी काम करणारे हे स्तुती आणि दोष समान मानणारे, साहसी आणि उत्साही माणसे हवीत.

तुम्ही अन्नपदार्थांची यादी प्रदर्शित करणाऱ्या, जेथे मोहक पदार्थांचे प्रदर्शन मांडलेले असते अशा उपाहारगृहात वेळ घालविता कामा नये. त्याऐवजी इतरांना मदत करण्यात वेळ घालवावा. जीवनाच्या चिंता आणि कष्ट यात थोडा वेळ आनंदात घालविण्यात काय चूक आहे असे तुम्ही विचाराल. मला सांगावेसे वाटते की इतरांना मदत करण्यातील आनंद इतर कशातही मिळत नाही.

कृष्ण परमात्मा खेळकर होता, नाही का? पण त्याचा खेळकरपणा ही बाह्य क्रिया होती. कारण अंतर्गत तो इतरांची सेवा करीत होता. त्याने कसे खेळकरपणे लोकांना संकटातून मुक्त केले आणि कितीतरी लोकांना त्याची मदत झाली. गुराख्यांना वाचविण्यासाठी लहान कृष्णाने मोठा गोवर्धन पर्वत उचलला. आणि पुन्हा, ज्याने यमुना विषमय करणाऱ्या कालिंगाच्या (कालिया) फड्यावर लहानसा कृष्ण नाचला. ती सर्व लीला वाटते, त्याने केलेली सर्व साहसी कृत्ये गोकुळातील लोकांना वाचविण्यासाठी होती. कृष्णासारख्या कोणीही लीला केल्या नाहीत; त्याचवेळेस त्याच्याइतकी मानवाची सेवा कोणीही केली नाही. त्याने केलेली ती केवळ बाह्य सेवा नव्हती. त्याने ज्ञान देऊन मानवाची सेवा केली. अर्जुनाचा आणि उद्धवाचा गुरू म्हणून त्याने महान सत्ये शिकविली. हे सर्व त्याने हसत आणि सर्वत्र प्रसन्नता पसरवीत केले. त्याने जे केले ते सर्व अगदी सहजतेने केले. ज्यांनी मानवसेवेचे काम पत्करले आहे त्यांना त्याच्या उदाहरणावरून प्रेरणा घेतली पाहिजे.

ईश्वराच्या सर्व अवतारांमध्ये कृष्णाची मानवसेवा सर्वात महान आहे. राम आणि आंजनेयाच्या अवतारांमध्ये सेवा मूर्तिमंत झालेली दिसते. जेव्हा आपण इतरांसाठी काम करतो तेव्हा त्यांच्या (कृष्ण आणि हनुमान) उदाहरणांवरून प्रेरणा घेतली पाहिजे, आपण त्यांच्यासारखे निःस्वार्थी असले पाहिजे आणि प्रसिद्धी टाळली पाहिजे.

जेव्हा आपली चित्तशुद्धी नसते तेव्हा आपण बाह्य जगापासून स्वतःला दूर ठेवत असतो. ज्या दिवशी आपण कोणाचीही सेवा करणार नाही तो दिवस अशुद्ध मानला पाहिजे. परमेश्वर सर्व प्राणिमात्रांचा पिता आहे. आपल्याबरोबर असलेल्या लोकांची सेवा करण्यात आपण ईश्वराची सेवा करीत असतो. तिरुमूलारच्या 'तिरुमन्तिरम्'मध्ये त्याचा हा संदेश आहे :

नडमाड-क-कोयिल नंबर-क-कोन्रीयिल, पदमाड-क-कोयिल भगवर्कदामे

त्याचा अर्थ असा : लोकांची सेवा करणे म्हणजे ईश्वराची पूजा करणे होय.

-----

# प्रकरण - ८

## सर्व प्राणिमात्रांना सुखी करणे

आपण स्वर्गस्थांसाठी, देवांसाठी यज्ञ करणे, आपल्या पितरांना आहुती देणे, श्राद्ध करणे न चुकता केलेच पाहिजे. पूर्वी याशिवाय आपले पूर्वज देवपूजा करीत, अतिथींना भोजन देत आणि सर्व प्राणिमात्रांसाठी असलेला वैश्वदेव करीत. जर तुम्ही ते करीत नसलात तरी तुम्हाला त्यांची कल्पना असली पाहिजे. मी वैश्वदेवाविषयी सांगतो.

आपल्या रक्षणासाठी आपल्याला अनेक प्राण्यांना इजा करावी लागते, नाही का? आपण आपले घर स्वच्छ ठेवण्यात अभिमान बाळगतो. पण आपण हे विसरतो की प्रत्येक घर एक कत्तलखाना आहे. धर्मशास्त्रानुसार हा एकच कत्तलखाना नाही, परंतु पाच कत्तलखाने एकत्र आहे. ते कोणते पाच आहेत? 'पञ्चषुणा गृहस्थया वर्तन्तेऽहरहः सदा। खण्डनी, पेषनी, चुल्ली, जलकुम्भा उपस्करः।।'

विळी भाजीपाला चिरण्यासाठी वापरली जाते - तो एक कत्तलीचा प्रकार आहे. भाजीपाल्यांनासुद्धा जीव आहे. ते आपल्याला सांगतात, ''शेळ्या, गाई आणि कोंबड्या (पक्षी) यांच्याप्रमाणे आपण खात असलेला भाजीपाला आणि गहू (धान्ये) यांनाही जीव आहे. हे खरे आहे की त्यांच्यात कुठलाही फरक नसला तरी त्यात अहिंसेच्या प्रमाणानुसार भाजीपाला आणि प्राण्यांमध्ये फरक आहे. वनस्पतींना मानवाप्रमाणे जीव आणि भावना असतात, परंतु त्यांना प्राणी आणि पक्ष्यांइतकीच वेदनांती जाणीव नसते. हे शास्त्रीयदृष्ट्या स्थापित झाले आहे. शिवाय आपण काही ठरावीक पालेभाजी उपटून अन्न म्हणून वापरतो, इतर बहुतेक भाज्या त्यांची कापणी न करता मिळविल्या जातात. हे आपली नखे किंवा केस कापण्यासारखे आहे. वनस्पतींना अगदी थोडी वेदना होते. जर आपण या वनस्पतींची फळे पिकल्यावर खाल्ली तर इतक्या प्रमाणातही वेदना होत नाहीत. पिके पक्व झाल्यावर आणि वाळल्यावर ती कापून डाळी, धान्ये मिळतात.

शाकाहाराच्या बाजूने आणखीं एक मुद्दा आहे. फक्त गोमांसासारख्या प्रकारचे मांस खाल्ले जाते. घोड्याचे मांस नेहमी खाल्ले जात नाही. पहिल्या किंवा दुसऱ्या महायुद्धाच्या काळात सैनिकांना घोड्याचे मांस देण्याविषयी प्रश्न उद्‌भवला. तेव्हा शाकाहाऱ्यांनीच विरोध दर्शविला. पक्षी आणि प्राणी खाणारे सुसंस्कृत आहेत असे मानणारे लोक दूरच्या प्रदेशातील जे लोक रानटी लोकांसारखे मानवाचे मांस खातात त्यांची निंदा करतात आणि त्यांना नरमांसभक्षक म्हणतात. जे मांस खातात ते आपल्याला आठवण करून देतात की भाजीपाल्यात जीव असतो : ''होय, पण जेव्हा हिंसेचा प्रश्न येतो तेव्हा सर्व प्राणी सारखेच असतात का? तुम्ही प्राण्यांचे मांस आणि मानवी मांस यात फरक का करता? तसेच आपण

वनस्पती आणि प्राण्यात फरक करतो. शाकाहार सात्त्विक गुणांना हातभार लावतात." जगण्यासाठी अन्न आवश्यक असल्याने घरात विळी, पेषनी इ. कापण्याची साधने आपल्याला ठेवावी लागतात; ते अपरिहार्य आहे.

तिसरी हत्या चुली, चूल दर्शविते. अनेक किटकांचा चुलीत नाश होतो. एखादी मुंगी शेगडीजवळ सरपटत, रांगत जाते आणि जळून जाते. काही वेळेस जेव्हा आपण एखादे भांडे जमिनीवर किंवा मांडणीवर ठेवतो तेव्हा एक-दोन कीटक चिरडले जातात. उन्हाळ्यात कीटक जेथे पाण्याची भांडी ठेवलेली असतात अशी ओलसर जागा शोधतात. पाण्याच्या भांड्याचाही हत्यारांमध्ये समावेश होतो. उपस्कर किंवा केरसुणी असते, आपण जेव्हा जमीन झाडतो तेव्हा अनेक लहान कीटक ठार मारले जात नाहीत का? अशा रीतीने आपल्या घरात हत्येची पाच अवजारे असतात.

आपल्याला इजा करणाऱ्या प्राण्यांनाही आपण दुखावता कामा नये. पण आपण काय करतो? आपण अगदी निरुपद्रवी प्राण्यांनाही यातना देतो किंवा ठार मारतो. आपल्याला जगण्यासाठी असंख्य सजीवांना दुखवत राहावे लागते. असा विचार करणे दुःखद आहे. परंतु हे सर्व अटळ दिसते. आपण मुद्दाम हत्या करीत नाही. नकळत केलेल्या पापाबद्दल प्रायश्चित्त आहे. हे वैश्वदेवाचे प्रायश्चित्त आहे. परमेश्वराला आपल्याला निरनिराळ्या प्राण्यांचा नाश केल्याच्या पापाबद्दल क्षमा करण्यास आणि त्या प्राण्यांच्या नंतरच्या जीवनातील सौख्यासाठी आपण हा विधी करतो. वैश्वदेव हा असा बहिष्कृतांसाठी- कुत्रे, कावळे, कीटक अशा सर्वांसाठी असतो. हा विधी आपल्याला अनेक पापांतून मुक्त करतो.

दीर्घकाळ साधू आणि ब्रह्माच्या पुत्रांकडून पंचमहायज्ञ केले गेले. सर्वांनी ते प्राचीन काळापासून आपल्या पूर्वजांपर्यंत केले. पाच महायज्ञ प्रलयापर्यंत व्यत्यय येऊ न देता करायचे आहेत. पण आपले 'चांगले भाग्य' असे की ही परंपरा भंगली आहे. अधिक वाईट म्हणजे त्यापासून होणाऱ्या लाभांपासून आपण भविष्यकाळातील पिढ्यांना वंचित केले आहे.

मी अनेक विधींबद्दल बोललो आहे. तुमच्या कार्यालयीन आणि व्यावसायिक कामाचे नुकसान होऊ न देता किमान जे करता येतील ते करा. जर तुमच्याकडून ते करायचे राहिले तर पश्चात्ताप व्हायला हवा आणि तुम्ही त्या चुका दुरुस्त कराव्यात.

-----

## प्रकरण - ९
# चित्तशुद्धीकडे

ज्या विधींमुळे तुम्ही मनाच्या अशुद्धतेपासून मुक्त व्हाल असे बरेचसे विधी आहेत. पिढ्यानुपिढ्या आपल्या पूर्वजांनी ते केले आणि सौख्य आणि समाधान मिळविले, आपण त्यांचे अनुकरण केले पाहिजे. आपल्याला कोणतीही नवीन जीवनपद्धती, नवीन तत्त्व किंवा श्रद्धा यांचा शोध घेण्याची गरज नाही.

आपल्या भूतकाळात महान व्यक्तींकडून, ज्यांनी आपल्याला आत्मज्ञानाचे पाठ दिले, कौटुंबिक आणि सामाजिक आचार दिला, त्यांच्याकडून आपण शिकू शकतो. उदाहरणार्थ, त्यांच्या काळात मैत्री आणि नाते उच्चतत्त्वांवर आधारलेले होते. जेव्हा एखादा विवाह किंवा उत्तरक्रिया असेल तेव्हा सर्व मित्र आणि नातलग मदतीसाठी पुढे येत. ते सर्वात चांगले सुसंस्कृत वर्तन होते आणि पोकळ बाह्य दिखाऊपणावर आधारलेले नसे. लोक त्या काळात गरिबांना आणि गरजूंना मदत करण्याबाबत प्रामाणिक होते. विवाहप्रसंगी वधूच्या पालकांना एक लहानशी रक्कम, पाच-दहा रुपये देत असत आणि जे विवाह करीत त्यांचे ओझे हलके करीत.

जेव्हा प्रत्येकजण गरजूला थोडेसे पैसे देतो तेव्हा देणाऱ्याला त्याचा (आर्थिक) चिमटा बसत नाही. परंतु घेणाऱ्याला बरीच मोठी रक्कम मिळते. त्यायोगे तो विवाह साजरा करू शकतो किंवा उत्तरक्रिया करू शकतो. पूर्वी नातलगांमध्ये गरीब आणि श्रीमंत यांच्यात फारसे अंतर नसे. श्रीमंत मनुष्य त्याच्या गरीब नातलगांना मदत करीत असे. हा धर्माचा एक भाग असे. जो मनुष्य मदत करतो तो, जो मदत घेतो त्यापेक्षा स्वतःला अधिक शुद्ध करतो.

आता परिस्थिती बदलली आहे. सुस्थितीत असलेले लोक त्यांच्या गरीब नातलगांना मदत करीत नाहीत. पूर्वी अन्नदान ही महान परंपरा होती. ती आता कशी आहे? हल्ली सुस्थितीतील लोक इतरांना जेवण देतात परंतु त्यांच्यासारख्याच सुस्थितीतील लोकांना. हा फरक आहे. जेव्हा ते मेजवान्या देतात तेव्हा त्यात बराचसा पैसा आणि सामुग्री खर्च केली जाते. या सर्वात धर्म आणि मनाची शुद्धी यांना कोठे जागा आहे? उदात्त हेतूने मेजवानी दिली जात नाही. उलट ती स्वार्थाने दिली जात असते. जो मनुष्य ती देतो तो निमंत्रितांना फसविण्याचा विचार करतो. परंतु निमंत्रितांना माहीत असते की यजमानाच्या त्यांच्याबद्दलच्या प्रेमाच्या भावना खऱ्या नाहीत. अशा रीतीने यजमान आणि अतिथी एकमेकांना फसवितात. एकूणच मेजवान्या या दुसरे-तिसरे काही नसून फसविण्याची आधुनिक कला आहे आणि त्यांना चित्तशुद्धीचे काही देणे-घेणे नाही.

जर तुम्ही एखाद्या गरिबाला अन्न किंवा वस्तू-रूपाने मदत केली तर तुम्ही आणि तो

सारखेच सुखी असता; दोन्ही बाजूंनी प्रेम असते. उलट मेजवान्यांमध्ये वाईट इच्छाही असते. श्रीमंतांकडून दिल्या गेलेल्या मेजवान्यांनी गरिबांच्या हृदयात द्वेष आणि संताप यांची निर्मिती होते. नातलगांमध्ये श्रीमंत-गरीब असा भेद नसला पाहिजे.

फक्त श्रीमंतच गरिबांना मदत करतात आणि पुण्य मिळवितात असे तुम्ही समजू नका. जर तुम्ही सुस्थितीत नसाल तर तुम्ही शारीरिकदृष्ट्या मदत करून इतरांची सेवा करू शकता. एका वसाहतीत राहणारे तुम्ही सर्वजण तलाव खोदण्यात एकत्र येऊ शकता. त्याचा चित्तशुद्धीसाठी उपयोग होतो. तुम्ही ईश्वरकृपेला कसे प्राप्त होता. सतत इतरांची सेवा करून, सर्व सजीवांप्रती दया बाळगून तुमचे मन, तुमची जाणीव स्वच्छ होईल. या तुमच्या शुद्ध जाणिवेत, शुद्ध चित्तात तुम्हाला ईश्वराची प्रतिमा दिसेल. गढूळ पाण्यात तुम्हाला एखादी प्रतिमा दिसते का? अशुद्धतेमुळे आपण आपली मने गढूळ केली आहेत. ईश्वराची भक्ती करून आणि मानवाची सेवा करून आपण मने स्वच्छ करावी. नंतर ईश्वर आपल्या आवाक्यात येईल.

-----

## प्रकरण - १०

# दोषान्वेषण

धर्माने प्रेरित झालेले जीवन जगणे म्हणजे ठरावीक शिस्त बाळगणे आणि वर्तनाचे विशिष्ट नियम पाळणे, या नियमांची स्वतःला ओळख करून देणे हे लोकांसाठी महत्त्वाचे आहे. ते स्वतः याप्रमाणे वागले तर ते वर्तन आदर्श होईल. कारण सक्तीने बांधून घेणे ही अभिमानाची गोष्ट नाही. 'संप्रज्ञा' किंवा परंपरा ही निसर्गतः उत्क्रांत झालेली असते आणि लोकांनी ती परंपरा सहजपणे धरून ठेवावी. संप्रज्ञता बनविणाऱ्या रूढी आणि नियम हे सर्व शास्त्रात लिहिलेले नसतात. कायदा म्हणजे घालून दिलेली कोणतीही गोष्ट ही सक्तीची बाब बनते. हल्ली सर्वत्र लोकांना 'हे करा आणि ते करू नका' असे सांगितले जाते. या आणि त्याबाबतच्या सूचना प्रदर्शित केल्या जातात. मी जेथे पूजा करतो (मठात) तिथेही त्या प्रदर्शित होतात. 'बोलू नका', 'सदरा घालू नका' इ. सांगणाऱ्या सूचना तेथे असतात.

मी जेव्हा असे बोलतो आणि तुम्हाला हे करू नका, ते करा असे सांगतो तेव्हा मीही स्वतःला ज्या नियमांविषयी बोललो त्याच्या विरुद्ध जाण्याचा गुन्हा करतोय. जेव्हा म्हणतो 'हे करा' तेव्हा तो कायदा बनतो. मी तुम्हाला असे सांगायला हवे : 'तुम्ही स्वतः विचार करा, अशा सूचना असणे योग्य आहे का?'

''इतरांचे दोष मोठे करून दाखवू नका.'' सुज्ञ माणसे म्हणतात. पण जर एखाद्या माणसामध्ये काही चांगले असेल तर गुणग्राहकत्व ठेवून बोला. मी स्वतः तुमचे दोष उघड करीत आहे. पण पुन्हा सांगायचे तर तुम्ही इतरांच्या उणिवा उघड करता कामा नये. फक्त चांगले गुण उघड करावेत. चंद्रकोरही शीतल आणि तेजस्वी असते म्हणून शिव त्याच्या जटांवर ती धारण करतो आणि तिचे सौंदर्य जगाला दाखवितो. तोच शिव भयानक हलाहल गिळून इतरांपासून लपवितो, असे दण्डी त्याच्या एका कवितेत म्हणतो.

इतरांच्या दोषांकडे बोट दाखविताना किंवा भाषण व लेखनात अतिशयोक्ती करणे हा आजचा आचार झालेला आहे. जितका एखादा मनुष्य जास्त शिकलेला तितका तो इतरांचे दोष शोधण्यात उतावीळ असतो. 'दोष शोधणे हे खरेच विद्वानांचे काम आहे.' असे म्हटले जाते. 'विद्वान' या शब्दाचा अर्थ दोषज्ञ असल्याचे म्हटले जाते. परंतु तो कशात तरी किंवा कोणामध्येतरी दोष असल्याचे जाणतो, तो दोषज्ञ असतो. जो ते दोष सर्व जगात प्रकट करतो किंवा त्यांची अतिशयोक्ती करतो तो नव्हे. तुम्हाला वाटेल की एखाद्या व्यक्तीकडे दोष आहेत तर तुम्ही त्याच्याशी त्याबाबत मैत्रीपूर्णपद्धतीने बोलले पाहिजे (त्यायोगे तो स्वतःमध्ये सुधारणा करू शकेल). परंतु त्याला सातत्याने सांगून आणि बाहेरच्या जगात उघड करून नव्हे.

इतरांच्या दोषाबाबत बोलण्यास आपण पात्र हवे. जेव्हा आपल्याला स्वतःला सुधारण्याची आवश्यकता असताना आपण स्वतः सल्लागाराची भूमिका घेऊ शकत नाही. अशा वेळेस आपण दिलेल्या सल्ल्याचा विपरीत परिणाम होईल. जर आपण एखाद्याला त्याची काय चूक आहे हे सांगितले तर कदाचित त्याला ती (आपल्या) गर्वाची गोष्ट वाटेल. इतरांना सल्ला देण्यास आपण केव्हा पात्र होऊ? जेव्हा आपण पुरेसे पात्र होऊ आणि जेव्हा आपल्या शब्दांचा अपेक्षित परिणाम होईल.

जेव्हा एखाद्या व्यक्तीची त्याच्या सद्गुणाबद्दल आपण स्तुती केली तर त्याला ते गुण वाढविण्यासाठी अधिक उत्साह मिळेल. परंतु स्तुतीलाही मर्यादा हवी - स्तुती ही खरेच लबाडीची गोष्ट असते. म्हणून सुज्ञ माणसे म्हणतात, 'ईश्वर आणि गुरू यांचीच फक्त स्तुती केली जावी.' मित्र आणि नातलग यांची त्यांच्या तोंडावर स्तुती करण्याऐवजी त्यांच्याबद्दल इतरांजवळ चांगले बोलावे. एखाद्या नोकराने त्याच्यावर सोपविलेले काम पूर्ण केल्यावरच तुम्ही त्याची स्तुती करा. (हे रपेट झाल्यावर घोड्याला थोपटण्यासारखे आहे.) तुम्ही तुमच्या मुलाची कधीही स्तुती करू नका.

प्रत्यक्षे गुरवः स्तुत्याः परोक्षे मित्रबंधवाः।
कार्यान्ते दासभृत्याश्च न स्वपुत्राः कदाचन ।।

इतका वेळ मी तुमच्यातले दोष शोधत आहे. दोष शोधणे ही स्वागतार्ह गोष्ट नाही असे मी म्हणालो. परंतु वरचे कडवे मला या दोषापासून मुक्त करते. कारण ते म्हणते की मुलांची स्तुती करू नये आणि त्यांचे काय दोष आहेत ते सांगावे. म्हणून मी तुमच्यातील दोष शोधण्याचा दोष मला लागत नाही.

-----

# प्रकरण - ११

# क्रोध

काम आणि क्रोध यांविषयी एकत्रित बोलणे हे नेहमीचे आहे. कृष्ण परमात्मा गीतेत म्हणतो, वासना आणि क्रोध माणसाला पापी कृत्याकडे ढकलतात.

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते।
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते।।
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति।।
-भगवद्गीता २.६२-६३

जेव्हा आपल्याला एखादी गोष्ट तीव्रतेने हवी असते तेव्हा आपण ती भल्या किंवा बुऱ्या मार्गाने मिळविण्याचा प्रयत्न करतो. हा भयानक शत्रू आहे, वासना : ती आपल्याला पाप करण्यास भाग पाडते. तितकाच भयानक क्रोध असतो. जेव्हा आपल्याला इच्छित वस्तू मिळत नाही तेव्हा जो अडथळा होतो असे वाटते अशा माणसाकडे आपला राग वळतो. अपूर्ण वासनेचा क्रोध बनतो.

जर आपण एक रबरी चेंडू भिंतीवर फेकला तर तो उसळी घेतो - अन्य शब्दांत सांगायचे तर तो परत आपल्याकडे येतो. फेकलेला चेंडू वासना असते आणि तोच चेंडू जेव्हा उसळी घेतो तेव्हा क्रोध बनतो. रागात आपण दुसऱ्यावर हल्ला करतो तो राग वस्तुतः आपण आपल्यावरच केलेला हल्ला असतो - आणि आपल्याला जो दुखावला जावा असे वाटत असते त्यापेक्षा आपणच जास्त दुखावलेलो असतो. जेव्हा आपण क्रोधात असतो तेव्हा आपले सर्व शरीर थरथरत असते. क्रोध शरीर आणि मन अशा दोन्हींना वेदनाकारक होतो आणि आपण जेव्हा रागावलेलो असतो तेव्हा आपण आपल्याला कुरूप बनवतो. जेव्हा तुम्ही वाईट मनस्थितीत असता तुमचा घेतलेला फोटो पाहिला तर हे सत्य तुमच्या लक्षात येईल.

अन्न सेवन करून भुकेची शांती होते. पण अग्नी अशा प्रकारे शांत होतो का? तुम्ही त्याला खाद्य देत असता आणि तो प्रत्येक गोष्ट फस्त करीत असतो. अग्नी तेजस्वी असतो पण तो जे फस्त करतो ते कलंकित करतो. किंवा अन्य शब्दांत सांगायचे तर तो प्रत्येक गोष्ट काळवंडवितो. म्हणून त्याला 'कृष्णवर्त्मन' म्हटले जाते. काम किंवा वासना तशीच असते. ती अग्नीप्रमाणे भडकते. तिला जेवढे खाद्य देऊ तितके ती अधिक भुकेली होते. काम आपले मन खरेच काळवंडवते. जेव्हा वासना पूर्ण होते तेव्हा क्षणभर आनंद होतो पण लवकरच ती खाद्याचा शोध घेते आणि त्या ओघात आपण आपली मनाची शांतता आणि सौख्य गमावतो आणि दुःख आणि क्रोधाचा बळी होतो.

दुःख आणि क्रोध हे पूर्ती न होणाऱ्या वासनेची दोन रूपे आहेत. आपल्या वासनेच्या पूर्तीमध्ये जे अडथळा ठरतात ते आपण गौण समजतो. आपण आपला राग त्यांच्याकडे वळवतो, आणि जर आपण त्यांना श्रेष्ठ मानले तर आपण आतून दुःखी होतो. वासनेपेक्षा क्रोधात अधिक शक्ती सामावलेली असते. 'नैषधम्', नलाची गोष्ट हे सत्य चांगलेच स्पष्ट करते. जेव्हा कलि अवतरतो तेव्हा वासना आणि क्रोध त्याचे दोन सेनापती म्हणून बरोबर येतात. दूत त्यांची स्तुती गातात. ''काम प्रवेश करू शकत नाही अशी एकही जागा नसते. नाही, तो प्रवेश करू शकत नाही अशी एक जागा आहे. क्रोध वास्तव्यास असलेली ती तटबंदी असते. ही तटबंदी दुर्वासांचे हृदय असते.'' दुर्वासाला वासना माहीत नसते पण तो रागाला बळी पडण्याजोगा असतो.

क्रोध म्हटल्या जाणाऱ्या भयानक पाप्यापासून आपण अतिशय दक्ष असले पाहिजे. विचार केला तर आपण कोणावर तरी रागावण्यास किंवा एखाद्यावर ओरडण्यास थोडेसुद्धा पात्र नाहीत हे पटेल. आपण ज्याच्यावर रागावतो त्याच्यापेक्षा आपण अधिक अपराधी असतो. आपल्या हृदयांच्या हृदयात आपण हे जाणून असतो. जरी आपण निरपराधी असलो तरी एखाद्याचा दोष पाहण्यापूर्वी, आपण त्या स्थितीत असतो तर त्याने केलेला अपराध आपण केला असता का असे स्वतःला विचारले पाहिजे.

आपण नेहमीच क्रोधाला अंतरावर ठेवण्याच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे.

-----

## प्रकरण - १२

# आपण क्रोधासाठी पात्र आहोत का?

आपण नेहमी कोणावर तरी रागावलेलो असतो. क्रोध दोन कारणाने उत्पन्न होतो. जेव्हा आपल्याला एखादा मनुष्य अपराधी दिसतो तेव्हा आपण संयम गमावतो. पण आपणही त्याच्यासारखे नाही का असा विचार क्षणभरही करीत नाही. जरी आपण गुन्ह्यात नसलो तरी आपले विचार पापी असतात. कदाचित इतरांपेक्षा आपण कमी पापे केली असतील असा आपला विचार असतो. याचे कारण आपण थोडे अधिक प्रगल्भ असतो. तरी आपल्याला स्वतःला सुधारणे किती कठीण असते ते आपल्याला आढळते. सराईत पापी माणसाला मागे फिरणे किती कठीण असेल? आपण त्याच्याशी सख्य करू नये. शास्त्रे सांगतात दुष्ट लोकांपासून स्वतःला तोडणे आणि सद्‌वर्तनी माणसांचा सहवास घेणे ही आत्मिक विकासाची पहिली पायरी आहे. पण पापी लोकांकडे द्वेष किंवा रागाने पाहण्यात काही अर्थ नाही. ते सन्मार्गाला लागावेत यासाठी प्रार्थना करणे एवढे आपण करू शकतो आणि केले पाहिजे. ईश्वरकृपेने आपल्याला थोडी कृपा लाभली तर आपण ती त्यांना योग्य मार्गावर आणण्यास वापरली पाहिजे.

आपण त्याला रागावलो म्हणून आपला विरोधक त्याचा आपल्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलणे संभवनीय नाही. त्याऐवजी तो अधिक मोठा द्वेष बाळगेल. अशा रीतीने द्वेषात एका बाजूने तेल ओतले जाईल. माणसाने त्याच्या चुका जाणून स्वतःला सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपल्या रागाला भिऊन जर एखाद्याने स्वतःला सुधारण्याचा प्रयत्न केला तर आपण स्वतःचे अभिनंदन करता कामा नये. शिवाय असा त्यातील बदल टिकाऊ असणार नाही. जर आपल्याला एखाद्यात काही वावगे आहे असे आढळले तर आपण प्रेमाने त्याला सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

लोक पाप का करतात? त्यांची मानसिक स्थिती आणि ते ज्या स्थितीत असतात हे त्याचे कारण असते. जर आपण अपराधापासून दूर राहिलो तर त्याचे कारण आपल्याला परिस्थितीचा चांगला लाभ झालेला दिसतो. जेव्हा तुम्हाला पापी दिसतो तेव्हा तुम्ही प्रार्थना केली पाहिजे : ''हे अंबिके, मीही त्याच्यासारखेच पाप केले असते पण तुझ्या दयेने तू मला तसे करण्याची स्थिती आणली नाही, तू त्याच्यावरही तशीच दया कर.''

जरी एखाद्याने आपल्याविरुद्ध वाईट इच्छा ठेवली तर आपण त्याच्यावर चिडता कामा नये. आपल्या खोलवरच्या मनाला, लोकांना आपल्याबद्दल किती वाईट बोलता येईल हे माहीत असते. जो आपल्याबद्दल वाईट भावना ठेवतो त्याचे कारण आपणाकडून काही वाईट केले गेले आहे हे नसते. आपल्याला आतून जाणवत असते की आपण खरेच मोठी पापे केली आहेत.

अशी आपली बिकट अवस्था असते म्हणून आपण अंबेपुढे आपल्या पापाची भरपाई होण्यासाठी आणि ती धुतली जावीत म्हणून अश्रू ढाळले पाहिजेत. इतरांकडे अपराधी म्हणून बोट दाखविण्यास आपण कसे पात्र होऊ?

प्रश्न असा उद्‌भवतो : जेव्हा आपण सर्व पापांपासून मुक्त असू तेव्हा आपला क्रोध इतरांकडे वळवू शकतो का? आपण खरेच निष्पाप असतो तर आपण सर्वांशी प्रेम आणि जिव्हाळा ठेवू. तेव्हा एखाद्यावर रागावण्याचा प्रश्न कोठे उद्‌भवेल? अगदी पापी माणसाबद्दलही आपल्याकडे प्रेमाशिवाय अन्य भावना नसावी. उलट आपण स्वतः गुन्हेगार असू तर आपल्याला जे गुन्हेगार वाटतात त्यांच्यावर रागावण्याचा हक्क नाही. पूर्ण निष्पाप स्थितीत आपल्याला जाणवते की ही सर्व अंबेची लीला आहे. तिच्या या खेळात कोणाची स्तुती होते, कोणाला दोष दिला जातो. कोणत्याही स्थितीत क्रोधाला आपल्या जीवनात स्थान नको.

मी अगोदर म्हटल्याप्रमाणे, कृष्ण परमात्म्यानुसार, मानवाला पाप करण्यास चेतवणाऱ्या दोन मोठ्या शक्ती म्हणजे वासना आणि क्रोध. अन्य शब्दांत सांगायचे तर आपण आपल्याच क्रोधाने स्वतःला दुखवतो. आपला विरोधक आपल्या रागाकडे दुर्लक्ष करेल पण आपण स्वतःच स्वतःला त्याने इजा करू - आपल्या मनाला आणि शरीराला त्रास होईल. प्रेमळ असणे हा मानवाचा नैसर्गिक धर्म आहे. प्रेमळ आणि प्रिय असणे हे वरदान आहे. प्रेम हे शिव आहे असे म्हटले जाते. आपण नेहमी प्रेमभावाची स्थिती म्हणजे शिव प्राप्त करण्यास शिकले पाहिजे.

-----

## प्रकरण - १३
# प्रेम आणि दुःख

सर्वांप्रती प्रेमपूर्ण जीवन जगणे हा मानवी जन्माचा हेतू असतो. इतरांवर प्रेम करण्यापेक्षा इतर कोणताही आनंद मोठा नाही. संपत्ती गोळा करणे, स्थावर मालमत्ता मिळविणे, स्वतःला सजविणे हे क्षणिक आनंद देतात. त्यात कोणतीही पूर्णत्वाची जाणीव असत नाही. आपल्या अंतरंगात पाझरणारा आनंद हा इतरांवर प्रेम केल्याचे सुख असतो. जेव्हा आपण इतरांवर प्रेम करतो तेव्हा आपल्याला आपण करीत असलेल्या शारीरिक श्रमाची आणि आपण खर्च करीत असलेल्या पैशाची जाणीव नसते : प्रेमाचा आनंद आपल्याला श्रेष्ठ जाणीव देतो. ज्या जीवनात इतरांबद्दल प्रेम नसते ते व्यर्थ असते.

मी म्हणालो की आपण एखाद्यावर प्रेम करतो तेव्हा आपण आपले दुःख विसरतो. पण शेवटी एक दिवस ती व्यक्ती आपल्या दुःखाचे कारण बनते. एक दिवस आपण जिच्यावर प्रेम करतो ती व्यक्ती कायमची सोडून जाते - किंवा एक दिवस आपण तिला कायमचे सोडू. ''अरे, तो मला कायमचे सोडून गेला.'' ''अरे, मी त्याला कायमचे सोडून जात आहे.'' अशा प्रकारे आपण शोक करतो. जेव्हा आपल्याला कळते की प्रेमाने दिलेले सौख्य शेवटी असत्य आहे आणि त्याचा शेवट दुःखात होतो. हे कळल्यावर आपण अस्वस्थ होतो. ''मग प्रेमाची परिणिती दुःख आहे?'' अस्वस्थतेने आपण आपल्याच विचारतो. व्यक्तीवर जितके मोठे प्रेम तितके मोठे दुःख ती व्यक्ती आपल्यापासून कायमची दूर गेल्यावर होते. प्रेमाविना जीवन, भावनाहीन जीवन, स्वार्थी जीवन हे अधिक चांगले असे वाटेल. असे जीवन जगणाऱ्याच्या जीवनावर प्रिय व्यक्तीच्या विरहाचा काही परिणाम होणार नाही.

तथापि, स्वार्थी किंवा आत्मकेंद्री मनुष्य फक्त पाप जमा करतो. आनंदाविना जगलेले जीवन - पूर्णत्वाच्या जाणिवेशिवाय जगलेले जीवन - व्यर्थ जगलेले जीवन हे लाकडाच्या ओंडक्याच्या किंवा दगडासारखे जीवन जगण्यासारखे नाही का?

(मग प्रश्न असा आहे की) आपल्या इतरांवरच्या प्रेमाचा शेवट दुःखात होतो, तरी प्रेम नसेल तर जीवनात काही अर्थ नाही. या प्रश्नाला उपाय काय? आपण असे प्रेम केले पाहिजे की जे बदलणार नाही, चिरस्थायी प्रेम. प्रेमाची वस्तू आपल्यापासून कधीही दूर जाणार नाही, सोडून जाणार नाही. अशी एखादी वस्तू असती तर आणि जर आपण आपले सर्व प्रेम त्यासाठी अर्पण केले तर आपण कधीही विलग होणार नाही - हे वरदान ठरेल, चिरकाल टिकणारे पूर्णत्व असेल.

हे स्पष्ट करून सांगायचे तर आपण एकाच वस्तूवर प्रेम केले पाहिजे, जी कधीही बदलत नाही. ती कोणती वस्तू आहे? परमात्मा. परमात्मा कधीही आपल्यापासून अलग

होणार नाही. आपले जीवन संपले तरी ते परमात्म्यात विलीन होईल आणि त्याच्याशी एकरूप होईल. फक्त तेच प्रेम जे त्याला अर्पण केलेले आहे तेच चिरस्थायी असेल.

प्रश्न असा उद्भवतो की नाश न होणारे प्रेम आपण परमात्म्यावर करतो, याचा अर्थ असा आहे का की आपण इतर कोणावरही प्रेम करता कामा नये, एक दिवस ते नष्ट होईल म्हणून इतरांवर आपण प्रेम करू नये? आपण त्याची भक्ती करीत राहिलो तर एक दिवस सत्य उमगेल की त्याच्याशिवाय काही किंवा कोणीही नाही. आपण ज्यांच्यावर प्रेम केले, ज्यांनी आपल्याला सोडून जाऊन दुःख दिले, ते सुद्धा आपल्याला परमात्म्याप्रमाणे वाटतील. आपण संपूर्ण विश्वाकडे परमेश्वर म्हणून पाहिले पाहिजे आणि तसे प्रेम केले पाहिजे. मग आपले प्रेम कधीही दुःखाचे कारण असणार नाही.

जरी आपले प्रेम विश्वाला व्यापणारे नसले तरी परमात्म्यासारखे आत्मिक गुण असलेली, तसेच आपले ज्ञान आणि दया असलेली सद्गुरूसारखी महान माणसे यांच्यावर प्रेम करण्याचे आपल्याला सहज लक्षात येईल. त्यांच्यावर प्रेम करणे आणि त्यांना शरण जाणे हे पुरेसे आहे. त्याद्वारे परमात्मा आपल्याला आशीर्वाद देईल. जेव्हा आपण प्रेम करीत असलेली व्यक्ती मरण पावते तेव्हा आपण दुःख करता कामा नये. आपण आपले सांत्वन करावे की परमात्म्याच्या रूपात असलेले फक्त शरीर नष्ट झालेले आहे. परमात्म्याच्या रूपात असलेली ती व्यक्ती परमात्म्याशी एकरूप झाली आहे. आपले प्रेम मग चिरकाल टिकणारे होईल. प्रथम आपण ईश्वराबद्दल, गुणी लोकांबद्दल, देवाची माणसे यांच्याबद्दल प्रेम वाटायला शिकले पाहिजे. मग हळूहळू आपण संपूर्ण निर्मिती व्यापण्याइतके मोठे होऊ. अशा रीतीने आपल्या जीवनाचा हेतू सफल होईल.

-----

## प्रकरण - १४

# प्रेम

ज्याला प्रेम म्हटले जाते त्याचे तीन गटांत विभाजन होते. आपण थोर माणसांवर त्यांच्या उच्च गुणांमुळे प्रेम करतो, मला विशेष व्यक्ती, सत्यवचनी, मानवतावादी, ज्ञानी, दयाळू माणसे म्हणायचे आहे. आपण आपले मित्र आणि नातलगांमध्ये जवळकीने मिसळतो आणि त्यांच्यात आणि आपल्यात जिव्हाळा निर्माण होतो. आपण लोकांवर प्रेम करतो - विशेष हेतूने बाह्यतः प्रेम करतो, त्यांच्याकडून काही लाभ होणार असतो. उदाहरणार्थ, आपल्या व्यवसायात किंवा व्यवहारात मदत करेल म्हणून एखाद्या श्रीमंतावर आपण प्रेम करतो. आपण आपल्या मालकावर प्रेम करतो कारण तो आपल्याला पैसे देतो.

हे तीनही प्रेमाचे प्रकार सत्यही नसतात आणि चिरकाल टिकणारे नसतात. जर आपल्या मालकाने आपल्याला नोकरीवरून काढून टाकले तर त्याच्याप्रती आपले प्रेम किंवा जिव्हाळा संपतो. आपले ज्यांच्याशी जवळचे संबंध असतात ते जर दूर गेले किंवा मरण पावले किंवा आपला त्यांच्याशी संपर्क तुटला तर आपण काळाच्या ओघात त्यांना विसरून जाऊ. त्यांच्या विरहाने प्रथम निर्माण झालेले दुःखही शेवटी आपणाकडून विसरले जाईल. जर ते खरे प्रेम असले तर त्याचे दुःखही टिकणारे असेल. अगदी थोर माणसाबद्दलचे आपले प्रेमही टिकाऊ नसते. जर त्याच्या गुणांचा क्षय झाला तर - किंवा तो आपल्याला जसा वाटत होता तसा नाही - असे वाटले तर आपण त्यानुसार कमी प्रमाणात प्रेम करू.

प्रेमाच्या तीनही श्रेणींमध्ये काहीतरी कारण मागे असते. म्हणून ते चिरकाल टिकणारे नसते. आपण थोरांवर प्रेम करतो कारण त्यांच्याकडे विशेष गुण असतात : त्यांच्याबद्दलच्या आपल्या भावनांमध्ये एक स्वार्थाचा घटक असतो : कारण आपल्याला वाटते की ते आपल्या प्रगतीत उपयुक्त होतील.

खऱ्या प्रेमासाठी कोणतेही कारण किंवा प्रेरणा लागत नाही. आपण एखाद्यावर खरे प्रेम केव्हा करतो? त्याच्यावरचे आपले प्रेम जेव्हा अपरिवर्तनीय आणि अस्थिर नसते - तेव्हा जरी तो आपल्याबरोबर नसला किंवा अंतर्गत गुण नसले किंवा त्याच्याकडे आपल्याला आशीर्वाद देण्याइतके सामर्थ्य नसेल; त्याची सेवा करण्यात आपला काही स्वार्थ नसेल तरी आपण खरे प्रेम करतो. कोणाकडे असे प्रेम आहे? होय, फक्त एकच. तो म्हणजे ईश्वर - फक्त त्याच्याकडेच असे प्रेम असते.

देव आपल्यावर विनाकारण प्रेम करतो. जर त्याला कारण हवे असते तर त्याने आपल्याला अन्नाचा एक घासही दिला नसता. परमेश्वर आपल्या कुकर्माबद्दल क्षमा करतो आणि आपले संरक्षण करतो - तोच सर्व प्रेम असतो. वर उल्लेखलेल्या तीन श्रेणींमध्ये त्याचेच

प्रेम प्रकट झालेले दिसते.

परमेश्वराद्वारा प्रकट झालेले प्रेम आपण शिकले पाहिजे; वैश्विक प्रेम, कोणत्याही कारणाशिवाय, स्वार्थाशिवाय असलेले प्रेम. आपल्याला जो काही चुकांमुळे अपराधी वाटतो त्याचा आपण का तिरस्कार करतो? आपण तशाच प्रकारे अपराधी नसतो का? मग आपण आपला तिरस्कार करतो का? आपला आपल्याकडे पाहण्याचा जसा दृष्टिकोन असतो तसाच इतरांकडे पाहण्याचा असावा. थोर माणसांबद्दल वाटणाऱ्या आपल्या प्रेमाचे विशेष नाही; विशेष गोष्ट म्हणजे पापी माणसावरही प्रेम हवे. तुम्ही मला विचाराल तर, तुम्हाला त्याच्याबद्दल चिंता आणि जिव्हाळा वाटला पाहिजे. ''तो आपल्यासारखा चुका करतो'', आपण आपल्याला सांगायला हवे. ''त्याचे मन ती (पापे) करण्यासाठी पुढे ढकलते. आपल्याला त्याबद्दल सहानुभूती वाटली पाहिजे आणि त्याला बरोबर करायला हवे.'' इतरांना आशीर्वाद देण्याची देणगी दयेपोटी ईश्वराने थोड्यांना दिलेली आहे. अशा माणसांनी इतरांना कुकर्मापासून मुक्त करण्याचे कार्य हाती घ्यायला हवे.

आरंभ करायचा तर आपण एखाद्या व्यक्तीवर निर्हेतूक प्रेम करायला शिकले पाहिजे, जे स्वार्थाने दूषित झालेले नाही असे. शेवटी असे प्रेम आपल्या आत झिरपेल. आपल्या आत्म्याला प्रेरणा देईल आणि शेवटी आपण सर्वांना व्यापून टाकणारे होऊ. सुज्ञ लोकांची ही शिकवण आहे की असे प्रेम आपल्या गुरूबद्दल हवे, कोणत्याही लाभाच्या विचाराविना असलेले. आपल्या गुरूवर प्रेम करण्यास आपण कोणतेही कारण शोधायला नको. आपल्या गुरूवर प्रेम करण्याची अशी सवय केली तर आपल्याला त्यांचे आशीर्वाद मिळतील. त्यांच्याबद्दलचे आपले प्रेम वाढून सर्वव्यापी होईल. जर आपले प्रेम असे व्यक्त झाले तर ते पूर्णत्व, शांती आणि वरदान असेल.

ॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐॐ

# परिशिष्ट-१

## वेदविद्येचे अध्ययन वाढविण्याचे उपाय

(भरतवर्षाच्या आत्मिक, धार्मिक आणि सांस्कृतिक पुनरुत्थानासाठी परमाचार्यांनी जी विविध आणि उल्लेखनीय महान कार्ये केली, त्यात वेदविद्येचे अध्ययन वाढविण्यासाठीचे कार्य महत्त्वाचे आहे. युगानुयुगे चालत आलेली वैदिक परंपरा जेव्हा अत्यंत अवनत स्थितीला पोहोचल्यासारखी दिसत होती, विशेषतः तेव्हा त्यांनी या महान परंपरेत प्राण फुंकून तिला नवसंजीवन प्राप्त करून दिले.)

१९५४ साली काही भक्त माझ्याकडे आले होते आणि त्यांनी माझा षष्ट्यब्दपूर्ती समारंभ साजरा करण्यासाठी माझी अनुमती मागितली होती. मी त्यांना म्हणालो, 'मला माझ्यासाठी कोणताही वैयक्तिक समारंभ नको आहे. माझ्या जीवितकाळातच जर या देशात वैदिक धर्म लोप पावला तर माझी जी दुष्कीर्ती होईल, ती मला नको आहे. त्या नामुष्कीतून मला वाचविणे हाच माझ्यासाठी फार मोठा उत्सव असेल. मी जर का वैदिक धर्म जीवित ठेवू शकलो नाही तर मी कोणत्याही सन्मान-समारंभास पात्र असणार नाही.'

यानंतरच 'षष्ट्यब्दपूर्ती न्यास' स्थापन झाला. वेदभाष्याच्या अभ्यासाला प्रोत्साहन देणे हाच या न्यासाचा हेतू होता. वेदभाष्यांत वेदग्रंथाच्या उद्धरणांचा अर्थ देऊन त्यात अभिप्रेत असलेली तत्त्वे आणि सत्ये स्पष्ट केली गेली आहेत. वेदमंत्रांचे पठण शिकल्यानंतरच वेदभाष्यांचा अभ्यास करावयाचा असतो. न्यास जेव्हा स्थापन झाला तेव्हा वेदमंत्रांचे पठण शिकलेल्यांची संख्या तर कमी होतीच पण त्याचबरोबर वेदभाष्यांचा अभ्यास तर केलाच जात नव्हता आणि म्हणूनच वेदभाष्यांचा अभ्यास करण्यासाठीच न्यासाची स्थापना करण्यात आली.

नंतर १९५७ मध्ये, मी पीठासीन झालो त्या घटनेस ५० वर्षे पूर्ण होत होती म्हणून भक्तांनी 'सुवर्ण महोत्सव' साजरा करण्याची इच्छा प्रकट केली. त्यावेळी वेदभाष्याच्या शिक्षणाबरोबरच वेदपाठशाळा चालविण्यासाठी 'कलवै न्यास' निर्माण करण्यात आला. कलवै हे तेच स्थान आहे जेथे माझे गुरू आणि परमगुरू म्हणजे गुरूंचे गुरू, यांना सिद्धी प्राप्त झाली होती. या ठिकाणी दोघांचेही वृंदावन म्हणजे समाधी आहे. त्यांच्या स्मरणार्थ 'कलवै वृंदावन न्यास' स्थापन केला गेला.

याच्या आधी काही काळ म्हणजे साधारणतः १९४२ मध्ये 'वेद-धर्मशास्त्र परिपालन सभा' स्थापन केली गेली होती. आणि वेदसंमेलने आयोजित करून वैदिक पंडितांचा गौरव करण्याची व्यवस्था केली गेली होती.

१९६० मध्ये वरील दोन्ही संस्थांचे कार्य एकत्रितपणे व्यवस्थित चालविण्याच्या हेतूने 'वेद रक्षण निधी न्यासा'ची स्थापना केली गेली. या न्यासाने संपूर्ण देशभर वेदपाठशाळा चालविणे व वैदिक पंडितांचा सन्मान करण्याचे दायित्व स्वतःवर घेत

अन्यअनेक योजना कार्यान्वित केल्या.

या न्यासाच्या एका योजनेअंतर्गत वेदपाठशाळेत किंवा पंडितांच्या निवासस्थानी अध्ययन केलेल्या विद्यार्थ्यांची वर्षातून एकदा, देशभरातील विविध केंद्रांवर परीक्षा घेतली जाते. वेदाचे अध्ययन करून शुद्ध स्वरूपात त्याचे एक आवर्तन मुखोद्गत होण्यास आठ वर्षे लागतात. हा अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर दरवर्षी परीक्षा घेतल्या जातात आणि उत्तीर्ण विद्यार्थ्यांना पदवी प्रदान केली जाते. वेदमंत्र-पठणाच्या 'पद' आणि 'क्रम' या पद्धतीविषयी मी माझ्या आधीच्या प्रवचनात बोललो होतो. आम्ही या पद्धतीमध्ये प्रावीण्य संपादन केलेल्या विद्यार्थ्यांना 'पदान्त स्वाध्यायी' आणि 'क्रमपाठी' अशा उपाध्या प्रदान करतो.

या उपाध्यांचा विषय बाजूला ठेवा. तो वैदिक अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रोत्साहित करणारा आर्थिक किंवा भौतिक साहाय्याचा विषय आहे. हा अभ्यासक्रम चालू असताना अध्यापक आणि विद्यार्थी या दोघांनाही आंशिकरूपाने अनुदान दिले जाते. अध्यापकांना दरमहा तर विद्यार्थ्यांना मात्र त्यांचा पाठ्यक्रम पूर्ण केल्यानंतरच हे अनुदान दिले जाते. याचे कारण इतकेच की विद्यार्थ्यास जे शिकविले गेले त्याच्या शुद्ध स्वरूपातील आवृत्तीबाबतचे त्याचे ज्ञान अर्ध्या-कच्च्या स्थितीत असताना त्याने मध्येच शिक्षण सोडून देऊ नये.

अध्यापकाला प्रत्येक विद्यार्थ्यामागे प्रतिवर्षी १०० ते १५० रुपये मिळतात. उदाहरणार्थ, दहा विद्यार्थी असतील तर अध्यापकाला वर्षाला किमान १५०० रुपये मिळतात. विद्यार्थ्याने त्याचा पाठ्यक्रम पूर्ण केल्यानंतर त्याला एकरकमी २००० ते ४००० रुपये मिळतात.

आपला वेदाभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर जर विद्यार्थी काव्य, शास्त्र इत्यादी मध्ये पाठ्यक्रम पूर्ण करून संस्कृतमध्ये प्रावीण्य प्राप्त करील तर त्याला १५०० ते ३००० रुपयांपर्यंत दान मिळते. या मिळालेल्या रकमेच्या पाव रक्कम त्याला आपल्या गुरूला गुरुदक्षिणा म्हणून द्यावी लागते.

आमच्या अनुभवातून आम्हांला असे दिसून आले आहे की वेदमंत्र-पठणाचा आपला अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर विद्यार्थ्याला 'सलक्षण घनपाठी' ही उपाधी मिळविण्यास तीन वर्षे लागतात.

पवित्र अग्नीमध्ये समिधांची आहुती देऊन 'समिधाधान' हा विधी करणे हे प्रत्येक ब्रह्मचाऱ्याचे कर्तव्य आहे. आपल्या अन्नासाठी घरोघर भिक्षा मागणे (म्हणजे भिक्षाचर्य) हे देखील त्याचे आणखी एक कर्तव्य आहे. स्वरयुक्त वेदपठण शिकण्याव्यतिरिक्त जो विद्यार्थी समिधाधान भिक्षाचर्य विधी करतो त्याला, एरवी तो साधारणतः जितक्या

अनुदानाला पात्र असेल त्या रकमेच्या दुप्पट अनुदान दिले जाते.

सलक्षण घनपाठी झाल्यानंतरच विद्यार्थी वेदभाष्याच्या अध्ययनासाठी स्वतःचे नाव नोंदवू शकतो आणि यासाठी सात-आठ वर्षांचा कालावधी लागतो. एकंदरीत वैदिक अध्ययन पूर्ण करण्यास विद्यार्थ्याला - 'क्रमपाठी' उपाधीसाठी ८ वर्षे, 'सलक्षण घनपाठी' साठी ४ वर्षे आणि वेदभाष्याच्या अध्ययनासाठी ७ वर्षे, अशी एकूण वीसएक वर्षे लागतात. एम.ए. पदवीसाठी पहिल्या इयत्तेपासून पदवी प्राप्त करण्यापर्यंत १७-१८ वर्षे लागत नाहीत का? विश्वविद्यालयीन शिक्षणापेक्षा वेदविद्येचे अध्ययन हे मनुष्यास अधिक उपयुक्त आणि हितकारक आहे आणि ते त्यास उन्नत आत्मिक सुस्थितीस पात्र ठरविते.

विद्यार्थी जेव्हा वेदभाष्याच्या वर्गात स्नातक होईल तेव्हा त्याचे जे वय असेल त्या वयाची अन्य मुले सामान्यतः नोकरी करू लागतात. वेदाध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्याने नोकरीवर जाण्यापेक्षा वेदाध्ययन चालू ठेवावे म्हणून त्याला प्रोत्साहन देण्याकरिता आम्ही विद्यावेतन दिले पाहिजे असा आम्ही विचार केला.

आणि म्हणूनच सात वर्षांच्या वेदभाष्य पाठ्यक्रमामध्ये १३ चाचणी परीक्षा घेतल्या जातात आणि यशस्वी विद्यार्थ्यांना रोख रकमेचे पुरस्कार दिले जातातः जे प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होतात त्यांना ६० रुपये, द्वितीय श्रेणीसाठी ४० रुपये आणि तृतीय श्रेणीसाठी ३० रुपये दिले जातात. याशिवाय जो विद्यार्थी दुसरी चाचणी परीक्षा देतो त्याला तिसरी परीक्षा देईपर्यंत १०० रुपये, चौथी परीक्षा देईपर्यंत २०० रुपये आणि त्यानंतर २५० रुपये दिले जातात. विद्यार्थी परीक्षेत दोनदा अनुत्तीर्ण झाला तरी त्याला ही रक्कम दिली जाते. काही का होईना तरुणांनी आपला वेदाभ्यास चालू ठेवावा, सोडून देऊ नये म्हणून कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्याबाबत पाठपुरावा व्हावा हीच माझी चिंता असते. आणि म्हणूनच ही व्यवस्था केली गेली. वेदभाष्याचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यास दरवर्षी सुमारे ६०० रुपये मिळालेच पाहिजेत, असा विचार आहे.

२० वर्षे अभ्यास केल्यानंतर विद्यार्थ्याला अंतिम वर्षाच्या रोख रकमेच्या पुरस्कारासाठी वा दानासाठी, त्याच्या नशिबावर सोडणे योग्य होईल का? म्हणूनच वेदाध्ययनाने त्याला उपासमार न होईल इतका तरी आहार मिळावयास हवा, असा आम्ही विचार केला आणि जो वेदाध्ययनाचा संपूर्ण पाठ्यक्रम पुरा करून प्रथम श्रेणी मिळवील त्याला ७ हजार रुपये, द्वितीय श्रेणी मिळविणाऱ्यास ५ हजार रुपये व तृतीय श्रेणी मिळविणाऱ्या विद्यार्थ्यास ३ हजार रुपये दान म्हणून देण्याचा आम्ही निर्णय घेतला. शिवाय त्यांना प्रथम श्रेणीसाठी 'भाष्यरत्न', द्वितीय श्रेणीसाठी 'भाष्यमणी' व तृतीय श्रेणीसाठी 'भाष्यज्ञ' अशी पदवी प्राप्त होते.

आमच्याकडे 'पारंपरीय नियमाध्ययन योजना' देखील आहे. जुन्या 'गुरुकुलवास'

पद्धतीत बदल करून कुटुंबाबाहेर गुरूंकडे राहून शिकण्याऐवजी पित्याकडूनच शिकण्याची पद्धत आता ब्रह्मचाऱ्यांमध्ये रुळली आहे.

काही पिढ्यांपर्यंत पित्याकडून पुत्राला वेदज्ञान देणे चालू राहिले पाहिजे. याप्रमाणे स्वतःच्या घरात राहून वेदाध्ययन करणाऱ्यांना - अशांची संख्या फार नाही, प्रोत्साहन द्यावे लागते. वेद व शास्त्रे यांत निपुण असणाऱ्या ब्राह्मणांनी ते ज्ञान आपल्या पुत्रांना द्यावे म्हणून त्यांना प्रोत्साहित करावे हा या 'नियमाध्ययन' योजनेचा हेतू आहे. या योजनेअंतर्गत येणाऱ्या विद्यार्थ्याच्या नावे १२,५०० रुपये ठेव म्हणून ठेवले जातात. शिक्षण चालू असताना या योजनेमध्ये त्याला दरमहा ४० रुपये विद्यावेतन मिळते. पाठ्यक्रम पूर्ण केल्यावर त्याला एकरकमी ९००० रुपये दिले जातात. याशिवाय त्याला त्याच्या नावे ठेवलेल्या १२,५०० रुपयांच्या ठेवीवरील व्याजाची ८० प्रतिशत रक्कम पूर्ण आयुष्यभर मिळत राहील.

-----

# परिशिष्ट-२

## ग्रंथात आलेल्या काही विशिष्ट संस्कृत शब्दांचा अर्थ

अभिचार : जारणमारण, भूत घालवणे, जादूटोणा.

अधिकरण : स्थान, नेमणूक, हुद्दा, ग्रंथाचे प्रकरण.

आगम : शास्त्र, तत्त्वज्ञान, वेद.

अग्रहार : ब्राह्मणाला इनाम म्हणून दिलेला गाव.

अहिताग्नी : श्रौत व स्मार्त असे दोन यज्ञ आहेत. त्यातील श्रौत यज्ञात तीन अग्निकुंडांत रोज आहुती देणाऱ्याला अहिताग्नी असे म्हणतात.

अनुदात्त : वेदमंत्र-पठणातील खालचा स्वर.

अपवर्ग : मोक्ष, मुक्ती.

अपरा विद्या : निम्न प्रतीची विद्या.

अष्टाक्षरी : आठ अक्षरांचा मंत्र, उदा. ॐ नमो नारायणाय.

अस्त्र : मंत्रसामर्थ्याने निर्माण होणारे शस्त्र.

बळी : गृहस्थाश्रमीयाने करावयाचा पंचमहायज्ञातील वैश्वदेव विधी. या विधीत मंत्रोच्चारासह भात पक्ष्यांना, किंवा निराधार व्यक्तींना दिला जातो.

ब्रह्मरंध्र : मस्तकातील द्वार-जेथे सुषुम्ना नाडी संपते.

चौल : (चूडाकर्म) बालकाचे प्रथम केशकर्तन. जावळ काढून शेंडी ठेवणे.

दक्षिणायन : कर्क संक्रांतीपासून मकर संक्रांतीपर्यंतचा सहा महिन्यांचा काळ. विषुववृत्तापासून सूर्याचे दक्षिणेकडे जाणे.

धनुर्वेद : शस्त्रविद्या, युद्धशास्त्र.

खदिर : खदिराचे झाड.

कुंभाभिषेक : वास्तुशांती, मंदिराचा जीर्णोद्धार करून देवतेची प्रतिष्ठापना करणे.

महावाक्य : 'तत् त्वं असि।' यासारखी उपनिषदांतील महान तत्त्वसूचक वाक्ये.

मुहूर्त : ४८ मिनिटांचा अवधी. विधीसाठीचा पवित्र वेळ.

नाडिका : २४ मिनिटांचा कालावधी.

नागस्वरम् : दक्षिणेतील वाद्य.

निदिध्यासन : एकाग्र ध्यान.

पंचाक्षर : 'नमःशिवाय' हा पाच अक्षरांचा मंत्र.

पंचम् : चार वर्णांच्या बाहेरचा.

पाणिग्रहण : विवाहविधी - ज्यात वर वधूचा उजवा हात आपल्या हातात घेतो.

पराविद्या : आत्मा किंवा परम सत्य याविषयीचे ज्ञान.

प्रग्रहण : देणगी किंवा दान स्वीकारणे.

प्रणव : सर्वोच्च ईश्वरीशक्तीचे प्रतीक - ॐ.

प्राणायाम : श्वासावर नियंत्रण करण्याचा योगाभ्यास. ज्यात पूरक (श्वास आत घेणे), कुंभक (श्वास रोखणे) व रेचक (श्वास सोडणे) हे प्रमाणबद्ध पद्धतीने केले जाते.

प्रातिशाख्य : विविध वेद-मंत्रांचे पठणाविषयक शब्दशास्त्राचे शिक्षण.

प्रत्यक्ष : थेट डोळ्यांना दिसणारे.

पुंसवन : पुत्रप्राप्तीसाठी, सामान्यतः गर्भधारणा झाल्यापासून तिसऱ्या महिन्यात केला जाणारा संस्कार.

पुरोडाश : साळींची आहुती.

ऋत्विक : यज्ञविधीचा पुरोहित.

समावर्तन : सोडमुंज.

समिधाधान : समिधांची आहुती देणे.

संगवकाल : पाच भागांत विभागलेल्या दिवसाचा दुसरा भाग.

षन्मत : सूर्य, गणपती, कुमार (कार्तिकेय), शिव, विष्णू आणि शक्ती या सहा देवतांचे पूजन.

शेषहोम : विवाहाच्या चवथ्या दिवशी केला जाणारा होम - अंगहोम.

स्मार्त : स्मृतींचे शब्दशः पालन करणारा, आद्य शंकराचार्यांच्या परंपरांचे पालन करणारा.

श्रोत्रिय : षडंगासहित एका तरी वेदावर प्रभुत्व मिळविलेला आणि वर्णाच्या षट्कर्माचे पालन करणारा ब्राह्मण.

सूक्त : वैदिक प्रार्थना.

त्रेताग्नी : तीन श्रौत अग्नींची पूजा करणारा.

यूप : यज्ञाचा पशू बांधण्याचा खांब.

# अनुवादकांचा संक्षिप्त परिचय

## श्री नारायण रामचंद्र कुलकर्णी, सोलापूर.

जन्म : १५ मे १९३४, अहमदनगर येथे.

शिक्षण : एम.ए. (मराठी-हिंदी)

व्यवसाय : रेल्वेमध्ये राजभाषा विभागात अनुवादकाचे काम करून राज्यभाषा अधीक्षक म्हणून १९९२ मध्ये सेविनिवृत्त.

साहित्य : विविध नियतकालिकांतून भावकविता व विशेषतः विनोदी कविता प्रसिद्ध. विनोदाचा वारसा वडिलांकडूनच लाभलेला.
सोलापूरचे ग्रामदैवत श्रीसिद्धरामेश्वर यांचे 'सिद्धराम विजय' हे ओवीबद्ध चरित्र प्रकाशित.
'प्रसाद ज्ञानेश्वरी' या ग्रंथाद्वारे आजच्या मराठीत केलेले ज्ञानेश्वरीचे सुगम, समओवी भावरूप प्रकाशित.
कान्हनगड, केरळ येथील 'आनंदाश्रम'चे प्रणेते प.पू. स्वामी रामदास यांच्या 'God Experience'वर आधारित 'अमृत प्रवचने' हा ग्रंथ प्रकाशित.
श्रीसिद्धरामेश्वरांच्या ५९५ वचनांचा विवरणात्मक अनुवाद 'अभंग गाथा'; प्रकाशनाच्या मार्गावर.

## श्री सुभाष दत्तात्रय कुलकर्णी

जन्म : ३ नोव्हेंबर १९४५

शिक्षण : बी.ए. (संपूर्ण इंग्रजी), एम.ए. (संपूर्ण मराठी), बी.एड.

व्यवसाय : अहमदनगर एज्युकेशन सोसायटी, अहमदनगर ह्या संस्थेच्या शाळांमध्ये मराठी आणि इंग्रजी विषयाचे अध्यापन. सन २००३मध्ये सेवानिवृत्त.

साहित्य : प.पू. चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी यांच्या प्रवचनांवरील 'वेदाज' या इंग्रजी ग्रंथाचा मराठी अनुवाद 'वेंदांची तोंडओळख' या नावाने प्रकाशित.
बाल-कुमार वाचकांसाठी लिहिलेले श्री आद्य शंकराचार्य यांचे चरित्र तसेच संकलित इंग्रजी बोधकथांचा संच प्रकाशित.
जैन मुनी प्रवीण ऋषीजी महाराज यांच्या प्रवचनांच्या काही भागांचे मराठी भाषांतर केले.

-----

# श्री कांची कामकोटीपीठाची 'गुरुपरंपरा'

| आचार्यांचे नाव | कोणत्या वर्षी समाधी घेतली | पीठावर असलेला काल |
|---|---|---|
| १. श्री शंकर भगवत्पाद | इ.स.पूर्व ४७६ | --- |
| २. सुरेश्वराचार्य | इ.स.पूर्व ४०६ | ७० वर्षे |
| ३. सर्वज्ञात्मश्रीचरणेंद्र सरस्वती | इ.स.पूर्व ३६४ | ४२ वर्षे |
| ४. सत्यबोधेंद्रसरस्वती | इ.स.पूर्व २६८ | ९६ वर्षे |
| ५. ज्ञाननंदेंद्रसरस्वती | इ.स.पूर्व २०५ | ६३ वर्षे |
| ६. शुद्धानंदमुनींद्रसरस्वती | इ.स.पूर्व १२४ | ८१ वर्षे |
| ७. आनंदानंदज्ञानेंद्र सरस्वती | इ.स.पूर्व ५५ | ६९ वर्षे |
| ८. कैवल्यानंद योगींद्रसरस्वती | इ.स. २८ | ८३ वर्षे |
| ९. कृपाशंकरेंद्रसरस्वती | इ.स. ६९ | ४१ वर्षे |
| १०. महेश्वरानंद सुरेंद्रसरस्वती | इ.स. १२७ | ५८ वर्षे |
| ११. शिवानंदचिद्घनेंद्र सरस्वती | इ.स. १७२ | ४५ वर्षे |
| १२. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. २३५ | ६३ वर्षे |
| १३. सच्चिद्घनेंद्रसरस्वती | इ.स. २७२ | ३७ वर्षे |
| १४. विद्याघनेंद्रसरस्वती | इ.स. ३१७ | ४५ वर्षे |
| १५. गंगाधरगीष्पतींद्रसरस्वती | इ.स. ३२९ | १२ वर्षे |
| १६. उज्ज्वलमहायतींद्रसरस्वती | इ.स. ३६७ | ३८ वर्षे |
| १७. बालगुरु सदाशिवेंद्रसरस्वती | इ.स. ३७५ | ८ वर्षे |
| १८. सुरेंद्रयोगीतिलकेंद्रसरस्वती | इ.स. ३८५ | १० वर्षे |
| १९. मार्तंडविद्याघनेंद्रसरस्वती | इ.स. ३९८ | १३ वर्षे |
| २०. मूकशंकरेंद्रसरस्वती | इ.स. ४३७ | ३९ वर्षे |
| २१. सार्वभौम गुरुचंद्रचूडेंद्रसरस्वती | इ.स. ४४७ | १० वर्षे |
| २२. परिपूर्णबोधेंद्रसरस्वती | इ.स. ४८१ | ३४ वर्षे |
| २३. सच्चित्सुखेंद्रसरस्वती | इ.स. ५१२ | ३१ वर्षे |
| २४. चित्सुखेंद्रसरस्वती | इ.स. ५२७ | १५ वर्षे |
| २५. सच्चिदानंदघनेंद्रसरस्वती | इ.स. ५४८ | २१ वर्षे |
| २६. प्रज्ञाघनेंद्रसरस्वती | इ.स. ५६४ | १६ वर्षे |
| २७. चिद्विलासेंद्रसरस्वती | इ.स. ५७७ | १३ वर्षे |
| २८. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. ६०१ | २४ वर्षे |
| २९. पूर्णबोधेंद्रसरस्वती | इ.स. ६१८ | १७ वर्षे |
| ३०. बोधेंद्रसरस्वती | इ.स. ६५५ | ३७ वर्षे |
| ३१. ब्रह्मानंदघनेंद्रसरस्वती | इ.स. ६६८ | १३ वर्षे |
| ३२. चिदानंदघनेंद्रसरस्वती | इ.स. ६७२ | ४ वर्षे |
| ३३. सच्चिदानंदेद्रसरस्वती | इ.स. ६९२ | २० वर्षे |
| ३४. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. ७१० | १८ वर्षे |
| ३५. चिद्सुखेंद्रसरस्वती | इ.स. ७३७ | २७ वर्षे |
| ३६. चित्सुखानंदेद्रसरस्वती | इ.स. ७५८ | २१ वर्षे |

| | | |
|---|---|---|
| ३७. विद्याघनेंद्रसरस्वती | इ.स. ७८८ | ३० वर्षे |
| ३८. अभिनवशंकरेंद्रसरस्वती | इ.स. ८४० | ५२ वर्षे |
| ३९. सच्चिद्विलासेंद्रसरस्वती | इ.स. ८७३ | ३३ वर्षे |
| ४०. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. ९१५ | ४२ वर्षे |
| ४१. गंगाधरेंद्रसरस्वती | इ.स. ९५० | ३५ वर्षे |
| ४२. ब्रह्मानंदघनेंद्रसरस्वती | इ.स. ९७८ | २८ वर्षे |
| ४३. आनंदघनेंद्रसरस्वती | इ.स. १०१४ | ३६ वर्षे |
| ४४. पूर्णबोधेंद्रसरस्वती | इ.स. १०४० | ३६ वर्षे |
| ४५. परमशिवेंद्रसरस्वती | इ.स. १०६१ | २१ वर्षे |
| ४६. सांद्रानंदबोधेंद्रसरस्वती | इ.स. १०९८ | ३७ वर्षे |
| ४७. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. ११६६ | ६८ वर्षे |
| ४८. अद्वैतानंदबोधेंद्रसरस्वती यांचेच दुसरे नाव चिद्विलासेंद्रसरस्वती | इ.स. १२०० | ३४ वर्षे |
| ४९. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १२४७ | ४७ वर्षे |
| ५०. चंद्रचूडेंद्रसरस्वती | इ.स. १२९७ | ५० वर्षे |
| ५१. विद्यातीर्थेंद्रसरस्वती | इ.स. १३८५ | ८८ वर्षे |
| ५२. शंकरानंदेंद्रसरस्वती | इ.स. १४१७ | ३२ वर्षे |
| ५३. पूर्णानंद सदाशिवेंद्रसरस्वती | इ.स. १४९८ | ८१ वर्षे |
| ५४. व्यासाचल महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १५०७ | ९ वर्षे |
| ५५. चंद्रचूडेंद्रसरस्वती | इ.स. १५२४ | १७ वर्षे |
| ५६. सर्वज्ञ सदाशिवेंद्रसरस्वती | इ.स. १५३९ | १५ वर्षे |
| ५७. परमशिवेंद्रसरस्वती | इ.स. १५८६ | ४७ वर्षे |
| ५८. आत्मबोधेंद्रसरस्वती | इ.स. १६३८ | ५२ वर्षे |
| ५९. भगवान्नामबोधेंद्रसरस्वती | इ.स. १६९२ | ५४ वर्षे |
| ६०. अद्वयआत्मप्रकाशेंद्र सरस्वती | इ.स. १७०४ | १२ वर्षे |
| ६१. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १७४६ | ४२ वर्षे |
| ६२. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. १७८३ | ३७ वर्षे |
| ६३. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १८१४ | ३१ वर्षे |
| ६४. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. १८५१ | ३७ वर्षे |
| ६५. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १८८० | ३९ वर्षे |
| ६६. चंद्रशेखरेंद्रसरस्वती | इ.स. १९०७ | १७ वर्षे |
| ६७. महादेवेंद्रसरस्वती | इ.स. १९०७ | ८ दिवस |
| **६८. श्रीमद् चंद्रशेखरेंद्रसरस्वती शंकराचार्यस्वामी महाराज (संचारी देव)** | **इ.स. १९०७ मध्ये पीठाधीश झाले. हे ६८वे पीठाधीश. ८ जानेवारी १९९४ रोजी समाधिस्थ.** | |
| ६९. श्री जयेंद्रसरस्वती स्वामीजी | इ.स. १९५४ मध्ये ६९वे पीठाधीश म्हणून नियुक्त झाले. | |
| ७०. श्री शंकरविजयेंद्रसरस्वती स्वामी महाराज | इ.स. १९८३ मध्ये ७०वे पीठाधीश म्हणून नियुक्त झाले. | |



हिंदू धर्माची, अधिक अचूक बोलायचे तर वैदिक किंवा सनातन धर्माची संकल्पना एका ग्रंथात मांडू पाहणे हे घागरीत सागर भरू पाहण्यासारखे आहे. हे कठीण काम थोर सत्पुरुषच करू जाणे. कांची कामकोटी पीठाचे ६८ वे शंकराचार्य पूज्यश्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी हे एक असे परमाचार्य होते की ज्यांनी आपल्या प्रवचनांमधून हिंदू धर्माच्या सर्व पैलूंवर अधिकारवाणीने प्रकाश टाकला आहे. परमाचार्य पूज्यश्रींची ती प्रवचने म्हणजेच हा ग्रंथ होय. त्यांची प्रगाढ विद्वत्ताच केवळ ग्रंथातून प्रकट झाली आहे असे नव्हे, तर त्यांच्याजवळील सहज जाणतेपण आणि सूक्ष्म दृष्टी यांचे दर्शनही येथे घडते. आधुनिक काळातील अन्य कोणा आचार्याने आपल्या धर्मशास्त्रांवर इतके सुबोध, विस्तृत प्रतिपादन केले असेल असे वाटत नाही.

परम सद्गुरूंनी चार वेद, सहा वेदांगे (षडंगदर्शन), मीमांसा, न्याय, पुराणे, धर्मशास्त्रे आदींच्या मूळ पाठांवर येथे चर्चा केली आहे. विविध विचारप्रणाली आणि दृष्टिकोन यांचे हे तत्त्वमंथन त्यांनी 'हिंदू धर्म' या एकाच सूत्रात गुंफण्याचा प्रयत्न केला आहे. प्राचीन विद्या ते अर्वाचीन ज्ञानाशी जोडू पाहतात आणि त्यात त्यांना ध्वनीमधील आध्यात्मिक आणि भौतिक असे समान पैलू आढळतात. या सर्वांचा 'ध्वनी' या प्रकरणात सविस्तर ऊहापोह करून ते वेदध्वनी का जतन केला पाहिजे हे स्पष्ट करतात.

एकंदरीतच, शाश्वत धर्माचा जो संकलित दृष्टिकोन येथे उलगडत राहतो त्यातून 'मोक्ष येथे आणि आत्ताच' हा मूळ वैदिक संदेशच अधोरेखित होतो.